महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

[त्रैमासिक]

५७

संपादक — के. नारायण काळे
बी.ए., एल्‌एल्‌.बी.

पौष १८६२

वर्ष १४ वें] जानेवारी १९४१ [अंक १ ला

# महाराष्ट्र साहित्य संमेलन

## रौप्यमहोत्सव (२५ वें) अधिवेशन, सोलापूर

महाराष्ट्र साहित्य संमेलन जसजसें जवळ येत चाललें आहे तसतशी तद्विषयक चळवळीस स्वागत-समितीतर्फे जोरांत सुरवात झाली आहे. कार्यकारी मंडळाच्या सभा दर आठवड्यास नियमितपणें होऊन निरनिराळ्या समित्या नेमल्या गेल्या आहेत.

संमेलनाच्या तारखा १२, १३, १४ अेप्रिल १९४१ ह्या निश्चित करण्यांत आल्या आहेत. कारण अीस्टरची सुट्टी ता. ११ ते १४ पर्यंत आहे. सुट्टीचा पहिला दिवस ता. ११ हा गुड्फ्रायडेच्या सुट्टीचा असल्यामुळे प्रतिनिधींच्या प्रवासास अुपयोगी पडावा म्हणून मोकळा ठेविला आहे.

ह्या सुट्टीमध्ये सवलतीचीं रेल्वे तिकिटें व झोन तिकिटें ह्यांचा फायदा प्रतिनिधींस व प्रेक्षकांस घेतां येअील.

या सुमारास सोलापुरास थोडा अुन्हाळा असतो ही गोष्ट खरी असली तरी पाहुणे-मंडळीस अुन्हाळ्याचा त्रास होअूं नये याासाठी स्वागतमंडळाकडून शक्य ते प्रयत्न केले जात आहेत.

M 581

स्थानिक नाटक-लेखकांकडून नाटक बसविण्याचें काम चालू आहे.

काव्यगायनाचा कार्यक्रम रौप्यमहोत्सवानिमित्त अपूर्व तऱ्हेने व वैशिष्ट्यपूर्ण रीतीने करावयाचा आहे.

परगांवच्या साहित्यप्रेमी लोकांनी स्वागत-समितीकडे सभासद, प्रतिनिधि व प्रेक्षक म्हणून आतापासून नांवें नोंदविण्यास सुरवात करावी.

महाराष्ट्रातील सर्व प्रमुख ठिकाणीं संमेलनाचीं प्रचारकेंद्रें अुघडण्यांत आलीं असून प्रचार करण्याचें काम चालू आहे.

सर्व महाराष्ट्र व बृहन्महाराष्ट्र यांतील सर्व साहित्यप्रेमी लोकांनी सोलापूर येथे भरणाऱ्या संमेलनाच्या रौप्यमहोत्सवाचा सोहळा पाहण्यास अवश्य अुपस्थित होअून संमेलन यशस्वी करावें अशी आमची आग्रहाची विनंती आहे.

महाराष्ट्र साहित्य परिषदेकडून म. सा. संमेलनाच्या अध्यक्षपदाच्या निवडणुकीसाठी ५ नांवें प्रसिद्ध व्हावयाचीं आहेत. तीं आमच्या हातीं येतांच अध्यक्षाच्या निवडणुकीचें काम स्वागतमंडळ हातीं घेअील.

द. श. मुद्गल
चिटणीस, महाराष्ट्र सा. संमेलन, सोलापूर.

---

# संलग्न संस्था वृत्त

## महाराष्ट्र वाङ्मय मंडळ, अुज्जयिनी

### नववा वार्षिकोत्सव (चिटणी. कडून)

महाराष्ट्र वाङ्मय-मंडळ, अुज्जयिनी, या संस्थेचा नववा वार्षिकोत्सव २३ व २४ नो. रोजीं साजरा करण्यांत आला. अध्यक्षस्थानीं नागपूरचे विद्वान साहित्यिक व सुप्रसिद्ध कादंबरीकार श्री. पु. य. देशपांडे यांची योजना करण्यांत आली होती. शनिवार ता. २३ रोजीं रात्रीं ८ वाजतां माधव कॉलेजच्या भव्य दिवाणखान्यांत अुत्सवास सुरुवात झाली. मुलींनी अीशस्तवन व स्वागत पद्य

[ कव्हर पान ३ वर पहा.

# वर्गणीविषयक माहिती

**म. सा. पत्रिकेची वार्षिक वर्गणी**—रु. ४॥ (ट. ख. सह)

**परिषदेचे सभासद व संलग्नसंस्था**— वा. व. रु. ३ (म. सा. पत्रिका विनामूल्य पाठविली जाते)

**पत्रव्यवहाराचा पत्ता**—महाराष्ट्र साहित्य परिषद्, टिळक रस्ता, पुणें २.

---



---

# सभासदांस विनंती

परिषदेचें नवीन वर्ष सुरू झालें. नियमाप्रमाणे सभासदांनी आपली वर्गणी वर्षारंभींच भरावयाची असते. सभासदांस सोयीचें पडावें म्हणून या अंकाबरोबर त्यांजकडून यावयाच्या वर्गणीचा आंकडा त्यांस स्वतंत्र विनंतीपत्रकाच्याद्वारें कळविला आहे. त्याप्रमाणे सभासदांनी आपली वर्गणी अवश्य पाठवावी अशी त्यांस विनंती आहे. मार्चअखेरपर्यंत वर्गणी न आल्यास अेप्रिलचा अंक सभासदांकडे व्ही. पी. ने पाठविला जाअील अिकडे सभासदांनी कृपेने लक्ष्य असूं द्यावें.

चिटणीस
म. सा. परिषद्.

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

वर्ष १४ वें ] अनुक्रमणिका [ अंक १ ला

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका



## वनभोजन*



शिलगावुन ही शेकोटी
शुष्क काटक्या जमवून
ओढ्याच्या रानांतून
घेर धरूनी ज्याभोतीं
काही हृदयें हरखून
हसलीं रमलीं मिसळून
स्थळ हें जागा ही तीच
जिथे परतलो हा मीच !

थंडीने गळुनी पानें
उघडीं झालीं हीं रानें,
आता भरुनी ये ऊर
भासुनिया हें कातार !

गेलीं वाळुन हीं गवतें,
वारें भवती भणभणतें,
दावी परि ही वनस्थली
जळकी जागा वाटोळी.

काड्यांचीं जळकीं टोंकें
अजून भवती मी देखें;
स्मारक एकच अखेरचें
आले गेले जे त्यांचें,
तोच खळखळे हा ओढा
जागा सोडुनिया थोडा;
जिथे येउनी नियमांनी
फराळ केले चौघांनी.

—परंतु त्यांच्यातिल दोघे
झाले परस्थ वैतागें,
तिसरा— निरोप घेऊन
गेला तो जगतांतून !

— ना. मा. सन्त

---

* कल्पना हार्डीच्या कवितेवरून.

# काव्य आणि सौंदर्यमीमांसा*

(ले०— श्री. बा. सी. मर्ढेकर)

सौंदर्याच्या मीमासेमध्ये अुत्पन्न होणाऱ्या विविध प्रश्नावर विचार करून त्यांसंबंधी अधिक खुलासा करून घेण्याच्या अुद्देशाने कलेचे चिकित्सक आणि सौंदर्याचे मीमासक यांच्या लेखनाकडे दृष्टि वळविली असता असें आढळून आल्यावाचून राहणार नाही की, त्यांनी काव्याला अितर ललितकलाच्या पंक्तीला आणून बसवल्यामुळे सौंदर्यमीमासेच्या प्रातात मोठ्याच गोंधळाची आयात झाली आहे. काव्य ही अेक ललितकलाच आहे, अशी कल्पना कां केली गेली, आणि नंतर त्या कल्पनेला अनुसरून सौंदर्यविषयक प्रश्नांचें विश्लेषण व चिकित्सा करताना किंवा त्यासंबंधी दाखले देताना, काव्याला सर्व कलांचें प्रतिनिधित्व बहाल करण्याचा मोह कसा अुत्पन्न होत गेला, या दोहोंचीं कारणें हुडकून काढणें हें फारसें कठिण काम नाही.

अर्थवाहन हें शब्दाचें कार्य आहे, आणि भावात्मक अर्थ (emotional meaning) वाहणारे शब्द हें काव्याच्या व्यवहारांतलें चलन आहे. भावात्मक अर्थाचें आपुलकीने, आत्मीयतेने आकलन करता येणें ही जीवनांतील आवश्यक बाब होय. अशा प्रकारचें शीघ्र आकलन आणि तदनुरूप प्रतिक्रिया याच्या अभावीं जीवमात्राला अनिरुद्ध जीवनकलहांत टिकाव धरणें किंवा स्वजातीची संतानपरंपरा स्थापणें अशक्य होईल. म्हणून या जीवशास्त्रीय प्रक्रियेला साहायक होणारें काव्यासंबंधीचें आकर्षण अगदी सहज आणि स्वाभाविक असून, मनुष्यमात्राची त्यासंबंधींची आस्था आणि आवड ह्याहि यामुळे सर्वव्यापी आणि चिरंतन आहेत. कलेचे आणि सौंदर्याचे मीमांसक हेहि ह्या आस्थेमध्ये अितराचे समभागी असल्यामुळे आणि अितर बहुसंख्य मानवाप्रमाणे तेहि काव्याच्या आकर्षणाने विचलित होत असल्यामुळे, सौंदर्यविषयक प्रश्नांचा अूहापोह करतांना दृष्टान्त देण्याची वेळ आली की, ते आपल्या मानव्यप्रधान (humanistic) प्राकृतिक वृत्तीच्या कलाला अनुसरून काव्याकडे धाव घेत असलेले दिसतात. दुसरें असें की, कोणतीहि चर्चा, अर्थात् सौंदर्याची सुद्धा, म्हटली म्हणजे ती शब्दातच केली जाणार; तेव्हा ज्यांना हीं शब्दरूपी भाषेचीं प्रतीकें आपल्या जोरदार आवाजाच्या बळावर पुनःपुनरुक्तीच्या अुपयोगाने किंवा अुच्चाराच्या मोहक लकबींनी, लीलेने खेळवतां वळवता येतात, ते सहजच लोकांचीं मनें आपल्या मतांनी भारून टाकून त्याच्या ठिकाणीं अेक प्रकारची मानसिक मोहनिद्रा अुत्पन्न करूं शकतात. आणि तशा अवस्थेत ते लोकहि त्याचीं तीं मतें बिनतक्रार मान्य करूं लागतात.

या मोहमयी सौंदर्यमीमासेचे प्रमुख प्रवर्तक अर्थात् कविच असतात. आणि काव्य ही देखील चित्र शिल्प-संगीत-नृत्य अित्यादि कलांसारखीच अेक कला असावी, अशी सामान्यपणें जी अेक मोहक कल्पना प्रचलित आहे, तिला अेक तर सौंदर्यविषयक कल्पनेची विशद मांडणी

*"ARTS AND MAN" मधील Poetry and Aesthetic theory या दुसऱ्या प्रकरणाचा श्रा. रा. भि. जोशी, एम्. ए. कृत अनुवाद.

करून किंवा दुसऱ्या रीतीने म्हणजे ज्या वाङ्मयेतर कलाकृति आपण पाहिल्या त्यांचा आपल्या-वर काय परिणाम आणि प्रतिक्रिया झाल्या याची नोंद करून, ते पुष्टि देतात. स्वाभाविकच त्यांच्या या पुष्टीमुळे वास्तविक पाहतां जी केवळ अेक उथळ स्वरूपाची लौकिक मोहक कल्पना, तिला अधिकृत अशा निश्चित मताची योग्यता प्राप्त झाल्यासारखी आपाततः वाटूं लागते; पण कवींच्या त्या कल्पनेला पुष्टि देणाऱ्या ज्या दोन रीती, त्यांमध्ये व्यक्त होणारा जो त्यांचा अनुभव, तो अर्थात्‌च काव्यात्मक असतो, भावात्मक असतो, सौंदर्यभावेतर (non-aesthetic) असतो; हें विसरून चालणार नाही.

परंतु कवितेसंबंधाचा मानवसहज फाजील पक्षाभिनिवेश आणि ललितकलांचा अेक सोपानक्रम असूं शकतो हें मान्य करण्याअैवजी काव्यालाच ललितकलेचा अेक प्रातिनिधिक नमुना म्हणून मानण्याकडे झुकणारा स्वाभाविक कल, यांना बेनिडिटो क्रोचेच्या Intuitional सौंदर्यमीमांसेमुळे अेक मोठा बळकट तात्त्विक पाठिंबा मिळाल्यासारखें झालें आहे. Ency-clopaedia Britanica च्या अगदी अलीकडल्या आवृत्तींत क्रोचेने लिहिलेल्या सौंदर्य-मीमांसेसंबंधीच्या लेखाचा आरंभ अेका कवितेच्या— म्हर्जिलच्या— परीक्षणाने झाला असून, त्या लेखाच्या दुसऱ्याच छेदकाचें पहिलें वाक्य, "वर कवितेसंबंधी जें म्हटलें तेंच चित्रकला, शिल्पकला, वास्तुकला, संगीत अित्यादि अितरहि सर्व कलांना लागू आहे." असें आहे. या दोन्ही गोष्टी क्रोचेच्या प्रणालींतील सौंदर्यमीमांसकांनी प्रतिपादिलेल्या सौंदर्यमीमांसाविषयक टीका-पद्धतीचें स्वरूप कसें आहे याच्या अुत्कृष्ट निदर्शक आहेत.

कलांचे कप्पे पाडून, त्यांचा परस्परांशीं संपर्क न येअूं देतां टीका करण्याची जी पद्धत त्याच्यापूर्वी रूढ होती तिला प्रतिक्रिया म्हणून क्रोचेला ही अमूर्त सौंदर्याची— भिन्नभिन्न स्वतंत्र ललितकलांच्या सीमा ओलांडणारी— कल्पना अुभी करणें कदाचित् आवश्यक झालें असेल आणि तें प्रसंगाला अुचितहि असेल; पण या कल्पनेची व्याप्ति किंवा स्वरूप काय आहे, याचा तर्काच्या कठोर कसोटीवर निर्णय केला नाही, तर सौंदर्यविषयक प्रश्नांच्या अूहापोहाचें साधन म्हणून तिचें महत्त्व संशयास्पदच राहील. वास्तविकपणें ज्या कामीं ही कल्पना वापरणें प्रयोजकपणाचें होअील त्याव्यतिरिक्त दुसऱ्याच कामीं ती लागू केली, तर सौंदर्यक्षेत्रात भलतांच गोंधळ आणि अनवस्थाप्रसंग निर्माण होअील. कारण मग यावरून साहजिकच असें निर्विवाद अनुमान निघाल्यासारखें होअील की, सौंदर्याच्या मीमांसेसाठी किंवा सौंदर्य-विषयक प्रश्नाचें साकल्याने विशदीकरण करण्यासाठी कोणतीहि अेक कला घेतली, तरी ती दुसऱ्या कोणत्याहि कलेअितकीच समर्पक होय; म्हणजे काव्य हें चित्रकलेपेक्षा काही अुणें आहे असें नाही किंवा संगीत या दोहोंपेक्षा सरस आहे असेंहि नाही ! विविध ललितकलांच्या ठिकाणीं कोणताच सामान्य धर्म नाही, असा अर्थात् माझा मुळीच अभिप्राय नाही. मला जें काही म्हणावयाचें आहे तें हें की, अेखाद्या विशिष्ट अुद्देशाने आणि विशिष्ट अतिभौतिक (metaphysical) किंवा अितर आत्मपर (subjective) पूर्वग्रहाच्या आधारावर काढलेली सौंदर्याची अर्करूप कल्पना, ही सौंदर्यशास्त्राच्या सबंध क्षेत्रावर प्रामाण्याने लागू करता येअील, किंवा त्या कल्पनेला अेखाद्या परमोच्च तत्त्वाच्या पदवीला चढवून तिजपासून काढलेलें अनुमान बिनबोभाट मान्य करता येअील, असें मानणें चुकीचें आहे व यामुळे क्रोचेच्या सौंदर्यमीमांसेची पद्धती सदोष आहे.

मानवी जीवन सर्वांत अधिक मूल्यवान मानण्याची आणि मानवी जीवनाचा प्रवाह संथ आणि निर्विघ्न करून त्याचा विस्तार वाढवण्याला कारण होणाऱ्या मनोभावनांना

सर्वांत अधिक महत्त्व देण्याची प्रवृत्ति, तिला कविवचनांचा मिळालेला पाठिंबा, तत्त्वज्ञानाने तिचें केलेलें समर्थन आणि सर्व कलांमध्ये काव्याला देण्यांत आलेलें प्रमुख स्थान, यांमुळे सौंदर्यविषयक सिद्धान्तांवर विपरीत परिणाम झाले आहेत. काव्याच्या आणि आपल्या व्यवहाराचें चलन अेकच, म्हणजे शब्द हेंच, असल्यामुळे प्रत्येकालाच काव्य समजतें; निदान आपल्याला समजतें अशी तो आपली समजूत तरी करून घेत असतो. त्याच्या दृष्टीने कवीच्या आणि आपल्या अनुभवांत जो कांही फरक असेल तो फक्त त्यांच्या व्यक्तिगत स्वरूपापुरता, अधिक सबळ किंवा निर्बल अशा परिमाणरूप प्रकारचा, मूलतःच भिन्न अशा रीतीचा नव्हे; तसेंच काव्य आणि इतर कला आणि कवीचा अनुभव आपल्या अनुभवापेक्षा मूलतः निराळा नसून तो केवळ अधिक संघटित आणि कमी निर्बल असा असतो असेंहि तो समजतो. याशिवाय यांच्यामध्ये त्याला आणखी अेक अगदी अुघड अुघड दिसणारें साम्य आढळून येतें. तें म्हणजे काव्य काय किंवा अितर कला काय, अेका ठराविक मर्यादित अर्थाने दोन्ही अुपयोगनिरपेक्षच होत, हें होय. यामुळे त्याला सर्व प्रकारच्या कलात्मक निर्मिति आणि सौंदर्यात्मक प्रक्रिया यांचा वाङ्मयनिर्मीतीच्या पदक्रमाच्या परिभाषेंत अनुवाद करण्याचा मोह होणें स्वाभाविक आणि अपरिहार्य होतें. अशा प्रकारचा अनुवाद सर्वांना संमत होईल अशा सफाईनें सहज करून दाखवतां येण्यासारखा असतो, व त्यापासून तो करून दाखविणाऱ्याला अेक प्रकारचा आभासात्मक, आयासरहित, सवंग आनंदहि मिळाल्यासा वाटतो; आणि त्यामुळे तो अेके काळचा मोह पुढे नेहमीची संवय होअून बसते.

काव्य ही अेक ललितकला आहे हें मी अमान्य करीत नाहीं. माझें म्हणणें अेवढेंच की, त्याची जात अितर ललितकलांपेक्षा निराळी आहे. काव्यापासून जो आनंद मिळतो तो दोन प्रकारचा असतो: अेक निव्वळ सौंदर्यमूलक (aesthetic) आणि दुसरा काव्यात्म (poetic) किंवा भावनात्मक (emotional). या दुसऱ्या प्रकारच्या आनंदामध्ये ज्या भावनांचा समावेश होतो त्यांचें पृथक्करण करून पाहतां त्या कमीजास्त प्रमाणात साधनरूप असल्याचें आढळून येतें. म्हणजे त्यांचें महत्त्व तन्निष्ठ नसून तदितर हेतु-निष्ठ असतें. तेव्हा ज्या अर्थाने काव्य हें ललितकला या संज्ञेला पात्र आहे– म्हणजे ज्या मर्यादेपर्यंत तें शुद्ध सौंदर्यमूलक आनंद देअू शकतें– त्या अर्थाने आणि त्या मर्यादेपर्यंतच काव्यनिर्मिति व काव्यप्रक्रिया या अितर ललितकलांची निर्मिति आणि प्रक्रिया यांच्या स्वरूपाच्या असूं शकतात; आणि या अर्थाने अितर ललितकलाकृतींची निर्मिति आणि प्रक्रिया यांचा अनुवाद काव्यनिर्मिति आणि प्रक्रिया यांच्या पदक्रमांत करण्यांत कांही स्वाभाविक हास्यास्पदता किंवा अनौचित्य नाही. परंतु असा अनुवाद करण्याचा प्रयत्न करण्यापूर्वी वाङ्मयात्मक प्रक्रिया आणि निर्मिति यांचें आमूलाग्र कठोर विश्लेषण करून त्यांच्या विविध अंगोपांगांच्या स्वरूपाचें यथायोग्य आकलन करून घेणें अत्यावश्यक आहे.

यासाठी यानंतरची पायरी म्हणजे हा पारिभाषिक पदक्रम अितर तत्सम सौंदर्यनिर्मिति आणि प्रक्रिया यांमधील कोणत्या पदांशीं तंतोतंत जुळतो हें पाहणें ही आहे; कारण चूक कदाचित् पहिल्याच पदामध्ये किंवा दुसऱ्याहि पदामध्ये घडून येअील. कदाचित् आपलें मूळ विश्लेषणच चुकीचें असेल; किंवा अेका प्रक्रियेचा पदक्रम दुसऱ्या प्रक्रियेच्या पदक्रमाशीं ताडून पाहतांना अेखादें पाअूल मागेपुढे झालें असेल आणि त्यामुळेंहि हीं पदें जुळत नसतील. पण बहुधा हीं दोन्ही कारणें अेकत्र येतात आणि बराचसा मिथ्या अर्थवाद आणि चुकीचा सौंदर्यानुवाद यांना कारण होतात. काव्यासंबंधींची अशी संदिग्ध पदक्रमजन्य कल्पना आणि काव्यमूलक अनुवाद-पद्धतीचा केला गेलेला हा अनधिकृत विस्तार, हीं जशीं सौंदर्यविषयक मीमांसेला शापरूप होअून

बसली आहेत; तशींच तीं अितर ललितकलाच्या संपूर्ण आणि योग्य रसास्वादाला देखील निरंतर अडथळा आणीत आहेत.

वाङ्मयात्मक प्रक्रिया आणि निर्मिति यासंबंधी सध्या रूढ असलेल्या विश्लेषणामध्ये संदिग्धता कुठे अुत्पन्न होते, हें शोधून काढायचें असेल किंवा यांमधील पदक्रमांची अितर सौंदर्यात्मक प्रक्रियेच्या पदक्रमाशीं जुळणी करीत असतांना जो विसंवाद झालेला आढळून येतो, त्याचें स्वरूप निश्चित करायचें असेल, तर सर्वांत अुत्तम मार्ग म्हणजे या काव्यनिर्मितीरूप प्रक्रियेच्या पदक्रमांतील मध्यमपदाचें म्हणजे माध्यमाचें स्वरूप पारखून पाहावें हाच. कारण अितर कोणत्याहि ललितकलेप्रमाणे काव्याच्या बाबतींतहि माध्यमासंबंधी सुस्पष्ट कल्पना असणें रसास्वादाला आवश्यक आहे. कोणतीहि सौंदर्यचिकित्सा 'शास्त्र' या पदवीला पात्र व्हायला हवी असेल तर त्यासाठी ही गोष्ट आधी केली पाहिजे. कोणत्याहि ललितकलेच्या माध्यमाचें नक्की स्वरूप ध्यानात आलें, म्हणजे अेक अत्यंत महत्त्वाचें अूहापोहाचें साधन हातीं आल्यासारखें होअील; आणि मग त्याच्या साहाय्याने त्या कलेची मीमांसा करीत असतांना तींतील धान्य कोणतें आणि भूस कोणतें, हें सुगमपणें पाहतां येअील.

सौंदर्यासंबंधीच्या अनेक सिद्धान्तांमध्ये जे प्रमाद, विरोध आणि गोंधळ दिसून येतात, त्यांचें कारण कलेच्या माध्यमासंबंधीची कल्पना निश्चित करून घेतली गेलेली नसणें हेंच आहे. अेकदा या बाबतींत मनुष्य गडबडला आणि कोणत्याहि विशिष्ट कलेच्या माध्यमाचे त्याला नीट आकलन झालें नाही की, त्याच्या हातून हल्ली दिसून येणारे सर्व हेत्वाभासरूप प्रमाद आपोआप घडून येतात. आपण अमुक अेका गोष्टीचें मर्मग्रहण करीत आहों या भ्रमांत मग्न राहून तो वस्तुतः दुसऱ्याच गोष्टीचें मर्मग्रहण करीत असतो. तो सौंदर्यासंबंधी नुसतें वक्तृत्वपूर्ण लेखन करील, पण त्याला वाटेल मात्र की, आपण कुशाग्र कलामीमांसेचा अत्युत्कृष्ट नमुना निर्माण केला आहे. डौलदार शब्दाच्या मदतीने कोड्याचा मांडा जरी करतां आला नाही, तरी त्यांच्या साह्याने सदोष चिकित्सा, नकली आनंद आणि भ्रमजन्य अुत्साह यांवर खाशी झूल पांघरतां येते.

कदाचित्, वरती मीं लोकांच्या ज्या चुकीकडे बोट दाखवलें आहे, तीच— निदान त्याच प्रकारची—चूक मी स्वतःच करीत आहें, असें काही लोकांना वाटण्याचा संभव आहे. किंबहुना त्याना असेंहि वाटेल की, मी अुगीचच राळ फेकून जाळ अुभा करतों आहें. कारण काव्याचें माध्यम काय, या प्रश्नाचें अुत्तर देण्यासाठी अेखादा तत्त्ववेत्ता अुतरला पाहिजे असें मुळीच नाही; कारण काव्याचें माध्यम 'शब्द' हें अगदी अुघड आहे, असें ते म्हणतील.

पण हें प्रकरण दिसतें तितकें सोपें नाही. यासाठीं अेखादा तत्त्ववेत्ता याविषयी काय म्हणतो तें पाहणे गंमतीचें होअील. शास्त्रीय दृष्टीने विचार करणाऱ्यांपैकीं अेक मुरब्बी आणि अत्यंत कुशाग्र बुद्धीने व निःसंदिग्धपणें विचक्षणा करणारे मानसशास्त्रवेत्ते प्रो. स्पिअरमन आपल्या Creative Mind या पुस्तकाच्या ८८ व्या पृष्ठावर म्हणतात :—

"आणि ज्याप्रमाणे तो (चित्रकार) आपल्या कार्यसिद्धीसाठी (स्वतःहून अितर अशा जड सृष्टीच्या निदर्शनासाठी) रंगद्रव्याचें माध्यम वापरतो त्याचप्रमाणे हा (वाङ्मयात्मक कलानिर्माता) शब्द, वाक्संप्रदाय अित्यादि वापरतो."

आणि लागोपाठ त्याच्या खालच्याच छेदकांत ते म्हणतात,

"चित्रकाराला जें सौंदर्य अभिप्रेत असतें तें मुख्यतः त्याच्या माध्यमाचें."

त्यांच्या लिहिण्याचा रोख मुख्यतः असा दिसतो की, चित्रकार आणि ललितसाहित्यिक यांचीं ध्येयें भिन्न आहेत. हीं दोन विधानें अेकमेकाशेजारीं ठेवण्यापलीकडे अधिक टीका करण्याची आवश्यकताच नाही; पण यावरून हें तावडतोब लक्ष्यांत येअील की, अत्यंत काटेकोर विश्लेषण करण्याबद्दल प्रसिद्ध असलेल्या माणसाच्या हातून सुद्धा जर असें अर्धवट, अुथळ विश्लेषण केलें गेलें, तर तें किती अनर्थावह गैरसमज अुत्पन्न करूं शकेल ! चित्रकला आणि ललितसाहित्य यांच्या माध्यमांचें प्रो. स्पिअरमन यांनी जर यथायोग्य विश्लेषण केलें असतें, तर ते सौंदर्यविषयक सिद्धान्तांतील सत्याच्या अधिक जवळ आले असते, आणि त्यांना कळून चुकलें असतें की, सर्व कलांचें (चित्रकला आणि काव्यसुद्धा)- कलात्मक ध्येय अेकच असतें आणि तें म्हणजे आपापल्या माध्यमांच्या सौंदर्याचा आविष्कार करणें. निरनिराळ्या कलामध्ये जी विभिन्नता दिसते, ती त्यांच्या माध्यमांची विभिन्नता असते. चित्रकारालामात्र आपल्या माध्यमाचें सौंदर्य साधावायचें असतें आणि कवीला दुसऱ्याच कशाचें तरी असतें असें मुळीच नाही.

हें पुस्तक बरेंचसें अलीकडलें आहे. पण आपण याच्याहि अलीकडचें अेक पुस्तक घेअूं. "स्फूर्ति म्हणजेच कविता; अेक स्वयंपूर्ण, स्वतंत्र, सर्वांगसंपन्न, अखंड असें पूर्णत्वच," या प्रो. ॲबरक्रॉम्बीच्या टीकाविषयक भूमिकेसंबंधी लिहिताना आपल्या Art of Experience या पुस्तकाच्या अेका तळटीपेंत प्रो. ड्यूअी अेक सूचक प्रश्न विचारतात- (आणि हा प्रश्न पाहतांच प्रतिपक्षी अगदी नामोहरम होअील अशी त्यांची कल्पना असावी असा आविर्भाव दिसतो,)- की, "जर कविता स्वयंपूर्ण आणि स्वतंत्र आहे, तर ती आपल्या आविष्कारासाठी शब्दांच्या माध्यमाची अपेक्षा करून त्याचा आश्रय कां घेते ?" आता या ठिकाणीं सुद्धा जर माध्यमाचें- म्हणजे शब्दाचें- यथार्थ स्वरूप लक्ष्यात घेतलें गेलें असतें, तर हा प्रश्न अशा रीतीने विचारलाच गेला नसता. कारण मग हा प्रश्न विचारणें हें कागद, लेखणी, शाअी यासंबंधी तसलाच प्रश्न विचारण्याअितकेंच निरर्थक आहे हें अुघड झालें असतें. अशा तऱ्हेचीं आणखी अुदाहरणें देण्याची कांही आवश्यकता आहे असें वाटत नाही.

आता आपण शक्य तितक्या संक्षेपाने काव्याचें माध्यम जे शब्द त्याचें खरें स्वरूप काय आहे हें पाहूं. शब्दाचीं मूलतः दोन अंगें असतात : (१) संवेदनात्मक, आणि (२) अर्थात्मक. पहिल्या दृष्टीने शब्द म्हणजे अेक नादरूप आविष्कार, श्रवणसंवेदनाचें अेक संघटित रूप, स्वर-व्यंजनाचा समूह असतो. पण भाषेमध्ये या नादरूप आविष्काराना स्वतःचें स्वतंत्र असें महत्त्व नसून दुसऱ्या कशाचीं तरी प्रतीकें म्हणून आहे. थोडक्यांत म्हणजे, शब्दाचें संवेदनात्मक अंग हें अर्थात्मक अंगाचें वाहक किंवा साहाय्यक असतें. स्वर-व्यंजनांच्या कोणत्याहि अेखाद्या संयोगाच्या अस्तित्वाचें समर्थन केवळ त्याच्या अर्थवाहकत्वामुळेच करता येअील. परस्परनिवेदनाच्या आवश्यकतेतून भाषा अुगम पावते आणि हें निवेदन अत्यंत सुकर करते. आपला परस्परव्यवहार अधिकाधिक कार्यक्षम व्हावा म्हणून माणसाने हिला घडवली आहे; आणि आपला विनियोग अधिकाधिक सौकर्याने व्हावा ही जी वाढत्या विचारसंपत्तीची अविरत मागणी ती ती पुरवीत असते.

अर्थाची अुत्क्रान्ति ही रचनात्मक (constructive) विचाराची अेक प्रक्रिया आहे. आणि विचार हा मूलतः मर्यादाबद्ध अशा संज्ञाशक्तीचा (consciousness) स्वभावधर्म आहे. ज्या क्षेत्रामध्ये संज्ञाशक्ति वावरते तें क्षेत्र आणि मर्यादाबद्ध संज्ञाशक्ति यांच्या परस्परसंघर्षातून विचार निर्माण होतो. आणि अशा प्रकारच्या संज्ञाशक्तीलाच अर्थाचें महत्त्व

किंवा अुपयोग ! पण हे संघर्षाचे प्रसंग जों जों अधिक येत जातात तों तों ते अधिकाधिक विविधरूप आणि जटिल होत जातात, आणि त्यांमधून निर्माण होणाऱ्या अर्थावरची संज्ञा-शक्तीची पकड अुत्तरोत्तर ढिली होत जाते, आणि त्याचा अुपयोग करण्यांत अेक प्रकारची अकुशलता आणि अनिश्चितता येते. ही मर्यादाबद्ध संज्ञाशक्ति जोंपर्यंत प्राथमिक अल्पविकसित अवस्थेंत असते, तोंपर्यंत कदाचित् तिला या अर्थांचा जसाच्या तसा अुपयोग करतां येत असेल; पण लवकरच अशी परिस्थिति अुत्पन्न होते की, या अर्थांचा सामाजिक व्यवहारांमध्ये अुपयोग करण्यासाठी सांठा करून ठेवण्याकरिता अेखादी सोयिस्कर, आटोपशीर, अशी पद्धत शोधून काढावी लागते. अशा रीतीनें प्राथमिक विचारांची घनता आणि व्याप्ति वाढत चालली म्हणजेच त्यांना अेखाद्या मुशींत ओतण्याची आवश्यकता अुत्पन्न होते आणि मग ते शब्दरूप धारण करून स्थिरावतात.

शब्दाचें नादरूप अंग हें त्याच्या अर्थरूप अंगाचें प्रतीक आहे, आणि अर्थाचें अेक व्यवहार्य वाहक म्हणूनच त्याचा अुपयोग केला जातो. शब्दाच्या या दोन अंगांचा संयोग हा मर्यादाबद्ध संज्ञाशक्तीला जसा वररूप तसाच शापरूपहि झाला आहे. ज्या जगामध्ये मनुष्याच्या अंगच्यासारखी अंशरूप आणि विभक्तरूप संज्ञाशक्ति नसेल त्या जगात अर्थांना स्थानच नाही. जी संज्ञाशक्ति विश्वरूप (universal) असेल, तिला प्रत्येक वस्तु हाच तिचा अर्थ आणि हेंच तिचें प्रतीक होअील. प्रतीक आणि अर्थ यांचा परस्परभेद आणि संयोग करणें तशा परिस्थितींत अशक्य आणि अनवश्यक होअील. सौंदर्यात्मक प्रक्रिया वाङ्मयात्मक प्रक्रियेशीं जुळवून घेतांना, हा अर्थ आणि प्रतीक यांमधील भेद आणि संयोग करण्याची आवश्यकता आणि या क्रियेचें स्वरूप, हीं पुरेशा सातत्याने आणि पुरेशा स्पष्टपणाने मनात बाळगलीं गेलेलीं नसतात, हें आपल्याला लवकरच दिसून येअील.

आता शब्दांच्या किंवा भाषेच्या या अर्थात्मक अंगाकडे सूक्ष्म दृष्टीने पाहिलें, तर त्यालाहि दोन अंगें आहेत असें आढळून येईल. अर्थबोध हा अेक मानसिक अनुभव असें मानलें, तर जीं दोन अंगें प्रतीत होतात तीं: अेक ज्ञानात्मक (cognitive) आणि दुसरें भावात्मक (affective ) अशीं होत. अर्थात् या दोहोंना अगदी निःसंदेहपणे विभागणारें असें अंतर त्यांच्यांत नाही, हें मानसशास्त्रातलें अगदी मामुली सत्य आहे; आणि जेव्हा अेखाद्याला अगदी मूलगामी असा दुसरा अेखादा युक्तिवाद करता येत नाही, तेव्हाच तो हा भेद पुढे करतो. तरी पण ज्ञानप्रधान आणि भावप्रधान अनुभवांमधल्या भेदाचें आकलन होणें फारसें कठीण नाही. आपल्या मानसिक अनुभवामध्ये जशा बुद्धिप्रधान (intellectual ) कल्पना किंवा सिद्धान्तात्मक अर्थ येतात, तसेच भाव (emotions) किंवा भावात्मक अर्थहि (emotional meaning) येतात, हा अगदी तीव्रतेने प्रत्ययाला येणारा जरी नाही तरी सहज आकलन होणारा भेद या ठिकाणीं लक्षांत ठेवला पाहिजे.

शब्दार्थाच्या या भावात्मक अंगाचें किंवा अनुभवाचेहि दोन प्रकार आहेत. त्यापैकी पहिल्या प्रकाराला शुद्ध किंवा स्वतंत्र (absolute) आणि दुसऱ्याला नैमित्तिक किंवा आनुषंगिक (contingent) भाव म्हणता येअील. अेखादा संवेदना-गुण किंवा अेखादा रचनानुबंध (pattern), रूपविशेष (Gestalt) किंवा संबंधसंघटना (organisation of relation) यांच्या जाणीवेबरोबरच तत्काल येणारे जे भावानुभव ते शुद्ध किंवा स्वतंत्र. अिंद्रियावगम्य (sensuous) अथवा रूपाकलानात्मक (formal) अशा कोणत्याहि अनुभवाचीं हीं नित्य

संबद्ध अंगें आहेत. आणि ज्या अर्थानें आपण 'वृद्ध माणसें हीं तरुणांपेक्षा अधिक अनुभवी असतात' असें म्हणतों, त्या अर्थाच्या 'जगाच्या अनुभवावर', पूर्वार्जित अनुभवांच्या संचयावर, हे भावानुभव अवलंबून नसतात. या भावासंबंधी मी अनेकवचनी प्रयोग करतों आहें खरा, पण खरोखर अेकवचनीच प्रयोग करायला पाहिजे. हा जो शुद्ध भाव आहे, त्याला आपण सौंदर्य-भाव असें नांव देअून अितर नैमित्तिक अथवा अनुषंगिक भावांना काव्यात्मक भाव म्हटलें, तर दोहोंतील भेद स्पष्ट होअील. या दुसऱ्यांना नैमित्तिक म्हणण्याचें कारण असें की, त्यांचें अस्तित्व विशिष्ट मानव व्यवहार व्यवस्थेवर अवलंबून असतें. विशिष्ट परिस्थितीच्या अस्तित्वावर आणि स्थायित्वावरच त्यांचें अस्तित्व संभवतें. अशा भावांचें महत्त्व अेवढेंच की ते प्राप्त परिस्थितीशीं प्रतिक्रियात्मक मानवी व्यवहार सुकर करतात. जर काही कारणानें विशिष्ट परिस्थिति बदलून विशिष्ट प्रतिकाराची आवश्यकता नाहींशी झाली, तर त्या प्रतिक्रियेला कारण होणारा तो भावहि संकोच पावत पावत नाहीसा होण्याच्या मार्गाला लागतो. स्त्रीदाक्षिण्ययुगामध्ये स्त्रीपुरुषसंबंधाशीं जे भाव निगडित झालेले दिसत असत, त्याच्या अस्तित्वाचें आज कांही कारण अुरलेलें नाही. ज्या जगामध्ये नागरशान्तता प्रतिष्ठापित झालेली आहे, आणि बलोपासना हें समाजाच्या विशिष्ट वर्गाचें राखीव क्षेत्र अुरलेलें नाही, त्या जगामध्ये स्त्रीदाक्षिण्याच्या भावनेलाहि खरें स्थान अुरलें नाही. आता स्त्रीदाक्षिण्याला कांही महत्त्व राहिलेंच असेल तर अेक शिष्टाचाराचा भाग म्हणून, त्यामुळे वागणुकीला जो अेक डौलदारपणा येतो त्यासाठी, किंवा त्याचा लैंगिक प्रवृत्तीच्या अुदात्तीकरणाला जो कांही अुपयोग होत असेल तेवढ्यापुरतें. तसेंच सोव्हिअेट नमुन्यावर अुभारलेल्या समाजपद्धतीमध्ये— जिथे असहाय मुलें आणि वृद्ध माणसें यांची काळजी सरकार घेतें— आअीबापें आणि मुलें यांच्यामध्ये दिसून येणाऱ्या वत्सलभावाची आवश्यकता राहणार नाही. हे भाव नष्ट होण्याचा संभव आहे असें वाटूं लागतांच जो निषेध आणि संताप व्यक्त केला जातो, त्यावरून अुलट मनुष्याची स्व-संरक्षक प्रवृत्ति कशी काम करते, आणि हे भाव खरोखर कसे केवळ आनुषंगिक आहेत हेंच सिद्ध होतें. काव्याची बाजू घेण्याच्या भरामध्ये मनुष्य स्वतःचीच फसगत करून घेअून बौद्धिक पेंचात कसा सांपडतो हें जर पाहावयाचें असेल, तर आअीबापांचें मुलांवरील निस्सीम प्रेम आणि त्यांसाठी त्यांचा स्वार्थत्याग यांचें महत्त्व आणि मुलांची पितृभक्ति आणि तत्संबंधी कर्तव्यपरायणता यांचें अुदात्त स्वरूप यांची प्रशंसा आणि स्तुति करणारीं किती कारंजीं तो अुडवतो, अर्थालंकारांच्या आणि वाक्सुमनांच्या किती पाट्या त्यांच्यावर तो अुधळतो, आणि त्यांची बाजू घेअून केवढ्या निषेधाचे आणि संतापाचे पलिते पाजळतो, अिकडे नुसतें लक्ष्य दिलें तरी या आनुषंगिक भावांना आपल्याला 'ममत्वयुक्त (interested) म्हणता येअील. कारण ते जीवशास्त्राच्या दृष्टीनें महत्त्वाचे आणि अुपयोगाचे असतात म्हणूनच ते आदरले जातात, अुलट सौंदर्य-भाव हा 'निर्मम' (disinterested) असतो, कारण त्याला कोणतेंहि जीवशास्त्रात्मक कार्य साधायचें नसतें. तसेंच या आनुषंगिक भावांना 'साधनात्मक'हि (instrumental)हि म्हणतां येअील. कारण ज्या परिस्थितींत त्यांचा अनुभव येतो तिच्या बाहेरचीं अुद्दिष्टें ते साधतात. अुलटपक्षीं सौंदर्य-भाव हा 'स्वान्त' (end in itself) आहे. कारण या भावाचा अनुभव येत असतांनाच त्याची अिष्टसिद्धिहि होते. सौंदर्यभावाचें महत्त्व हें असें स्वयंसिद्ध आहे.

मागच्या सगळ्या चर्चेचा सारांश आता आपण अेखाद्या तक्त्यासारखा मांडून पाहूं :




वरील विवेचनाच्या आधारावर मला जो मुद्दा मांडावयाचा आहे तो हा की, काव्याचें माध्यम शब्द– नाद आणि अर्थ या दोन्ही अंगाच्या दृष्टीने– नाहीत. शब्द म्हणजे "काव्यात्म-भावप्रधान अर्थ" असें जर समजलें तरच काय तें शब्दांना काव्याचें माध्यम म्हणता येईल. हीच गोष्ट आणखी स्पष्टपणें सांगायची तर असें म्हणावे लागेल की, 'भावप्रधान अर्थ' हें काव्याचें माध्यम आहे. या प्रकारचे अर्थ कवि वापरतो, वाकवतो आणि वळवतो; नाद किंवा बौद्धिक स्वरूपाच्या कल्पना या स्वरूपात वापरीत नाही. अेरवी निरपवादपणें शब्द हे काव्याचें माध्यम आहे असें म्हणणें म्हणजे नाद आणि बौद्धिक कल्पना यानाहि केवळ ज्ञानात्मक क्रियेचे भाग म्हणून हळूच चोरून आत आणण्यासारखें आहे. आणि त्यामुळे मग सौंदर्यमीमांसेमध्ये अनर्थावह परिणाम दृष्टीस पडतात. ते कसे हें मी आता पुढल्या छेदकात दाखवणारच आहें. जे कवि दुय्यम दर्जाचे असतात, ते दुय्यम दर्जाचे होण्याचें अेक कारण असें असूं शकतें की, ते कलाकृति निर्माण करीत असतात अेका प्रकारची आणि माध्यम वापरतात दुसऱ्या कलेचें; म्हणजे अुदाहरणार्थ, कविता करीत असताना कविच राहण्यात समाधान न मानतां ते संगीत-कुशल होण्याची आकांक्षा बाळगतात, आणि मग ना अिकडे ना तिकडे अशी त्याची स्थिति होते; किंवा त्याचें दुसरें कारण असें असतें की, त्याच्या ठिकाणीं बौद्धिक कल्पनाची परिणति भावामीचें अिंधन होअूं शकण्या अितपत झालेली नसते. पैकी दुसऱ्या कारणासंबंधी मी विवेचन करीत नाहीं, कारण त्या बाबतींत फारसा कुणाचा विरोध होईल असें वाटत नाही.

"या सत्य तत्त्वाचें सतत मनन करा, केव्हा तरी तीं तुमच्या ठिकाणीं भावरूपांत परिणति पावतील." असें कोलरिज म्हणतो; व आपल्या वर्ड्स्वर्थ वरच्या प्रबंधांत खऱ्या गूढवादी कवीसंबंधी बोलतांना, 'विचार हे त्याच्या भावाना (emotions) अनुरूप होतात, भाव विचारांना नव्हत,' असें सर वॉल्टर रालीने म्हटलें आहे.

परंतु अेकीकडे टेनिसन आणि स्विनबर्न् आणि दुसरीकडे ब्राअुनिंग, यांच्या भाग्यचक्रांना मिळालेली अुलटसुलट गति अुघड दिसत असताहि, काव्यामध्ये 'नादा'ला सुसंबद्ध स्थान नाही, या म्हणण्याला विरोध होईल यात शंका नाही. पण मी अगदी स्पष्टपणें सांगूं अिच्छितों की, काव्यामध्ये नादाला केवळ नाद म्हणून मुळीच काहीहि स्थान नाही. नादाचें नातें संगीताच्या प्रांताशीं आहे,ही गोष्ट अगदी पक्केपणीं मनात बागवली पाहिजे आणि ती केव्हाहि दृष्टिआड होऊं देता कामा नये. शब्दाच्या नादाना काव्यांत जी किंमत आहे ती केवळ प्रतीकात्मक, भावात्मक अर्थांचे वाहक म्हणून; अितर कोणत्याहि अंगभूत गुणामुळे नाही. तसें जें त्याचें महत्त्व आहे तें संगीतात.

ज्या अर्थाचें प्रतीक म्हणून परंपरेनें त्याला मानलें आहे त्या अर्थाचा विकास करण्याला, त्यांत भर घालण्याला, किंवा त्यावर जोर देण्याला जितपत शब्दाच्या नादरूपाचा अुपयोग होतो, तितपतच काव्यामध्ये त्याचें महत्त्व. परंतु दुय्यम दर्जाच्या कवींना आणि तिसऱ्या दर्जाच्या टीकाकाराना वारंवार असा मोह पडताना दिसतो की, वस्तुतः अप्रस्तुत असलेलें हें अंग ते काव्याच्या परिणामकारकतेच्या दृष्टीने अगदी अेक न्यायसिद्ध घटक मानतात. आणि अेखाद्या कवितेची ती नादमधुर आहे म्हणूनच स्तुति करतात; आपल्या विद्यार्थ्यांसमोर शेलीचें समर्थन करीत असतांना सर आर्थर क्विलरकूच म्हणाले की, "काव्याचे आणि त्याच्या तंत्राचे अभ्यासक या नात्याने आपल्याला या बाबतींत आणखी बोलता येईल; पण शेलेचें काव्य म्हणजे केवळ 'रिकाम्या भांड्याचा निनाद' अशा अर्थाने मात्र नव्हे; कारण आर्नल्ड् आणि स्विन्बर्न याच्या कौशल्यपूर्ण वादविवादातील सगळी टीका-प्रतिटीका, निंदा-स्तुति याच्या अेकंदर गोळाबेरजेचा कांहीसा तसाच परिणाम मनावर होतो." त्याचा हा निबंध फारच अुद्बोधक आहे; आणि त्यावरून हें नादाच्या महत्त्वाचें पिल्लूं काव्याच्या प्रांतात शिरलें, म्हणजे वाङ्मयाच्या रसग्रहणाला आणि टीकात्मक दृष्टीला किती विघातक होतें हें स्पष्ट दिसून येतें. आणि असें होणें स्वाभाविक आहे. कारण वस्तुतः काव्यामध्ये नाद हा केवळ आगंतुक, संकेतमान्य आणि अुघड अुघड अप्रस्तुत आहे.

खरी गोष्ट अशी आहे की, अमुक नादाच्या संयोगापासून अमुक अर्थ निघालाच पाहिजे असा काही नादधर्म नाही. कारण अेकच अर्थ निरनिराळ्या भाषामध्ये निरनिराळ्या नादसंयोगाकडून व्यक्त केला जातो. किंबहुना अेकाच भाषेंत सुद्धा असा प्रकार दिसून येतो. नाही तर समानार्थक शब्दच दिसले नसते. याच्या अुलट अेखाद्या विशिष्ट नादसंयोगाचा (शब्दोच्चाराचा) अर्थ अेका भाषेंत अेक आणि दुसऱ्या भाषेंत अगदी वेगळा होअूं शकतो; आणि कधी कधी अेकाच भाषेंत सुद्धा असें होतें.

"—murmur of flies on Summer eves" या ओळींतील murmur या शब्दाचा नाद अिथे योग्य अर्थाचा वाहक ठरतो. कारण त्या शब्दोच्चाराच्या अनुषंगाने अिंग्लिश माणसाच्या मनात परंपरेने काही कल्पना ठसलेल्या आहेत, म्हणजे हा परिणाम केवळ योगायोगाचा आहे. याव्यतिरिक्त या शब्दाच्या केवळ नादामध्ये असा काही गुण नाही की, ज्यामुळे अमुक अर्थ किंवा अमुक कल्पना सिद्ध झाल्याच पाहिजेत. हा शब्द अैकून अेखाद्या महाराष्ट्रीय माणसाला अगदी निराळ्याच अर्थाचा बोध होअील. तसेंच 'wail' (वेल) या शब्दाच्या अुच्चाराने अिंग्रजी आणि मराठी भाषांत अगदी निराळ्या अर्थाचा बोध होतो. भाषेमध्ये शब्दाच्या नादाचें कार्य काय, हें काही जोड्या घेअून दाखवता येअील. फ्रेंच शब्द Paris (पारी) आणि अिटालियन pari (पारी), अिटालियन para (पारा) आणि मराठी 'पारा'; फ्रेंच bien (बिया) आणि मराठी 'बिया', या प्रकारच्या आणि अेकाच भाषेंत अेकाच शब्दोच्चाराचे अनेक अर्थ होअूं शकतात, या विधानाला पोषक अशीं आणखी अुदाहरणें वाचकानासुद्धा पुष्कळ गोळा करता येतील.

अर्थ आणि नादोच्चार हीं काव्यामध्ये परस्परानुकूल असलीं पाहिजेत, या तत्त्वाचें मर्म जाणण्यासाठी अर्थ आणि नादोच्चार यातला भेद लक्ष्यांत घेतला पाहिजे; आणि काव्यामध्ये फक्त अर्थालाच महत्त्व आहे, हेंहि मनात वागवायला पाहिजे. जिचा सामान्यतः फार अुदो अुदो होतो अशा हल्लीच्या 'नादमधुर' कवितेचें जीवित प्रायः क्षणभंगुर असतें, याचें कारण म्हणजे काव्याच्या माध्यमाच्या स्वरूपासंबंधी योग्य कल्पना नसणे; कारण जेव्हा जेव्हां अेखादा

कलावंत किंवा कवि आपल्या साधनसाहित्याच्या अप्रस्तुत किंवा दुय्यम महत्त्वाच्या गुणांच्या (aspects) आहारीं जाऊन आपल्या योग्य माध्यमाशीं विश्वासघात करतो, तेव्हा तेव्हा तो विस्मृतीच्या दरींमध्ये स्वतःचा कडेलोट करून घेत असतो. आणखी अेक पाऊल पुढे जाऊन असेहि म्हणता येअील की, नादोच्चार हा काव्यामध्ये अप्रस्तुत आणि त्याच्या कक्षेच्या बाहेर आहे अेवढेंच नव्हे, तर नादोच्चाराची परिणामक्षमता– ती सूक्ष्म असेल तर– जाणवणें हें सुद्धा त्या काव्याच्या भावात्मक अर्थांच्या रचनाबंधाचें (pattern) आधीं आकलन होण्यावर आणि त्या आकलनाच्या स्वरूपावर अवलबून असतें. डॉ. रिचर्ड्सच्या Practical Criticism या पुस्तकांतील सहाव्या कवितेला जोडलेलें प्रास्ताविक, त्यात केलें गेलेलें विश्लेषण, आणि त्यांपासून निघणारीं छंदोविषयक अनुमाने, हीं पाहिलीं असता मी म्हणतों त्याची सत्यता वाचकाना पटेल. खाली दिलेल्या पहिल्या दोन ओळींच्या नाजूक यमकावर त्यानी केलेलें भाष्य विशेष अुद्‌बोधक आहे. त्या ओळी अशा—

"Margaret! are you grieving
For golden grove unleafing?"

जोंपर्यंत नादाचें माधुर्य हें साहचर्याच्या किंवा अितर साधनांच्या किमयेमुळे भावात्मक अर्थाच्या सौंदर्यामध्ये रूपान्तरित होत नाही, तोंपर्यंत त्याची दखल घेण्याची काव्याला कांहीहि आवश्यकता नाही. शब्दाच्या नादोच्चाररूप अंगाचें केवळ नाद म्हणून काव्यात कांही महत्त्व नाही. शेक्सपिअर किंवा डांटे यांच्याहिपेक्षा अधिक नादमधुर पद्यरचना करणारे 'यमकये' पुष्कळ असूं शकतील! परंतु महाकवि हे भावकवींपेक्षा अधिक श्रेष्ठ असतात, ते त्यांची रचना अधिक नादमधुर असते म्हणून नव्हे, तर आपल्या काव्यांमध्ये ते भावात्मक अर्थांची (emotional meaning) अधिक भव्य, अधिक जटिल पण त्याबरोबरच अधिक सुसंबद्ध रचना यशस्वी रीतीने निर्माण करतात म्हणून. संगीतामध्ये वास्तविक केवळ स्वर आणि स्वरानुबंध यांनाच महत्त्व असतें, पण त्यांत लोक भावात्मक अर्थ शोधून काढूं पाहतात, आणि भावात्मक अर्थांच्या अभिव्यक्तीसाठींच निर्माण झालेल्या काव्यामधून मात्र नादमाधुर्याचा अेखादा थेंब कां होअीना, पण तो पिळून काढण्याची अगदी पराकाष्ठा करतात, असा मनुष्यस्वभाव विपरीत आहे.

वर जें मीं विश्लेषण केलें आहे, तें माझें स्वतंत्र असें नाही; त्याला पूर्णता आणणें, त्यावर जोर देणें आणि काव्याच्या प्रांतांतला केवळ नादोच्चाराचा हक्क निरपवादपणें नाकारणें, हें मात्र मीं केले आहे. या विवेचनातला सगळ्यांत महत्त्वाचा टप्पा पुढे आहे. तो म्हणजे सौंदर्यनिर्मितीची प्रक्रिया वाङ्मयनिर्मितीच्या प्रक्रियेशीं जुळवून घेतांना जो विसंवाद अुत्पन्न होतांना दृष्टीस पडतो, तो वरच्या विश्लेषणाच्या साहाय्याने स्पष्ट करणें, आणि शक्य तर नाहीसा करणें. सौंदर्यनिर्मितीची प्रक्रिया आपल्याला सामान्यतः खालीलप्रमाणे मांडून दाखवतां अेईल.

कलावंत : माध्यम : सौंदर्य

आता या ठिकाणीं आपण विशिष्ट कलाचे व्यवच्छेदक घटक मांडून पाहूं. आधी आपण चित्रकला घेअूं या.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| कलावंत | : | माध्यम | : | सौंदर्य |
| चित्रकार | : | वस्तुजाताचें दृग्गोचर अंग | : | सौंदर्य |
| | | (रंग, रेषा, घनता अि.) | : | |

आता काव्य घेअूं.

कवि : भावात्मक अर्थ : सौंदर्य
(emotional meaning)

माध्यमाचें सौंदर्य हें त्याच्या संघटनेंतून-रूपरचनेच्या नियमानुरूप योजनेंतून-आविष्कृत होतें. आता आपण प्रो. स्पिअरमनच्या विधानाकडे वळूं. काव्य आणि चित्रकला यांच्या माध्यमासंबंधीच्या आपल्या कल्पना निःसंदिग्ध नसतील तरच आपण काव्य आणि चित्रकला यांचीं ध्येयें भिन्न आहेत असें म्हणूं. रंगद्रव्य (pigments) हें चित्रकलेचें माध्यम आहे, असें जर आपण म्हटलें, तर शब्द हें काव्याचें माध्यम आहे, असें म्हणावें लागेल, आणि मग आपण गोंधळ आणि संदेह यांच्या अुताराला लागलोंच असें म्हणायला हरकत नाही; कारण अेकदा आपण आपल्या मध्यमपदामध्ये (middle term) अप्रस्तुत घटकाना प्रवेश करूं दिल्यानंतर मग अमुक हवा आणि अमुक नको, असा निर्बंध कुठे, कसा आणि कोणत्या तत्त्वावर घालणार? या कल्पनेप्रमाणे चित्रनिर्मितीची प्रक्रिया अशी ठरेल:

चित्रकार : रंगद्रव्य : सौंदर्य

आता याच भूमिकेवरून वाङ्मयनिर्मितीची प्रक्रिया मांडूं. आपली पहिलीं दोन पदें :

कवि : शब्द

हीं आलीं. आता तिसरें पद आपण अर्थ असें माडणार. पण तसें केलें तर 'शब्दा'मध्ये अेका-परीने 'अर्था'चा अतर्भाव झालेला असतो- जसा 'रंगद्रव्या'मध्ये 'सौंदर्या'चा झालेला नसतो- हें आपण विसरल्यासारखें होअील. हीच गोष्ट आपण दुसऱ्या रीतीने मांडू शकूं. आणि या खेपेला वाङ्मय आधी घेअूं :

कवि : शब्द : अर्थ

आता या भूमिकेवरून चित्रनिर्मितीची प्रक्रिया अशी माडावी लागेल :

चित्रकार : रंगद्रव्य : अर्थ

या ठिकाणीं हेत्वाभास मध्यमपदामध्ये आहे हें अुघड आहे. या दुसऱ्या प्रक्रियेंतील 'रंगद्रव्य' हा शब्द पहिल्यादा माडून दाखविलेल्या प्रक्रियेंतील दुसऱ्या व तिसऱ्या पदाशीं मिळून समानार्थक ठरतो. अेकदा आपण पहिल्या प्रक्रियेमध्ये अेका पदाचे दोन विभाग केले तर दुसऱ्या प्रक्रियेमध्ये तसे करणे ओघानेच येतें. म्हणजे आपल्याला या दोन प्रक्रिया अश माडल्या पाहिजेत :

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| कवि | : | शब्द | : | अर्थ | : | सौंदर्य |
| चित्रकार | : | रंगद्रव्य | : | रंग | : | सौंदर्य |

आपली नेहमी अेक चूक होते ती अशी की, आपण काव्यांत जसे शब्दांचे अर्थ शोधतों तसे चित्रांत रंगांचे अर्थ पाहण्याचा प्रयत्न करतों. पण शब्द हे जसे अर्थांच्या आवि-ष्कारासाठी वापरले जातात, तसें रंगद्रव्य हें रंगाच्या आविष्कारासाठी वापरलें जातें. रंग अेखाद्या अर्थाच्या आविष्कारासाठी वापरला जात नाही. शब्द हे जसे मनुष्याने अर्थबोधा-साठी घडवले तसे कांही त्याने रंग हे अर्थबोधासाठी घडवले नाहीत. 'अर्थ' नाही तर 'शब्द' नाही, असें आपल्याला म्हणता येअील; पण 'अर्थ' नाही तर 'रंग' नाही, असें कांही आपल्याला म्हणतां येणार नाही. 'हिरवा' या शब्दाचा अर्थ हिरवा रंग असा होतो. हिरवा रंग किंवा हिरवेपणा याच्या संवेदनेची कल्पना जर आपल्याला अेखाद्याच्या मनांत जागृत करायची नसती, तर त्या अर्थाचा वाचक असा हा शब्दोच्चार अस्तित्वातच आला नसता. पण 'हिरवेपणा'

किंवा 'हिरवा रंग' हा स्वतः अेखाद्या अर्थाचा वाहक आहे असें मुळीच नाही. आता 'हिरवा रंग' म्हटल्यावर किंवा पाहिल्यावर साहचर्यानें आपल्या मनात अितर कल्पना येतात हें खरे आहे; पण हीं आपल्या कल्पनेनें त्यावर चढवलेलीं पुटें आहेत. या आगंतुक कल्पना आपण विसरलों किंवा आपल्या मनातून घालवून टाकल्या तरीसुद्धा हिरवा रंग हा हिरवाच राहील. पण 'हिरवा' या शब्दाने होणारा अर्थबोधच जर नाहीसा झाला, तर तो शब्दच आपल्या कोशांतून नाहीसा होअील.

तेव्हा रंगाच्या बाबतींत अर्थ हा जसा केवळ गौण, संकेतजन्य असतो, तसाच शब्दांच्या बाबतींत विशिष्ट नाद किंवा अुच्चार हा सुद्धा गौण किंवा संकेतजन्यच आहे. हा परस्परसंबंध जर कोष्टकरूपाने माडावयाचा झाला तर तो :—

अर्थ : शब्द : अर्थ : रंग

असा न माडतां

अर्थ : शब्दः : रंग : . रंगद्रव्य

असा माडला पाहिजे. रंगाचा अर्थ काय हें जर आपण पाहूं लागलों, तर मग अर्थाचा अर्थ काय हेंहि आपल्याला पाहावें लागेल. म्हणजे

| | | | |
|---|---|---|---|
| चित्रकार : | रंगद्रव्य : | रंग : | अर्थ |
| कवि : | शब्द : | अर्थ : | अर्थ (अर्थाचा) |

असें म्हणावें लागेल. आणि तें अगदी न्यायसिद्ध होअील. परंतु या ठिकाणीं अुद्‌भवणारा प्रश्न (अर्थाच्या अर्थाचा) हा सामान्यपणें समजल्या जाणाऱ्या अर्थाचा नसून त्याच्या तात्त्विक चिकित्सेचा आहे. आणि या दृष्टीने जर या प्रश्नाचा विचार केलेला पाहायचा असेल, तर संवेदनाच्या मानसशास्त्रावरचें (psychology of Sensations) अेखादें पुस्तक आणि ऑग्डन आणि रिचर्डस् याचें The Meaning of Meaning हीं पुस्तकें पाहिलीं असतां भागेल.

वरील विवेचनाचा साराश आपल्याला असा माडता येअील :




किंवा

अर्थ + अर्थाचे वाहक — शब्द.

रंग + रंगाचे वाहक — रंगद्रव्यें.

शब्दाचें अिंद्रियगोचर— म्हणजे नादरूप— अंग, हें केवळ प्रतीकात्मक, तैल किंवा जलवर्ण हीं जशीं रंगाचीं वाहक त्याप्रमाणें केवळ अर्थाचें वाहक, असतें; शब्दाच्या बाबतींत नादोच्चार, आणि रंगाच्या बाबतींत तैल किंवा जलवर्ण हीं केवळ साधनें आहेत, तीं कितीहि अपरिहार्य असलीं तरी साधनें म्हणूनच; सौंदर्यनिर्मितीच्या प्रक्रियेशीं परमार्थतः त्यांचा अवश्यरूप संबंध नाही. ही गोष्ट लक्ष्यात घेतली म्हणजे वाङ्मयनिर्मितीची प्रक्रिया आणि सौंदर्यनिर्मितीची प्रक्रिया याची सागड घालताना अुत्पन्न होणारा विसंवाद आणि त्याचें अनर्थावह स्वरूप हीं तावडतोब विशद होतात. या ठिकाणीं चित्रकलेसंबंधी जें विवेचन केलें आहे तेंच अितर ललितकलांसंबंधीहि त्याच्या विविध माध्यमाना अनुलक्षून करतां येअील. अेकदा

आपण या विसंवादापासून लांब राहण्याची खबरदारी घेतली, म्हणजे मग काव्य-निर्मितीच्या प्रक्रियेवरून काढलेलीं अनुमानें सर्व ललितकलांचीं प्रतिनिधिरूप मानण्याला कांही प्रत्यवाय नाहीं; आणि मग आपल्याला प्रतिनिधिरूप कला आणि आदर्श (abstract) कला यांच्या द्वंद्वाच्या आखाड्यात उतरण्याचीहि आवश्यकता राहणार नाही; किंवा आपल्या मनांत सौंदर्यनिर्मितीच्या प्रक्रियेविषयी गैरसमजुतीहि राहणार नाहीत; कारण मग काव्याच्या भावात्मक सामर्थ्याला आधींपासून वश होऊन त्याच्या प्रक्रियेंत अंतर्भूत होणाऱ्या पदक्रमाच्या अनुरोधाने अितर कलातील सौंदर्यनिर्मितीच्या प्रक्रियेचा अनुवाद आपण करणार नाही.

काव्याची जर अशी निःसंदिग्ध चिकित्सा झाली आणि त्याबरोबरच विविध ललित-कलांच्या माध्यमांचें सम्यग् विश्लेषण झालें तर सौंदर्यमीमांसेमध्ये अेक प्रकारची सैद्धान्तिक अेकता येईल, आणि तिच्यापासून जीं तत्त्वें निघतील त्याचा अधिकार सबंध कलासृष्टीवर निरपवाद चालेल. अशा विश्लेषणाच्या आधारावरच आपल्याला सौंदर्यमीमांसेमध्ये शास्त्रीयता आणता येअील, आणि टीकात्मक निर्णयांमधली बजबजपुरी आणि असंबद्धता नाहीशी करतां येअील. वाङ्मय आणि अितर ललितकला यांच्या रसास्वादामध्ये जें अंतर असल्यासारखें दिसतें तें नाहीसे करायचें असेल, तर तें तत्त्वज्ञानाच्या हातचलाखीने नाहीसें होणार नाही; त्यासाठी या दोन्ही प्रकारच्या निर्मितीच्या मुळाशीं असणारी रचनात्मक प्रक्रिया तत्त्वतः अेकच आहे हें ओळखलें पाहिजे. परतु हें घडायला हवें असेल आणि सौंदर्यमीमांसेला चिकटलेले काव्याचें शापरूपत्व नाहीसें व्हायला हवें असेल, तर काव्याची भावात्मकता द्विविध आहे ही गोष्ट आधी ओळखायला पाहिजे, म्हणजे काव्याचें माध्यम असलेले विविध भाव आणि काव्या-पासून निर्माण होणारा विशिष्ट व अनुपम असा सौंदर्यभाव यामधील भेद आपल्याला स्पष्ट झाला पाहिजे.

---

# फेरफटका

( ले०— श्री. ना. गो. चापेकर )

ठाणें जिल्हा हा अितिहासप्रसिद्ध आहे. महाराष्ट्रांत दुसरीकडे अितिहासप्रसिद्ध स्थळें नाहीत असें नाही. महाराष्ट्र हा मराठयांच्या पराक्रमाचें स्थान असल्यामुळे येथील भूमीच्या प्रत्येक रजःकणात अितिहास भुरलेला आहे. त्याप्रमाणे ठाणे जिल्ह्यांतहि पाश्चात्य लोकांवर विजय संपादन करणाऱ्या चिमाजीअप्पाच्या पराक्रमाची साक्ष वसअी किल्ला देत आहे. परंतु ह्या अर्वाचीन अितिहासापेक्षा प्राचीन अैतिहासिक प्रसंगांनी ठाणें जिल्ह्याला महत्त्व प्राप्त झालें आहे. परशुरामाच्या साम्राज्याचें सीमाशहर जें शूर्पारक तें ह्याच जिल्ह्यांत आहे. कान्हेरी येथे लेण्याच्या रूपाने बौद्धांनी आपलें स्मारक करून ह्या जिल्ह्याला मोठेपणा दिला आहे. सोपाऱ्याचा विटाचा स्तूप हा बौद्धांनी ह्या जिल्हयांत केलेल्या धर्मप्रसाराची ग्वाही देत आहे. ह्याशिवाय वज्रेश्वरीचे अून पाण्याचे झरे परस्थांना ह्या जिल्हयांत आकृष्ट करून घेण्यास कारणीभूत झाले आहेत. त्याचप्रमाणे कोळी राजा असलेलें जुनाट राज्य ह्याच जिल्हयांत मोडतें.

जव्हारचें राज्य हें मराठेशाहीच्या पूर्वीपासून म्हणजे अि.स.१३४३ च्याहि अगोदरपासून आहे. ह्या राज्याचा संस्थापक जयाबा मुकणे नावाचा कोळी होता. जयाबाचा मुलगा नेमशहा ह्याला शहा ही पदवी अि. स. १३४३ मध्ये महमद तघलखाकडून मिळाली आहे. आणि तेव्हापासून हे हिंदु राजे आपल्या नावापुढे शहा हें अुपपद मोठ्या आढ्यतेने लावीत असतात ! म्हणून ह्या राजाचीं नावें विक्रमशहा, पतंगशहा, कृष्णशहा अशीं हिंदुमुसलमानी स्वरूपाचीं आढळतात. अेवढेंच नव्हे तर 'शहा'दानाच्या ताम्रपटापासून जव्हारने आपला स्वतंत्र शक सुरू केला ! हा शक बदलावा व शहापदवीचा त्याग करावा हें अद्यापि जव्हाराधिपतींच्या मनातसुद्धा येत नाहीं ! अि. स. १९४१ म्हणजे जव्हार शक ५९९ होय. मागसलेल्या राज्याला हा मागसलेला शक मानवणें स्वाभाविक आहे ! हा शक ५ जून म्हणजे मृगसालापासून सुरू होतो.

जव्हार संस्थानची लोकसंख्या सुमारें ५४००० असून १०८ गावाचें हें राज्य आहे. अुत्पन्नहि साडेतीन लाखापेक्षा अधिक नाही. ह्यावरून माणशीं सहा रुपये कर द्यावा लागतो असें कोणी म्हणेल; परंतु वारली, कोळी, कातोडी ह्यासारख्या अर्धनग्न जंगली लोकांनी वसलेल्या ह्या राज्यात प्रत्येक माणमाने अितका कर देणें अशक्य आहे. माणशीं दोन रुपये अुत्पन्न नसणाऱ्या लोकाना अितका कर पेलणें शक्य नाही. आयतें अुत्पन्न देणारें जंगल संस्थानात असल्याकारणाने ही संपत्तीच परमेश्वराने संस्थानाधिपतींना देअून ठेविली आहे. जमिनीचें अुत्पन्न सगळयाच राज्यकर्त्यांना मिळतें. जमिनीव्यतिरिक्त अुत्पन्नाच्या दुसऱ्या बाबी असणारीं दक्षिणी संस्थानें थोडीं. जंगलामुळें हें संस्थान निष्कर्जी असून लाखाच्या घरात अुलट संस्थानची शिलक आहे. हें संस्थान लोकाकरता नसून राजाकरता आहे असें म्हणण्यास हरकत नाही. संस्थानची प्रजा अत्यत अशिक्षित व मागसलेली. ह्या प्रजेकडून फक्त जमीन लावण्याचें काम होतें. आणि त्यामुळे माऱ्याच्या रूपाने सरकारास अुत्पन्न मिळतें. प्रजा नसती तर जमीन ओस गेली असती व सरकार दरिद्री झालें असतें. प्रजेच्या ह्या बहुमोल कामगिरीची जाणीव जव्हार सरकारला असल्याचें चिन्ह बाह्यतः तरी दिसत नाही. जंगलात सागादि वृक्षांची अुपज व वाढ नुसत्या पावसाने आपोआप होते. त्याकरता मानवी श्रमाची आवश्यकता फारशी लागत नाही. जव्हारला पावसाचें मान ११५ अिंच आहे, व खुद्द जव्हार गाव १५०० फूट अुंचीवर

असल्यामुळे तेथील हवा अुन्हाळ्यात फारशी तापदायक होत नाही. अेकंदरींत संस्थानांत सुधारणा करण्यास पुष्कळ अवसर आहे ह्यात संशय नाही. ५०० वर्षांपूर्वी प्रजेची जी स्थिति होती तींत ५०० व्या अंशाने तरी सुधारणा झाली आहे काय ह्या प्रश्नाला अुत्तर देणें अधिकाऱ्यांना कठीण जाअील. अभिवृद्धि करण्यास राजा सत्प्रवृत्तीचा व दिवाण चतुर, विद्वान आणि स्वतःपुढे ध्येय ठेवणारा असा असावा लागतो. परंतु बहुतेक ठिकाणीं ह्या दोहींचा अभावच दिसून येतो. दिवाण नेमताना त्याच्या पात्रापात्रतेचा कोणीहि विचार करीत नाही. पेन्शनर डे. कलेक्टर ह्याची निवड दिवाणाच्या जागीं बहुधा केली जाते. पण आपल्या संस्थानच्या गरजेचा व डे. कलेक्टरच्या गुणाचा मेळ बसतो कीं नाही हें कोणीच पाहत नाही. कोणताहि डे. कलेक्टर दिवाण होण्याला लायक आहे अशी साधारण समजूत असलेली दिसते. आता जव्हारचेंच आपण अुदाहरण घेअूं. ह्या संस्थानात जंगल मोठें व प्रजा अत्यंत मागासलेली. ह्यामुळे जंगलाचें अुत्पन्न कसें वाढवता येअील व वारली ठाकरसारख्या लोकाची सुधारणा कशी करता येअील हे दोन प्रश्न संस्थानी अधिकाऱ्यापुढे असणार. ह्या दोन गोष्टी करून दाखविण्याची पात्रता ज्याच्यात असेल असाच दिवाण जव्हाराधिपतींनी नेमला पाहिजे. परंतु जव्हारच्या आजपर्यंतच्या अितिहासावरून हा विचार ह्या शहा राजाच्या मनात कधी डोकावला असेल असें वाटत नाही. दिवाणाकरता अभ्यासक्रम ठरवून परीक्षा घेण्याचें सरकारने योजिलें तर संस्थानी प्रजा सरकारला दुवा देअील.

जव्हार संस्थानातील प्रजा अगदी प्राथमिक अवस्थेंत आहे. निसर्गाला ती अद्यापि चिकटून आहे असें म्हटलें तरी चालेल. ठाणें जिल्ह्यात ठाकूर लोकाची वस्ती अनेक ठिकाणीं आहे. काही ठाकरांना म–ठाकूर व काहींना क–ठाकूर म्हणतात. ह्या दोन स्वतंत्र जातीच बनल्या आहेत. बदलापूर वगैरे ठिकाणीं म– ठाकूर आहेत. ह्या जातीची माहिती बदलापूर पुस्तकात दिली आहे. जव्हार येथे क– ठाकूर आहेत. त्याच्या बोलण्यात आरंभीं क येतो म्हणून ह्या जातीला क– ठाकूर हें नाव पडलें असें येथे सागतात. ह्याच्या लग्नाला ब्राह्मण लागत नाही. ह्यावरून हिंदुधर्माच्या कक्षेंत ही जात अद्यापि समाविष्ट झाली नाही असें दिसतें. ह्या जातींतील स्त्रियाची अेक विशिष्ट चाल अुल्लेखनीय आहे. ह्याचा दक्षिणनितंब अुघडा असून वामनितंबाचा प्रदेश वस्त्राच्छादित असतो. अुजवा जो अुघडा भाग तो माहेरचा व झाकलेला डावा सासरचा असें समजतात. तसेंच ह्या स्त्रिया चोळी घालीत नाहीत व पदरहि अंगावरून घेत नाहीत.

वारली लोकाच्याहि कांही चालीरीती समाजशास्त्राच्या अभ्यासकांना कुतूहलास्पद वाटण्यासारख्या आहेत. लग्नात पुरोहिताचें काम स्त्रियानी करण्याची वहिवाट ह्या जातींत आहे. अशी चाल अन्य जातींत असल्याचें अद्यापि कोणास माहीत नाही. पावसाळ्यात हिरवी भाजी व चवळी न खाण्याचा नियम ह्या जातींत पाळला जातो. म्हणून पावसाळ्यानंतर दिवाळीला सदरहु जिन्नस खाण्याची त्याची रीत आहे. वारलीकुटुंबात अेक जोडपें तरी चतुर्मासात ब्रह्मचर्य पाळून राहतें. असें केल्याने पीक चागलें येतें अशी त्याची समजूत आहे. कातोडी व वारली ह्या जातींत गर्भाधानविधि—प्रथम स्त्रीपुरुषसंबंध—घरात न होतां जंगलात होत असतो. घरें करून राहण्याचें मनुष्याला माहीत नव्हतें त्या वेळच्या चालीचा हा अवशेष असू शकेल. वारली लोकाना पाच पाडव माहीत नाहीत. धर्म, भीम व अर्जुन ह्या तीन पांडवानाच ते ओळखतात.

वारल्याच्या देवाला हिरवा देव म्हणतात. हा देव म्हणजे मोराचा पिसारा होय. ह्या

पिंगान्याच्या रंगावरून हिरवा हें नांव पडलेलें दिसतें. ह्या देवाची पूजा फक्त दिवाळींत करण्यांत येते. हिरव्या देवाला वारली पितर समजतात. ह्या देवाचें देऊळ जामसर गांवीं आहे. वारली लोक पावसाकरता नारायण देवाची प्रार्थना करतात. जव्हारच्या कोळी राजाचें कुलदैवत मल्हारी मार्तंड हें होय; परंतु ह्या मार्तंडाचा पुजारी वारली असतो असें समजतें. सारांश, समाजशास्त्रोपयोगी बहुमोल माहिती ह्या संस्थानात मिळण्यासारखी आहे. अशा तऱ्हेची माहिती गोळा करणें अवघड नाही. संस्थानात दोन तीन सुविद्य अधिकारी आहेत. त्यांनी मनावर घेतल्यास त्यांना हें काम सहज करतां येईल.

संस्थानच्या अुत्पन्नाचा बराचसा भाग लोकांच्या अभिवृद्ध्यर्थ खर्च होईल तर लोक सुखी होतील. कारण जमिनीच्या मानाने संस्थानची लोकसंख्या कमी आहे. अेकंदर दोन लक्ष अेकर जमिनीपैकी अेक लक्ष अेकर जंगल व अेक लक्ष लागवड आहे. ५४००० पेक्षा कमी असलेल्या लोकाना अेक लाख जमीन म्हणजे माणशीं जवळ जवळ दोन अेकर भातजमीन हें प्रमाण पडलें. असें प्रमाण अितरत्र क्वचित् आढळेल. त्याचप्रमाणे अेक लक्ष अेकर रानापैकी ४०००० अेकर गुरचरण आहे. ३३००० गुरांना चरण्याची सोय चांगलीच म्हटली पाहिजे. अेका गुराला सवा अेकराहून अधिक जमीन चरण्यास मिळते. असें असून जव्हारच्या दुबळ्या प्रजेची हीन स्थिति का असावी ह्याचें अुत्तर अधिकाऱ्यांवांचून दुसरा कोण देअूं शकणार !

जव्हार येथे शेणवी जातीच्या लोकाची कायमची वस्ती आहे. ह्या ब्राह्मणांचा व दक्षिणी ब्राह्मणाचा पंक्तिव्यवहार अन्यत्र होत नाही. परंतु जव्हार येथे तो राजरोसपणें होतो. ह्या व्यवहाराची व्याप्ति मेजवानीपुरतीच नाही; धार्मिक कृत्यें घरांत होतात त्या दिवशींहि परस्परांना बोलावण्याची वहिवाट आहे. अशा वेळीं निराळी पंगत नसते; सर्व अेकाच पंगतीला बसतात.

जव्हारचा राज्यकारभार जुन्या वळणावर असल्यामुळे मुढेबंदी, ठोकेबंदी, नांगरबंदी आणि विघावण हे चार सारावसुलीचे पूर्वकाळचे प्रकार लोकांच्या स्मृतींतून अजून गेलेले नाहीत.

जव्हारच्या प्रजेची हलाखी पाहून विपण्ण झालेला प्रवासी नाळासोपाऱ्या कडे वळला तर तेथील दृश्य पाहून सदृश कारणानी त्याच्या मनात अुद्विग्नता अुत्पन्न झाल्याशिवाय राहणार नाही. ह्या दोनहि गावीं फारच सुंदर मूर्ति आहेत. खासगी माणसांनी खासगी देवळांत ठेवलेल्या ह्या नामांकित मूर्ति धूळ खात अुभ्या आहेत. सोपाऱ्याच्या शेजारीं अेका शंकराच्या देवळाच्या आवारात ब्रह्मदेव, वराह व सूर्य ह्याच्या मूर्ति आहेत तर नाळा येथील अेका देवळांत पाहुण्यांप्रमाणे परशुराम, विष्णु, गौतम व वामन हे सकोचाने अुभे आहेत. सर्व मूर्ति अप्रतिम आहेत. ह्या दगडाच्या मूर्तींचें— विशेषतः वराहाच्या मूर्तीचें काम प्रेक्षणीय आहे. वामनाची मूर्ति घडीव व काहीशी अर्वाचीन असावी. ह्या मूर्ति आहेत ह्या ठिकाणी आणखी किती वर्षें पडून राहणार हें अीश्वर जाणें !

ह्यासंबंधाने ठाणें जिल्हातील लोकांची अुपेक्षा अक्षम्य आहे. लोकल बोर्डाने जिल्ह्याकरता अेक संग्रहालय का अुभारूं नये तें समजत नाही. निदान बोर्डाच्या अिमारतीच्या आवारात ह्या मूर्ति आणून ठेवण्यास अडचण भासूं नये. परंतु ह्या कल्पना मनात येण्याअितकें सुशिक्षित मन असेल तर. ह्या मूर्ति १०० वर्षांपूर्वी खाडींत सापडल्या असें सांगतात. ह्याचा अधिक शोध करणें अवश्य आहे. सरकारने तरी ह्या मूर्ति आपल्या वस्तुसंग्रहालयांत नेअून ठेवण्यास हरकत नव्हती.

म. सा. प. (१४-१-१)

———

# दृष्टीआडच्या सृष्टींत



(लेखक— प्रो. स. वि. आपटे व श्री. त्र्यं. गो. ढवळे)

गेलीं कित्येक हजार वर्षे आपण अितर अनेक प्रार्थनांच्या बरोबरीनेच 'तमसो मा ज्योतिर्गमय' अशी अेक प्रार्थना करीत आलों आहोंत. याच अर्थाची प्रार्थना अितर देशांतून निरनिराळ्या धर्मांच्या लोकाकडून, होत आलेली आहे. 'तम' आणि 'ज्योति' या दोन्ही शब्दांभोंवतालचें तत्त्वज्ञानाचें जाळें थोडा वेळ बाजूला सारलें आणि त्याचे सरळ, नेहमीचे, अर्थ घेतले तरी देखील सहजच प्रश्न उपस्थित होतो की अंधारात राहण्याला आम्ही अितके नाखूष का? अुजेडात असें काय आहे की ज्याच्यासाठी अंधारातून अुजेडाकडे जाण्याची आम्हीं धडपड करावी? जें जें वाअीट तें सर्व अंधकारमय, जें जें चांगलें ते तें सर्व तेजोमय, असा आमचा, कल्पनेसाठीमुद्धा का होअीना, ठाम आग्रह काय म्हणून?

याचें मुख्य कारण असें दिसतें की अंधारात शिरल्याने किंवा राहिल्याने आपण अुघड्या डोळ्यानी आपल्या मरणाला हाक मारतो. अंधारात आपल्या डोळ्याना दिसत नाही. साहजीकच, डाव्या- अुजव्या बाजूकडून, पुढून मागून, वरून खालून, लपत छपत, मांजराच्या चालीने अेखादें लहानमोठें संकट आपल्यावर अचानकपणें झडप तर घालणार नाही ना, अशी भीति अंधारात कोणालाहि पदोपदीं वाटते. ही भीति म्हणजे पर्यायाने दृष्टीला आणि अितर अिंद्रियाना अगम्य असणाऱ्या विश्वाबद्दलचीच भीति असते जसजसें हें विश्व बुद्धीच्या आटोक्यात येअूं लागतें, तसतशी भीति जाते, कुतूहल वाढतें. असाच प्रकार आधुनिक भौतिक शास्त्राच्या वाढीमुळे घडूं लागला आहे. दूरादर्शाच्या- दुर्बिणीच्या-[1] प्रगतीमुळे तारकेय विश्वाचा दूरदूरचा भाग जसा अधिकाधिक दृष्टिगम्य होअूं लागला आहे तसाच सूक्ष्मादर्शाच्या सहाय्याने जवळचा, लहानातला लहान भाग, पाहता येअूं लागला आहे. गारगोटीच्या तुकड्याचा, अुपयोग करून आपण पाण्यातले आपले शत्रुमित्र हेरू लागलों आहोंत. पारायणी किरणांच्या साहाय्यानें पदार्थमात्राचें अंतरंग पाहता येअूं लागलें आहे. या शेवटच्या दोन प्रकाराविषयीची कांही थोडीशी माहिती 'पत्रिके'च्या गेल्या दोन अंकात दिली. प्रस्तुत लेखात भौतिकशास्त्राच्या आजच्या आघाडीवरच्या अेका बाजूकडे जाअून अंधारावर विजय मिळवण्याच्या कामीं आपण आणखी अेक पाअूल पुढे कसे गेलों आहोंत हें सांगावयाचें योजिलें आहे.

१८८० च्या सुमाराला ॲब्ने नावाच्या अेका शास्त्राभ्यासकाने अेका चमत्कारिक प्रयोगांत आपल्याला यश मिळाल्याचें जाहीर केले. ॲब्नेचें म्हणणें असें की आपण अेक

---

१ 'दुर्बीण' हा शब्द Telescope या अर्थी मराठींत प्रचारात असूनहि येथे 'दूरादर्श' शब्द वापरला आहे तो पारिभाषिक शब्दांची अेक विवक्षित धाटणी सुचवण्यासाठी. दूरचा जिन्नस जवळ आणल्यासारखा दाखवतो तो दूरादर्श (Telescope), सूक्ष्माचें विवर्धन करून दाखवतो तो सूक्ष्मादर्श (Microscope). याच रीतीने अंतरादर्श (Diascope), अुपरिदर्श (Episcope), अंतरोपरिदर्श (Epidiascope), परितोदर्श (Periscope), शोभादर्श (Kaleidoscope), वंजादर्श (Electroscope) अि. अि.

किटली घेतली, ती अुकळत्या पाण्याने भरली, नंतर ती अेका निबिड अंधाऱ्या, बंदिस्त, खोलींत ठेवली आणि तेथेच, अंधारात, ठेवलेल्या अेका निकोशकोटराच्या—कॅमेऱ्याच्या—द्वारा त्या किटलीचा निकाश घेतला. नेहमी जे आपण निकाश घेतों त्यांना प्रकाशाची जरूरी असते. 'डे अँड नाअिट फोटोग्राफर्स' म्हणून म्हणवणाऱ्याना देखील सूर्याचा नसला तरी विजेचा प्रकाश लागतोच. पण ॲब्नेच्या खोलींत आरंभापासून शेवटपर्यंत अंधारच अंधार पसरलेला होता, साध्या डोळ्यांना तेथे कांहीहि दिसूं शकत नव्हतें. ॲब्नेने जी किटली गरम पाण्याने भरून ठेवललेली होती— तिच्या सर्वांगातून अुष्णतेच्या झळी बाहेर पडून त्या तरंगरूपाने किटलीच्या भोंवतालीं दशदिशाना, प्रकाशतरंग जसे संचरतात तशा, दूरवरपर्यंत पसरत होत्या. प्रकाशामुळे आपल्या डोळ्याना दिसतें, अुष्णतेचें ज्ञान त्वचेला होतें. येथे प्रकाशरूपी तेज नव्हतें, तें अुष्मरूपाने संचरत होतें. नेहमीं आपण अेखाद्या व्यक्तीचा निकाश—फोटो—काढतों तेव्हा त्या व्यक्तीवरून परावर्तन पावलेल्या प्रकाशकिरणामुळे जसें कोटरांतील—कॅमेऱ्यांतील—कांचेवर रासायनिक विक्रिया घडून चित्र उमटतें तसेंच तें याहि प्रसंगीं अुष्मकिरणानी अुमटविलें होतें. फरक अितकाच की ॲब्नेने निकाशग्रहणासाठी वापरलेली काच कांही अेका विशेष प्रकारच्या, सुसंस्कारी, रसायनात बुचकळून काढलेली होती. त्यामुळे नेहमीच्या निकाशासाठी ज्या प्रकाशाची आवश्यकता असते त्याच्यापेक्षा अधिक सौम्य, कमी क्षिप्रतेच्या, अुष्म किरणांचा, किंवा अुपारुण किरणाचा[2] अुपयोग ॲब्नेला या कामीं करता आला.

खुद्द ॲब्नेने जीं रसायनें वापरलीं आणि ज्या रीतीने अंधारांत निकाश घेतला त्या रसायनांच्या व पद्धतीच्या यशस्वितेविषयी काही शास्त्रज्ञ साशंक आहेत. तथापि अेकदा अेक विशेष दिशेने विचाराला जी चालना मिळाली तिचा परिणाम असा झाला की, निरनिराळ्या रसायनाच्या बाबतींत प्रयोग होतां होता आता आगफा, कोडॅक वगैरेसारख्या कित्येक कंपन्यानी अनेक प्रकारच्या अुपारुण संस्कारी काचा तयार केलेल्या असून त्याच्या द्वारा अंधारात देखील चित्रें घेण्याची सोय झालेली आहे. अगदी अलीकडे, १९३२ सालीं, या बाबतींतलें अेक प्रात्यक्षिक करून दाखविण्यासाठी, रॉयल फोटोग्राफिक सोसायटीच्या सभागृहात जमलेल्या श्रोत्याचा निकाश घेतला गेला. त्या वेळीं सभागृहांत पूर्ण अंधार केलेला होता. व्यासपीठाजवळ पहिल्या ओळींतल्या श्रोत्यापासून सुमारें १५ फुटांच्या अंतरावर, प्रत्येकी १५०० ओजाचे (वॅटचे) तीन वीजदिवे ठेवून दिलेले होते. या प्रत्येक दिव्यासाठी पत्र्याची अेकेक पेटी होती त्यात ते दिवे असून पेट्या बंद केलेल्या होत्या. दिव्यांचा खटका ओढताच दिवे लागत, पण पेटीच्या बाहेर फक्त अुष्म किरण किंवा अुपारुण किरणच काय ते जाऊं शकत, त्यापेक्षा अधिक क्षिप्रतेचे— प्रकाशादि— तरंग पेटीच्या आंतच रोखले जात. साहजीकच, या वेळीं साध्या डोळ्यानी पाहणाऱ्याला सभागृहांत कांहीच दिसत नव्हतें, सर्वत्र

१ 'फोटोग्राफ' या अर्थी मराठींत 'छायाचित्र' असा तुर्कीचा शब्द कधी कधी वापरला जातो. येथे कांचेवर जें चित्र अुमटतें तें छायेमुळे नव्हे, परावर्तित प्रकाशामुळे अुमटलेलें असतें. म्हणून वस्तुतः त्याला प्रकाशचित्र, किंवा प्रकाशरेखन अशासारखें कांही तरी म्हणावयास पाहिजे. 'फोटोग्राफ' या शब्दानेहि असाच, प्रकाशरेखनाचा अर्थ सुचविला जातो. संस्कृतांत निकाश हा शब्द प्रतिकृति, प्रतिरूप अशा अर्थी वापरला जातो. म्हणून प्रकाशाच्या द्वारा मूळाबरहुकूम अुमटविलेली प्रतिकृति तो निकाश. निकाश घेणारी पेटी, कोटर, तो निकाशकोटर (Camera). नैकाशिक कांच (Photographic plate). निकाशक (Photographer).

२ अुपारुण किंवा अुष्मकिरणाविषयी थोडीशी कल्पना 'पत्रिके'च्या गेल्या अंकांत पृ. ३२३-३२४ वर दिलेली आहे.

अंधार होता; तरीसुद्धा निकाशकोटराच्या मार्जारदृष्टीला मात्र तेथलीं माणसें चक्क दिसत होतीं; त्याचें चित्रण कोटरांतल्या कांचेवर अुत्कृष्ट रीतीने झालेलें होतें.

माणसाच्या दृष्टीला केवळ अंधारांतच दिसत नाही अेवढेंच अेक व्यंग असतें, तर वर दिलेल्या प्रयोगासारख्या प्रयोगांना फारसें व्यावहारिक महत्त्व अुरलें नसतें. दिवा लावा, त्याच्या भोंवतीं पड्याचें आवरण घालून अंधार करा आणि मग निकाश काढा, असला द्राविडी प्राणायाम करण्यापेक्षां कोणीहि समंजस माणूस साहजीकच दिव्याच्या थेट अुजेडातच निकाश काढणें अधिक पसंत करील हें अुघड आहे. पण निकाश काढणें हें कांही वरील प्रयोगांतलें अुद्दिष्ट नव्हतें. क्षिप्रतेच्या कांही विवक्षित टापूंतलें, प्रकाश म्हणून ज्याला आपण म्हणतों तें, तेज अुपलब्ध नसतांना जें बाह्य विश्वाविषयींचें ज्ञान अेरव्हीं आपल्याला मिळत नव्हतें तें ज्ञान मिळविण्याची अेक सोय वरील प्रयोगाने निर्माण झाली. अेरव्ही देखील अंधारांत, डोळ्यांना दिसत नाहीसें होतें तेव्हा, आपण हातांनी चांचपडतों. तसाच प्रकार येथेंहि, अुपारुण तरंगांचा अुपयोग केल्याने झाला.

डोळ्यांना दिसूं शकेल अितपत अुजेड नव्हता, तेव्हाचा हा प्रकार झाला. पण दिवसा, उघड्या जागेंत, अंधार नसतांनादेखील, आपल्या साध्या दृष्टीला दाट धुक्यांतून आरपार पाहतां येत नाही. आपल्या अिकडे, पुण्यासारख्या ठिकाणीं, वर्षांतून अेखाद्या दिवशीं काही थोडा वेळच काय तें अितकें दाट धुकें असतें की त्यावेळीं चारदोन हातांवरचें माणूस देखील नीटसें दिसत नाही. यूरोपांत असे प्रकार वेळोवेळीं घडणारे, साहजीकच अशा वेळीं अेखाद्या धाडशी शत्रूने अचानक हल्ला केल्यास त्याचा प्रतिकार करणें कठीण जाणार. रोजच्या व्यवहारांनादेखील दाट धुक्याचा अडथळा होतोच. म्हणूनच अशा प्रसंगीं दृष्टीचा टप्पा जास्तींत जास्त कसा वाढवावा हा पाश्चात्यांच्या दृष्टीने अेक व्यावहारिक महत्त्वाचा प्रश्न होऊन बसलेला आहे. धुकें म्हणजे भूपृष्ठाजवळ बनलेला किंवा आलेला अेक ढग— अत्यंत बारीक बारीक अशा बाष्पसीकरांचा अेक राशि. बिलोरी आरशाची अेखादी मोठी काच घेअून ती कुटून तिचा भुगा केला आणि तो आकाशात फेकून दिला तर त्यांतल्या प्रत्येक कणाकणावरून जशी सूर्याची किरणें विकिरण पावतील, चहूंवार फेंकलीं जातील, तशीं तीं धुक्याच्या प्रत्येक कणावरून सर्वत्र फेंकलीं जातात. धुक्याच्या कणाकणामधली जी मोकळी जागा तिच्यामध्यें हा सर्व प्रकाश पिसकारला जातो. येवढेंदेखील कारण आपल्या दुबळ्या दृष्टीला अधिक दुबळी करण्याला पुरेसें होतें.

हें कसें घडतें हें ध्यानांत येण्यासाठी अेकदोन परिचित उदाहरणें घेअूं. समजा, अेखादा चित्रपट पाहण्यासाठी आपण अेखाद्या चित्रनिकेतांत–थिएटरांत– बसलों आहोंत. अशा प्रसंगीं रजतपटावरचीं चित्रें स्पष्टपणें दिसावयाचीं झालीं तर चित्रपट्टी (फिल्म)च्या मागच्या प्रखर दिव्याखेरीज निकेतांतले बाकीचे सर्व दिवे मालवून टाकावे लागतात. हा जो अेकच अेक दिवा ठेवला, त्याचा प्रकाश त्याच्याच समोरच्या चित्रपट्टींतल्या काळ्या-पांढऱ्या भागांतून कमीअधिक प्रमाणांत आरपार दुसऱ्या बाजूला आल्यावर तो रजतपटावर पडेल अशी सोय केली म्हणजे मग त्या प्रकाशाच्या झोतांतच आपण तीं तीं चित्रें अुमटलेलीं पाहतों. चित्रपट चालू असतांना भोंवतालचे बाकीचे दिवे लावले तर चित्रें अस्पष्ट होतात. दिवसां, दिवे लावून चित्रनिकेताचीं दारें सताड उघडीं टाकलीं तर चित्रांचा पूर्ण लोप होतो. वास्तविक, या दोन्हीं प्रसंगीं, बाकीची सर्व परिस्थिति कायम असतांना, कृत्रिमरीत्या जर कांही केलें गेलें असेल तर तें अेवढेंच की, रजतपटावर उमटलेल्या चित्राच्या सर्वच भागावर,–काळेपांढरेपणाच्या

निरनिराळ्या छटांवर,-पूर्वीपेक्षा थोडासा अधिक, सर्वत्र सारखा, अेकाच इयत्तेचा, प्रकाश टाकला गेला. पण तेवढयानें देखील चित्राचें चित्रपण नाहींसें झालें.

असें घडण्याचें कारण प्रयोगदृष्ट्या आढळलें आहे तें असें की, कोणताहि पदार्थ आपल्या दृष्टीला अुमगावयाचा झाल्यास त्याची प्रकाशपरिवर्तनक्षमता किंवा परावर्तनक्षमता ही त्याच्या लगत, भोवतालीं, असणाऱ्या पदार्थादिकाच्या परिवर्तन-परावर्तनक्षमतेपेक्षा निदान शेकडा दोहोंनी तरी निराळी असली पाहिजे. आपल्यापैकी कोणाच्याहि समोर आम्हीं अुभे राहिल्यावर आपल्याला आमच्या शरीराची बाह्याकृति दिसते, हातापायांचा रेखीवपणा दिसतो, याचें कारण असें की आमच्या हातापायादिकाना लागून असणारी जी हवा, तिच्यामधून जितक्या प्रमाणांत प्रकाशाचें परिवर्तन-परावर्तन होत असेल त्यापेक्षा आमच्या हातापायांच्या त्वचेवरून, अंगांतल्या कपडयांवरून, तें शेकडा दोहोंनी कमी किंवा जास्त असेल; चेहेऱ्यावरच्या किंवा कपडयावरच्या कोणत्याहि दोन शेजार-शेजारच्या बिंदूवरूनहि तें याच प्रमाणांत होत असेल तरच त्यांचा अलगअलगपणा आणि त्यांचें अस्तित्व हीं डोळ्यांना समजतात. हें प्रमाण जसजसें अेकमेकांजवळ येअूं लागेल तसतसा त्या पदार्थांचा अलग-अलगपणा नाहीसा होतो, ते पदार्थ अदृश्य होअूं लागतात. धुक्यातले किंवा धुक्यापलीकडचे पदार्थ आपणाला दिसत नाहीत ते याच कारणामुळे. घराच्या खिडकीला जाळीदार पाढरें कापड लावलें म्हणजे दिवसा घरांतल्या माणसाला खिडकीबाहेरच्या हालचाली त्या जाळींतून दिसूं शकतात, बाहेरच्या माणसाला घरांतल्या हालचाली दिसत नाहीत. अुलट, रात्रीं दिवे लागले म्हणजे बाहेर अंधारांत असलेल्या माणसाला घरांतल्या हालचाली दिसूं शकतात, आंतल्याला बाहेरचें दिसत नाही, तेंहि अशाच कारणामुळे.

हा धुक्यांतला आधळेपणा घालविण्याचे मार्ग दोन. पहिला मार्ग, कोणत्याहि अुपायाने धुकें नाहीसें करणें. दुसरा मार्ग, धुक्याला न जुमानता त्यांतून सहज जाअुं येअूं शकतील अशा किरणाचा अुपयोग करणें. पहिला मार्ग म्हणजे टिटवीने समुद्राचा अुपसा करण्यासाठी कंबर कसण्यासारखेंच आहे. तरी देखील मर्यादित जागेत अेखादी वीजवहाळयुक्त तार धरली असताना तिच्याभोंवतालचें धुकें नाहीसें होतें, असें ऑलिव्हर लॉजने दाखवून दिलें आहे[1]. दुसरा मार्ग म्हणून जो सांगितला त्याच्या कामीं अुपारुणकिरणाचा अुपयोग होतो असें सिद्ध झालें आहे. त्याच्या द्वारा धुक्यातल्या किंवा त्या पलीकडच्या जिनसाचे निकाश देखील धुकें नसल्याअितकेंच स्पष्ट अुमटतात. याचें कारण असें की सूर्यादि तेजोगोलापासून जें तेज आपल्याकडे, पृथ्वीवर, येते तें निरनिराळ्या क्षिप्रताचें असतें. त्यातला काही भाग अतींद्र– म्हणजे पारायणी वगैरे किरणांचा असतो, काही प्रकाशाचा असतो, अुपारुणकिरणांचा असतो, अितरहि प्रकार असतात. धुक्यामध्ये प्रकाशाचे किरण विस्कारतात, पण अुपारुणकिरण आरपार जाअूं येअूं शकतात. त्यांच्या द्वारा जेव्हा निकाश घ्यावयाचे असतात तेव्हा अेरव्हीं आपण वापरतों त्यापेक्षा निराळ्या प्रकारचा निकाशकोटर वापरला जातो. त्याच्या तोंडाशीं ठेवलेल्या चाळणींतून फक्त अुपारुणकिरणच आत शिरूं शकतात, बाकीच्यांना मज्जाव असतो. आत वापरावयाच्या कांचाहि केवळ अुपारुणग्रहिष्णूच असतात.

अशा रीतीने दृष्टीची कक्षा वाढवण्याचे कामीं नवीन नवीन क्षेत्रें दृष्टींत आणण्याच्या

---

१ याविषयी थोडीशी कल्पना 'सह्याद्री'च्या ऑक्टोबर १९४० च्या अंकांत 'दोन ब्रिटिशशास्त्रज्ञ—लॉज आणि टॉमसन' या श्री. ढवळे याच्या लेखात आलेली आहे.

कामीं, अुपारुणकिरणांचा अुपयोग अितरहि अनेक प्रसंगीं करतां येअूं लागलेला आहे. धुकें नसतांना, अेरव्हीच्या हवेंत देखील, थोडाफार जलांश असतोच. अशा हवेंत, वियद्यानाच्या साहाय्याने, २३००० फूट अुंचीपर्यंत जाअून अमेरिकेंतल्या वायवी विभागाचा अेक प्रमुख कॅ. स्टीव्हन्स, याने वियद्यानांतून दिसणाऱ्या दृश्याचा अेक निकाश घेतला. त्यांत निकाशकोटरांपासून ३३१ मैलांवर असलेल्या अेका डोंगरापर्यंतचा सर्व आलोक सामावतां आलेला आहे. अशा चित्रांचा अुपयोग युद्धादिकाच्या कामीं कसा होत असेल हें सांगावयास नको. रात्रीं चंद्र-प्रकाश असतांना आकाशांतल्या ताऱ्यांचा निकाश काढावयाचा प्रयत्न केल्यास चित्रांत थोडीशी अस्पष्टता येते. अशा वेळीं अुपारुणकिरणांच्या द्वारा निकाश घेतल्यास ते चांगले स्पष्ट येतात. अशा रीतीने आकाशातल्या दूरदूरच्या ताऱ्याचे आणि अभ्रिकांचे (नेब्युली) निकाश घेण्याची सोय झाल्याने ज्योतिर्विषयक ज्ञानांत विशेष भर पडूं लागली आहे. शरीराच्या त्वचेंत झालेल्या रोगांचें निदान करण्याच्या कामीं अुपारुणकिरणांचा अुपयोग होअूं लागला आहे. पदार्थ-मात्राच्या अंतरंगांतले, त्याच्या घटनेचे बारकावे पाहावयाचे झाले तर हल्ली आपण सूक्ष्मादर्शाचा (मायक्रॉस्कोप) अुपयोग करतों. अशा वेळीं आपण साध्या प्रकाशकिरणांच्या साहाय्यानेच पाहात असतों. त्याअैवजी अुपारुणकिरणांचा अुपयोग करून चित्रें घेतल्याने प्राणिमात्राच्या आन्तररचनेची अधिक माहिती मिळते.

इतरहि कित्येक मजेदार गोष्टी साधण्याकडे अुपारुणकिरणाचा अुपयोग होतो. अुदा-हरणार्थ, अुपारुणकिरणाचें आस्तित्व हें डोळ्याना भासण्याजोगें नसल्यामुळे, अंधारांत ठेव-लेल्या तिजोरीवर या अदृश्य किरणांचा झोत पडत राहील आणि त्या किरणांतून कोणीहि मनुष्य आला गेला तरच तत्काळ घंटा वाजेल अशी सोय केल्याने तिजोरीचें रक्षण करता येतें. अुपारुणकिरणांच्या द्वारा अेखाद्या जिवंत माणसाचा निकाश घेतला तरी तो अेखाद्या संगमरवरी पुतळ्याच्या निकाशासारखा, काळ्याभोर रोखलेल्या डोळ्यांचा, पांढुरक्या, निष्प्रभ चेहेरेपट्टीचा, किंचित् भीतिप्रद, असा निघतो. घोटीव दाढी केलेल्या अेखाद्या माणसाचा एक निकाश नेहमीच्या प्रकाशात काढला आणि दुसरा अुपारुणकिरणांत घेतला तर पहिल्यांत नसलेले दाढीचे खुंट दुसऱ्यांत उमटतात! आकाश निरभ्र असताना, दिवसा, अैन सूर्यप्रकाशांत या किरणांच्या द्वारा घेतलेल्या निकाशात शीतल चंद्रप्रकाशाचा आभास निर्माण होतो.

आपल्या भोंवतालच्या विश्वाकडे आपण आपल्या डोळ्यांनी पाहतों-मर्यादित ग्रहण शक्ति असलेल्या आपल्या डोळ्यांनी पाहातों— त्याच्याविषयीचें ज्ञान मिळवण्याच्या कामीं अितरहि अिंद्रियांचा अुपयोग करतों. चर्मचक्षूंची गति खुंटली असें वाटलें तरी निरनिराळीं साधनें निर्माण करून त्याच्या द्वारा मिळविलेलें ज्ञान आपण आपल्या अंतश्चक्षूपुढें अुभें करतों, त्यावेळीं असें दिसतें की विश्वाकडे पाहाण्यासाठी आपण ज्या विवक्षित जागीं अुभे राहिलों, जो विवक्षित दृष्टिकोण साधला त्यात थोडासा बदल केला म्हणजे त्याच विश्वांत नावीन्य दिसूं लागतें, नेहमीच्या दृष्टीआड असलेला विश्वाचा भाग दृष्टीच्या समोर येअूं लागतो. हाहि टापू पहिल्या-अितकाच विशाल, मनोरंजक, आणि विचारप्रवर्तक, नाही असे कोण म्हणेल!

# महाराष्ट्रांतील जानपद ओवी



(लेखिका— कु० अनसूया भागवत)

महाराष्ट्रांत पूर्वापार चालत आलेल्या जानपद-अथवा लोकगीतांचे जे अनेक प्रकार आज प्रचलित आहेत, त्या सर्वांमध्यें ओवीचें स्थान फार महत्त्वाचे आहे. अभंग, साकी किंवा इतर कुठल्याहि गीतप्रकाराचा झाला नसेल इतका प्रचार व इतकी लोकप्रियता ओवीची महाराष्ट्रभर आहे. अशिक्षित व काबाडकष्ट करून जीवनपथावरून चालणाऱ्या सामान्य जनतेला श्रम हलके करण्याकरता अगर श्रमपरिहारार्थ आणि सुखासीन लोकांना करमणुकीकरता वाटलेली गायनाची आवश्यकता, यामधून नेहमी जानपद-गीताचा उगम होत असतो. जानपद-गीतांच्या अनेक प्रकारामध्यें श्राव्य ओवी हा प्रकार अशिक्षित जनता व विशेषतः स्त्रिया याच्या जीवनाशीं निगडित झालेला आहे. सर्वसामान्य अशिक्षित जनतेच्या मनातील विचारांना व भावनांना वाङ्मयात आविष्करण मिळण्याकरता अत्यंत सुलभ व लवचिक अशा पद्यरचनेची आवश्यकता असते व तशा तऱ्हेची सुलभ रचना 'ओवी' या प्रकारांत असल्यामुळे, मुख्यत्वें करून स्त्रियानी आपल्या भावनाना वाट देण्यास व आपलीं जीवनचित्रें रंगविण्यास ओवीचा अवलंब केला असावा.

लोकगीताच्या रूपाने चालत आलेल्या श्राव्य ओवीची निर्मिति सर्वस्वीं स्त्रियांनी केलेली आपल्याला आढळते. दोन ते चार ओळींच्या अत्यंत लहान पद्यात सहजसुलभ काव्याची अवीट गोडी, अशिक्षित मनाचें कल्पनाचातुर्य व भावनाचे सत्य आविष्करण याचा सुंदर मिलाफ ओवींतून पुष्कळदा सापडतो आणि अशा तऱ्हेच्या लाखो ओव्या निर्माण करून अशिक्षित स्त्री वर्गाने त्यांत आपलें, आपल्या कुटुंबाचें व आपल्या भोवतालच्या समाजाचें जीवन ओतलेलें आहे. अभंग, भूपाळी वगैरे इतर गीताप्रमाणे ओवींचा उद्देश भक्तिभाव किंवा धार्मिकता हा नसून त्यांत मानवी मनाचें व जीवनाचें वास्तविक प्रतिबिंब आपल्याला पाहावयाला मिळतें व म्हणूनच ओवीचा जिवंतपणा अजूनहि कायम आहे. अजूनहि महाराष्ट्रातील मागासलेल्या खेड्यातून प्रातःकालच्या शान्त व आल्हाददायक समयीं ग्रामीण स्त्रियानी जात्यावर दळतांना गाइलेल्या, किंवा संध्याकाळच्या थंड वेळीं सुखवस्तु कुटुंबातील मुलींनी करमणुकीकरता झोपाळ्यावर बसून म्हटलेल्या, किंवा मातांनी आपल्या तान्ह्या अर्भकांना निजवितांना आळविलेल्या ओव्यांचा मंजुळ स्वर कानीं पडण्याचा सुखद अनुभव उपभोगावयास मिळतो; व ओवीची लोकप्रियता महाराष्ट्राच्या खऱ्या कृषिजीवनांत किती आहे तें पटतें.

लोकगीताच्या रूपाने ओवी या श्राव्य पद्याचा उगम कधी झाला असावा, हें निश्चित सागतां येणें कठीण आहे; परंतु मराठी वाङ्मयाला सुरुवात होण्यापूर्वी अशा तऱ्हेचा कांहीतरी पद्यप्रकार सर्वसाधारण जनतेंत प्रचलित असला पाहिजे असें वाटतें.

ओवी हा छंद अस्सल देशी असल्याचा उल्लेख श्री. वि. ल. भावे यांनी आपल्या "महाराष्ट्र सारस्वतां"त केलेला आहे.[१] श्री. भावे हे यानंतर असेंहि म्हणतात की, "१०५१

१ श्री. वि. ल. भावे : "महाराष्ट्र-सारस्वत" भाग १ पृ० ७.

मधल्या सोमेश्वराच्या ग्रंथावरून महाराष्ट्र स्त्रिया मराठींत गाणीं रचून गात असत व हीं गाणीं केवळ कांही विशेष प्रसंगांपुरतीं नसून घरांतल्या दळणकांडणाच्या नित्यकृत्यांत हीं हमेश गायलीं जात असें दिसतें ...... म्हणजे ११ व्या शतकांत मराठींत चांगलीं गाणीं रचलीं जाऊन तीं बायकांच्या नित्यकृत्यांत जाऊन पोचलीं होतीं."[1] यावरून ओवी हा प्रकार ११ व्या शतकापासून किंवा अस्पष्ट स्वरूपांत कदाचित् त्यापूर्वीहि प्रचलित असावा असें दिसतें. श्री. साने गुरुजी यांनी तर आपल्या 'स्त्री-जीवन' या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत असें म्हटलें आहे की, "महाराष्ट्रांतील बायका दळतांना, कांडताना ओव्या म्हणतात असे फार प्राचीन ७ व्या ८ व्या शतकांतील उल्लेख आहेत."[2] आणि त्या वेळीं महाराष्ट्रांत श्राव्य ओवीची असलेली ही सामुदायिक लोकप्रियता व सर्वसामान्य जनतेंत खोलपर्यंत जाऊन पोंचलेलीं तिचीं मुळें, हीं लक्षांत घेऊनच मराठी वाङ्मयाच्या प्रारंभकाळीं महानुभावी पंथीय कवींनी व त्यानंतर ज्ञानेश्वर आणि इतर संतकवींनी आपल्या भागवतधर्माची शिकवण समाजाच्या कानाकोपऱ्यात, अगदी सामान्य व अशिक्षित जनतेंत खोलपर्यंत नेऊन पोंचवण्याकरता आपल्या प्रचार-कार्याला ओवी या सुलभ व लोकप्रिय पद्यरचनेची मदत घेतली असावी.

संतकवींनी ग्राथिक ओवीला जन्म देताना तिची कल्पना जरी श्राव्यरूपांत असलेल्या जानपद-ओवीपासून घेतली असली, तरी यानंतर मात्र त्यांच्या प्रचारकार्यामुळे श्राव्य ओवीवर ग्राथिक ओवीचा बराच परिणाम झाला असावा असे आजमितीला प्रचलित असलेल्या असंख्य ओव्यांच्या विषय स्वरूपावरून दिसून येतें. ग्राथिक ओवी निर्माण होण्यापूर्वी श्राव्य ओवीच्या विषयाची मर्यादा कोठपर्यंत असेल हें जरी निश्चित सांगतां आलें नाही, तरी मानवी मन, त्या काळचें कौटुंबिक व सामाजिक जीवन व फार तर तेव्हा लोकप्रिय असलेल्या पौराणिक वाङ्मयातील कथा, यापलीकडे ओवी-विषयांची मर्यादा गेलेली असण्याचा संभव नाही. परंतु यानंतर मात्र संतकवींच्या व विशेषतः वारकरीपंथाच्या प्रचारकार्यांचा परिणाम त्यांच्या ओवीबद्ध ग्रंथांकरवीं होऊन, श्राव्य ओवीच्या विषयात कौटुंबिक जीवन व वाङ्मयीन कथा यांबरोबर धार्मिकता, देवादिकावरील भक्तिभाव व संतांबद्दल वाटणारा आदर याची भर पडली. आज कौटुंबिक व सामाजिक जीवनाचें प्रतिबिंब दाखवणाऱ्या हजारों ओव्यांबरोबर अशा तऱ्हेच्या देवादिकावर व साधुसंतावर रचलेल्या ओव्यांची संख्या पण पुष्कळ आहे.

लेखी ओवीचा परिणाम श्राव्य ओवीवर कितीहि झाला असला, तरी लेखी ओवीचें मूळ विशिष्ट व्यक्तीच्या किंवा पंथाच्या बुद्धींत असतें, व जानपद ओवींचा उगम सर्वसामान्य अशिक्षित जनतेच्या सामुदायिक मनःप्रवृत्तींत व अनुभवांत असतो, हें विसरून चालणार नाही. यामुळेच ग्राथिक ओवीच्या जोराच्या प्रचारानंतरहि श्राव्य ओवीने आपले 'जानपद'स्वरूप सोडलेलें नाही. संतकवींच्या ओवीबद्ध ग्रंथाचा मूळ हेतु प्रचारकार्यांचा होता. धार्मिकता व भक्तिभाव याची शिकवण त्यांना आपल्या ग्रंथांच्या साहाय्याने द्यावयाची होती. परंतु श्राव्य ओवीचा उगम मानवी मनाच्या भावमूलक आदितत्त्वातून झाला असल्याने तिने अशा प्रकारचा हेतु कधीच धरलेला नाही. श्राव्य ओवींत कुठेहि मनुष्यस्वभावपरिपोषक अशा मानवतेला व वास्तविकतेलाच अधिक किंमत दिलेली आढळते. आणि म्हणूनच समाजशास्त्रदृष्ट्या ग्राथिक ओवीपेक्षा श्राव्य ओवीचें महत्त्व अधिक आहे.

---

१ श्री. वि. ल. भावे : "महाराष्ट्र-सारस्वत" भाग १ पृ० २९.

२ श्री. साने गुरुजी "स्त्री-जीवन" पृ० २.

ओवी या पद्यप्रकाराची रचना कशी असते याबद्दल बरीच माहिती कै. मा.त्रि.पटवर्धनें यांनी आपल्या 'छन्दोरचना' या पुस्तकांत दिली आहे.[1]

साधारणपणें उच्च वर्गांतील मुली किंवा स्त्रिया झोपाळ्यावर बसून किंवा मुलाला अंगाअी गातांना ज्या ओव्या म्हणतात त्या साडेतीन चरणी असतात[2] व त्यांना ठराविक चाली लावलेल्या दिसतात. परंतु मध्यमस्थितींतील किंवा अगदी खालच्या वर्गांतील स्त्रिया जात्यावर दळतांना ज्या ओव्या म्हणतात त्या बहुधा चार चरणी असतात व स्त्रिया त्यांना निरनिराळ्या चाली लावून व दोनच ओळी अत्यंत कुशलतेने आळवून आळवून म्हणतात.

साधारणपणें अेकापेक्षा अधिक स्त्रिया जात्यावर दळायला बसल्या की अेकीने सुचेल ती ओवी म्हणावी, थोडीशी आळवावी व सोडून द्यावी; दुसरीने तिला साथ करता करतां ती अुचलावी किंवा त्यावरून सुचलेली दुसरी सुरू करावी व आळवावी; अशा तऱ्हेने दुव्याला दुवा जोडून साखळी निर्माण होते. जात्याच्या फिरत्या क्रियेबरोबर व त्याच्या होणाऱ्या तालबद्ध सुराबरोबर ही मंजुळ स्वरांत आळवलेली ओवी-मालिका अेक होअून गेली म्हणजे जी विलक्षण गोडी अुत्पन्न होते ती दुसऱ्या कोणत्याहि लोकगीतांतून आढळावयाची नाही. जात्यावर दळतांना या खेडवळ स्त्रिया जितक्या तन्मयतेने व कुशलतेने ओवी आळवूं शकतात तितकी अितर वेळीं किंवा रिकामपणीं त्या आळवूं शकत नाहीत. मनांतील भावना व त्यांना गेय स्वरूपांत मिळालेला आविष्कार या गोष्टी जात्याच्या हालचालींशीं किती संलग्न झालेल्या असतात याची यावरून कल्पना येअील.[3]

जात्यावरील चालींची थोडीशी कल्पना येण्याकरता येथे दोन ओव्यांच्या दोन निरनिराळ्या चालींचें नोटेशन दिलें आहे. या नोटेशनने चालींच्या फक्त रंगरूपाची कल्पना येईल; परंतु निरनिराळ्या प्रकारें आळवून घोळवून तेच चरण पुन्हा पुन्हा म्हणून स्त्रिया जी गोडी उत्पन्न करतात त्याची कल्पना कदाचित् येणार नाही. 'अग' 'बाई' 'सखे' वगैरे शब्द मधून मधून घालून लवचिक स्वरूपाच्या ओवीला मनाप्रमाणे ताणून या ओव्या कुशलतेने आळवल्या जातात.

(१)

| | |
|---|---|
| सा रे रे ग ग सा रे रे सा | सा रे ग ग ग सा रे ग ग ग |
| अ ग सी ता ग बा ळ ती ण | अ ग सी ता ग बा ळ ती ण ग |
| ० ० ० ० ~ | ० ० ० ० ० |
| ध सा रे ग ग सा रे रे सा | ध सा रे ग ग सा रे रे सा |
| अ ग सी ता ग बा ळ ती ण | सी ता ग बा ई बा ळ ती ण |
| ० ० ० ० ~ | ० ᵕ ᵕ ~ ० – |
| सा रे ग ग ग सा रे रे सा | सा रे ग ग ग सा रे ग ग ग |
| ता तो बा च्या ग हा ये म ठी | ता तो बा च्या ग हा ये म ठी ग |
| ० ० ० ० ~ | ० ० ० ० ० |

१ प्रा. मा. त्रि. पटवर्धन : 'छन्दोरचना' पृष्ठें ११ व ५१४.

२ या साडेतीन चरणी ओव्यांतून पुष्कळदा शेवटला तोकडा चरण, ज्या व्यक्तीवर ओवी गायली असेल त्या व्यक्तीचें नांव घालून करतात.

३ 'जात्यावर बसलें म्हणजे ओवी आठवते' किंवा 'हातीं खुंटा आल्यावाचून ओवी सुचत नाही' अशा प्रकारच्या म्हणी याच कारणावरून प्रचारांत आल्या असाव्यात.

सा रे ग ग ग सा रे रे सा | ध सा रे ग रे सा रे रे सा |
ता तो बा च्या ग हा ये म ठीं | ता तो ग बा ई बा च्या म ठी |
० ० ० ० ~ | ० ˘ ˘ ~ ० — |

या ओवीची दुसरी ओळ "अग मिळना कातगुळ । ही का चिंचचा पाला वाटी" अशाच तऱ्हेने आळवणें.

(२) रे रे रे ग॒ रे सा रे ग॒ रे सा | सा रे ग् ग् रे सा रे ग रे ग सा |
ये लु बा ई च ज त ऽ क री | ये लु बा ई च ज त ऽ क ऽ री |
० ० ० ० ० ~ | ० ० ० ० ० ~ |

सा रे ग् ग् ग् ग् सा रे ग् ग् रे सा | रे ग् ग् रे ग् |
म्या का व ळ खि ल मा ळा व ऽ ऽ री | स खे बा ई ग |
० ० ० ० ० ~ ~ | ० ० ~ |

ग् ग् सा रे ग् ग् सा रे रे सा | ध नि सा सा रे ग् रे सा
म्या का व ळ खि ल मा ळा व री | मा ळा वऽ री ग ऽ व री
० — ० — | ० ० ० ˘ ˘ ०

या ओवीची दुसरी ओळ "सोन्या चांदीच्या अब्दागिरी । परशुराम त्या बाळावरी." वरीलप्रमाणेच आळवणें.

आतापर्यंत भारत-अितिहास-संशोधक-मंडळाचें त्रैमासिक, महाराष्ट्र साहित्य पत्रिका, प्रतिभा व सह्याद्री या नियतकालिकाच्या अंकांतून ओव्यांचा थोडा थोडा संग्रह येअून गेलेला आहे. कौटुंबिक व सामाजिक ओव्यांचा अेक बराच मोठा संग्रह श्री. साने गुरुजी यांनी आपल्या 'स्त्री-जीवन' या पुस्तकात केला आहे. निरनिराळ्या जातींतून व प्रांतांतून प्रचलित असलेल्या ओव्यांचें स्वरूप पुष्कळदा सारखेंच असल्याने, मीं अुद्धृत केलेल्यांतील अेखाददुसरी ओवी पूर्वी कशांततरी येअून गेली असण्याचा संभव आहे. श्री. साने गुरुजींनी संग्रहित केलेल्या सर्व ओव्या ब्राह्मण जातींत रूढ असलेल्या आहेत. मी ज्या ओव्या देणार आहें, त्या सर्व मराठा, महार किंवा मांग अशा तऱ्हेच्या मागासलेल्या वर्गांतील स्त्रियांच्याकडून मिळविलेल्या आहेत. त्या बहुतेक मुंबअीच्या मजूरवर्गांतील स्त्रियात हिंडून व पुणें जिल्ह्यांतील लोणी काळभोर या खेड्यांतील शेतकरी स्त्रियांकडून घेतलेल्या आहेत. या सर्व ओव्या घाटावर किंवा देशावर राहणाऱ्या स्त्रियांच्या तोंडच्या आहेत. अुच्च जातींत व मागासलेल्या जातींत रूढ असणाऱ्या ओव्यांचें स्वरूप पुष्कळसें सारखें असलें, तरी मागासलेल्या जातींतील स्त्रियांकडून मिळालेल्या ओव्यांतून खास त्यांच्या चालीरीतींची व कल्पनांची जास्त माहिती मिळण्यासारखी आहे. भाषेच्या दृष्टीनेसुद्धा मागासलेल्या वर्गांच्या स्त्रियांच्या तोंडून घेतलेल्या ओव्यांपासून वाचकवर्गाचा जास्त फायदा होअीलसें वाटतें. विषयानुरूप ओव्यांचें मुख्यत्वेंकरून पुढीलप्रमाणे वर्गीकरण करतां येअील.

(१) पौराणिक कथांवर आधारलेल्या ओव्या.

(२) नाथसंप्रदाय व संतकवि यांच्या भक्तिमार्ग-प्रचाराचा परिणाम होअून रचल्या गेलेल्या ओव्या.

(३) अैतिहासिक कल्पित कथावर अुभारलेल्या तुरळक मिळणाऱ्या ओव्या.

(४) सामाजिक व कौटुंबिक जीवनावरील ओव्या.

पुराणकालीन थोर त्रिभूति आज समाजांत देवाप्रमाणें कल्पून पूजिल्या जातात. राम, कृष्ण वगैरे विभूतींना समाजाने आज मंदिरांतून देवाची जागा दिलेली आहे. तेव्हा अशा तऱ्हेने पुराणकालीन देवतांसंबंधी धार्मिक व भक्तिभावाने स्तुतिपर म्हणून रचल्या गेलेल्या कांही ओव्या सापडतात. या ओव्यांतून दैवत आणि भक्त या नात्याचें समर्थन असतें. त्यांतील उद्दिष्ट व्यक्ति ही मानवतेच्या पातळीवर कधी येऊं शकत नाही. अुलट पुराणवाङ्मयांतील विभूतींच्या चरित्रांतला सामान्य मानवी जीवनाशी समान्तर असा कथाभाग निवडून, त्यांतील प्रसंग व भावना यांना सर्वसाधारण माणसांच्या व्यवहाराप्रमाणे मानून, त्यांच्या सुख-दुःखाशीं समरस होअून रचलेल्या कथात्मक ओव्या याहिपेक्षा जास्त प्रमाणांत आढळतात व याच ओव्यांचा विचार या ठिकाणीं करावयाचा आहे. पौराणिक कथाप्रसंगांचा आधार मध्यवर्ती घेअून त्यांवर स्वानुभवाने सुचलेल्या कल्पनांचें कुशलतेने वेष्टन देअून ज्या शेकडो ओव्या स्त्रियांनी निर्माण केल्या आहेत, त्या मनोरंजक आहेत यांत शंकाच नाही. त्यांत अशिक्षित मनाच्या कल्पनेच्या भराऱ्या किती अुंचीपर्यंत सहजसुलभतेने जाअूं शकतात, याचा चांगला प्रत्यय येतो.

अशिक्षित जनतेने स्वतः वाङ्मयाचा अभ्यास केलेला नसतो. श्रुतिपरम्परेने त्यांच्या कानांवर हें वाङ्मय पडल्याने पुष्कळदा त्यांचें ज्ञान अर्धवट असतें व अशा अर्धवट ज्ञानाला स्वतःच्या कल्पनेची जोड देअून ज्या ओव्या स्त्रियांनी रचलेल्या आहेत, त्यांत पुष्कळदा त्या वास्तविक मूळ आधारापासून दूर गेलेल्या दिसतात. महाभारत व रामायण यांतील कांही प्रसंगांचा विचित्र अर्थ घेअूनहि त्यावर कांही गीतें रचलेलीं आढळतात.

पुराणकथांवर आधारलेल्या ओव्यांमध्ये प्रामुख्याने महाभारत व रामायण या दोहोंतील कथाप्रसंगावर ओव्या रचलेल्या मिळतात. अितर पुराणांपैकी भागवत व विष्णुपुराणांतील कृष्णकथेवरील ओव्या पुष्कळ सापडतात. शिवलीलामृतांतील लोकप्रिय कथाप्रसंगांवरहि कांही ओव्या रचलेल्या दिसतात. तरीपण अेकंदरींत रामायणाच्या मानाने महाभारतांतील कथाप्रसंगांवर रचलेल्या ओव्या कमी मिळतात. याचें अेक कारण असें सागतां येईल की, मानवी जीवनाशीं समरस झालेला व म्हणून सामान्य जनतेला आकर्षक वाटणारा असा कथाभाग रामायणांत जितक्या मोठ्या प्रमाणांत आहे तितका महाभारतात नाही, त्यामुळे महाभारतापेक्षा रामायणच अधिक लोकप्रिय झालेलें असावें.

महाभारताच्या कथेंतील पाडवांना कौरवाच्या दुष्टपणामुळे भोगावा लागलेला अज्ञातवास व त्यामध्ये द्रौपदीचा झालेला छळ या अत्यंत हृदयस्पर्शी प्रसंगांवरच बऱ्याचशा ओव्या आहेत—

पापी किंचकर्ण मांडिला खोटा डाव ।
वनवास भोगिला पांची पांडवांनं ॥ १
पापी किंचकण मांडिला खोटा डाव ।
दुर्पदी जिंकिली कपटभावानं ॥ २
अिंदरसभेत दुर्योधन लअी पापी ।
त्याला देखल्यानं दुर्पदी नैनं झाकी ॥ ३
गांजिली दुर्पदी चारी दर्वाजे लावुनी ।
येदर्वो तिचा बंधु आला बैरागी होअूनि ॥ ४
गांजिली दुर्पदी नेली चावडीच्या कोना ।
पाची पांडवानं खालीं घातल्यात घोनां[3] ॥ ५
दुर्पदीच्या वस्त्रांचा ढीग लागला गंगणीं ।
देव श्रीकृष्ण शेला टाकी अंगावरी ॥ ६
राजा जनकाच्या घरीं काय किंचक मातला ।
दुर्पदीबाअीचं फेडी वस्त्र ढीग गंगनीं पोंचला ॥ ७

या शेवटच्या ओवींतील स्थल-काल-व्यक्ति-घटनांचा गोंधळ मृच्छकटिकातील शकाराच्या बोलण्याप्रमाणे अभिजात वाङ्मयात विनोदी म्हणून ठरवल्यावाचून राहणार नाही.

---

१ कीचक (?). २ यादव. ३ नाक (घोणा).

महाभारतांतील आणखी कांही प्रसंगांवरहि क्वचित् ओव्या रचलेल्या सांपडतात —

समिंदराच्या कांठीं तिनशे हजार ऋषीसर। तांब्यानं तूप वाढी दुर्पदीचं दैवं थोर ॥ ८

वत्सलाहरणप्रसंगींचा लक्ष्मण-अभिमन्यु-युद्धाचा प्रसंग पुढील ओव्यांत वर्णिला आहे—

बाणावरी बाण येत्याती द्वारकेवरी।
अभिमनुचं लगीन येवधं लागलं दारुणी ॥ ९
ऐरावतीच्या वाटनं बिट्टीचा झाला गाळ।
ऐवध खेळले अभिमनु दोघ बाळ ॥ १०
बाणावरी बाण येत्याती गहुगहुं।
येवध खेळले अभिमनु दोघ भाऊं ॥ ११
बाणावरी बाण येत्याती कुठूनी।
अभिमनुनं नेली वंशीला जिंकूनी ॥ १२

महाभारतापेक्षा रामायणाच्या कथेवर उभारलेल्या ओव्या अधिक प्रमाणांत मिळतात. पुराणकथांवरील ओव्यांतून मनुष्यस्वभावनिदर्शक अशा मुद्यांना दिलेलें महत्त्व, रामायणकथेवरून ज्या ओव्या रचल्या गेलेल्या आहेत त्यात अत्यंत उठावदारपणें दिसून येतें. रामाचे अयोध्येंतील प्रथमचे दिवस किंवा वनवासानंतर त्याचा राज्यकारभार यांवर ओव्या रचलेल्या आढळत नाहीत; परंतु राम, सीता व लक्ष्मण यांना वनवासांत भोगावें लागलेलें कष्टमय जीवन, हा कथाभाग मात्र अत्यंत आकर्षक व हृदयस्पर्शी असल्याने त्यावर रचलेल्या बऱ्याच ओव्या मिळतात. त्यांतहि रामासारख्या शूर पुरुषापेक्षा सीतेसारख्या सुकुमार स्त्रीला जनतेची सहानुभूति जास्त मिळालेली दिसते. राम, सीता व लक्ष्मण यांनी एकत्र केलेल्या वनवासापेक्षाहि त्यानंतर लोकनिंदेस्तव रामाने सीतेचा त्याग केल्यावर तिला एकटीला ज्या अत्यंत करुण परिस्थितींत जीवन कंठावें लागतें त्या प्रसंगावर जास्त प्रमाणांत ओव्या रचल्या गेलेल्या दिसतात :—

रामलक्षुमण दोन्ही गुलाबाच हार।
सीताबाई मध शेवंती सुकुमार ॥ १३
रामलक्षुमण दोन्ही जडावाच मोतीं।
सीताबाई मध लालडी शोभा देती ॥ १४
रामलक्षुमण बंधु होउनीया गेल।
आताच्या येवग्यांत वाग्या दुषमन झाल ॥ १५
रामाच्या कुंडावरी हिरवी पालखी कुणायाची।
अंघुळीला गेली सीता जानकी रामायाची ॥ १६
पदमतळ्यावरी फुलाचा शेणसडा।
रामाच्या सीताईचा सुटला बुचड्डा ॥ १७
पडत पाऊईस फळी धरून काळीकुट।
सीतच्या न्हाणीवरी रामचंदर हाकी मोट ॥ १८
सीताबाई बोल आग लागो कोंकणाला।
वनींची वनफळ खावनात मला ॥ १९
रामलक्षुमण दोघ हिंडती लवेंणानं।
रामाची सीता नार नेली लंकेच्या रावणानं २०
लंकेचा रावण अभिमानानं तर्वतो।
रामाची सीता नार हिला भोगीन म्हणतो ॥ २१
रामलक्षुमण दोघ पटाईत वाघ।
रामाच्या सीताईला रावणाचा एक राग ॥ २२

सीतेची सुटका करण्यांत व रावणाचा सत्यानाश करण्यांत मारुतीने दाखवलेल्या पराक्रमाला उद्देशून रचलेल्या बऱ्याच ओव्या आढळतात :—

सीतच्या शुद्धीला गेल होत कोण कोण।
नळनीळ जांबुवंत मारूती चौघेजण ॥ २३
रामलक्षुमण धुंडिती चारी वनं।
मारवती सांगे खुण सीता नेली रावणानं ॥ २४
अंजनीच्या पोटीं देव मारूती एकला।
रामाच्या सीतेसाठी येढा लंकेला टाकला २५

---

१ दैव. २ युद्ध. ३ एकामागून एक. ४ दुर्योधनपुत्र लक्ष्मण व अर्जुनपुत्र अभिमन्यु म्हणून भाऊ भाऊ. ५ वत्सला. ६ घाटावर राहणाऱ्या स्त्रियांनी या ओव्या रचल्यामुळे त्यानी सीतेला वनवासाला कोकणांत पाठविलें हें स्वाभाविक नव्हे काय ? ७ शेतांतील खोलगट भाग. ८ रागाने पाहतो.

अंजनीच्या पोटीं देव मारूती वगरे ।
रामाच्या सीतेसाठी घेतो लंकेची खबर ॥ २६
देव मारवती अंजनीचा तान्हा बाळ ।
रामाच्या सीतेसाठी झाला रावणाचा काळ २७
अंजनीच्या पोटीं देव मारूती भीमबळी ।
रामाच्या सीतेसाठीं लंका जाळोनी केली होळी॥
जळो जळो लंका रावणाची ।
तोंड झालीं काळीं रामाच्या वानरांचीं ॥ २९
जळली लंका वीझवीतो सारा गांव ।
लंकेचा धनी मारवती त्याचें नांव ॥ ३०
अंजनी गरभिणी हायेत्या पिवळया तुझ्या कुशी ।
जल्मिला मारवती चैती पुनवच्या दिशीं ॥३१

रामलक्षुमण दोघींचे दोघेजण ।
मारवती राजा अंजनीचा पैलवान ॥ ३२
देवामधीं देव मारूती ब्रह्मचारी ।
अस्तुरीवांचुनी तप त्याचें निरधारी ॥ ३३
मारवतीदूता अंजनी तुझी माता ।
आणिली द्रुणागिरी नेत्र उघडावीं आता ॥ ३४
इंद्रजित बाण सक्ति[२] लागली लक्षुमणा ।
राम बोलइतो मारवती दुरणागिरीची वनशी[३] आणा ॥ ३५
लक्षुमणाला सक्ति लागली पान्या रातीं ।
मारूतीनें आणिली दुरणागिरी परवती ॥ ३६

रावणाच्या दुष्टपणामुळे त्याच्याबद्दल वाटणारा तिरस्कार खालील ओव्यांतून दृग्गोचर होतो :—

लंकेचा रावण सरणीं जळतो पालथो[४] ।
रामाच्या सीतेसंगं गरव केला होता ॥ ३७
खोटी वासइना ज्याची त्याला खाती ।
कपटी रावणाच्या झाल्यात्या कोण गती ३८
देव धरमात पतिवर्ता दोघी नारी ।
रामाची सीतामाई रावणाची मंदोदरी ॥ ३९

रावणाच्या बंदीशाळेंत असतांना सीता व रावणाची साध्वी स्त्री मंदोदरी यांचें सख्य असतें. त्या दोघी एकमेकींजवळ काय बोलत असतील याची कल्पना करून खालील ओव्या रचलेल्या दिसतात.

सीता सांग कथा आइक मंदुदरी ।
रामाच्या गुफवरी यऊध झाल भारी ॥ ४०
सीता करी कथा ऐक मंदुदरीबाई ।
आला वनवास तुझ्या रावणाच्यापायीं ॥ ४१
मंदुदरी बोल सीता पलंगीं बसूं दोघी ।
राम जन्माचा भिकारी राजि रावणाच्या घरीं ४२
सीतामाय बोल मंदोदरी माझी आई ।
तुझ्या सारइख्या माझ्या रामाला दासी कई ४३

सीतेच्या सुटकेनंतर तिच्यावरील संकटाचें वर्णन ती स्वतः व इतर लोक रामाजवळ करतात अशी कल्पना करून त्या वेळीं रामाची झालेली मनःस्थिति कांही ओव्यांत चितारलेली दिसते :—

सीता सांग कथा आपल्या जलमाची ।
लंका जळो त्या रावणाची ॥ ४४
सीतेच्या सांगी कथा ऐक राम चित्तीं ।
लंकेच्या रावणानं सीता रामाची नेली होती ४५
सीता सांगी कथा राम सांगूं देईना ।
तुझ्या जलमाची कथा मला ऐकवना ॥ ४६
सीतच्या सांग कथा राम रडतो धाई धाई ।
बारा वरसं झालीं सीता मंदिरांत नाहीं ॥ ४७
सीतला वनवास आला कुण्या रिती ।
लंकेचा आला जोगी त्याला भिकेशी गेली होती
सीता चालली वनवाशीं आडवी गेली गाभी ।
सीतला वनवास आला रावणाच्या पायीं ॥ ४९

---

१ उग्र. २ अस्त्र (शक्ति). ३ वनस्पति. ४ हिंदु पद्धतीप्रमाणे मृत माणसाला उताणें निजवून अग्नि देतात. रावणाने गर्व करून दुष्ट वर्तन केलें म्हणून त्याला पालथा जाळण्यांत आलें असें स्पष्टीकरण ओवी सांगणाऱ्या महार स्त्रीने केलें.

सीता चालली वनवासीं आडवा गेला होला । सीतला वनवास देवा रावणानीं दिला ॥ ५०

पुढील ओव्या रामाने सीतेचा त्याग केल्यानंतरच्या तिच्या दुसऱ्या वनवासाबद्दलच्या आहेत.*

सीता चालली वनवासा कुंकु कपाळ भरूनी ।
तिचा अळींकार राम हेरीतो दुरुनी ॥ ५१
शिमगारीला रथ रथा जुंपिली वासरं ।
भयाणकार[1] वनांमधी सीतानारीचं सासर ॥५२
शिनगारीला रथ रथा जुपिल्यात वास ।
सीता वनाला झाली स्वास ॥ ५३
शिनगारीला रथ रथा लाविलिया दोरी ।
वना निघाली दारुणी ॥ ५४
शिनगारिला रथ रथा लाविली पडओीकी[2] ।
सीता रामाची लाडइकी ॥ ५५
सीताला घालवाया आयाबायांचा घोळका ।
संभाळा बायांनो राम भुकेचा आळका ॥ ५६
सीताला घालवाया आयाबाया सवा कोस ।
फिरा बायांनो माघारी शिरीं माझ्या वनवास ५७
सीतेला वनवास डोओीच्या केसोकेशीं ।
घालून दिलं तिनं सर्याला देशोदेशीं ॥ ५८
सीता जाते वनवासा सांगते तेल्याला ।
राम मंदिरीं अेकला तेल द्यावं समओीला ५९
सीता जाते वनवासा सांगते कोळयाला
राम मंदिरीं अेकला पाणी द्यावं आंघुळीला ६०
सीता जाते वनवासा सांगते माळयाला ।
राम मंदिरीं अेकला फुल द्यावींत पूजेला ६१
सीता निघाली वना वन लागलं जाओीचं ।
अुघड सीता डोळ घंर तुपल्या आओीचं ॥ ६२

सीता निघाली वना वन लागलं चाफ्याचं ।
अुघड सीता डोळ घर तुपल्या बापाचं ॥ ६३
त्या वनाच्या ठायीं सीतेला तहान लागली खरी
लक्षुमण दीरा पाणी आणावं लवकरी ॥ ६४
लक्षुमण दीरा सांग मनाचं कपट ।
नव्ह माहेराची वाट रान दिसतं अचाट ॥६५
लक्षुमण दीरा सांग मनींचं फोडुनी ।
नव्ह माहेराची वाट गेलं अंतर अुडूनी ॥ ६६
लक्षुमणानीं रथ नेअुन ठेविला वनांत ।
लक्षुमण देव आले आपले नगरींत ॥ ६७
सीतेला वनवास आलासा बाळपणीं ।
तेव्हा रामाची भरज्वानी ॥ ६८
भयाण[3] वनांमधीं सीता रडते आइका ।
तिला समजावया बोरी-बाभळी बाओीका॥ ६९
सीता वनवासी दगडाची केली अुशी ।
अेवढ्या वनांमधीं बाओी झोप आली कशी॥७०
असा वनवास सीतेसारख्या सओीला ।
झाल्यात बारा वर्से डोओी धुतली नओीला ।७१
सीतेला वनवास लवअंकुशाच्या येळ ।
वनींचीं वनफळं त्याचा रुमालीं रस गळ ॥ ७२
सीता नार बाळंतीण तिला सुओीण नाही कोणी ।
नेत्र झाकुयानी तातोबा[4] घाली पाणी ॥७३
भयाण वनामधीं सीता करीते आओी आओी
बांधुनिया डोळ तातोबा झाला दाओी ॥७४

---

* सीतेबद्दलच्या अशा तऱ्हेच्या कांही ओव्या भारत-इतिहास-संशोधक-मंडळ-ग्रंथमालेच्या ९ व्या पुस्तकांत (वार्षिक इतिवृत्त शके १८३६, पृ. १४६) श्री. वा. दा. मुडले यांनी दिलेल्या आहेत. या ओव्या महाराष्ट्रांतील निरनिराळ्या खेड्यांतून व जातीतून थोड्याफार फरकाने रूढ असल्याने उद्धृत केलेल्यापैकी कांही ओव्या त्यांत येऊन गेल्या असण्याचा संभव आहे.

१ 'भयकर' याची रूपें ओव्यांतून भयाणकार, व भयाण वनांत याची बहीण वनांत वगैरे झालेली आढळतात.

२ पडकें– गाडीला दोन बाजूंस माल पडूं नये म्हणून लावलेल्या ताट्या.

३ या ठिकाणीं 'आटंग्या वनामधी' असाहि शब्दप्रयोग सापडतो. अटंग्या = भयंकर त्याप्रमाणेच अटव्य याचें रूपांतर होऊन "आठव्या" असा शब्दप्रयोगहि मिळतो.

४ वाल्मिकी ऋषीचा उल्लेख जानपदगीतांतून नेहमी "तातोबा" किंवा "काकोबा" असा केलेला आढळतो. सीतेला तो पित्याप्रमाणे झाला असल्यामुळे "तात" पासून हा शब्दप्रयोग असावा.

बहीण वनांमधीं काय दिसतं लालीलाल
सीताबाअी बाळंतीण दिलं लुगडयाचं पाल ॥
सीता बाळंतीण तातोबांच्या हाये मठीं ।
मिळना कातगुळ चिंचयेचा पाला वाटीं ॥ ७६
सीताबाअी बाळंतीण बाळुती धुया गेली ।
तिच्या आशीरवादानं वाचा वानरांना आली ॥
भयाण वनांमधीं कोण करीत जुजुजुजु ।
सीताबाअी बोल वनवाशा बाळा नीजु ॥ ७८
दगडाची केली अुशी तनाची केली शेज ।
सीताबाअी बोल लवअंकुशा बाळा नीज ७९
नाचणीचा कोंडा नको खाअू सीताबाअी
लहु नी अंकूश अुद्या होतील शिपाअी ॥ ८०
सीतेच्या सरपाला तातोबा ऋषी म्याला ।
लवाळ्याचा लव त्यानं साजिवंत केला ॥ ८१
शीताबाअी बोल काकोबा माझ्या ऋषी
माझं बाळ मजपाशीं तूं त कुणाचं हालविशी ॥

सीता वाल्मिकी ऋषीच्या आश्रमात असतांना घडलेल्या आणखी कांही प्रसंगांना अुद्देशून खालील ओव्या आहेत :—

तातोबा ऋषी बोल सीता सतव आवर ।
तुझ्या सतवाने माझीं भिजलीं वावरं ॥ ८३
तातोबा ऋषी बोल सतव झालं मात ।
तुझ्या सतवाने वाहवला माझा मठ ॥ ८४
रातीचं सपह्नु[१] सीता सागते तातोबाला ।
रामाच्या बागेमधें लहु गेल कंबळाला ॥[२] ८५
सोन्याच्या कातरी लहु कंबळ उतरी ।
रातीचं सपनं हिरव्या पातळाची नारी ॥ ८६
रामाच्या बागेतून कोण आल्यात खेतरी[३] ।
हातीं सोन्याच्या कातरी लहु कंबळ उतरी ८७
बाणावरी बाण येतात लुव्हाच ।
रामाच्या बागेमधीं बाळ खेतरी कुणाचं ॥ ८८
लहु लवाळ्याचं बाळ अंकुश रामायाचं ।
धनुष्यबाण उड लक्षुमण चुलत्याच ॥ ८९

वाल्मिकी रामायणांत किंवा इतर कुठेहि आधार नसलेली अशी एक विचित्र कथा महाराष्ट्रांतील मागासलेल्या लोकाच्यात रूढ आहे. ती म्हणजे रामाने सीतेचा नुसता त्यागच करावयास लक्ष्मणास सांगितलें नाही तर कैकयीच्या सांगण्यावरून तिचा वध करण्यास त्याने लक्ष्मणास आज्ञा दिली :—

शिनगारिला रथ रथा जुपियलि सुतळी ।
वधाया चालवली सीतेसारखी पुतळी ॥ ९०
सीता नेली वधायाला सुर्‍यातळी केला माथा ।
वध वध लक्षुमणा आशा सोड माझी आता ॥
सीता नेली वधायाला सुर्‍यातळी केली मान ।
वध वध लक्षुमणा तुला केगईची आण ॥९२
सीतेला वधिली साक्ष[४] आणीला तिचा हात ।
केगाई[५] सासु जेविली दुधभात ॥ ९३
सीतेला वधिली साक्ष आणीला तिचा पाय ।
सीता वधिली कोणा ठाय[६] ॥ ९४
सीतेला वधिली साक्ष आणील तिच डोळ ।
राम धरणीला लोळ ॥ ९५
सीतेला वधिली साक्ष आणीली तिची निरी ।
सीता वधिली आता खरी ॥ ९६

---

१ स्वप्न. २ अश्वमेधयज्ञाचा घोडा सोडला असतां रामाच्या सैन्याशीं युद्ध खेळतो. त्या वेळीं सीतेला पडलेल्या स्वप्नाला उद्देशून रचलेलें. ३ क्षत्रिय, रणशूर.

४ या ठिकाणीं 'साथ ग आणिला' असाही प्रयोग आढळतो. ५ कैकयी.

६ कुठल्या जागीं; सीतेचा वध करून आल्यावर राम लक्ष्मणाला विचारतो.

# राष्ट्रकूटकालीन मराठी

(लेखक— श्री. ग. वा. तगारे)

सर्वसामान्य समज असा आहे की, मराठीमध्ये ग्रंथरचनेला सुरुवात १२ व्या शतकाच्या अुत्तरार्धात झाली. महानुभावपंथाचे आद्यलेखक व जुन्या परंपरेतील मुकुंदराज किंवा ज्ञानेश्वर यांनी आजच्या सुशिक्षितांवर अितकी विलक्षण मोहिनी टाकली आहे की, या लेखकांची भाषा ही कमींत कमी पांच शतकें होत असलेल्या भाषा व वाङ्मयविकासाची परिणत अवस्था आहे याचा त्यांना विसर पडतो. ज्ञानेश्वरींतील भाषा हा १३ व्या शतकांतील अभिजात वाङ्मयाचा अुत्कृष्ट आदर्श आहे याबद्दल मतभेद नाही. पण त्या भाषेची प्राचीन शिलालेखांतील त्रोटक वाक्यांशीं तुलना करून मराठी भाषेवर अनैसर्गिकपणा (Supernormality) लादण्यांत येतो. आणि हीच गोष्ट अनिष्ट आहे. वस्तुतः अि.स.च्या ८ व्या शतकांत मराठीला वैशिष्ट्यपूर्ण अस्तित्व होतें. 'दढ-मडह- सामलंगे सहिरे अहिमाणकलहसीलेय। "दिण्णले" "गहिल्ले" अुल्लविरे तत्थ मरहट्टे॥' या कुवलयमालेंतील अुताऱ्यावरून ही गोष्ट स्पष्ट होते. ज्ञानेश्वरपूर्व शिलालेख व ताम्रपट हे ८ व्या शतकापासूनचें मराठीचें सातत्य दाखवतात[1].

यादवकीलान मराठीवर डॉ. तुळपुळ्यांनी प्रबंध लिहिल्यामुळे त्या भाषेचें स्वरूप आता वाचकवर्गासमोर येअीलच. पुष्पदंता[2]बद्दल मला वाटणारें कुतूहल त्याची भाषा मराठीचें पूर्वरूप असल्यामुळेच निर्माण झालें. आणि व्याकरणदृष्ट्या तिचें पृथक्करण करून त्याची ज्ञानेश्वरकालीन भाषेशीं तुलना करतां माझा तर्क खरा आहे असें आढळलें. हाच अभ्यास तज्ज्ञांचे समोर सविस्तर मांडून पुष्पदंताची ग्रंथसंपत्ति मराठींत लिहिली गेली आणि त्या मराठीचें अशा तऱ्हेचें स्वरूप आहे, हें सांगणें हा या प्रकरणाचा अुद्देश आहे.

---

१ आज "अपभ्रंश" म्हणून गणलें गेलेलें साहित्य जर प्रांतवार विभागून तत्प्रांतीय अर्वाचीन भाषांशीं त्याची तुलना केली तर अर्वाचीन आर्यभाषांचा १०००-१२०० वर्षांचा सुसंगत अितिहास लिहितां अेअील. मराठी भाषेपुरता तसा प्रयत्न प्रस्तुत लेखकाने या प्रकरणांत केलेला आढळेल. बरेंच अपभ्रंश वाङ्मय अजून अप्रकाशित असल्यामुळे या बाबतींत अधिक लिहितां येणें शक्य नाही.

२ पुष्पदंत नांवाचा महाकवि राष्ट्रकूट राजे तिसरा कृष्णराव खोट्टिगदेव (अि.स.च्या १० व्या शतकाचा अुत्तरार्ध) यांच्या कारकीर्दींत मान्यखेट (निजामराज्यांतील आधुनिक"मालखेड") अेथे होअून गेला. हा मूळचा शैवपंथी ब्राह्मण होता. पण पुढे त्याने दिगंबर जैनपंथ स्वीकारला. अि. स. ९५९ मध्ये मान्यखेट येथे राष्ट्रकूट राजा (तिसरा) कृष्ण याचा प्रधान भरत याच्या आश्रयास तो येअून राहिला; व त्याने आपल्या आश्रयदात्याच्या अुत्तेजनावरून तेथील देशभाषेंत जैन पुराणांतील ६३ महापुरुषांचें गुणवर्णनपर अेक प्रचंड महाकाव्य "महापुराण" लिहिलें. त्यानंतर मध्ययुगांत लोकप्रिय असेलल्या 'यशोधरचरित' व 'नागकुमारचरित' या कथा त्याने देशी भाषेंतील दोन महाकाव्यांत गुंफल्या. अि. स. ९७२ मध्ये धारचा परमार राजा हर्षदेव याने मान्यखेटवर स्वारी करून तें नगर जाळल्यावर हा कवि कोठे गेला अि. माहिती आज अुपलब्ध नाही. पुष्पदतवाङ्मयाचें मराठी भाषेच्या दृष्टीने फार मोठें महत्त्व असल्यामुळे त्याच्या भाषेचें शास्त्रीय पृथक्करण होणें अत्यंत जरूर आहे. आणि तें पृथक्करण प्रस्तुत प्रकरणांत केलें आहे.

प्रथमतः पुष्पदंत हा मान्यखेटची भाषा न येणारा कवि होता, या समजुतीचा विचार करूं. महापुराणाच्या प्रस्तावनेंत तो आपल्याला देशी भाषा येत नाही (म. पु.१.८.१०) असें म्हणतो. पण त्या कबुलींत कांही अर्थ नाही. कारण त्याचीं आपल्याला लक्षण, छंद व देशी येत नाही (म. पु. १.८.१०) तसेंच "व्यास, कालिदास अि. महाकवि, कपिल, सुगत अि. दर्शनकार याचा गंध नाही" (म. पु. १९) वगैरे विधानें तत्कालीन शालीनतेचा अेक प्रकार आहे. त्याने धर्मप्रसारकास व कवीस आवश्यक अशी स्वपरमतांची माहिती मिळविली होती व पूर्वसाहित्याचें अध्ययन केलें होतें; ही गोष्ट त्याच्या ग्रंथामध्ये पावलोपावलीं पटते. याचा विचार पुढील प्रकरणांत केला आहे.

पुष्पदंताचें लिखाण ज्ञानेश्वरपूर्वकालीन मराठींत आहे, याला पुढील प्रमाणें देतां येतील. (१) तें वाङ्मय महाराष्ट्राची प्राचीन राजधानी मान्यखेट येथे लिहिलें गेलें आहे. आज निर्विवाद तऱ्हेने मराठी समजलें जाणारें बरेंच प्राचीन वाङ्मय मान्यखेटच्या जवळपास निर्माण झालें आहे. (२) तें वाङ्मय बहुजनसमाजाला कळून धर्मप्रसार व्हावा व (लेखकालाहि पुण्य लागावें) या अुद्देशाने मान्यखेटच्या देशभाषेंत लिहिलें आहे. (३) ज्ञानेश्वरकालीन (व आजसुद्धा) मराठींत प्रचलित असलेले अनेक शब्द त्यांत आढळतात. (४) वर्णप्रक्रिया, प्रत्ययप्रक्रिया, वाक्यरचना अि. भाषाशास्त्राचे पुराव्यावरून तें ज्ञानेश्वरपूर्व मराठीचें रूप आहे असें ठरतें. (५) त्यांतील वृत्तें व मराठींतलि वृत्तें (गण व मात्रावृत्तें व आधुनिक गेय वृत्तें सुद्धा) अेकच आहेत.

यापैकी क्रम ४ हें प्रमाण अतिशय महत्त्वाचें असून त्याचा विचार प्रस्तुत प्रकरणांत करावयाचा आहे. त्यापैकी प्रत्ययप्रक्रियेला जरूर तेवढाच वर्णविचार करून मी मुख्य विषयाकडे वळणार आहें. वर्णविचाराबद्दल अधिक माहिती Vendryes, Bloomfield, Graaf, Jesperson, Taraporewala अि. लेखकांच्या भाषाशास्त्रावरील पुस्तकांत पाहावी. स्थलाभावामुळे जास्त चर्चा करतां येत नाही व करणें आवश्यक नाही.

साहित्य—(Apparatus criticus)

(१) पुष्पदंताचे ग्रंथ—

(१) महापुराण—डॉ. प. ल. वैद्य संपादित

(२) नागकुमार चरित—प्रा. हिरालाल जैन संपादित

(३) यशोधरचरित—डॉ. प. ल. वैद्य संपादित

(पुष्पदंताचे पुस्तकांचा संक्षिप्त अुल्लेख पुढे म.पु.,ना.च,.य.च.असा अनुक्रमें केलाआहे.)

यशोधन चरितांत कांही भाग प्रक्षिप्त आहे. परंतु या साहित्यांत गंधर्वाने घुसडलेला प्रक्षिप्त भाग लक्षांत घेतला नाही.

(२) स्थलकालाचें सातत्य असलेले मराठीचे वाङ्मयीन अुल्लेख ताम्रपट, शिलालेख. यांत श्रवणबेळगोळचा शिलालेख स्थलदृष्ट्या दूर म्हणून घेतला नाही. हे सर्व ज्ञानेश्वरपूर्वकालीन आहेत.

(३) ज्ञानेश्वरी आणि अमृतानुभव. (ज्ञानेश्वरी–राजवाडेप्रत).

(४) ज्ञानेश्वरपूर्वकालीन महानुभाववाङ्मय (लीलाचरित्र, चक्रधरसूत्रें, वच्छहरण, रुक्मिणीस्वयंवर, धवळे)–या वाङ्मयास ज्ञानेश्वरीनन्तर घेण्याचें कारण, हें सांकेतिक लिपींत संग्राहिलें गेलें असतां अर्वाचिलें असावें अशी शंका येते.

वर्णप्रक्रिया—

प्रत्ययप्रक्रियेबद्दल लिहितांना वर्णप्रक्रियेवर लिहिणें, म्हणजे विषयान्तर करणें आहे असें वाटण्याचें कांही कारण नाही. कारण भाषाशास्त्राचे दृष्टीने प्रत्ययप्रक्रियेचा विचार करतां प्रत्यय ज्या वर्णांचे बनतात त्या वर्णांसंबंधी स्पष्ट कल्पना असणें आवश्यक आहे. आणि विशिष्ट वर्णांचीं अुच्चारस्थानें व त्यांच्यामधील संबंध लक्षांत घेतला नाही, तर प्रत्ययप्रक्रिया हें अेक विचित्र कोडें होअून बसतें. मी येथे phonetics बद्दल फार माहिती न लिहितां, स्वरागम (prothesis), स्वरभक्ति (anaptyxis), वर्णविपर्यय (metathesis), अवयवलोप (haplo-logy), वगैरे गोष्टी, "वुअिल्सन् फॉयलॉलॉजिकल् लेक्चर्स," कुलकर्णीकृत "मराठी भाषा–अुद्गम व विकास," किंवा तत्सम पुस्तकांतून वाचकांस माहीत आहेत असें गृहीत धरून लिहितों.

स्वरविचार—अिण्डोयुरोपियन भाषांत मूळ स्वर तीन ॲ, ऍ, ऑ. त्यांच्या ऱ्हस्व व दीर्घ अुच्चारांप्रमाणें अेकंदर सहा स्वरमाला (vowel-gradations) बनल्या आहेत. या प्रत्येकांत मुख्य स्वर (आघातयुक्त) ॲ (अ किंवा आ), ऍ, किंवा ऑ घेअून नन्तर त्यांत अर्ध-स्वर (य्, व्, र्, ल्), व अनुनासिकें (न्, म्) घेअून स्वरमाला (vowel-gradation series) तयार होते. अिंडोयुरोपियन भाषांतील ऍ व ऑ यांत प्राकृतिक रूपान्तर (ablaut) होअून ॲ स्वरमाला राहिली आहे. ग्रीकमध्ये अे मालेंतील स्वरांचें ओ मालेंत रूपांतर झालें आहे. असें कां झालें याची कारणें अज्ञात आहेत. आता संस्कृतमधील ॲ स्वरमालेमुळे पुढील ध्वनि अथवा स्वर निर्माण झाले. ॲ=अ, ॲ=आ हे ध्वनि ऱ्हस्व व दीर्घ अुच्चार दाखवतात.

(१) अ स्वरमाला (ऱ्हस्व स्वर)

(१) अ हा शुद्ध स्वर = अ
(२) अ + य् = अय्, ए [इ किंवा ई]
(३) अ + व् = अव्, ओ [उ किंवा ऊ]
(४) अ + र् = अर् (ऋ)
(५) अ + ल् = अल् (ऌ)
(६) अ + न् = अन्
(७) अ + म् = अम्

(२) आ स्वरमाला (दीर्घ स्वर)

वर दिल्याप्रमाणे सात अुच्चार जरी शक्य असले तरी फक्त तीनच नेहमी अुपयोगांत येतात.

(१) आ हा शुद्ध स्वर = आ
(२) आ + य् = आय्, ऐ
(३) आ + व = आव्, औ

आधुनिक भाषाशास्त्र स्वरविचार अशा पद्धतीने करतें. ऍ किंवा ऑ हे संस्कृतमध्ये आढळत नाहीत असें म्हटलें, तरी भारतीय भाषांत त्यांचा अुच्चार सर्रास आढळतो. अपभ्रंशांत तें स्वर आढळतात व पुष्कळदा हस्तलिखित ग्रंथांत 'ऍ'चा 'इ' व 'ऑ'चा 'उ' केलेला आढळतो.

पाणिनीने याचा विचार जरा निराळ्या पद्धतीने केला आहे. पाणिनीने प्रत्याहारसूत्रांत अ, इ, उ, ऋ, ऌ, ए ओ, ऐ, औ हे स्वर देऊन लगेच 'हयवरट्' या सूत्राने अर्धस्वर दिले आहेत. यावरून त्याच्या दृष्टीने ह्–अ, य्–इ, व्–उ, र्–ऋ अशा उच्चारस्थानावरून जोड्या असाव्यात. अर्धस्वर हे स्वभावतःच अर्धे स्वर व अर्धी व्यंजनें आहेत. 'अिग्वणः संप्रसारणम्' (१·१·४५) या सूत्रावरून तो संबंध स्पष्ट होतो. आपण स्वतःशीं कण्ठ्य ह्, व अितर अर्धस्वराचे अुच्चार पाहिले तर य्=इअ, व्=उअ, र्=ऋअ असे अुच्चार आहेत असें आढळेल. 'वृद्धिरादैच्' (१-१-१), 'अदेङ् गुणः' (१-१-२) या सूत्रांनी अ, इ, उ, ऋ, ऌ यांचा आ, ऐ, औ, आर्, आल् आणि ए, ओ, अर्, अल् हे होतात असें त्याने सांगितलें. 'वृद्धिरादैच्' व 'अदेङ् गुणः' यांतील त् या ज्ञापकावरून 'आ' याचे ऱ्हस्व व दीर्घ उच्चार पाणिनीस माहीत होते असें दिसतें.

एओङ् सूत्रात ए, ओचा साधा–एकस्वरी उच्चार आहे, संयुक्त नाही. ए व ओ यांचे सुद्धा ऱ्हस्व व दीर्घ उच्चार असावेत हें 'ईदूदेद् द्विवचनं प्रगृह्यम्' (१-१-११), ओं (१-१-१५) यांत 'ए' व 'ओ'ला लागलेल्या 'त्'वरून व 'एचइग्रस्वादेशे' (१-१-४८त् या सूत्रावरून वाटतें.

परमसन्निकृष्ट स्वरांची संहिता न करता वेदपूर्वभाषा बोलली जात असे व 'वृद्धिरादैच्') या सूत्राच्या मुळाशीं वरील लकब असावी असें कै. राजवाडयाचें मत आहे (गुण व वृद्धि-निबंध, इतिहास व ऐतिहासिक ३). प्राकृत भाषेप्रमाणे वेदपूर्व भाषेत अइ, अई, आइ, आई, अए, अऐ, आए, आऐ, अय्, आय् आणि अउ, अऊ, आउ, आऊ, अओ, अऔ, आओ, आऔ, अव्, आव् असे असंहित स्वराचे गट होते. त्यापैकी वैदिककालीं एमध्ये अइ, अई, आइ, आई, ऐमध्ये अए ते आय् अखेर, ओमध्ये अउ, अऊ, आउ, आऊ आणि औमध्ये अओ ते आव् अखेर उच्चार समाविष्ट झाले. प्रातिशाख्य किंवा पाणिनीय संधिनियमावरून पूर्ववैदिक उच्चारांची स्मृति जाणता येते अितकेंच नव्हे तर आज विसाव्या शतकांत ए, ओ, ऐ आणि औ यांचे उच्चार करताना वरील असंहित स्वरांचेच उच्चार केलेले ऐकू येतात.

सारांश, संस्कृतमधील साधे, संयुक्त व अर्धस्वर या प्रकारांचा प्रपंच वर दिल्याप्रमाणे आहे. या फेरफारामध्ये आघातांना (accents) फार महत्त्व आहे. पण तो स्वतंत्र संशोधनाचा विषय आहे तो येथे सोडून देऊ.

स्वरमालेसंबंधी संस्कृत व्याकरणकार व पाश्चात्य भाषाशास्त्रज्ञ यांच्या दृष्टिकोणाची कल्पना पुढील दिलेल्या आकृतीवरून येअील.

**स्वरमाला**




ए व ओ हे स्वर मुख्य मानून पाश्चिमात्य भाषाशास्त्रज्ञ वृद्धि, व दीर्घ व ऱ्हस्व स्वरांची व्युत्पत्ति करतात तर पाणिनीने संप्रसारण किंवा ऱ्हस्व स्वरांना मुख्य मानून स्वरप्रपंच केला. दोघांचे पहाण्याचे दृष्टिकोन भिन्न आहेत अितकेंच. कण्ठ्य 'ह' अर्धस्वर आहे, अ मध्ये

इ, उ चे उच्चार बीजरूपाने आहेत. इ–ई–ए–ऐ–य् व उ–ऊ–ओ–औ–व् यांचा व यांत समाविष्ट होणाऱ्या उच्चारांचा फार निकटचा संबंध आहे, ही गोष्ट लक्षांत घेतली की हेमचंद्राचें अपभ्रंशावरील महत्त्वाचें सूत्र 'स्वराणा स्वराः प्रायोऽपभ्रंशे' (सिद्धहेम ८–४–३२९) उलगडतें व अपभ्रंशाच्या प्रत्ययप्रक्रियेंतील इकार लुप्त होऊन उरलेले प्रत्यय जुन्या मराठींत कां सांपडतात याचा उलगडा होतो.

स्वरविचाराची शास्त्रीय कल्पना लक्षांत घेतां पुष्पदंताचे भाषेंत अ, आ, अि, अी, अु, अू, ऋ (क्वचित्) अॆ, ओ॒ व ज्ञानेश्वरींत अै आणि औ हे अधिक आहेत, त्यामुळे दोन्ही भाषांच्या अैक्याला बाध येतो असें नाही. यादवांच्या राजवटींत संस्कृत विद्येला मिळालेल्या अुत्तेजनाचा तो ग्रांथिक भाषेवर (वस्तुतः लेखावर) झालेला परिणाम आहे. महाराष्ट्रांतील लोकसमुदाय अै व औ हे अुचार १० व्या शतकांत करीत नव्हता किंवा ज्ञानेश्वरकालीन भाषेंत अॆ व ओ॒ हे अुचार नव्हते असें नव्हे.

अे किंवा ओ च्या पुढे जोडाक्षर आलें की पुष्कळदा त्यांचा ऱ्हस्व अुचार होतो ही गोष्ट परिचयामुळे आपल्या लक्षांत येत नाही. मध्ययुगामधील बरेच लेखक (copyists) ऒ किंवा ऎ दाखवताना सरसकट अु किंवा अि लिहित. द्राविड भाषांतून ओ˘, ओ¯ हे दोन्ही अुच्चार असल्यामुळे त्यांना ही अडचण भासत नसे असें सापडलेल्या हस्तलिखितांवरून वाटतें.

ऋ किंवा जोडाक्षरांत 'र'कार कायम ठेवणें हे कांही लेखकांच्या (copyists) परंपरेंत आढळतें. तशीच परंपरा'ळ'बद्दल असावी. राजवाड्यांच्या ज्ञानेश्वरींतील ळकाराचा अभाव हा त्या लेखकांच्या परंपरेचें वैशिष्ट्य असावें. याशिवाय या ळकाराच्या अभावाचें समाधानकारक विवरण करता येत नाही.

हल्लीच्या मराठी लिखाणांत अिंग्लिश अुचार दाखवण्याची जशी अडचण भासते तशीच प्राचीन भाषेंतील अुचार– विशेषतः स्वराचे अुचार– दाखवण्यास येते. निदान आधुनिक कवींनी मुक्तछन्दासारखें लिखाण लिहिताना आघात दाखवण्याची नवीन प्रथा पाडली तर बरें होओल.

**व्यंजनविचार—**

पुष्पदंताचे भाषेंत पुढील व्यंजनें आढळतात. तीं कण्ठ्य तालव्य अशा अुच्चारस्थाना प्रमाणें दिलीं आहेत.

क ख ग घ। च छ ज झ। च़ छ़ ज़ झ़। ट ठ ड ढ ण। त थ द ध न (?)। प फ ब भ म। य र ल व। स ह। ळ।

तालव्य व दन्त्यतालव्य अुचार निरनिराळे दाखविण्यासाठी दोन चवर्ग दिले. 'न'बद्दल अपभ्रंशाच्या हस्तलिखित ग्रंथांतून फारच गोंधळ असतो. १० व्या शतकांत 'न' हा ध्वनि होता हें त्या काळच्या संस्कृत ग्रंथांवरून दिसतें. पैशाचीमध्ये संस्कृत 'ण'बद्दल सुद्धा 'न' अक्षर येअी व त्याचे अवशेष आज 'पानी', 'लोनी' इ. ग्रामिक शब्दांत दिसतात. मूर्धन्य वर्ण अिण्डो-युरोपियन भाषांत आरंभीं नव्हते. ते द्रवीड भाषांच्या सहवासाने संस्कृतमध्ये शिरले व पुढे ते शिष्टमान्यता पावले असा समज आहे. ऋ, र्, ष् नंतर तवर्गाचा टवर्ग होतो असें प्राकृत भाषांतील अुदाहरणांवरून दिसतें. सारांश 'ण'बद्दल १० व्या शतकांत परकेपणा वाटण्याचें कांही कारण नव्हतें व बहुजनसमाजांत 'न'बद्दल पुष्कळदा 'ण' येत असल्यामुळे लेखकांचा (copyists) 'न' व 'ण'बद्दल गोंधळ अुडाल्यास नवल नाही. द्राविड लेखक मात्र सरसकट 'ण' वापरीत असें दक्षिणेकडे अुपलब्ध होणाऱ्या हस्तलिखितांवरून दिसतें. डॉ.

पिशेल-पण्डित-वैद्य यांनी संपादिलेल्या हेमचंद्राच्या व्याकरणांत अपभ्रंशांत शब्दाचे प्रारंभीं असलेला 'न' कायम ठेवला असला तरी डॉ. पिशेलनी अपभ्रंश दोह्याच्या सुधारलेल्या आवृत्तींत (Materialien zur kenntnis des Apabhramsa) सरसकट 'ण' वापरला आहे व हल्ली प्रकाशित होणाऱ्या अपभ्रंशग्रंथांत तेंच धोरण स्वीकारलें जातें.

श, ष, स या ऊष्म्यांपैकी 'स' तेवढा ग्रांथिक लिखाणांत आढळतो. बहुजनसमाजांत अद्याप दन्त्य ऊष्मेच श किंवा षबद्दल वापरतात. राष्ट्रकूट राजवटीपेक्षा यादवघराण्यानें संस्कृत विद्येला चांगला आश्रय दिल्यामुळे आपल्याला १३ व्या शतकांतील ग्रांथिक भाषेंत तिन्ही ऊष्मे आढळतात. कुणबाऊ गीतें लिहिणारे सुशिक्षित कवि ज्याप्रमाणे जानपद भाषा लिहितात तसाच प्रकार पुष्पदंताच्या लिखाणाचा आहे. बहुजनसमाजासाठी लिहिलेल्या कथावाङ्मयांत त्यानें त्यांना प्रिय असलेला 'स' वर्ण कायम ठेवला आहे. वेदपूर्वभाषेंत सुद्धा 'स्' हा एकच ऊष्मा आहे व त्याची पुढे 'ह्, श्, ष्, झ्' अशीं रूपें होतात.

स् आणि ह् यांमध्ये फार निकटचा संबंध आहे. वेदपूर्व भाषेतील सचा अवेस्तामध्ये 'ह' होतो; उदा. सोम– हओम, सुरा– हुरा, सिन्धु– हिन्दु, सव्य–हव्य अि. हीच गोष्ट संस्कृतमधील भविष्याचे सकारादि प्रत्यय हकारादि बनवण्यात आणि दश > दह > दस > दहा अशा शब्दांत आढळते. स्चा विसर्ग होणें व विसर्गाचा उच्चार 'ह' युक्त असणें यावरून तीच गोष्ट स्पष्ट होते. तेव्हां स व ह हे अत्यंत संलग्न ध्वनि आहेत ही गोष्ट लक्षांत घेतल्यावर प्रत्ययप्रक्रियेंतील कोडीं सुगम होतात.

ख, घ, छ, झ, ठ, ढ, थ, ध, फ, भ हीं महाप्राणयुक्त व्यंजनें आहेत. ऋक्प्रातिशाख्यांत ख्, घ्, छ्, झ्, थ्, ध्, फ्, भ् याना 'संयुक्त' व्यंजनें म्हटलें आहे. उच्चारसौकर्याचे दृष्टीने यांचा नुसता महाप्राणयुक्त उच्चार होणें स्वाभाविक आहे. आणि प्राकृतमध्ये यांचा 'ह' होतो असें हेमचंद्राने यथार्थ म्हटलें आहे. (सिद्धहेम ८.१.१८७,) ह्या सूत्रांत अनादि व असंयुक्त ख, घ, थ, ध, भ यांचा ह होतो असें तो म्हणतो. छ, झ, ठ, ढ यांचा उपयोग पुष्कळच कमी आहे आणि प्रत्ययप्रक्रियेमध्ये आपल्याला त्यांचा फारच थोडा संबंध येणार असल्यामुळे हा विषय येथेच पुरा करितों. णाहो, लाहो, दहि यासारखीं 'ह'कार राहणारीं उदाहरणें जुन्या मराठींत पुष्कळ आहेत. तीच गोष्ट 'भिः' या तृतीयेच्या बहुवचनाच्या प्रत्ययाचें 'हि' होतांना आढळते.

अनादि व असंयुक्त क ग च ज त द प य आणि व चा बहुधा लोप होणें, (सिद्धहेम ८.१.१७७) यचा ज होणें आणि अपभ्रंशांत पुष्कळदा क-ख-त थ-प-फ याचे अनुक्रमें ग-घ-द-ध-ब-भ होणें, (सिद्धहेम ८.४.३९६) या प्रवृत्ती १३-१४ व्या शतकांप्रमाणे १० व्या शतकांतहि आढळतात.

ळकार पुष्पदंताच्या भाषेंत क्वचित् येतो. राजवाड्यांना सांपडलेल्या ज्ञानेश्वरींत तो त्यांना आढळला नाही यावरून मराठी भाषेंत त्याला अस्तित्व नव्हतें असें नाहीं. वैदिक-पाली-पैशाची व द्राविड भाषांत तो आहे; मध्ययुगांतील संस्कृत शिलालेखांतून सुद्धा तो डोकावतो. आणि आधुनिक मराठींत सुद्धा त्याला अर्थाचे दृष्टीने महत्त्वाचें स्थान आहे असें चूळ, बाळ, गाळ, वेळ अि. शब्दांवरून दिसतें. या शब्दांत आपण लकार घातला तर अर्थ बदलतो. लपेक्षा ळमध्ये उच्चारसौकर्यहि नाही. तेव्हा तो १० व्या शतकांत अस्तित्वांत होता असें म्हणण्यास मुळीच प्रत्यवाय नाही.

सारांश, ज्ञानेश्वरकालीन सर्व वर्ण पोथींत नसले तरी प्रत्यक्ष १० व्या शतकांतील समाजांत अस्तित्वांत होते.

प्रत्ययप्रक्रियेच्या दृष्टीने महत्त्वाचा मुद्दा म्हणजे अनुस्वारांचा. पुष्पदंताचे भाषेंत व यादवकालीन मराठींत अनुच्चारित अनुस्वार बरेच आहेत. संस्कृतमधील अनुनासिकांतील ङ् व ञ् ज्ञानेश्वरींत नांवापुरतेच आहेत. ण ला ज्ञानेश्वरींत व पुष्पदंताचे ग्रंथात परसवर्ण या दृष्टीने महत्त्व तात्पुरतेंच आहे.

पुष्पदंताचा कोणताहि ग्रंथ घेतला तरी तहिं, पयाअिं, माअें, हउं, हुं अित्यादि शब्दां-बरोबरच चंदु, दंडेण, कंतु, अणंगु असे शब्द आढळतात. या शब्दांपैकी पहिला गट अनुच्चा-रित अनुस्वारांचा असून त्यापासूनच पुढील शिलालेखादि वाङ्मयांतील अनुस्वार व्युत्पादिता येतात. दुसरा गट अुच्चारित अनुस्वारांचा आहे. हे अनुच्चारित अनुस्वार अुं, हुं, हिं. अि. प्रत्ययांत नेहेमी येतात त्याचप्रमाणें संस्कृत शब्दांमध्ये अनादि व असंयुक्त असलेल्या 'म'ने अपभ्रंशांत व मराठींत अनुच्चारित अनुस्वारांची गर्दी करून टाकली आहे. श्यामल>सामल> सँवल>सावळा, कोँमल>कोवँळा, ग्राम>गाम>गाँव या व अशा अनेक अुदाहरणांवरून म चें अनुनासिक पूर्वव्यंजनावर जाअून वकार शिल्लक अुरतो असें दिसतें. गांव, नांव, जांवअी चांफा अित्यादि शब्दांतील अनुस्वार आता लुप्त झाले तरी त्यांच्या मागे अखंडित अशी व्याक-रणाची परंपरा आहे. आणि प्रत्ययप्रक्रियेमधील अनुस्वारांची अडगळ जरी आम्ही आमच्या सोयी-साठीं कमी केली तरी भाषेचा अैतिहासिक अभ्यास करतांना आपण त्यांना विसरून चालणार नाही.

प्रत्ययप्रक्रियेच्या दृष्टीने जरूर तेवढा वर्णविचार आपण केला आहे. यापेक्षा जास्त विवेचन करण्यास स्वतंत्र लेख लिहावे लागतील. प्रत्ययप्रक्रिया (morphology) हें भाषेचें अत्यंत महत्त्वाचें अंग आहे. भाषेची प्रकृति (nature) ह्यावरून ठरते. शब्दसंपत्तीप्रमाणें प्रत्ययांची अुसनवारी सहसा होत नाही त्यामुळे भाषाशास्त्रज्ञ या प्रक्रियेला अतिशय महत्त्व देतात.

प्रत्यय प्रक्रियाः—

भाषेच्या अुत्पत्तीबद्दल[1] जरी अनेक मतें असली तरी भाषेचें मूळ परिमाण वाक्य आहे याबद्दल फारसा मतभेद होणार नाही. आपण स्वतःशीं विचार किंवा दुसऱ्याशीं विचारविनि-मय करूं शकतों पण तो वाक्यांनी, शब्दांनी नव्हे[2]. शब्द हे पृथक्करणांतीं सिद्ध होणाऱ्या कल्पनांना (thought-concepts) दिलेलें नांव आहे[3]. वाक्य हें परिमाण धरल्यानंतर नाम (व सर्वनाम)

१ भाषेच्या उत्पत्तीबद्दल अनेक उपपत्ति बसवल्या आहेत. त्यांपैकी कांही पुढे देतों. उदा.— Bow wow theory, Pooh pooh theory, Dingdong theory, Yo-he-yo theory, Play-way (Superfluous energy) theory इ०. या अनेक उपपत्तींपैकी शेवटची व Jesperson ने वर्णिलेली प्रेममूलक उपपत्ति (Language Ch. XXI) जास्त सयुक्तिक वाटतात.

२,३ यामुळे अर्वाचीन व्याकरणकार आपल्या व्याकरणास वाक्यपृथक्करणापासून सुरवात करतात.

४ भाषेसंबंधी मानसशास्त्र्यांचीं पुढील मतें पाहा.

Language is "essentially an instrument of conceptual analysis and synthesis."—Stout "Groundwork of Psychology" P.149.

Language makes our concepts "become like molten bullion poured into coining moulds, whence.........they issue as legal tender for general circulation."— Spearman "Nature of Intelligence" P.264.

शब्दाविषयी या ग्रंथकाराने मोठें मार्मिक उदाहरण घेतलें आहे.

"The cognitive field may be compared to an ocean studded with-

आणि क्रियापद या शब्दांच्या जातींना विशेष महत्त्व येतें. Vendryes[१]चे मतें वाक्यांतील खरे जिवंत शब्द नाम व क्रियापद होत. नाम व विशेषण हे शब्द अेकमेकांसाठीं वापरले तरी विशेषण हें नामावर अवलंबून असतें. क्रियाविशेषण, शब्दयोगी व अुभयान्वयी अव्ययें वाक्य-रचनेंत किंवा शब्द जोडण्यास अुपयोगी पडणारीं साधनें आहेत. अुद्गारवाचक अव्ययें हीं भाव-नांचा अुद्रेक दर्शवणारीं अपूर्ण वाक्यें मानलीं जातात. सारांश, नाम, (सर्वनामांचा अंतर्भाव यांतच केला पाहिजे,) विशेषण, क्रियापद, क्रियाविशेषण, शब्दयोगी व अुभयान्वयी अव्ययें हे सहा शब्दप्रकार शास्त्रीय कसोटीस अुतरतात. यांपैकी पहिले तीन व्ययी व दुसरे तीन अव्ययी (विभक्तिप्रत्यय न घेणारे) आहेत.

**नाम व सर्वनाम—**

भाषेंत प्रथमतः सर्वनामें व क्रियावाचक शब्द निर्माण होअून सर्वनामापासून प्रत्यय व क्रियावाचक शब्दापासून अितर शब्द (प्रकृति) निर्माण होअून या प्रकृतिप्रत्ययांपासून भाषेचा प्रपंच निर्माण होतो. त्यामुळे प्रत्ययप्रक्रियेंत पहिलें स्थान सर्वनामांना दिलें पाहिजे. 'सर्वनाम' हें नांव पडण्याचें कारण या शब्दांच्या यादीचे सुरवातीस 'सर्व' शब्द आहे हें होय. (सर्वादीनि शब्दस्वरूपाणि सर्वनामसंज्ञानि स्युः । सि. कौ. अष्टाध्यायी १.१.२७) सर्वनामांचे मुख्य प्रकार चार. १ पुरुषवाचक, २ दर्शक, ३ संबंधी, ४ प्रश्नार्थक. पुष्पदंताचे काळांत अेक-वचन व अनेकवचन हीं दोनच वचनें प्रमुख होतीं. लिंगाबद्दल निश्चित नियम नव्हते. या दोन्ही गोष्टी अर्वाचीन मराठीमध्ये आपल्यास आढळतात.

पुरुषवाचक सर्वनामें— प्रथमपुरुष (अेकवचन)

| | संस्कृत | महाराष्ट्री | पुष्पदन्त | ज्ञानेश्वर | आज |
|---|---|---|---|---|---|
| प्र. | अहम् | अहम्मि<br>अम्मि<br>म्मि | हं, ह, *म्मि (य. च. २.७.८<br>(अहयम्) ३.२.६<br>हुं (ज. च. २.२८.४)<br>हउँ (य. च. १.६.९) | मी, मीँ | मी, हाँव (कोंकणी) |
| द्वि. | माम् | अम्मि } ><br>म्मि } | मइँ (य. च. २.३५.४) > | मीँ, मी | |
| तृ. | मया | मए ><br>मइ > | मए (य. च. २.१.१५)<br>मे (य. च. ३.२.४)<br>मइ<br>मइँ (य. च. २.४.१०) | मिया<br>मियाँ<br>म्या | मीं |
| च. | मह्यम्-मे > | | मज्झं (म. पु. १.१०.१२) ><br>मज्झु (ना.च.) | मज, मजसि<br>मा(म)सि or षि | |
| पं. | मत् | मज्झत्तो<br>ममाहिंतो | ... ... ... | मजहुनि | |
| ष. | मम-मे | मज्झ > | मज्झ (ना. च.) > | मज | |

icebergs......Only dotted here and there has the thought frozen into verbo-conceptual rigidity."— "The Nature of Intelligence and the Principle of Cognition." P.265.

१. Language, ch.III.

* अशी खूण असलेलीं रूपें त्या काळीं असावीं असा माझा तर्क आहे.

मज्झं (म. पु. १.१०.१२) माझा
मज्झु (य. च. २.५.३)
महु (य. च. १.६.९) ... > माझा
महुँ (य. च. १.१८.१७) (पू. खा.)
महँ (म. पु. १.१०.३)
स. मयि मइ > *मइँ > मीं
मि

असमद्‌चें अेकवचनी बीजरूप म आहे, ही गोष्ट लक्षांत घेता याचे अेकवचनी प्रत्यय पुढे दिल्याप्रमाणें होतात—

| | संस्कृत | महाराष्ट्री | पुष्पदंत | ज्ञानेश्वर | आज |
|---|---|---|---|---|---|
| प्र. | | | | | |
| द्वि. | अम् | | > इँ | > इँ | |
| तृ. | या | > ए, इ | > ए, इ, इँ | > इँ, इया<br>इयाँ, या | > इँ |
| च. | ह्यम् | > *ज्झम् | > ज्झँ (*ज्झ) | > ज<br>झिया | > झें |
| पं. | | | | | |
| ष. | | ज्झ | > ज्झ<br>ज्झँ<br>ज्झु | > ज<br>झ | |
| | | | हँ<br>ह<br>हु | | > ह्य (पू. खा.)<br>ह (नागपूर)<br>मराठी |
| स. | यि | > इ | > इँ | > इँ | > इँ |

पुष्पदंताने संस्कृतवरून प्रथमेचें रूप बनवलें असें म्हणण्यांत अर्थ नाही. त्याचे काळीं जैन लेखक संस्कृतमध्ये लिहीत. स्वतः पुष्पदंत ब्राह्मण असल्यामुळे त्याच्या भाषेवर (मोरोपंताप्रमाणे) संस्कृतचा पगडा जास्त आढळतो हें म्हणणें मान्य करून सुद्धा तो 'अहं'पासून बनविलेलीं रूपें मुद्दाम वापरतो असें म्हणता येत नाही. त्याचे काळीं तीं रूपें वापरलीं जात असावींत. मराठींत 'मी' शब्द (वै. सं.) 'अस्मे'>(महा) 'अम्हे'>(पुष्प) अम्हइं>आमि >मी किंवा (सं) मया>(महा) मए, मइ (पुष्प) मइँ>मीं किंवा मह्. म्मिपासून आले असावे. अपभ्रंशमधील अधिक वाङ्मय प्रसिद्ध झाल्यास याबद्दल निश्चित मत देतां येईल. पण सं. अहम्‌चा महा. 'म्मि'शीं बादरायणसंबंध जोडण्यापेक्षा 'म' ह्या सार्वनामिक बीजापासून या शब्दांचीं एकवचनी रूपें व्युत्पादावीं हें बरें. कारण साधर्म्य (analogy) ही भाषेचें स्वरूप बदलणारी फार मोठी शक्ति आहे.

झचें ह होणें, प्रत्यय सानुनासिक किंवा निरनुनासिक होणें, स्वार्थे क किंवा 'य' (या) प्रत्यय लागणें, प्रत्ययाला अपभ्रंशाची खूण 'उ' लागणें, य-ए-इ यांची अदलाबदल होणें है ध्वनि उच्चारण्याच्या विशिष्ट लकबींचे परिणाम आहेत व वर्णप्रक्रियेचे सामान्य नियम लक्षांत घेतां पुष्पदंताची भाषा ज्ञानेश्वरीचें पूर्वरूप आहे हें प्रत्यय प्रक्रियेवरून लक्षांत येईल.

# लोकहितवादी

(लेखक— श्री. गंगाधर बाळकृष्ण सरदार)

अव्वल अिंग्रजींतील बऱ्याच सुशिक्षितांचीं मनें पाश्चात्य संस्कृतीच्या मोहिनीनें भारलेलीं होतीं. त्यामुळे स्वकीयांच्या सर्वच गोष्टी त्यांना निंद्य व अुपहासात्मक वाटत. अुलट अिंग्रजांच्या प्रत्येक गोष्टीची ते मुक्तकंठाने प्रशंसा करीत; व बारीकसारीक बाबतींतहि त्यांचें बेगडी अनुकरण करण्यांत धन्यता मानीत. अशा परधार्जिण्या व अर्धशिक्षित जुन्या पिढीचे प्रतिनिधि म्हणून गोपाळराव हरि देशमुख अुर्फ लोकहितवादी यांच्याकडे बेधडक बोट दाखविण्याचा परिपाठ 'माला'कारांच्या कृपेने महाराष्ट्रांत दृढमूल झाला आहे. लोकहितवादींविषयी बोलतांना 'त्यांना स्वाभिमानाची मुळींच चाड नव्हती; त्यांनी आपला देश, धर्म, विद्या, संस्कृति, आचार, विचार अित्यादिकांची यथेच्छ विटंबना करून लोकांचा आत्मविश्वास समूळ नाहीसा केला, अेतद्देशियांना सरांस अडाणी, आळशी, निर्लज्ज, मूर्ख, भ्याड, निर्बल, टोणपे अित्यादि अपशब्दांची लाखोली वाहून त्यांचा तेजोभंग केला' असे आक्षेप वारंवार घेण्यांत येतात. अशा तऱ्हेची अतिशयोक्त, निराधार व भ्रामक विधानें अेकलीं म्हणजे 'पूर्ण ग्रंथ पाहिल्याबीण । अुगाच ठेवी जो दूषण । तो.........' या समर्थवचनाची आठवण झाल्याशिवाय राहत नाही. लोकहितवादींनी निरनिराळ्या विषयांवर लहानमोठे सुमारें छत्तीस ग्रंथ लिहिले आहेत. त्यांच्या वेळची परिस्थिति नीट लक्षांत घेअून त्यांच्या समग्र वाङ्मयाचें निःपक्षपातीपणाने परिशीलन केल्यास वरील आक्षेपांत कसें बिलकुल तथ्य नाही तें सहज समजतें; आणि मायभाषेच्या व देशाच्या सर्वांगीण सुधारणेसाठी आमरण झटणाऱ्या ह्या थोर पुरुषाची वास्तविक योग्यता आपल्या ध्यानांत येते.

आजपर्यंत मराठी भाषेंत लोकहितवादींचीं दोन विस्तृत चरित्रें प्रसिद्ध झालीं आहेत. त्याप्रमाणेच निरनिरनिराळ्या नियतकालिकांतून वेळोवेळीं त्यांच्यासंबंधी कांही चरित्रपर व चर्चात्मक लेख येअून गेले आहेत. तरी देखील त्यांचें कार्य अितकें व्यापक, भरीव, बहुविध व चिरस्मरणीय आहे, की वेगवेगळ्या दृष्टींनी त्याचा परामर्श घेणारे अनेक टीकाग्रंथ व लेख प्रसिद्ध झाल्याशिवाय महाराष्ट्रांतील जनतेला त्याची यथातथ्य कल्पना येणें शक्य नाही. म्हणून प्रस्तुत लेखांत लोकहितवादींच्या सामाजिक, राजकीय व वाङ्मयीन कार्याचें सत्यस्वरूप थोडक्यांत पण साकल्याने दिग्दर्शित करण्याचा मनोदय आहे.

लोकहितवादी अुर्फ गोपाळ हरि देशमुख यांचा जन्म पुणें येथे ता. १८ फेब्रुवारी सन १८२३ ह्या दिवशीं झाला. त्यांच्या अुदार चरिताला व विशुद्ध चारित्र्याला साजेल असेंच त्यांचें घराणें संपन्न व सत्त्वशील होतें. त्यांचें मुळचें अुपनांव 'सिद्धये'. देशमुख नांव वतनावरून पडलें. त्यांचे वडील हरिपंत हे पेशव्यांचें सर सेनापति बापू गोखले यांचे फडणीस होते. पेशवाअी गेल्यानंतर ते ठराविक मुदतींत अेल्फिन्स्टन साहेबास भेटले नाहीत म्हणून त्यांची जहागीर जप्त झाली होती. पण खुद्द बाजीरावाच्या रदबदलीने ती लवकरच परत मिळाली. गोपाळराव तेरा वर्षांचे असतांनाच त्यांचे वडील दिवंगत झाले. त्यामुळें त्यांच्या कुटुंबावर फारच मोठी

आपत्ति कोसळली. सरकारने त्यांचा सरंजाम तहह्यात होता, वंशपरंपरेने चालावयाचा नव्हता, असें ठरवून लगोलग खालसा केला. तो परत मिळावा म्हणून गोपाळरावांचे वडील बंधु चिंतामणराव यांनी पुष्कळ खटपट केली, पण तिचा अुपयोग झाला नाही. फक्त त्यांच्या मातोश्रीला गुजाऱ्यापुरतें सालीना ६०० रुपये पेन्शन मिळूं लागलें, व ह्या तिघां भावांना सरकारी नोकरी नसल्यास वार्षिक २०० रुपये देण्याचा ठराव झाला. जहागीर जप्त झाल्यामुळे कुटुंबपोषणाचा सर्व भार त्यांचे थोरले बंधु चिंतामणराव व ते स्वतः यांच्यावरच येअून पडला.

गोपाळरावांची शरीरप्रकृति मूळचीच चांगली सुदृढ होती. लहानपणापासून त्यांना पोहण्याचा, घोड्यावर बसण्याचा व नेम मारण्याचा सराव होता. विद्याभ्यासांतहि ते तितकेच दक्ष असत. त्यांचें अक्षर फार उत्तम होते. ज्ञानेश्वरी, एकनाथी-भागवत, दासबोध अित्यादि ग्रंथ ते फार आवडीने वाचीत. अि. स. १८४१ मध्ये ते अिंग्रजी शाळेंत दाखल झाले; व तीन वर्षांत त्यांनी तेथील अभ्यासक्रम पुरा केला. त्यांची कुशाग्र बुद्धि व परिश्रमशीलता यांची त्या वेळींहि त्यांच्या मुख्य अध्यापकांवर छाप बसल्याशिवाय राहिली नाही. अितिहास हा त्यांचा आवडीचा विषय होता. अिंग्रजी शाळेचे मुख्य अध्यापक अिजदेलसाहेब यांनी त्यांना दिलेल्या शिफारसपत्रांत त्यांच्या अिंग्रजी भाषेतील नैपुण्याबद्दल व अुत्कृष्ट भाषान्तर करण्याच्या कौशल्याबद्दल तारीफ केली आहे. हुबेहूब भाषान्तर करण्याचें हें कसब पुढे अैतिहासिक ग्रंथांचीं भाषांतरें करतांना त्यांना अुपयोगी पडले. अि. स. १८४२ मध्येच त्यांनी रे. ग्लीगच्या हिंदुस्थानच्या अितिहासाचें भाषान्तर करण्यास सुरुवात केली होती. संस्कृत व प्राकृत साहित्याकडेहि त्यांनी दुर्लक्ष केलें नाही. अि. स. १८४३ पासून संस्कृत ग्रंथांतील 'सुभाषितें' टिपून ठेवण्याचा त्यांचा क्रम होता. त्यांचेंच भाषान्तर करून अि. स. १८७८ त त्यांनी 'सुभाषित अथवा सुबोधवचनें' हा ग्रंथ छापला. ज्ञानार्जनाच्या कोणत्याहि साधनाची त्यांनी अुपेक्षा केली नव्हती. संस्कृत, फारशी, गुजराती, हिंदुस्थानी अित्यादि अनेक भाषा त्यांना अवगत होत्या. अशा आत्यंतिक विद्याभिरुचीमुळेच त्यांना मराठी भाषेंत अितकी विपुल ग्रंथरचना करतां आली.

अिंग्रजी शाळेंतील अभ्यासक्रम पुरा झाल्यानंतर गोपाळराव सरकारी नोकरींत शिरले. त्यांना आरंभीं अि. १८४४ त जॉन वार्डन याच्या शिफारशीवरून दरमहा ७७ रुपये पगारावर दक्षिणेंतील सरदारांच्या अेजंटच्या कचेरीमध्ये ट्रान्स्लेटरची जागा मिळाली. तेथेच ते अवघ्या दोन वर्षांत शिरस्तेदार झाले, व पुढे अुत्तरोत्तर त्यांची सारखी बढती होत चालली. अि. स. १८४६ त त्यांनी मुनसफची परीक्षा दिली. त्यानंतर अि. स. १८५२ मध्ये वाअी येथे 'फर्स्ट क्लास मुनसफ' म्हणून त्यांची नेमणूक झाली. गोपाळरावांच्या कामकाजांत हयगय किंवा दिरंगाअी कधीच होत नसे. त्यामुळे त्यांच्या बाबतींत वरिष्ठ अंमलदार नेहमी संतुष्ट असत. जो मनुष्य स्वतंत्र हिंदुस्थानांत अेखाद्या प्रांताचा गव्हर्नर झाला असता, त्याला कारकुनी पेशाचीं क्षुद्र कामें समाधानकारक रीतीने पार पाडणें हा केवळ हातचा मळ वाटला तर काय नवल! अि. स. १८५६ त गोपाळरावांना सब्‌असिस्टंट अिनामकमिशनर म्हणून नेमण्यांत आलें. ह्याच कामामुळे लोकांत त्यांच्याविषयी थोडाबहुत गैरसमज पसरलेला होता. त्यांनीं आपलें काम कायदेशीरपणें बजावलें. त्यामुळे कांही लोकांचीं अिनामें खालसा झालीं असलीं तर त्याची जबाबदारी सरकारी धोरणावर आहे. त्याबद्दल लोकहितवादींना व्यक्तिशः जबाबदार धरतां येत नाही. परंतु लोकापवाद हा नेहमी साधार व न्याय्य असतोच असें नाही. अुलट लोकनिंदेच्या वावटळींत 'रजाचा गज' झाल्याचीं अुदाहरणेंच पुष्कळ दृष्टीस पडतात.

अि. स. १८६१ त अिनामकमिशन खातें रद्द झालें. त्यानंतर हिंदु व मुसलमान धर्मशास्त्राच्या व्यवहारभागाचा गोषवारा काढण्याच्या कामीं त्यांची नेमणूक झाली. हें काम संपल्यावर पुढे ते अहमदाबादेस असिस्टंट जज म्हणून नेमले गेले. नंतर त्यांची नगरला बदली झाली. अि. स. १८६३ त सनदी नोकरांना आवश्यक असणारी डिपार्टमेंटल् परीक्षा ते पास झाले. तरी देखील युरोपियन सनदी नोकरांच्या तक्रारीमुळे सनदी नोकरांत झालेली त्यांची नेमणूक कायम होअूं शकली नाही. अि.स.१८६६ त त्यांस अहमदाबादेस ॲक्टिंग स्मॉलकॉज जज्ज नेमलें. येथे ते सतत दहा वर्षे होतें. त्यानंतर हिंदी नोकरांस सिव्हिल सर्व्हिसमधील जागा देण्याचें सरकारने पुन्हा ठरविलें; व त्याप्रमाणें गोपाळरावांना नाशिक येथे जाअींट सेशन्स जज्ज नेमण्यांत आलें. अि. स. १८७९ मध्ये त्यांनी पेन्शन घेतलें. पेन्शन घेतल्यानंतर अेक वर्षाने मुंबअी सरकारने त्यांना विधिमंडळाचे सभासद नेमलें होतें. अि. स. १८८१ मध्ये ते फर्स्ट क्लास सरदार झाले. पुढे तीन वर्षांनंतर त्यांनी रतलाम संस्थानांत दिवाण म्हणूनहि वर्षभर काम केलें. त्यानंतर शेवटपर्यंत पुण्यासच त्यांचें वास्तव्य होतें. अि. स. १८९२ मध्ये ते निवर्तले.

लोकहितवादी जसे निरलस कार्यकर्ते होते, तसे श्रेष्ठ साहित्यिकहि होते. त्यांचा लेखनविस्तार फार मोठा आहे. त्यांनीं इ. स. १८४७ मध्यें, म्हणजे वयाच्या अवघ्या चोविसाव्या वर्षी, लेखणी हातीं घेतली. तेव्हापासून त्यांचें लेखनकार्य अविछिन्न सुरू होतें. इ. स. १८७९ त ते सेवानिवृत्त झाले; तरी त्यांच्या वाङ्मयोपासनेंत खंड पडला नाहीं; उलट त्यानंतरच त्यांचे बरेचसे ग्रंथ प्रसिद्ध झाले. त्यांनी इंग्रजी भाषेचा परिश्रमपूर्वक अभ्यास केला होता. परंतु अखिल भारतीय कीर्तीच्या मोहानें त्यांनी आपल्या मायभाषेला लाथाडलें नाही. चार-दोन इंग्रजी ग्रंथ लिहून साहेबाची शाबासकी मिळविण्यापेक्षा आपल्या लक्षावधि अज्ञ बांधवांना ज्ञानदान करणेंच त्यांना श्रेयस्कर वाटलें, म्हणून राजकारण, अर्थशास्त्र, इतिहास, धर्म इत्यादि विषयांवर त्यांनी सुमारें छत्तीस ग्रंथ लिहिले; आणि मराठी गद्यवाङ्मयांत अमोलिक भर घातली. त्यांचे अैतिहासिक ग्रंथ बहुतेक भाषांतरात्मक आहेत. परंतु नियतकालिकांतील त्यांचे आरंभींचे स्फुट लेख आणि इतर सदाचारप्रवर्तक छोटेखानी निबंध सगळे स्वतंत्रच आहेत. ज्या वेळीं मराठी भाषा कोती व असंस्कृत आहे, तिच्यामध्यें भारदस्त विषय मार्मिकपणें मांडतां येत नाहीत अशी सार्वत्रिक समजूत होती, आणि बाळशास्त्री जांभेकर, महादेवशास्त्री कोल्हटकर, कृष्णशास्त्री चिपळूणकर यांच्यासारखे बडे बडे पंडितहि निव्वळ भाषान्तरावरच भिस्त ठेवीत होते; त्या वेळीं लोकहितवादींनी समाजाच्या अत्यंत जिव्हाळ्याच्या सामाजिक, धार्मिक व राजकीय प्रश्नांची मराठी भाषेंत सुबोध व परिणामकारक रीतीनें चर्चा करण्याचा उपक्रम केला. समाजातील नानातऱ्हेचे गुंतागुंतीचे प्रश्न त्यांच्यासमोर होते. त्यांचा त्यांनी निर्भिडपणें परामर्श घेतला. त्यांना आपले जळजळीत व तेजस्वी विचार व्यक्त करण्याला मराठी भाषा अपुरी पडली नाही. त्यांची भाषा नेहमीच्या परिचयाची, अगदी साधी व सोपी, पण अंतरींच्या जिव्हाळ्यामुळे वाचकांच्या अंतःकरणाला जाऊन भिडणारी आहे. "ज्ञान हें सर्व सन्मानाचें, पराक्रमाचें, बलाचें व अैश्वर्याचें मूळ आहे." अशी त्यांची दृढ श्रद्धा होती; म्हणून ज्या योगाने आमच्या लोकांची बौद्धिक उंची वाढण्यास थोडी तरी मदत होईल अशा अनेक विषयांवर त्यांनी परिश्रमपूर्वक ग्रंथरचना केली आहे.

लोकहितवादीकृत समग्र ग्रंथांची विषयवार नामावलि कालानुक्रमानें खालीलप्रमाणें आहे.

## राजकारण व अर्थशास्त्र

१ लक्ष्मीज्ञान– क्लिफ्टच्या 'Treatise on Political Economy' या ग्रंथाचें रूपांतर. पुणें १८४९

२ हिंदुस्थानास दरिद्र येण्याचीं कारणें आणि त्याचा परिहार व व्यापाराविषयीं विचार– आधाररचित– दादाभाअी नवरोजी यांच्या "Poverty in India" या निबंधाच्या आधारें. मुंबअी १८७६

३ स्थानिक स्वराज्यव्यवस्था– स्वतंत्र निबंध. पुणें १८८३

४ ग्रामरचना, त्यांतील व्यवस्था आणि त्यांची हल्लींची स्थिति– स्वतंत्र निबंध. पुणें १८८३

५ स्वदेशीय राज्यें व संस्थानें— ?

## अितिहास

१ भरतखंडपर्व– हिंदुस्थानचा संक्षिप्त अितिहास. पुणें १८५१

२ पाणिपतची लढाअी– काशीराज पंडिताच्या फारशी ग्रंथाच्या अिंग्रजी भाषांतराचा तर्जुमा. ठाणें १८७७

३ अैतिहासिक गोष्टी भाग १ ला– स्वतंत्र संग्रह. ठाणें १८७७

४ ,, भाग २ रा नाशिक. १८७८

५ हिंदुस्थानचा अितिहास– पूर्वार्ध– रेव्ह ग्लीगच्या 'The History of the British Empire in India' चें भाषांतर. ठाणें १८७८

६ अैतिहासिक गोष्टी– भाग ३ रा. नाशिक १८८०

७ गुजराथ देशाचा अितिहास— अनेक गुजराती अितिहासांचे आधारें; पुणें १८८५

८ लंकेचा अितिहास. पुणें १८८८

९ सुराष्ट्र देशाचा ससाक्ष अितिहास— गुजरातीवरून मराठींत भाषांतर. पुणें १८९१

१० अुदेपूरचा अितिहास— कर्नल टॉडच्या 'राजस्थानच्या अितिहासा'चें भाषांतर पुणें १८९२

## चरित्र

१ पृथ्वीराज चव्हाण याचा अितिहास— चारणकविकुलश्रेष्ठ चंदबरदाअी याच्या 'पृथ्वीराजरासा' या प्रसिद्ध काव्यग्रंथाधारें. पुणें १८८३

२ स्वामी श्रीमद्दयानंद— स्वतंत्र. पुणें ?

## धर्म व नीति

१ खोटी साक्ष व खोटी शपथ यांचा निषेध— पुणें १८५१

२ गीतातत्त्व— वामनाच्या समश्लोकींतील सारभूत श्लोक (मूळ वचनांसह). नाशिक १८७८

३ सुभाषित अथवा सुबोध वचनें– संस्कृत ग्रंथांतील सुभाषितांचें भाषांतर, १८७८

४ स्वाध्याय—स्वतंत्र— प्राचीन आर्यविद्यांचा क्रम, विचार आणि परीक्षण. नाशिक १८८०

५ आश्वलायन गृह्यसूत्र— भाषांतर— मुंबअी १८८०
६ आगमप्रकाश— लोकहितवादीकृत मूळ ग्रंथ गुजराती— त्याचें मराठी भाषांतर, भाषांतरकार के. रघुनाथजी. मुंबअी १८८४

## समाजकारण

१ जातिभेद— स्वतंत्र निबंध. ठाणें १८७७
२ भिक्षुक— मुंबअी आर्यसमाजांत दिलेलें व्याख्यान. ठाणें १८७७
३ प्राचीन आर्यविद्या व रीति— स्वतंत्र. अलिबाग १८७७

## संकीर्ण

१ होळीविषयीं उपदेश— स्वतंत्र— मुंबअी १८४७ (!)
२ महाराष्ट्र देशांतील कामगार लोकांशीं संभाषण— स्वतंत्र. पुणें १८४८
३ सरकारचे चाकर आणि सुखवस्तू हिंदुस्थानांतील साहेब लोकांशीं संभाषण— स्वतंत्र. पुणें १८५०
४ यंत्रज्ञान— भाषांतर– Introduction to Physical Sciences. पुणें १८५०
५ पंचनामा— फारशी नीतिग्रंथाचें भाषांतर. पुणें १८०५
६ पुष्पवन— सादीच्या गुलिस्तांतील आठव्या अध्यायाचें भाषांतर. पुणें १८५१
७ शब्दालंकार— अिंग्रजीवरून भाषांतर. पुणें १८५१
८ निबंधसंग्रह— स्वतंत्र. शतपत्रें व अितर विविधलेख. अहमदनगर, पुणें १८६६
९ कलियुग— मुंबअी आर्यसमाजांतील व्याख्यान. मुंबअी १८७७
१० बोधपत्र— स्वतंत्र. ठाणें १८७८

## लोकहितवादींनी काढलेलीं नियतकालिकें

१ लोकहितवादी— मासिक, पुणें आक्टोबर १८८२
२ लोकहितवादी— त्रैमासिक, पुणें अेप्रिल १८८३

लोकहितवादींनी क्लिफ्टच्या अर्थशास्त्रावरील प्रवेशपुस्तकाच्या आधाराने अि. स. १८४९ त 'लक्ष्मीज्ञान' या नांवाचें पुस्तक प्रसिद्ध केलें. यांत ज्ञान, अुद्योगाचे विभाग, क्रयविक्रय, भांडवल, निर्भयपणा, किंमत, आणि धारा, नफा व मजूरी, अशीं अेकंदर सात प्रकरणें आहेत. हें क्लिफ्टच्या ग्रंथाचें शब्दशः भाषांतर नाही. मूळांतील आशय लक्षांत घेअून अिकडील परिस्थितीच्या अनुरोधाने हें रूपांतर केलें आहे. अर्थशास्त्रावरील हा पहिलाच मराठी ग्रंथ होय.

अि. स. १८७६ त त्यांनी 'हिंदुस्थानास दरिद्र येण्याचीं कारणें' हें पुस्तक प्रसिद्ध केलें. त्यांत अिंदुप्रकाशामध्यें प्रसिद्ध झालेल्या आठ पत्रांचा समावेश केला आहे. ह्याची प्रस्तावना सडेतोड व विचारप्रवर्तक आहे. शेती, व्यापार व रोजगार या तिन्ही व्यवसायांच्या हलाखीचें स्पष्ट चित्र त्यांनी प्रस्तावनेंत रेखाटलें आहे. हीं पत्रें त्यांनी दादाभाअी नवरोजींच्या 'Poverty in India' या निबंधाच्या आधाराने लिहिलीं होतीं. त्यांत त्यांनी रवानगी व अमदानी यांचे प्रत्यक्ष आंकडे देअून हिंदुस्थानच्या आर्थिक परिस्थितीची छाननी केली आहे. लोकहितवादी हे अिंग्रजी राज्याचे पक्षपाती होते, असें म्हणणारांनी प्रस्तुत पुस्तक काळजीपूर्वक वाचल्यास त्यांचा भ्रम आपोआप दूर होअील. 'अदलातीचे कर लुटारूसारखे आहेत', 'या देशांतील लक्ष्मी वाढण्याचा यत्न सरकार कांही करीत नाही.' 'भाड्याचा अुंट, त्याजवर लादतां लादतां

नाळी पडल्या तरी कोणी मनास आणीत नाही. अेकतर्फी काम चालतें', 'दिवाळखोर सरदारांचा धूर्त कारभारी जसा संसार पाहतो तसें अिंग्रज सरकार या देशाचें राज्य चालवीत आहे' अशा तऱ्हेचे अुघड आक्षेप ह्या पुस्तकांत जागोजाग आढळतात. शिवाय अिंग्रज सरकारच्या बेजबाबदार धोरणावर सणसणीत टीका करून त्यांनी तें परिणामीं हिंदुस्थान व अिंग्लंड ह्या दोघांनाहि अपायकारक झाल्याशिवाय राहणार नाही असा गंभीर अिषारा दिला आहे.

"परंतु जरी अिंग्रज सरकारानें आपल्या देशाचे हिताकरितां हा देश सर केला तरी हें धोरण चांगलें नाहीं असें आम्हांस दिसतें. अमेरिका व्यापारांत फार वाढत आहे व राजकारणांत रशिया वाढत आहे. हे दोन्ही देश फार जबरदस्त आहेत. याजकरितां हिंदुस्थान देश आपला आहे व विलायतचें व हिंदुस्थान देशाचें हित हें अेकच आहे असें समजून वहिवाट केल्यास विलायतच्या मदतीस हा देश फार अुपयोगीं पडेल व येथें जें द्रव्य वाढेल ते विलायतचे अुपयोगीं आहे. आणि या देशांत संपत्ति उत्पन्न होण्याचीं साधनें फार मोठीं आहेत त्या सर्वांचा अुपयोग केल्यास येथील प्रजा फार सुखी होओील व त्या मानानें विलायत जबरदस्त होअून राहील; परंतु सवतीच्या मुलांसारखी जी हल्लीं स्थिति आहे ही हितकारक नाहीं. विलायत सरकारचें राज्य या देशांत बहुतकाल राहावें अशी आम्हांस अिच्छा आहे व जरूरहि दिसतें. यास्तव छिनाल बायकोचा नवरा जसा तिचा अविश्वास धरतो आणि घरांतल्या किल्ल्या कमरेस बांधून फिरतो तशी वहिवाट अिंग्रज सरकारनें न केली तर फार चांगलें. गैरवाजवी खर्च या देशावर घालूं नये. येथील लोकांची ममता संपादन करावी. पूर्वी कंपनी सरकारास मोठीं मोठीं राज्यें ज्यांनीं मिळवून दिलीं तें कांहीं विलायचे लोक नव्हते. तर टिपू सुलतानापासून रणजितसिंगापर्यंत येथील जे मुलूख घेतले ते अेथल्याच लोकांनीं घेतले. त्यांचा आज भरंवसा तुटला म्हणून अैशीं हजार सोजर बाळगावे लागतात; हें चिन्ह चांगलें नाहीं, असें अिंग्रज सरकारचे मोठेमोठे नामांकित दोस्तहि म्हणतात. याजकरितां येथील लोक थोड्या खर्चांत मिळतात. त्यांसच राखावें. कौंसलापर्यंत नेटिव लोक राज्यकारभारात घेअून त्यांचे सल्लामसलतीनें कारभार करावा, म्हणजे सर्वत्र आबादानी होअून अुभयदेशांचें अैक्य होओील, आणि त्यापासून बहुत लाभ होतील. येथील अुदीम वाढवावे व येथें खाणी काढाव्या तें अेकीकडे राहून जकातीचा कायदा ठरविण्याचे वेळीं होपसाहेबांनी जें भाषण केलें त्याजवरून येथील अुद्योग कमी व्हावा व सुताचे कारखान्यांवर कर घालून त्यास जेर करावें. अुंच प्रतीचा कापूस येथें येअूं देअूं नये. बारीक कपडे येथें करतलि त्यास अडचणी घालाव्या. हें धोरण सर्वथैव अयोग्य व परिणामीं विषासारखें आहे. लोभामुळें अशी बुद्धि धरण्यांत कांहीं फायदा नाहीं असें अिंग्रजसरकारचा अुपयोग समजून त्याजवर जी आमची निष्ठा आहे तिच्या प्रेरणेनें आम्ही स्पष्ट बोलून दाखवितों. हें ज्यास रुचेल त्यास रुचो, न रुचेल त्यास न रुचो." (हि. द. ये. का. पृ. २४-२६)

लॉर्ड रिपन यांनी हिंदुस्थानांत स्थानिक स्वराज्याची स्थापना केल्यानंतर लोकांमध्यें त्याविषयी बरेंच कुतूहल अुत्पन्न झालें होतें. वर्तमानपत्रांतून या विषयाची चर्चा सुरू झाली होती. पुण्याच्या सार्वजनिक सभेने तर महाराष्ट्रांत आपले प्रचारक पाठवून लोकांना 'स्थानिक स्वराज्यव्यवस्थे'ची माहिती करून देण्याचा अुपक्रम केला होता. याच सुमारास लोकहितवादींनीहि स्थानिक स्वराज्यव्यवस्थेवर छत्तीस पृष्ठांचा अेक छोटासाच पण विचारपरिप्लुत निबंध प्रसिद्ध केला. ह्या निबंधांत त्यांनी शासनसंस्थेची सोपपत्तिक मीमांसा करून प्रजेच्या मूलभूत हक्कांचें अुत्कृष्ट विवेचन केलें आहे. नेहमींप्रमाणेच लोकहितवादींचा ह्या ग्रंथांतील दृष्टिकोनहि त्यांच्या देशाभिमानाची साक्ष दिल्याखेरीज राहत नाही.

"जेथें दुर्दैवानें आणि अज्ञानानें लोकास परावलंबनाची दुःस्थिति प्राप्त झाली आहे तेथें जितका अधिकार स्वदेशीय लोकांचे हातांत परत येअील तितका अिष्टच आहे. मग तो लोकांच्या मागण्यानें येवो किंवा राज्यकर्त्या सरकारचे प्रसन्नतेमुळें आणि औदार्यानें येवो; कसाही आला तरी पाहिजेच आहे. आपणास लायखी व राज्यकर्तृत्वशिक्षण हीं यथास्थित प्राप्त होअून आपलें 'स्वराज्य' आपल्या हातीं अंशतः तरी यावें आणि ठिकठिकाणीं व मोठमोठ्या हुद्यांवर स्वदेशीय कामगार नेमले जाअून त्यांस मोठमोठे पगार मिळावे, असें प्रत्येक स्वदेशाभिमानी सुज्ञ पुरुषास वाटतें व त्याप्रमाणें सरकारचेंहि वर्तन नाहीं असें नाहीं. आपण अमीनीपर्यंत होतों ते हायकोर्टाचे जजाच्या पदापर्यंत गेलों; मामलेदार होतों ते कलेक्टर झालों; अर्जदार होतों ते कौन्सिलदार झालों; कोतवाल होतों ते पोलिस इन्स्पेक्टर बनलों; शिरस्तेदार होतों ते जूरर लोकांत आलों; इस्पितळांत असिस्टंट, अप्रेंटिस व कंपाअुंडर होतों ते डाक्टराच्या व सिव्हिल सर्जनच्या पदवीस पोंचलों; आणि मेस्त्री होतों ते अिंजिनिअर होत चाललों. याचप्रमाणें आपल्याला पुढें पाअूल टाकीत टाकीत गव्हर्नर व व्हाअिसराय यांच्या पगारी कौन्सिलदारांच्या पदवीला जाअून पोहोंचावयाचें आहे. या देशांत पार्लमेंटसुद्धां झालें पाहिजे अशी अुमेद आहे. व या सर्व कृत्यांत अेतद्देशीय लोकांचें पाअूल जितकें पुढें पडेल तितकें विशेष अभिनंदनीय व हितकारक आहे. अिकडील द्रव्य पगारांनीं म्हणा किंवा सामानखरेदीच्या द्वारें म्हणा, तें परदेशांत जाणें अिष्ट नाहीं. म्हणून जितकें ओढवेल व धरवेल तितकें धन ओढलें पाहिजे आणि त्याचीं द्वारें आपले हातीं राखिलीं पाहिजेत. यांत कांहीं अन्याय नाहीं व कोणाचा अपहार करावयाचा नाहीं. आतां ही शर्यत आहे. धांवण्याच्या आखाड्यावर सर्व धांवतात पण पुढें जातील त्यांस पैजेचें अिनाम मिळतें. त्याप्रमाणें विद्या, अक्कल आणि अुद्योग यांचें बल पैदा करून ही स्वराज्यव्यवस्थेची पैज जितण्याची सर्व स्वदेशकल्याणेच्छूंनीं अुमेद बाळगिली पाहिजे." (स्था.स्व.व्य. पृष्ठ २०-२१).

लोकहितवादींनी कोणताहि विषय अेकदा हातीं घेतला म्हणजे त्यासंबंधीची बारीकसारीक माहिती ते मोठ्या प्रयत्नाने मिळवीत. ही त्यांची शोधकता व चिकाटी त्यांच्या प्रत्येक ग्रंथांत दृष्टीस पडते. अि. स. १८८३ मध्यें त्यांनी ग्रामरचनेवर सुमारें सत्तर पृष्ठांचा अेक मुद्देसूद व माहितीपूर्ण प्रबंध लिहिला होता. त्यांत 'ग्रामरचना, तिचा अुद्देश, तिची पूर्वीची व हल्लीची स्थिति आणि लोकांना पूर्वी व हल्ली होत असणारें सुख-दुःख, सरकारचें वर्तन व त्यास सूचना' अित्यादि गोष्टींचें त्यांनी फार मार्मिक तऱ्हेने विवरण केलें आहे. खेडेगांवांतील गरीब व कष्टाळू जनतेच्या सुखदुःखांशीं ते किती समरस झाले होते याचें प्रत्यन्तर प्रस्तुत पुस्तकांत ठिकठिकाणीं मिळतें. खालील अुताऱ्यावरून त्याची थोडीशी कल्पना येअील.

"रयतेला दुसरा कांहीं धंदा व दुसऱ्या कोणाचें रक्षण नसल्यामुळें, सुनेला ज्याप्रमाणे, कशीहि सासू द्वाष्ट व खाष्ट असली तरी सासरीं डोकें खुपसून तिच्या हाताखालीं नांदावें लागतें, नाहीं तर मुलगी नाठाळ हट्टी वगैरे निंद्य विशेषणें लावून घ्यावीं लागतात, तद्वत् सरकारनें कसेंही वागविलें व तरवारीच्या धारेवर धरिलें तरी खालीं मान घालून सरकारचा अधिकार व कबजा मानिला पाहिजे. परंतु सासूबाअीचा द्वाष्ट-व-खाष्टपणा बघून ज्याप्रमाणें लोक तिचा अुपहास करतील, त्याचप्रमाणें नाणावलेल्या, राजनीतिकुशल व रयतेच्या सुखाकरितां दुसरीं भांडणें विकत घेअून जुलमी देशी राजांकडून गांजणूक कमी करणाऱ्या अुदारधी सरकाराचेंच असें विरुद्धाचरण पाहिलें म्हणजे सुज्ञ जन त्याचा अुपहास करणार नाहीत असें कदापि होणार नाहीं. रयत नादान व सर्वांशीं परावलंबी झाली म्हणून तिच्या सौख्याकडे अितकें

दुर्लक्ष्य करणें किंवा तिच्या ओरडण्याकडे अितक्या अुदासीनतेनें पाहणें चांगलें नाहीं. रयत जी आज गांजल्यासारखी व त्रस्त झाली आहे व तिच्याजवळ द्रव्याचा विटाळ न राहून हाता-तोंडाशीं तिची गांठ पडली आहे, याचें कारण अितका वेळ पुनः पुनः सांगत आल्याप्रमाणें हेंच आहे कीं, सारे धारे व करपट्टया यांचें ओझें रयतेवर अुचलेना अितकें जड असल्यामुळें ती त्या ओझ्याखालींच गारद होत आहे! व याविषयीं चोहोंकडून ओरड अैकूं येते. मोठ्या दर्यांत गलबत फुटून त्याजवरचे लोक ज्याप्रमाणें त्या अथाक पाण्यांत गटंगळ्या खात पडावे व अितक्यांत त्यांस अेखादा लांकडाचा मोठासा ओंडा मिळावा, म्हणजे मग ते जीव जाअीपर्यंत किंवा कड लागेपर्यंत त्यास धरून राहतात व तोच काय तो त्यांचा आसरा होतो, त्याप्रमाणें, अफाट राज्योदधींतील नानाराष्ट्ररूप गलबतांची कालरूप महावातानें वाताहत झाल्यामुळें त्यामध्यें प्रस्तुतच्या सरकारासारखा आश्रयभूत ओंडा रयतेला सापडला असून त्यास, त्या महोदधींत बुडणारी प्रजा चिकटून राहिली आहे. तिचें संरक्षण आश्रयदात्या सरकारानेंच केलें पाहिजे." (ग्रा. र. पृष्ठ ५८-५९)

लोकहितवादींच्या वाङ्मयांत अैतिहासिक ग्रंथांची संख्या भरपूर आहे. त्यापैकी बरेच ग्रंथ भाषांतरात्मक आहेत. तरी त्यांच्या प्रस्तावना स्वतंत्र व मार्मिक आहेत. अितिहास-संबंधीची आमची अनास्था फारच शोचनीय होती. गेल्या दोन हजार वर्षांत ह्या देशांत अेवढीं प्रचंड स्थित्यंतरें झालीं, मोठमोठीं साम्राज्यें अुदयाला आलीं, अस्तंगत झालीं, तथापि त्यांचा साधार व सुसंगत अितिहास कोणीं लिहून ठेवला नाही. आमच्याच अिति-हासाविषयी आम्हाला परकीयाचे ग्रंथ प्रमाण मानण्याची पाळी आली. ग्रांट डफ, अेल्फिन्स्टन, मरे वगैरेंच्या अितिहास ग्रंथांचीं मराठींत भाषांतरें झालीं. लोकहितवादींनी अि. स. १८५१ त 'भरतखंडपर्व' या नांवाने हिंदुस्थानचा संक्षिप्त अितिहास लिहिला. अर्वाचीन मराठी वाङ्मयांतील स्वतंत्र अितिहास लिहिण्याचा हा पहिलाच प्रयत्न होय. हा ग्रंथ जरी मामुली होता तरी अितिहासलेखनाचा स्वतंत्र अुपक्रम या दृष्टीने तो लक्षांत घेण्यासारखा आहे. स्वदेशाच्या अितिहासाची ही दशा. मग परदेशाचे अितिहास समजून घेण्याची गोष्ट दूरच राहिली. पर-प्रांतांतील घडामोडींसंबंधीहि आम्ही असेंच अुदासीन होतों. मद्रासमध्यें काय घडलें तें बंगाल-मध्यें कळत नसे; आणि कलकत्त्याला काय चाललें आहे याची महाराष्ट्रात दादाहि नसे. "आपल्या लोकांमधील अैतिहासिक ज्ञानसंपादनाची अुदासीनता जी आज फार प्राचीन काळापासून चालत आली आहे तिच्याविषयीं येथें आज नव्यानेंच विवेचन करावयाचें आहे असें नाहीं. ती अुदासीनता आपण दूर ढकलून, निदान आपआपल्या देशातील प्रान्ताच्या अितिहासाविषयीं तरी अगदीं अजाण न राहण्याची अुत्सुकता आतां आपण धरिली पाहिजे." (गु. दे. अि. प्रस्तावना)

परप्रांतीय अितिहासग्रंथांची ही अुणीव दूर व्हावी म्हणून लोकहितवादींनी सुराष्ट्र, गुजराथ, राजस्थान, लंका ह्या देशांच्या अितिहासाचीं भाषातरें केलीं. 'गुजराथ देशाचा अितिहास' या ग्रंथाचे शेवटीं अिंग्रजी राज्य व देशी राज्य याची त्यांनी केलेली तुलना विचाराई व अुद्बोधक आहे. 'पाणिपतची लढाअी' या भाषांतरात्मक पुस्तकाची प्रस्तावनाहि स्वतंत्र व माहितीपूर्ण आहे. तींत त्यानी ह्या लढाअीची कारणमीमांसा देअून सदाशिवरावभाअूच्या चुका दाखविल्या आहेत. या ग्रंथाच्या परिशिष्टात त्यांनी भोसले, पेशवे, निजाम, शिंदे, होळकर, बुंदेले, भानु अित्यादि अितिहासप्रसिद्ध घराण्याचे वंशवृक्ष दिले आहेत. त्यांच्या

ऐतिहासिक गोष्टींच्या संग्रहांतील दुर्मिळ माहिती वाचली म्हणजे लोकहितवादी हे 'आमच्या देशाच्या माहितीच्या संबंधाने केवळ समुद्र आहेत' ही अुक्ति सार्थ वाटते.

स्वाध्याय व आश्वलायनगृह्यसूत्र ह्या दोन्ही ग्रंथांच्या प्रस्तावना विस्तृत व विद्वत्ता-प्रचुर आहेत. त्यावरून लोकहितवादींच्या ऐतिहासिक दृष्टीची व शोधक बुद्धीची कल्पना येते. तसेंच त्यांना हिंदुधर्माचा व वैदिक संस्कृतीचा किती अभिमान होता तेंहि समजतें. 'मूळ आर्य हे मोठे पराक्रमी विद्याशोधक व अेकमताने वागणारे असे होते. त्यांणी अनेक ग्रंथ लिहून ठेविले व अनेक कलाकौशल्यांत प्राविण्य मिळविलें. परंतु गेल्या हजार वर्षांत आमची ज्ञानलालसा मंदावली; आमच्या पराक्रमाला ओहोटी लागली; आमचा देशाभिमान नाहींसा झाला; आणि अुत्तरोत्तर आम्ही अशा अवनत दशेला येअून पोहोंचलों असे त्यांचें स्पष्ट मत होतें. आश्वलायन गृह्यसूत्राच्या प्रस्तावनेंत त्यांनी संस्कृत भाषेचा महिमा वर्णिला आहे. संस्कृत विद्येची योग्यता ते बरोबर जाणत होते, परंतु जुन्या ग्रंथांवरच सर्वस्वीं अवलंबून राहून आधुनिक शास्त्रांकडे दुर्लक्ष करणें त्यांना संमत नव्हतें. "संस्कृत ग्रंथाची रुचि स्वदेशीय लोकांत असावी तशी नसल्यामुळें फार वाअीट वाटतें, द्विपातरीं आमच्या संस्कृत ग्रंथांचा विचार अस्खलित चालावा आणि आमच्याअिकडील पंडितांनीं त्याविषयीं स्वस्थ बसावें हें आश्चर्यकारक कालमाहात्म्य आहे." (आ. गृ. प्रस्तावना पृष्ठ ५४-५५) आगमप्रकाश या ग्रंथांत त्यांनी शाक्तपंथाच्या विधिविधानांची तपशीलवार माहिती देअून या अनैतिक व अनाचारप्रवर्तक मार्गाचा निर्भयपणें दंभस्फोट केला आहे.

लोकहितवादींवर स्वामी दयानंदांच्या मताची बरीच छाप पडली होती. त्यांनी स्वामीजींचें संक्षिप्त चरित्रहि लिहिलें आहे. आर्यसमाजाची सामाजिक अुपयुक्तता आता सर्वमान्य झाली आहे. परंतु लोकहितवादींनी आरंभापासूनच ह्या समाजाच्या कार्यांत मन घातलें होतें. ह्यामध्ये त्यांची सर्वसंग्राहक वृत्ति व दूरदर्शीपणा दिसून येतो. मुंबअीच्या आर्यसमाजांत लोक-हितवादींचीं व्याख्यानें नेहमी होत असत. त्यापैकी भिक्षुक, कलियुग, जातिभेद अित्यादि भाषणें पुस्तकरूपाने प्रसिद्ध झालीं आहेत. याशिवाय त्याचा महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे 'निबंध-संग्रह' होयें. यांत 'प्रभाकरां'तील पत्रें व 'वृत्तवैभवां'तील ऐतिहासिक लेख संकलित केले आहेत. हा ग्रंथ सुमारें ११०० पृष्ठांचा आहे. ह्या अेका ग्रंथावरूनहि लोकहितवादींचा गाढ व्यासंग व्यक्त होतो. तत्कालीन समाजस्थितीशीं संबंध असलेला अेकहि विषय ह्या लेखसंग्रहांतून सुटला आहे असें दिसत नाही. सरकारी नोकरींतून निवृत्त झाल्यावर गोपाळरावांनी अि. स. १८८२ त 'लोकहितवादी' मासिक सुरू केलें. पहिल्या अंकाच्या प्रस्तावनेंत त्यांनी आपलें धोरण विशद केलें आहे. त्यांत त्यांनी 'सुबोध, स्पष्ट, अल्पविस्तृत व प्रौढ विचारांच्या लेखांचे द्वारें' निरनिराळ्या अुपयुक्त विषयांचा लोकाना परिचय करून देण्याचा आपला अुद्देश जाहीर केला आहे; व "बाष्कळपणाच्या आणि व्यर्थ वाद वाढविणाऱ्या लेखांस आमच्या या पुस्तकांत स्थल मिळणार नाही." असें स्वच्छ म्हटलें आहे. याच मासिकांतून त्यांची 'स्थानिक स्वराज्य-व्यवस्था', 'ग्रामरचना', 'पृथ्वीराज चव्हाण', 'दयानंदाचें चरित्र' अित्यादि पुस्तकें प्रथम प्रसिद्ध झालीं होतीं. त्यानंतर त्यांनी अि. स. १८८३ त केवळ ऐतिहासिक विषयांना वाहि-लेलें त्रैमासिक चालू केलें. त्याचें नांवहि 'लोकहितवादी'च होतें. याच्या प्रत्येक अंकांत ६० पृष्ठें असत. ह्या मासिकांतून त्यांनी आपला 'राजस्थानचा अितिहास' वगैरे ग्रंथ क्रमशः प्रसिद्ध केले.

लोकहितवादींनी आपला शिक्षणक्रम संपवून ज्या वेळीं सार्वजनिक जीवनांत प्रवेश केला, त्या वेळची हिंदुस्थानांतील परिस्थिति एका दृष्टीने आशादायक व उत्साहवर्धक होती; तर

दुसऱ्या दृष्टीने शोचनीय व उद्वेगजनक होती. इंग्रज सरकारच्या अमदानींत सुरवातीपासूनच शांतता व सुरक्षितता नांदू लागली होती. त्यामुळे लोकाना आपले दैनंदिन व्यवहार निश्चिंतपणें पार पाडण्यास मोकळीक मिळाली. ब्राह्मणापासून अंत्यजापर्यंत सर्व जातींच्या व सर्व पंथांच्या लोकांना विद्यामंदिराचा दरवाजा खुला झाला; इतकेंच नव्हे तर, सरकारनें सार्वजनिक शिक्षणप्रसाराच्या कार्यात स्वतः मन घालून त्या कामीं सढळ हातानें खर्च करण्यास आरंभ केला. ठिकठिकाणीं इंग्रजी व मराठी शाळा स्थापन केल्या व गोरगरिबांच्या मुलाना पाठ्यपुस्तकें विनामूल्य वाटण्याची व्यवस्था केली. ह्या नवीन शिक्षणक्रमामुळें आमच्यातील पंडितांची ऐकान्तिक परमार्थप्रवणता नाहीशी झाली; व निरनिराळ्या भौतिक शास्त्रांशीं त्यांचा परिचय घडला. पाश्चात्यांच्या सहवासानेच आम्हांला आधुनिक जगाची प्रथम कल्पना आली; व मानवी जीवनाकडे पाहण्याचा आमचा दृष्टिकोन साफ बदलून गेला. परंपरागत जुन्या समजुती अज्ञानमूलक, जीर्ण व हानिकारक वाटूं लागल्या. सामाजिक जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात नवीन नवीन कल्पना उदयाला आल्या; व त्यांच्या अनुरोधाने आम्ही आपल्या सर्वांगीण प्रगतीचा मार्ग आक्रमूं लागलों.

वैयक्तिक सुरक्षितता, न्यायालयाची स्थापना, भौतिक सुखसाधनाची वाढ, सार्वजनिक शिक्षणाची सोय, इत्यादि आकर्षक गोष्टींमुळे इंग्रजाची राजवट आरंभीं आरंभीं तरी लोकाना पुष्कळच सुखावह व प्रगतिकारक वाटली. परंतु दिवसानुदिवस हिंदुस्थानची सांपत्तिक स्थिति फार खालावत चालली; आणि त्यामुळे अल्पावकाशातच परकीय राजसत्तेचें कुटिल अंतरंग जनतेच्या निदर्शनास आलें. यांत्रिक सुधारणेच्या बळावर आमचा सगळा व्यापार परक्या देशानी हस्तगत केला. पिढ्यानपिढ्या चालत आलेले उद्योगधंदे पार रसातळास गेले. लक्षावधि कसबी व कारागीर बेकार झाले. धान्याशिवाय आमच्या घरातील बारीक सारीक सर्व जिनसा परदेशातून येऊं लागल्या. ओबडधोबड देशी मालापेक्षा विलायती माल सुबक व स्वस्त मिळू लागला; पण तो खरेदी करण्याची लोकाची ऐपत नाहीशी झाली. देशाच्या संरक्षणाचा भार सरकारने आपल्या शिरावर घेतल्यामुळे क्षात्रवृत्ति लोपली; व शिपाईगिरीचा बाणा मिरविणारे मराठे पुन्हा मजूर बनले. शेतकी व चाकरी याखेरीज उदरनिर्वाहाचें दुसरें साधन उरलें नाही. "परंतु शेत करण्यात तरी काय नफा ! वर्षभर मजूरी मरेमरेतो करावी तरी लंगोटी आणि शिळी कोंड्याची भाकर देखील मिळावयाची भ्रांति. बहुत दाणे पिकवितात, परंतु घेतो कोण ! पैसा दुसऱ्या देशात चालला. श्रीमंत लोक, जाजवळ लाखो रुपये आहेत, ते विलायती जिनसा घेतात आणि पैसा उडवितात. त्याचे पोटास पावशेर दाणे पाहिजेत, त्याची मात्र किंमत रयतेकडे जाते. बाकी हजारो रुपये विलायतेस थेट जातात. याप्रमाणें हमेश चाललें आहे." [लोकहितवादींचीं शतपत्रें, नवी आवृत्ति १९४०, पृष्ठें ३५२-५३].

पांढरपेशा वर्ग थोडेंबहुत शिक्षण घेऊन सरकारी नोकरींत पडत असे; पण त्यातहि काही तथ्य नव्हतें. मोठमोठ्या हुद्याच्या सर्व जागा अिंग्रजानी अडविल्या होत्या. फक्त लहानलहान कारकुनी कामें एतद्देशीयाच्या वाट्याला येत. बुद्धिमान् व सुशिक्षित तरुणाच्या महत्त्वाकांक्षेला सरकारी नोकरींत मुळीच वाव नव्हता. "रोजगाराकडे पाहिलें तर जेथें तेथें साहेब पुढें येतात. पोलिस व त्यात सिविल सर्विस तर राजवंशीच म्हटली पाहिजे. त्यात नेटिवाचा प्रवेश न व्हावा याजबद्दल जितक्या युक्ति असतील तितक्या लागू केल्या आहेत......नेटिव जरी स्वभाषा शिकून परभाषा शिकला, त्यानें मोठ्या बिकट परीक्षा दिल्या, व लाखांत एक असा बुद्धिमान् असला तरी त्याची चीज होत नाही." (हिं. दा. ये. का. प्रस्तावना पृष्ठ ९).

अशाप्रकारें चारी बाजूंनी रयतेची आर्थिक कुचंबणा चालू होती. सरकारचे मूठभर 'आशाबद्ध व द्रव्यलोभी' कामदार साहेबाची खुशामत करून भल्याबुऱ्या मार्गांनी धनसंचय करण्यात गढून गेले होते. तसेंच मोठाले सरदार व जाहागिरदार याना सुखासीनतेशिवाय कशाचीच पर्वा नव्हती. बाकीची जनता मात्र हवालदील होऊन पारतंत्र्याचीं कटु फळें भोगीत होती.

अव्वल अिंग्रजींत बहुजनसमाजाची अशी दुरवस्था होती. तथापि तत्कालीन सुशिक्षित व सुखवस्तु वर्गांने ह्या गरीब व अज्ञ जनतेची स्थिति सुधारण्याकडे मुळीच लक्ष दिलें नाही. "श्रीमंत आणि विद्वान् या दोन लोकाचा हातून लोकाचे व देशाचे सुधारणेकरिता प्रयत्न व्हावयाचे. या दोघाशिवाय कोणी करणार नाही. अेक श्रीकडून बलवान् आणि दुसरे ज्ञानेंकरून बलवान्." (श. प. पृष्ठ १२९-३०) परतु ह्या दोघानाहि समाज तरला काय, किंवा बुडला काय, त्याचें काहीच सोयरसुतक नव्हतें. जाहागीरदाराखेरीज धनिकांचा असा स्वतंत्र वर्ग महाराष्ट्रात फारसा नव्हता. जाहागीरदाराना तर स्वतःचा सरजाम साभाळण्याची देखील अक्कल नव्हती. तिन्हित्रिकाळ त्याची चैन अविच्छिन्न चालली म्हणजे झालें, मग दिवस 'अुजाडल्यामावळल्याचीहि' चौकशी करण्यास राजी ते नसत. अशा सुखलोलुप लक्ष्मीपुत्राना दलिताच्या अुद्धारासाठी आपल्या पैशाचा सदुपयोग करण्याची बुद्धि कोठून होणार ! राहता राहिला विद्वानांचा वर्ग. विद्यार्जनाच्या कामीं अिंग्रजी अमदानींतहि आरंभीं ब्राह्मणच आघाडीवर होते. त्यापैकीं जुन्या पद्धतीप्रमाणे शिकलेले शास्त्री व भिक्षुक हे निव्वळ 'पोटभरू व परस्वाधीन' होते. प्राचीन ग्रंथातील ठराविक कोटिक्रम व अर्थशून्य पाठातर ह्यावर ह्या पंडितब्रुवाची सारी भिस्त असे. कोणत्याहि प्रश्नाचा स्वतंत्रपणें विचार करण्याचें त्याच्या बुद्धीला वळणच नव्हते. तेव्हा आपल्या सामाजिक जबाबदारीची त्याना जाणीव होण्याचा बिलकुल संभव नव्हता. यजमानाची तोंडदेखली स्तुति करून आपला चरितार्थ बिनबोभाट कसा चालवावा अेवढ्या अेकाच गोष्टीची ते विवंचना करीत. "स्वसत्ता गेली व स्वराज्य गेलें. हें आपले देशातील सर्व लोकास अनिष्ट आहे अित्यादि स्वदेशाभिमानाच्या गोष्टी त्यास ठाअुक नाहींत. त्यास जेवायास मिळालें, म्हणजे कोणीही राज्य करीत असलें, तरी चिंता नाहीं; त्याची स्तुति करतील; असे हें ब्राह्मण स्वार्थतत्पर आहेत. स्वदेशाचें अितर जातींचे लोकाविषयीं त्याचे मनात काहीं येत नाहीं. फक्त आपलें जेवण व मान कमी जहाला, अेवढ्याचेंच त्यास दुःख आहे." (श. प. पृष्ठ २७७).

जुन्या पडिताप्रमाणेच नवशिक्षिताची वृत्तीहि अत्यंत संकुचित होती. चार-दोन 'बुकें' शिकून कशीतरी अेकदा सरकारी नोकरी मिळविली, की गंगेत घोडे न्हाले अशी त्याची समजूत होती. रयतेच्या अज्ञानाचा व दुर्बलतेचा फायदा घेअून आपली तुंबडी भरण्याकडेच त्याची नेहमी नजर असे. दरमहा 'वेतनाअितका खर्च ठेअून पाच वर्षात दहा हजार रुपये जवळ' करणाऱ्या ह्या व्यवहारपडिताचे अंतःकरण गोरगरिबाची अुपासमार पाहून द्रवण्याअितकें खास हळवें नसणार. ब्राह्मण कामदाराच्या अशा दुष्ट प्रवृत्तीमुळेच सामान्य जनतेचा त्याच्यावरील विश्वास अजिबात अुडाला; आणि परकीय अिंग्रज त्याना आपमतलबी ब्राह्मणापेक्षा जास्त न्यायी व निःपक्षपाती वाटूं लागला. लोकहितवादींनी याबद्दलचा अेक दाखला आपल्या पत्रांत मुद्दाम नमूद केला आहे. "मी अेकदा खेड्यात अेका कुळंब्याचे तोंडाने अैकिलें की, साहेबाचें राज्य चागलें, साहेब न्याय अिनसाफ चांगला करितो, पण ब्राह्मण लोक त्यास शिकवून आमचीं घरें बुडावितात. आणि बहुतकरून सर्व रयतेची समजूत अशीच आहे, आणि ती खरी आहे." (श. प. पृष्ठ ४४) ज्या धानिक व बुद्धिजीवि वर्गांच्या त्यागबुद्धीवर बहुजन-

समाजाचें भवितव्य अवलंबून होतें त्याची दानत अशा प्रकारची होती; म्हणूनच लोकहित-वादींना ह्या बेजबाबदार समाजकंटकांचा— आर्थिक व सांस्कृतिक भांडवलदारांचा — अतिशय कठोर शब्दांत निषेध करावा लागला.

लोकजागृतीचें दुष्कर कार्य हातीं घेण्यापूर्वी लोकहितवादींनी सभोंवतालच्या परि-स्थितीची सूक्ष्मपणें छाननी केली व तदनुसार आपलें धोरण निश्चित केलें. त्यांची दृष्टि अत्यंत शुद्ध व व्यापक होती. आपल्या विशिष्ट वर्गाच्याच हिताहितांशीं व सुखदुःखांशीं समरस होण्या-अितका त्यांचा देशाभिमान संकुचित नव्हता. ज्यामध्यें ब्राह्मण, महार, रामोशी, कैकाडी, कोमटी वगैरे सर्व वर्गांतील लोक अेकमेकांशीं 'सहोदर बंधूंप्रमाणे' वागतील अशा तऱ्हेचा आदर्श समाज त्यांना अस्तित्वांत आणावयाचा होता. त्या दृष्टीने त्यांनी आपल्या समाजांतील गुणावगुणांची निर्भीड व सडेतोड चर्चा करण्याचा अुपक्रम केला. ब्राह्मणांच्या मूर्खपणावर जरी त्यांनी निष्ठुर वाक्प्रहार केले, तरी त्यांतहि त्यांचा प्रांजलपणा व न्यायप्रियता व्यक्त झाल्या-खेरीज राहत नाही. ब्राह्मणांनी कुळंब्यांचा द्वेष करावा व कुळंब्यांनी ब्राह्मणांना शिव्या द्याव्या ही गोष्ट त्याना मुळींच रुचत नसे. परस्परांतील हा द्वेषभाव पाहून त्यांच्या अंगाचा तिळपापड होअी व साहजिकच त्यांच्या तोंडून जळजळीत व मर्मभेदक उद्गार बाहेर पडत. "आता जर कोणी शूद्र जातीचा कारकून झाला, तर सर्व ब्राह्मण लोक त्याजकडे डोळे वटारून पहातात. त्यांस असें वाटतें की, आमचा धर्म लिहिणें-पुसणें करावयाचा असून कुणबी आमचा वृत्तिच्छेद करितात." (श. प. पृष्ठ २९३.)

"माझा हेतु अितकाच की, विरोध मोडावे आणि लोकांनी परस्परममतेने वागावें व जसे जसे कालेंकरून हे अज्ञानपाश सुटतील तसे तसे सोडयावे. परंतु या कार्यास आरंभ करावा म्हणजे बरें पडेल. बहुत लोक वाट पहातात. ब्राह्मण महाराची निंदा करतात. त्यास शिवत नाहीत व अिंग्रजांजवळ प्रीतीने बसतात. हें पाहून मला आश्चर्य वाटतें. शास्त्राप्रमाणे पाहिलें असतां महार बरे; परंतु अिंग्रजाचे मंडळींत ब्राह्मण असूं नयेत. तत्रापि हे ब्राह्मण मूर्ख, त्यांस समजत नाहीं." (श. प. पृष्ठ २१५)

सामाजिक सुधारणांचा पुरस्कार करताना लोकहितवादींनी राजकीय प्रगतीचें महत्त्व कधीहि दृष्टीआड केलें नाही. अुलट देशाच्या दारिद्र्याचें व विपन्नावस्थेचें मूळ राजकीय परा-धीनतेंत आहे, व आपल्या लोकांच्या हातीं थोडीबहुत सत्ता आल्याशिवाय आपली सांपत्तिक स्थिति कधीहि सुधारणार नाही याची त्याना पूर्ण कल्पना होती. "आपला देश निर्धन होत चालला आहे, याचा विचार करणें सर्वांस अुचित आहे, आणि मुलखाचें दरिद्र काढावयाचा अुपाय करणें, तर आधी राज्य सुधारलें पाहिजे. अुत्तम रीतीने राज्य चालावें, अशी कांही तरी युक्ति निघाली पाहिजे." (श. प. पृष्ठ ५३-५४)

लोकहितवादींनी जरी वेळोवेळीं अिंग्रजांच्या विद्येचा व गुणांचा गौरव केला असला, तरी त्यांना आपल्या देशाचा, धर्माचा व संस्कृतीचा कांही कमी अभिमान नव्हता. त्यांची देशभक्ति रानडे-चिपळूणकर, टिळक-आगरकर यांच्याअितकीच अुत्कट होती. वैदिक संस्कृतीच्या पूर्ववैभवाचे त्यांनी जागोजाग गोडवे गाअिले आहेत. मंत्रद्रष्ट्या ऋषींच्या शोधकतेबद्दल व बुद्धिमत्तेबद्दल त्यांना आदर होता. शिवाजीमहाराज व रामशास्त्री यांची थोरवी त्यांनी मोठ्या अभिमानाने प्रतिपादिली आहे. आपल्या लोकांच्या कर्तबगारीवर त्यांचा दृढ विश्वास होता. "ब्राह्मण लोक हे आपल्या घरीं आले, म्हणजे सोवळें करितात व यवनांचा विटाळ जहाला म्हणून म्हणतात. तथापि त्यांस राज्य करावयास त्यांणी हरकत केली नाही व किती-

अेक लोक मुसलमानांवर अितके फिदा जहाले की, राज्य करणें व शूरत्व करणें हें काम मुसलमानांचें होय, अितरांस यावयाचें नाहीं, असें म्हणूं लागले; परंतु त्या मूर्खांस असें समजत नाही की, आठशे वर्षांपूर्वी हिंदु राजे जहालेले पांडव, राम, परशुराम हे मुसलमान होते कीं काय ! आपले देशांत यवन लोक आले ते कोठले, यांस अिकडे वस्ती करूं द्यावी कशाकरितां व यांस हाकून देण्यास आम्हांस कांही शक्ति नाहीं कीं काय ! सर्व हिंदु लोक निर्बळ व अपौरुष आहेत कीं काय !" (श. प. पृष्ठ ७२)

आर्जवीपणाचा त्यांना अतिशय तिटकारा होता. त्यामुळे कोणाचीहि विनाकारण खुशामत करणें त्यांना आवडत नसे. परंतु अिंग्लंडप्रमाणेच आपला देश समर्थ व संपन्न व्हावा अशी त्यांची मनीषा होती; आणि म्हणून अिंग्रजांचे जे जे गुण त्यांना अिष्ट व अनुकरणीय वाटले त्यांची त्यांनी मोकळ्या मनाने प्रशंसा केली आहे. तसेंच त्यांनी प्रसंगोपात्त त्यांच्या दुर्गुणांवर ताशेरेहि झाडले आहेत. आपल्यांतील नवीन सुशिक्षित लोक लवकरच हरअेक बाबतींत अिंग्रजांची बरोबरी करतील याबद्दल त्यांना बिलकुल शंका नव्हती. "जा ज्ञानाने आपल्यावर अितर लोकांनी सरशी केली, तें ज्ञान आपण धिःकारूं नये; कारण की, त्याचा आपणास अनुभवच आला आहे. याजकरिता सावधगिरीचें लक्षण हेंच की, काळास ओळखून त्याप्रमाणें चालावें, असें न केलें तर फार फजीत होअून दुर्दशा झाली आहे, त्यापेक्षा अधिक होण्याचा संभव आहे." (श. प. पृष्ठ १४५) "साहेब लोकांस लोक चांगले म्हणतात व नेटीव कामगारास बहुधा वाअीट म्हणतात; परंतु आतां सुधारलेले व सुशिक्षित लोक सरसावत चालले आहेत ते अिंग्रजांची बरोबरी करतील यांत संशय नाही" (श. प. पृष्ठ ६१)

आपल्या राजकीय पारतंत्र्याचें शल्य लोकहितवादींच्या चित्तात सदैव सलत होतें. शक्य तितक्या लवकर हा देश स्वतंत्र कसा होअील याविषयीं त्यांच्या अंतःकरणाला तळमळ लागून राहिली होती. या दृष्टीनेच त्यांनी 'आपण सर्व अेकत्रित होअून विलायतेंत शिष्टमंडळ पाठवावें; आणि आपल्या देशाला 'पार्लमेंट'-मागून घ्यावें' अशी सूचना केली होती. आपल्या लोकांच्या स्वाभिमानशून्यतेची त्याना फार चीड होती. कोणाहि जबरदस्ताचा जुलूम निमूटपणें सहन करण्याच्या आमच्या नादानपणावर त्यांनी वारवार कोरडे ओढले आहेत. तसेंच गेल्या आठशें वर्षांत हिंदूंना आपलें राज्य सांभाळतां आलें नाही याबद्दलहि त्यांनी ठिकठिकाणीं दुःखोद्गार काढले आहेत. "आज आठशे वर्षांपासून हिंदु लोकाच्याने स्वराज्य रक्षवलें नाही. आठशे वर्षांत मुसलमान, अिंग्रज वगैरे पाळीपाळीने येअून येथे राज्य करितात. व आपलेच लोकांचें सैन्य ठेवून आपलेच लोकांस मारतात. याचें कारण 'ज्ञानशून्यता." (श. प. पृष्ठ २५७)

"परमुलखाचे लोक येअून हिंदु लोकांचे हातचें हिसकावून घेअून खातात व मानेवर जोखड ठेवून राज्य करितात; पण हें अितकें सर्व सहन करून आहेत. यांच्यामध्ये बळ, शूरत्व किंवा शक्ति कमी आहे असें नाही; पहिल्याने यांणी सर्व हिंदुस्थान जिंकलें होतें; परंतु यास राखावयाचें शहाणपण नाही, याजमुळे हे गमावून बसले." (श. प. पृष्ठ ३३१)

परकीय राजसत्तेचें प्राणघातक जूं आपल्या मानेवर वाहण्याचें आमच्या अंगवळणीं पडलेलें पाहून त्यांचें मन अस्वस्थ होअी. गव्हर्नरापासून असिस्टंट कलेक्टरपर्यंतच्या सर्व मानाच्या जागा म्हणजे अिंग्रजांची मिरास व्हावी आणि आमच्यावर त्यांची हमाली करण्याची पाळी यावी ही स्थिति त्यांना अपमानास्पद वाटे. "सांप्रत काळीं हिंदु लोक मूर्ख; त्यास राज्यकारभार करतां येत नाही व आपलें राज्य सांभाळण्याची ताकद नाही. याजकरिता पहा त्यास किती संकटें प्राप्त झालीं आहेत की, गवरनरापासून असिस्टंट कलेक्टरपर्यंत व कमांडर चीफ-

पासून अेनसाअीन व सोजीरपर्यंत दुसरे देशचे लोक भाडयाने आणले आहेत. ते कसे म्हणाल तर त्यांनी लाखो रुपये पगार आम्हांपासून घ्यावा आणि स्वदेशास जावें. त्यांचीं घरेंदारें अिकडेस काहीं नाहींत. त्याचे हातीं पैसा गेला तो अिकडे अगदी यावयाचा नाही. अशा प्रकारचे लोक आम्हास भाडेकरी आणून राज्यकारभार करावा लागतो." (श. प. पृष्ठ ८७)

लोकहितवादींना स्वराज्याची अुत्कंठा होती. परंतु त्याना कोणाहि अेका व्यक्तीचें वा वर्गाचें राज्य नको होतें. मूठभर अिंग्रजाच्या हातून कांही हिंदी लोकाच्या हातात सत्ता गेली, तर त्यामुळे बहुजनसमाजाच्या परिस्थितींत काही म्हणण्याजोगा बदल होणार नाही याची त्याना पक्की खात्री होती. म्हणून ज्यामध्ये समाजाच्या सर्व थरातील लोकाना 'हिस्सेदार' म्हणून भाग घेता येअील अशा खऱ्याखुऱ्या 'लोकसत्ताक' राज्याची त्याना अपेक्षा होती. जोपर्यंत आपल्या राजकीय हक्काची जाणीव होअून त्याच्या रक्षणासाठी संघटित प्रतिकार करण्याची कुवत जनतेच्या अंगीं आली नाही तोपर्यंत अिंग्रज येथून गेले तरी अशा प्रकारचे 'लोकराज्य' स्थापन होणें शक्य नाही हे त्यांनी पुरेपूर ओळखले होतें. "आमचे लोकाचे रीति अगदी बदलल्या-शिवाय या देशाचें हित होणार नाही व या लोकास स्वता राज्य चालविण्याचे सामर्थ्य असल्याखेरीज अिंग्रज लोक या देशातून गेले तरी अुपयोग होणार नाही. पुनः गर्दी होअील व बेबंदी, अंदाधुंदी, भालेराअी, होळकरी गर्दी व पेंढारी अशा गोष्टी पुनरपि होतील, आणि कोणाचा जीव व घरदारहि निर्भय राहाणार नाही. जो जबरदस्त त्याचे हाती सर्व जाअील व जो निर्बल असेल तो अुपाशी मरेल. सर्व त्याचें हरण होअील." (श. प. पृष्ठ ९२)

लोकहितवादींचा दृष्टिकोन केवळ पुस्तकी पांडित्यावर अुभारलेला नव्हता. जगाच्या अितिहासाचें मार्मिक अध्ययन व देशाच्या परिस्थितीचें सूक्ष्म अवलोकन याच्या आधारावर त्यानी आपलें धोरण फार दूरदर्शीपणाने आखलें होतें. संपूर्ण स्वातंत्र्य हेच त्याचें ध्येय होतें. तीस कोटि लोकांच्या राष्ट्राला आपल्या संघटित सामर्थ्याची ओळख पटल्यावर तें मूठभर गोऱ्या लोकाचें वर्चस्व मुळीच मानणार नाही, हें त्यानी असंदिग्ध शब्दात सांगितलें आहे. अर्जविनंत्यापासून सशस्त्र प्रतिकारापर्यंतचे सत्ताग्रहणाचे सर्व मार्ग त्याच्या दृष्टिपथात होते. परंतु लोकाचें बळ अजमाविल्याशिवाय नुसत्या निरर्थक वल्गना करणे ही देशभक्ति नव्हे! राजकीय शहाणपण तर नव्हेच नव्हे. म्हणून 'अधिकार तैसा करूं अुपदेश। साधे ओझें त्यास तेचि द्यावें' ह्या न्यायाने देशातील गाढ अज्ञान व शैथिल्य नाहीसें करण्यासाठी त्यानी आपलें शक्तिसर्वस्व खर्च केलें. "देशसुधारणा क्षणात होत नाही. तीस पुष्कळ विलंब लागतो." (श. प. पृष्ठ ७८). शेकडों कार्यकर्त्यांना प्रसिद्धीची हाव न धरता जन्मभर धीमे-पणाने पण अविरत प्रयत्न करावे लागतात; कणाकणाने जनतेची संघटना व बळ वाढवावें लागतें; अुगाच भावनावश होअून अुतावळेपणाने लोकाची दिशाभूल करण्यापासून काही फायदा होत नाही; ह्या सर्व गोष्टी लक्षात घेअून लोकहितवादींनी कोणाचीहि भीडभाड न धरता आधी लोकजागृतीचें प्राथमिक कार्य हातीं घेतलें. याचा अर्थ अिंग्रजाच्या राज्यात ते सुखाने नांदण्यास खुशी होते असा नाही. क्षणाचाहि विलंब न लागता हिंदुस्थान स्वतंत्र झाला असता तर त्याच्याअितका हर्ष कोणालाच झाला नसता. पण तसें घडण्याची त्या काळीं तिळ-मात्र शक्यता नव्हती. "पेशवे चागले असोत अगर अिंग्रेज वाअीट असोत, जें प्राप्त झालें आहे तें खरें. सांप्रत ब्राह्मण लोकांची हलाखी आहे. हे सर्व कबूल करतोऊं. बरें, जे अिंग्रेजी राज्यास नावें ठेवितात व मनात चुरमुरतात, त्यांनी व्यर्थ काळजी करूं नये. कारण पेशव्यानें किंवा दुसरे कोणाचें चागलें त्यास पाहिजे तसें राज्य त्याच्याने स्थापवत नाही. व अिंग्रजांसही

सध्या जा किंवा अमुक रीतीने चाला, हें म्हणण्याचीहि या भटांची व कारकुनांची प्राप्ती नाही. यास्तव जें आपणांस कर्तव्य, त्यावर विचार मात्र आपण करावा." (श. प. पृष्ट ३५५-५६)

लोकहितवादींनी आपल्या काही पत्रांत अिंग्रजी राज्यापासून झालेले फायदे वर्णिले आहेत. परमेश्वराच्या प्रेरणेनेच या देशांत अिंग्रजांचें राज्य स्थापन झालें आहे अशी त्यांची श्रद्धा होती; आणि म्हणून ते अिंग्रजांना गुरुस्थानीं मानीत. कारण पाश्चात्यांची संस्कृति तत्कालीन भारतीय संस्कृतीच्या मानाने भौतिकदृष्ट्या पुष्कळच प्रगत व पुरोगामी होती. त्यामुळे सामाजिक जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात पदोपदीं आम्हांला त्यांची मदत घ्यावी लागे. अशा स्थितींत लोकहितवादींसारख्या सालस व श्रद्धाळू माणसाला अिंग्रज गुरुतुल्य वाटले तर काही नवल नाही. परंतु त्यांचें राज्य ह्या ठिकाणीं आचंद्रार्क राहावें असें त्यांनी कधीच म्हटलें नाही. अुलट शक्य तितक्या लवकर त्यांनी आम्हास लायक बनवून आमचें राज्य आमच्या हवालीं करावें असा त्यांचा आग्रह होता. अिंग्रजी राज्यातील फिळमवाण्या वशिलेबाजीवर त्यांनी कडक टीका केली होती. हिंदु लोकांप्रमाणे अिंग्रजहि मनुष्येंच आहेत; तेव्हा न्याय-दानाच्या बाबतींतील नेटिव व अिंग्रज हा भेदभाव अपमानास्पद आहे असा आपला अभिप्राय त्यांनी निर्भीडपणें व्यक्त केला होता. शिवाय अिंग्रजी राज्यात रयत दिवसानुदिवस दरिद्री होत चालली आहे; व सरकार देशाच्या आर्थिक सुधारणेसाठी काहीच प्रयत्न करीत नाही अशी त्यांची रास्त तक्रार होती. ब्रिटिश पार्लमेंट हें हिंदुस्थानातील कारभारासंबंधी 'सवतीच्या मुलाप्रमाणे' अुदासीन आहे. तेव्हा प्रजेच्या न्याय्य हक्काच्या रक्षणाविषयी आपण नेहमी जाग-रूक असलें पाहिजे ही त्यांची शिकवण होती. याप्रमाणे अिंग्रजी राज्याच्या दोन्ही बाजू त्यांनी जनतेपुढे स्पष्ट मांडल्या, व प्राप्त परिस्थितीचा आपल्या सर्वांगीण प्रगतीसाठी जास्तींत जास्त अुपयोग कसा करून घ्यावा तेंहि परोपरीने दाखवून दिलें.

भौतिक शास्त्राची अुपेक्षा, आपसातील फूट, व निरपवाद शब्दप्रामाण्य हे त्रिगुणच प्रामुख्याने आमच्या अधोगतीला कारण झाले होते. तेव्हा त्या दिशेने लोकहितवादींनी आपल्या टीकेचा भडिमार सुरू केला. अेक हजार वर्षांपर्यंत आमच्यातील पंडितांनी ठराविक ग्रंथांचें चर्वित-चर्वण करण्यात आपल्या बुद्धीचा दुरुपयोग केला होता. म्हणूनच लोकहित-वादींना 'भटाच्या निरुपयोगी विद्ये'चा अितका निष्ठुरपणें समाचार घेणें भाग पडलें. आमच्या महामहोपाध्यायांना भौतिकशास्त्राचे सामान्य सिद्धान्तहि अवगत नसत. त्यांचा व्यवहारात काही अुपयोग आहे याची त्यांना दादच नव्हती. राजाश्रय तुटला. पावलोपावलीं मानखंडना होअूं लागली. तरी त्याचें कारण शोधण्याची कोणालाच गरज वाटत नव्हती. काळ फिरला, सद्दी संपली, दुर्दैव ओढवलें, अशा तऱ्हेच्या रडकथा गाअून ते स्वस्थ बसत. त्यांचा हा मूर्खपणा व शैथिल्य पाहून लोकहितवादींचें पित्त खवळून जाअी; व 'परटाचा किंवा लमाणाचें गाणें यापेक्षा अर्थशून्य वेदपठनाची किंमत काही अधिक नाही.' 'व्याकरणापेक्षा लाकडें तोड-ण्याचें कसब शिकणें बरें.' अशासारखे अुद्गार त्यांच्या तोंडून बाहेर पडत. नवीन व्यवहारोप-योगी विद्या हस्तगत करून केवळ अैतिहासिक दृष्टीने जुनीं पुराणें व शास्त्रग्रंथ वाचण्यास त्यांची ना नव्हती. परंतु 'पंचमस्कंधातील भूगोल' आज शब्दशः प्रमाण मानण्यास त्यांचा विरोध होता. "भागवताचीं हजार पारायणें केलीं व रामायण नित्य वाचलें, तरी हिंदुस्थानात अिंग्रज कसे आले, हें समजणार नाही. तसें जन्मपर्यंत जुन्या गोष्टी सांगितल्या आणि हाप्रतचे विचार केले नाहीत तर त्यांचा अुपयोग काय?" (श. प. पृष्ठ २४८-४९) म्हणूनच लोक-हितवादींनी 'ज्ञान हीच शक्ति; शहाणपणाचे अंतीं सर्व आहे' असें प्रतिपादून आधुनिक शास्त्रांचें

अद्यावत् ज्ञान संपादन करण्याचा लोकांना अुपदेश केला.

आमच्या लोकांत बुद्धि, शौर्य, धैर्य, पराक्रम अित्यादि गुण कांही कमी नव्हते; परंतु आपसांतील दुफळीमुळे त्यांची माती झाली. याची साक्ष अितिहासाच्या प्रत्येक पानापानावर आढळतें. समाजांत सलोखा व सहकार्य नांदावें म्हणून जातिव्यवस्था अंमलांत आली. पण तिचें पर्यवसान तेढ आणि वितुष्ट वाढविण्यांत झालें. देश, धर्म, भाषा, संस्कृति अित्यादि बंधनांचा आम्हांला विसर पडला; व जातीच्या संकुचित अभिमानाला बळी पडून आम्ही अेकमेकाचे शत्रू बनलों. संख्याबलानें हिंदु समाज अजिंक्य असतांहि ह्या भेदबुद्धीचा परधर्मीयांनी भरपूर फायदा घेतला व येथे साम्राज्यें स्थापलीं. हजार वर्षें परक्यांच्या लाथा खाअूनहि आम्ही शुद्धीवर आलों नाहीं. घरभेदेपणा हा आमचा देहस्वभावच होअून बसला. स्वतःच्या क्षुद्र स्वार्थासाठीं देशहितावर धडधडीत निखारे ठेवण्याच्या ह्या अधम प्रवृत्तीवर लोकहितवादींनी पुन्हा पुन्हा फटकारे ओढले आहेत. "परक्याजवळ हात जोडून रहातात; पण आपले स्वकीयांशीं लढाअी करितात; अशी चाल आपले लोकांची आहे. आपसांत प्राण देअून भांडतात; पण परक्याच्या लाथा सोसून नम्र रहातात." (श. प. पृष्ठ २३६).

"सर्व हिंदुलोक मुळापासून बकऱ्यासारखी जात; त्यांस कोणीहि पोटास दिलें तर ते स्वदेश किंवा बापभाअू याची ओळख सोडितात. अेक जातीचे लोक दुसऱ्या जातीशीं वैर करतात, आपण फितुर होअून आपलेच लोकास मारतात व आपणच पेंढारी होअून आपणासच लुटतात." (हिं.दा. ये. का. पृष्ठ ८).

जातिवैमनस्याचें हें भूत पुरतेपणीं गाडल्याशिवाय ह्या देशाचा तरणोपाय नाही हें लोकहितवादींना समजून चुकलें होतें. म्हणून त्यांनी सामाजिक समतेचा धडाडीने पुरस्कार केला. समाजाच्या धारणेला व अुत्कर्षाला पोषक होणारा प्रत्येक घटक हा सारख्याच योग्यतेचा मानावा; त्यांत अुच्चनीच भाव ठेवूं नये, हाच त्यांच्या सांगण्याचा मथितार्थ होता. या दृष्टीने ब्राह्मणांच्या परंपरागत प्रतिष्ठेवर त्यानी सतत हल्ला चढविला; आणि आळशी व अनुत्पादक भिक्षुकवर्ग हा सामाजिकदृष्ट्या मजुरांपेक्षाहि निकृष्ट व निरुपयोगी आहे असें बिनदिक्कत प्रतिपादिलें. "मोठे शहरांत पहाल, तर तुम्हांस असें वाटेल की, अितके भट येथे आहेत, यांस खावयास मिळतें, त्याबद्दल हे कोणती चाकरी करितात? असें जर मनांत आणिलें, तर तुम्ही काय म्हणाल? मला तर अेक मनुष्य दाखवा की, भटांनी शाळा घालून कोणी तयार केले किंवा कोणास विद्वान् केलें, किंवा ग्रंथ केले किंवा ज्ञान सांगितलें किंवा लोक सुधारले किंवा मजुरी केली, असें कांही तरी मला या भटांचें व भिक्षुकांचे खाण्याचे मोबदला त्यांचा अुपयोग दाखवा. चांभाराचा अुपयोग मी तुम्हास सांगतों व दर अेक मनुष्याचे पायांत जोडे दाखवितों. तुम्ही आम्हांस भटांची निशाणी दाखवा." (श.प. पृष्ठ ३१५)

'तेव्हां ब्राह्मणांनी आपल्या जन्मजात मोठेपणाच्या खुळ्या कल्पना सोडाव्या; जातीचा अभिमान बाळगूं नये; मनुष्यमात्राला सारखें लेखावें; अर्वाचीन विद्या व कला आत्मसात् कराव्या; कालमान पाहून आचारविचारांत योग्य तो फरक करावा; प्राचीन शास्त्रांचा केवळ शब्दार्थच घेऊं नये, त्याचें मर्म ओळखावें; जुन्या वेडगळ समजुतींना फाटा द्यावा; आचारांचें फाजील स्तोम माजवूं नये; सदाचरणाची व नीतीची कास धरावी; आर्जव व लाचारी टाकून द्यावी; अन्यायाचा वेळींच प्रतिकार करावा; देशहित हा मुख्य धर्म मानावा. म्हणजे बाकीचे सर्व लोक त्याचें अनुकरण करतील व त्यामुळे त्यांची व देशाची प्रगति होईल' अशी लोकहितवादींची विचारसरणी होती. एवढ्या मोठ्या समाजांत कांही ना कांही वर्ग किंवा गट हे

राहणारच. पण त्यांचा सामाजिक दर्जा सारखा असला म्हणजे भांडणतंटे मिटतील, व संघटनेला बाध येणार नाही असें त्यांचें मत होतें. "यास्तव जाति अभिमान सोडला तरी जाति कायम राहातील, यांत संशय नाही. परंतु तटे व भांडणें मोडतील. मत्सर करणार नाहीत. इतका फायदा होईल. सर्व लोक एकचपणानें वागतील. ब्राह्मण असें म्हणणार नाहींत की अमका तो महार आहे, त्याचें तोंड पाहूं नये, त्याचा विटाळ होतो. हा वेडेपणा मात्र जाईल. मग तो महार अर्थातच ब्राह्मणांचें गर्विष्ठपणाचे शब्द ऐकून नीट इंग्रजाचे घरीं जातो आणि म्हणतो, ब्राह्मण आतां फार माजले. मी त्यांस हात दाखवीन. इंग्रज लोकाचे फौजेंत नीच जातीचे लोक फार असतात; कारण त्यास ब्राह्मण लोक तुच्छ मानतात; त्यास उष्टें खावयास घालतात व केवळ जनावराप्रमाणें समजतात. याजमुळे त्यांस उपाय सुचतो तो ते करितात. आणि ब्राह्मणाचें काम काढितात. हा परिणाम जातिअभिमानाचा आहे.' (श. प. पृष्ठ ४१९-२०).

लोकहितवादींची अशा तऱ्हेची पायाशुद्ध विचारप्रणाली पाहिली म्हणजे त्यांना महाराष्ट्रांतील राष्ट्रवादाचे आद्यप्रवर्तक म्हणून संबोधावयास हरकत वाटत नाही. निरनिराळ्या विषयांवरील त्यांचीं मतें मुख्यतः 'प्रभाकर' साप्ताहिकांतून इ. स. १८४८–५० च्या दरम्यान प्रसिद्ध झालेल्या शतपत्रांत प्रतिबिंबित झालेलीं आहेत. हीं पत्रें त्यांनी पुढे आपल्या कांही किरकोळ लेखांसह संकलित करून इ. स. १८६६ त 'निबंधसंग्रह' या नांवाने छापलीं. ह्याशिवाय 'हिंदुस्थानास दरिद्र येण्याचीं कारणें,' 'स्थानिक स्वराज्यव्यवस्था,' 'ग्रामरचना,' 'जातिभेद,' इत्यादि छोटेखानी पुस्तकातूनहि त्याचे स्वतंत्र विचार दृष्टीस पडतात. परंतु त्यांच्या 'पुरोगामी' व 'क्रांतिकारक' विचारांची ठेवण बरोबर लक्षात येण्यास शतपत्रांचाच उपयोग सर्वांत अधिक आहे. हीं पत्रें नामदेव-तुकारामादिकांच्या अभंगाप्रमाणे स्फुट स्वरूपाचीं आहेत. समाजाच्या अत्यंत जिव्हाळ्याच्या प्रश्नांसंबंधी त्या त्या वेळीं सुचलेले विचार त्यांनी सरळ जसेच्या तसे त्यांत टिपून काढले आहेत. त्यामुळे त्यांची मांडणी काहीशी शिथिल परंतु स्वाभाविक व भावनिष्ठ आहे; सुसंबद्ध व तर्कशुद्ध नाही. पत्रांची भाषा अगदीच साधी व तुटक आहे. पण प्रत्येक वाक्यात समाजहिताची तळमळ ओतप्रोत भरलेली आहे. त्यामुळे त्यांचे सहजस्फूर्त उद्गार वाचकाच्या अंतःकरणाचा ठाव घेतल्याशिवाय राहत नाहीत. त्याचे विचार तर्काला सोडून नाहीत, पण त्याच्या लिखाणाचा कल वाचकांची न्यायबुद्धि व सद्भावना जागृत करून 'हृदयपालट' करण्याकडेच आहे. निरनिराळ्या रीतीने आपलें म्हणणें लोकांच्या गळीं उतरविण्याचा त्यानी प्रयत्न केला आहे. त्यामुळे त्याच्या लिखाणात बरीच पुनरुक्ति व क्वचित् विसंगतीहि आढळते. परंतु त्यांचा दृष्टिकोन स्थिर व निश्चित असल्यामुळे परस्परविरोधी वाटणाऱ्या त्यांच्या विधानांची संगति लावणें कठिण जात नाही. त्यांचे विचार आज सर्वांनाच तंतोतंत पटतील असें नाही. परंतु त्यांची कळकळ, प्रांजलपणा, दूरदृष्टि, निःस्पृहता इत्यादिकाबद्दल कोणाचेंहि दुमत होणार नाही.

लोकहितवादींच्या अलौकिक समाजकार्याप्रमाणेच त्यांचें व्यक्तिगत जीवनहि उज्ज्वल व स्फूर्तिदायक होतें. त्यांची ज्ञानलालसा व विद्याव्यासंग दांडगा होता. कुटुंबपोषणासाठी स्वीकारलेली सरकारी नोकरी त्यानी अत्यंत दक्षतेने व चोख रीतीने बजाविली पण आपल्या स्वाभिमानाला कधीहि धक्का लागूं दिला नाही. सामान्य कारकुनापासून तों मोठमोठ्या अधिकाराच्या व मानाच्या जागेपर्यंत ते आपल्या कर्तबगारीने चढले. मात्र त्या वेळच्या इतर कामदारांप्रमाणे ते द्रव्यलोभाने अंध झाले नाहीत किंवा सत्ताबळाने शेफारले नाहीत. त्यांची राहणी

अगदी साधी होती. स्वभाव फारच प्रेमळ होता. लहानापासून थोरापर्यंत ते खुल्या दिलाने वागत. त्यांच्या दातृत्वाला तर सीमाच नव्हती. आंधळ्यापांगळ्याला, गरीब-दुबळ्याला कांहीना कांही मदत केल्याशिवाय त्यांचा अेकहि दिवस सुना जात नसे. थोडक्यांत 'तुका म्हणे सुख पराविया सुखें । अमृत हें मुखे स्रवतसे' अशी त्यांची वृत्ति होती.

सरकारी नोकरीत लोकहितवादींनी मानमान्यता मिळविली अेवढ्यावरच त्यांचा मोठेपणा अवलंबून नाही. त्यांनी तीस वर्षे नोकरी केली; पण आपला बाणेदारपणा कधीहि सोडला नाही. अहमदाबादेस असतांना बडोदें संस्थानचे असिस्टंट रेसिडेंट लेफ्टनंट फिनिक यांनी त्यांचा अपमान केला होता. त्यांना तो सहन झाला नाही. त्यानी सरकारकडे कायदेशीर दाद मागितली. सरकारने सदर प्रकरणाची पूर्ण चौकशी करून फिनिफ साहेबास त्यांच्या कामावरून काढून टाकलें व पुन्हा पलटणींत धाडलें.

नोकरीच्या निमित्ताने ज्या ज्या ठिकाणीं गोपाळराव गेले त्या त्या ठिकाणीं त्यांनी आपलें लोकसेवेचें व्रत अखंड चालू ठेवलें. त्यांच्या खटपटीने पुणें येथील नगरवाचनालय सुरू झाले. ज्ञानप्रकाश व अिंदुप्रकाश ह्या दोन्ही वृत्तपत्रांच्या स्थापनेंतहि त्यांचा हात होता. ते वाअीस असतांना कृष्णेला भयंकर पूर आला व त्यामुळे आजूबाजूच्या लोकांचें अपरिमित नुकसान झालें. ह्या अपद्ग्रस्तांना दुःखमुक्त करण्याच्या कामीं गोपाळरावानीं शक्य तितके प्रयत्न केले. लेखन व भाषण हा तर त्याचा नित्याचा व्यवसायच होता. याशिवाय ते निरनिराळ्या सार्वजनिक संस्थाच्या कार्याला हातभार लावण्यास सदैव तत्पर असत. मुंबअीच्या आर्यसमाजाचे ते अध्यक्ष होते. दयानंदस्वामींनी आपल्या संस्थेच्या विश्वस्त-मंडळांत त्यांचें नांव घातलें होतें. अहमदाबादच्या प्रार्थनासमाजात त्यांचीं नेहमी व्याख्यानें होत असत. अशा तऱ्हेची त्यांची सर्वसंग्राहक दृष्टि होती. मतभेद चिवडीत बसण्यापेक्षा मतैक्यावर जोर देअून परस्परसहकार्य करण्याचें त्यांचें धोरण होतें.

मागे विविधज्ञानविस्तारांत लोकहितवादींवर अेक टीकात्मक लेख आला होता. त्यात आरंभीं त्याचें गुणवर्णन करून शेवटीं त्याच्यावर दोन आक्षेप घेतले होते. (१) पुनर्विवाहाच्या निमंत्रणपत्रिकेवर सही देअून लोकहितवादी स्वतः समारंभाला हजर राहिले नाहीत, (२) विलायतेंत पार्लमेंटरी फायनान्स कमिटीसमोर साक्ष देण्यासाठी सरकारने बोलावलें असतां 'धर्माच्या अडचणीमुळे मला विलायतेस जातां येणें शक्य नाही' असें अुत्तर दिलें. ह्या दोन्ही आक्षेपांत पुष्कळच तथ्य आहे. लोकहितवादींचें हें आचरण शंभर नंबरी तत्त्वनिष्ठेच्या कसोटीला अुतरत नाही; आणि म्हणून बुद्ध, ख्रिस्त, मार्क्स, लेनिन, गांधी यांच्यासारख्या युगप्रवर्तक महापुरुषांच्या मालिकेंत त्यांना स्थान नाही, याबद्दल मुळीच वाद नाही. परंतु त्याना जें सत्य व हितावह वाटलें, तें त्यानी स्वतःच्या सदसद्विवेकबुद्धीशीं प्रतारणा न करतां निर्भीडपणें बोलून दाखविलें, आणि तदनुसार आचरण ठेवण्याचा कसोशीने प्रयत्न केला. दोन वेळा बहिष्कार सोसला; लोकनिंदेचे आघात सहन केले, तरी देखील आपला मतप्रचार अव्याहत चालू ठेवला. "The spirit indeed is willing but the flesh is weak." हा न्याय थोराभोठ्यांच्या चरित्रालाहि लागू आहेच. तेव्हा अेखाददुसऱ्या प्रसंगीं मनुष्य तत्त्वच्युत झाला, म्हणजे तेवढ्यावरूनच त्याचीं सर्व मतें अप्रामाणिकपणाचीं आहेत असें मानणें हें मनुष्य स्वभावाच्या अज्ञानाचेंच निदर्शक होय.

———

# रद्दींतील रत्नें



## गटारयंत्र

[हा शब्दप्रयोग फार जुना आहे. पुण्यांत बुधवारांत गटारावरच्या फरश्यांवर बसून ज्या चकाटया पिटल्या जात त्या शहरांत सर्वत्र तारायंत्राप्रमाणे फैलावत. म्हणून अशा बातमीस गटारबातमी किंवा गटारयंत्र म्हणत याचा नमुना पाहा. —संग्राहक.]

"त्यांची (सर्व तऱ्हेच्या लोकांची) अेकमेकाची गांठ पडण्याची जागा बुधवारांत भांग्या मारुतीजवळ होती व अद्यापही आहे. तेथें सर्व भिक्षुकांच्या टोळयांच्या टोळ्या संध्याकाळीं गडत पडायाच्या वेळेस बसलेल्या दृष्टीस पडतात. या जाग्यास भटचावडी असें म्हणतात. आलिकडे तेथें सडका झाल्याकारणानें गटारें झालीं आहेत. म्हणून त्या जाग्यास गटार म्हणतात व आतां आठ दहावर्षांपासून म्हणजे तारायंत्र सुरू झाल्यापासून त्या जाग्यास गटारी यंत्र असें म्हणतात. कोणी कांहीं बातमी सांगितली व ती संभवण्यासारखी नसली म्हणजे गटारी बातमी असें म्हणतात, म्हणजे त्या बातमींत कांहीं अर्थ नाहीं. या गटारावर भट जमून बसतात तेथें त्यांचें संभाषण चालतें त्याचा मासला येणेंप्रमाणें :—

रामचद्र भट, विनायक भट, हर भट, त्रिंबक भट.

विनायक भट बोलतो, कां त्रिंबक भट, आज चागले मनगट बुडे इतकें होतें ना? आंतडीं मांखली ना?

त्रिं०— होय, होतें. बाबा, मनगट बुडण्यासी काय करावें, पण घरच्या माणसांस मनगट बाजवावें लागतें.

वि०— का टका नव्हता कां?

त्रिं०— टका कसला? हजामत.

वि०— जेवणास तरी (दोन्ही हात पालथे करून) यथास्थित होतें काय?

त्रिं०— कसले चार पाचुंदे पोळ्या खाल्या.

रा०— अरे, आज ऐकलेंस काय? त्या गोविंद भट विन सोन भट याच्या मुलास ५०० रुपयांची चाकरी लागली.

ह०— मिळाली तर आपल्याला काय करावयाचें आहे.

रा०— अहो, आपल्याला काय करावयाचें; आताचे सरकारास आपण शहाणे म्हणतो आणि हे इतकाले पगार कशाकरितां देतात. पहा, येवढे आपले नाना फडणीस शहाणे पण त्यांस सरकारांतून तीनशें रुपये वर्षास तैनात होती. पण आतां बघावें तें विलक्षणच. आज सभा कोठें आहे?

त्रिं०— त्यांस आवदानें केवढाली मिळत होती. हें तुम्हास माहित आहे कीं तो नऊ कोट नारायण होता.

ह०— सभा कोठें आहे?

त्रिं०— उद्याचें मला आमंत्रण आहे.

ह०— कसलें, श्राद्धाचें किंवा सभेचें?

त्रिं०— गोविंद भटाकडे तें काम आहे.

ह०— ऐकलेस कां, रूमग्राम कलकत्त्याकडचा त्याने लढाई आरंभिली.

त्रिं०—- रूमशाम बेट आहे. कलकत्त्याकडेस कोठलें, तें तर दक्षिणेस.

ह०—- छुट, दक्षिणेस समुद्र तरी आहे काय ?

त्रिं०—- तबकीर काढा, चला आपण जाऊं.

ह०—- अरे, गोविंद भटाचा मुलगा मुंबईस परिक्षेंत उतरला.

त्रिं०—- तो तर फार हुषार, आतांच्या परीक्षेंत उतरणें म्हणजे पूर्वीप्रमाणें वशिल्यानें होत नाहीं.

ह०—मग परीक्षा कशी घेतात ?

त्रिं०—अरे, घेतो कोण ! तेथें एक यंत्र आहे. त्याचें नाव युनिटी (युनिवरसिटी) त्यांतून शब्द पडतात व तेथें एक साहेब बसलेला असतो त्याच्या देखत ते शब्द वाचले म्हणजे तो साहेब म्हणतो कीं उतरला, अशी परीक्षा कठीण आहे.

ह०— मला वाटतें कीं जसें तारायंत्र आहे तसें युनिटी यंत्र आहे."

—पुणें शहरचें वर्णन (१८६८)

## पुणें नेटिव्ह जनरल लायब्ररी

[आज जोमांत असणाऱ्या पुणें नगर वाचनालयासंबंधी पुढील जुनी बातमी चमत्कारिक तर खरीच, पण उद्बोधकहि आहे. इंदुप्रकाशाने व्यवस्थापक मंडळास दिलेला दोष व पुणेंकर साहित्यिकांना दिलेला टोला त्या वेळीं योग्यच असेल.]

"चमत्कारिक बातमी— पुण्याच्या डेक्कन हेरल्ड पत्रावरून कळते कीं, पैशाच्या कमताईमुळें पुण्याची नेटिव जनरल लायब्ररी आगस्ट महिन्यापासून बंद करावी असें त्यावरील कमिटीनें ठराव केला. तेथील बुकें सामान चीजवस्त विकून देणेदारांचें देणें देऊन बाकी राहील ती हल्लींच्या वर्गणीदारानीं वाटून घ्यावें असेंही ठरविलें आहे. ही चमत्कारिक बातमी पुण्याच्या लायब्ररीविषयीं ऐकून आम्हास मोठें आश्चर्य वाटतें. व्यवस्थापक मंडळी व तिचे सेक्रेटरी यांनीं इमानें इतबारें मन लावून काम न केल्याचा हा दुःखकर परिणाम आहे असें आम्हांस वाटतें. पुण्यासारख्या योग्यतेच्या शहरास लायब्ररी असणें अवश्य असून असलेली आता नाहींशी होते तेव्हां आतां हें केवढें पुणेकर विद्वज्जन मंडळीस भूषणास्पद हें त्याचें त्यांनींच विचार करून पाहिलें असतें तर बरें होतें."

—इंदुप्रकाश २ आगस्ट १८६९

---

# वऱ्हाडी मराठींतील म्हणी

(१) घेनं नं देनं, पोकय धिङ्गानं (घेणं ना देणं, पोकळ धिङ्गाणा).

(२) नेमाधर्मांच्या नं वढाय जल्माच्या (नेमाधर्माच्या न् ओढाळ जन्माच्या).

(३) तोण्डाले लागली गोळी नं मांजर शिकं तोळे (तोण्डाला लागली गोडी, अन् मांजर शिंकें तोडी).

(४) नवल लागलं नं ढेकाऊ फुटलं (नवल झालं न् ढेकूळ फुटलं) !

(५) गोटची तऱ्हा नं आयक रे म्हातारा (गोष्टीची तऱ्हा न् ऐक रे म्हाताऱ्या) !

(६) नकटी दये नं चकटी पीठ पाहे (नकटी दळे न् चकटी पीठ पाही).

(७) नवल झालं नं चुल्याले (चुलीला) हींव आलं.

श्रीराम अत्तरदे

# गाडीचा रुपया

पेशवेकालीन चलनें अगर चलनांच्या संज्ञा प्रत्येक जुन्या कागदाबरोबर नवीन नवी न दृष्टीस पडतात आणि पूर्वीच्या घोटाळ्यांत अधिकच भर पडते. वेळणेश्वरच्या कुळकरणी दप्तरांत आढळलेल्या नवीन प्रकारच्या चलनांचा निर्देश मीं "चापेकर" पुस्तकांत केला आहे; त्यांत अेका रुपयाचें नांव अथवा वर्णन "गाडीचा" असें आहे (पृ.१८). दप्तरांतील हा कागद इ. स. १८३६ चा आहे. दुसऱ्या अेका इ. स. १८२६ च्या कागदांत सात आण्यांचा खुर्दा "चाकीचा" म्हणून म्हटलें आहे. ह्या गाडीच्या रुपयाचा अुल्लेख आजपर्यंत पाहिलेल्या जमाखर्चाच्या वह्यांत मला अन्यत्र आढळला नाही.

गाडीचा रुपया म्हणण्याचें कारण त्या रुपयावर गाडीचें चित्र असावें असें तर्कानें देता येअील. परंतु अशा प्रकारचा रुपया नाणकसंग्रहांत असल्याचें माझ्या पाहण्यांत नाही. हा रुपया सरकारतिजोरींत चालत असे हें त्याच्या "१ रु. पोतेचाल गाडीचा" अशा वर्णनावरून स्पष्ट दिसतें.

हा गाडीचा रुपया लोकांच्या वापरांत पुष्कळच असला पाहिजे. कारण रुपयाच्या अैवजीं नुसता गाडी शब्द वापरण्याचा प्रघात पडलेला होता. गाडीचा अर्थ रुपया असा कोणत्याहि कोशांत दिलेला नाही. माझ्याजवळ— बहुधा वेळणेश्वर दप्तरांतील— अेक कागद आहे. त्यांत गाडीच्या रुपयाचा अुल्लेख अनेक ठिकाणीं केलेला आहे. "यादी बाळंभट आपटे खरच शके १७८६ रक्ताक्षी नाम संवत्सरे चैत्र शु १ गुरुवार" असें ह्या कागदाचें शीर्षक आहे. ह्या यादींत गाडीच्या रुपयांच्या रकमा आहेत त्यांतील कांही येथे देत आहें.

| रु. | |
|---|---|
| ४८= | तेल खरेदी गाडी चार रुपये चवल. |
| १ | अनुष्ठान संगमेश्वरास केलें सर्वांनी त्याची सांगतेस गाडी वै॥ वद्य २ सोमवार. |
| १। | पंचेची जोडी लक्षुमण साळी याजकडील आठ हाती गाडी वै॥ वद्य २ नेसण्यास प्रारंभ जेष्ठ. |
| १ | संता कामरेकर तूप दर पावणेदोन मापें जेष्ठ शु ५ गाडी. |
| १।= | महालक्षुमीस करवीरास नैवेद्य केला जेष्ठ वद्य ५ शुकुरवार गाडी कीरकोळ चवल दक्षणा चार. |
| २ | पानें पत्रावळीचीं आटका घेतला गाडी दोन रुपये जेष्ठ वद्य ५. |
| ३ | तांब्डी......आस्तर व हाशाची गजनी मिळून गाडी रुपये तीन मीती जेष्ठ वद्य १० रविवार. |
| १८≡ | आलेपाकला सदाशिवपंत रेटरास गाडी अेक रुपया तीन आणे आषाढ शु ५. |
| १ | संता दूधवालीस दुधाचे गाडी वद्य ९. |
| ९८≡ | श्रीवापाचा हिशेब आषाढ अखेरपर्यंत फडशा केला गाडी. |
| ॥• | मोरभट श्रीधोरेचे मुलाचे हातांत गाडी आठ आणे दील्हे आश्वीन शु १. |
| १ | चीमा सुअीणीला गाडी दील्हा. |
| ४ | ओवाळणी आकास घातली भिवमी व काशीआकास दोघानी दोन अेकूण चार गाडी कार्तीक शु २. |

ना. गो. चापेकर

---

टीप—जेथे गाडीचा रुपया नाही तेथे नुसतेंच रुपया अेवढें म्हटलें आहे.

# महाभारत व आर्याछंद

प्रत्युपकुर्वन्बह्वपि न भाति पूर्वोपकारिणा तुल्यः।
अेकः करोति हि कृते, निष्कारणमेव कुरुतेऽन्यः॥ १३८.८२

अर्थ—अुपकृत मनुष्याने कितीहि अुपकर्त्यांवर अुलट अुपकार केला तरी त्याला अुपकर्त्यांची सर येत नाही. कारण अुपकर्ता, दुसऱ्याचें हित करण्याचें बंधन त्यावर नसतांच अुपकार करितो; पण त्याची फेड करणारा केवळ अेक प्रकारची देवघेव करितो.

वरील आर्या महाभारतांत आहे. आर्याछंद जरी संस्कृत छंदःशास्त्रांत सांगितलें आहे तरी त्याचा प्रयोग महाभारत, रामायण यात सहसा आढळत नाही. तरी येथे शंका अशी की संपूर्ण अध्यायांत मध्येच आढळणारी ही आर्या प्रक्षिप्त असेल काय, याचा विद्वानांनी विचार करावा.

गो. कृ. मोडक

---

## पत्रिकेच्या ५६ अंकांतील श्री. ना. ग. जोशी यांच्या लेखांतील शंकांस उत्तर

१ शेफालिका— पारिजातक (Nyctanthes Arbor-tristis, Linnaeus) यालाच हरसिंगार (हरशृंगार), शेवळी, शेफाली अशीं नांवें आहेत. हा वृक्ष मुंबअी अिलाख्यांत कोठेहि आपोआप अुगवलेला आढळत नाही. सातपुड्यांत, अरवली पर्वतांत, हिमालयाच्या पायथ्याची तराअी, मध्यहिंदुस्थान (१-३००० फूट), बुंदेलखंड, गंगेचें खोरें, अयोध्या प्रांत, छोटा नागपूर अित्यादि भागांत हा जंगलात सापडतो.

बंगाली लोक सर्वत्र याला 'शेफालिका' या नावाने ओळखतात. हिंदुस्थानी लोक 'हरसिंगार' म्हणतात.

२ नीप— कदम्ब. या नांवाने दोन निराळ्या जातींचे वृक्ष ओळखिले जातात. (१) Anthocephalus Cadamba, Miquel हा आहे. हा वृक्ष मुंबअी अिलाख्यांत क्वचित् स्वाभाविकपणें अुगवलेला सापडतो. बहुधा गांवाच्या सभोवतींच आढळतो. याचा प्रसार कोंकणाशिवाय कानडा जिल्हा, हिंदुस्थानांतील अितर भाग (पुष्कळदा लावलेला), सीलोन, सुमात्रा, बोर्निओ वगैरे देशांत आहे. यालाच 'नीव' म्हणतात.

(२) Mitragyna parvifolia, Korth. हा वृक्ष मुंबअी अिलाख्यांतील जंगलांत सार्वत्रिक आहे. कोकण, मावळ, दक्षिणेंतील जिल्हे, बडोदें, गुजरात, कानडा, सीलोन अित्यादि भागांत याचा प्रसार आहे.

हे दोन्ही मोठे वृक्ष असून त्यापैकी एकहि पाणथळ जमिनींत वाढत नाही.

(३) अिंगुदी— हिंगु. हिंगणबेट (Balanites, Roxburghii Planchon) या झाडाचा प्रसार मुंबअी अिलाख्यातील दक्षिणेंतील जिल्हे, नगर, धारवाड, द. महाराष्ट्र, गुजरात अित्यादि भागात असून हिंदुस्थानातील कोरड्या हवेच्या भागात सार्वत्रिक आहे. याचीं फळें १–२ अिंच लांब असतात. त्यातील चिकट बलकाचाच उपयोग जटा वळविण्याकडे करितात असें नमूद आहे.

'अिंगुदी'पासून 'अुंडी' हा शब्द भाषाशास्त्र्यांनी सिद्ध करीत बसण्याची मुळीच जरूरी नाही.

शं. पु. आघारकर

# स्त्रियांच्या म्हणी

(५६ व्या अंकावरून पुढे)

पुढील म्हणी देण्यापूर्वी आज मला म. सा. पत्रिकेच्या वाचकांस अेक खेदकारक वृत्त निवेदण्याचा प्रसंग आला आहे. ज्यांच्या तोंडून मी म्हणी अेकत असें, त्या माझ्या ज्येष्ठ भगिनी श्रीमती बाळूताअी नवरे ह्या १४ डिसेंबर १९४० या दिवशीं हृदयविकाराने दिवंगत झाल्या. पत्रिकेंत प्रसिद्ध झालेल्या बऱ्याचशा म्हणींचें श्रेय त्यांच्या बहुश्रुतपणालाच दिलें पाहिजे. बाळूताअी म्हणजे म्हणी, गाणीं, कहाण्या, ओव्या याचा चालताबोलता संग्रहच होता, आणि त्यांत भर टाकण्याची त्यांना नित्याची हौस होती. त्याचा व्यवसाय परिचारिकेचा असल्याने सर्व जातींच्या व धर्मांच्या स्त्रियांशीं त्यांचा संबंध येत असे. नवीन म्हण अैकली की त्यांनी ती लक्षांत ठेवावी आणि आम्हांला साक्षेपाने सांगावी. मी म्हणींचा शोकी असल्याने ती टिपून ठेवावी. सुमारें १२ वर्षांपूर्वी म. सा. पत्रिकेचे भूतपूर्व संपादक श्री. नानासाहेब चापेकर सोलापुरीं आले असतां त्यांनी तो संग्रह यदृच्छेने माझ्या टेबलावर ठेवलेल्या वहींत पाहिला आणि त्यांच्याच सांगण्यावरून मी पत्रिकेंत हप्त्याहप्त्याने म्हणी देअूं लागलों.

श्री. बाळूताअी ह्या बडोदें व नगर येथील साहित्यसंमेलनास सोलापूरच्या स्त्रीप्रतिनिधि म्हणून आलेल्या होत्या.

(५१७) काय बाअी मायेची, तोंड झाकून खायची.
(५१८) अरे माझ्या भूपणा, कुठे काही दिसेना.
(५१९) शेतात बाड (बाटुक), गावात आड (मुलें).
(५२०) गांवांत झिपरी, अन् शेतात विपरी (बिन दाण्याचीं कणसें).
(५२१) साळ्यांची गाय, माळ्याची मका.
(५२२) मला पाहा, शेंदूरफुलें वाहा; घर पाहा, थुंकून जा.
(५२३) दारात घाण घरात घाण, माझी बायको गोरीपान.
(५२४) शेटजींचें देणें, सवाअी अुणें.

नीळकंठ शंकर नवरे

---

# मांजर-शब्दाची व्युत्पत्ति

## (व्युत्पत्तींत व्यवहारज्ञानाचा संग्रह)

१ प्रास्ताविक— पत्रिकेच्या गेल्या अंकांत दिलेल्या न्हावीशब्दाच्या व्युत्पत्ती- कडे बऱ्याच विद्वानांचें लक्ष गेलेलें पाहून आणखी शब्दांच्या व्युत्पत्ति दिल्यास बरें असें दिसतें. अशापैकी अेक विद्वान् रा. प्र. धों. कानिटकर यांनी कांही सूचना केल्या आहेत. त्यांत अेक अशी की शब्दरूपांत होणारा बदल ज्या सूत्रानुसार होतो तीं सूत्रें व्युत्पत्ति- चर्चेत द्यावीं. या गोष्टीशीं माझें वि-मत आहे. सूत्र अुदाहरणावर अधिष्ठित असतें. अर्थात् अशा अुदाहरणांसच सूत्राहून अधिक महत्त्व. या दृष्टीने मी प्रायः सूत्र न देतां, त्यास आधार- भूत असलेलीं अुदाहरणेंच देतों. प्रस्तुतांत न्हावी शब्दाच्या व्युत्पत्तीस आधार म्हणून रा. कानिटकर (१) नोणः सर्वत्र (२) श्न...स्न...क्ष्णां...ण्हः हीं सूत्रें म्या देणें योग्य होतें, असें लिहितात. हें लिहिणें सदोष आहे. सूत्र १ प्रमाणें न-चा ण् झाला पाहिजे. पण मराठींत नापित-मधील न् न्हावी यांत तसाच राहतो, त्याचा ण् होत नाही. तसेंच सूत्र २ सांगतें की स्न-चा ण्ह होतो. पण हें सूत्रहि येथे लागत नाही. कारण संस्कृत नापित हा शब्द न्हावी-

चें मूळ असल्याने,- व तें रा. कानिटकर यांसहि संमत आहे.-सूत्र २ मध्ये असलेला ल्ल नापित-मध्ये नाही. अर्थात् ज्याचा ण्ह व्हावयाचा तो ल्ल जर नापित-मध्ये नाही, तर हें सूत्र येथे कसें लागणार? यावरून उघड आहे की प्राकृत शब्दांची व्युत्पत्ति सांगणारी सूत्रें जशींच्या तशीं मराठी व्युत्पत्तीस साधक होत नाहीत. म्हणूनच मी या सूत्रापेक्षा अुदाहरणांस अधिक महत्त्व देतों. प्रस्तुतात या दोन्ही सूत्रांनी जें कार्य होत नाही तें कार्य प्र-नाल (= प्रणाल)-पन्हाळ या अुदाहरणाने अधिक समर्पक रीतीने व साक्षात् सिद्ध होतें. यावरून मला वाटतें, सूत्राकडे न वळतां अुदाहरणें देणें अधिक अुपयुक्त आहे, हें रा. कानिटकर यांस पटेल. अशाच अुदाहरणाचा अुपयोग माजर या शब्दाच्या व्युत्पत्तीत खाली केला आहे.

२ मांजर हें रूप— शुल्ब सुंभ, कूर्च कुंचा या शब्दांतल्याप्रमाणें जोडाक्षरांतील पूर्व-घटकाचा (रेफाचा) अनुस्वार होअून मार्जार-चें मांजार असें रूप प्राप्त होतें. दोन दीर्घ स्वर लागोपाठ येत असल्यास त्यांतील दुसरा स्वर ऱ्हस्व करण्याकडे मराठीची प्रवृत्ति आहे; मागासलें याचें रूप मागसलें हीच प्रवृत्ति दर्शवितें. या प्रवृत्तीनुसार मांजार-चें मांजर असें रूप होतें.

३ अर्थविचार— वरीलप्रमाणे मांजर हें रूप मिळालें. पण मुळांतच मार्जार हा शब्द विवक्षित प्राण्यास का लावण्यांत आला असावा? एतदर्थ पुढील गोष्टीचा विचार करूं.

यात माजराची संवय दिसून येईल; व तिची नोंद करणारा मार्जार हा शब्द त्या प्राण्यास योग्य आहे हें दिसून येईल.

४ आजीबाअींचा अनुभव— स्वयंपाक चालू असतांना घरांतील मांजर यांत तोंड घाल, त्यांत तोंड घाल, हें खा, तें लवंड अशा रीतीने स्वयंपाक करणारास वारंवार फार त्रास देतें. यांतून सुटका कशी करावी? अनुभवी आजीबाअी एक तुपाचा थेंब घेऊन मांजराच्या नाकावर उडवितात. त्याचा वास नाकावर स्थिर होतो. त्या वासावरून अनुमित होणारें तूप मिळविण्यासाठी मांजर नाकावरून आपली डावली फिरविते व तिचा वास घेतें. पण या कृत्यात वासाहून अधिक, साक्षात् तुपाची प्राप्ति त्यास लाभत नाहीं. तरी पण ही प्राप्ति होअील अशा आशेने डावली नाकारून फिरविणें व तिचा वास घेणें हें काम अेकीकडे जाअून मांजर सारखें बराच वेळ करीत राहतें. अर्थात् अितका वेळ माजराच्या त्रासापासून आजीबाअींची सुटका होते. मांजराच्या नाकावर तुपाचा थेंब अुडविल्यास, डावलीने नाक घासणें व ती डावली हुंगणें हें सारखें करीत राहिलेल्या मांजराचें दृश्य कोणासही पाहता येअील. ही मांजराची खोड मार्जार या शब्दांत समाविष्ट आहे.

५ मार्जार-ची व्युत्पत्ति-मृज् (घासणें) या धातूस आर प्रत्यय लागून आणि ऋ-ची वृद्धि होअून, मृज्-पासून मार्जार शब्द झाला आहे. त्याचा अर्थ घासणारा. वरील परिच्छेदांतील मांजराची खोड पाहता ही मार्जार संज्ञा किती समर्पक आहे व तीवरून वरील मांजराची खोड जिज्ञासूंस कशी सूचित होतें, हें दिसून येअील.

६ निगमन— मृज् + आर = मार्जार. याचा अर्थ 'घासणारा.' यांतील रेफाचा अनुस्वार होअून मांजार आणि दुसरा दीर्घ स्वर ऱ्हस्व होऊन मांजर हा शब्द सिद्ध झाला आहे. यावरून तुपाचा वास घेअून तें मिळण्याच्या आशेने आपल्या डावलीने नाक घाशीत राहण्याची माजराची खोड सूचित होते. शिवाय या ज्ञानाने स्वयंपाकास होणारा मांजराचा त्रासहि चुकविण्याचा अुपाय आपणांस कळतो.

गोविंद कृष्ण मोडक

# परीक्षणें

## धर्म-समाजशास्त्र

१ धर्मनिर्णयमंडलमाला— संध्या : मूल्य ·॥· आणा; सामुदायिक प्रार्थना : मूल्य १ आणा; अुपनयन प्रयोग : मूल्य २ आणे; विवाहप्रयोग : मूल्य ३ आणे; अन्त्येष्टिप्रयोग : मूल्य ३ आणे; श्राद्धप्रयोग : मूल्य २ आणे. तत्त्वनिष्ठ परिवर्तनवादी परिषदेच्या चार अधिवेशनांचा संक्षिप्त वृत्तान्त; मूल्य ४ आणे. प्रकाशकः– र. गो. कोकजे, धर्मनिर्णयमंडळ-कार्यालय, लोणावळें, पुणें.

२ जैन धर्मावरील आक्षिप्त विधानें व त्यांचें निरसन— ले. रा. ने. शहा; प्रका. बाळासाहेब पाटील; मूल्य ४ आणे

३ खानदेश वऱ्हाडांतील माध्यंदिन शाखा प्रकरण– ले. व प्रका. शं. गो. जोशी, नवीपेठ, जळगाव; मूल्य १ रु.

अुपर्युक्त धर्मनिर्णयमंडलमालेच्या सात पुस्तकांपैकी संक्षिप्त वृत्तान्त आणि अितर पुस्तकांच्या पूज्यपाद केवलानंदस्वामींनी लिहिलेल्या प्रस्तावना काळजीपूर्वक वाचून पाहिल्या म्हणजे धर्मशास्त्रांशीं परिचय नसलेल्या सर्वसाधारण व्यक्तीला असा बोध होतो की, आज हिंदु धर्माच्या रुढ अगर लौकिक आचार, ग्रांथिक धर्म आणि तात्त्विक धर्म अशा तीन परंपरा आहेत. लौकिक आचारांत अशा कांही रूढी सांपडतील की, त्या ग्रांथिक धर्मांत अंतर्भूत नाहीत, तर अुलट कांही धर्म ग्रांथिक आचारांत अंतर्भूत असून व्यवहारात रूढ नाहीत (अुदाहरणार्थ स्त्रीशूद्रांचें अुपनयन). त्याप्रमाणेंच ग्रांथिक धर्म तात्त्विक असतीलच असें नव्हे. (या ग्रंथांच्या मताने अस्पृश्यता, सगोत्रविवाहनिषेध वगैरे.) अशा तीन परंपरा दिसूं लागल्या कारणानें शुद्ध हिंदु धर्म कोणता आणि त्याचे विहित आचार कोणते, याची मीमांसा यथातथ्याने व्हावयास पाहिजे यांत मुळींच शंका नाही.

अशा तऱ्हेची मीमांसा करणारे दोन पक्ष हिंदुस्थानांत अस्तित्वांत आहेत, असाहि पण या ग्रंथांच्या वाचनानेच बोध होतो. अेक पक्ष म्हणजे सनातनी किंवा अपरिवर्तनवादी, दुसरा पक्ष म्हणजे तत्त्वनिष्ठ परिवर्तनवादी. त्यांपैकी पहिला जो सनातनी पक्ष त्याला परिस्थितीचें ज्ञान नाही (संक्षिप्त वृत्तांत पा. ३), धर्मशास्त्राचे अर्थ कसे लावावे याची पद्धति माहीत नाही, अगर त्याने घेतलेली पद्धति चूक आहे (संक्षिप्त वृत्तात पा. ५) तो पक्ष अत्यंत आग्रही आहे, (संक्षिप्त वृत्तान्त पा. १९) तो पक्ष सुधारकांच्या विरुद्ध असलेलीं धर्मशास्त्रांतील वचनें पुढे आणून सुधारकांचीं वचनें दडपून टाकतो. (संक्षिप्त वृत्तान्त पा. २) अशा तऱ्हेने हा पक्ष धर्मशास्त्रांत मार्गदर्शन करण्याला अर्थात् नालायक आहे. अुलट जो दुसरा पक्ष आहे त्याला परिस्थितीचें ज्ञान आहे, धर्मनिर्णयाची अचूक पद्धति माहिती आहे, तो पक्ष अनाग्रही आहे, आणि तो पक्ष सुधारकांची वचनें दडपून टाकीत नाही. अलीकडे धर्मसुधारणेच्या काळांत, पंडित अीश्वरचंद्र विद्यासागरांपासून तर्कतीर्थ रघुनाथशास्त्री कोकजे यांच्यापर्यंत, जे कोणी धर्मसुधारक झाले त्या सर्वांचा अंतर्भाव या पक्षात होतो, असें या पक्षाचें म्हणणें आहे. अशा पक्षाने ही ग्रंथमाला निर्माण केलेली आहे.

म. सा. प. (१४-१-९)

अर्थात् अशा तऱ्हेच्या ग्रंथमालेंत सर्वसाधारण सुशिक्षितांचें समाधान करण्यासारखे सिद्धान्त असणार याबद्दल मुळीच शंका घेण्याचें कारण नाही. अुदाहरणार्थ, 'धर्म हा समाजाकरिता आहे, समाज हा धर्माकरिता नाही. देशकालसापेक्ष आचारांचा तोल बदलणें अपरिहार्य असतें (डॉ. कुर्तकोटी, संक्षिप्त वृत्तान्त पा. ९). येथे समाज हा धर्माचा नियंत्रक आहे, धर्म हा समाजावर नियंत्रक नाही असें दिसतें. आपण त्या पक्षाच्या अवलोकनार्थ आणखी कांही सिद्धान्त लिहूं. नीति ही समाजाकरिता आहे, समाज हा नीतीकरिता नव्हे. शिस्त ही समाजाकरिता आहे, समाज हा शिस्तीकरिता नव्हे. अर्थशास्त्र हें समाजाकरिता आहे, समाज हा अर्थशास्त्राकरिता नव्हे, अित्यादि अित्यादि. अर्थात् येथे समाज या शब्दाने प्रत्यक्ष अर्थ काय घ्यावयाचा हा प्रश्नच आहे. सर्वच समाज अेखादी क्रिया कधीच करीत नसतो. अुदाहरणार्थ, व्यभिचार, समाजांतील कांही भाग व्यभिचार करतो, समजा तोच भाग समाजात बहुसंख्य होअूं लागला तर, व्यभिचार हा गुन्हा मानावा ह्या नियमाकरिता समाज नसून समाजाकरिता हा नियम आहे या तत्त्वज्ञानानुरोधाने, व्यभिचार हा गुन्हा आहे असें म्हणणारा कायदा रद्द करावयास पाहिजे (यः येन स्वनुष्ठातुं शक्यते स धर्मः). असो.

पुन्हा लौकिक रूढींपैकी कांही रूढी त्याज्य, कांही अनवश्यक, कांही धर्मशास्त्रविरोधी असें दाखविण्याकरिता ज्या तर्कशास्त्राचा आधार घेतला आहे, त्याने सर्वसाधारण सुशिक्षितांचें समाधान होअील असें मानावें तर तसेंहि दिसत नाही. अुदाहरणार्थ, खऱ्या अर्थाने अुपनयन-संस्कार आज अनवश्यक आहे, ही गोष्ट या पक्षाला मान्य दिसते (अुपनयनसंस्कार, प्रस्तावना पा. १). परंतु त्या पक्षाचें म्हणणें असें की, 'विद्येबरोबर मुलास चांगली शिस्त लागावी म्हणून योग्य ते नियम घालून देणें हाहि या संस्काराचा प्रमुख अुद्देश आहे' (प्रस्तावना पा. १). हा अुद्देश चांगला आहे, परंतु त्याचा संस्काराशीं संबंध काय याचा खुलासा होत नाही. अुपनयन केलें तर नियम सांगतां येतात आणि शिस्त लागते; अुपनयन केलें नाही तर नियम सांगतां येत नाहीत आणि शिस्त लागत नाही, असा साहचर्यनियम नजरेस येत नाही. अनुपनीतांत शिस्त दिसून येते आणि अुपनीतांत शिस्त दिसून येत नाही, म्हणून अुपनयन हा निरुपयोगी संस्कार आहे, असा पक्ष मांडल्यास त्याचा परिहार कसा करावा, हें ह्या प्रस्तावनेवरून समजलें असतें तर बरें झालें असतें. हेंच तर्कशास्त्र अितर सर्व संस्कारांना लागू आहे. आम्ही येथे अितकेंच विधान करून ठेवतों की अुपनयन, विवाह, अन्त्येष्टि आणि श्राद्ध यांपैकी कोणत्याहि संस्काराची जरूरी निव्वळ बौद्धिक (बुद्धिः स्मृतिः अनुभवः च) आणि अुपयुक्ततावादाच्या भूमिकेवरून सिद्ध करणें अशक्य आहे. त्यामुळे ग्राह्य रूढी आणि त्याज्य रूढी ठरविण्याच्या भानगडींत पडणें थोडेंसें धाडसाचें आहे. पुन्हा धर्म हा समाजाकरिता असल्याकारणाने समाजाने जी रूढी घेतली, तिला त्याज्य म्हणण्याचा खरोखर कोणासहि अधिकार कसा येअील !

या ग्रंथमालेंतील पुष्कळसा तपशील परीक्षणीय आहे. परंतु स्थलाभावास्तव तसें करता येत नाही. अगदीच धर्महीनतेकडे जी प्रवृत्ति सुशिक्षित समाजात वाढत चालली आहे त्या दृष्टीने विचार केल्यास ही माला अत्यंत अुपयुक्त होअील. परंतु जोपर्यंत स्वतःला सुशिक्षित म्हणवून घेणारा वर्ग बुद्धीचें सामर्थ्य असून देखील बरटूँड रसेल, हॅवेलाक अेलिस, मार्क्स, लास्की यांच्याच जोडीने कणाद, गौतम, वात्स्यायन, मनु, महाभारत वाचावयास तयार होत नाही, तोपर्यंत अशा माला देखील त्या वर्गाला धर्माचें शुद्ध ज्ञान करून देअूं शकतील असें मानण्याला कांहीहि पुरावा नाही.

(२) शालेय पुस्तकांत वेगवेगळ्या धर्मासंबंधी गैरसमज पसरविणारीं किती तरी विधानें येतात ही गोष्ट सर्वश्रुत आहे. अशा तऱ्हेचीं जैन धर्माबद्दलचीं जीं विधानें, रा. गोविंद सखाराम देसाओी, अेन्. के. भावे, दे. भ. लोखंडे (नगर) वगैरे ग्रंथकारांनी केलेलीं आहेत, त्यांचें निराकरण करून जैन धर्माचें स्वतंत्रत्व आणि प्राचीनत्व रा. शहा यांनी दाखविलें आहे. हिंदुधर्माबद्दल अशी आस्था कोणी दाखवील का?

(३) वऱ्हाड खानदेशात गैरसमज, अज्ञान अित्यादि कारणांमुळे माध्यंदिन शाखीय ब्राह्मणांमध्ये जे तट आज सरासरी दोनशे वर्षे पडलेले आहेत, तसे तट पाडण्याला धार्मिक अगर व्यावहारिक असें काहीहि कारण नाही, असें सप्रमाण या ग्रंथांत दाखविलें आहे. त्यापासून ते ब्राह्मण योग्य तो बोध घेतीलच. अितरानी देखील अजून सर्वसाधारण समाजांत धार्मिक कल्पनांचें किती प्राबल्य आहे आणि अशा विषयांत निर्णय घेण्याकरिता समाज अजून श्रीमच्छंकराचार्यांकडे धाव घेतो, हा मुद्दा बरोबर समजावून घेण्याकरिता हा ग्रंथ अेकदा नजरेखाली घालावा. यांतील प्रमाणपद्धती युक्त आहे. अेकदरींत मुख्यतः हा ग्रंथ नवीनांनी वाचून पाहावा.

---

## अितिहास

१ **सरदेसाअी स्मारक ग्रंथ** — संपादक : श्री. श्री. रा. टिकेकर; प्रका० श्री. के. भि. ढवळे, मुंबअी ४; मूल्य ४ रु.

२ *Saradesai Commemoration Volume* :— Editor- S. R. Tikekar; Publisher- K. B. Dhavale, Bombay 4; Price 6 Rs.

३ **शिव-चरित्र-वृत्त-संग्रह** — १ ला खंड: कानडी विभाग (अनुवादक— श्री. पां. भि. देसाअी, अेम्. अे.; १९३८; पृ. ७७+२०, किं. १ रु.)

४ **शिव-चरित्र-वृत्त-संग्रह** — २ रा खंड : फार्सी विभाग (संपादक— श्री. गणेश हरि खरे, क्यूरेटर, भा. अि. सं. मंडळ; १९३९, पृ. १२५+८; किं. १। रु.)

५ **शिव-चरित्र-साहित्य**, सहावा खंड; (संपादक— श्री. गणेश हरि खरे, क्यूरेटर, भा. अि. सं. मंडळ; १९३७; पृ. १४१+६; किं. १॥ रु.)

६ **अैतिहासिक फारसी साहित्य**, तृतीय खंड (संपादक— श्री. गणेश हरि खरे, क्यूरेटर, भा. अि. सं. मंडळ; १९३७; पृ. १३८+६, किं. १॥ रु.)

रा. ब. गोविंदराव सरदेसाअी यांच्या ७३ व्या वाढदिवसानिमित्त प्रसिद्ध करण्यांत आलेले हे दोन स्मारक ग्रंथ अनेक दृष्टींनी वाचनीय असे आहेत. महाराष्ट्रांतील व पंजाब, बंगाल व मद्रास या प्रांतांतीलहि अनेक लेखकांनी आपापल्या परीने लहान मोठे लेख पाठविल्यामुळें या ग्रंथांत विविधता साधलेली आहे. अर्थात् कथानकाच्या दृष्टीने त्यांतील लेखांचा सारांश थोडक्यात सांगतां येण्याजोगा नाही. शिवाय या ग्रंथांच्या प्रसिद्धीनंतर जवळ जवळ दोन वर्षांनी हा अभिप्राय लोकांपुढे येणार असल्यामुळे व मूळ ग्रंथ बहुतेकांच्या पाहण्यांत आला असल्यामुळे त्यांतील विवक्षित लेखांचा सविस्तर सारांश देण्याचें कारण नाही. पण महाराष्ट्रांतील व अितर प्रांतांतील अितिहासाभ्यासकांत अेक महत्त्वाचा भेद या प्रसंगाने स्पष्टपणें दिसून येतो, तो या ठिकाणीं सांगण्याजोगा आहे. बखरींचें प्रकाशन महाराष्ट्रांत ४०।५० वर्षांपूर्वी झालें व त्यानंतर गेल्या चाळीस वर्षांत अस्सल पत्रें छापणें व प्रकाशित साधनांच्या आधारें संकलनात्मक लेख लिहिणें, यावर महाराष्ट्रांतील लेखकांचा मुख्य भर आहे. पण अितर प्रांतांतील लेखक समकालीन

पत्रांचें प्रकाशन करीत नाहीत व अप्रकाशित साधनांचा आधार घेण्यांत आपलें कांही चुकत असेल अशी शंकाहि त्यांना अजून येत असल्याचें दिसत नाही. अुदाहरणार्थ, प्रो. पांडुरंगराव पिसुर्लेकर यांनी पोर्तुगीज लेख आधी छापण्यांत कित्येक वर्षें घालविलीं व आता त्या प्रकाशित साधनांच्या आधारावर ते आपले लेख लिहितात. याच्या अुलट डॉ. रघुवीरसिंह यांनी 'माळव्यांत मराठे' हा महत्त्वाचा लेख अप्रकाशित साधनांच्या आधारें लिहिला आहे. जयपूर दप्तरांतील जुन्या कागदांच्या नकला आपण करविल्या व त्या लिहिण्यास पाठपोठ तीन हजार बंद लागले व त्यांपैकी बहादूरशहाच्या कारकीर्दीतले बाराशे बंद वाचून त्याच्या आधारें अि. स. १७०७ ते १७१९ पर्यंतच्या शाहूच्या हालचाली व मराठ्यांचे माळव्यांतील दंगे यांची माहिती आपण देत आहों, असें सदर लेखक सांगतात; पण त्यांपैकी निवडक भाग मुळाबर-हुकूम प्रसिद्ध करण्याची खटपटने करीत नाहीत. यामुळे या लेखकाचें लिहिणें साधार आहे किंवा नाही, हें तपासून पाहण्याने वाचकांत चिकित्साबुद्धि वाढण्यास जो अवसर असतो, तो डॉ. रघुवीर यांच्या पद्धतीने राहत नाही. 'लेखक विद्वान् आहेत. तेव्हा त्यांनी साधनांचा योग्य अुपयोग करूनच लिहिलें असेल' असें मानण्याकडे वाचकांची स्वाभाविकच प्रवृत्ति असते, तिची वाढ अशा रीतीने होते. आणि भावी लेखकांना देखील या लेखांतील विधानें गृहीत धरून अितिहास रचण्याचा मोह पडतो. बखरकारांनी व ग्रँटूडफने कांही जुनें लिखाण पाहून आपल्या मताने विश्वसनीय म्हणून ठरला तोच मजकूर ग्रंथांत लिहिला; व त्यांचे आधार लोकांपुढे नसल्यामुळे ६०।७० वर्षें वाचक त्याचें लिहिणें डोळे मिटून खरें मानीत आले. पण अस्सल पत्रांच्या प्रकाशनाने तो मनु महाराष्ट्रापुरता पालटला. तथापि अितर प्रांतांत हा नवा मनु अद्याप अुगवलेला दिसत नाही. तेथें जुन्या बखरवजा अितिहासग्रंथांवरून नवे अितिहास लिहिण्यास हरकत नाही, हें मत अद्याप प्रचलित आहे. याचें प्रत्यंतर प्रस्तुत स्मारकग्रंथांत डॉ. सालेटोर यांच्या लेखांत सापडण्याजोगें आहे. या विद्वानांनी कानडी जुन्या ग्रंथांत महाराष्ट्राच्या अितिहासास अुपयोगी पडणारी सामग्री आहे असें सांगितलें आहे; व महाराष्ट्रांतील संशोधकांनी ती सामुग्री मराठींत प्रकाशित करण्यास प्रारंभहि केला आहे. पण या ग्रंथापेक्षा 'समकालीन पत्रांत अधिक विश्वसनीय अितिहास असतो; यासाठी कानडी पत्रें छापावीं' असा विचार या कानडी विद्वानाच्या मनांत आल्याचें कोठेहि दिसत नाही. यावरून अितर प्रांतांत अैतिहासिक पत्रांचें प्रकाशन करण्याचा धडा देखील महाराष्ट्रांतील लोकांनीच घालून दिल्याशिवाय तो सर्वत्र रूढ होणार नाही, असें म्हणण्यावांचून गत्यंतर नाही. तथापि यास अपवाद म्हणून अेक लेख आलेला आहे हें सांगणें आवश्यक आहे. डॉ. कानूनगो यांनी अेक हिंदी पोवाडा (पृ. ११५ ते ११८) या ग्रंथांत छापला असून त्यापुढे त्याचें अिंग्रजी रूपान्तर व टीपा जोडल्या आहेत. ही पद्धति चिकित्सक विचारसरणीची वाढ होण्यास अुपकारक आहे.

हा अभिप्राय येथेच थांबवण्यास हरकत नव्हती. पण या ग्रंथांत शेवटल्या लेखांत अेक महत्त्वाचा मुद्दा अुपस्थित केलेला असल्यामुळे त्याविषयी दोन शब्द लिहिले पाहिजेत. सर जदुनाथ सरकार यांनी रियासतकारांचें चरित्र देतांना पेशवेदप्तराच्या प्रकाशनाचा विषय अुल्लेखिलेला आहे; व स्मारकग्रंथांतील लेखांत औचित्याच्या दृष्टीने या प्रकाशनाबद्दल त्यांचे आभार मानणें योग्यहि आहे. पण या आभाराबरोबर सर जदुनाथ सरकार यांनी 'पेशवेदप्तराचें संपादन योग्य प्रकारें झालें नाही,' व 'आता त्याची सुधारलेली आवृत्ति काढणें अवश्य आहे,' हे मुद्दे अुपस्थित केलेले आहेत (पृ. ३०१). अलीकडे मुंबअीस व्याख्यान देतांना त्यांनी या मुद्यावर पुनः भर दिला आहे आणि हें

संपादन योग्य प्रकारें न होण्याचें कारण सांगतांना कौन्सिलांत 'बेजबाबदार अेम्. अेल्. सी.'नीं खोटीं विधानें व प्रश्नांचा मारा करून सरदेसाअी यांचें मन व्यग्र केलें व अेलियनेशन ऑफिसांत त्यांना दप्तरें पाहण्यास अनेक रीतींनी प्रतिबंध करण्यांत आला, अित्यादि तक्रार सरसाहेबांनी केली आहे; आणि 'आता व्यग्रचित्त न होतां पत्रांच्या तारखा ठरविण्यास मनःस्वास्थ्य लाभलें असल्यामुळे सुधारलेली आवृत्ति काढण्यास हरकत पडणार नाही' असें प्रतिपादन केलें आहे. पण माशी शिंकल्यामुळे अपशकुन झाल्याचें हें निमित्त कोणासहि पटण्याजोगें नाही. सरदेसायांनी रियासती लिहून महाराष्ट्रास कायमचें अुपकृत केलें आहे, हें मनापासून कबूल करतांना ते सर्वज्ञ आहेत असें म्हणण्याचें कारण नाही. रियासती लिहिणें व पत्रांच्या तारखा ठरविणें या गोष्टी अगदी निराळ्या आहेत. रियासत लिहिणाऱ्याला पत्रांच्या कालनिर्णयाचें शास्त्रहि बारकाअीने अवगत असतें असें गृहीत धरतां येत नाही. रियासतकारांना पेशवेदप्तरांतील पत्रें छापून काढण्याची संधि सरकाराने दिली व त्यांनी ती साधून लोकांना ही सामग्री अुपलब्ध केली. हें काम त्यांच्या सरावांतलें नसल्यामुळे त्याना तें अुत्तम रीतीने करतां आलें नाही हें स्वाभाविक आहे. अर्थात् यशाबरोबर अपयशाचाहि वांटा घेण्यास त्यांनी तयार असणें न्यायाचें आहे.* सारांश, पेशवेदप्तरांतील पत्रांच्या तारखा ठरवितांना चुका झाल्यामुळे पत्रांच्या जुळणींत जी अव्यवस्था झाली आहे, तिचें अपयश कौन्सिलांत प्रश्न करणाऱ्यांच्या डोक्यावर फोडूं पाहणें ही निव्वळ फसवणूक आहे. पत्रांच्या तारखा ठरवितांना रियासतकारांच्या हातून चुका होण्यास ते व्यग्रचित्त असण्याचें कारण नाही; याचा पुरावा त्यांचे ग्रंथ बारकाअीने वाचणाऱ्यास माहीत आहे. अि. स. १९२० सालीं छापलेल्या मध्यविभागांत कांही अप्रकाशित पत्रें रियासतकारांनी छापलीं आहेत व त्यांचे काल त्यांनी ठरविले आहेत (पृ. ४१५-४१७). ते किती चुकले आहेत हें कोणासहि पाहतां येण्याजोगें आहे. तात्पर्य, बाजू संभाळण्यासाठी म्हणून कित्येक वेळां स्नेही धावून येतात आणि त्यांच्या धडपडीने अुलट फजीती मात्र होण्याचा प्रसंग ओढवतो; तसा प्रकार सर जदुनाथ यांच्या या प्रकरणांतील लिहिण्याने झाला आहे. पेशवेदप्तरातील चुकांची हाकाटी रियासतकारांच्या

* यावर सर जदुनाथ यांचें असें म्हणणें आहे कीं— With the advantage of the whole series of 45 volumes in print and the minute chronlogy of Indian History 1730–1800 constructed by me it would be the easiest thing in the world to correct and particularise the tentative dates given in many places in these *Selections*. Indeed, such corrections have been made by Sardesai himself as the series advanced, and he has added them to the index sheets of the first 25 volumes which were printed when the series was half way to completion. यावरून पेशवेदप्तराच्या पहिल्या २५ भागांतच चुकीच्या तारखा मांडल्या गेल्या व त्यांची दुरुस्ती सर जदुनाथ यानी तयार केलेल्या सनावळीच्या सहायाने सहज लीलेने करतां येते असें त्यांचें मत दिसतें. पण तें साफ चुकीचें आहे. कारण २५ भागांच्या पुढेहि तारखांच्या चुका संपादकांनी अनेक ठिकाणीं केल्या आहेत. अेवढेंच नव्हे तर शुद्धीपत्रालाहि शुद्धिपत्र जोडणें अवश्य आहे हें दाखवून देतां येण्याजोगें आहे. आता आपल्या सनावळीचा अुपयोग मराठी पत्रांच्या कालनिश्चितीस फार होईल, असें जें सरसाहेबांना वाटतें त्याविषयी अितकें म्हणणें आवश्यक आहे की, ती सनावळी सरसाहेबानी रियासतकाराच्या हातीं पेशवेदप्तराच्या संपादनाच्या वेळीच द्यावयास पाहिजे होती; म्हणजे पुढची सर्व आपत्ति टळली असती. पण आता तरी ती त्यानीं रियासतकारांच्या हातीं द्यावी व चुकीच्या तारखांचें शुद्धिपत्र चटकन प्रसिद्ध करण्यास त्याना सांगावें. म्हणजे या सनावळीसंबंधीचा सरसाहेबांचा भ्रम आपोआप नाहीसा होईल असा अंदाज आहे.

'स्नेह्यांनी'च केली असल्यामुळे, हें येथे स्पष्टपणें सांगण्यास हरकत नाही की, पेशवेदप्तराची सुधारलेली आवृत्ति काढण्यात पैशाचा अपव्यय होणार आहे, व ही जबाबदारी रियासत-कारांनी 'स्नेह्या'च्या आग्रहास्तव पत्करली, तर त्याच्या हातून ती योग्य रीतीने पार पडण्याचा संभव नाही. मुख्य चुका झाल्या आहेत त्या तारखा ठरविण्यासंबंधीच्या; तेव्हा अशा चुकांच्या शुद्धीकरणाचें अेक चोपडें त्यांनी प्रकाशित करावें; म्हणजे लोकाना आपल्या संग्रहातील पेशवे-दप्तरांतले छापील भागाचे ग्रंथ सुधारून घेता येतील; किंवा विषयवारीने पत्रांचा अनुक्रम सुचवावयाचा असला तरीहि असा क्रम लहानशा ग्रंथरूपाने मांडता येअील.

प्रस्तुत ३, ४, ५, ६ हीं चारहि पुस्तकें मुख्यत्वेंकरून शिवकालीन अितिहासावर प्रकाश पाडणारीं आहेत. भा अि.सं. मंडळांतील आचार्यपदवीला पात्र असणारे सुप्रसिद्ध संशोधक दत्तोपंत आपटे यांच्या योग्यतेवर मोहून याच कामासाठी विशेष देणग्या मिळतात त्याचाच हा परिणाम आहे हें खरें असलें, तथापि महाराष्ट्रालाहि शिवकालाचीच विशेष आवड असल्यामुळे त्याच संशोधनाला विशेष आश्रय मिळूं शकतो, हीहि गोष्ट ध्यानांत घेतली पाहिजे.

'शिवचरित्र-वृत्त-संग्रह' हें नांव बखरीवजा संकलनग्रंथांतील अुपयुक्त अुताऱ्यांना दिलेलें आहे. त्या सर्वांना अस्सल समकालीन पत्रांचें महत्त्व नसलें तथापि लेखकांच्या समकालीन-त्वामुळे किंवा भौगोलिक सान्निध्यामुळे कांही तपशील कर्णोपकर्णींहि अैकून देतां येतो. व तो अितर साधनसाहित्याशीं विसंगत नसेल तर प्रमाणभूत मानतां येतो. वृत्तसंग्रहाच्या १ ल्या खंडांत डॉ. सालेतोरप्रभृतींनी नांवाजलेल्या 'कंठीरव नरसराज (१६३७-५९) विजयम्' व 'केळदीनृपविजयम्' या दोन प्रदीर्घ आणि अैतिहासिक दृष्टया महत्त्वाच्या आणि अितर ६ मिळून अेकंदर ८ निरनिराळ्या कानडी ग्रंथांतील अुतारे आलेले आहेत. रणदुल्लाखानाच्या दाक्षिणेंतील स्वारीविषयीं पहिल्यामध्यें बराच तपशील विस्ताराने मिळतो. कित्येक अितिहासांतील विकृत हकीकती कानडी मुलुखात कशा रूढ झाल्या होत्या, याचें प्रत्यंतर केळदीविजयावरून मिळतें. आणि अितरांवरून कित्येक वाङ्मयप्रकारांशीं परिचय होअून मनोरंजन होतें.

या वृत्तसंग्रहाचा दुसरा खंड बराच महत्त्वाचा आहे. श्री. जदुनाथ सरकारप्रभृति महा-राष्ट्रीयेतर अितिहासकार आपल्या फारसी भाषेच्या तथाकथित ज्ञानामुळे ज्या महत्त्वाच्या साधन-संपत्तीचे अेकमेव मिरासदार म्हणून मिरवीत होते आणि जिच्या आधारावर महाराष्ट्रीय संशो-धकांना वाटेल तशीं नांवें ठेवीत होते, तोच गड्डा आता महाराष्ट्रीयाच्या हातात देण्याचें मह-त्कार्य या खंडाने पार पाडलें आहे. मुहम्मदनामा, तारीखअिअली, अलीनामा, हफ्तकुर्सी, बसातीनुस्सलातीन अशा आदिलशाहीचा अितिहास सांगणाऱ्या पाच ग्रंथांचें सार त्यांतील अैति-हासिक भाग तेवढाच निवडून या ग्रंथांत दिलेलें आहे. यापैकी तीन ग्रंथ आज फक्त हस्त-लिखित स्वरूपांत आहेत, हें ध्यानांत घेतलें म्हणजे मंडळाच्या ह्या कामगिरीचें महत्त्व उघड होअील.

'साहित्यखंड' म्हणजे अस्सल कागदपत्र छापणारीं पुस्तकें. यांपैकी शिवचरित्र साहित्य खंड ६ वा यामध्यें मुख्यत्वें शिवचरित्रपयोगी मराठी व कानडी कागद छापले आहेत. त्यांपैकी बहुतेक कर्नाटकातून आणलेले असून, कर्नाटकातल्या अितिहासाशीं साहजिकच संबद्ध असे आहेत. यांतील यादीनामे हें आठवें प्रकरण अत्यंत नमुनेदार आणि विश्वसनीय माहितीचें असून, आजपर्यंत तरी तशा नमुन्याचा कागद साधनग्रंथांत विशेष प्रसिद्ध झाल्याचें स्मरत नाही. वाअी परगण्यावरील अधिकारीमालिका वगैरे यांतील माहिती शिवकालीन अितिहासांत

अत्यंत महत्त्वाची ठरलेली आहे. यामधील लेखांक ६२ वरून मुहम्मदनामा आदिकरून साहित्यावरूनहि आजपर्यंत निश्चित करतां आली नाही अशी कोलारच्या अेका स्वारीची तारीख बहुतेक निश्चित करता येते, असा संपादकांचा तर्क आहे.

'अैतिहासिक फारसी साहित्य', तृतीय खंड, यामध्ये मूळ फारसी कागद, त्याचा मराठी सारांश असे काळजीपूर्वक कागद छापलेले आहेत. त्याचाहि मुख्यत्वेंकरून दक्षिणेकडील अितिहासालाच अुपयोग आहे. या खंडांतील ले. १८ मध्यें अि. स. १६५६ मधील शिवाजीच्या आजपर्यंत अज्ञात असलेल्या कर्नाटकांतील अेका पराजयाबद्दल शोध लागत आहे. व वेतन-विषयक (ले.३६) व लष्कराला लागणाऱ्या धान्याबद्दल (ले.७२) अुल्लेख मनोरंजक आहेत. आदिलशाही शिक्के या अगदी स्वतंत्र आणि अुपयुक्त प्रकरणात श्री. खरे यांनी आपलें अचूक ज्ञान परिश्रमपूर्वक संकलित केलें आहे. आणि प्रस्तावनेंतील 'परवानगीहुजूर' व 'दअअझाम खान' अशा अुल्लेखांविषयीचा व फर्मानावरील सुहूर सनाच्या प्रयोजनाबद्दलचा त्यांचा खुलासा त्यांच्या तपशीलवार अभ्यासामुळे शक्य तितका निर्णायक झाला आहे, असें समजण्यास हरकत नाही. हा खंड त्यांतल्या त्यांत बराच काळजीपूर्वक संपादित झाला आहे यात संशय नाही.

या सर्व खंडाना मेहनतीने तयार केलेल्या विस्तृत सूचि, पत्रांचे कालानुक्रमदर्शक तक्ते, शुद्धिपत्रें आणि टीपा अित्यादि असून त्यावरून संपादकाचा व्यासंग, त्यानी केलेले परिश्रम अित्यादींची कल्पना येते. परंतु हे परिश्रम कितीहि महत्त्वाचे आणि पुष्कळसे आदरणीय आणि कुतूहलजनक असले, तथापि त्याचा वाचकाच्या दृष्टीने व्हावा तसा अुत्तम परिपाक झालेला प्रस्तुत साधनग्रंथमालिकेवरून दिसत नाही. म्हणून अितिहासप्रेमी वाचक आणि मराठी भाषेतील अैतिहासिक साधन-ग्रंथाचे सामान्य चहाते यांच्या वतीने म्हणून काही सूचना करणें अवश्य झालें आहे.

हीं चारहि पुस्तकें पुण्याच्या भारत अितिहास संशोधक मंडळाने आपल्या स्वीय ग्रंथमालेंत प्रसिद्ध केलेलीं आहेत. या संस्थेतील कार्यकर्त्यांचें संशोधन कार्य हेंच महाराष्ट्रेतिहासाच्या क्षेत्रांत महत्त्वाचें समजलें जातें. आणि संघटित स्वरूपात होत असल्यामुळे साहजिकच त्याला अेका परंपरेचें अखंडत्वहि प्राप्त झालेलें आहे. परंतु असें असूनहि ठाकठिकीची अेकरूप सजावट, रचना, मलपृष्ठाचे रंग, मुखपृष्ठावर छापावयाचा नामादिक तपशील अित्यादींचा काळजीपूर्वक विचार करण्याचें महत्त्व अधिकारी वर्गाचे ध्यानांत अजूनहि (सुमारें ३० वर्षांनंतर) येत नाही, हें अक्षम्य दुर्लक्षाचें अेक अुदाहरण आहे. आपलें अंगीकृत कार्य लोकाना आकर्षक आणि अुद्बोधक होण्याच्या कामीं अगदी थोडया श्रमाने साध्य होणारीं साधनें अुपयोगांत आणण्याला चुकणें हा द्रव्यसाहाय्य देणाऱ्या लोकाचा अुपमर्द आहे, हें स्पष्टपणें कोणींतरी सांगणें अवश्य आहे. आज अनेक अुच्च दर्जाच्या आणि शास्त्रीय ग्रंथमाला कोणत्याहि ग्रंथविक्रेत्याच्या दुकानांत पाहावयास मिळतील. त्यांपासून बोध घेणें अत्यंत अवश्यक आहे.

दीर्घकाल अस्तित्वांत असलेल्या आणि विशेषतः संशोधनासारखें शास्त्रीय काम करणाऱ्या ग्रंथमालांचा रचना-विशेषच काय परंतु पृष्ठक्रम, ठसे, प्रस्तावना, निवेदनांतील मजकूर, संक्षेपाची समजूत, चिन्हांचा खुलासा इत्यादि गोष्टी एकरूप असाव्या, अशी साहजिकच अपेक्षा असणार. संपूर्णत्वासाठी पुनरुक्ति करण्यास या मालानी मागे पाहता कामा नये, आणि अशा बाबतींतील कोणत्याहि गोष्टी गृहीत धरतां कामा नये. उदाहरणार्थ * ही खूण मूळ कागदांत नसलेल्या व संपादकांनी समजुतीसाठी छापलेल्या तपशीलाच्या वाचक आहे किंवा मध्येच

जाड ठशांत छापलेलें ऱ्हस्व अक्षर हें मूळ कागदांतच तें अक्षर ऱ्हस्व काढलें असल्याचें द्योतक आहे, हा खुलासा प्रत्येक पुस्तकांतील चिन्हांच्या समजुतींत नमूद केला पाहिजे. तसा तो ह्या ग्रंथांत कोठेंहि नमूद केलेला नाही.

ह्या गोष्टी क्षुद्र वाटतील आणि तशा त्या वाटतात म्हणूनच संपादकांनी तिकडे दुर्लक्ष केलेलें आहे; परंतु पुस्तकें छापलीं म्हणजे कोणाहि जिज्ञासूला त्याचा आस्वाद घेतां यावा हाच पुस्तकें छापण्याचा मूळ हेतु आहे, ही साधी गोष्ट विसरल्यामुळे दुसरीहि अेक अक्षम्य चूक झालेली आहे. साधनग्रंथ छापणें याचे दोन उद्देश असूं शकतील. संशोधकांनी केलेल्या कार्याचा अहवाल सादर करणें हा अेक आणि त्यांनी संपादन केलेलीं साधनें अभ्यासकांना अुपलब्ध करून देणें हा दुसरा. पैकी पहिल्यापेक्षा दुसराच अधिक महत्त्वाचा, किंबहुना अेकमेव महत्त्वाचा अुद्देश असावा असें आम्ही समजतों; आणि यामुळे कार्यगौरवात्मक, अर्थवादात्मक तपशील शक्यतों मर्यादेंत ठेवून प्रसिद्ध होणाऱ्या साधनांचें अैतिहासिक दृष्टीचें महत्त्व वाचकांच्या नजरेंत कसें भरेल, त्याचे धागेदोरे भराभर कसे अुकलतील, इकडेच विशेष लक्ष पुरविलें पाहिजे. ग्रंथाची रचना, ठशांची निवड, प्रस्तावनेंतील निवेदन इत्यादि सर्व सजावट या अेका अुद्देशावर केन्द्रीभूत झाली पाहिजे.

या सर्व ग्रंथांतून सर्वच ठिकाणीं जाड ठशांचा अुपयोग करून अैतिहासिक घडामोडी धावतां धावतां वाचकांच्या दृष्टिपथांत येण्याची सोय करणें फारसें कठीण नव्हतें. शिवचरित्र वृत्तसंग्रहाच्या पहिल्या खंडात सूचीला स्वतंत्र पृष्ठांक दिले आहेत, ही गोष्ट अितर तिन्ही खंडांपेक्षा निराळी आहे. शिवचरित्रसाहित्य, सहावा खंड, यामधील यादीनामे अितक्या महत्त्वाचे असूनहि, त्या महत्त्वाचें प्रास्ताविकांत किंवा निवेदनांतहि दिग्दर्शन केलेलें नाही. एकदा 'सहावा' खंड व अेकदा 'तृतीय' खंड अशी भिन्न भाषांतील क्रमांकपद्धति निरनिराळ्या वेळीं रूढ केलेली दिसते. अशा आणखीहि किरकोळ गोष्टी दर्शवितां येतील की, ज्या थोड्याशा काळजीने आणि आस्थेनें सुधारणें कठीण नव्हतें; परंतु सर्वांत महत्त्वाची अशी जी सुधारणा सुचवायची आहे ती प्रास्ताविक निवेदनाबद्दल. अेखादा साधनग्रंथ तयार करतांना संपादकाचा जो वेळ आणि श्रम खर्च होतो, त्याचा संपूर्ण परिपाक ग्रंथ तयार झाल्यावर वाचकाला मिळावा; त्यासाठी ४।६ महिने ग्रंथ लोकांच्या हातीं अुशीरा पडला तरी चालेल. अेखादा ग्रंथ म्हणजे संपादकाच्या ज्ञानपथावरील अुत्क्रान्तीचा आदर्श नव्हे, की ज्यामध्ये त्याच्या सर्व पायऱ्या, झालेल्या चुका, त्याच्या मनातील अैतिहासिक व अनैतिहासिक विचार, वृत्तपत्रीय लिखाणाचे नमुने म्हणून शोभतील असे शेरे अित्यादिहि सरमिसळ छापले जावे. अितर सर्व वाङ्मयप्रकाराच्या लेखकाप्रमाणेच संशोधन-साधनग्रंथाच्या प्रकाशकानेहि संयम अंगिकारला पाहिजे. आणि तोहि विशेषेंकरून शक्य तों संशोधन पूर्ण करून मग ग्रंथ छापण्यांत व अनैतिहासिक गोष्टींची छाटाछाट करण्यात. अुपर्युक्त खंड सहावा याचे निवेदनांतील तिसरा परिच्छेद व लेखांक ८६, ९० व विशेषतः ले. ९२ वरील टीपा वाचल्या म्हणजे आमचें म्हणणें ध्यानांत येअील. फारसी साहित्यखंडातील ले. १८, २२, ३२, ९१, ९२ वरील टीपाहि नमुनेदार आहेत ! परंतु या टीपा अशा लेखांकशः विभागून लिहिल्या म्हणजे आपलें कर्तव्य संपलें असें समजणेंहि खरोखर बरोबर नाही. वास्तविक म्हटलें तर अशा साधनाशीं कित्येक दिवस झगडून झाल्यावर त्याच्या संपादकाने शक्य तितक्या थोडक्यात व अगदी स्पष्टपणें या नवप्रकाशित साधनामुळे ज्ञात अितिहासात खरोखर नेमकी कोणती भर पडली, नेमका कोणता बदल झाला, हें सांगितलें पाहिजे. आजच्या साधनग्रंथप्रकाशनांतील

परंसंपरागुरु श्री. दत्तोपंत आपटे यांनी संपादिलेल्या कोणत्याहि ग्रंथांत जें समाधान ते स्वतः वाचकांना देऊं शकतात ती परंपरा अितक्यांतच टाकाअू झाली असें म्हणण्याचें धाष्टर्य कोणी केलें तर तें धुष्टपणाचें ठरणार नाही.

प्रस्तुत प्रकाशित साधनांनी अितिहासांत फार मोठी धडामोड सुचविलेली नाही अशी वस्तुस्थिति असल्याने त्या तऱ्हेचा परामर्श घेण्याची जरूरी अुत्पन्नच झाली नाही. शिवाय साधनग्रंथ-प्रकाशनाचा मक्ता घेऊन बसलेल्या संस्थाबद्दल सोअीच्या दृष्टीनेहि दोन शब्द लिहिण्याचें धाडस सामान्यतः कोणी करीत नाही तें करणें आवश्यक आहे, म्हणूनच अेवढें लिहावें लागलें. साधनग्रंथ हा अितिहासाचा कच्चा माल आहे हें खरें असलें, तथापि तो ज्या शेतांत पिकला असेल त्या शेताच्या मालकाने तो पोत्यांत भरून ठेवताना ज्या मापाने तो मोजून ठेवला असेल त्या मापाने तो किती भरला, आणि सामान्यतः तो कोणत्या प्रकारचा आहे, हें लोकाना समजणें अवश्य असतें. आणि गिऱ्हाअिकाच्या दृष्टीने हेंच अधिक महत्त्वाचें असतें, हें उमगणें आवश्यक आहे, अेवढेंच या निमित्ताने सांगावयाचें आहे.

---

## भाषाशास्त्र—व्याकरण

मराठी भाषेचें पद्यात्मक लघु व्याकरण ले.– कै. रं. ग. शेळडेकर; प्रका.– भि. कृ. भांडारे, गिरगांव, मुंबअी ४; मूल्य ४ आणे.

हें व्याकरण पुष्कळ वर्षांपूर्वी लिहिण्यांत आलें; तें आठ वर्षांपूर्वी लेखकाचे पुत्र रा. विष्णुपंत, राहाणार असोळडें (गोवा) यानी छापिलें; व अशा रीतीने अेक प्रकारें वडिलांचें ऋण फेडिलें. हें व्याकरण लेखकाने आपल्या मुलांबाळांस शिकविण्यासाठीच तयार केलें होतें. व त्या लेखकाची हें छापण्याची मुळीच अिच्छा नव्हती. अर्थात् यामुळेच त्याच्या ह्यातींत त्यांच्य चिरंजीवांस हें पुस्तक छापतां आलें नाही. पुस्तकाचें स्वरूप पाहतां हें छापून काढण्यांत रा. विष्णुपंतांनी छोटेखानी व्याकरणपुस्तकात भर टाकली आहे, हें स्पष्ट होतें.

प्रकाशकांनी लिहिल्याप्रमाणे दादोबाकृत लघुव्याकरण हा ह्या पुस्तकाचा आदर्श आहे. अर्थात् दादोबांच्या चुका ह्या पुस्तकांतहि अुतरणें साहजिक आहे. व याबद्दल लेखक तादृश दोषीहि ठरत नाही. कारण लेखकाच्या काळीं वर्तमान काळाचे मानाने लोकांची दृष्टि चिकित्सकपणांत फारच मागें होती. पान ७ मध्यें अव्यय शब्दांत नाम, सर्वनाम, विशेषण, ह्यांच्या पंक्तीला धातु हा शब्द बसणें योग्य असता, तेथे दादोबानुसार क्रियापद आलें आहे. पुढील सर्वनामांची व्याख्या अशीच सदोष झाली आहे.

नामाचें अुच्चारण न पुन्हा व्हावें म्हणून त्या जागीं ॥
नवशब्द योजिती जो त्या म्हणती सर्वनाम त्या लागीं ॥ ६५ ॥

ही व्याख्या पुरुषवाचक, संबंधी, अित्यादि सर्वनामांस लागत नाही. ह्यावरून ती अुघड अुघड सदोष आहे. द्वितिया व चतुर्थी ह्यांचीं रूपें व म्हणून प्रत्यय सारखे असतां तें हा प्रत्यय केवळ द्वितीयेचा म्हणूनच दिला आहे. अशा रीतीने स्वतंत्र विचार ह्या पुस्तकांत विशेष दिसून येत नाहीं. तरी पण (पान ११) 'आमचा देश' ह्या ठिकाणीं षष्ठयन्त विशेषण (आमचा) आणि त्याचें विशेष्य (देश) ह्यांस क्रमाने भोक्ता आणि भोग्य अशी संज्ञा देण्यांत

लेखकाने आपली स्वतंत्र बुद्धि चालविली आहे. तरीपण यांतहि, माझे मतें, संज्ञांची अुलट-पालट करणें योग्य दिसतें. देश-च्या लिंग-वचनाची छाप आमचा ह्या रूपावर पडली आहे. ह्यावरून देश हा भोक्ता आणि आमचा हें भोग्य ठरतें. असा प्रमाद ह्या संज्ञेच्या मूळाशीं असला तरी ह्या संज्ञा योजण्यांत लेखकाचा स्वतंत्र विचार मान्य करणें प्राप्त आहे.

हें सर्वच व्याकरण आर्यामय अर्थात् पद्यरूप आहे. मात्र यांत येणारीं अुदाहरणें तेवढीं निराळीं गद्यांत दिलीं आहेत. ह्या आर्यांपैकीं काही आर्या विशेष पठनार्ह दिसतात. अुदा.—

वर्ण मुखांतून निघे ज्या भागापासुनी तया स्थान ॥
त्या वर्णाचें म्हणती, ऐशीं हीं सात हें मनीं आण ॥ १६ ॥
जुळण्यास विभक्तीचे प्रत्यय शब्दास रूप देतात ॥
त्याच विकृत रूपाला गुरुजन सामान्य-रूप म्हणतात ॥ ५७ ॥
ज्या योगें शब्दाचें सततचि सामान्यरूप बा होतें ॥
नामापुढती राहे, जाणावें शब्दयोगि अव्यय तें ॥ १५६ ॥
होतो क्रियान्वयाने नामाच्या अर्थ जो विभक्तीचा ॥
त्याला कारक म्हणती, सागूं कांही विचारही त्याचा ॥ १७९ ॥

वरील आर्यांत क्रमानें वर्णांचें स्थान, सामान्यरूप, शब्दयोगी अव्यय आणि कारक यांचे वर्णन आहे. हें वर्णन यथार्थ असून पद्यमय असल्याने लक्ष्यांत ठेवण्यास सोपें आहे.

व्यंजनाचा खालचा फाटा काढून टाकिला म्हणजे त्यास स्वर जोडला असें समजावें. (पान ३) येथे, मला वाटतें, स्वर–चे स्थानीं अ अशी लेखकाची विवक्षा असावी. "द्वंद्व समासामध्यें दोहोंहुनि अधिक शब्द वापरिती ।।१७२।।" ह्या विधानांत 'दोन किंवा दोहोंहून अधिक' असें सागणें योग्य आहे. असे कांही दोष क्वचित् आढळतात.

विभक्त्यर्थसूचक अव्ययें मागील शब्दास जोडून, लिहितात असें असतां पान १२ वर 'लिहिती शब्दापुढे न त्या जुळता' असें पडलें आहे. ह्या ठिकाणीं मला वाटतें, शब्दापुढेंच असें पाहिजे. पान २० वर 'सहाय क्रियापद कालार्थाला फिरवी' असें म्हटलें आहे. तत्स्थानीं 'कालार्थाला ठरवी' असें योग्य दिसतें. पान २३ वर पद्यें ११५ व ११६ ह्यांचे मध्यें, धातु सकर्मक असतां त्यावरून कोणते प्रयोग सिद्ध होतात हें सांगावयाचें राहून गेलें आहे. पान ५३ मध्यें विद्वत्प्रार्थनेंत—

"या न्यायें पद्यात्मक लिहिलें हें अल्पसेंच व्याकरण !" ह्या ओळींत व्या–चे पूर्वी च–ला गुरुत्व प्राप्त होणें अवश्य आहे व यामुळे येथे छंदोभंग घडला आहे. असला दोष ह्या पुस्तकांत मधून–मधून आढळतो.

पान ५ वर होय–चे स्थानीं होत असें पाहिजे. पान ६ मध्यें ओळ ५ मध्यें आशय असा शब्द असावा. पान २५ मध्यें ओळ ८–चे आरंभीं करून-चे स्थानीं करूं असावें. पान ५२ मध्यें ओळ १० त यणादेश चे स्थानीं गणादेश चुकून पडलें आहे.

मराठींत सी–चे स्थानीं शी आणि स्या–चे स्थानीं शा असें लिहिणें योग्य आहे. ही लेखकाने सांगितलेली गोष्ट, घूस–चें अनेकवचन घुशी आणि ससा–चें सामान्यरूप सशा ह्या अुदाहरणांवरून मनास पटते; व यांत लेखकाची सूक्ष्म दृष्टि दिसून येते. वर सांगितल्याप्रमाणे गुणदोष ह्या पुस्तकांत आढळतात. पैकी गुणाची बेरीज अधिक असल्याने, हें पुस्तक स्वागतार्ह ठरतें. यांत, विशेषतः कौतुकाची गोष्ट अशी की, लेखकाचें बेताचें अध्ययन आणि चिकित्सक

पारखा असलेला त्याचा काळ ह्या दोहोंचा विचार करितां हा प्रयत्न विशेष अभिनंदनीय ठरतो. शेवटीं कोणीहि असेंच म्हणेल की, प्रकाशकांनी आपल्या वडिलांनी लिहिलेला छंदःशास्त्रावरील-हि ग्रंथ छापून आपल्या वडिलांचें अुतराओी व्हावें. हा ग्रंथ बाहेर पडल्यास गेल्या शतकाच्या अंतीं, अध्ययनसाधनें बेताचीं असतांहि कुशाग्र बुद्धीचे लोक अभ्यास्य विषयावर कसे गाढ परिश्रम करीत ही गोष्ट जनांच्या निदर्शनास येअून, त्याना अधिक साधनें अवळ असल्याने ज्ञानाचा अधिक व्यासंग करावा असें एक प्रकारचें प्रोत्साहनहि मिळेल.

---

## चिंतनपर निबंध व प्रवासवर्णन

१ विचारसौंदर्य— ले.– प्रा. वा. म. जोशी; प्रकाशक– स्वस्तिक पब्लिशिंग हाअुस, मुंबअी; मूल्य १ रु.

२ नाट्यस्वरूप गडकरी— ले.– शं. ना. सहस्रबुद्धे; प्रकाशक– महाराष्ट्र नाट्य-मंदिर, नाशिक; किं. २॥ रु.

३ प्रो. फडके यांचीं गाजलेलीं भाषणें— ले.– प्रा. ना. सी. फडके; प्रकाशक– पु. रा. भिडे आणि कं., लक्ष्मी रोड, पुणें २; मूल्य १ रु. ६ आणे.

४ मराठवाड्यांतील आधुनिक कविता— ले.– कृष्णाकुमार; प्रकाशक– ग. ना. अंबेकर, गोदावरी प्रिंटिंग प्रेस, नादेड; मूल्य १॥ रु.

५ मराठवाड्यांतील गद्य वाङ्मय— ले.– कृष्णाकुमार; प्रकाशक– भी. कृ. वाघमारे, वाग्विलासमंडळ, हैदराबाद (द.); मूल्य १। रु.

६ माझी येरुशलेमची यात्रा— लेखक व प्रकाशक– डॉ. अ. ल. जाधव, निपाणी; मूल्य १० आणे.

मराठींतील अपुऱ्या टीका वाङ्मयात विचार-सौंदर्य या पुस्तकाने महत्त्वाची भर घातली आहे. मुद्दाम आसन माडून, विशिष्ट विषय निवडून, विस्तृत टीकाग्रंथ लिहावयास बसण्याची पात्रता दोन चार विद्यमान साहित्यिकामध्यें तरी खास आहे; पण तशी स्वतंत्र वाङ्मय-कृति क्वचित्च प्रकट होते. म्हणून प्रस्तावनेच्या, अभिप्रायाच्या वा अध्यक्षीय भाषणाच्या निमित्ताने जे स्वैरालाप वाग्भटानी केले असतील, त्यांच्याच संकलनाचे ग्रंथ स्वागतार्ह ठरतात. या पुस्तकांतील पहिलाच निबंध ह्या. 'निर्झरिणी' या काव्यग्रंथाची प्रस्तावना म्हणून तो जन्मास आला. वाङ्मय कालनिष्ठ कीं व्यक्तिनिष्ठ, या प्रमेयाचें विवेचन अुजयिनीच्या अध्यक्षपदावरून पूर्वी केलेलें आहे. अशा प्रासंगिक महत्त्वामुळे विवेचनात एकागीपणा येऊन ग्रंथातील एकसूत्रीपणा जातो हें उघड आहे. तथापि प्रो. वामनरावासारख्या वाङ्मय-महर्षीचें कोटलेंहि लेखन हें बहुश्रुतपणाच्या कोंदणांत बसविलेलें व चिकित्सेचे पैलू पाडलेलें असें असतेंच; आणि म्हणून तें रम्य-कांत वाटतेंहि.

"सर्वत्र अनिश्चय, संशय, ढिलेपणा, गुळमुळीतपणा व चालढकलपणा दिसत आहे." —प्रस्तुत ग्रंथाचें हें वर्णन नव्हे! तर महाकाव्यें निर्माण न होण्याचें हें कारण आहे, असें वामनराव म्हणतात. पण मग लहान लहान काव्यें तरी कां होत नाहीत! खरोखर महाकाव्याला साजेसे (Epic greatness) महान् प्रसंग, पं. जवाहरलालानी म्हटल्याप्रमाणे, आपल्या डोळ्यांपुढे घडत आहेत; पण त्याचे आपल्या मनावरील संस्कार वक्तविण्याचें वाहन काव्य नव्हे, असें लेखकवर्गास वाटूं लागलें आहे. श्री. न. चिं. केळकर यांच्या 'सविकल्प समाधी'च्या तत्त्वाचे

पापुद्रे किती हलक्या हाताने त्यांनी काढले आहेत, हें पाहण्यासारखें आहे. डॉ. केतकरांच्या कादंबऱ्यांतील गुण त्यांनी बहारीने अुकलून दाखविले आहेत. "कलेच्या ध्येयापेक्षा व नियमांपेक्षां दुसरी-तिसरीकडे कलावंतानें पाहूं नये." हें मत कोणास संमत नसलें, तरी त्यातील निश्चितपणा पाहून कोणीहि संतुष्ट होअील. कोणताहि निबंध अुघडा आणि तुम्हांला वामनरावाची चतुरस्रता चकित करील, त्यांची विद्वत्ता आदर निर्मील आणि बारीक बारीक विनोदाचे कण स्मिताच्या लहरी मुखावर पसरावितील.

अेक वर्षापूर्वी प्रसिद्ध झालेल्या या नाट्यरूप गडकरी परिचयग्रंथाचीं पानें तीनशेंवर आहेत. आतांपर्यंत गडकऱ्यांवर इतके टीका-ग्रंथ निर्माण झाले आहेत की, नवीन लिहिणाराने लेखणी उचलण्यापूर्वी दोनदा विचार करावयास हवा. या पुस्तकांत त्यांच्या नाटकांचें स्वरूप निवेदन करून, सुचले ते विचार स्वैरपणें मांडले आहेत.

प्राध्यापक ना. सी. फडके हे जसे सिद्ध-हस्त-लेखक तसेच ते ख्यातनाम वक्तेहि आहेत, ही गोष्ट सर्वश्रुतच आहे. त्यांच्या लेखनाप्रमाणेच लालित्य हाच त्यांच्या वक्तृत्वाचाहि प्रभावी गुण आहे. परंतु व्यासपीठावरील वक्त्याच्या धाराप्रवाही शब्दोच्चारांमुळे अुत्पन्न होणारी विषयप्रतिपादनांतील परिणामकारकता, तोच मजकूर कागदावर लिहिल्यावर तितक्याच प्रमाणांत कायम राहणें ही दुष्कर गोष्ट आहे. सामुदायिक मनापेक्षा वैयक्तिक मनाची तर्क व विचार यांबद्दलच्या सूक्ष्मतेची अपेक्षा केव्हाहि अधिक काटेकोर राहत असल्यामुळे, अेखाद्या परिणामकारक व्याख्यानाचें अितिवृत्त त्याच्या वाचकाला श्रोत्याअितकें परिणामकारक व सुसंबद्ध वाटेलच असें नाही. व्यासपीठावरील वक्त्याचें वक्तृत्वकौशल्य व श्रोत्यांपैकी बहुसंख्यांची पूर्वसहानुभूति यांमुळें भाषणाच्या ओघांत परिणामकारक वाटणारे अनेक तार्किक हेत्वाभास, लिखित स्वरूपांत अगदीच अुघडे पडतात, याचा अनुभव सर्वांनाच असेल. परंतु प्रा. फडके यांची विषयप्रतिपादनाची शैली मुद्देसूद, सुसंगत, व सुसूत्र असल्यामुळे लिखित स्वरूपांतहि त्यांच्या व्याख्यानांत, वक्तृत्वगुणांच्या वजाबाकीनंतरहि, फारसें मोठें स्थित्यंतर होत नाही, हा त्यांच्या व्याख्यानपद्धतीचा अभिनंदनीय विशेष आहे. वक्ता व्याख्यान देतो तेव्हा तें अैकणारांची मानसिक परिस्थिति, व लेखकाने लिहिलेल्या लेखाच्या वाचकाची मानसिक परिस्थिति यांमध्ये स्थिति-गति, व्यक्ति-समष्टी या दुहेरी घटकांमधील विरोधयुक्त प्रक्रियेच्या परिस्थितीअितकें अंतर असल्यामुळे, कोणत्याहि व्याख्यानांतील विषयाचें विवरण हें त्या विषयावरील लेखांतील विवरणापेक्षा अधिक स्थूल, अधिक ठोकळ मानाचें असणें, त्यांत पृथक्करणापेक्षा समीकरणावर जास्त भर दिलेला असणें, आणि हजर असलेल्या श्रोत्यांपैकी जास्तींत जास्त श्रोत्यांना अैकतां अैकतां, फारसा किंबहुना मुळींच विचार करण्याचा त्रास न पडतां, सहज ग्रहण करतां येअील अितकें त्याचें स्वरूप अुथळ असणें, हें अगदी स्वाभाविक आहे. त्यांतल्या त्यांत समाजांतील बहुसंख्य लोकांना ज्यांत विशेष कुतूहल आहे अशा विषयांचे विवेचनाबाबत तर हें वैशिष्ट्य विशेष प्रामुख्याने दिसून येतें. प्रा. फडके यांच्या, "साहित्यसागरावरील लहानमोठीं वादळे", "पावित्र्य-विडंबन", "संगीतांतील नवमतवाद" अित्यादि "गाजलेल्या भाषणां"पैकी बहुतेकांचे विषय असेच आहेत; आणि त्यामुळे त्यांचीं तीं भाषणें अैकतांना जितकीं परिणामकारक वाटलीं असतील, तितकीं तीं लिखित स्वरूपांत विचारी वाचकाना तर्क बुद्धीचें तितकेंसें समाधान करणारीं वाटलीं नाहीत, तर त्यांत आश्चर्य नाही. हा दोष प्रा. फडके किंवा त्यांची विषयप्रतिपादनपद्धति यांचा नसून, माध्यमांतरामुळे निर्माण झालेला हा परिणाम आहे माध्यमांतरामुळे अेका ठिकाणीं सुंदर व परिपूर्ण वाटणारी गोष्ट दुसऱ्या ठिकाणी कशी अपुरी व परिणाम-

हीन वाटूं शकते, याचें अेक अुदाहरण म्हणूनच केवळ त्याचा अितक्या विस्ताराने येथे अुलेख केला; नाही तर लेख या दृष्टीने सुद्धा प्रा. फडके यांचे हे लेख मनोरंजक, वाचनीय व बरेचसे अुद्बोधक आहेत असेंच कोणीहि म्हणेल.

मराठवाडा हें मराठीचें मूळ माहेर आहे. पण माहेराहून बाहेर आलेली कन्या आपल्या प्रौढावस्थेत वैभवशाली व्हावी तशी मराठीची स्थिति झाली. अनेक राजकीय व सामाजिक घटनांमुळे मराठीची अभिवृद्धि महाराष्ट्रांतील इतर प्रान्तांत फार जोमाने झाली व मग तिच्या माहेराचें अगदी विस्मरण नसलें तरी त्याबद्दल थोडें औदासीन्य तरी मराठीच्या भक्तांत अुत्पन्न झालें. तें नाहीसें करण्याचा पहिला प्रयत्न हैदराबादचे साक्षेपी व व्यासंगी ज्येष्ठ प्राध्यापक चिंतामणराव जोशी यांनी केला. त्यांनी "मराठवाड्यांतील अर्वाचीन मराठी वाङ्मय"—पद्यविभाग— या आपल्या ग्रंथांत सन १८३८ ते १९३८ पर्यंतच्या शंभर वर्षांच्या पद्य वाङ्मयाचा आढावा घेतला आहे. त्यानंतर नअू महिन्यांनी "मराठवाड्यांतील आधुनिक कविता" हें श्रीयुत कृष्णाकुमार यांचें पुस्तक प्रसिद्ध झालें. मराठीच्या एकंदर व्यापात, केवळ एका प्रान्तांतील काव्याचा जेवढा परामर्श घ्यावयास पाहिजे तेवढा घेतां येत नाही ही गोष्ट खरीच आहे. त्यामुळे श्री.वि. पां. नेने, सरवटे किंवा त्याहि पूर्वी कै. भावे यांच्या पुस्तकांत प्रान्तांच्या काव्यांचा पूर्ण आढावा नाही. अशी अुणीव प्रादेशिक ग्रंथकारांनीच भरून काढावयाला हवी. तशी ती लागोपाठ प्रसिद्ध होणाऱ्या या दोन्ही ग्रन्थांनी भरून काढली आहे, ही गोष्ट अभिनंदनीय आहे. श्रीयुत कृष्णाकुमारांनी आपलें काव्यविवेचनक्षेत्र प्रो. जोश्यांच्यापेक्षा थोडें, आकुंचित म्हणजे १९२० ते १९३८ पर्यंतचेंच, घेतलें असल्याने त्यांना आपलें परीक्षण अधिक विस्तृत करतां आलें आहे. सदर टीका-ग्रंथांत कोरकेल या ज्येष्ठ कवींपासून कान्त या कवींपर्यंत तेरा कवींच्या काव्यांचा सर्वांगीण परामर्श घेतला आहे. विवेचन विस्तृत, विवेचक व मर्मग्राही असल्याने सदर कवींच्या कृतींचा परिचय होण्यास तें एक उत्तम साधन झालें आहे. या ग्रंथावरून माडखोलकरांच्या "आधुनिक कविपंचकाची" आठवण वाचकांना होईल.

श्रीयुत कृष्णकुमारांनीच प्रसिद्ध केलेला 'मराठवाड्यांतील गद्य वाङ्मय' हा ग्रंथ त्यांच्या पहिल्या ग्रंथाची एक पूरणिकाच होय. पहिल्यांत पद्यवाङ्मयाचें समालोचन केल्यावर यांत गद्याचें समालोचन होणें योग्यच होतें. व अशा तऱ्हेनें हीं दोन्हीं पुस्तकें मिळून मराठवाड्यांतील आधुनिक मराठी गद्यपद्य वाङ्मयाचा संपूर्ण आढावा झाला, ही समाधानाची गोष्ट आहे. सदर टीका ग्रंथांत डॉ. वा. दा. गाडगीळ प्रभृति सहा गद्य लेखकांचा परामर्श घेतला असून, शेवटीं अखिल मराठी वाङ्मयांत मराठवाड्यांतील स्थळें व व्यक्ति यांचा कोठे कोठें उल्लेख आला आहे, यांचें एक मोठें छान प्रकरण लिहिलें आहे.

ख्रिस्ती भारत युवक संघातर्फे १९३७ च्या मे मध्ये ख्रिस्ती लोकांपैकी जेरूशलेमच्या यात्रेला श्री मिशनरी मंडळी गेली, त्यात निपाणीच्या ख्रिस्ती मंडळींतील डॉ. अ. ल. जाधव हे अेक होते. त्यानी आपल्या प्रवासाची हकीकत 'ज्ञानोदय' मासिकाचे त्या वेळचे संपादक श्री. देवदत्त नारायण टिळक यांच्या सांगण्यावरून वेळोवेळीं लिहून पाठविली, आणि तीच अेकत्र करून 'माझी यरूशलेमची यात्रा' हें छोटेंसें पुस्तक छापून प्रसिद्ध केलें. संक्षिप्त प्रवासवर्णन या दृष्टीने हें पुस्तक करमणूक करणारें आहे. पण मुख्यतः ख्रिस्ती (धार्मिक) दृष्टीने लिहिलें असल्याने आणि बायबलांतील अुल्लेख प्रत्येक पानांत बऱ्याच ठिकाणीं आल्याने, ख्रिस्ती लोकांनाच अधिक अुपयुक्त होअील असें वाटतें.

वर्णनाच्या दृष्टीने, ज्या ज्या गोष्टी त्यांना प्रवासांत पाहायला मिळाल्या त्यांची सरळ, साधी हकीकत देत गेल्याने, फारसें अुठावदार किंवा आकर्षक स्वरूप या पुस्तकास आलेले दिसत नाही. तरी पण रोजनिशींतील किंवा खाजगी पत्र-लेखनांतील वर्णनशैली लेखकाने या पुस्तकभर अनुस्यूत ठेवल्याने वर्णनविषयाविषयीचा लेखकाचा जिव्हाळा त्यांतून चांगला व्यक्त होत आहे.

---

## चरित्र

१ आनंदीबाई पेशवे— ले० व प्रका०— श्री. चिं. ग. कर्वे, २०४ सदाशिव पेठ, पुणें २; मूल्य ६ आणे.

२ सर मोरोपंत जोशी, के. सी. आय्. अी. यांचें संक्षिप्त चरित्र व आठवणीः— ले० व प्रका० :— श्री. मो. धों. हिंगवे, कॉंग्रेसनगर, नागपूर.

३ विठ्ठलरत्न दप्तरी— प्रका०— श्री. के. र. काशीकर, आदर्श कार्यालय; मुंबअी १६.

४ विजिगीषु हिट्लर— प्रका०— लोकशिक्षणलघुग्रंथमाला, १९५/५ सदाशिव, पुणें २; मूल्य ६ आणे.

आनंदीबाअी पेशवे हें पुस्तक सयाजी बालज्ञानमालेंतील १६१ वें पुष्प म्हणून १ मार्च १९४० रोजीं प्रसिद्ध झालें. 'आनंदीबाअीबद्दल गैरवाजवी सहानुभूति ठेवून लिहिलेलें चरित्र' असें याचें थोडक्यांत वर्णन करतां येअील. 'आनंदीबाअी ही पेशवेघराण्यांतील अेक थोर स्त्री होअून गेली, असें समजण्यास व सांगण्यास शिका' असें लेखक बालवाचकांस पुस्तकाचे अखेरीस सांगतात, पण आनंदीबाअीवरील, जो मुख्य आरोप 'ध'चा 'मा' केल्याबद्दलचा, त्याचें निराकरण करण्याबद्दलचा अेकहि पुरावा लेखकाला सापडलेला नाही. नारायणरावाचा सूड अुगवण्याचें जें राघोबा व आनंदीबाअींनी मनांत आणलें त्याबद्दल लेखक विचारतात 'यांत वावगें काय झालें ?' यास अुत्तर हेंच की, अशा रीतीने विचार करूं लागल्यास कुणाच्याहि कृत्याचें समर्थन करणें कठीण जाणार नाही. आनंदीबाअीचीं पत्रें तिची बुद्धिमत्ता दर्शवितात; पण सद्बुद्धि दर्शविणारें असें तिचें अेकहि पत्र नाही. खुद्द तिच्या मुलाचा— दुसऱ्या बाजीरावाचा— आपल्या आअीनेच नारायणरावास मारविलें असा समज होता. अस्सल पत्राचा अुलट पुरावा मिळेपर्यंत अितिहासाच्या न्यायालयांत 'ध'च्या 'मा'चा आरोप तरी आनंदीबाअीवर ठेवणें चूक होणार नाही. लेखकाच्या वकिलीचा यत्न व्यर्थ आहे. आनंदीबाअीस तत्कालीन राजकारण समजत होतें व अिंग्रजाचें वाढतें भय व धोरण तिने ओळखलें होतें हें खरें, पण तेवढ्यावरून अितिहासकारांनी तोल सोडून तिचें समर्थन करणें अिष्ट नाही. श्री. कर्वे यांनी चरित्र साधनें पाहून परिश्रमपूर्वक लिहिलें आहे हें नमूद केलें पाहिजे. आनंदीबाअीची वकिली प्रथम श्री. वि. स. वाकसकर यांनी अजमासें १९२१ सालीं केली. श्री. वाकसकर बडोद्याचे, राजधानींत सरकारी अितिहास-साधन-संग्रहांत वावरणारे, तेव्हा आनंदीबाअीचें चरित्र लिहिण्यासारखें आहे व तेंहि मुलांच्यासाठी, ही गोष्ट बडोदे सरकारच्या ओरिअंटल अिन्स्टिटयूटच्या मनांत कशी आली, याचें आश्चर्य वाटण्याचें तितकेंसें कारण नाही.

सर मोरोपंत जोशी यांनी आपल्या राजकीय आणि सामाजिक कार्याने राष्ट्राला, दातृत्वाने अनेक संस्थांना, औदार्याने अनेक व्यक्तींना, ऋणी केलें आहे. या ऋणसंभाराचे अंशतः

अुतराअी व्हावें म्हणून नागपूरप्रांतस्थ मंडळींनी हें त्यांचें चरित्र त्यांना त्यांच्या ८० व्या वाढदिवसानिमित्त अर्पण केलें आहे.

वऱ्हाडचें वर्चस्व मध्यप्रांतांत व महाराष्ट्रांत स्थापन करण्यांत ज्या त्रिमूर्ति कारणीभूत झालेल्या आहेत त्यांत श्रीमंत दादासाहेब खापर्डे, श्रीमंत तात्यासाहेब मुधोळकर यांच्याबरोबरच सर मोरोपंत जोशी यांचें नांव कोणाच्याहि चटकन् तोंडात येतें. अशी अण्णासाहेबांची राजकीय, सामाजिक आणि स्वतःच्या वकिलीच्या धंद्यातली अशी त्रिविध प्रांतातील मोठी अलौकिक कामगिरी आहे. तेव्हा अशा थोर लौकिकवान् सच्चरित व्यक्तीचें चरित्र मोठ्या परिश्रमपूर्वक लिहून व त्याच्यासंबंधीच्या आठवणी महर्षी धोंडो केशव कर्वे, डॉ. सर तेजबहाद्दर सप्रू, डॉ. र. पु. परांजपे, जम्नादास मेथा, सरदार किबे, आणि श्रीमंत सौ. सरस्वतीबाअी पटवर्धन, राणीसाहेब सांगली, माणिकताअी भिडे (सर मोरोपंताच्या दोन कन्या) वगैरे सारख्यांकडून लिहवून घेअून त्या संपादित केल्या; याबद्दल लेखकाचें अभिनंदनच केलें पाहिजे प्रारंभींची दिवाणबहादुर के. वा. ब्रह्म, दिवाणसाहेब सांगली स्टेट, याची प्रस्तावनाहि मार्मिक आणि समर्पक आहे. अेकंदरींत मराठी वाङ्मयाच्या चरित्रवाङ्मयांत संक्षिप्त चरित्र लेखनाचा आदर्श नमुना म्हणून या पुस्तकाला स्थान द्यावें लागेल.

नागपूरचे श्री. केशव लक्ष्मण दप्तरी यांना गेल्या नोव्हेंबर महिन्यांत अेकसष्टावें वर्ष लागलें; त्या निमित्ताने श्री. के. र. काशीकर ह्यानी श्री. दप्तरी यांचें हें संक्षिप्त चरित्र प्रसिद्ध केले असून त्यात त्याच्या ग्रंथांचा (भारतीय ज्योतिःशास्त्रनिरीक्षण, करणकल्पलता, भारतीय युद्धकालनिर्णय, सच्चिकित्साप्रकाश, धर्मविवादस्वरूप अि०) परिचय करून दिला आहे, आणि शेवटीं नागपुरांतील लोकांच्या काही उद्बोधक आठवणी जोडल्या आहेत. त्या वाचून श्री. दप्तरींचें गाढ पांडित्य, दुर्दम्य आत्मविश्वास, आत्यंतिक साधेपणा, कठोर सत्यप्रियता, निगर्वीपणा आणि त्यांच्या ठिकाणची मन, वाणी व कृति यांची एकवाक्यता यांची प्रतिती होते; आणि त्यांच्याविषयींचा आदर द्विगुणित होतो. श्री. दप्तरी हे केवळ पुस्तकी पंडित नसून 'क्रियावान् पंडित' आहेत. त्यांची संशोधक बुद्धि मूलगामी असून लोकमान्य टिळकांनाहि त्यांच्याविषयीं आदर वाटत असे. त्यानी जीं तत्त्वें अेकदां आगिकारिलीं, तीं निश्चयानें कृतींत आणण्याचें धैर्य त्यानी दाखविलें आहे, याविषयी प्रस्तुत चरित्रांत दिलेली माहिती वाचून ह्या पुरुषाचें एकवार तरी दर्शन घ्यावें, अशी मनीषा वाचकांच्या मनात अुद्भूत झाल्याखेरीज रहणार नाही.

ज्याचें नांव आजकाल जगभर आबालवृद्धांच्या तोंडीं झालें आहे, तो हिटलर आहे तरी कसा असें कुतूहल ज्यास वाटत असेल, त्याने विजिगीषु हिट्लर हें छोटेखानी पुस्तक अवश्य वाचावें; म्हणजे गेल्या महायुद्धात पराभूत व हतवीर्य झालेल्या जर्मनीला पूर्ववैभव प्राप्त करून देण्यासाठीच नव्हे, तर अखिल युरोपात अग्रेसर बनविण्यासाठी हिट्लरने जून १९४० पावेतों जो प्रचंड पराक्रम केला आहे त्याचें शब्दचित्र त्यास पाहावयास मिळेल. हिट्लर हा बाल्यदशेपासून कसा स्वतंत्र वृत्तीचा आहे, त्याने नात्सी पक्षाची स्थापना कशी केली, त्याचें वक्तृत्व कसें प्रभावी आहे आणि त्याच्या बलावर त्याने जर्मनीचें मनुष्यबल, बुद्धिबल व द्रव्यबल कसें संघटित केलें आहे, याचें वर्णन लेखकाने सहृदयतेने केलें आहे.

हिट्लरचें खासगी चारित्र्य संन्यासवृत्तीचें असून तो ब्रह्मचारीच आहे. मद्य, मांस व तंबाखु यांपासून तो अलिप्त आहे. अंडीं, भाजीपाला व फळें हाच त्याचा मुख्य आहार आहे. त्याच्या अंगीं आकर्षणशक्ति असून त्याची मुद्रा प्रसन्न पण निश्चयी भासते, अित्यादि माहिती

'हिट्लरचें व्यक्तिमत्व' या अखेरच्या प्रकरणांत दिली असून विन्स्टन् चर्चिल् यांनी पांच वर्षां-पूर्वी काढलेले "Whatever else may be thought about Hitler's exploits, they are certainly among the most remarkable in the whole history of the world." हे उद्‌गार देऊन पुस्तकाचा समारोप केला आहे.

---

## काव्य

१ भग्नमूर्ति— कवि– आत्माराम रावजी देशपांडे; प्रकाशक– ना. ल. प्रयाग, खांडवा ( सी. पी. ) किं. १॥ रु.

२ काव्यकिरीट— कवि– यशवंत; प्रकाशक– वि. पां. नेने, हुजूर कचेरी, बडोदें; किंमत १॥ रु.

सुप्रसिद्ध कवि 'अनिल' (रा. आत्माराम रावजी देशपांडे) यांचें भग्नमूर्ति हें चिन्तनात्मक दीर्घ काव्य वाचून रसिकांना खास संतोष वाटेल; आणि 'महाराष्ट्रकविपरंपरा खंड न पडला तिला जरा' या कव्युक्तीची सानंद प्रचीति येईल. 'अनिलां'ची मनोरचना चिंतनपर आहे. सृष्टीच्या सौंदर्यांत व व्यापारांत रंगून तत्त्वबोधाकडे धाव घेणें त्यांच्या प्रवृत्तीला आवडतें. उत्कटता हा त्यांच्या काव्याचा विशेष आहे. प्रस्तुत 'भग्नमूर्ति' या दीर्घ काव्यांत त्यांच्या प्रतिभेचे व कवितेचे सर्व गुण उत्कर्षाने प्रकट झालेले आढळून येतात.

रामटेक येथील एका भग्न मंदिराचें दर्शन होताच कवि व्यथित होतो; आणि शिल्प व संस्कृति यांच्या विनाशासंबंधी अनेक उदास विचार त्याच्या मनात येतात. जगभर प्रवास करणाऱ्या आणि वेळोवेळीं बदलत जाणाऱ्या ढगाप्रमाणें कविकल्पना हिंदुस्थानांतील सर्व प्रमुख भग्न शिल्पावरून प्रवास करीत जाते. या कल्पयात्रेंत अजिंठा, वेरूळ, कार्लें, सांची इ० सर्व ठिकाणें आलीं आहेत. हिंदुस्थानातलें हें सारें शिल्पसौंदर्य आज भग्नावशेष होऊन पडलेलें पाहून कवि अश्रु ढाळतो. पण ही केवळ विलापिका नाही. भावानाजालातून कवीने स्वतःची सुटका करून घेतली आहे.

बदल आणि विकास हा सृष्टीचा नियम आहे. हें ध्यानांत घेऊन नव्या नव्या युगाचे तेज मुरवून घेतलें नाहीं तर समाज मागे पडतात. रा. देशपांडे यांनी हें सर्व फार परिणाम-कारक रीतीने सांगितलें आहे. प्राचीन शिल्पाचें गूढ सौंदर्य पाहून मन आनंदित होतें न होतें, तोंच असा विचार मनात येतो की, हें सर्व नष्ट का झालें ? कवि सांगतात—

"आधीं पोखरली जाते संस्कृति, तिच्यांतील तेज नाहींसें होतें,
लयाला जातें विचारसामर्थ्य, बनतात विद्या तात्त्विक केवळ
निरुपयोगी, चैतन्यहीन, विसंगतच लोकजीवनाशीं."

आणि याचा शेवट काय होतो ?—

"हळू हळू मग नाहींसें होतें, सामर्थ्य देखील स्वसंरक्षणाचें."

रक्षणतंत्राची केलेली अवहेलना हिंदु संस्कृतीला नडलेली आहे. शिवाय समष्टिवादाचा विचारच हिंदु संस्कृतीने टाकून दिलेला आहे. निदान अलीकडल्या कांही शतकांच्या इति-हासावरून तरी असें खात्रीच म्हणता येईल. व्यक्तिवाद, पंथोपपंथ, जीवनविषयीं औदासीन्य, कणखर वृत्तीची उपेक्षा इ० अनेक कारणांनी प्राचीन वैभव केवळ स्मृतिशेष होऊन

राहिलें. रा. देशपांडे यांनी या अवकळेनें हृदयद्रावक वर्णन करून नव्या समष्टिधर्माचा मंत्रोच्चार केला आहे.

"जेव्हां राहतात सारेच लोक; ओळखून जीवनैक्य सर्वांचें
तेव्हांच नांदतें शक्तिसामर्थ्य, स्वरक्षणाचें, प्रतिकाराचें."

"अिह जगाला व मानवदेहाला तुच्छ मानणाऱ्या आणि मानवधर्माला विरोध करणाऱ्या तत्त्वज्ञानाला थारा देअू नका." असा आशावादी गंभीर ध्वनि या मनोहर काव्यात ठायीं ठायीं दिसतो. रा. देशपांडे साक्षात्कारवादी कवि असले, तरी विरक्तवृत्तीचे किंवा समाज-पराङ्मुख नाहीत. कुठलाहि सौंदर्यपूजक तसा होअूच शकत नाही. 'जीवनकामेष्टि'यज्ञाला त्यांनी गर्जून केलेलें आमंत्रण अैकून

"जगतेर आनन्दयज्ञे आमार निमंत्रण, धन्य हल हल मानवी जीवन!"

या रवीन्द्रांच्या सुविख्यात द्विपदीची आठवण झाल्यावाचून राहात नाही.

या वैशिष्ट्यपूर्ण काव्याला सुबक मुद्रणाची जोड मिळाली आहे ही आनंदाची गोष्ट होय. काव्यात आलेल्या स्थळाचीं व अुल्लेखाचीं स्पष्टीकरणें शेवटी दिल्याने काव्यरसिकाची सोय झाली आहे. भव्य, करुण कल्पनाप्रमाणेच पानोपानीं आढळणारीं सुबक चित्रें डोळ्यांना आल्हाद देतात.

हें काव्य मुक्तछंदात नसतें तर बरें झालें असतें, असे मात्र म्हटल्याशिवाय राहवत नाही. मुक्तछन्द हा सुकर आहे. यमक व गणमात्रा यांचीं बंधनें त्याला नाहीत, म्हणून कवीच्या स्वैर कल्पकतेला तेंच माध्यम परिणामकारक होअील, असं रा. देशपांडे याना वाटतें. रा. देशपांडे याची निष्ठा अेवढी मर्यादितहि नाही. आधुनिक कवितेला आलेली अवकळा नाहीशी करून तिला पुनः प्रभावसपन्न करण्याचें सामर्थ्य मुक्तछंदात आहे, असा रा. देशपांडे याना विश्वास वाटतो. प्रचारकाला ही श्रद्धा शोभण्यासारखी असली, तरी काव्यरसिक ती तशीच पत्करतील असें मात्र नाही.

बंधनाची सक्ति पत्करून त्यातून आपला विलास दाखविणें, हें तर कलेचें रहस्य आहे. नृत्यगायनादि कलात आपण हेंच पाहतों ना की तालाचीं, सुराचीं व लयीचीं अनंत बंधनें संभाळून कलाकार आपली कुशलता प्रकट करीत असतो! 'बंधनें नकोत' या तत्त्वाची अंतिम सीमा गाठावयाची तर ५ व ६ अक्षराच्या 'लगत्त्वभेदातीत' पदाचें तरी बंधन कशाला! आणि लय हा काव्याचा आत्मा मानल्यानंतर गणमात्रानी सिद्ध होत जाणारा सूक्ष्म-सूक्ष्मतर लय हा अधिकाधिक सौंदर्यच्छटा दाखविण्यास समर्थ ठरणार नाही काय!

अशा दोनहि सवालांचें या मुक्तछंदपंथाचे प्रणेते समाधानकारक अुत्तर देतील असें वाटत नाही. अकुशल कवि हुरळून जाअून या छंदानें अनुकरण टूम म्हणून करतील हा धोका आहेच. कारण या गद्यप्राय निर्यमक रचनेचें अनुकरण करणें फार सोपें आहे. पण हा मुद्दा रा. देशपांडे यांना अप्रस्तुत वाटेल म्हणून सोडून दिला, तरी हा मोठा प्रश्न अुरतोच की, रा. देशपांडे म्हणतात त्याप्रमाणे, खरोखरच आधुनिक कवितेला आलेली मंदी छंदोरचनेच्या संरक्षक बंधनांनी आलेली आहे काय? आणि मुक्तछंदाचा खुला व्यापार सुरू होताच अेकदम तेजी येअील काय? रा. देशपांडे याना सविनय सांगावेंसें वाटतें की, केवळ शब्दरूप शरिराच्या बंधनाने मराठी कवितेची प्रगति खुंटलेली नाही. कवींना नवी दृष्टि, प्रतिभा, अभ्यास आणि सहृदयता असेल तर गणमात्राच्या जुलमातूनहि नवीन सरस कृति ते निर्माण करतील. आणि परिस्थितीं-

तील ४ था लेख वाचला तर देशपाड्यानाहि या गोष्टीची मनोमन खात्री पटलेली आहे असें दिसून येअील. असो.

काव्याच्या शब्दस्वरूपाबद्दल मतभेद असला तरी रा. देशपांडे यांचें हें काव्य अत्युत्कृष्ट आहे. अव्यवस्थितरणें पसरलेल्या मुक्तछंदाच्या आमृड लांब ओळींतून भव्यता व अुत्कटता ठिकठिकाणीं प्रतीत होते.

"अमलात जरी आज वामन, बाट खुंटलेले, खुजटलेले,
दबले, दाबले चारी बाजूनीं, तरीहि धरा त्रिविक्रमरूप,
दावा पायाखालीं बळी काळाला."

हा 'भग्नमूर्ती'च्या तोंडून कवींनी वदविलेला संदेश दुर्लक्ष नाही असें कोण म्हणेल ! आणि म्हणून मुक्तछंदाच्या चौकटींत जरी ही काव्यवाणी वेडीवाकडी बसविलेली असली तरी तिचें सप्रेम स्वागत करून मी म्हणेन — "पात्र सोन्याचें असो मृत्तिकेचें, वेड मजला आतल्या अमृताचें."

महाराष्ट्राचे नामवंत कवि यशवंत यांनी काव्यकिरीट हें काव्य बडोद्याचे अधिपति महाराज प्रतापसिंह याच्या राज्यारोहणाच्या शुभ प्रसंगानर रचिलें आहे. हें काव्य प्रासंगिक आहे, म्हणून अपेक्षागर्भ दृष्टीने त्याकडे पाहण्यात येअूं नये. कारण ते रचणारा कवि प्रतिभाशाली कलावंत आहे; (त्याला जीवनाविषयीं आस्था आणि कळकळ आहे; सामान्य जनांच्या भावनांना वाचा फोडून त्याने लोकप्रियतेचें शिखर गाठलें आहे,) 'राजकवि' होण्याच्या आधी आणि नंतरहि 'लोककवि' या पदवीचा अभिमान त्यानें वाहिला आहे. पण याहिपेक्षा महत्त्वाची गोष्ट म्हणजे ह्या काव्याची भूमिका प्रासंगिक आहे, याची जाणीव स्वतः कवीला आहे; आणि म्हणूनच ते काव्य चिरस्थायी स्वरूपाचें कसे होअील याविषयी त्याने आस्थापूर्वक खटपट केली आहे.

कवि नगरप्रवेश करीत 'पेशीनर' प्रथम आपली ओळख करून देतो. बडोद्याचे व आपले ऋणानुबंध किती जिव्हाळ्याचे आहेत, हे कवीने थोडक्यात पण चटकदार रीतीने दाखविलें आहे. बडोद्यातील सुविख्यात नररत्नांचे उल्लेख मार्मिक आहेत. यापुढे पुण्यश्लोक सयाजीराव गायकवाडाच्या स्वर्गारोहणाचा प्रसंग हृदयस्पर्शी शब्दात वर्णिला आहे. नंतरचीं प्रकरणें प्रतापसिंहाच्या राज्यारोहणाच्या वर्णनाची आहेत. अुपान्त्य प्रकरणात रामराज्याचें 'भविष्यदर्शन' आहे आणि 'समर्पणा'त हा काव्यसंपदेचा बहुमोल नजराणा नृपतीपुढे ठेविलेला आहे हें नम्रपणे सागून कवि राजेश्वरास म्हणतो—

"मानावया नलगे अुणा हा भूपणाहुनि आयना, रिझवील दर्पण आपणा, भूपा परी अितरे जना."

हें काव्य लिहिणें अेकापरीने अत्यंत अवघड होतें. अशीं काव्यें सामान्यतः प्रतिभाहीन पद्यकारच करतात, हा समज जनतेच्या मनात दृढमूल झालेला आहे. आणि तो फारसा गैरहि नाही. तेव्हा या कामाला अुज्ज्वल परंपरेचा आधार नाही. वातावरण सरजामी युगातले. तें आधुनिक लोकसत्ताप्रधान युगकल्पनांशी शोभेल अशा थाटात रंगवावयाचें म्हणजे केवढी अवघड कसरत ! 'नृपतिजनपदां'ना अेकाच काव्याच्या जोरावर संतुष्ट करणें जवळ जवळ अशक्यप्रायच होतें. पण ही अत्यंत कठीण कामगिरी यशवंतानी यशस्वी रीतीने पार पाडली आहे. याबद्दल त्याचें अभिनंदन करावें तेवढे थोडेच होअील.

काव्याचा थाट आदर्श (classic) कवितेचा आहे. पण त्याचें आवाहन लौकिक आहे. बडोद्याच्या राज्यारोहणप्रसंगीं दरबार अनेक झाले पण 'पटेल-मतादारा'चा व 'तैनाती नोकर

लोकां'चा असे दोनच दरबार वर्णनांकरिता अन्चलून यशवंतानी आपली लोकाभिमुखवृत्ति दाखविली आहे.

"असें असो तव शासन धोरण । व्हावें अनचें दैन्य निवारण ॥
जनीं पटो विश्वास 'नृपवत्ता–दर दिन मंगळ, सुवर्णदिन सण' ॥

* * *

"करुं अम्ही आपलें काम । पुरेसा दाम ॥
द्या अम्हा; आमुच्या मिळो श्रमाने । प्रभो, तुम्हा आराम. ॥"

लोकसत्ताक राज्याच्या अध्यक्षाला किंवा अशाच्या जनाग्रणीला जनता ज्या प्रकारें आळवील तशीच ही विनवणी आहे. 'कैद्याची मुक्तता' हें प्रकरण अत्यंत व्यापक सहानुभूतीनें आणि अधिक आधुनिक विचारांनी मंडित असें आहे.

"गुन्हेगार का हे, गुन्ह्याच्या केवळ लोभानें—
झाले कीं अथवा घोरतर जीवनकलहाने !"

असा विचारप्रवर्तक प्रश्न यशवंतानी आपल्या भेदक शब्दात विचारला आहे. हें प्रकरण वाचताना 'काव्यकिरीटा'ची प्रासंगिक बैठक आपण पूर्ण विसरून जातों, आणि 'बन्दीशाळे'चा अुत्कट भावनावेग आपल्या पुनः अेकदा प्रत्ययाला आल्यासारखा वाटतो. आपल्या लौकिक व जनताभिमुख तत्त्वज्ञानाचा कवीला कुठहि विसर पडत नाही. आणि म्हणूनच अन्नसंतर्पणाचें वर्णन असो अथवा 'कीर्तिमंदिरा'चे गुणगान असो, केव्हा अुपदेशकाची तर केव्हा तत्त्वज्ञाची भूमिका घेअून कवीने आजच्या युगधर्माची आणि शाश्वत मानवतेची ओळख जागोजाग करून दिलेली आहे.

आणि या मर्यादा संभाळून केलेली राजप्रशस्ती व राज्यारोहण वर्णनें, कलेचे अुत्तम नमुने म्हणून कायम राहतील. 'तीर्थास आवाहन' ह्या प्रकरणातील अुदात्त सुंदर शब्दरेखन अितके हृदयंगम आहे की, ते वाचून 'ना विष्णुः पृथिवीपतिः' या तत्त्वाचा निस्सीम अुपासक आणि 'This land is for those who work on it' असें गर्जणारा समाजवादी, या दोघानाहि सारखाच आल्हाद वाटावा.

"किती बलाढ्य राजर्षींचे– औकिले तुवा पोवाडे
दूरदूरच्या योद्ध्यांचे– तव पात्रीं न्हाले घोडे
जन्ममृत्युचे कितिकांना– तव तटीं सुकविले ग्वोडे
होतात खुलीं मोक्षाचीं– तव तीरावरति कवाडें;
अगाध तीर्थापगा अशी तूं अगणित गुणशालिनी; अशी तू अगणित गुणशालिनी;
तरि करि मंगलकार्य साजिरे मम गेहीं येअुनी"

हें गंगामाअीचें महिम्नस्तोत्र कोणास प्रातःस्मरणीय वाटणार नाही !

यशवंत भाषाप्रभुत्वाच्या बाबतींत कुशल शिल्पी आहेत. मार्गीच वृत्तें, जाति आणि छंद ते सारख्याच कौशल्याने हाताळतात. विक्रमसाच्या भाषानगरला 'स्वानंदसम्राट'सारखें लयदारवृत्त यशवंतरावानी घेतलें; या अेकाच गोष्टीवरून त्याच्या योजकतेची साक्ष पटेल. या वृत्तात "युवराज तैसे गुण भूषणांनी" या ओळीमध्ये दोन वेळा दोन लघु आणून कवीने गणरचनेचे कामीं थोडें शैथिल्य दाखविले आहे. पण सर्वच रचना निर्दोष स्फटिकासारखी असल्याने अेखादा दोष विशेष जाणवतो. 'मंदाक्रान्ता'सारख्या प्राचीन सुसंस्कृत वृत्तापासून तों 'पुकार' चित्रपटातल्या आधुनिक ढंगदार चालीपर्यंत, अनेक वृत्तप्रकार व जातिप्रकार

कौशल्याने वापरून यशवंतानी काव्याला पैलुदारपणा आणला आहे. (सुबक संस्कृत शब्दांना त्यांचें सौंदर्य अधिक खुलेल अशी जागा पाहून देण्यात यशवंत वाकबगार आहेत. 'आयुपर्थी' असा एखादा सदोष समास मध्येच लागतो. पण अशीं स्थळें सुदैवाने 'काव्यकिरीटां'त हुडकूनच काढावीं लागतील.

(वर्णनाच्या भरांत तोल सुटलेला कुठेहि दिसत नाहीं.) तथापि 'कीर्तिमंदिरा'चें गुणगान करताना ताजमहालाला कमीपणा देण्यात यशवंतांनी काहीसा अन्याय केला, हें मात्र खेदाने म्हणावें लागतें. हा कमीपणा स्पष्ट दाखविला नसला तरी सूचित केला आहे. कै. बा. अ. भिडे याना लेणीं पाहून ताजमहालाला शिव्या देण्याची लहर आली त्या प्रकाराचीच ही नवी आवृत्ति दिसते! असो.

हें काव्य यशवंताच्या कीर्तींत भर घालणारें आहे यात शंका नाही. साध्या करमणुकीच्या खेळाच्या वर्णनातहि तात्त्विक चिंतनाची रोपनाई यशवंतानी केली आहे. राजाला उपदेश करताना मानवतेचा विशाल दृष्टिकोण त्यानी घेतला. अर्थात् तत्त्वज्ञान वर्गसलोख्याचें आहे. आणि काव्याची भूमिका लक्षात घेता तें तसेंच असावयाचें. परंतु प्रथमच सांगितल्याप्रमाणे केवळ प्रासंगिक स्वरूपाचें हें काव्य नव्हे ही गोष्ट केव्हाहि विसरली जाऊं नये. या दरबारी काव्याला सजावटहि तशीच उंची मिळाली आहे.

---

## नाटक

१ श्रुतिगुण-नाटिका— लेखक– श्री. शंकर बळवंत तळेकर; प्रकाशक– गोडबोले आणि गोडबोले, २६५, बुधवार, पुणें शहर; मूल्य २ रुपये.

२ हवेवर— लेखक– श्री. शामराव नीलकण्ठ ओक, बी. कॉम्.; प्रकाशक– शंकर नरहर जोशी, १०२६, सदाशिव पेठ, पुणें २; किंमत १। रुपया.

३ गृहपाश— लेखक– प्रा. डॉ. नरहर काशीनाथ घारपुरे, एम्. ए., एल्‌एल्. बी., पीएच्. डी., एम्. टी. सी.; डॉ. यशवंत गंगाधर लेले, बी. ए., बी. एस्‌सी. डी. एस्‌सी.; प्रकाशक– विष्णु बळवंत लिमये, ६०८, सदाशिव पेठ, पुणें २; किंमत १ रु.

४ घरंदाज— लेखक– प्रो. ना. बा. पराडकर, एम्. ए.; प्रकाशक– लक्ष्मण नारायण चापेकर, १९८ (१७) सदाशिव, टिळक रस्ता, पुणें २; किंमत १२ आणे.

५ सर्वदमन— लेखक– श्री. रा. न. कीर्तने, एम्. ए.; प्रकाशक– गो. पु. रानडे, ६१७ शनिवार, पुणें २; मूल्य १२ आणे.

ज्यांचे प्रयोग केवळ ऐकण्यासाठीच होतात, पाहण्यासाठी नव्हेत; अशा प्रकारच्या नाटिकांच्या लेखन-तंत्रावर 'श्रुतिगुण नाटिका' या निबंधात बरीच विस्तृत चर्चा केली आहे. या विषयावरचें मराठींतील हे बहुधा पहिलेंच पुस्तक असावे. याच्या पूर्वार्धांत श्रुतिनाटिकेचें लेखन-तंत्र-विधान सांगितलें असून, उत्तरार्धात निबंध-लेखकानीच लिहिलेल्या 'रिकामी राणी', 'मारगमळा-पिकनिक्', 'पुनर्मीलन' व 'संक्रांतीचा वसा' या चार श्रुतिगुण नाटिकाहि छापल्या आहेत.

श्रुतिगुण-नाटिका हा नवीनच वाङ्मयप्रकार असल्यामुळे, आरंभीं त्याचें स्थान व महत्त्व निश्चित करण्यासाठी लेखकाने त्याची रंगभूमीवरील नाटक व चित्रपट सृष्टींतील नाटक यांच्याशीं तुलना करून, त्यातील साम्यें व भेद बरेचसे बारकाईने दाखविले आहेत. या

पुस्तकाचा हा भाग अश्यमनीय आहे. रंगभूमि व चित्रपटसृष्टि यांतील नाट्यविषयक मर्यादा दर्शवून या दोनहि क्षेत्रापेक्षा श्रुतिगुण नाटिकाच्या क्षेत्रामध्ये लेखकाच्या नाट्यगुण प्रकटनाला अधिक अवसर असतो, असें सिद्ध करण्याचा लेखकानी अभिनिवेशाने प्रयत्न केलेला दिसतो. अेकदा अेखाद्या बाजूची कैफियत माडण्याचें पत्करलें, म्हणजे असें होणें फारसें अस्वाभाविक किंवा दोषाई आहे, असें म्हणता यावयाचें नाही. अुलट रगभूमी व चित्रपट याच्या शक्यता, शक्ति व अुपयुक्तता याच्याबाबत त्यानी अभिनंदनीय सयम व समजुतदारपणा दाखविला आहे; असेंच म्हणावें लागेल. नाटक, मग तें रगभूमीवरील असो, चित्रपटातील असो, की नभोवाणीवरील असो, त्यातील मौलिक नाट्यतत्त्व भिन्न असू शकत नाही. माध्यमभेदामुळे, म्हणजे माध्यमाच्या शक्यता व मर्यादा याच्या सापेक्षाने, जो काही फरक पडेल तो त्या नाटकाच्या तात्त्विक आविष्कार पद्धतींत. या तिन्ही माध्यमाच्या शक्यता व मर्यादा याचा खुलासा श्री. तळेकर यानी चागल्या रीतीने केला आहे; आणि त्यानीच सागितलेल्या श्रुतिगुणनाटिकांविषयक मर्यादा अेकत्र संकलित केल्या, तर त्याना अभिप्रेत असलेलें, रंगभूमीवरील व चित्रपटातील नाटकापेक्षा श्रुतिगुण नाटिकाचें अुत्तरत्व, सिद्ध होणें कठीण आहे. अुदाहरणार्थ, अेक तर, हें माध्यम अेकदिश असल्यामुळे अेकाच मानवी ज्ञानेंद्रियाला संवेदनाक्षम आहे; दुसरें म्हणजे या नाटिकातल्या नटवर्गाला आपल्या श्रोत्याच्या मनावरील झालेल्या परिणामाच्या प्रतिक्रियातून प्रत्यक्ष स्फूर्ति वा मार्गदर्शन मिळूं शकत नाही; तिसरें, यंत्राचा सासुरवास; चवथें, प्रयोगकाराच्या अिच्छा, अधिकार, आवडीनिवडी याचें बंधन लेखक व नट याच्यावर पडणें; पाचवें, श्रोते कोणत्या अभिरुचीचे व विचाराचे असतील याची अनिश्चितता असणें; सहावें, दृश्याचा अभाव असून त्याचा आभास अुत्पन्न करण्याची आवश्यकता मात्र कायमच असल्यामुळे ध्वनिक्षेपणात घातलेले वेगवेगळे नाद, कंमातील क्रियासूचकें व्यक्त करण्यासाठी संवादातूनच सामील केलेलीं अनवश्यक वाक्यें, यामुळे नाट्य लेखनात व प्रयोगात कृत्रिमता अुत्पन्न होणें; अशा अनेक मूलभूत आणि अगभूत मर्यादा श्रुतिगुण विधानात आहेत; व यामुळे पूर्वोक्त दोन माध्यमांवरील त्याचे वरिष्ठत्व ही अेक कल्पित कथा होय. या तिन्ही माध्यमाना स्वतःचें स्थान, स्वतःचें कार्यक्षेत्र व स्वतःची उपयुक्तता आहे याबद्दल वादच नाही; परंतु त्यात जर अुच्च कनिष्ठत्व दाखवावयाचेंच असेल तर श्री. तळेकर यानी अनवधानाने आपल्या म्हणण्याच्या पुष्ट्यर्थ पृष्ठ ४५ वर अुद्धृत केलेल्या सायरिल्‌वुड् याच्या अेका अवतरणातूनच ते प्रकट झाले आहे. सायरिल् वुड् यानी प्रयोगकार या नात्याने ब्रिटिश ब्रॉडकास्टिंगमध्ये सतत सात वर्षे काम केलें असल्याचें श्री. तळेकर यानी तेथेंच सागितलें असल्यामुळे तर या अवतरणाला विशेष महत्त्व येतें; व त्या लेखकाने नटाला रंगभूमीवर काम करण्याला लायक बनवण्यासाठी, नभोवाणीची प्राथमिक शाळा म्हणून जी तरफदारी केली आहे, ती विशेष रीतीने नजरेंत भरल्यावाचून राहत नाही. परंतु अेकंदरींत, अभिनिवेशामुळे अुत्पन्न झालेली अप्रमाणशीरता सोडली, तर हे पुस्तक लिहून श्री. तळेकर यानी मराठी वाङ्मयात अेका अुपयुक्त व आज अत्यंत आवश्यक असलेल्या पुस्तकाची भर घातली आहे यात शका नाही. श्री. तळेकर याच्या या पुस्तकात अतर्भूत केलेल्या श्रुतिगुण-नाटिका मात्र त्याच्या तात्त्विक विवेचनाअितक्या परिणामकारक नाहीत. वाङ्मयदृष्ट्या त्याचा दर्जा काय आहे, हें जरी क्षणभर बाजूला ठेवले, तरी श्रुतिगुण-नाटिकाच्या लेखनविधानात आवश्यक म्हणून त्यानी जे गुण सागितले आहेत, त्याचाहि त्यामध्ये अभावच दिसून येतो.

परंतु श्रुतिगुण–नाटिकाचा दुसराहि अेक संग्रह नुकताच प्रसिद्ध झाला आहे. तो या दृष्टीने जास्त प्रशंसनीय आहे. श्री. श्यामराव ओक याच्या अकरा नाटिकाचा 'हवेवर' हा तो

संग्रह होय. यातील 'छडी न घेतां गेलेली नटी', 'त्याचा धंदा', 'कोंडीबा टिन्मेकर', 'असना बाप' व 'विकार' या नाटिका अिंग्रजींतून रूपांतरित केल्या असल्याची कबुली खुद्द लेखकानीच दिलेली आहे. बाकीच्या सहापैकी 'शुक्र संजीवनी', 'ब्रह्मचारी वऱ्हा', 'निकडीची सोयरीक', 'मुलगी पहायला' व 'लोकसेवा' या स्वतंत्र असून 'विहिरींतला जीव' ही अेक नाट्यछटा आहे. 'हवेवर'मधील नाटिकांची भाषा सुबोध, घरगुती आणि प्रवाही असून त्यातील संवाद आटोपशीर, अकृत्रिम व ठसकेबाज आहेत. नाट्यप्रसंग व पात्रांचे स्वभाव यात स्वभावजन्य विकृती व विरोध याचा मूलतःच अंतर्भाव केला गेला असल्यामुळे, सरस विनोदनिर्मितीला त्यात भरपूर अवसर मिळतो व चमत्कृति, सुरस अित्यादि नाट्यगुणांचाहि प्रभावी प्रकाश त्यात पसरलेला आढळतो. रूपांतरित नाटिकांची भाषा अेकंदरींत अितकी मराठी वळणाची आहे की, क्वचित् प्रसंगीं त्यातील विषयाचा व वातावरणाचा परकीयपणा आड आला नसता, तर त्या रूपांतरित आहेत, हें ओळखणेंहि कठीण झालें असतें.

डॉ. न. का. धारपुरे व डॉ. य. गं. लेले या डॉक्टरद्वयाने 'गृहपाश'ला जर्मन भाषेंतून मराठींत आणलें असून 'गृहप्रवेश' या आपल्या प्रास्ताविक निवेदनात हरमान् सुडरमान् याच्या हायमाट्च्या 'आधारें' प्रस्तुत नाटक लिहिलें आहे, असें त्यानी सांगितले आहे. यावरून तें भाषांतर किंवा रूपांतर नसून, ती जवळ जवळ स्वतंत्र अशी कृति आहे, असें सूचित करण्याचा त्याचा हेतु दिसतो. परंतु असे करण्याअैवजीं लेखकानी मूळ नाटकाचें सरळ व सुबोध भाषांतर करण्याचा प्रामाणिकपणा दाखविला असता, तर धड जर्मन समाजाचें चित्र नाही, व धड महाराष्ट्रसमाजाचेंहि प्रतिबिंब नाही; अशी त्याची अर्धवटगी व 'अितो भ्रष्टस्ततो भ्रष्टः' अशी जी केविलवाणी अवस्था झाली आहे, ती तरी टळली असती.

लष्करी अधिकारीवर्गाची सामाजिक प्रतिष्ठा, त्या वर्गाच्या खानदानीच्या कल्पना, लष्करी पेशाव्यतिरिक्त अितर पेशाना हीन व तुच्छ गणण्याची त्याची वृत्ति, घराण्याचा मोठेपणा टिकविण्याचा त्याचा आत्यंतिक अट्टाहास अित्यादि विशेष जर्मनी व जपान या दोन देशातील समाजरचनेंत तेवढेच काय ते प्रामुख्याने दिसून येतात. हायमाट्मधील समस्या व तिचें वातावरण हें यामुळे अगदी पूर्णपणे जर्मन-देशविशिष्ट स्वरूपाचें आहे. त्या नाटकात जर्मन माणसाला जें सौंदर्य आढळून येते, जी वास्तविकता दिसते किंवा त्याबद्दल त्याला जो जिव्हाळा वाटतो, तो केवळ त्यातील वातावरणाबद्दल व विचारसरणीबद्दल त्याला जी आपलेपणाची भावना असते, तिचा परिणाम आहे. सुडरमानच्या 'मागडा' किंवा 'जॉय् ऑफ लिव्हिंग' यांहि नाटकांची जवळ जवळ अशीच स्थिति असून, सामान्यतः सुडरमानचीं नाटकें, रूपांतरात ज्याचें मूळचें सामर्थ्य, सौंदर्य व वैशिष्ट्य उतरूच शकत नाहीत, अशा प्रकारचीं आहेत असे म्हणता येअील. त्याची वास्तविक शक्ति व सौंदर्य कळण्यास तीं मूळ जर्मनमध्ये वाचणेंच आवश्यक आहे; आणि दुय्यम पक्ष स्वीकारावयाचाच असेल, तर केवळ भाषान्तर करण्यापलीकडे त्यावर आणखी काही शस्त्रक्रिया करण्याचा प्रयत्न करणे, म्हणजे मूळ ग्रंथकाराशीं प्रतारणा करण्यासारखें आहे.

'गृहपाश'च्या विद्वान् लेखकानी सुडरमानशीं अशी प्रतारणा केली आहे यात संशय नाही; कारण त्यात दाखविलेला सनातनी लष्करी वर्ग, त्या वर्गाच्या प्रतिष्ठेच्या कल्पना, त्याची कौटुंबिक विचारसरणी व राहणी हीं केवळ नावापुरतीच आणि लेखक सांगतात म्हणूनच, आजच्या किंवा अुद्याच्या महाराष्ट्रांतील आहेत असे म्हणता येअील. स्वाभाविकच 'गृहपाश' नाटकातील सर्व पात्रांना स्वभावपरिपोष, त्यांचें वागणे, बोलणे, त्याचे विचार महाराष्ट्रीय

माणसाला कृत्रिम, अवास्तव व परके वाटतात. चाळीस पन्नास वर्षांपूर्वीच्या जर्मनीमधील लष्करी वर्गातील अेखादा सेवानिवृत्त पुराणपुरुष आणि त्याचे संबंधी, यांच्या कलेची अुपासना करणाऱ्या व्यक्तींच्या सामाजिक दर्जाच्या आणि प्रतिष्ठित अप्रतिष्ठितपणाबद्दलच्या कल्पना, आजच्या किंवा अुद्याच्या महाराष्ट्राच्या परिस्थितींतील म्हणून रंगविण्याअितका दुसरा कोणताहि कलात्मक विपर्यास असूं शकेल असें वाटत नाही. अर्थातच ज्या पात्राविषयी व ज्या परिस्थितीविषयी नाट्यरचना करावयाची, ती परिस्थिति व तीं पात्रे मुळातच अशीं चुकीचीं, खोटीं व अवास्तव असतील, तर त्याच्याविषयी जे सांगितलें ते परिणामकारक व पटण्यासारखे कसे होणार ! आणि यामुळे मूळ हायमाट्शीं ज्याचा परिचय नाही, त्याना स्वाभाविकच ही अुणीव मूळ ग्रंथातील असावी, असा संदेह अुत्पन्न झाल्यावाचून कसा राहणार ! अेवढ्याचसाठी 'हायमाट्'चें रूपान्तर करण्यात 'गृहपाश'च्या लेखकानी मूळ लेखकाशीं प्रतारणा केली असे वर म्हटलें आहे.

अेकीकडे 'गृहपाश'च्या लेखकानी आपली सामान्य प्रतिकृति हरमान् सुडरमान्च्या हायमाट्वर आधारलेली आहे असे सांगून, बिचाऱ्या सुडरमान्च्या नाट्यलेखन कौशल्याबद्दल मराठी वाचकाच्या मनात शंका व अनादर अुत्पन्न करण्याची शक्यता निर्माण करून ठेवली आहे, तर दुसरीकडे प्रा. ना. वा. पराडकर यानी अुघड अुघड रूपांतरित दिसणाऱ्या आपल्या 'घरंदाज' नावाच्या दत्तक नाट्यापत्याचे पहिले घराणे व नाव कोणते, याचे संशोधन करण्याचें काम न सांगताच टीकाकारावर व वाचकावर सोपविलें आहे. अर्थात् ते होअीपर्यंत 'घरंदाज' आपली औरस संतती, अगदी शंभर टक्के स्वतंत्र कृति आहे असें समजलें जावें, अशी त्याची अिच्छा असावी; परंतु या दृष्टीने त्यांचे प्रस्तावनेतील निवेदन मात्र अितकें निर्लेप आहे की, अुद्या 'घरंदाज' अमुक अेका नाटकाचे रूपान्तर आहे, असें निश्चित सिद्ध झाले तरी त्या निवेदनातील अेकाहि वाक्याला बाध येअु शकणार नाही. कारण त्याच्या पहिल्या छेदकातील रुवेच वाक्यातून कर्तृपद गुप्त असून प्रथमपुरुषी प्रयोग स्पष्टपणें असा कोठेहि केलेला आढळत नाही.

'गृहपाश' व 'घरंदाज' या दोन्ही नाटकाचे विषय— घराण्याचा लौकिक— कुलीनपणाचा अभिमान—जवळ जवळ सारखेच आहेत. कथानकातील घटना व पात्रांचे स्वभाव परिपोष यामध्येहि अंधुकशी समानता आहे. मात्र 'घरंदाज'मध्ये कुलीनतेचा बडेजाव माजविणारी व्यक्ति एक विवाहित स्त्री आहे, तर 'गृहपाश'मध्ये तो एक वृद्ध व सेवानिवृत्त असा मुलीचा बाप असलेला पुरुष आहे, हा फरक आहे. या दोन नाटकातील परिस्थितीची तुलना करता "घरंदाज," "गृहपाश"पेक्षा आधुनिकतर वाटतो व त्यातील आचारविचार व वातावरण आजच्या किंवा उद्याच्या महाराष्ट्राच्या वातावरणाशीं, आचार विचाराशीं आणि परिस्थितीशीं अधिक मिळते जुळते आहे. भाषेच्या दृष्टीने 'गृहपाश'मधील बोजड व बेगरूळ वाक्यरचना, कोणत्याहि दृष्टीने, जिला शैली हा शब्द लागू पडेल अशा सुसंघटित व घाटदार अवस्थेला पोहोचलेलीच नाही; तर याच्या अुलट घरंदाजची भाषासरणी, निश्चितपणें साध्या, सफाअीदार, मोहक व ओघवती भाषाशैलीचें अुदाहरण म्हणून दाखविता येण्यासारखी आहे. अर्थात् याला अपवाद म्हणून,— 'काय ती मस्था आणि काय तिचं काम ! अगदीं अंगावर शहारे येतात ! चारचौघात काही उत्सुकतेने बोलावयाला नको." "तिच्या आणि माझ्या डोळ्यातील सारखेपणाशिवाय आमच्यात कांहींच सारखेपणा नव्हता !" "आपला नवरा चांगला आहे असा कोणत्याहि स्त्रीनं अभिमान बाळगू नये. तो तसा चांगला असता तर तिलाच वश झाला नसता." "मंजुळा मावशी, तू तर शाळेत जाणाऱ्या मुलीसारखी

दिसतेस!" "म्हातारपणाला त्या ड्रेसिंगरूमच्या बाहेर डोकावूंच देत नाहींत आणि इतरांना ड्रेसिंगरूममध्यें डोकावूं देत नाहींत. ड्रेसिंगटेबलावर जरी दांत विराजमान होत असले तरी बाहेर लोकाना वाटतें की, अजून दुधाचे दातच कायम आहेत." "अेखाद्या बाओवरून पुरुष भाळूं लागले कीं मला वाटतं, आहे जगण्याजोग काहीं." अशीं अुघड अुघड अिंग्रजीचीं भाषांतरें वाटणारीं काही बेडौल वाक्यें दाखविता येतील. त्याचप्रमाणे, "यशापयशता" "सुहासिनीम् सुमधुरभाषिणीम् अशी आपली मातृभूमि आहे." यासारखी प्रमादयुक्त शब्दयोजना किंवा "कुलीनपणाचा बडेजाव" याबद्दल "कुलशीलाचा बडेजाव" या शब्दसमूहाचा ठिकठिकाणीं केलेला चुकीचा वापर, यासारखीं स्थळें क्वचित् कोठे आढळतील; पण एकंदरींत नाटकातील बहुतेक सर्व संवाद सुटसुटीत, सरस आणि साभिप्राय आहेत; असेंच दिसून येअील. नाटकाचें कथानक व त्याचा विकास हीं सुसूत्र व सुसंगत आहेत. परंतु नायिकेची कुलीनपणाची कल्पना आणि तिला आपल्या नवऱ्याच्या सामाजिक कार्यामुळे त्याचा दुसऱ्या स्त्रीशीं संबंध येअून त्या कारणानें त्याची आपल्यावरील प्रेमाची एकनिष्ठता ढळेल अशी वाटणारी भीति, या दुहेरी हेतूंनी कथानकातील अखेरच्या समरप्रसंगाचा परिपोष करण्याचा प्रयत्न केला असल्यामुळे, त्याच्या परिणामिक्याला बाध येअून त्याच्या अुत्कटतेलाहि धक्का बसतो व नाटकाची रचना तंत्रदृष्ट्या बहुतांशीं निर्दोष असूनहि वाचकाच्या मनाची आणि भावनाची पकड घेण्याच्या दृष्टीने तें कमजोर व निर्जीव वाटतें. तरीपण वर सांगितलेल्या दोन हेतूंपैकी दुसऱ्या, भावनात्मक, हेतूच्या विकासालाच नाटकात त्यातल्या त्यात जास्त अवसर मिळाला असल्यामुळें, समस्यापरिपूर्तीच्या बौद्धिक अपेक्षेनें वाचक जरी असंतुष्ट राहिला, तरी त्याचें रंजन व भावनात्मक आणि रसात्मक समाधान होते, यात संशय नाहीं. भावनाविष्कार हाच या नाटकाच्या यशस्वितेचा महत्वाचा घटक आहे. कुलीनतेचा अभिमान हा केवळ नैमित्तिक घटक म्हणून म्हटला जाअूं शकेल, कारण मंदाकिनीला सुहासिनीबद्दल वाटणारी घृणा तिच्या-अकुलीनत्वामुळे वाटते, असें जरी मंदाकिनी वर वर दाखवीत असली, किंवा तशी आत्मवंचना हि करून घेत असली, तरी तें कारण अगदी पोकळ आहे, हें सुहासिनीचें आपल्या बिघडलेल्या का होईना पण कुलीन अशा भावाशीं लग्न व्हावें, ही कल्पना तिला मानवते व त्या कल्पनेला ती अुत्तेजन देते, यावरून अुघड आहे. तिची मानसिक अस्वस्थता खरें पाहाता मत्सरजन्य आहे व यामुळे अकुलीनपणाच्या विरोधावर आधारलेला समर प्रसंगाचा जेवढा भाग आहे, तेवढा दुर्बल व परिणामहीन झाला असून, भावनात्मक संघर्ष तेवढाच प्रभावी व परिणामकारक ठरला आहे. यामुळे 'घरंदाज' नाटक वाचीत असता अेक तर दोन वेगवेगळ्या नाटकाच्या तात्त्विक भूमिकाचे संमीलन करून त्यानें कथानक तयार केलें असावें किंवा दुसरें म्हणजे अेखाद्या अेकांकी नाटिकेचा हा तीन अंकीं विस्तार केलेला असावा व त्यामुळे त्यात काहीसा ढिलेपणा व ठिसूळपणा आला असावा अशी कल्पना होते. वर अुद्धृत केलेलीं अिंग्रजी वळणाचीं वाक्यें, वुअिलची कल्पना व ते वाचलें जाण्याची औपचारिक योजना मंजुळा मावशीचें स्वभावचित्रण, अित्यादि 'घरंदाजा'मधील विशेषावरून त्याचें अनुवादात्मक स्वरूप अगदीं सहजानुमेय आहे; मग त्या बाळसेदार आगलटीच्या व सुंदर चेहेऱ्याच्या अपत्याचा जनक पिता कोण व त्या अपत्याचें मूळ नाव काय, हें त्याचे दत्तक वडील, प्राध्यापक ना. बा. पराडकर सागोत किंवा न सागोत.

प्राध्यापक पराडकर व डॉ. लेले-धारपुरे याच्या स्फूर्तिसरितेचा अुगम पाश्चिमात्य वाङ्मयातून झालेला असला, तर श्री. रा. न. कीर्तने याच्या स्फूर्तीचें अुगमस्थान गीर्वाणभारती

हें आहे. त्यांचा "सर्वदमन" 'मज नावडे थोराची ते करणी, काय करूं जी भगवंता' अशा अवगीने महाकवि कालिदासाच्या शाकुंतलातून बाहेर पडला आहे.

कालिदासाचें शाकुंतल किंवा त्याचा किर्लोस्करकृत मराठी अनुवाद यांचा परिचय नसलेला कोणी अेकादा रसिक महाराष्ट्रीय अस्तित्वात असला(!) तर त्याला 'सर्वदमन' अवश्य अतिशय आवडेल; नाहीपेक्षा प्रा. ना. मी. फडके यांनी श्री. कीर्तने यांना आपल्या पत्रात लिहिल्याप्रमाणे "आपल्या आधुनिक कल्पनांचा साज पुराणकालीन पात्रांवर घालून त्या कल्पना लोकांच्या गळीं अुतरवण्याचा प्रयत्न सहसा करूं नये. कारण अेक तर अशानी जुन्यातला अस्सल प्रसाद नाहीसा होतो व शिवाय पडद्याआडून बोलल्याचा भिन्नपणा पदरीं येतो." असेंच 'सर्वदमन'बद्दल कोणीहि म्हणेल. श्री. कीर्तने यांनी शाकुंतलातील कालिदासीय योगायोग टाळण्याचा प्रयत्न केला आहे. पण त्यांनाहि अखेरीस योजावी लागलेलीं चक्रवर्तिपदाचीं सामुद्रिक चिन्हे सर्वदमनाच्या हातावर अुमटविण्याची क्लृप्ति फारशी स्पृहणीय नाही.

प्रा. के. ना. वाटवे यांनी 'रा. कीर्तने यांची भाषा मोठी ठसकेबाज आहे. तडफ व त्वेष हाहि तिचा प्रसंगविशेषीं दिसून येणारा गुण असला तरी ती लाडिक शृंगारात व विलास विभ्रमांत अधिक मोकळेपणाने रंगते, तिच्यात कोटीबाजपणाहि आहे.' हें 'सर्वदमना'च्या भाषासरणीला दिलेलें प्रशस्तिपत्र अक्षरशः यथार्थ आहे, याबद्दल दुमत होअीलसें वाटत नाही.

---

## कथा-कादंबरी

१ ज्वाला—ले. माधव मनोहर, प्रकाशक— अुषा प्रकाशन, औंध, सातारा; मूल्य १॥ रु.

२ तिसरा प्रवाह—ले. पा. गो. लोहकरे; प्रकाशक - हे. ग. करमरकर, २० नारायण पुणें २; किं. १। रु.

३ आदिमाया — ले. प्रो. त्र्यं. रा. वनमाळी; प्रकाशक— पु. आ. चित्रे, जीवनसाहित्य, बडोदें; मूल्य १ रु.

४ तरतें पोलाद— ले. भा. वि. वरेरकर; प्रकाशक— हिरजी मोहनजी, शंकर बारीलेन, मुं. २; मूल्य २। रु.

५ विचित्र संसार— ले. श्री. बा. दा. गाडगीळ; प्रकाशक— मराठवाडा मनोरंजक ग्रंथ प्रसारक मंडळ, हैद्राबाद द.; मूल्य २ रु.

६ पुनर्भेट भा. ५— ले. य. गो. जोशी; प्रकाशक - ल. ना. चापेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, पुणें २; किं. १। रु.

७ चांदण्यांतील सावल्या— ले. दत्त रघुनाथ कवठेकर; प्रकाशक— कॉंटिनेंटल प्रकाशन, टिळक रस्ता; पुणें २; मूल्य २ रु.

८ कण्हेरीचीं फुलें — ले. वि. ग. भिडे; प्रकाशक— म. गो. जोशी, ६१३।१५ सदाशिव, पुणें २; किं. १॥ रु.

९ मंदज्योति— ले. वसंत हरि कटककर; प्रकाशक— कॉंटिनेंटल् बुक् सर्व्हिस, पुणें २; किं. १। रु.

वैवाहिक जीवनातील विवाहबाह्य प्रवाह दाखविणें हा प्रकार ललितवाङ्मयात, विशेषतः कादंबरीविभागात बराच रूढ झाला आहे. आणि त्याची लोकप्रियता अद्याप कायम आहे.

चालू पिढीच्या वैवाहिक जीवनात विवाहापूर्वी किंवा विवाहानंतर पत्नीखेरीज दुसऱ्या अेखाद्या स्त्रीचा परिचय वावरत असतो. आणि त्या परिचयास वैवाहिक जीवनात जागा न मिळाल्याने वैवाहिक जीवनाचें संगीत बेसूर होतें. कधी पत्नी तर कधी पति त्या वैवाहिक जीवनाशी झगडत असतात. हे झगडे भोवतालच्या समाजात दिसतात. त्यांचीं प्रतिबिंबें ललित वाङ्मयांत येणें अपरिहार्य आहे. परंतु नुसतीं प्रतिबिंबेंच येत नाहीत, तर त्या बदसूर जीवनावर लेखकाचें कांही भाष्यहि येतें; आणि त्यामुळे प्रत्यक्ष जीवनावर आधारलेल्या असल्या कादंबऱ्यामुळे वाद-विवाद माजतात. उदाहरणार्थ, ज्वाला या कादंबरीवर केवढीं वादळें माजलीं! माधव मनोहर नावाच्या अेका चिरयौवन वृत्तीच्या काव्यात्म भावनाशील तरुणाचें लोकविलक्षण जीवन या कादंबरींत रंगविले आहे. श्री. माधव मनोहर (लेखक-नायकाचे सनामधन्य मित्र) यानी चालू वाङ्मयात काही नवीन दाखविण्याच्या हिरीरीने हें तारुण्यसहज अतिरंजन रंगविलें आहे. नवमतवाद, साम्यवाद, ध्येयवाद, अित्यादि वादानी वाचक गाजले आहेत असें समजून, त्यानी ही अेका साध्याभोळ्या, भावनाशील पण दुबळ्या, निष्क्रिय युवकाची प्रेम (भंग) कथा सांगितली आहे.

प्रेम अव्यक्त राहिल्याने उत्पन्न झालेली फसगत, प्रेम असून प्रेमभंग, इत्यादि प्रकार वाङ्मयांत रूढ झालेले आहेत. परंतु विवाहापूर्वी युवयुवतींनी रात्ररात्र फिरणें, रात्ररात्र घराबाहेर तळ्याकाठीं बसून काढणें, एकमेकाच्या उन्मादकारी प्रमाथी स्पर्शसुखाने अनेक वेळा धुंद होऊनहि एकमेकाचें एकमेकावरील प्रेम अव्यक्तच राहणे, प्रेमभंगाच्या दारुण जीवनात एका तरुण परस्त्रीला आश्रय आणि सहवाससुख (उन्मादी!) देणें, इत्यादि भाग लोकविलक्षण आहेत. नायकाचें अत्यंत भरपूर नैराश्यमय जीवन हा कादंबरीचा मुख्य भाव आहे. परंतु नायकाचें नायिकेशी विवाहापूर्वीचे वागणें पाहिले म्हणजे मुख्य भावच ढासळतो! उन्मादकारक सहवासात इतका दीर्घकाळ गेला तरी प्रेम अव्यक्तच कसे राहिले? पहिलें प्रेम हेंच खरें प्रेम, त्याचा विसर पडत नाही; हा सिद्धान्त श्री. खाडेकर यानीहि मांडला आहे. परंतु पहिलें प्रेम मिळत नाही असें ठरल्यावर, नंतरच्या जीवनात अेखाद्या बाईबरोबर शरीरसुखाचें सर्व विलास चालू असताना केव्हातरी ज्या प्रेमाची आठवण होते, ते पहिले प्रेम जिवंत असले तरी तें जीवन्मृतासारखेंच जिवंत! लेखकाने हरि नारायण आपटे याचें पहिल्या प्रेमाविषयीचें जें सुभाषित आरंभीं उद्धृत केलें आहे, तें अशा जीवन्मृत प्रेमाच्या समर्थनास कितपत उपयोगी पडेल! पुन्हा या नायकाचें जीवन पाहिल्यावर, प्रेम म्हणजे विशिष्ट स्त्रीच्या प्रमाथी देहस्पर्शाची अनिवार इच्छा, असें दिसून येतें! अशा इच्छेंत, अशा इच्छापूर्तीत, काहीतरी पाप आहे अशी रुखरुख नायकाच्या मनात आहे; परतु देहाच्या आवेगापुढे ती रुखरुख क्षणार्धांत नाहींशी होते.

नायकाच्या प्रेमभग्न जीवनाचें चित्र रंगवताना केलेली वर्णनें अतिशय उत्कट आहेत. दैनंदिनी पद्धतीचा उपयोग करून सत्य व सत्याभास याची आकर्षक आंदोलनें उत्पन्न केलीं आहेत. भाषेवर प्रभुत्व असूनहि, यूथलीगच्या स्टडी सर्कल मीटिंगला, (पृ.२) कोरममध्यें बसे. पर्यंत (पृ.७५) असे, किंवा स्टेशनवर झंकारलेली हाक. तूं अत्यंत shy, असे वाक्प्रयोग आले आहेत. भाषाशैली व रचनाकौशल्य या गुणामुळे प्रतिपादनातील विसंगति जाणवत असतांनाहि कादंबरी वाचनीय झाली आहे.

श्री. पा. गो. लोहकरे याच्या तिसरा प्रवाह या कादंबरीचा नायक पद्मनाभ हाहि ज्वालेंतील प्रभाकराच्याच जातीचा आहे. कादंबरी आत्मवृत्तपद्धतीने लिहिली असल्याने लेखकास 'आपले' विचार सांगण्यास ऐसपैस जागा मिळाली आहे. परंतु आत्मवृत्ताचेंच तंत्र

लेखकानें शेवटपर्यंत पाळलें नाही. मधें मधें कथनपद्धतीसारखीं संभाषणेंहि आहेत. आणि त्या संभाषणांत लेखकाने केलेली व्याख्यानबाजी कादंबरीस कृत्रिमपणा आणण्यास कारण झाली आहे. श्री. लोहकरे याची भाषा गडकरी थाटाची आहे. काही ठिकाणचीं आत्मगत भाषणें थेट गडकऱ्याच्या नाटकातील आत्मगत भाषणासारखीं वाटतात. संभाषणास सुरुवात कथानकातील कोणत्यातरी प्रसंगाच्या निमित्ताने होते, परंतु नंतर कथानक तसेंच बाजूला राहून, संभाषणातील पात्रें कोणत्याहि परिस्थितींत समाज, ज्ञाति, परमेश्वर, संपत्ति अित्यादि विषयावर व्याख्यानें देऊं लागतात. संभाषणात तर भाषेचा अवजडपणा जास्तच जाणवतो.

कादंबरी या दृष्टीने वरील गोष्टी दोषास्पद ठरल्या तरी श्री. लोहकरे यांची भाषा जोरदार आणि विचार विचारप्रवर्तक आहे हें खास. आयुष्यात प्रेमभंग वगैरे तडाखे खाऊन हाकललेले तरुण देशभक्ताच्या ताडयात घुसतात. त्यामुळे देशाच्या कामीं तर त्याचा उपयोग होत नाहीच, परंतु त्याच्याहि आयुष्याचें मातेरें होतें. अशा तरुणाना पुढाऱ्यानी नादीं लावूं नये, हे पद्मनाभाचे उद्गार विचार करण्यासारखे आहेत. तसेंच एखाद्या तरुणीचें प्रेम म्हणजे जीवनसर्वस्व नव्हे, या विषयावरील कुमुदचें प्रवचन हेंहि विचारप्रवर्तक आहे. संपत्ति हें लायकीचें मोजमाप करण्याचें साधन आहे, हे ओळखणें हाच व्यवहाराचा मूलमंत्र महेशनें सांगितला तोहि ठीक आहे. या कादंबरीतील कथानक-पात्रें अित्यादि अर्धवट गोष्टी काढून टाकल्या तर प्रचलित परिस्थितीवरील विवेचनाचा एक सुंदर ग्रंथ शिल्लक अुरेल!

पण यात तिसरा प्रवाह कोणता? प्रेम हा पहिला, देशभक्ति हा दुसरा आणि ग्रामसेवा हा तिसरा, असें तर नाही? कथानकाच्या कुवतीच्या मानाने कादंबरींतील विवेचन फारच अवजड वाटतें. त्यापेक्षा, स्वामी सच्चिदानंदाचे विचार, आधुनिक सुशिक्षिताचा वेदान्त, या प्रथासारख्या पद्धतीने श्री. पां. गो. लोहकरे यानी विचारसंकलन केलें असतें, तर त्याची सूक्ष्म विचारसरणी व जोरदार भाषा याचा योग्य अुपयोग झाला असता. नायकाचा आवेश प्रेमभंगापाशीं सुरू होतो व प्रेमपूर्तीसाठी थांबतो! त्यापेक्षा कुमुदने शिकविलेल्या शिकवणुकीप्रमाणे वागणारा नायक रंगवला असता तर कादंबरीस अतिशय जिवंतपणा आला असता. परंतु बिचाऱ्या कुमुदने सुद्धा पद्मनाभापुढे हात टेकले. ती त्याला अुच पातळीवर नेत आहे; परंतु तो कुमुदचे पाय सोडावयास तयार नाही. शेवटीं त्या वाया गेलेल्या महात्म्याला जगविण्यासाठी कुमुद संपत्तीवर लाथ मारुन त्याच्या स्वाधीन होते! यात विजय कोणाचा! अेकंदर पात्रात महेश हा गृहस्थ बराच जिवत वाटतो. त्याच्या तत्त्वज्ञानावर अुभारलेलें महेशचे आत्मवृत्त श्री. लोहकरे यानी लिहावें. असे या कादंबरीवरून त्यास सुचवावेंसें वाटते.

प्रा. त्र्यं. रा. वनमाळी, अेम्. अे., याची आदिमाया ही दीर्घ कथा आणि श्री. वरेरकर यांची तरतें पोलाद ही कादंबरी यात स्त्रीसहवासाचा अनुभव नसलेल्या तरुणाच्या जीवनातील प्रथम स्त्रीप्रवेश व त्या वेळचे अनुभव याचें चित्र रेखाटलें आहे.

स्त्री हें निसर्गाचें अमोघ अस्त्र आहे व निसर्गाचे कार्य करण्याकरिता ती पुरुषाला हातीं धरते, हें प्रतिपादन "आदिमाया"च्या लेखकाचे अुद्दिष्ट आहे. पारधी सावजाशीं अुद्दामपणें वागत नाहीं; पारध साधण्यासाठी त्याला सावजाशीं अनुनयनच केले पाहिजे. स्त्रीजीवनात ही अनुनयनवृत्ति पाहिजे. या अनुनयनाने दोन व्यक्ति— स्त्री-पुरुष— अेकत्र येतात. आणि मग स्त्री स्वतःचा अभिमान, पावित्र्य सारे काही विसरते. हो, पावित्र्यसुद्धा! (पृ. १०६) सावज सापडल्यावर स्त्री ही पारध्याची भूमिका सोडून देते आणि प्रेमाअैवजीं तेथे सौंदर्य आणि वात्सल्य अुभीं राहतात! हें सूत्र या कथेंत गोविले आहे. या कथेच्या द्वारें आधुनिक तरुणी

तील पुरुषीपणा, पुरुषास लाचार करण्याची, जायबंदी करण्याची वृत्ति, या गोष्टी अनैसर्गिक आहेत, निसर्गाच्या evolution च्या कार्याला विघातक आहेत, हें लेखकाने कॉलेजमधील निरनिराळ्या प्रवृत्तींच्या विद्यार्थिनींच्या स्वभावचित्रांनी दाखविलें आहे. कॉलेजातील चालू जीवनाच्या पार्श्वभूमीवर श्यामा आणि देवदत्त यांचीं स्वभावचित्रे अतिशय अुठून दिसत आहेत. संभाषणानी पुस्तकाचा बराच भाग व्यापल्यामुळे प्रा. वनमाळी यांच्या भाषाशैलीचा विशेष, चांगला व्यक्त झाला आहे. प्राध्यापकानी आपल्या भोवतालच्या जीवनाचें असें अुत्सुक परिशीलन करणें फार जरूर आहे, परिणामकारक आहे, हें प्रा. वनमाली यांची आदिमाया वाचून कळेल.

तरतें पोलाद ही श्री. वरेरकर यांची कादंबरी एका तरुण मनाचें विकसन दाखविणारी आहे. आरंभीं हें नमूद केले पाहिजे की, 'तरतें पोलाद,' हें नाव का दिलें ते कादंबरी वाचून झाल्यावरहि समजत नाही! नावाच्या बाबतींत गूढवादाच्या काही रूढी पडल्यामुळे नावें निरर्थक होअूं लागलीं आहेत.

प्रत्यक्ष कथानकांत कोणतेंहि मुख्य विचारसूत्र दिसत नाही आणि तरतें पोलाद म्हणजे काय ही शंका पुन्हा मनात कायमच राहते. गोविंदा हा आपल्या जन्मवृत्तान्तामुळे समाजापासून दूर राहिल्याने त्याच्या बऱ्याचशा नैसर्गिक वृत्ति खुरटल्या होत्या. त्या वृत्ति, विशेषतः तारुण्यसहज वृत्ति, एका मनमोकळ्या वृत्तीच्या युवतीच्या वात्सल्यप्रधान प्रेमामुळे अंकुरित झाल्या. अेवढाच कथाभाग अत्यंत महत्त्वाचा आहे. परंतु या कथाभागावर, केवळ सहवासानेहि अुत्पन्न झालेलें पाळलेल्या मुलाविषयींचें मातृप्रेम, बडेजावी श्रीमंतांचीं नातीं जोडण्यांतील व्यवहारी वृत्ति, आपली जन्मदाती आअी दिसल्याबरोबर क्षणार्धात जागें होणारें गोविंदाचें मन, अित्यादि प्रसंगानी दडपण पडलें आहे. राजकीय परिस्थितींत हिंदी सनदी नोकराच्या मनाची होणारी तळमळ, मला सोबत पाहिजे मोहबत नको, हे नर्गिजचें मत व शेवटीं पुरुषाची सोबत हवीशी वाटणे म्हणजेच मोहबत असे त्या मताचें पर्यवसान; अमर्याद होण्याची आवड, वाडिलाच्या संपत्तीचा मनमुराद अुपभाग घेत मार्क्स व अेंजल्स यांच्या ग्रंथाचें अध्ययन करण्याची नवी फॅशन, अित्यादि गोष्टींनी रगविलेलें नर्गिजचें स्वभावचित्र हे आधुनिक युवतीवर्गाचें बरेंचसें प्रातिनिधिक चित्र आहे. भाषेच्या साधेपणाची कमाल मर्यादा या कादंबरीने गाठल्यासारखें वाटतें. कलेचा मागमूससुद्धा भाषेंत कोठे दिसत नाही. कादंबरीचें हें स्वरूप पाहिल्यावर, श्री. वरेरकरानी निदान शेवटचें प्रकरण म्हणून तरी प्रस्तावना लिहिली असती, तर बरें झालें असतें असें वाटू लागतें.

आधुनिक संसारात तरुणाच्या विचित्र मनोवृत्तींमुळे विचित्रपणा कसा येतो, हें विचित्र संसार या कादंबरींत श्री. वा. दा. गाडगीळ यानी दाखविलें आहे. प्रा. वा. म. जोशी यांनी प्रस्तावनेत या कादंबरींतील विचारसूत्राचा व व्यावहारिक वैशिष्ट्याचा परिचय करून दिला आहे. कादंबरीचा विशेष म्हणजे हैदराबाद संस्थानातील भाषा व वातावरण. यामुळे कादंबरीची आकर्षकता वाढण्यास मदत झाली आहे. नव्या पिढींत आधुनिकतेच्या आणि शुद्ध प्रेमाच्या नावाखाली जी कामुकता आणि दांभिकता माजली आहे, तिचें वर्णन या कादंबरींत आहे आणि असा हेतु पुढे ठेवूनहि लेखकाने औचित्य पाळलें आहे; औचित्य पाळूनहि स्वाभाविकता टिकविली आहे. सत्याभास अुत्पन्न केला आहे, तरी अनुभवाचा पाया भक्कम आहे, हेंहि पटविले आहे. आधुनिक समाजातील भोंदूपणा दाखवितांना त्यांनी जुन्या पिढीचीहि गय केली नाही. दांभिकतेचे प्रकार निराळे अेवढेंच. जुने व नवे दांभिकतेनेच

वागत आहेत. ही दांभिकता दाखवून ते स्वस्थ बसले नाहीत. कारण भांडवलशाहींत याचें मूळ आहे, ही कारणमीमांसा ते सांगतात आणि तें कारण दूर करताना समाजाच्या खालच्या थरापासून पुनर्रचनेचे प्रयत्न होणें जरूर आहे, हाहि विचार त्यांनी स्पष्टपणें मांडला आहे. पुरोगामी तत्त्वज्ञानास त्यांचा विरोध नाही; अुलट त्याची आवश्यकता, निदान अपरिहार्यता, त्यांना मान्य आहे. फार काय, ते तत्त्वज्ञान प्रगतिकारक ठरावें अशी त्यांना तळमळ आहे. यासाठी प्रेमाचें कामुकतेपासून, आचारस्वातंत्र्याचे स्वैराचारापासून, विचारस्वातंत्र्याचे बेजबाबदारपणापासून आणि नावीन्याच्या आवडीचे निष्क्रियतेपासून, रक्षण करण्याचा ते प्रसंगानुरूप अुपदेश करीत आहेत.

परंतु हे विचार ज्या कथानकांत मांडले आहेत तें फार विस्कळित आहे. कथानकाचें वस्त्र विचारांच्या मानाने फार विरविरीत आहे. आणि कादंबरीतून कित्येक ठिकाणीं निबंध बाहेर डोकावत आहेत. कथानकातून विचार मांडताना, त्यांना अकल्पनीय घडामोडींचा आश्रय करावा लागला आहे, अद्‌भुत प्रसंगाचीं ठिगळे लावावीं लागलीं आहेत. ज्या स्वैराचाराचा धोका त्यांना दिसतो, तो ज्या परिस्थितीत संभवतो अशी परिस्थिति त्यांनी आपणच निर्माण करून ठेवली आहे आणि ती अुपाययोजना म्हणून दाखविली आहे. ही विसंगति त्यांच्या लक्षात आली नाही. प्रियकराचा विवाह झाल्यावर (प्रियेखेरीज दुसऱ्या स्त्रीशीं) प्रियेने त्याच्या सहवासात राहणें चालू ठेवणे ही परिस्थिति निर्धोक नाही. या परिस्थितींतून वैवाहिक जीवनात विचित्र प्रसंग अुत्पन्न होतात. अशिष्ट मार्गांनि चालविलेले असले सहवास मोठमोठ्या कार्यांचाहि नाश करतात. प्रियकराच्या कार्यात मदत्कार्य करणें, हे निमित्त मात्र राहतें, आणि शेवटीं जें होण्याची कोणाचीहि अिच्छा नसते, ते होतें.

हुंडा नि कुंडल्या यांच्या खुळामुळे बालविवाहहि दुस्तर होत असत. प्रौढविवाहाच्या कालातहि या गोष्टींचे बंड कायम असल्याने प्रौढत्व या अडचणींत आणखी अडचणींची भरच पडते. आणि शेवटीं संसारात विचित्रपणा उत्पन्न होतो. विवाहित लोकांवर पुन्हा प्रौढपणामुळे उत्पन्न झालेल्या प्रेमाचा बोजा पडतो आणि प्रिया व पत्नी हे दोन ध्रुव साधता साधता शेवटीं सर्वच वैवाहिक जीवन गढूळ होतें. तीन कुमारी व तीन कुमार यांच्या जीवनाचें चित्र रंगवता रंगवता लेखकाने आपली जीवनाची कल्पना स्पष्टपणें मांडली आहे. आणि कादंबरीच्या शेवटीं हरिभाअूंच्या पद्धतीप्रमाणें अेका आश्रमाची स्थापना केली आहे. अवलोकन व त्याचें परिष्करण या दोन्ही गोष्टी लेखकाच्या ठिकाणीं आहेत. फक्त त्यांची सांगड घालण्याची कथनकला अद्याप अपरिपक्व आहे. संस्थानी वातावरणातील जीवनाचा परिचय करून देण्याचा त्यांचा अुपक्रम स्तुत्य आहे.

कादंबरीप्रांतातून लघुकथेच्या प्रांतात आपण आलो, तर तेथेहि आधुनिक तरुणाचे जीवन, विशेषतः वैवाहिक जीवन, हाच प्रमुख विषय आढळेल. अपवाद फक्त श्री. य. गो. जोशी ! श्री. जोशी यांच्या पुनर्भेट भाग ५ यातील माणसे मोबतालच्या परिस्थितींत वावरणारींच आहेत. तरुण पिढीशींहि त्यांची दोस्ती आहे. तरुणांशीं त्यांच्या गाठीभेटी होतात आणि त्या परिचयात त्यांना दिसणारीं दृश्यें आपल्या विशिष्ट दृष्टिकोनाने ते रंगवतात. अितरत्र ज्या कथा लिहिल्या जातात, त्याच कथांचीं कथानकें झालीं असतील तशीं मांडून दाखवून, त्या कथातील बनावटपणा दाखविण्याची श्री. जोशी यांची अेक पद्धत आहे. वाङ्मय आणि सत्य यातील तें अंतर पाहिल्यावर सत्याची मुस्कटदाबी केल्याबद्दल तसल्या वाङ्मयाचा तिरस्कारा वाटूं लागतो. अुदा. या संग्रहातील ‘सुरवात आणि शेवट’ ही गोष्ट. या कथासंग्रहात कथापेक्षा स्वभाव-

चित्रें जास्त आहेत. सखाराम हें एक अविस्मरणीय स्वभावचित्र आहे. तसेंच, आपल्या दरिद्री हतप्रभ जीवनाचा विसर पडण्यासाठी काही तरी समाधान वाटावें म्हणून चळवळींना पै पैसा देणारा रघुनाथ; आपण लोकांच्या पैशावर श्रीमंत झालों म्हणून आपलीं मुलें वाचत नाहीत, तो कोणालाहि दिला तर त्याचाहि वंश खुंटणार, या समजुतीने तो पैसा दोन्ही हातांनी उधळीत राहिलेला आणि पैसे कसे संपणार ही काळजी लागलेला घरमालक; सांचून राहिलेलें आयुष्य घालविण्या-साठी विदाउट तिकीट भटकूं लागलेला खादीवेषधारी "समाजसेवक;" केवळ पैशासाठी पैसे जमविणारा व स्वतः आपल्या ऋणकोपेक्षाहि दरिद्रीपणाने राहणारा रामदासीबुवांचा धनको; सखाराम या गोष्टींत तर सखाराम आणि त्याचा मालक हीं दोन स्वभावचित्रें आहेत. वरील स्वभावचित्रांतील माणसें म्हणजे एक एक नमुना आहेत. सामान्य माणसांच्या गर्दीत तीं वावरत असतात. त्यामुळे त्याचें अस्तित्व आणि वैशिष्ट्य कोणाच्या सहसा लक्ष्यात येत नाही. परंतु श्री. जोशी हे जगाकडे काही विशेष चौकसपणाने पाहत असल्याने त्याच्या नजरेतून तीं माणसें सुटलीं नाहीत. हीं माणसें कोणतेंहि तत्त्वज्ञान सांगत नाहीत, कोणाताहि मतप्रचार करीत नाहीत. फक्त तीं आपणांस क्षणभर स्तब्ध करतात. हीं व अशीं माणसे लेखनासाठी निवडण्यात श्री. जोशी याचा काही हेतु असेल का ? ते काही कलावादी नाहीत. त्याचा हेतु जो दिसतो तो असा की, जीवनाचें आधुनिकीकरण करण्याची जी सगळीकडे धाई उडाली आहे ती थाबवावी आणि त्या क्रातिकारकाना सागावें की, काय चालले आहे तुमचें ! टाकतां काय ! स्वीकारता काय ! कोष्टकें कशाचीं माडता ! आडाखे कसले बसवता ! जीवन म्हणजे काय माधि-कांत येणाऱ्या स्वयंपाकघरातील गोष्टी आणि फोलफटाचा चिवडा करण्याची यादी आहे ! आधुनिक जीवनातील दिखाऊ उत्साहाबद्दल, बेगडी उमेदीबद्दल, तकलादी तारुण्याबद्दल, ते मना पासून संतापतात. आणि त्यामुळे त्याच्या लेखनात तीव्र उपरोध पदोपदीं व्यक्त होतो. वाऱ्याने पदर उडाला असें त्यांनी कोठे वाचलें कीं, वारा आला म्हणून खोवलेला पदर तिने वाऱ्यावर सोडला असें ते लिहितात. आपला समाज वाङ्मयात जितका किडला आहे तितका सृष्टींत नाही, असें त्याचें प्रामाणिक मत आहे (पृ. ४०). आणि याच्या उलट काही लेखक हातीं न येणारी झाडाचीं फुलें आपल्या समाजवृक्षावर चिकटवून दाखवितात; त्याविषयी त्याना असें म्हणावयाचें आहे की, आपल्या वाङ्मयात जी आतषबाजी दाखविलेली असते ती लेखकाची हौस असते. जीवन इतकें सोपें नाही. "वाङ्मय म्हणजे शोभेची दारू आहे" (पृ. ४२). त्यांनी लिहिलेली 'योगायोग' ही गोष्ट पाहा. ते योगायोग वाङ्मयात नियमासारखे रंगविले जातात. हें पाहून त्यानी वाङ्मयातील जीवनाचे वाभाडे काढण्याचे ठरविलेले दिसतें. हें सगळें करताना त्याची लेखणी जळफळत नाहीं, तर शांतपणें आपला विलास करीत असते. लेखणीचा तो शांत विलास 'तो दिवस' या लघुनिबंधात दिसतो. आणि त्यासाठी श्री. जोशी याच्या पुनर्भेटींचें वाचकवर्ग नेहमी स्वागतच करील.

श्री. य. गो. जोशी याची पुनर्भेट संपवून चांदण्यांतील सावल्या वाचावयास घेतल्या-वर आपण सदाशिव पेठेंतून नव्या पेठेंत आल्यासारखे वाटूं लागतें ! सदाशिव पेठेंतीलच एक नवी पेठ श्री. कवठेकर यांनी वसविली आहे. मध्यमवर्गीय पांढरपेशा समाजाचेंच चित्रण बहुतेक लेखक करतात. परंतु नुसता पांढरपेशा वर्ग घेतला, नुसती सदाशिव पेठ घेतली, तरी तीहि केवढा मोठा भाग आहे ! त्या एकाच भागात वाङ्मयाच्या मोठमोठ्या वसाहती स्थापन झाल्या आहेत. त्यातील कांही नवोदित प्रश्नाचा ते प्रश्न सोडविण्याच्या इच्छेने श्री. कवठेकर ऊहापोह करीत असतात. उदाहरणार्थ, 'अध अंधारीं बसले,' ही संग्रहातील गाजलेली गोष्ट घ्या.

मतप्रचारक हा शब्द बद्दू झाल्यामुळे श्री. कवठेकराना तो लावणें चागलें नाही. तसेंच नुसते कलावंत म्हणण्यातहि त्याची निंदाच होओील ! तेव्हा मतप्रचार करण्याची कला साधलेले ते अेक लेखक आहेत, असें म्हणणें फारसें आक्षेपार्ह होणार नाही. केवळ जीवनाचा अेखादा भाग मोठा मजेदार सुंदर दिसला म्हणून ते तो रंगवीत नाहीत, तर जीवनाच्या काही भागांत काही तरी खटकतें आहे तें नीट करण्यासाठी लिहितात. विधवाविवाहाची अुपयुक्तता, आवश्यकता, या गोष्टी नव्या नसूनहि त्याना असें वाटतें की, अद्याप तो प्रश्न चांगलासा सुटलेला नाही. यासाठी त्यानी, 'अध अधारीं बैसले,' ही लघुकथा लिहून पाहिली आहे. आधुनिक जगात जगणाऱ्या विधवेचे हाल या कथेंत वर्णन केले आहेत. पतिसुखाचा काहीहि अनुभव नसलेली विधवा मनाने कुमारीच असते. त्या कुमारींना बाहेरच्या वातावरणाची ओळख झाल्यावर जुन्या जमान्यातील संयमाची साधने निष्फळ ठरतात. शरीर आवरलें की झालें, मन आपोआप गप्प बसतें; हा विधवाच्या आचारधर्माचा पाया आहे. तो किती अशास्त्रीय आहे, हें अेका विधवाकुमारीच्या हृदयद्रावक कथेने दाखविले आहे. परंतु या गाजलेल्या कथेपेक्षाहि; 'भिकारी तूं आहेस,' ही गोष्ट जास्त परिणामकारक आहे. अेका प्रौढ, सुसंस्कृत, सुशिक्षित डॉक्टरचें तें मनोविश्लेषण अत्यंत अुद्बोधक आहे.

बाकीच्या गोष्टींची मुख्य घडण प्रसंगनिष्ठ आहे. त्यात मानवी मनाचे धागेदोरे आहेत. परंतु शेवटीं कलाटणी मिळते ती आकस्मिक कारणामुळे मिळते. 'जरा हास बरं गोड'मधील प्रमोदने अुत्तरेकडे धाव घेतली, ती केवळ पत्नीच्या शरीराचा विरह होअून असें दिसतें. त्यापेक्षा घराबाहेरच्या जगात सुखाचा शोध करून नंतर तो परत आला असता, तर त्यामुळे कथानक भरदार झालें असतें. 'देहि पशुच' ही गोष्ट तर केवळ प्रसंगावर अुभारलेली आहे. जिवलग दोस्तहि मित्राच्या पत्नीविषयी वैषयिक वासना बाळगतो आणि प्रसंग साधून दगा देतो, अेवढेंच यात दाखविलें आहे. 'जातिवंताचें मन' ही गोष्ट, 'जरा हास बघूं गोड' याच गोष्टींतल्या मालमसाल्यावरून तयार केली आहे. सुलभेकडून मनूकडे हें जगदीशचें मानसिक स्थित्यंतर, हा या गोष्टींतला महत्त्वाचा भाग अेका वाक्यात आवरला आहे ! अेवढें सोडलें तर बाकी सगळें ठीक आहे. 'अन्नावाचून मारलं ग !' यात त्या गोष्टीच्या शेवटीं विठ्ठलचा मृत्यु घडवून आणण्याचें काहीच कारण नव्हतें; का 'अन्नावाचून मारलं ग !' हे विठाअीचे अुद्गार जास्त करुणाजनक ठरावेत यासाठी, शोकरस चढविण्यासाठी, विठोबाला मारलें आहे ! गोष्टी वाचण्याच्या भरात वाचक आचार्य कालेलकराचें पत्रहि वाचून जातो. आणि तें पत्र अभिप्रायात्मक असलें, तरी त्याचा पूर्वार्ध वाङ्मयाविषयीच्या सर्वसामान्य तत्त्वाची चर्चा करणारा असल्याने, तोहि परिणाम अेक लाभच आहे. प्रसंगानी कथानकास कलाटणी देण्याच्या अैवजी, त्या प्रसंगाचे मनावरील परिणाम सागून, त्याचे परिशीलन करून, गोष्टीचा समारोप गाठावा असें श्री. कवठेकरास सागावेंसे वाटतें. गोष्टींचीं शीर्षकें सूचकतेच्या बाबतींत फारच अपुरीं व प्रसंगीं विपरीत ठरतात हीहि अुणीव या कथासंग्रहात भासते.

श्री. य. गो. जोशी व श्री. कवठेकर हे स्थानसिद्ध लेखक झाले आहेत. त्याच्या कथासंग्रहानतर तपश्चर्या चालू असलेल्या लेखकापैकी श्री. वि. ग. भिडे यांचा कण्हेरीचीं फुलें हा कथासंग्रह वाचला आणि कथासंग्रहास चुकून किती सार्थ नाव मिळालें आहे, या विचाराने फार वाअीट वाटलें !

चालू जमान्यात आपला निभाव लागणार नाही असें वाटूनच कीं काय, श्री. वि. ग. भिडे यानी शहरी वातावरण सोडून, शिकलेलीं माणसें सोडून, चाकोरीबाहेर जाऊन रामोशी वगैरे

लोकांच्या प्रांतांत प्रवेश केला आहे. परंतु प्रांत बदलला तरी त्यांना मन बदलतां आलें नाही. आणि त्यामुळे रामोशी विश्वविद्यालयीन तंत्राने प्रणयाराधन करीत आहे, असे देखावे तेथे दिसतात. माळी आणि रस्त्यावरची भिकारीण यांचें कूजन या पुस्तकांत ऐकूं येतें. १-२ कथांत समाजांतील खालच्या थरांत हिंडून आल्यावर लेखकाने पुन्हा शहर गाठलें आहे. परंतु माणसाच्या गर्दीत राहूनहि अवलोकनशक्ति बेताबाताची असल्याने, त्याना गोष्टींसाठी सापडलेले प्रसंग अगदीच मामुली आहेत. याच पुस्तकात काही लोककथाहि आहेत. लोककथांबद्दल लेखकाची काय कल्पना आहे, तें त्याने स्पष्ट केलें असतें तर बरें झालें असतें. मंत्रतंत्रामुळे कथानकांत रहस्यें उत्पन्न करून तीं जादू-मंतर करून सोडविणें, या प्रकाराला ते लोककथा समजत असावेत. श्री. भिडे याचा ग्रंथ श्री. य. ग. जोशी यानी प्रकाशित केला आहे. श्री. जोशी यांचा असा धंदेवाईक संबंध येण्यापूर्वी वाङ्मयीन संबंध श्री. भिडे यानी जोडला असता, तर त्यांना कण्हेरीचीं फुलें वेचण्याची वेळ आली नसती. भाषेच्या बाबतींत तर त्यानी बरीच दक्षता बाळगणें जरूर आहे. 'मन खोलून' हें लिहिल्याबद्दल श्री. भिडे यानी गैरसमज करून घेऊं नये.

श्री. भिडे या तरुण मित्राची भेट घेऊन जरा खट्टू झालेले मन श्री. कटककर यांच्या मंदज्योतीच्या प्रकाशात प्रसन्न झाल्याखेरीज राहिलें नाहीं. नाट्यछटेच्या प्रातात श्री. कटककर यानीं कै. दिवाकर याच्या स्थानापर्यंत मजल गाठली आहे. नाट्यछटाकारास लागणारे गुण त्याच्या ठिकाणीं स्वभावतः आहेत, हें त्याच्या नाट्यछटावरून दिसून येतें. 'मंदज्योति' या पुस्तकांत त्या नाट्यछटा आरंभीं छापल्या असत्या तर बरें झालें असतें. तरी निदान वाचकांनी पृ. ८१ ते १०४ हा भाग आधी वाचावा आणि मग १ ते ८० हीं पानें वाचावींत. सामान्य माणसाच्या व्यवहारी जगात ज्या अनेक विसंगति दिसतात त्या दुरून पाहणाऱ्यांस विनोदी दिसतात. त्या विसंगती ज्याच्या ठिकाणीं उत्पन्न होतात त्यांना त्यांची जाणीव नसते, हा त्या विनोदाचा प्राण आहे. दुरून पाहणाऱ्यांस त्यांतील आनंद अनुभविता येतो. आपल्या अवगुणांचें समर्थन करताना, आपल्या प्रेयसाचें कौतुक करताना, आपल्या पराभवांवर पांघरूण घालताना, या विसंगती उत्पन्न होतात. असे प्रसंग निवडून, त्याचें मोजक्या उद्गारांत संपूर्ण चित्र रेखाटून, श्री. कटककर यानी आपल्या नाट्यछटा मनोवेधक केल्या आहेत. काही नाट्यछंदातून दोन तीन नाट्यछटाचें मिश्रण झाल्यासारखें वाटतें. नाट्यछटेंतील मध्यवर्ती कल्पना पक्की करून ती कल्पना हळू हळू उकलविणारे प्रसंगसूचक उद्गार रचणें जरूर असतें. नाट्यकथेची मांडणी भावगीतासारखी पाहिजे. या दृष्टीने श्री. कटककर यांनी आपल्या काही नाट्यछटांवर फेरनजर फिरवावयास पाहिजे.

नाट्यछटा लिहिणाऱ्या कुशल लेखकास कथेसाठी कितीतरी प्रसंग सापडावेत हें अगदी साहजिकच आहे! अशाच्या प्रसंगामें नाट्यछटेने चित्रण करताना अतिशय संयम ठेवावा लागतो. परंतु काही प्रसंग अितके परिणामकारक असतात की, ते मनसोक्तपणे कथन केल्याखेरीज मनाचें समाधान होत नाही. परंतु या संग्रहातील लघुकथा वाचल्यानंतर मात्र असें काही समाधान श्री. कटककर यानी मिळविलें असेल असें वाटत नाही. ८१ ते १०४ या पानांखेरीज राहिलेल्या भागात ज्या लघुकथा आहेत त्या अगदी सामान्य आहेत, त्यांना लघुकथा म्हणणें कठीण आहे. काही कथात लघुकथेला लागणारी सामग्री आहे, परंतु सांगण्याची पद्धति अगदी मामुली असल्याने त्याना लघुकथेचें सौंदर्य आलें नाही. 'पेन्शनर', या गोष्टीची सुंदर लघुकथा करण्यास त्या हकीकतीची रचना बदलली पाहिजे. सुरवात 'पेन्शनर' या शब्दावरील ठराविक विनोदाने आणि शेवट अगदी गंभीर, असें विचित्र मिश्रण (गोष्टीचें नांव

सुद्धां विपरीतार्थसूचक आहे !) झालें आहे. 'पति कीं पातिव्रत्य' ही कथा चांगली आहे. शब्दचित्रांत 'हत्याराचा कायदा' हें केवळ हत्यारें या शब्दावरील कोटीवर रचलेलें विनोदी शब्दचित्र बरें आहे. 'विक्रमबहादूर', मुंबअीच्या अफाट पसाऱ्यामुळे होणारी चुकामुक वर्णन करणारी 'अचानक भेट', 'प्रेमाची बेबंदशाही', 'शिंप्याच्या दुकानांत' अित्यादि कथांतील विनोद अगदी सामान्य वाचकाच्या अपेक्षेअितकेच आहेत. निबंधात चुरचुरीतपणा आणण्यासाठी विनोद केला पाहिजे अशा समजुतीचा प्रभाव बराच दिसतो. 'लग्नघर' या निबंधाचा शेवट तर अगदीच शालेय आहे.

थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे श्री. कटककर यांनी नाट्यछटेच्याच क्षेत्रात आपलें लक्ष्य टिकवावें; अितर प्रांतांत विहार करून वाचकांचा अपेक्षाभंग करूं नये. नाट्यछटा लिहिताना त्यांना जी सूक्ष्म दृष्टि असलेली दिसून येते ती कथाप्रांतांतहि असेल अशी अपेक्षा अुत्पन्न होते आणि ती फोल ठरते ! विनोदबुद्धि त्यांच्या ठिकाणीं आहे परंतु ती अद्याप अपरिपक्व आहे, तोपर्यंत त्यांनी शाब्दिक कोट्या करून ती राबवूं नये, असें त्यास मित्रप्रेमाने सांगावेंसें वाटतें. नाट्यछटेच्या प्रांतांत त्यांना बरेंच यश मिळालें आहे. तें वाढीस लावणें हें कार्य अेकाग्रपणें करण्याअितकें महत्त्वाचें आहे.

---

# संपादकीय



'साहित्य पत्रिके'चा हा १४ व्या वर्षाचा पहिला व माझ्या संपादकत्वाखालील पाचवा अंक होय. मागील अंक प्रसिद्ध झाल्यावर, 'झंकार' या प्रो. ना. सी. फडके, अेम्. अे., हे सहायक : Director असलेल्या साप्ताहिकात (दिनांक १७·११·४०) 'कोरखळया' या सदरांत त्याच्यावर '"पत्रिका" कीं अत्याचार !' या शीर्षकाखाली, बरीचशी टीका आली होती. प्रो. फडके, या वर्षाचे संमेलनाध्यक्ष, हे त्या पत्राचे सहायक : दिग्दर्शक नसते, तर त्या टीकेला अुत्तर देण्याचीहि तादृश जरूर नव्हती. परंतु खुद्द तात्यासाहेब केळकर, अध्यक्ष, साहित्य परिषद्, यांनी अेका जाहीर प्रसंगीं नामोल्लेखपूर्वक मला तशी सूचना दिली असल्यामुळे, त्या आक्षेपांचा, जागेच्या अभावीं अगदी थोडक्यातच, परामर्श घेणें आवश्यक आहे.

वास्तविक पाहतां प्रस्तुत अंक हेंच त्या आक्षेपाना सक्रिय अुत्तर आहे. परंतु त्याव्यतिरिक्तहि त्यांचा विधानशः समाचार घेणें अस्थानी होणार नाही. सदरहू आक्षेपकानी साहित्य पत्रिकेचा गेला अंक हा दिवाळी अंक समजून, "अितर मासिकानी व वृत्तपत्रानी अेकाहून अेक सुंदर अंक काढले," परंतु पत्रिकेचा तो अंक मात्र "आकर्षक व वाचनीय" या दोन विशेषणाच्या अपेक्षेने "भिकार" निघाला, असा शेरा मारला होता.

या आक्षेपाला "पत्रिके"चा तो अंक दिवाळी अंक नव्हता; आकर्षकपणाची चैन साजरी करण्यासारखी सांपत्तिक परिस्थिति व मनःस्थितीहि, पत्रिकेच्या संचालक संस्थेची नाही; व वाचनीय मजकूर कोणता हें ठरविणें हें ज्या त्या वाचकाच्या अभिरुचीवर अवलंबून आहे;" अेवढेंच अुत्तर दिलें म्हणजे पुरे आहे. घरामागील अुकीरडा अुकरण्याचा अुद्योग करणाऱ्या अेका कोंबड्याला सांपडलेलें अेक मोती, त्याला जोंधळ्याच्या अेका दाण्याच्याहि योग्यतेचें वाटलें नाही; ही आपला लहानपणचा दोस्त अीसाप याने सांगितलेली गोष्ट अजून आपण

थोडीच विसरलों आहों! आपल्याला काय अिष्ट अन्न आहे हें ज्याचें त्यानें ठरवावें. पत्रिकेच्या संपादकाची अभिरुचि कोपरखळ्या मारण्याची सवय जडलेल्या ठकाळापेक्षा भिन्न आहे, याला त्याचा नाअिलाज आहे. या अुत्तरांत अर्थात्, "निम्मीं पृष्ठें सरळ रद्दीच्या टोपलींत टाकण्याच्या योग्यतेचीं आहेत." या विधानाचा अंतर्भाव झालाच.— 'रद्दींतील रत्नें' शोधून काढण्यासाठीं उद्याच्या अितिहाससंशोधकांनी कांही थोरामोठ्यांच्या केराच्या टोपल्या तपासल्या, तर त्यांत माझ्यासारख्या सामान्य माणसाच्या दृष्टीने आज अुत्कृष्ट ठरलेल्या कित्येक कादंबऱ्या, नाटकें आणि ललितप्रबंध सांपडणारच नाहीत, असें तरी कोण सांगूं शकेल!

पुढें या आक्षेपकाने क्लिष्ट भाषेचें अुदाहरण म्हणून श्री. मर्ढेकर यांच्या 'माध्यम' या लेखांतील अेक अुतारा देअून, "अशा लेखकाची चांगली 'तेलपाणी' लावून संभावना केली पाहिजे," असे सात्त्विक संतापाचे अुद्गार काढले आहेत. श्री. मर्ढेकर यांच्या लेखांत चित्रकलेच्या विवेचनाच्या अनुसंधानाने तेल व पाणी हे शब्द आलेले पाहून या लेखकाला आपला वृत्तिच्छेद झाल्यासारखें दुःख झालेलें दिसतें. 'तेलपाणी' लावण्याचा मुख्य व्यवसाय असणारे हे कोणी लेखक जर फावल्या वेळीं 'झंकार'मधील कोपरखळ्या लिहीत असतील, तर सहायक: दिग्दर्शकांना नुकतेंच तें सदर बंद करणें कां भाग पडलें याचें वेगळें कारणच पाहावयास नको. त्या अंकांतील यशवंत कवींच्या कवितेच्या चरणांतून या लेखकाला 'दोग्ध्री-पुरंध्री'सारखे निवडुंगाचे फड अुगवलेले दिसत आहेत. "प्रायेणैवंविधे कार्ये पुरंध्रीणां प्रगल्भता।" असा त्या शब्दाचा कालिदासानेहि आपल्या कुमारसंभवांत प्रयोग केलेला स्मरतो. कालिदास हा आपल्या कवितेंतून निवडुंगाचे फड अुभे करणारा कवि नाही, अशी माझी समजूत होती; पण या कोपरखळ्या मारणाऱ्याच्या लालित्य संशोधक अिंद्रियाच्या पुराव्याने ती आता चुकीची ठरली आहे. कवि यशवंताना कोपरखळीचा मार बसून या शब्दाच्या पुराव्याने ते 'कंत्राटी कवि' तर ठरलेच, पण त्यातल्या त्यांत त्याना अेवढेंच समाधान मानण्याला जागा आहे की, या निवडुंगाच्या फडांच्या लागवडीच्या कामांत वैदिक सूक्तकारांबरोबरच आपल्याला निदान कालिदासासारख्या अेका सामान्य राजाश्रयी कवीची सोबत तरी आहे. असो.

पत्रिकेच्या त्या अंकांतील लेख वाचून कोणाचेंहि "प्राणोत्क्रमण" झालें नाही व ते छापण्यांत वाचकावर "अत्याचार"हि होत नाही, ही कोपरखळ्यांच्या लेखकांकडून आक्षिप्त ठरलेल्या लेखाबद्दल 'चित्रा' (मुंबअी) या साप्ताहिकात आलेल्या अेका वाचकाच्या पत्रिकेच्या संपादकाचें समर्थन करणाऱ्या पत्रावरून, व त्या लेखाचा अुतारा 'अुषा' (मुंबअी) या लोकप्रिय मासिकाने सविस्तर घेतला यावरून, परस्पर सिद्ध होणारी गोष्ट आहे. संपादकांच्या आडनांवावर केलेल्या 'काळेपाण्याच्या' निर्बुद्ध कोटीबद्दल तर न बोलणेंच बरें. तेव्हा कोपरखळ्या मारण्याची-सवय अेकंदरींत वाअीटच, हें जें सहायक: दिग्दर्शकांना अितक्या अुशीरां पटलें, तें थोडें अगोदरच कळलें असतें, तर 'पत्रिके'च्या गेल्या वर्षाच्या तीन अंकांबद्दल खाजगी रीतीने प्रशंसापर उद्गार काढणारे संमेलनाध्यक्ष प्रो. ना. सी. फडके, यांच्या साहाय्य: दिग्दर्शनाखालील साप्ताहिकाच्या अेक विशिष्ट सदरातील कांही मजकुराबद्दल असे कटु शब्द लिहिण्याचा अप्रिय प्रसंग माझ्यावर यावयाचा टळला तरी असता. असो.

यानंतर श्री. गं. दे. खानोलकर यांनी ता. १ डिसेंबर १९४० च्या समीक्षकाच्या अंकात त्याचा निरोप घेतां घेतां, "श्री. काळे यांनी न पाळलेली जबाबदारी" या स्फुटांत मी पत्रिकेच्या गेल्या अंकीं संपादकीय न लिहिल्याबद्दल माझा आक्षेप करण्याची अुठाठेव केली आहे, तिकडे वळतों.

ते म्हणतात त्याप्रमाणे "संपादकीय नसलेली पत्रिका संपादन करण्याचें कार्य महाराष्ट्र साहित्य परिषदेचे श्री. देसवंडीकर श्री. काळयांअितकेंच अुत्कृष्ट अगर निकृष्ट करूं शकतील." याबद्दल मला मुळीच शंका नाही. पण तें श्री. खानोलकर यांना मात्र करतां यावयाचें नाही, अशी ज्यांनी माझी पत्रिकेचा संपादक म्हणून योजना केली त्यांची खात्री होती; याला माझा नाअिलाज आहे. श्री. खानोलकरांचे या स्फुटांतील पत्रिकेच्या अंतरंगाबद्दलचे टीकात्मक अुद्गार कोणत्या मनःस्थितींतून निर्माण झाले आहेत, याची जाणीव श्री. खानोलकरांच्या संपादकीय चरित्राबद्दलची व महत्त्वाकांक्षांबद्दलची ज्यांना माहिती आहे, त्याना मी आपल्या शब्दांत करून देण्याची गरज नाही.

श्री.खानोलकर यांच्या अितका नसला तरी श्री. लाड यांचा व माझाहि थोडासा परिचय असून, श्री. लाड यांच्या पत्रिकेबद्दलच्या सूचना व रत्नागिरी संमेलनाचा पत्रिकेबद्दलचा ठराव यांबद्दल योग्य तो विचार कार्यकारी मंडळांत व श्री. लाड यांच्या माझ्या भेटींत झाला होता व यावच्छक्य त्यांचा उपयोग करण्याचा अुपक्रम सुरू आहे. श्री.लाड यानी पुस्तकपरीक्षणासाठी ज्या प्रकारची समिति सुचविली होती तिची योजना अव्यवहार्य आहे, हें माझें मत मीं रत्नागिरी येथे त्यांना बोलून दाखविलें होतें व तेंच प्रत्यक्ष अनुभवांत खरें ठरतें. श्री. लाड यांची साहित्य-विकासाबद्दलची आस्था, तळमळ, तयारी व योग्यता याबद्दल कोणाचें दुमत असेल ! पण त्यांना देखील आज आठ महिन्याच्या अवधींत त्यांनी पूर्वीच व्याख्यानरूपाने माडलेल्या विषयावरील एक परीक्षण आणि एक निबंध, (लिहून पाठविण्याचें कबूल केलेलें असून व तें पार पाडण्याची उत्कट अिच्छा असूनहि,) कार्यव्यापृत्वामुळे लिहून पाठविण्यास फुरसत मिळालेली नाही. तीच स्थिति केवळ अेकच लेख लिहिण्याबाबत प्रा. कृ. पां. कुलकर्णी यांची आहे. तेव्हा अशा जिव्हाळ्याच्या साहित्यिकाची जर इतकी अगतिक परिस्थिति आहे, तर श्री. लाड यांची, अनेक अधिकारी पण कार्यबहुल व दूरदूरच्या ठिकाणीं राहणाऱ्या विद्वानांची समिति बनवून तिच्याकडून पुस्तकपरीक्षणें लिहवून घेण्याची, योजना कशी सफल करतां येणार ! याचसाठी, ज्याचें साह्य मला सहज सुलभतेने मिळण्यासारखें होतें, अशा काही सन्मान्य स्थानिक साहित्यिकांची मदत करण्याबद्दलचीं आश्वासनें मीं मिळविलीं असून त्याचेंच दृश्यफल म्हणजे या अंकांतील परीक्षणविभाग होय. ज्यांचीं नावें प्रसिद्ध करण्यास त्यांची मला परवानगी नाही, त्या या माझ्या साहित्यिक स्नेह्यांचे त्यांच्या या अमोल साहाय्याबद्दल जेवढे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत.

के. नारायण काळे

## खुलासा

गेल्या अंकीं श्री. ना. गो. चापेकर यांनी परीक्षण केलेल्या "हिंदूंच्या सामाजिक संस्था" या पुस्तकाबद्दलची माहिती— "Hindu Social Institutions" by Pandharinath H. Valavalkar, Ph.D., LL.B.; *Publishers*— Longmans, Green & Co. Ltd. Price Rs. 7-8-0. अशी आहे. गेल्या अंकीं ती देण्याचें अनवधानाने राहून गेलें.

संपादक, म. सा. प.

---

## साभार स्वीकार

फ्रान्सची झांशीवाली—ले० न. चिं. केळकर; प्रका० दि अिंटर नॅशनल बुक सर्व्हिस, पुणें ४; मूल्य १२ आणे.

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

## विशेष साधारण सभा

म. सा. परिषदेची विशेष साधारण सभा ता. २४ नोव्हेंबर १९४० रविवारीं सायंकाळीं ४॥ वाजता परिषदेच्या सभागृहात भरली होती. सभेस पुढील ३० सभासद आले होते :—

श्री. न. चिं. केळकर (अध्यक्ष), रा. ब. दा. ग. पाध्ये, श्री. गो. कृ. मोडक, श्री. कृ. गो. मराठे, श्री. गं. गो. पुंडलीक, श्री. पा. र. अंबिके, श्री. य. ल. गुण्ये, श्री. रा. भा. भागवत, श्री. के. नारायण काळे, श्री. त्र्यं. गो. ढवळे, श्री. वि. थों. कुळकर्णी, प्रो. रा. श्री. जोग, श्री. ग. गं. जांभेकर, प्रो. द. वा. पोतदार, प्रो. वा. म. जोशी, प्रो. त्र्यं. शं. शेजवलकर, श्री. द. र. कवठेकर, श्री. गो. ग. तळवलकर, प्रो. स. वि. आपटे, श्री. गं. बा. सरदार, प्रि. ध. रा. गाडगीळ, श्री. नी. शं. नवरे, श्री. ज. श्री. वाघ, श्री. श्री. बा. जोग, श्री. दि. वि. काळे, श्री. गं. ब. ग्रामोपाध्ये, श्री. ज. अ. नरवणे व रा. सा. र. लु. जोशी.

पटवर्धन स्मारक समितीचें क्रमांक प ३७८ ता. १५ नोव्हेंबर १९४० चें पत्र वाचून दाखविण्यात आलें. या पत्रांत नमूद केलेला ठराव येणेंप्रमाणें :—

"पुढे लिहिल्याप्रमाणे योजना म.सा.परिषदेकडे कळवावी व त्याबाबत म. सा. परिषदेच्या साधारण सभेचा ठराव होईल तो या समितीस कळवावा अशी विनंती म. सा. परिषदेस करावी. योजना अशी :—

(१) पटवर्धन स्मारक समिति म. सा. परिषदेस खालील अटींवर रु. सात हजारांची देणगी देण्यास तयार आहे.

(२) वरील देणगीच्या पोटीं रु. ५० किंवा त्याहून अधिक देणगी समितीकडे ज्यांनी दिली आहे अशांचीं नावें वरील सात हजारांच्या हिशेबात बसतील व जीं परिषदेकडे समितीकडून लिहून कळविलीं जातील त्या नावाचा समावेश परिषदेच्या नियमान्वये जे परिषदेचे सभासदांचे वर्ग आहेत त्या त्या वर्गांत करण्यांत आला पाहिजे.

(३) म. सा. परिषदेने वरील देणगीची रक्कम "माधवराव पटवर्धन सभागृह" या नावाचें सभागृह म. सा. परिषदेसाठी बांधण्याच्या कामीं खर्चावी.

(४) हें सभागृह शक्यतोवर अ. स. १९४१ पूर्वी तयार व्हावें.

(५) या सभागृहाचा नकाशा म. सा. परिषदेने तयार करवून त्यास या समितीची पूर्व-संमति मिळवावी.

(६) म. सा. परिषदेने ही देणगी स्वीकारल्याबाबतचा आपल्या साधारण सभेचा ठराव सुमारें चार महिन्याच्या आत इकडे कळवावा."

यानतर पटवर्धन स्मारक समितीच्या ठरावासंबधी परिषदेच्या कार्यकारी मंडळाने केलेल्या शिफारशी वाचून दाखविण्यात आल्या.

(१) प्रि. ध. रा. गाडगीळ यानी खालील ठराव सभेपुढे मांडला व त्यास रा. ब. दा. ग. पाध्ये यानी अनुमोदन दिलें :—

"स्मारक-समितीने देऊं केलेल्या रु. ७००० च्या देणगीचा आभारपूर्वक स्वीकार

करून परिषदेच्या अेकंदर अिमारतीचा अेक भाग म्हणून 'माधवराव पटवर्धन सभागृह' बांधण्यांत यावें. स्मारक-समितीने आपल्या पत्रांत अुल्लेखिलेल्या अटींपैकी क्र. २ व ३ साधारण सभेस पूर्ण मान्य आहेत. अट क्र. ४ यांत '१९४१ च्या पूर्वी' याअैवजीं '१९४१ अखेरपर्यंत' अशी दुरुस्ती करावी. अट क्र. ५ संबंधाने असें सुचविण्यांत येतें की पटवर्धन स्मारक समितीने नकाशास मान्यता दिल्यानंतर नकाशांत कांही फरक योग्य वाटल्यास कार्यकारी मंडळास ते करण्याचा अधिकार राहावा."

चर्चेनंतर ठराव सर्वानुमतें मान्य करण्यांत आला.

(२) "पटवर्धन स्मारक-समितीच्या पत्रांतील अट क्रमांक २ प्रमाणे स्मारक-समिति कळवील त्या गृहस्थांचीं नावें योग्य त्या वर्गांत दाखल करून घेण्याचा अधिकार कार्यकारी मंडळास देण्यांत येत आहे."

हा ठराव प्रिं. ध. रा. गाडगीळ यांनी सुचविल्यानंतर त्यास प्रो. वा. म. जोशी यांनी अनुमोदन दिलें व ठराव सर्वानुमतें मान्य करण्यांत आला.

(३) यानंतर सभेंत ठराव मान्य झाला तो येणेंप्रमाणें :—

"सबंध तळमजल्यावर सभागृह सर्व सुखसोयींसह बांधण्यास १०००० रु. लागतील असा अंदाज आहे. तेव्हा ही रक्कम पुरी करण्यास अिमारतनिधींतून रु. ३००० पर्यंत या कामीं खर्च करण्याकरिता कार्यकारी मंडळास अधिकार देण्यांत येत आहे."

सूचक—प्रिं. ध. रा. गाडगीळ. अनुमोदक—श्री. य. रा. दाते.

(४) यानंतर प्रिं. ध. रा. गाडगीळ यांनी नियोजित 'पटवर्धन स्मारक सभागृह' बांधून झाल्यावर त्याचें ट्रस्टडीड परिषदेच्या ट्रस्टींच्या नावें करण्यात यावें अशा अर्थाचा ठराव सभेपुढे मांडला व त्यास श्री. य. रा. दाते यानी अनुमोदन दिलें. चर्चा झाल्यावर या प्रश्नाचा विचार वार्षिक साधारण सभेंत व्हावा असें बहुतेक सभासदांचें मत दिसल्यावरून प्रिं. ध. रा. गाडगीळ यांनी अध्यक्षांच्या परवानगीने मांडलेला ठराव परत घेतला.

(५) प्रो. द. वा. पोतदार यानी "संकल्पित 'माधवराव पटवर्धन सभागृहा'ची सर्व योजना व तजवीज करून काम पुरें करून घेण्याचा अधिकार ही साधारण सभा कार्यकारी मंडळांस देत आहे." असा ठराव सुचविला व त्यास प्रो. वा. म. जोशी यानी अनुमोदन दिलें. ठराव सर्वानुमतें मान्य करण्यात आल्यानंतर अध्यक्षानी सभा विसर्जन केली.

# परिषद्वार्ता



## (चिटणीसांकडून)

ता. २४ नोव्हेंबर १९४० या दिवशीं भरलेल्या कार्यकारी मंडळाच्या सभेंत रत्नागिरी संमेलनांतील १७ व्या ठरावाच्या अंमलबजावणीसंबंधाने पत्रिकासमितीने केलेल्या शिफारशींचा विचार करण्यांत येअून त्यांस मान्यता देण्यांत आली. त्याचप्रमाणे कै. माधवराव पटवर्धन स्मारक समितीने नियोजित माधवराव पटवर्धन सभागृह बांधण्यासाठी देअूं केलेल्या रु. ७००० रकमेचा व अटींसंबंधी चर्चा होअून साधारण सभेस शिफारशी करण्यांत आल्या.

**संमेलन**— सोलापूर येथे भरणाऱ्या आगामी म. सा. संमेलनाच्या स्वागत मंडळाची गेल्या महिन्यांत स्थापना होअून संमेलन कार्यकारी मंडळ नेमण्यांत आलें. **कार्याध्यक्ष :** श्री. वि. भि. साठे; **कार्योपाध्यक्ष :** श्री. बाबूराव जक्कल, श्री. अत्तरदे व श्री. रा. शं. राजवाडे; **खजिनदार :** प्रो. गो. प. पटवर्धन; **संयुक्त सरचिटणीस :** श्री. शं. नी. जामदार व श्री. द. ब. मुद्गल; **चिटणीस :** श्री. बसलिंगप्पा शेटे, प्रो. मेहेता, श्री. शं. गो. पटवर्धन, श्री. ना. न. दामले व श्रीमती सरस्वतीबाअी किर्लोस्कर.

संमेलनाच्या कार्यकारी मंडळांत सोलापूर शहरांतील व जिल्ह्यांतील मिळून २४ सभासदांची नेमणूक झाली आहे. संमेलनाच्या कार्याच्या मार्गदर्शनाकरिता सोलापूर नगरवासीयांचें अेक सल्लागार मंडळहि नेमण्यांत आलें आहे.

संमेलनाध्यक्षपदासाठी ता. ६ जानेवारीपर्यंत सुचविलेल्या १७ नांवांपैकी सहांनी आपली संमति देण्याचें नाकारिलें व दोघाकडून स्मरणपत्रें पाठविलीं असतांहि कांहीच अुत्तर आलें नाही. अुरलेली नअू नावें घटनेच्या नियमाप्रमाणे नियामक मंडळाच्या सदस्याकडे रीतसर निवडणुकीसाठी पाठविण्यांत आलीं असून मतमोजणी ता. ५ फेब्रुवारी या दिवशीं होणार आहे.

**परीक्षा**— प्रतिवर्षाप्रमाणे यंदाहि प्राज्ञ व विशारद या परीक्षा नोव्हेंबर १९४० मध्ये घेण्यांत आल्या. 'प्राज्ञ'परीक्षेसाठी अेकूण ६९ अर्ज आले होते. अुपस्थित अुमेदवारांची संख्या ६३ होती. त्यांपैकी खालील ४६ अुमेदवार यशस्वी झाले :—

### प्राज्ञ परीक्षा

#### मुंबअी केंद्र

**दुसरी कक्षा**— श्री. मालतीबाअी परचुरे, श्री. विष्णु श्रीधर फणसळकर, श्री. गुरुनाथ राधाकृष्ण शिरोडकर.

**तिसरी कक्षा**— श्री. शशिशेखर काशीनाथ आठल्ये, श्री. भगवान विष्णु काकिर्डे, श्री. वसंत शंकर कुळकर्णी, कु. अिंदुमती बाळकृष्ण गोडबोले, श्री. केशव शिवराम टिळक, श्री. शारंगधर शामजी पहिलवान, कु. नर्मदा दत्तात्रेय पेंढारकर, श्री. वसंत जनार्दन फाटक, श्री. गणेश नारायण सप्रे, कु. मंदाकिनी दत्तात्रेय साठे.

पुणें केंद्र

दुसरी कक्षा— श्री. श्रीराम हरि अत्तरदे, कु. सिंधू मोरेश्वर आपटे, श्री. लक्ष्मण मारुति कानडे, श्री. चिमणलाल ताराचंद गुजर, श्री. दामोदर महादेव गोविंत्रीकर, श्री. तुकाराम अेकनाथ डांगरे, श्री. भिकू नाना साबळे, श्री. रंगनाथ गोविंद सुभेदार.

तिसरी कक्षा— श्री. काशीनाथ जयराम काजरेकर, श्री. दत्तात्रेय रामकृष्ण कुलकर्णी, श्री. नरहर शंभूराव कुलकर्णी, श्री. नरहर चिंतामण केळकर, श्री. गोपीनाथ लक्ष्मणराव खत्री, श्री. भिकाजी गणेश गोखले, श्री. मुकुंद यशवंत जोशी, श्री. विठ्ठल नारायण ठकार, श्री. गणेश रघुनाथ दीक्षित, श्री. प. उर्फ अण्णा शंकर देशमाने, श्री. देवराम श्रीपत नारखेडे, सौ. सुभद्राबाअी लक्ष्मण पाचे, श्री. जयवंत भिकाजी पाटील, श्री. गणपत विठू माळी, श्री. श्रीपाद दत्तात्रेय वैद्य.

अिंदूर केंद्र

दुसरी कक्षा— श्री. त्र्यंबक गणेश तर्टे.

तिसरी कक्षा— सौ. सरलाबाअी दिगंबर कोराने, श्री. माधव सीताराम गबाळीकर, श्री. वसंत गणेश देशमुख, श्री. बाळकृष्ण अनंत लोकरे.

सांगली केंद्र

दुसरी कक्षा— श्री. विष्णु धोंडो गोरे, श्री. त्र्यंबक शिवराम देशपांडे.

तिसरी कक्षा— श्री. अनंत जनार्दन ओगले, कु. सोनू वासुदेव कुलकर्णी, श्री. नारायण दामोदर देशपांडे, श्री. राघवेंद्र श्रीनिवास नाडपुरोहित.

## विशारद परीक्षा

'विशारद' या परीक्षेसाठी ११ अुमेदवारांचे अर्ज आले होते पैकी ९ अुमेदवारांस अुपस्थित होता आलें. त्यांतील खालील ४ अुमेदवार यशस्वी झाले:—

दुसरी कक्षा— श्री. श्रीराम हरि अत्तरदे, पुणें; श्री. जगन्नाथ गणेश यादव, सांगली.

तिसरी कक्षा— श्री. माधव कृष्ण वेहेरे, पुणें; श्री. प्रभाकर लक्ष्मण सासवडकर, पुणें.

अितर— सिंध सरकाराकडून होत असलेल्या मराठीच्या व गुजरातीच्या गळचेपीचा निषेध करण्यासाठी पुणें नागरिकांची सभा भरविण्यास म. सा. परिषदेने श्री. दि. वि. काळे, श्री. चिं. ग. कर्वे यांची योजना केली. ही जाहीर सभा ता. १५ डिसेंबर १९४० या दिवशीं श्री. ज. स. करंदीकर यांच्या अध्यक्षतेखाली भरून पुढील ठराव सर्वानुमतें मान्य करण्यांत आला :—

"पुण्यांतील नागरिकांची ही सभा, सिंध सरकाराने बिगरसिंधी प्राथमिक शाळांना मिळणारी सरकारी मान्यता व मदत थांबविण्याबद्दलच्या नुकत्याच केलेल्या ठरावाचा निषेध करते आणि सदर ठरावामुळे सिंध प्रांताच्या अुत्कर्षाला कारणीभूत झालेल्या सिंधीतर मराठी व गुजराती समाजांना होणारा अन्याय व अडचण तात्काळ दूर करण्याविषयी आग्रहाची सूचना करते."

हा ठराव डॉ. र. पु. परांजपे यांनी सभेपुढे मांडला व त्याच्या पुष्ट्यर्थ श्री. दा. वि. गोखले, श्री. य. रा. दाते, श्री. ल. गं. काळे, श्री. शंकरराव चव्हाण अित्यादि वक्त्यांचीं भाषणें झालीं. या ठरावाच्या प्रती सिंधचे गव्हर्नर व सिंध सरकारचे पंतप्रधान यांजकडे पाठविण्यांत आल्या. याबद्दलची पोच परिषदेच्या कार्यालयांत अद्याप आली नाही.

हिंदी साहित्य संमेलनानिमित्त पुण्यास आलेल्या पं. श्रीरामशर्मा, संपादक, 'विशाल भारत' व अितर हिंदी साहित्यिकांनी परिषदेच्या कार्यालयास भेट दिली व लिपीसंबंधी बराच विचारविनिमय झाला.

पुण्याच्या काणे-सत्कार-समितीकडून श्री. पां. वा. काणे यांचें तैलचित्र म. सा. परिषदेस नजर करण्यात आलें. याबद्दल परिषद् या स्मारक-समितीची आभारी आहे.

धारवाड येथे डिसेंबर १९४० मध्ये भरलेल्या २५ व्या कन्नड साहित्य संमेलनास म. सा. परिषदेतर्फे प्रतिनिधि म्हणून प्रो. वि. मा. दी. पटवर्धन व श्री. स. रं. सुंठणकर यांची योजना करण्यात आली.

## नवीन साधारण सभासद

पुणें

१ श्री. शिवराम श्रीपाद वाशीकर, दादर
२ श्री. बाळकृष्ण गणेश मुर्डेश्वर, मुंबअी
३ श्री. विठ्ठल रामजी मुत्तेपवार, अुमरी
४ श्री. विश्वनाथ अमृतराव देशिक, ,,
५ श्री. गंगाधर अण्णाजी दिमोटे, जव्हार
६ श्री. बापूराव शिवराम नाअीक, मुंबअी
७ श्री. अ. ह. लिमये
८ श्री. शांताराम अुर्फ शामराव नीळकंठ ओक
९ श्री. दत्तात्रेय विष्णु देवघर
१० डॉ. गजानन विठ्ठल देसाअी
११ श्री. शंकर दामोदर चितळे
१२ श्री. नारायण माधव संत

## तहहयात

डॉ. श्रीकृष्ण सखाराम भावे, बडोदें

---

## परिभाषा चर्चा मंडळवृत्त

अहवालाच्या तिमाहींत मंडळाच्या पाच बैठकी झाल्या. ता. २१ नव्हेंबर आणि १६ डिसेंबरच्या बैठकींत श्री. रा. का. भिडे यांनी अनुहरण किंवा अनुवंशता (Heredity) विषयक काही परिभाषा मांडली. याच विषयावर ता. २२ जानेवारीच्या सभेंत प्रो. स. वि. आफ्ळे यांनी स्वतःला मान्य असलेली परिभाषा व्याख्यानद्वारा मांडून दाखविली. या विषयावरील चर्चा अद्याप पुरी व्हावयाची आहे.

ता. १७ डिसेंबरच्या बैठकींत प्रो. डॉ. दि. धों. कर्वे यांनी रसायनपरिभाषेविषयींचे स्वतःचे कांही विचार मांडले. ते थोडक्यात असे:—

रसायनपरिभाषाविषयक शब्दाचे दोन वर्ग— (१) ज्याचा अर्थ कळणें जरूर आहे, ज्याच्या अर्थावरून विशिष्ट प्रकारच्या घटना, क्रिया, विशिष्ट तऱ्हेने बनलेले पदार्थ अित्यादि कांचा बोध होतो; (२) जे शब्द केवळ पदार्थांचीं नावें आहेत.

पहिल्या प्रकारासाठी सार्थ, सुटसुटीत शब्द बनवावे. त्यांपासून संयुक्त शब्द, धातुसाधितें वगैरे बनूं शकतील अशी काळजी घ्यावी.

पूर्वी माहीत असलेल्या पदार्थांच्या नांवापैकी सोनें, रुपें वगैरेसारखीं जीं नांवें प्रचारांत आहेत तीं किंवा त्यांचीं संस्कृत रूपें स्वीकारावींत. अलीकडे शोध लागलेल्यांपैकी रेडियम्, क्रोमियम् वगैरेसारखीं गुणधर्मद्योतक नांवें आहेत त्यांना अन्वर्थक शब्द बनवावेत. कोलंबियम्, जर्मेनियम् वगैरेसारखीं जीं नावें संशोधकानी आपल्या देशादिकांच्या स्मरणार्थ दिलीं असतील तीं तशींच स्वीकारावींत.

रसायनपरिभाषेविषयींचें हें स्थूल धोरण बैठकींत मान्य झालें असून तदनुसार चालू वर्षी रसायनपरिभाषानिश्चितीचा प्रश्न हातीं घ्यावा असें ठरलें आहे.

ता. १६ जानेवारीच्या बैठकींत प्रो. रा. न. जोशी यांनी 'वैश्वकिरण' (कॉस्मिक रेज) या विषयावर व्याख्यान दिलें. आधुनिक वास्तवशास्त्रांतला हा अेक चित्ताकर्षक विषय असल्यामुळे प्रो. जोशी यांचें हें व्याख्यान 'पत्रिके'च्या वाचकांना बहुधा लेखरूपाने लवकरच मिळूं शकेल अशी अपेक्षा आहे.

(२) औद्भिदभाषासमितीच्या अेकंदर २१ बैठकी झाल्या. या बैठकींत औद्भिद-शास्त्रांतल्या अेका अंगाविषयींची म्हणजे बाह्यरूपविचार(morphology)विषयींची परिभाषा पुरी झाली आहे. तूर्त या परिभाषेवर थोडेसे संस्कार चालू आहेत.

(३) हिंदी साहित्य संमेलनाच्या निमित्ताने पुण्यास आलेल्या परप्रांतीय विद्वानांशीं परस्परपरिचयाचा आणि अनौपचारिकरीत्या कांही थोडा विचारविनिमय करण्याचा योग ता. २७ डिसेंबर रोजीं जुळून आला. या दिवशीं परिभाषामंडळाच्या चिटणिसाच्या विनंती-वरून डॉ. सत्यप्रकाश, श्री. दुलारेलाल भार्गव, सौ. सावित्रीदेवी भार्गव, श्री. पुत्तनलाल विद्यार्थी, व श्री. रामचंद्र टंडन यांनी परिषदेच्या कार्यालयाला भेट दिली. या वेळीं हिंदी संमेलनाच्या 'विज्ञान' विभागाचे अध्यक्ष डॉ. सत्यप्रकाश यानी हिंदी वाङ्मयांतील शास्त्रीय ग्रंथांविषयी थोडक्यांत माहिती सांगितली. स्थानिक साहित्यिकांपैकी आणि शास्त्राभ्यासांपैकी श्री. के. नारायण काळे, प्रो. रा. ना. जोशी, प्रो. द. वा. लिमये, श्री. श्री. के. क्षीरसागर, प्रो. कृ. पां. कुलकर्णी, श्री. ह. पु. परांजपे, प्रो. स. वि. आपटे, श्री. य. रा. दाते अित्यादि-कांनी सभेच्या कामांत भाग घेतला.

(४) प्रो. डॉ. दि. धों. कर्वे यांनी 'सृष्टिज्ञान' संपादकमंडळाच्या वतीने प्रकाशित झालेल्या 'पदार्थविज्ञान' आणि 'रसायन'विषयक परिभाषाकोशाची अेकेक प्रत परिभाषा-मंडळास नजर केली. याबद्दल 'मंडळ' अुभयतांचें ऋणी आहे.

त्र्यं. गो. ढवळे
कार्यवाह, परिभाषा-चर्चामंडळ.

---

म्हटल्यानंतर प्रो. जोशी यांनी अध्यक्षांची सूचना मांडली. ते म्हणाले, आजचे नियोजित अध्यक्ष महाराष्ट्रांतील आजच्या अत्यंत लोकप्रिय अशा चार-पांच कादंबरीकारांपैकी अेक आहेत. शिवाय ते कला आणि वाङ्मय या विषयांवर स्वतंत्र बुद्धीने विचार करणारे मार्मिक टीकाकार आहेत. त्यांच्याकडून आपणांस कांही तरी नवीन विचार अैकावयास मिळतील अशी आशा बाळगण्यास हरकत नाही. प्रो. माचवे यांनी दुजोरा देताना अध्यक्षांच्या राजकारणविषयक कामगिरीचाहि अुल्लेख केला. त्यानंतर टाळ्यांच्या गजरांत अध्यक्ष स्थानापन्न झाले. त्यानंतर मंडळाचे अुपाध्यक्ष डॉ. दिवेकर यांनी त्यांना पुष्पहार अर्पण केला. नंतर अध्यक्षांनी आपलें अत्यंत विचारपरिप्लुत व आवेशयुक्त भाषण वाचून दाखविलें. "व्यक्ति आणि विश्व यांच्या नवनव्या संगतींतून निर्माण होणारें नवनवें साकल्य म्हणजेच नानाविध कलाकृति. कलेंत व्यक्त होणारी वास्तवता आणि नजरेस दिसणारी वास्तवता यांत विशाल अंतर आहे. व्यक्ति आणि विश्व यांची अनुभवजन्य नवी संगति नवा दृष्टिकोन मानवामानवांतील नवीन अधिक अर्थपूर्ण नातें 'नवी मानवता' नव्या मानवतेच्या जाणीवेमुळे ध्वनित होणारी व्यक्ति आणि समाज यांचें नवें साकल्य आणि नव्या साकल्यांतून व दूर दूर दिसणारीं नवीं क्षितिजें हींच कलेंत व्यक्त होणाऱ्या वास्तवतेचीं प्रथम-चिन्हें आहेत. पूर्वसिद्ध, रूढ सामाजिक निष्ठेवरील विश्वास ढासळल्याखेरीज कलेला अनुकूल अशी भूमिका अस्तित्वात येणें अशक्य आहे. वर्तमान समाजसंघर्षांत जीवन व्यतीत करतां करतां प्रत्यक्ष अनुभवास येणारी वास्तवता कलात्मक रीतीने व्यक्त करण्याकरिता जो व्यक्तिस्व-विकास, आत्मप्रत्ययावरील विश्वास, नव्या जाणिवेची नवी दृष्टि, नव्या मानवतेचा साक्षात्कार, नव्या वास्तवतेचें दर्शन आणि रूढ प्रतिष्ठांचा मर्मभेदी प्रतिकार करण्याचें सामर्थ्य अित्यादि गोष्टींचा महाराष्ट्रीय कलावंतांमध्ये प्रादुर्भाव झाला तरच महाराष्ट्रांत अुत्तम कला निर्मिति होअील." असा त्यांच्या भाषणाचा मुख्य विषय होता. अध्यक्षीय भाषणानंतर मंडळाचे चिटणीस रा. पु. रा. टिल्लू यानी संस्थेचा वार्षिक वृत्तान्त वाचून दाखविला.

दुसरे दिवशी सकाळीं आजचीं मराठी नियतकालिकें समाजाच्या अभिरुचीस अनिष्ट वळण लावीत आहेत या विषयावर चुरशीची चर्चा झाली. चर्चेंत डॉ. दिवेकर, प्रो. जोशी, श्री. दि. ना. डांगे, श्री. खेडकर, झोकरकर, कु. शिर्के, प्रो. माचवे अित्यादींनी भाग घेतला होता. आजच्या नियतकालिकातून येणाऱ्या वैयक्तिक टीका, अश्लील विनोद अित्यादि प्रकारां-वर बहुतेक वक्त्यांनी भर दिला. व कांही वक्त्यांनी आपल्याला या गोष्टी पाहिजे असतात म्हणून त्या खपतात, वैयक्तिक निंदा कित्येक वेळां समाजाच्या हिताच्या दृष्टीने अवश्यक असते, आपल्या देशाच्या आर्थिक परिस्थितीमुळे अशा प्रकारचें वाङ्मय निघतें व खपतें अित्यादि मुद्दे पुढे मांडले. अध्यक्षानी समारोप करताना असें सांगितलें की जोपर्यंत शासनसंस्था आपल्या हातात नाही तोपर्यंत या प्रकारांबद्दल नुसती शाब्दिक चर्चा करण्यांत कांही अर्थ नाही. तेव्हा या सर्व गोष्टींचें मूळ जें राज्यतंत्र त्याला हात घालण्याचा प्रयत्न व्हावयास पाहिजे. यानंतर डॉ. दिवेकर यांनी अध्यक्षांचे यथोचित अशा शब्दांत आभार मानल्यावर 'वंदे मातरम्' गीत होअून सकाळचा कार्यक्रम संपला.

संध्याकाळीं चार अेक वाजतां श्री. काळेले (अिंदूर), श्री. झोकरकर (देवास), श्री. आष्टेवाले यांचें काव्यगायन झालें व त्यानंतर 'कला व प्रगति' या विषयावर श्री. पु. य. देशपांडे यांचें व्याख्यान सुमारें सव्वा तासपर्यंत झालें. रात्रौ गायन-वादनाचा कार्यक्रम होअून अुत्सव समाप्त झाला.

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेचीं पहिलीं बारा वर्षें

अर्थात्

## पत्रिकेच्या अंकांचीं वर्षशः बांधलेलीं बारा पुस्तकें

दर पुस्तकांत अभिप्राय, अैतिहासिक, चरित्रें, निबंध, पुस्तकपरीक्षण, भाषिक शंकाचर्चा, सामाजिक, अित्यादि विषयांवर सदरें असून, सर्व मिळून महाराष्ट्र-भाषा, वाङ्मय, समाज, अितिहास यांसारख्या विविध क्षेत्रांतील नवीन विद्वत्ताप्रचुर विचार आणि माहिती मिळणार आहे.

**किंमत**— सुंदर कापडी बांधणी विषयसूचीसह दर वर्षाच्या पुस्तकास ४ रुपये, परिषदेच्या सभासदांस २ रु; ट. ख. निराळा.

**वि. सू.**— तेराव्या वर्षाच्या पुस्तकांच्याहि बांधीव प्रती तयार आहेत, परंतु या प्रत्येक प्रतीस सभासदांसहि ४ रुपये पडतील; ट. ख. निराळा.

---

## 'मराठी भाषेचा व वाङ्मयाचा अितिहास'

### महानुभावअखेर

लेखक— कै. **बाळकृष्ण अनंत भिडे**, आकार- रॉयल अष्टपत्री, पृष्ठें-१२५. अत्तम बांधणी. किंमत फक्त अेक रुपया. परिषदेच्या सभासदांस बारा आणे; ट. ख. वेगळा.

विशेष माहितीसाठीं लिहा :—

चिटणीस,

म. सा. परिषद्, टिळक रस्ता, पुणें २.

---

आर्यसंस्कृति मुद्रणालय, चिमणबाग, टिळक रस्ता, पुणें, येथे लक्ष्मण नारायण चापेकर यांनी छापिलें व पुणें येथे महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या कार्यालयांत परिषदेकरिता वामन मल्हार जोशी यांनी प्रसिद्ध केलें.

# सभासदांस विनंती

परिषदेचे नवीन वर्ष जानेवारीपासूनच सुरू झाले. सभासदांना माहितीसाठी गेल्या अंकी त्यांजकडून यावयाच्या वर्गणीची रक्कम त्यास स्वतंत्ररीत्या कळविण्यांत आली होती, परंतु अद्याप बऱ्याच सभासदांची वर्गणी येणे आहे. तरी सभासदांनी शक्य तितक्या लवकर आपली वर्गणी पाठवून परिषदेस उपकृत करावे. जून १९४१ पर्यंत सभासदांकडील वर्गणीची वाट पाहून जुलैचा अंक त्यांजकडे व्ही. पी. ने पाठवावा लागेल इकडे त्यांनी अवश्य लक्ष पुरवावे अशी त्यांस विनंती आहे.

चिटणीस

**म. मा. परिषद्**

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका



वर्ष १४ वें ] **अनुक्रमणिका** [ अंक २ रा





# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका



## अभंग छंद—



तुला विसराया माझा अट्टाहास । मन घेअी ध्यास । तुझा परी. ।
दूर दूर जाया किती चळवळे । किती तळमळे । तुजवीण !
येअू कसा तेथे ? माझ्यावरी आळ । मन हे ओढाळ । तुझ्याकडे. ।
तुझ्या अिंद्रजालीं अडके पाखरू । जीवें नको मारूं । अपगाला. ॥

जेथे जावें तेथे सागाती साअुली । मूर्ती गे सानुली । मनीं तुझी. ।
साअुली न सत्य, चेतनाविहीन । चैतन्याची खाण । तुझी मूर्ती. ।
साअुली न सत्य, विरे अंधारात । तमीं पाजळत । तुझी स्मृती. ।
अैसा वेध लागे मनीं आभासाचा । ध्यास संगतीचा । खऱ्याखुऱ्या. ॥

अगा तुजवरी ठेवायाचा हेत । वाऱ्यावरी ज्योत । मालवाया ! ॥
ज्योत लवलवे निराजनामधी । तुळशीसंनिधीं । थरथरे. ।
अगे, विझायाची अशीच ना क्षीण ? व्यर्थ संजीवन । अपेक्षिले ? ॥

तरी कांहीकाळ तेवेल ती मंद । त्यातही आनंद । मानील ती. ।
जाअील जळून स्निग्धता आतील । मागुती राहील । राख मात्र ! ॥
—परी तिमिरात मंदशी तेवून । तव दे दर्शन । हेंच भाग्य ॥

—ना. ग. जोशी

## २५ व्या महाराष्ट्र-साहित्य-संमेलनाचे नियोजित अध्यक्ष

# श्री. वि. स. खांडेकर यांचा संदेश

आजचें मराठी वाङ्मय सुंदर आहे यांत शंका नाही. पण तें सौंदर्य अेखाद्या मोठ्या तळ्याचें आहे; नदीचें किंवा समुद्राचें नाही! तळ्यांत लहान लहान सुंदर तरंग अुठावेत, त्याप्रमाणे आपल्या आजच्या वाङ्मयांत भावनांच्या विविध छटांचा विलास आढळतो. जलाशयांत विविध रंगांचीं कमळें अुमलावींत, त्याप्रमाणे वैचित्र्यपूर्ण कल्पनेचा आविष्कारहि आजच्या मराठी वाङ्मयात प्रतीत होतो. पण तळ्यांतले तरंग आणि समुद्रांतल्या लाटा यांच्यात जेवढें अंतर आहे, तेवढाच फरक जगाच्या अुत्कृष्ट वाङ्मयांतल्या भावनाकल्लोळांत आणि आजच्या आपल्या वाङ्मयांतल्या भावनाविलासांत आहे. आमच्या कल्पकतेचें विकसनहि अजून कमळाप्रमाणेच होत असतें. त्यांत नाजूक सौंदर्य असलें तरी जीवनाच्या गतीचें प्रतिबिंब दिसत नाही. तें समुद्रांत विहार करणाऱ्या माशांच्या हालचालींतच आढळतें.

या वाङ्मयीन रम्यतेला भव्यतेची जोड मिळाल्याशिवाय मराठीचें वैभव वृद्धिंगत होणार नाही, आणि माधवराव पटवर्धनांनी जगांतल्या अितर भाषा मराठीला खंडणी देत आहेत असें जें सुखस्वप्न रंगविलें होतें, तें खरेंहि होणार नाही. वाङ्मयांतली ही भव्यता साध्य करण्याकरिता साहित्यसेवकांनी कला ही क्रीडा असली, तरी ती विराट समाजपुरुषाची क्रीडा आहे, मनुष्याच्या आत्म्याची क्रीडा आहे, या गोष्टीचा स्वतःला कधीहि विसर पडूं देतां कामा नये. साहित्याच्या भव्यतेच्या आड येणारीं अनेक बंधनें तटातट तोडून टाकण्याचें काम आजचा काळ करीत आहे. या संधीचा साहित्यिकांनी योग्य अुपयोग केला तर ज्ञानदेवांनी मराठी वाणी अमृतापेक्षाहि श्रेष्ठ आहे, असें जें अभिमानाने सांगितलें, त्याचा प्रत्यय भावी पिढ्यांना आल्यावांचून राहणार नाही. अमृताची माधुरी मराठींत केव्हाच आली आहे. त्याची संजीवक शक्ति आपल्या मायबोलींत केव्हा येते हें पाहण्याकडे आज दोन कोटि मराठ्यांचे डोळे आशायुक्त अंतःकरणाने लागले आहेत. मराठी लेखकांची आजची पिढी त्याची ही आशा सफल करो.

कोल्हापूर
१६-३-४१

वि. स. खांडेकर

# विष्णुबावा ब्रह्मचारी



( लेखक— गंगाधर बाळकृष्ण सरदार )

श्रीविष्णुब्रह्मचारी विदितबहुमतः प्रौढविख्यातकीर्ति ।
ब्रह्मण्यः स्पष्टवक्ता सदसि धृतियुतः खडयन् म्लेच्छवादान् ।
वेदैः शास्त्रैस्तपोभिर्जयति गुणगणैस्तीव्रवैराग्ययोगै ।
बोधैः सत्यैश्चिदंगैर्नतमुनिरिव यो मूर्तिमान् दत्तराजः ॥[1]

महाराष्ट्रात अिंग्रजी अंमल सुरू होण्यापूर्वीच खिस्ती धर्मोपदेकानी मुंबअीस आपल्या धर्मप्रसाराच्या चळवळीचा झेंडा रोवला होता. इ.स. १८१३ मध्यें त्यानी 'मुंबअी बैबल सोसाइटी' व 'अमेरिकन मराठा मिशन' ह्या दोन धर्मसंस्था स्थापन केल्या; आणि त्याच्या द्वारे ते खिस्ती धर्माचें व पाश्चात्य संस्कृतीचें लोण मराठ्याच्या घरोघर नेऊन पोंचविण्याच्या प्रयत्नाला लागले[2]. त्यांच्या मार्गात अनंत अडचणी होत्या. ह्या देशात अिंग्रजी राजसत्तेचें बस्तान अद्याप नीट बसलेलें नाही, अशा वेळीं लोकाच्या धर्मभावना दुखावल्या तर न जाणो कदाचित् ते बिथरतील, म्हणून अेल्फिन्स्टनप्रभृति अिंग्रज मुत्सद्याचा खिस्ती धर्मप्रसाराला बिलकूल पाठिंबा नव्हता. अेतद्देशीय लोकाचीं मनेंहि त्याच्या कार्याबद्दल साशंक होतीं. मद्रास आणि बंगाल ह्या दोन्ही प्रातापेक्षा महाराष्ट्राची प्रकृति व परंपरा फार निराळी होती. त्यामुळे मराठयाच्या या डोंगराळ मुलखात त्याना सुखासुखी कोठेच थारा मिळाला नाही. गावोगावीं अपमान व छळ सहन करावा लागला. पहिल्या वीस वर्षात जेवढे धर्मोपदेशक मृत्युमुखीं पडले, तेवढेदेखील हिंदु खिस्ती झाले नाहीत. अशा निराशामय व प्रतिकूल परिस्थितींतहि त्यानी आपलें कार्य निष्ठेने व नेटाने चालू ठेवलें; आणि त्या कामीं लोकाची सहानुभूति मिळावी म्हणून सुरवातीस प्रत्यक्ष प्रचारापेक्षा आनुषंगिक गोष्टींवरच जास्त भर दिला. कोशव्याकरणादिकाचें साहाय्य नसताहि प्रथम त्यांनी मराठी भाषेचा परिश्रमपूर्वक अभ्यास केला, आणि हरणी, बाणकोट, पुणें, नगर, नाशिक, जुन्नर, सातारा, शिरूर इत्यादि ठिकाणीं प्रचारकेंद्रें अुघडून उच्चवर्णीयांनी अुपेक्षिलेल्या खेड्यापाडयातील अज्ञ व निरक्षर जनतेंत ते निःशंक मनाने वावरूं लागले.

शेकडों वर्षे दारिद्र्यात व अज्ञानात खितपत पडलेल्या ह्या अफाट जनसंमर्दाकडे पाहून त्याना आपल्या पुढील विस्तीर्ण कार्यक्षेत्राची अचूक कल्पना आली. मूठभर उच्चवर्णीयात जरी आपला निभाव लागला नाही, तरी बहुसंख्य हिंदी लोकाना आपण शिक्षण दिलें, त्यांच्या

---

१ रा. पा, आजरेकर — श्रीविष्णुबावा ब्रह्मचारी याचें चरित्र.

२ "The language of the Marathas, as well as the people themselves, must be Christianized; and the change in the people and in their language must go on together. Neither can very much precede the other." Rev. Bruce — The Literary Work of the American Marathi Mission, P.13.

दैनंदिन अडचणी दूर केल्या, त्यांच्या धर्मग्रंथांतील दोष त्यांना दाखवून दिले, आणि त्यांच्या-वर होणारा सामाजिक अन्याय व जुलूम यांची त्याना जाणीव करून दिली, तर त्यामुळे ख्रिस्ती धर्माच्या प्रसाराला अप्रत्यक्षपणें पुष्कळच मदत होओील अशी ह्या धर्मोपदेशकांची खात्री पटली; आणि त्या दिशेने त्यांनी आपल्या नानाविध चळवळींचा कार्यक्रम मोठया कुशलतेने आखला. हजारों रुपये खर्चून ठिकठिकाणीं छापखाने काढले. शेकडों लहानसहान पुस्तकें छापून तीं विनामूल्य वाटलीं; खेडोपाडीं मुलामुलींच्या शाळा घातल्या; रोगग्रस्तांना मोफत औषधें पुरविण्याची व्यवस्था केली. देवळात, बाजारात, शेतांत, घाटावर जेथे जेथे म्हणून चार माणसें जमा होण्याचा संभव असे; तेथे तेथे वारंवार जाअून त्याची विचारपूस करण्याचा, त्याच्या अडीअडचणी समजून घेण्याचा, इतकेंच नव्हे तर वेळप्रसंगीं त्याना यथाशक्ति मदत करण्याचाहि त्यानी परिपाठ ठेवला.

ह्या सर्व गोष्टी अल्पावकाशातच फलद्रूप झाल्याशिवाय राहिल्या नाहीत. महार, माग, चाभार, धेड, रामोशी, भिल्ल वगैरे शूद्र व अतिशूद्र ज्या हिंदुसमाजाचे अविभाज्य घटक म्हणून शतकानुशतकें नादत होते, ज्याच्या धारणेसाठी पिढ्यानपिढ्या राबत होते, त्यातील वरिष्ठवर्णीयाकडून त्याना अशा तऱ्हेचा सहानुभूतीचा जिव्हाळा कधीच लाभला नव्हता; अुलट शुद्धाशुद्धतेच्या भ्रामक कल्पनेने उच्चवर्णीय लोक त्याच्या सावलीपासूनहि चार पाअुलें सदा लाब राहत आले होते. तेव्हा ख्रिस्ती धर्मोपदेशकांच्या अशा खेळीमेळीच्या व बंधु-भावाच्या वागणुकीमुळे दलितवर्गातील भोळयाभाबडया लोकाचीं मनें स्वाभाविकपणेंच त्यांच्या कडे ओढलीं गेलीं. ख्रिस्त्याच्या शाळेंत आपलीं मुलें ब्राह्मण, परभू, मराठे वगैरे पाढरपेशा जातींतील मुलाच्या माडीला माडी लावून बसूं शकतात याचें त्याना फार नवल वाटलें. परंपरा-गत सामाजिक बंधनें जरा ढिलीं पडताच त्याच्या सुप्त अिच्छा व आकांक्षा जागृत झाल्या आणि ख्रिस्तीधर्मप्रचारक हेच आपले खरे हितचिंतक व मार्गदर्शक होत असा त्याचा समज झाला. हळुहळू सरकारचा विरोधहि मावळला, व ख्रिस्ती धर्मोपदेकाना आपलें कार्य निर्वेधपणें पार पाडण्यास मोकळीक मिळाली. दिवसानुदिवस त्याच्या शाळातील मुलामुलींची संख्या वाढत चालली. अितर शालेय अभ्यासक्रमाखेरीज येशू ख्रिस्ताच्या सुवर्तमानाचा माफक 'डोस' मुलाच्या गळीं अुतरविण्याचा त्याचा शिरस्ता होता. अशा रीतीने त्यानी आपला धर्मप्रचार धीमे-धीमे पण अव्याहत सुरू ठेवला होता.

अशिक्षिताना सेवावृत्तीने जिंकावें व सुशिक्षिताना युक्तिवादाने कुंठित करावें असा ख्रिस्ती धर्मोपदेशकाचा दुहेरी डाव होता. सरकारचें शिक्षणविषयक धोरणहि त्यांच्या प्रयत्नाला पोषकच होतें. पाश्चात्य सुधारणेचा व संस्कृतीचा चिरंतन ठसा भारतवासीयांच्या अंतःकरणावर अुमटवावा हाच नव्या शिक्षणक्रमाचा स्पष्ट उद्देश होता[१]; आणि अव्वल अिंग्रजींतील सु-शिक्षितांच्या आचारविचारात तो सफळ होत चालल्याचीं चिन्हें दिसूं लागलीं होतीं. ज्या अर्थी अिंग्रजानी युद्धांत आपला पराभव केला, त्या अर्थी दरअेक बाबतींत ते आपल्यापेक्षा श्रेष्ठ

१ "The object of Government we take to be perfectly distinct and intelligible, namely, to make as vigorous an impression upon the Asiatic mind as possible, to rouse it from the torpor into which it has subsided for some hundred years past, and to place it in a condition for receiving and digesting the results of European progress and civilization."— Report of the Board of Education, IV, P.22.

असलेच पाहिजेत अशा तऱ्हेचा न्यूनगंड आमच्या नवसिक्षितांत निर्माण झाला होता. ज्याप्रमाणे पाश्चात्यांची भौतिक संपत्ति अपार आहे, विद्या व कला अगाध आहेत, त्याप्रमाणे त्यांचा धर्म व संस्कृतिहि उच्चतर असणारच असें सरळ अनुमान त्यानी बांधलें. ह्या मानसिक दुबळेपणाचा ख्रिस्ती धर्मोपदेशकानी पुरेपूर फायदा घेतला. हिंदुधर्म व समाजरचना यातील वैगुण्यांवर त्यांनी अेकतर्फी टीकेची झोड उठविली, आणि ख्रिस्ती धर्मांचा महिमा तारस्वराने गाण्यास आरंभ केला. अपरिपक्क विचाराच्या अनेक अर्धशिक्षित तरुणाच्या मनावर या विध्वंस्त टीकेचा फारच अनिष्ट परिणाम झाला. विष्णु भास्कर करमरकर, रामकृष्ण विनायक मोडक, नारायण शेषाद्रि, बाबा पदमनजी अित्यादि सुशिक्षितानी राजरोस ख्रिस्ती धर्म स्वीकारला; व त्याचा ते मोठ्या हिरिरीने प्रचार करूं लागले. अितर सुशिक्षितानी जरी उघडपणें धर्मांतर केलें नाही, तरी स्वधर्मावरील त्यांची श्रद्धा अजिबात उडाली होती; आणि म्हणूनच या सुमारास 'परमहंस मंडळी'सारख्या ख्रिस्ताळलेल्या संस्थेचा जन्म झाला. ख्रिस्ती धर्मोपदेशकाचें प्रचारकार्य अतिशय पद्धतशीर व परिणामकारक होते; त्यात जुल्मजबरदस्तीला फारच थोडा वाव होता. परंतु 'तुका म्हणे पाणी । पातळपणें तळा खणी' ह्या न्यायाने ख्रिस्तानुयायाचें हें धार्मिक व सास्कृतिक आक्रमण मुसलमानाच्या कड-या धर्मप्रचारापेक्षा जास्त भयावह व हानिकारक होतें. त्याचे दूरगामी परिणाम लक्ष्यात घेअून मोरभट दांडेकर, नारायणराव, भाअू महाजन, गंगाधरशास्त्री फडके, कृष्णशास्त्री चिपळूणकर याच्यासारख्या महाराष्ट्रातील विचारवंतानी त्याला वेळींच पायबंद घालण्याचा प्रयत्न केला. ख्रिस्तीधर्मोपदेशकाच्या वाढत्या चळवळीचा यथासाग प्रतिकार करण्यासाठी अुपदेशचंद्रिका, विचारलहरी, सद्धर्मदीपिका अित्यादि नियतकालिकेंहि अुदयास आलीं. परंतु वैदिक धर्मांचें पुनरुज्जीवन व ख्रिस्ती आक्रमणाचें अुच्चाटन या जोडकार्याला सर्वस्वीं वाहून घेअून तें आपल्या डोळ्यादेखत अंशतः सिद्धीस नेण्याचा मान विष्णुबावा ब्रह्मचारी याच्याच वाट्याला येतो. लेख, संभाषणें, वादविवाद, व्याख्यानें अित्यादि अनेक मार्गांनी त्यानी ख्रिस्ती धर्मोपदेशकाचा पिच्छा पुरविला, व त्याचाच कोटिक्रम त्याच्यावर उलटवून त्याना वेळोवेळीं निरुत्तर केलें. विष्णुबावाच्या सतत पंधरा वर्षांच्या परिश्रमामुळे ख्रिस्तीधर्मप्रसाराची प्रबळ लाट ओसरली, व सामान्य जनाची संशयाकुल दृष्टि पुन्हा स्वधर्माकडे आत्मीयतेने व अभिमानाने वळली.

विष्णुबावाचें संपूर्ण नाव विष्णु भिकाजी गोखले. त्याचे वडील ठाणे जिल्ह्यात राजपुरी तालुक्यापैकी निजामपूर पेट्यात शिरवली[1] या नावाच्या लहानशा खेड्यात राहत असत. त्याना सहा मुलगे आणि पाच मुली अशीं अेकंदर अकरा अपत्यें झालीं. त्यापैकी विष्णुबावा हे दहावे. त्याचा जन्म शके १७४७ मध्यें (सन १८२५) श्रावण शुद्ध पंचमीस झाला. विष्णुपंत पाच वर्षांचे असताना त्याचे वडील दिवंगत झाले. सातव्या वर्षी त्याचें मौंजीबंधन झाल्यावर त्यानी पूर्वापार पद्धतीप्रमाणे एक वर्षपर्यंत वेदाध्ययन केलें, व लेखनवाचन, हिशेबठिशेब वगैरे व्यावहारिक शिक्षणहि घेतलें. त्याचें अक्षर सुबक व वळणदार होतें. नवव्या वर्षी जमीन वसुलातीकडील तालुका कचेरींत ते अुमेदवारी करूं लागले. परंतु घरच्या गरिबीमुळे त्याच्या आअीने त्याना लवकरच शेती, बागाईत, गुरें चारणें, लाकडें फोडणें वगैरे कामात घातलें. आपल्या मुलाच्या अंगातील गूढ सामर्थ्याची त्या वेळीं त्या माअुलीला काय कल्पना असणार? परंतु विष्णुपंताची महत्त्वाकांक्षा व आत्मविश्वास त्याना स्वस्थ बसूं देईना. बाराव्या वर्षी त्यानी महाड येथे भुसाराच्या दुकानात चाकरी पतकरिली दोन वर्षांतच त्याना ह्या कामाचाहि कंटाळा आला

१ हल्लीं हें खेडें कुलाबा जिल्ह्यात माणगाव तालुक्यात मोडतें.

व ठराविक मुदत संपताच त्यांनी दुकानदारास सोडचिठ्ठी दिली. पुढे ते रत्नागिरी जिल्ह्यांतील संगमेश्वर बंदरावर 'कष्टम' खात्यात अुमेदवारीस राहिले. तेथे दोन तीन महिने काढून ते पुन्हा ठाणें जिल्ह्यात आले व कमिटीसमोर परीक्षा देअून सरकारी चाकरीस लायक ठरले. सोळाव्या वर्षी त्याना साष्टी तालुक्यात 'कष्टम' खात्यात नोकरी मिळाली. त्यानंतर सात वर्षेपर्यंत वसई, कल्याण, भिवंडी, अुरण अित्यादि ठिकाणीं त्यांनी आपली नोकरी चोखपणें बजाविली. लहानपणापासूनच धार्मिक गोष्टीकडे त्यांचा कल होता. कथा-कीर्तन, पुराण-प्रवचन अैकण्याची संधि ते कधींहि वाया दवडीत नसत. साधु, संन्यासी, बुवा, बैरागी यांच्यापासून काहीतरी परमार्थ लाभ घडेल म्हणून ते मोठ्या जिज्ञासेने ह्या मंडळींत मिसळत. परंतु सर्वत्र त्याची निराशाच झाली. संस्कृत भाषेचें त्याचें अध्ययन बेताचेंच असावें. मात्र विवेकसिंधु, ज्ञानेश्वरी, अेकनाथी भागवत, भावार्थरामायण, दासबोध, बोधसागर अित्यादि प्राकृत ग्रंथाचा त्यानी फार परिश्रमपूर्वक अभ्यास केला होता. नवव्या वर्षापासून त्यानी नानातऱ्हेचे व्यवसाय केले परंतु कोठेहि त्याचें चित्त रमेना. अखेर तेविसाव्या वर्षी त्यांना पूर्ण अुपरति झाली. केवळ अुदरभरणासाठी आपला जन्म नाही, त्यापेक्षा अुच्चतर कार्य साधण्यासाठी आपण धडपड केली, तरच आपलें जीवित सफळ होअील, अशा भावनेने सर्वसंगपरित्याग करून ते अरण्यात निघून गेले.

आत्मदर्शनाच्या अुत्कंठेने विव्हल होअून विष्णुबावा सद्गुरूच्या शोधार्थ रात्रंदिवस रानावनांत भटकले. कित्येक महंतांचे त्यानी मंत्रोपदेश घेतले. अनेक साधुसंताना ते शरण गेले; बहुत सिद्ध पुरुषाना त्यांनी नम्रपणें शंका विचारल्या; परंतु दुसऱ्याना ब्रह्मज्ञानाच्या लांब लांब गोष्टी सागणारे हे शब्दपंडित स्वतःच मोहांध व विषयलंपट असल्याचें त्यांना आढळून आलें. या बुवाबाजींतला किळसवाणा दंभ व अनाचार पाहून त्याचें चित्त उद्विग्न झालें. अज्ञानाच्या खोल गर्तेंत बुडालेले हे पोटभरू परमहंस आपल्या शिष्याना कोणती सद्गति देणार याबद्दल त्यांना संशय अुरला नाही. व 'अुद्धरेदात्मनात्मानं' या भगवद्वचनावर विश्वास ठेवून त्यानी स्वतःच्या प्रयत्नानीच आत्मप्राप्ति करून घेण्याचा निश्चय केला. त्यानंतर ते थेट सप्तशृंगीच्या डोंगरावर गेले, व तेथे निव्वळ कंदमुळे खाअून, वेदांतविचार व ध्यानधारणा यामध्ये सदैव निमग्न राहून त्यानी खडतर तपश्चर्या केली. ह्याच ठिकाणीं त्याच्या अंगीं तीव्र वैराग्य बाणले. ज्या आत्मसुखासाठी त्यानी जिवापाड साधना केली, तें हस्तगत झाल्याची त्याच्या अंतरात्म्यानी त्याना ग्वाही दिली. अुभ्या जगाच्या विरोधाला न जुमानता आपल्या सदसद्विवेकबुद्धीवर खंबीरपणें विसंबून राहण्याअितका आत्मविश्वास व निर्भयता त्याच्या ठिकाणीं अुत्पन्न झाली.

अुग्र तपस्येच्या योगाने आपण आपलें कल्याण साधलें पण तेवढ्यानेच आपला कार्यभाग पुरा होत नाही, जगाच्या कल्याणासाठी आपण आपलें अुर्वरित आयुष्य वेंचलें पाहिजे, अशी बावांच्या अंतःकरणांत प्रेरणा झाली. वैदिक धर्म हा अत्यंत अुज्ज्वल व सर्वश्रेष्ठ आहे. परंतु दिवसानुदिवस या देशात त्याचा ऱ्हास होत चालला आहे. त्याच्या शुद्ध स्वरूपाचा लोकांना विसर पडून धर्माच्या नावाखाली भलभलत्या आचाराचें अवास्तव स्तोम माजलें आहे. तेव्हा 'पाखाडमताचें खंडन करून तूं वैदिक धर्माची पुन्हा स्थापना कर' असा प्रत्यक्ष परमेश्वरानेच आपणास आदेश दिला आहे अशी त्याची भावना झाली.

"हे अीश्वरा, तूं मला अरण्यात शंकरपार्वतीरूपाने अनेक वेळा दर्शन देअुन आज्ञा दिल्हीस कीं, माझ्या वेदोक्त नियमात ज्या तारक गोष्टी आहेत त्या लोकाच्या मनात ठसवून दे; कारण कीं, त्या गोष्टींचा लोप झाला आहे."[1]

१ वेदोक्तधर्मप्रकाश, पृ.७३८.

विष्णुबावानी संस्कृत भाषेचें सशास्त्र अध्ययन केलेलें नव्हतें, तेव्हा वेदोक्त धर्माची शिकवण आपण कशाच्या आधारावर सागणार असा संदेह त्याच्या मनात क्षणभर अुत्पन्न झाला. परंतु पाडित्यापेक्षा अंतःप्रेरणेवरच त्याचा जास्त भर होता; म्हणून 'यस्य निश्वसितं वेदाः' असा भगवानच आपला 'बोलविता धनी' असल्यामुळे आपल्या तोंडून वेदबाह्य उपदेश होणार नाही असा त्यानी विश्वास बाळगिला.

"हे अीश्वरा, बापा, तूं दत्तात्रेय अवताररूपाने दर्शन देअून बोललास की, तूं जगात तारक अुपदेश कर, पण त्या वेळेस मी बोललों कीं, मला संस्कृत भाषा येत नाहीं. मग तूं हास्यवदन करून बोललास की, जा विष्णु तूं सहज भाषण बोलशील; तोच वेदगर्भीचा परम सिद्धांत होअील."[1]

सप्तशृंगीच्या डोंगरावरून निघून विष्णुबावा नाशिक येथे पंचवटींत येअून राहिले. नंतर कांही दिवसानी ते पंढरपुरास गेले. तेथे त्यानी अधिकारवाणीने लोकाना वैदिक धर्माचें रहस्य विशद करून सागण्यास प्रारंभ केला. त्याची सडेतोड वृत्ति व अमोघ वक्तृत्व याची लगोलग लोकावर छाप बसली; व लवकरच त्याचें नाव सर्वतोमुखीं झालें. लहानापासून थोरापर्यंत सर्वजण त्याना 'ब्रह्मचारीबावा' या नावाने ओळखू लागले. येथे तीन वर्षे त्याचा मुक्काम होता. तेवढ्या अवधींत त्यानी विठ्ठलाच्या सभामंडपात अेकनाथाच्या 'भावार्थरामायणा'चें तीन वेळा पारायण केलें. अि. स. १८५६ त त्यानी 'भावार्थसिंधु' या नावाचा पंचप्रकरणात्मक ओवीबद्ध ग्रंथ लिहून प्रसिद्ध केला. याच सुमारास सरकारी विद्याखात्याकडील अिन्स्पेक्टर महादेवशास्त्री कोल्हटकर याच्याशीं विष्णुबावाचा परिचय झाला. आपल्या अलौकिक व्यक्तिमत्त्वामुळे त्यानी महादेवशास्त्र्यासारख्या चतुरस्र पंडिताचें मनहि वेधून टाकलें. त्याच्याच आग्रहावरून पुढे बावानी सांगली, मिरज, वाअी, सातारा, पुणें, नगर वगैरे गांवीं जाअून व्याख्यानें दिलीं व त्या त्या ठिकाणच्या लोकाना आपल्या स्वतंत्र व स्फूर्तिदायक विचाराची चमक दाखविली. अि. स. १८५६ सालीं विष्णुबावा द्वारकेला जाण्यासाठी म्हणून निघाले व सप्टेंबर महिन्यात मुंबअीस येअून दाखल झाले. येथे त्याना अकल्पित रीतीने आपल्या जीवनकार्याची ओळख पटली; व यात्रेला जाण्याचा बेत त्यानी लाबणीवर टाकला.

बावाचा मुक्काम मुंबअीस गणेशवाडींत होता. वेदोक्त धर्माचे कट्टर अभिमानी म्हणून त्याची ख्याति अगोदरच शहरभर झाली होती. त्यामुळे दर्शनासाठी दररोज भाविक लोकाचे थवेच्या थवे लोटूं लागले. मुंबअींतील एकंदर परिस्थिति नजरेखालून जाताच त्याना खिस्ती आक्रमणाच्या भयानक स्वरूपाची कल्पना आली. तत्कालीन हिंदु विद्यार्थ्यांना कदाचित् भगवद्गीतेचें नावहि माहीत नसेल, पण खिस्ती धर्मसंस्थाच्या शाळातून त्याच्या बालमनावर बायबलाचा संस्कार नित्यनियमाने घडत होता. आपल्या लोकाचा हा परधार्जिणेपणा पाहून बावाच्या चित्तात कालवाकालव झाली. हिंदुसमाजावर हें मोठें गंडांतर आहे अशी त्यानी आपल्या मनाशीं खूणगांठ बाधली, व त्याचा प्राणपणाने प्रतिकार करण्याचा विडा उचलला. ज्याच्या ज्याच्या मनावर खिस्ती मताचा पगडा बसूं लागला होता, व जे धर्मांतर करण्याच्या बेतात होते त्याच्याशीं खुल्या दिलाने चर्चा करून त्याचें मतपरिवर्तन घडवून आणण्याचा त्यानी उपक्रम सुरू केला. 'परमहंस'मंडळींतील सभासदाशींहि त्यानी वादविवाद केला, व आपल्या बिनतोड युक्तिवादाने स्वतःला नास्तिक म्हणविणाऱ्या कित्येक मूढात्म्यानीं मनें परत हिंदुधर्माकडे खेचलीं.

१ वेदोक्तधर्मप्रकाश पृ. ७३८.

वैदिक धर्मावरील खिस्तानुयायांच्या आक्षेपांचें खंडन करून त्याची श्रेष्ठता लोकांच्या मनावर बिंबवावी म्हणून विष्णुबावानी ता. २० सप्टेंबर १८५६ पासून दर शनिवारीं परभु लोकाच्या विद्यालयात व्याख्यानें देण्यास सुरवात केली. ह्या व्याख्यानमालेची व्यवस्था सोकर बापूजी त्रिलोकेकर, शामराव मोरोजी त्रिलोकेकर आणि आत्माराम सदानंद हे विद्यालयांतील शिक्षक ठेवीत असत. याशिवाय काळकादेवीच्या रस्त्यावर धाकजीचे वाड्यात, सखारामजींच्या वाड्यातील चौधरात व गावातील सद्गृहस्थाच्या घरीं त्याच्या वादविवादाच्या बैठकी भरत असत. बावाचीं काहीं विक्षिप्त मतें व तऱ्हेवाईक वागणूक पुष्कळांना पसंत नसली, तरी हिंदु-धर्माची कड घेऊन भांडणारा तडफदार व वादकुशल प्रचारक म्हणून सर्वांना त्यांच्याबद्दल आदर वाटत होता. त्यामुळे त्याच्या व्याख्यानाला अतोनात गर्दी लोटत असे. अेक आण्याचें तिकीट ठेवून देखील रस्त्यावर बंदोबस्तासाठी पोलीस बोलावण्याची पाळी येअी. वेदोक्तधर्माच्या प्रसारासाठी त्यानी अशा सुमारें पन्नास सभा भरविल्या. "याचा भाषणाची वेधक शक्ति व समयसूचकता हीं प्रसिद्ध होतीं. याची स्मृति फार तिव्रट होती आणि धैर्य विलक्षण होतें. याचा भगवद्गीतेवर विशेष अभ्यास असून त्या अप्रतिम पुस्तकाचा आधाराने त्याचें बहुधा पांडित्य होत असे[1]."

विष्णुबावाच्या या व्याख्यानाचा प्रसार मुंबअीपुरताच मर्यादित नव्हता. त्यांचें प्रतिवृत्त वर्तमानपत्रात नेहमी प्रसिद्ध होत असे. त्यामुळे त्याच्या कार्याचा संबंध महाराष्ट्रभर बोलबाला झाला होता. बावाच्या विक्षिप्तपणावर भाऊ महाजन याच्या 'धूमकेतु' पत्रात फार कडक टीका येत असे. तिला प्रत्युत्तर देण्यासाठी बावाच्या शिष्यानी 'वर्तमानदीपिका' पत्र काढलें. 'धूमकेतु' व 'वर्तमानदीपिका' याचा वाद बरेच दिवस चालला होता. परभु विद्यालयातील सभाना येण्यास महार-धेड प्रभृति अस्पृश्याना बंदी होती. त्यामुळे खिस्तीधर्मोपदेशक तेथे जात नसत. स्वतः बावाना अस्पृश्यता मुळीच मान्य नव्हती. कदाचित् विद्यालयाच्या चालकांनीच तसा नियम केला असेल. त्यानंतर इ. स. १८५७ त खिस्ती धर्मोपदेशकाच्या सांगण्यावरून बावांनी आपल्या सभा कोणात्याहि खाजगी जागेंत न भरविता, समुद्रकिनाऱ्यावर चालू केल्या. त्यामुळे अस्पृश्यासकट सर्वांना या सभाना हजर राहण्यास मोकळीक मिळाली. पारशी, मुसलमान, खिस्ती वगैरे सर्व धर्माचे लोक बावाच्या व्याख्यानाला येत असत. पारशी हे तर वैदिक धर्मानुयायीच आहेत असें त्याचें स्पष्ट मत होतें. दर गुरुवारीं संध्याकाळीं पाच वाजता सभा सुरू होअी त्या वेळीं जुन्या व नव्या कराराच्या आधाराने बावा खिस्ती धर्मो-पदेशकाशीं वादविवाद करीत असत. एका खिस्ती धर्मोपदेशकानेच खालीलप्रमाणे या बैठकीची हकीकत दिली आहे.

"आज समुद्रावर बावाशीं संभाषण करण्यास गेलों. एका पाठीमागें एक अशीं चोहों बाजूंनीं बाकें मांडून एकात एक दोन चौक केले होते. तीं सर्व बाकें लोकानीं भरलीं होतीं, आणि ते बावांची मार्गप्रतीक्षा करीत होते. बावाकरितां मध्यभागीं एक खुर्ची व मेज मांडिलें होतें. पाठीमागली भिंत जरी फार उंच होती तरी थोड्या वेळात निरनिराळ्या जातींच्या लोकांनीं ती भरून गेली; तेथे सुमारें हजार बाराशें लोक जमले होते. बावांची स्वारी आली तोंच मी त्यास म्हटलें कीं, तुम्ही एकदम बहुत शंका काढिता आणि आम्ही तुमच्या बोलण्यांत आड येत नाहीं. त्याप्रमाणें आम्ही त्या शंकांचीं उत्तरें देतांना तुम्हांकडून कांही

१ नेटिव ओपिनियन, ता. २६ माहे फेब्रुवारी १८७१. पृ.६८,

प्रतिबंध होऊं नये. नाहीं तर तुम्ही अेक अेक शंका काढावी व तिचें उत्तर घेत जावें. यातून दुसरी गोष्ट बावानें मान्य करून संभाषण सुरू केलें.[1]"

अशा तऱ्हेने सुमारें वीस सभा झाल्यावर मे अखेर पावसाळा जवळ आल्यामुळे बावानी हा वादविवाद थांबविला. त्याच्या विचारप्रवर्तक व्याख्यानमालेमुळे लोकात पुष्कळच जागृति झाली व खिस्ती धर्मोपदेशकाच्या बेजबाबदार प्रचाराला थोडा आळा बसला. पुढे लवकरच बंडाची धामधूम उसळली, व सरकारी सूचनेवरून त्याना आपला सार्वजनिक प्रचार काही काल बंद ठेवावा लागला. त्याची शेवटची जाहीर सभा लोहारचाळीत आत्माराम बापुजी दळवी यांच्या घरीं भरली होती. त्यानंतर त्यानी इ. स. १८५९ त 'वेदोक्तधर्मप्रकाश' या नावाचा सुविस्तृत ग्रंथ लिहून प्रसिद्ध केला. त्याच्या शिष्यपरिवारात मुंबअीतील मोठमोठे सुशिक्षित व वजनदार लोक होते. त्यामुळे नुसत्या महाराष्ट्रातच नव्हे तर अखिल भारतवर्षांत त्याचें नाव गाजलें. 'इलस्ट्रेटेड लंडन न्यूज' या विलायतेंतील वृत्तपत्रातहि त्याचें छायाचित्र आलें होतें.

कालांतराने विष्णुबावाना जलप्रवास करण्याची इच्छा झाली, व त्यानी मद्रासला जाण्याचा बेत ठरविला. मद्रास येथे काही दिवस राहून नंतर ते कलकत्त्यास गेले. माधवराव अनंत दलाल याच्या घरीं त्याचा मुक्काम होता. तेथील दोन महिन्याच्या वास्तव्यात त्यानी हिंदींत भाषणें केलीं, आणि ब्राह्म समाजाच्या सभासदांशीहि विचारविनिमय केला. कलकत्त्याहून ते काशीला गेले, व तेथे त्यानी परमहंसदीक्षा घेतली. अेके दिवशीं काशीविश्वेश्वराच्या देवळाजवळ अेका पाद्रयाची व त्याची अचानक गाठ पडली. परंतु त्याच्या नावाचा त्याना अितका वचक बसला होता की, मुंबअीचे सुप्रसिद्ध 'ब्रह्मचारीबावा' ते हेच असें कळताच ते तेथे होते तोपर्यंत तो देवळाकडे पुन्हा फिरकला देखील नाही. काशीहून ते परत कलकत्त्यास गेले, व तेथे सुमारें वर्षभर राहिले. मध्यंतरीं त्याना महामारीचा अुपद्रव झाला. परमुलखात फारशी ओळखदेख नसल्यामुळे त्याच्या जेवण्याखाण्याची, औषधोपचाराची फार पंचाअीत पडली. म्हणून त्यानी 'खानु' या नावाचा अेक मुसलमान नोकर ठेवला. तोच त्याचें जेवणखाण करी व त्याना औषधपाणी देअी. तसेंच कलकत्त्याहून परत येताना काही अनपेक्षित कारणामुळे त्याचा प्रवास लांबला, व त्याच्याजवळची शिधासामग्री संपली. तेव्हा त्यानी बोटीच्या कप्तानास आपली खाण्यापिण्याची सोय लावण्यास सांगितलें, व त्याच्या किरिस्ताव बबर्जीने शिजविलेला भात आणि बटाटे खाअून निर्वाह केला. लौकिकदृष्ट्या निषिद्ध अशा या दोन्ही गोष्टी पुढे ते सर्वांना उघड व निःसंकोचपणाने सांगत असत. खिस्ती मताचें खंडन करण्याचा जरी त्यानी चंग बांधला होता, तरी त्याचें कोणा व्यक्तीशीं वैर नव्हतें. त्याचें भांडण तत्त्वाचें होतें; आणि म्हणूनच ते हिंदु, मुसलमान, पारशी, खिस्ती वगैरे सर्व लोकांशीं मोकळेपणाने व समभावाने वागत असत. ते पूर्ण शाकाहारी होते. मद्यमांसनिवृत्तीवर त्याचा विशेष कटाक्ष होता. तथापि रोटीव्यवहाराचे परंपरागत निर्बंध ते मुळीच पाळीत नसत. भुलेश्वराच्या बाजारातील पुऱ्या, भाजी व भजीं वगैरे पदार्थ टोपलींत भरून भररस्त्यात, जोडा घालून व अुभ्याने, सर्व जातींच्या लोकांशीं संभाषण करीत बिनदिक्कत खात असत. कोणाच्या हातचें हा प्रश्न त्याच्यासमोर कधीच अुभा राहिला नाही. काय खावयाचें अेवढ्या अेकाच गोष्टीचा ते विचार करीत.

त्याचा वर्ण गौर, बांधा अुंच व धडधाकट, प्रकृति निकोप व सुदृढ, मुद्रा प्रसन्न व शांत होती. त्याचा स्वभाव बराचसा लहरी होता. कधी ते अधाशासारखे बेसुमार खात सुटत, तर कधी आठ आठ दिवस उपोषण करीत. कधी दिवसच्या दिवस आंघोळीवाचून

१ समुद्रकिनारीचा वादविवाद, पृ. २१.

राहात, तर कधी दिवसातून चार चार वेळा सचैल स्नान करीत. कधी दुःखातिशयाने व्याकुळ होत, तर कधी आनंदाने बेहोष बनत. अशा तऱ्हेचा स्वच्छंदी स्वभाव असताहि त्यांच्या लोकोत्तर गुणांमुळे त्यांच्याबद्दल कोणाला अनादर वाटला नाही. सर जमशेटजी जीजीभाओंसारख्या गुणग्राही धनिकाला तर त्यांचा सहवास लोभनीय वाटे. जनार्दन रामचंद्रजी, केशव सखाराम-शास्त्री, पांडुरंग हरिश्चंद्रजी, बाळ भास्कर, दामोदर धोंडजी, मल्लनाथ बाबुराव, काशीलाल मिश्रा वगैरे लोक नेहमी त्यांच्या सान्निध्यात असत. कलकत्त्याहून आल्यावर बावानी 'सुख-दायक राज्यप्रकरणीं निबंध', 'सहजस्थितीचा निबंध' इत्यादि लहानसहान पुस्तकें लिहिलीं पुढे त्यांनी भगवद्गीतेवर 'सेतुबंधनी'नामक मराठी टीका लिहिण्यास आरंभ केला. अठराव्या अध्यायाची टीका चालू असतानाच त्यांच्या मानेवर काळपुळी झाली, व ह्या आजारानेच त्यांचा अंत झाला. शनिवार ता. १८ फेब्रुवारी १८७१ (माघ वद्य १४ शके १७९२) रोजीं ते निवर्तले.

घरच्या गरिबीमुळे विष्णुबावाना उच्च शिक्षण घेण्याचा योग आला नाही. युरोपियन व पारशी लोकांच्या सहवासामुळे त्यांना इंग्रजी थोडेंबहुत समजत असे, पण मूळ ग्रंथ वाचण्याइतकें त्यांना इंग्रजी भाषेचें ज्ञान नसावेंसे वाटते. वादविवादासाठी त्यांनी जुन्या व नव्या करारांचें मराठी भाषांतर वाचलें होतें. तसेंच 'सुखदायक राज्यप्रकरणीं निबंध' या आपल्या लहानशा पुस्तकाचें भाषांतरहि त्यांनी बाळ भास्कर भित्रे यांच्याकडून करविलें होतें. ते स्वतःच म्हणतात, "आता नास्तिकांनो तुम्ही म्हणता की, ब्रह्मचारी बावा तुम्ही इंग्रजी लिपी शिका, परंतु नास्तिकांनो तुम्ही अविचारी आहां. अरे जी मी बालबोध (म्हणजे देवनागरी) लिपी शिकलों आहें ती वेद लिहिण्याची लिपी आहे, असें "अर्धेंदुलसित तारेणरुद्धं" या वेदवाक्या-वरून सिद्ध आहे, अशा त्या बालबोध लिपीच्या योग्यतेपुढे इंग्रजी व फारसी व आरबी वगैरे लिपी कशा आहेत, तर बालबोध लिपीच कोणी सूर्य आहे आणि इंग्रजी वगैरे लिपी त्यापुढें खद्योत म्हणजे काजव्यासारख्या आहेत. यास्तव सूर्यासारख्या बालबोध लिपीपुढे काजव्यासारख्या ज्या इंग्रजी वगैरे लिपी त्या शिकण्याची मला किंवा शहाण्यांना गरज काय !"

इंग्रजी व संस्कृत या दोन्ही भाषांतील वाङ्मयाचा गाढ व्यासंग नसतानाहि विष्णुबावा मी मी म्हणणाऱ्या ख्रिस्ती पंडितांना वादविवादात निरुत्तर करीत, व वेदशास्त्रसंपन्न विद्वज्जनांना आपल्या विचारसरणीपुढे मान वाकवायास लावीत. त्यांची उद्योगशीलता अचाट होती. आपल्या कार्यसिद्धीसाठी ज्या ज्या गोष्टी त्यांना आवश्यक वाटत, त्या त्या गोष्टींची ते परिश्रमपूर्वक माहिती घेत. त्यांचा दृष्टिकोन उदार, व्यापक पण स्वतंत्र होता. त्यांच्या अनु-रोधाने त्यांनी वैदिक धर्माच्या विविध अंगोपांगांची छाननी केली, जगातील निरनिराळ्या धर्म-पंथांचाहि तुलनात्मक दृष्टीने विचार केला, व आपलीं आत्यंतिक मते निर्भीडपणे लोकांसमोर मांडलीं. त्यांच्या पदरीं जरी विद्वत्तेचें भांडवल नव्हतें, तरी त्यांच्या अंतःकरणात स्फूर्तीचा स्फुलिंग होता; व जगाच्या इतिहासात तर पढिक पांडित्यापेक्षा जीवंत प्रेरणेच्या बळावरच महनीय कार्ये घडून आलेलीं दिसतात.

विष्णुबावांच्या कार्याचें स्वरूप चतुर्विध होतें. इ.स. १८५६ सालीं ते मुंबईस आले. त्या वेळीं श्रुतिस्मृतिपुराणादि संस्कृत धर्मग्रंथांचीं मराठींत भाषांतरें झालेलीं नव्हतीं. ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम, रामदास यांचे ग्रंथहि छापून प्रसिद्ध झाले नव्हते. त्यामुळे सामान्य लोकांना आपल्या धर्माची साधार व विश्वसनीय माहिती मिळण्यास काही मार्ग नव्हता. हरदास व पुराणिक यांच्यामार्फतच त्यांना आपल्या धर्माची तोंडओळख करून घ्यावी लागे. या दोन्हीहि

१ वेदोक्तधर्मप्रकाश, पृ.७२३.

लोकोपयोगी संस्था जीर्ण झालेल्या होत्या. बदलत्या परिस्थितींतहि स्वधर्मावर लोकाची श्रद्धा अढळ राखण्याचें कार्य त्यांच्या हातून होण्यासारखें नव्हतें. ख्रिस्ती धर्मोपदेशकानी हिंदुधर्म-ग्रंथांच्या हस्तलिखित प्रती मोठ्या प्रयासाने मिळविल्या, छिद्रान्वेषक बुद्धीने त्याचा अभ्यास केला, आपल्या मल्लीनाथीसह हिंदुधर्मविषयक लहान लहान पुस्तकें प्रसिद्ध केलीं; आणि त्याच्या हजारों प्रती गावोगावीं वाटल्या. लेख व भाषणें यांच्या द्वारें आमच्या धर्मकल्पनाची टर अुडविण्यास त्यांनी आरंभ केला. जॉन स्टिव्हन्सनने ऋग्वेदातील काहीं सूक्तांचें भाषांतर केलें. रॉबर्ट निब्बिटने 'भगवद्गीतेचें सार' काढलें. जॉन विल्सनने 'हिंदुधर्मप्रसिद्धीकरण' लिहिलें. अशा तऱ्हेने ख्रिस्ती धर्मोपदेशकाच्या तोंडूनच आपल्या धर्मानी विपर्यस्त माहिती करून घेण्याचा आमच्या लोकावर अनवस्था प्रसंग ओढवला. त्याच्या अशास्त्रीय व एकतर्फी टीके-मुळे भोळसर व अज्ञानी लोकाचा बुद्धिभेद होऊं नये म्हणून विष्णुबावाना 'भावार्थसिंधु', 'वेदोक्तधर्मप्रकाश' वगैरे सुबोध ग्रंथ लिहून वैदिक धर्माचें व्यापक स्वरूप लोकाच्यापुढे माडलें. जाहीर व्याख्याने व खाजगी संभाषणें यांच्या योगे त्यानी आपल्या बांधवाना वैदिक धर्माचे मूलभूत सिद्धान्त सुगम करून सागितले. भौतिक क्षेत्रात जरी आपण पाश्चात्याच्या पुष्कळच मागे असलों, तरी आपला धर्म, तत्त्वज्ञान व संस्कृति निःसंशय श्रेष्ठ आहे, व त्या बाबतींत तरी दुसऱ्याच्या ओंजळीने पाणी पिण्याचो आपणास बिलकूल गरज नाहीं याबद्दल त्यानी आपल्या देशबाधवाची खात्री पटवून दिली; आणि केवळ हिंदूंनाच नव्हे, तर पारशी, मुसळ-मान वगैरे अन्यधर्मीयाच्या अंतःकरणातहि धर्माभिमानाची ज्योत प्रज्वलित केली.

ख्रिस्ती धर्मोपदेशक फक्त येशू ख्रिस्ताची महती गाअून थाबत नसत. हिंदुधर्म व समाजरचना ह्यावरहि ते आक्षेप घेत. भारतीय तत्त्वज्ञानातील विसंगति व तर्कदुष्टता, आणि हिंदु-समाजरचनेतील अन्याय व विषमता दाखवून देअून ख्रिस्ती धर्म हाच खरा बुद्धिवादावर अधिष्ठित असा धर्म आहे असें सिद्ध करण्याचा ते प्रयत्न करीत. विष्णुबावानी आपल्या धर्म-ग्रंथातील अनेक प्रमाणे देअून त्याचे आक्षेप कसे निराधार व फोल आहेत तें स्पष्ट केलें. शेकडों लोकांसमक्ष ख्रिस्ती धर्मोदेशकाशीं वादविवाद करून त्याच्या अुथळ व ठराविक कोटिक्रमाचें त्यानी सयुक्तिक खंडन केलें. त्याप्रमाणेच जुन्या व नव्या करारातील असत्य विधानें व परस्पर-विरोधी वचनें त्यानी अुद्धृत केलीं, व दोषैकदृष्टीने कोणत्याहि धर्मावर हल्ला करणें किती सोपें आहे तें लोकाच्या निदर्शनास आणून दिले.

विष्णुबावानी स्वकीयाचें वेळोवेळीं समर्थन केलें, परंतु सवंग लोकप्रियतेच्या नादीं लागून त्यानी लोकाच्या मूर्खपणाला व दांभिकतेला प्रोत्साहन दिले नाही. ख्रिस्ती धर्मोदेशकाच्या खोडसाळ विधानाचा त्यानी यथास्थित समाचार घेतला, तथापि त्याच्या न्याय्य आक्षेपांतील कटु सत्याकडेहि त्यानी दुर्लक्ष केलें नाही. आपल्या दुःस्थितीचीं कारणें त्यानी आधी बारकाअीने शोधून काढलीं व त्याच्या निराकरणासाठी जरूर त्या सामाजिक सुधारणाचा सडेतोड पुर-स्कार केला. समाजहिताच्या दृष्टीने ज्या ज्या सुधारणा घडवून आणण्याची आपणास अुत्कंठा आहे, त्या त्या सर्व सुधारणा वेदकालीं अस्तित्वात होत्या याबद्दल त्याना मुळींच संशय नव्हता. वैदिक धर्माचें मूळ स्वरूप अत्यंत अुज्ज्वल आहे, सद्यस्थितींत त्याचा लोप झाल्यामुळेंच आपण अशा अवनत दशेला येअून पोहोंचलों, तेव्हा त्याची पुन्हा स्थापना केल्याशिवाय आपला तरणोपाय नाही अशी त्याची दृढ श्रद्धा होती. जन्मसिद्ध अुच्चनीचपणाचा फाजील बडेजाव माजवून समाजात फूट पाडण्याचें धोरण त्याना बिलकूल मान्य नव्हतें. प्रचलित जातिभेद हा वेदकालीन वर्णव्यवस्थेला सोडून आहे असें त्याचें स्पष्ट मत होतें. पुनर्विवाह, प्रौढविवाह, घट-

स्फोट, शुद्धीकरण, मंदिरप्रवेश अित्यादि सामाजिक प्रश्नांसंबंधींचे त्यांचे विचारहि पूर्णपणें पुरोगामी होते; आणि लोकांच्या स्तुतिनिंदेची पर्वा न करता त्यानी ते असंदिग्ध शब्दांत व्यक्त केले. आपल्या या विचारसरणीचा अुगम वेदप्रणीत सनातन धर्मांतच आहे असें ते आग्रहाने म्हणत असत.

"एकजण म्हणतो कीं, ब्रह्मच्यारी बावा तुम्ही लोकांच्या अशास्त्र वर्तणुकीला मान कां देत नाही ? आणि लोकास विरुद्ध वाटेल असा अुपदेश का करितां ? त्याला मीं अुत्तर दिलें कीं, अरे माझा वेदोक्त धर्मांप्रमाणें अुपदेश करण्याचा सांप्रदाय आहे, तो सोडून मी लोकाच्या मनधरणीकरितां अशास्त्र अुपदेश करूं कीं काय ? माझा प्राणान्त झाला तरीही मी अशास्त्र अुपदेश करणार नाहीं हींच माझी प्रतिज्ञा आहे. कारण मला परमेश्वराचा पूर्ण साक्षात्कार आहे. त्या माझ्यानें अशास्त्र अुपदेश कसा करवेलें ?"[1]

विष्णुबावाच्या भाषणाप्रमाणेंच त्यांचें लेखनहि स्वतंत्र, सडेतोड, ओजस्वी व परिणामकारक होतें. त्यानी सहासात गद्यपद्यात्मक ग्रंथ लिहिले; पण त्यात कोठेहि पाश्चात्यांची अुसनवारी नाही. त्याच्या वेळचे बहुतेक प्रथितयश लेखक इंग्रजी ग्रंथांचीं हुबेहूब भाषांतरें करण्यांतच भूषण मानीत असत. क्वचित् एखाद्दुसऱ्या साहित्यिकाला स्वतंत्र ग्रंथलेखनाची स्फूर्ति झाली, तरी त्याच्या विचारात पाश्चात्य ग्रंथांची छाप दिसून आल्याशिवाय राहत नसे. परावलंबनाच्या ह्या लाजिरवाण्या प्रवृत्तीपासून विष्णुबावा सर्वस्वीं अलिप्त होते. त्यांच्या प्रत्येक शब्दात स्वाभिमानाची व आत्मविश्वासाची भावना ओतप्रोत भरलेली होती. त्यांची दृष्टि संकुचित नव्हती; पण जेथे तेथे परकीयाचा वरचष्मा त्याना नको होता. आम्हीहि आमच्या महत्त्वाच्या प्रश्नाचा स्वतंत्रपणें व जबाबदारीने विचार करूं शकतों ही गोष्ट त्यांनी सप्रमाण सिद्ध केली. आपल्या ग्रंथात त्यानी ठिकठिकाणीं अनेक धार्मिक, सामाजिक, राजकीय व सांस्कृतिक विषयाचा अूहापोह केला आहे. त्याचीं अैकान्तिक मतें सर्वांनाच ग्राह्य वाटतील असें नाही, परंतु त्यांच्या वाङ्मयातील अभिनव कल्पना व क्रान्तिकारक विचार आपल्या मनाची पकड घेतल्याशिवाय राहत नाहीत.

## विष्णुबावा ब्रह्मचारी यांचे ग्रंथ व भाषणें

१ भावार्थसिंधु— मुंबअी, सातारा, अि. स. १८५६.
२ वेदोक्तधर्मप्रकाश— मुंबअी, अि. स. १८५९.
३ सुखदायक राज्यप्रकरणीं निबंध— मुंबअी, अि. स. १८६७.
४ चतुःश्लोकी भागवत याचा अर्थ— मुंबअी, अि. स १८६७.
५ सहजस्थितीचा निबंध— मुंबअी, अि. स. १८६८.
६ समुद्रकिनारींचा वादविवाद— मुंबअी, अि. स. १८७२.
(संपादक— जी. बोअेन)
७ वेदोक्त धर्माचा विचार व ख्रिस्ती मतखंडन—मुंबअी, अि. स. १८७४.
(विष्णुबावाच्या शिकवणींचें सार— ले. मंगेश हरी नेरुरकर)
८ नारायणबावाकृत बोधसागराचें रहस्य— ... ...(?)
९ सेतुबंधनी टीका— मुंबअी, अि. स. १८९०.
(लेखनकाल—अि. स. १८७१) प्रकाशक: रामचंद्र पांडुरंग राअुत

१ वेदोक्तधर्मप्रकाश, पृ.१६१

बावांनी आपल्या ग्रंथरचनेचा उपक्रम 'भावार्थसिंधु'नामक ओवीबद्ध अध्यात्मपर ग्रंथाने केला. त्यांनी तो पंढरपूर येथे शके १७७७ त (इ. स. १८५६) माघ शुद्ध दशमीस लिहून पुरा केला. योगमार्गदर्शन, पंचकोशाचें विवरण, आत्मज्ञानाचें विवरण, भक्तिमार्ग, मुक्तलक्षणें व जनांस उपदेश अशीं ह्या ग्रंथाचीं पाच प्रकरणें आहेत. एकंदर ओव्यांची संख्या पांचशें-सव्वीस आहे. बावाच्या ओव्या एकनाथी ओव्याप्रमाणे साडेचारचरणी आहेत. याच सुमारास ते भावार्थरामायणाचें पारायण करीत होते. तेव्हा 'भावार्थसिंधु' हें नावहि कदाचित् नाथांच्या ग्रंथावरूनच सुचलें असावें. त्यांची भाषा मात्र रामदासांच्या लिखाणाप्रमाणे खोचदार व खणखणीत आहे. ह्या ग्रंथातील कांही भागांचें गद्यात्मक रूपांतर दंभहारकात प्रसिद्ध झालें होतें. विष्णुबावानी हा ग्रंथ निव्वळ परमार्थदृष्टीनेच लिहिलेला आहे असें वाटतें. त्रिविध-तापाने पोळलेल्या जीवाना शाश्वत 'सुखप्राप्ती'चा मार्ग दाखवावा यापलीकडे त्याचा कांही दुसरा उद्देश दिसत नाही. मात्र सुरवातीपासूनच त्याची महत्त्वाकाक्षा फार दाडगी होती. वेग-वेगळ्या भाषांत आपल्या ग्रंथाचीं भाषातरें होऊन त्याचा सर्वध जगांत प्रसार व्हावा अशी त्याची इच्छा होती. त्यांच्या औदार्याला तर सीमाच नव्हती. ज्ञान हें पवित्र व भेदातीत आहे, कोणत्याहि एका विशिष्ट धर्माची किंवा पंथाची ती मिरास नाही, तेव्हा म्लेच्छांसहित सर्व मनुष्यमात्राना माझ्या उपदेशाचा अधिकार आहे असें त्यानी स्पष्ट म्हटलें आहे.

"पृथ्वीवरील मनुष्यमात्र। म्लेच्छादिक सकल जात। उपदेशास अधिकारी निश्चित। हीच माझी आज्ञा असे॥ मनुष्यजाती असे एक। हेंच ज्ञान सम्यक। ऐसा जाणोनि विवेक। मुक्तें उपदेश करावा॥ सकलद्वीपें सकलखंडें। मुक्तें फिरावीं उदडे। मोडूनि मतवादाचीं बंडें। उप-देश ज्ञानाचा करावा॥ या भावार्थसिंधूनें बोलणें। सकळ जनाच्या हिताकारणें। तरी यानें पुस्तक बाळगणें। स्त्रियापुरुषानीं वाचावया॥ याचें भाषांतर करावें। द्वीपद्वीपातरीं न्यावें। स्त्रियापुरुषांनीं पाहावें। संसारीं वर्ततां सर्वदा॥"[1]

'वेदोक्तधर्मप्रकाश' इ. स. १८५९ त प्रसिद्ध झाला. सुमारे साडेसातशें पृष्ठाच्या ह्या प्रदीर्घ गद्यग्रंथात बावाच्या स्वतंत्र व तेजस्वी विचाराचें सारसर्वस्व ग्रथित झालें आहे. आबालवृद्धाना सहज समजेल अशा सुबोध पण जोरदार शब्दांत त्यांनी वैदिक धर्माच्या विविध अंगोपांगाची संवादरूपाने थोडक्यात माहिती दिली आहे. तत्त्वज्ञान, आचार, संस्कार विवाह-धर्म, नीतिनियम, वर्णव्यवस्था, जातिभेद, मंत्रशास्त्र, इत्यादि अनेक धार्मिक व सामाजिक गोष्टींचा यात स्फुट स्वरूपांत पण मार्मिक रीतीने ऊहापोह केला आहे. त्याप्रमाणेच ख्रिस्ती धर्मोपदेशकांच्या आक्षेपकाचेंहि जागोजागीं खंडन केलें आहे. पौराणिक कथाचे लाक्षणिक अर्थ विशद करून लोकाना परधर्मीय टीकाकारापासून सावध राहण्याबद्दल इशारा दिला आहे. 'याहुदी','ख्रिस्ती'व'मुसलमान' या म्लेच्छ मताचा यथोचित परामर्श घेऊन त्यानी वैदिक धर्माची श्रेष्ठता लोकाच्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न केला आहे. सारांश, हा ग्रंथ म्हणजे वैदिक धर्मानुयायांचा एक लहानसा 'धर्मकोश'च आहे असें म्हणावयास चिन्ता नाही. ग्रंथाची रचना काहीशी विसकळीत व असंबद्ध आहे. नाना विषयावरील बहुमोल विचार त्यात इत-स्ततः विखुरलेले आहेत. तत्त्वज्ञानविषयक विवेचन बरेंच गूढ व दुर्बोध झालें आहे. बऱ्याच ठिकाणीं तपशीलवार आधार देऊन प्रमाणशुद्धतेचा व पांडित्याचा विनाकारण आव आणला आहे. उदा०— "यजुर्वेदामध्यें हिरण्यकेशीशाखेच्या संहितेच्या पाचव्या अष्टकाचे दुसऱ्या अध्यायाचे सातवे अनुवाकांत ब्राह्मण मुख्य श्रेष्ठ का याविषयीं प्रमाण......[2]". लिहिण्याची घाटणी

१ भावार्थसिंधु, प्र.५, ओ.९१-९३, १०३-१०४. २ वेदोक्तधर्मप्रकाश, पृ.१३.

सामान्यतः जुन्या तऱ्हेची आहे. कांही प्रकरणांत हरदासी पालुपदाप्रमाणे प्रत्येक छेदकाचा शेवट अेका विशिष्ट वाक्यानेच केलेला आढळतो. तात्पर्यबोधक मुख्य विधानें मनांत ठसण्यासाठी कधी कधी त्रिवार लिहिलीं आहेत. कडमणी, पाणिलगें, रहण्या अित्यादि प्राकृत वाङ्मयांतील जुने शब्द मधून मधून सांपडतात. कित्येक ठिकाणीं विचाराची व क्वचित् वाक्याचीहि पुनरुक्ति झालेली आहे. प्रचारकाच्या दृष्टीने अेकच विचार अनेक रीतींनी घोळून सांगणें हा दोष नसून अुलट गुणच आहे. परंतु शब्दाची पुनरुक्ति मात्र मुळींच समर्थनीय नाही. अशा तऱ्हेचे कांही किरकोळ दोष जरी मान्य केले, तरी तत्कालीन वाङ्मयात हा ग्रंथ निःसंशय अुच्च प्रतीचा आहे असें म्हणावें लागतें. त्याच्या प्रत्येक पानावर बावाच्या कुशाग्र बुद्धीची व तडफदार वृत्तीची चमक दिसून येते. त्यांतील कितीतरी कल्पना आणि विचार आजहि अुद्बोधक व कौतुकास्पद वाटल्याशिवाय राहत नाहीत. म्लेंच्छ मताचा नायनाट करून वैदिक धर्माची स्थापना करण्यासाठी माझा जन्म आहे; म्हणून परमेश्वराच्या प्रेरणेनेच मीं हा महान् ग्रंथ लिहिला आहे. तेव्हा प्रत्येकाने त्याचें नित्य अध्ययन करून स्वतःची चित्तशुद्धि व समाजाचा अुत्कर्ष हीं दोन्ही साधावीं अशी ग्रंथाच्या अखेरीस बावानी 'सूचना' केली आहे.

"ग्रंथा नांव वेदोक्त-धर्मप्रकाश । वाचनाचा धरा अुल्हास । परमशुद्ध होओील मानस । सत्य सत्य त्रिवाचा ॥ यात नाहीं मताभिमान । नसे संशयाचे ज्ञान । जें ओीश्वरें अुपदेशिलें मजलागुन । तेच लिहिलें असे मीं ॥ संपूर्ण ग्रंथ समजल्याविना । व्यर्थ धराल कल्पना । तेणें होओील विटंबना । तुमचीच कीं निश्चयें ॥ म्हणून शतवार ग्रंथ वाचून । न समजेल तें घ्या विचारुन । मृगजलवत् भवाब्धींतून । स्वस्वरूपीं सावध व्हा ॥ च्यार हजार नअुशें साठ । गेला महाघोर कलीचा लोट । म्लेंच्छ मते माजलीं अफाट । म्हणून माझी प्रेरणा"[१] ॥

वेदोक्तधर्मप्रकाशाचे ब्रिज भाषेंत भाषांतर होअून तें मुंबअीस इ.स. १८६९ त गणपत कृष्णाजी याच्या छापखान्यात छापून प्रसिद्ध झालें. मथुरेचे रहिवासी रामरतन जवाहरलाल यानी हें भाषांतर तपासून शुद्ध केलें होते.

विष्णुबावानी वेदोक्तधर्मप्रकाशात राजनीतीसंबंधी अेक स्वतंत्र प्रकरण लिहिलें होतें. त्यानंतर इ.स. १८६७ त त्यानी 'सुखदायक राज्यप्रकरणीं निबंध' हें पुस्तक प्रसिद्ध केलें. ह्या लहानशा निबंधातील पंधरा कलमात त्यानी आदर्श राजनीतीचें स्वरूप सूत्ररूपाने दिग्दर्शित केलें आहे. आपल्या ह्या राजनीतीमुळे जगातील अन्याय व विषमता, दुःख व दारिद्र्य, भांडणें व मारामाऱ्या आपोआप नाहीशा होअून सर्वत्र निर्वैर शांततेचें साम्राज्य नांदूं लागेल याबद्दल त्याना तिळमात्र शंका नव्हती.

"हल्लीं या भूगोलावर अनेक राज्यें आहेत परंतु तीं चालविणाऱ्या राजाना खरी राजनीति काय हें माहीत नाहीं व प्रजा कोणत्या अुपायानें गुन्हे करणार नाहीं हें माहीत नाहीं यामुळें सर्व राजे व सर्व प्रजा अित्यादि मनुष्यमात्र सर्व काळ चिंताग्रस्त व हाय हाय करीत फिरत आहेत. म्हणजे कोणीच दुःखी नाहीं असें नाहीं. ह्यास्तव लहानशा निबंधांत लिहिलेली राज्य करण्याची रीति राजानीं धरावी व प्रजेनें त्या राज्यरीतीप्रमाणें वागण्याची रीति धरावी म्हणजे सर्व प्रापंचिक संकटें दूर होअून निरिच्छेनें परमेश्वराची भक्ति त्याना घडेल, आणि वेदांतशास्त्राचे पूर्ण विचार करण्यास व योगशास्त्राचा पूर्ण अनुभव घेण्यास त्याच्या वृत्तीला स्वस्थता व अवकाश मिळेल, आणि परस्परमनुष्यात अत्यंत निरिच्छ सत्य व मैत्री राहील, दया, क्षमा, व शांति हीं लक्षणें मनुष्यमात्राच्या अंगीं सहज राहतील. या हेतूनें हा निबंध मी

१ वेदोक्तधर्मप्रकाश, पृ.७४८.

विष्णुबावा ब्रह्मचारी यार्णे केला, यात जितका विचार लिहून दाखवावयाचा तितका लिहिला नाहीं.[१]" परंतु त्या सर्व विचारांचीं मूळ कारणें सूत्ररीतीप्रमाणे कळतील अशीं लिहिलीं आहेत.

विष्णुबावाची ही राज्यनीति साम्यवादाच्या तत्त्वज्ञानाशीं बऱ्याच बाबतींत जुळती आहे. सर्व प्रजा एक कुटुंब मानावें व देशातील सर्व जमीन व संपत्ति यावर समाईक मालकी असावी हा या राजनीतींतील मूलभूत सिद्धांत आहे. प्रजेच्या दुःखाची व दुष्कर्मांची जबाबदारी राजावर आहे. त्याने लोकाकडून लायकीप्रमाणे काम करवून घ्यावें व त्याबरोबर त्याच्या पालनपोषणाची जबाबदारी पार पाडावी. सर्वांना अन्न व सुखभोग्य पदार्थ सारखे मिळाले तर लोभ आणि मत्सर यांचें कारणच उरणार नाही व लोकातून गुन्हे करण्याची प्रवृत्ति हळूहळू कमी होत जाईल. गुन्ह्याच्या बाबतींतील बावाची ही मीमांसा बहुतांशीं कशी बरोबर आहे हें आज विस्ताराने सांगण्याची गरज नाही. बावाच्या राजनीतीची कल्पना किती भव्य व उदात्त होती तें लक्षात येण्यासाठी दोन महत्त्वाचीं कलमें येथे उद्धृत करतों.

"याप्रमाणें सर्व प्रजा एक कुटुंब व सर्व जमीन हाच अेक बाग व त्यातून जें जें निघेल तें तें सर्वांचें अेक याप्रमाणें राज्यव्यवस्था असली म्हणजे सर्वांना सर्व अुपभोग मिळतात व सर्वांना अुत्तम खावयास मिळतें, सर्वांना अुत्तम विपुल वस्त्रे व अलंकारभूषणें मिळतात, सर्वांना नाच, तमाशे, बैठकी पहावयास सापडतात. पालख्या, रथ, घोडे व हत्ती याजवर सर्वांना वृद्ध अवस्थेंत "पार्लमेंटच्या" जागीं बसावयास मिळतें, यामुळें कोणाला काहीं प्राप्त नाहीं असें होतच नाहीं म्हणून सर्व लोक पूर्णकाम होतात. यामुळें कामाच्या अपूर्णतेनें क्रोध येणें हें शिल्लकच राहत नाहीं; आणि क्रोध नसल्यामुळे गुन्हा करणें किंवा गुन्हा करण्यास्तव मत्सर धरून बसणें याचा लवलेशही राहत नाहीं, यामुळें हाच प्रजेचा व राजाचा खरोखर असावा तसा संबंध आहे."

"पहा, सर्व प्रजा अेक कुटुंब व सर्वांचें मुख्य धन जें अन्न तें एक व सर्वांचें सुखभोग्य पदार्थ एक याप्रमाणें राज्यव्यवस्था नसल्यामुळे सर्व प्रजा परस्परांचे गुन्हे करीत आहे व विश्वासघात करीत आहे, व एकमेकांचे प्राण घेत आहे व अनेक कपटे करीत आहे व परमेश्वराला शिव्या देत आहे व "काय करूं कसें करूं" या अष्टाक्षरी मंत्राचा जप करीत आहे, व कितीअेक कितीएकास पीडा करीत आहेत व कुलूप किल्ल्या बाळगीत आहेत व कोणाला पुरें खावयास मिळते व कोणाला मिळतें नाहीं अशी दुर्दशा होत आहे व दुष्काळानें प्रजा मरत आहे व एशिया, युरोप, आफ्रिका आणि अमेरिका या चारी खंडातील व सर्व द्वीपातील राजे म्हणविणारे इंग्लिश, फ्रेंच, रशियन, प्रजासत्ताक वगैरे अमेरिकन चिनअी व हिंदुस्थान वासी व मध्यअेशियानिवासी अित्यादि राजाचे कलह अुत्पन्न होअून प्राणघात होत आहेत. ह्या अितक्या अनर्थांचें मुख्य कारण अितकेंच की, सर्व प्रजा अेककुटुंब ही वर लिहिलेली राज्यव्यवस्था भूगोलावर कोठेंच आढळत नाही हेंच आहे. यास्तव सर्व प्रजा अेककुटुंब व सर्व जमीनच अेक बाग व त्यातील जें जें अुत्पन्न तें तें सर्वांचे अेक व त्या सर्व खटल्यावर नेमलेला मालक राजा अेक याप्रमाणें राज्यव्यवस्था असावी म्हणजे अिंग्लिश, फ्रेंच, रशियन, प्रजासत्ताक अमेरिकन व चिनअि ह्या राज्यांना व त्यांच्या सहकाऱ्यांना असें वाटेल कीं, आमची नीति दुष्ट म्हणून आमच्या प्रजेंत दुष्ट गुन्हे होतात. यास्तव आपण सर्व प्रजा अेक कुटुंब अशी नीति ठेवूं तरच सुखी राहूं व प्रजा सुखी राहील. कारण प्रजेच्या गुन्ह्यांचें पाप

१ सुखदायक राज्यप्रकरणी निबंध – ग्रंथकर्त्याची विनति.

राजाच्या मस्तकावर आहे. या म्हणण्याचें कारण राज्यनीति बराबर नाही, हें ध्यानांत ठेवून अेककुटुंब सर्व प्रजा अशी राज्यनीति ठेवावी[१]."

बावाचा हा निबंध प्रसिद्ध झाल्यावर विविधज्ञानविस्तार, नेटिव ओपिनियन वगैरे तत्कालीन नियतकालिकानी त्यावर टीकेची खूपच झोड उठविली. बावाना वेडगळ व व्यवहारशून्य ठरवून त्याच्या राजनीतीची त्यानी मानभावीपणाने सणसणीत हजेरी घेतली. मात्र त्यामुळे विष्णुबावाच्या श्रद्धेत अणुमात्र अंतर पडलें नाही. त्यानी मुंबअी हायकोर्टातील ट्रान्स्लेटर बाळ भास्कर शिंत्रे याच्याकडून आपल्या निबंधाचें भाषांतर करविलें, व तें क्याप्टन फेल्प्स याच्याकडून तपासून घेऊन अी. स. १८६९ त त्याच्या १०००० प्रती काढल्या. आपल्या नवविचाराचा जगभर प्रसार व्हावा म्हणून त्यानी सर्व देशातील सन्मान्य व प्रतिष्ठित लोकाकडे स्वखर्चाने कांही प्रती पाठवून दिल्या. विलायतेतील 'एशियाटिक' या नियतकालिकातहि त्यावर प्रतिकूल अभिप्राय आला होता.

मुंबअी बेटाच्या पश्चिमेस समुद्रकिनाऱ्यावर ता. १५ जानेवारी १८५७ पासून दर गुरुवारीं वादविवादाच्या बैठकी भरूं लागल्या होत्या. हा क्रम सुमारें साडेचार महिने चालू होता. तेवढ्या मुदतींत अेकंदर वीस बैठकी झाल्या. ख्रिस्ती धर्मोपदेशक जी. बोअेन हे या सभांना नित्यनियमाने जात असत, व अधून मधून वादविवादात प्रत्यक्ष भागहि घेत असत. ह्या सभेची हकीगत दर आठवड्यास 'Bombay Guardian' या पत्रात प्रसिद्ध होत असे. त्याचें मराठी भाषांतर करून ते जी. बोअेन यानी 'समुद्रकिनारींचा वादविवाद' या नावाने अी. स. १८७२ त प्रसिद्ध केलें. या बैठकीच्या व्यवस्थेसंबंधीचा अेक अुतारा मागे अुद्धृत केलेला आहेच. त्यावरून त्यानी मुंबअींत किती खळबळ अुडवून दिली होती याची कल्पना येते. या सभा मुख्यतः ख्रिस्ती मताची चर्चा करण्याकरिता बोलावण्यात येत होत्या. "ख्रिस्ती धर्माची परीक्षा करण्याकरिता आम्ही जमलों आहों. कोणी म्हणतात, तो अीश्वरप्रणीत धर्म आहे, आणि कोणी म्हणतात की तो अीश्वरप्रणीत नाही. काही दिवसामागें बोअेनसाहेबानें मजकडे जुना व नवा करार याच्या प्रती पाठविल्या, त्या मी वाचीत असतों[२]."

रे. वालंटैन, वालेस, नारायण शेषाद्रि, दाजीबा पाडुरंग, हरि केशवजी वगैरे लोक ह्या बैठकींत प्रामुख्याने भाग घेत असत. वादाचें स्वरूप साधारणपणें खेळीमेळीचें असे. पण कधी कधी सभेत गोंधळहि होई. लोकाच्या मनात ख्रिस्ती धर्मोपदेशकाच्याबद्दल अनादर उत्पन्न झाला होता. त्यामुळे केव्हा केव्हा जमावच्या जमाव 'हुर्रे हुर्रे,' 'घे पाव, घे पाव.' असें ओरडत त्याच्यामागे लागे, व त्यांच्या अंगावर धूळहि फेकीत. प्रत्यक्ष सभेच्या कामात मात्र सहसा व्यत्यय येत नसे. "ज्या सर्व सभा झाल्या त्यामध्ये अव्यवस्था किंवा दाडगाई नव्हती. वादविवाद होत असता सभेस आलेल्या हिंदु, पारशी, मुसलमान लोकानी बहुधा सभ्य रीतीची वर्तणूक केली.[३]"

स्वतः बावांचाहि गुंडगिरीला विरोध होता. शांततेने व सभ्यपणाने मतपरिवर्तन घडवून आणण्याचें त्यांचें धोरण होतें. कोणी एक मुलगा एका पाद्रीपाशीं बाप्तिस्मा घेण्यास गेला होता. त्याच्याशीं संभाषण करण्यास बावा गेले म्हणून त्यांच्यावर त्या पाद्रीने फिर्याद केली, असें बावाने वादविवाद कारण्याच्या प्रारंभीं सांगितलें. आणि उपहास केल्यासारखें हसून म्हटलें.

---

१ सुखदायक राज्यप्रकरणी निबंध, कलम ८,१२. २ समुद्रकिनारीचा वादविवाद, पृ.४५–४६
३ समुद्रकिनारीचा वादविवाद, पृ. १८५–१८६.

कीं, मज बापड्याचीं लढण्याचीं शस्त्रें शब्द मात्र आहेत, पण ज्यास दुसरीं शस्त्रें हवींत त्यांनीं तीं घ्यावींत."

विष्णुबावांची ही व्याख्यानमाला पूर्णपणें यशस्वी झाली. ग्रंथांचा वाचकवर्ग फार मर्यादित असतो. त्यामुळे समाजाच्या सर्व थरांत कार्याचा प्रसार होऊं शकत नाही. म्हणून बावांनी शेकडों लोकांच्या समुदायापुढे भाषणें केलीं व सामान्य जनतेंतहि जागृति घडवून आणली.

ह्याशिवाय बावानी 'बोधसागराचें रहस्य' व 'चतुःश्लोकी भागवताचा अर्थ' असे दोन धर्मपर ग्रंथ लिहिले त्याप्रमाणेच धनुर्वायु झाला असताहि आपलें सर्व दुःख विसरून त्यानी लोकोपकारार्थ 'सहजस्थितीचा निबंध' लिहिला, व बरें झाल्यावर अि स. १८६८ त छापून प्रसिद्ध केला. ह्यानंतर बावानी आपल्या शिष्यवर्गास आधुनिक पद्धतीप्रमाणे भगवद्गीतेवर टीका सागण्यास प्रारंभ केला. प्रत्यक्ष वैदिक वाङ्मयापेक्षा त्याचा गीतेचाच दृढ व्यासंग होता. वेदोक्तधर्मप्रकाशांतहि भगवद्गीतेंतील आधार विपुल आहेत. तेव्हा बावाची 'सेतुबंधनी' नामक टीका मार्मिक व अुद्बोधकच असणार हें अुघड आहे. परंतु दुर्दैवाने अठराव्या अध्यायाच्या सतराव्या श्लोकापर्यंत टीकेची मजल गेली असतानाच बावा कालवश झाले. पुढे रामचंद्र पांडुरग राअूत याच्या सागण्यावरून आप्पाशास्त्री थडवे यानी ही टीका पूर्ण केली, व राअूत यानी ती अि. स. १८९० मध्यें प्रसिद्ध केली.

आतापर्यंत विष्णुबावांच्या धार्मिक, सामाजिक व वाङ्मयीन कार्यांचा स्थूल मानाने परामर्श घेतला. वैदिक धर्माच्या व हिंदुसमाजाच्या संरक्षणासाठी त्यानी ख्रिस्तीधर्मोपदेशकांशीं हटातटाचा सामना दिला. तरी त्याची भूमिका निःसंशय उच्च व पवित्र होती. त्याच्या अतःकरणांत द्वेष व दुराग्रह याना तिळमात्र जागा नव्हती. त्याचे कार्य केवळ प्रतिक्रियारूप होतें. ख्रिस्ती धर्मोपदेशकानी आमच्या धर्मग्रंथाची टवाळी केली, आमच्या देवताची विटंबना केली, आमच्या समाजसंघटनेवर घाला घातला; म्हणून बावाना पावलोपावलीं त्याच्याशीं झगडा करावा लागला. परंतु ख्रिस्तीधर्म हा सर्वथैव त्याज्य आहे असे त्यानी कधीच म्हटलें नाही. आपली धर्मश्रद्धा अढळ राखून दुसऱ्या धर्मांतील चागल्या गोष्टी घेण्यास त्याची ना नव्हती. ख्रिस्तीधर्माप्रमाणेच आपण अितर धर्मांचें खंडन का करीत नाही असें जेव्हा त्याना कोणींतरी विचारलें, तेव्हा त्यांनी चोख अुत्तर दिलें कीं, जोपर्यंत ते आमच्या धर्माची अुठाठेव करीत नाहीत, तोपर्यंत मला त्याच्या धर्मांत हात घालण्याची गरज नाही.

"पारशी धर्म व मुसलमानी धर्माविषयी आपलें काय मत आहे हें कृपा करून सागावें. तुम्ही या धर्मांचा मोड करण्यास का कंबर बाधीत नाही!

जर ते लोक हिंदुधर्माचा मोड करण्याच्या कामात हात घालतील तर मीही त्यांच्या धर्मांचा मोड करण्यास यत्न करीन. ख्रिस्ती धर्म खेरीजकरून पारशी व मुसलमानी व अितर सर्व धर्म खरे आहेत असें मी मानितों."

"माझा धर्म म्हणाल तर वेद आहे. दुसऱ्या कोणत्याहि धर्मांतून चागल्या गोष्टी घेण्यास मला काहीं प्रतिबंध नाही. जसा कोणी अेखादा मनुष्य आंब्याचा गीर भक्षण करून कोअी व सालपटें टाकून देतो, त्याप्रमाणें प्रत्येक धर्मांतून जी चागली गोष्ट माझ्या मनास पटेल ती घेण्यास व वाअीट टाकून देण्यास मी खुषी आहें. ख्रिस्ती धर्माविषयींही मी असेंच करणार."

१ समुद्रकिनारांचा वादविवाद, पृ.३८-३९. २ समुद्रकिनाराचा वादविवाद, पृ.७७-७८.
३ समुद्रकिनारींचा वादविवाद, पृ.८६-८७.

विष्णुबावानी स्वधर्मावरील आक्षेपांचें खंडन केलें, पण त्याबरोबरच प्रचलित समाजरचनेंतील दोषांकडे त्यांनी डोळेझाक केली नाही. परकीयांच्या कोणत्याहि प्रबळ आक्रमणाला आपण संघटित रीतीने तोंड देऊं शकत नाही याचें खरें कारण आपल्यांतील सामाजिक विषमता होय हें त्यांनी पुरतेपणीं ओळखलें होतें. वैदिक वर्णव्यवस्था ही मुळांत गुणकर्मांवर आधारलेली असताहि तिचें जन्मसिद्ध जातिभेदात रूपांतर झालें, व त्यामुळेच पुढील अनर्थपरंपरा ओढवली. तेव्हा पूर्वीप्रमाणे वर्णव्यवस्था अंमलात आणल्याशिवाय आमची आपसांतील फूट व वैमनस्य कमी होणार नाही असें त्यांनी असंदिग्धपणें प्रतिपादिलें. समाजाचा प्रत्येक घटक हा निदान सार्वजनिक जीवनात तरी सारख्याच दर्जाचा मानला जावा. त्यांत श्रेष्ठकनिष्ठभाव असूं नये. राजाने तर या बाबतींत फारच दक्ष असलें पाहिजे. उमेदवाराची वैयक्तिक लायकी पाहूनच त्याने अधिकाऱ्यांची निवड करावी, जातीय भावनेला थारा देऊं नये, अशी त्यांची बुद्धिनिष्ठ विचारसरणी होती.

"वर्णव्यवस्थेचीं कारणें गुणकर्मांप्रमाणें असून पंचद्रविड व पंचगौड, व चित्पावन व देशस्थ व कऱ्हाडे व देवरुखे व गुर्जर व मारवाडी व शीक, व जैन, व लिंगायत, व मध्व, व शेणवी व परभू व पानकळशी व पारशी व इंग्रज व फ्रेंच व आरब व रशियन व चिनी, इत्यादि अनेक प्रकारचे नावाचे जमातीचा म्हणजे जातीचा अभिमान धरून, प्रजा परस्पर भांडतात, आणि मनास वाटतील तसे अकमेकाच्या निंदापर संस्कृत श्लोकरचनेचे ग्रंथ नवीन रचून, त्यात अनेक पुराणांचीं नावें लबाडीने घालितात, आणि देशभाषातूनही निंदेचे ग्रंथ रचून परस्परद्वेष करितात, याचें कारण "मर्कटस्य मदिरापानं तन्मध्ये वृश्चिकदंशनं". मग त्याचें चरित्र काय पाहावयाचें, त्याप्रमाणें मूळ वर्णव्यवस्था गुणकर्मांवरून आहे हें विसरले, हेंच मद्यपान आहे. त्यात द्रव्याच्या उपार्जना करण्यापासून जो मत्सर उठतो, तोच वृश्चिकदंश झाला आहे, यामुळें परस्परद्वेष होऊन अकमेकाला क्रोधावरून बीभत्स बोलण्याप्रमाणें अकमेकाच्या जमातींची म्हणजे जातींचीं निंदा ग्रंथरूपानें करूं लागले, आणि परस्परद्वेष ठेवूं लागले, आणि विच्यार कोणीच करीना असें जाहले. याचे मूळ, वर्णव्यवस्था गुणकर्मांवरून हल्लीं केली पाहिजे ती करीत नाहींत हेंच आहे असें शाहाण्यानीं पक्के ध्यानात ठेवावें. आणि हा अनर्थ मनानें व क्रियेनें दूर करून, परस्पर मनुष्यमात्रानीं परस्परावर प्रीती ठेवून, परस्पराचें उणें पडूं देऊं नये. अकमेकाचें सहाय करीत जावें हीच आज्ञा आहे. व सर्व पृथ्वीवरील मनुष्यें गुणकर्मविभागानें वेगवेगळ्या वर्गात आहों, तरी अका शक्तीनें जग धरणाऱ्या ओश्वराचीं आम्हीं सर्व लेकरें आहों, असें समजून ओश्वराच्या वेदाज्ञेप्रमाणें परस्परावर परस्परानीं प्रीति ठेवून अकमेकाचें सहाय करून, सर्व भूमंडलावरील मनुष्यानीं मतवाद सोडून वेदोक्तधर्मांप्रमाणें वागून, परस्परांवर प्रीती करावी आणि परस्पराचें सहाय करावें हीच आज्ञा आहे[1]."

"युद्ध करणारी सेना, अथवा लेखनकामादिक अनेक कामें करणारी सेना, अित्यादि सैन्य राजानें बाळगावें. त्यातील मनुष्यें अमुकच वर्णाचीं अथवा अमुकच वर्णांपैकीं अमुकच जमातीचीं म्हणजे जातीचीं असावीं असें नाहीं. मनुष्यमात्रास त्याच्या अकलेची व बलाची व शौर्याची, परिक्षा घेऊन ठेवावें, त्यात वर्णभेद किंवा वर्णभेदातील ज्यातिभेद अित्यादि अटकाव नसावा, तरच सर्व जातींच्या प्रज्येला आमचे राज्य आमचे राज्य असा अभिमान राहातो, आणि शत्रुंचें अगदीं चालत नाहीं, व मनुष्यमात्राचें अन्याय दृष्टोत्पत्तीस येतात, यामुळें नीतीनें शासन होतें[2]."

१ वेदोक्तधर्मप्रकाश, पृ ९४-९५. २ वेदोक्तधर्मप्रकाश, पृ.४४७.

"न्यायाधिशानें अन्यायी ब्राह्मण आणि अन्यायी माहार या दोघांस सारख्या मानानें अुभें करून, अथवा बसवून न्याय करावा; परंतु माहार दरवाजाबाहेर आणि ब्राह्मण आंत असा पक्षपात करूं नये; मग तो न्यायाधीश ब्राह्मण क्षत्रियादिक कोणीही असो, अथवा माहार मांग असो. सर्व न्यायाधीशानीं ह्या नियमानें चालावें, आणि पक्षपात सोडून न्याय करावा, तरच प्रजा कैदी होईल, नाहीं तर प्रजा स्वतंत्रता पाहील."[1]

सामाजिक विषमतेप्रमाणेच अतिशूद्रांवर होणाऱ्या अमानुष अन्यायाचीहि बावाना जाणीव होती. ह्या दलित बांधवाच्या मागासलेपणाची जबाबदारी सर्वस्वी अुच्चवर्णियावरच आहे; म्हणून त्याची अवहेलना न करता ब्राह्मणादिकानी त्याना समानतेच्या नात्याने वागवावें, त्याच्या सांस्कृतिक सुधारणेसाठीं कसोसीने झटावें, व मंदिरप्रवेशादि त्याचे न्याय्य हक्कहि सुखा-समाधानाने मान्य करावे असा बावाचा स्पष्ट अभिप्राय होता.

"नीच कर्मांच्या योगाने जे गावाबाहेर राहून अधिकाधिक नीच कर्में करितात असल्या त्या नीच अवस्थेंतील मनुष्यास म्हणजे अतिशूद्रास वगैरे असें बोलूं नये कीं तुम्ही नीच आहा तुम्ही नीच आहा, कारण असे नित्य त्याना बोलूं लागलें म्हणजे ते अधिकच नीच होतात. यास्तव भूदेव जे श्रेष्ठ ब्राह्मण त्यांणीं नीच अवस्थेतील मनुष्यास उत्तम स्वभाव अभ्यासवून त्यांना नीच पदवीपासून मुक्त करून अुत्तम पदवीस आणावे. कारण नरदेह हा उत्तम पदवी मिळविण्यास योग्य आहे आणि ब्राह्मणानीं हेच आपले मुख्य कृतकर्म आहे असें स्मरावें. आता हें त्याना मातेस बालकाच्या सुचना देण्याप्रमाणे स्मरण दिल्हें आहे, कारण माझीं माता-पिता चित्पावन ब्राह्मण व माझ्या देहाची उत्पत्तीपासून गणना ब्राह्मणवर्णात श्रेष्ठपणानें आहे म्हणून सर्व ब्राह्मण माझे आईबाप आहेत म्हणूनच मीही निर्भयपणानें बोललों."[2]

"आपोआप मेलेलीं ढोरें खाणाऱ्या माहारादिकाना शिवलें असतां विटाळ मानावा, म्हणजे वीट मानावा, त्यापेक्षां जीवंत ढोरें मारून म्हणजे हिंसाकर्म करून मास खाणाऱ्या म्लेच्छ लोकाचा विटाळ म्हणजे वीट, अथवा कंटाळा, विशेष मानिला पाहिजे हें न्यायानें सिद्ध आहे. तथापि, "देशकालानुरोधेन वर्तितव्यं सदा बुधैः" या शास्त्राप्रमाणे वर्तावें. आणि मानाचा विच्यार ठेवावा, व अशोकवनातील पडल्या फळाच्या परवानगीवरून, अशोकवनाचा नाश झाला, तसाच, आपोआप मेलेलें ढोर खाण्याच्या, माहार लोकाच्या रूढीनें ढोरांच्या जीवाचा कपटानें नाश होतो. यास्तव आपोआप मेलेलें, किंवा जीवंत मारून इत्यादि रीतींनीं माहारांच्या सर्व जमातींनीं ढोर खाऊंच नये, म्हणजे ते शुद्ध झाले, व देवळात येण्यास योग्य झाले.[3]"

वेदोक्तधर्मांतील त्रिकालाबाधित तत्त्वाचा प्रसार करून बावानी हिंदुसमाजाला लागलेली गळती थांबविली. परंतु गेल्या हजार वर्षांत लक्षावधि हिंदु लोक परधर्मांत गेले होते. त्यांच्या आचारविचारांत सनातन हिंदु संस्कृतीचे अवशेष अजूनहि दिसून येत होते. तरी देखील त्यांना परत हिंदुधर्मांत येण्यास मुभा नव्हती. आपल्याच रक्ताचे हे असंख्य लोक परधर्माच्या छत्राखाली वावरतांना पाहून बावाचें मन अस्वस्थ होअी, व काही ना काही तरी तोड काढून त्यांना पुन्हा हिंदुधर्माची दीक्षा कशी देता येअील याची ते विवंचना करीत. शुद्धी-करणाची कल्पना आता सर्वमान्य झाली आहे. पण पाऊणशे वर्षांपूर्वीच या थोर महात्म्याला त्याची आवश्यकता भासली होती ही गोष्ट लक्ष्यात घेण्यासारखी आहे.

---

१ वेदोक्तधर्मप्रकाश, पृ.४४७. २ वेदोक्तधर्मप्रकाश, पृ २२१.
३ वेदोक्तधर्मप्रकाश, पृ.१०४–१०५.

"वेदोक्तधर्माच्या आधाराने सर्व मतें खंडन केलीं जातात, परंतु त्या मतांतून मिसळलेले लोक, म्हणजे त्या मतांच्या जमावाचे लोक जे, त्याना पुन्हा वेदोक्तधर्मात आणण्यास युक्ति चालविली पाहिजे, अथवा चालली ही पाहिजे."[1]

विष्णुबावा स्वतः जरी विरक्त संन्यासी होते, तरी त्यानी लोकसंग्रहासाठी प्रवृत्तिमार्ग चोखाळला होता. भौतिक शास्त्रांची व व्यावहारिक सुधारणेची किंमत त्याना कळत होती. देशकालपरिस्थितीच्या अनुरोधाने प्राचीन धर्मशास्त्रांचें रहस्य समजूत न घेतां पोकळ शब्द-पांडित्यावर फाजील भिस्त ठेवल्यामुळे आम्ही दिवसानुदिवस कमजोर होत गेलों, व शेवटीं परकीयांचे गुलाम बनलों ही गोष्ट त्याच्या चित्तात सदैव सलत होती. जुन्या पठडींतील आमच्या पंडितांचा दुरभिमानच सगळ्या राष्ट्राला भोवला आहे अशी त्याची दृढ समजूत होती, आणि म्हणून त्यानीं या पंडिताच्या अर्थशून्य पाठांतराचा व व्यावहारिक निष्क्रियतेचा तीव्र निषेध केला.

"जो गीर्वाणभाषा म्हणजे संस्कृत भाषा शिकतो, आणि बोलतो, तोच विद्वान् अशी हिंदुस्थान देशांतील बहुतेक लोकांची बोलण्याची चाल पडून तशीच समजून दृढ झाली आहे; परंतु ही समजूत अगदीच मूर्खपणाची आहे. कां कीं, ज्या ज्ञानाच्या अनुभवानें वेदशास्त्रादिक ग्रंथ रचले, तें ज्ञान व अनुभव नाहीं, आणि नुस्ते ग्रंथ पाठ केले आणि बोलला त्याला विद्वान म्हणणें हें केवढें मूर्खपण आहे! असो. अशा ह्या दुरभिमानाने हिंदुस्थान देशांत जी पाच हजार वर्षांवरील जी अत्युत्तम व्यवहारसुधारणा व नीति व धर्मस्थिति होती, इत्यादि त्याची धुळधाणी जाहली, आणि आपल्या वेदोक्त धर्मासहित आपलीं शरीरें म्लेच्छाच्या स्वाधीन झालीं. असो, झालें तें झालेंच, पण होईल त्याविषयीं सावध."[2]

ज्याप्रमाणे 'पढतमूर्ख' पंडितानी आपली बुद्धिमत्ता अनाठायीं खर्च केली, त्याप्रमाणेच लहानमहान हिंदु राजेहि आपल्या सत्तेचा व संपत्तीचा दुरुपयोग करीत होते. सभोंवतालच्या बदलत्या परिस्थितींचें बरोबर आकलन करण्याची त्याच्या ठिकाणीं पात्रता नव्हती. त्यामुळे अितर देशांतील लोकांचा उत्कर्ष कसा झाला हें जाणून घेऊन त्या धोरणाने आपल्या देशांत कलाकौशल्याचीं कामे सुरू करण्याचें त्याच्या स्वप्नांतहि येत नसे. आपल्या टीचभर राज्यांत आपला अधिकार व ऐश्वर्य मिरवावयास सापडलें, म्हणजे ते त्यातच खुष असत. अशा आळशी व निर्बुद्ध राजेरजवाड्यांच्या सुखासीनतेवर विष्णुबावानी सणसणीत टीका केली, व त्यांचा असाच वर्तनक्रम पुढे चालू राहिल्यास त्याच्या नातवंडाना राज्यपद लाभण्याची आशा नको असा गंभीर इशाराहि दिला.

"हल्लीं हिंदुस्थान देशात लाहान साहान राजेरजवाडे व त्याचे कारभारी इत्यादि जे आहेत, त्याची स्थिति कशी आहे तर जसे पक्षी आपलीं घरें दोन हजार वर्षांवर बांधीत होते, त्याच नमुन्याप्रमाणें सांप्रतचे पक्षी आपलीं घरें बांधितात, या पक्ष्याच्या गृह बांधण्याच्या दृष्टांता-प्रमाणेंच सांप्रतकाळीं हिंदुस्थानदेशात जे लाहानमोठे राजेरजवाडे व त्याचे कारभारी इत्यादि आहेत त्यांची स्थिति आहे, व त्याचें मन अगदीं निर्बळ आहे. याचें कारण त्याना स्वहस्तानें काम करण्याची संवय नाहीं, व भूगोलाची माहिती नाहीं, व जलप्रवास करीत नाहींत, यामुळें त्याना मरणाची भीती वाटत्ये, वंशपरंपरा चाकर मनुष्यें, यामुळें समयास कोणाचा उपयोग नाहीं, व जात्यभिमानामुळें कोणी कोणास सार्वभौमत्व देण्यास वगैरे मदत करीत नाहीं, व स्वतः लेखन-वाचनज्ञानाचा, व कलाकौशल्याचीं कामें करण्याचा मार्ग मुळींच ठाऊक नाहीं, व त्यातील आनंदरस चाखला नाहीं, यामुळें प्रजेस द्यावा हें स्वप्नातही नाहीं, व बापाच्या आज्यानें

१ वेदोक्त धर्मप्रकाश पृ. ७०३-७०४. २ वेदोक्त धर्मप्रकाश पृ. ४२७-२८.

ज्या पराक्रमाने जो किताब मिळविला, तो किताब भालदारचोपदारांकडून ललकारऊन, आपण नाटकांतील सोंगाप्रमाणें त्या किताबाचा आनंद भोगतों, याची लज्या त्यांना वाटत नाहीं, व अन्य द्वीपांतील राजे, कोणत्या कारणानें व कायद्यानें योग्यतेस चढले तो उद्योग करण्याचें ज्ञान नाहीं, पण शिकवूं लागल्यास शिकत नाहींत, इत्यादि प्रकारची हल्लीं जे हिंदुस्थान देशांत लाहानमोठे राजेरजवाडे आहेत त्यांची स्थिति आहे. असो, अशीच त्यांणीं आपली स्थिति ठेविली, तर त्याचें सोंग, नातू झालाच तर त्यास मिळणार नाहीं."[1]

आपला देश, धर्म, भाषा, संस्कृति इत्यादिकाबद्दल विष्णुबावाना जाज्वल्य अभिमान होता. मुसलमानी अंमलात राजकीय कागदपत्र फारशी लिपींत लिहिण्याचा प्रघात सुरू झाला; त्यानंतरहि पुढे तो कित्येक ठिकाणीं तसाच चालू राहिला होता. हा अनिष्ट प्रघात मोडून टाकून हिंदुस्थानांतील राजेरजवाड्यानी सर्वत्र देवनागरी लिपी प्रचारात आणावी असा त्याचा आग्रह होता. त्याचप्रमाणे शक, महिना, तिथि, वार वगैरे सर्व कांही हिंदु पद्धतीप्रमाणे लिहिण्याची दक्षता घ्यावी, व हरएक बाबतींत आपला स्वाभिमान रक्षण करावा अशा तऱ्हेची त्यांची शिकवण होती.

"हिंदुस्थान देशांतील राजकीय लेखन, किंवा व्यावहारिक लेखन, बालबोध जी देवनगरी पूर्ण लिपी तिच्यात असावें, अथवा बालबोध लिपीच्याच आधारानें जी मोडी लिपी तिच्यांत असावें. आणि युधिष्ठिर, शालिवाहान, विक्रम हे शक, व चैत्र, वैशाख अित्यादि महिने, व प्रतिपदा, द्वितीया अित्यादि तिथी, व रविवारादिक वासर, व प्रभवादिक संवत्सर, याप्रमाणें पुस्तकांस लावीत जावे. अन्य देशातील अपूर्ण लिपींचा अभ्यास करण्याचे, व म्लेच्छाच्या गोष्टी शिकविण्याचे बालकास श्रम देऊं नये. व अन्यदेशीय वेदोक्त धर्मविरुद्ध मतवादी मनुष्याचे शक व महिने, याचा कागदपत्रात मुख्यत्वेंकरून अुपयोग करूं नये. याप्रमाणें हरकोणी हिंदुस्थान देशांत राजे असतील त्यांणीं वागावें."[2]

लहानपणापासून अगदी जुन्या वातावरणात वाढलेल्या विष्णुबावांसारख्या अध्यात्मप्रवण संन्याशाचीं अशीं पुरोगामीं मतें पाहिलीं म्हणजे त्याच्याबद्दलचा आदर दुणावतो. शुद्धाशुद्धतेच्या बावाच्या कल्पना लोकमताहून फार भिन्न होत्या. "मुंबअी हें भ्रष्टतेचें आगर; अशा स्थितींत आपण येथे कसें राहता!" असा कोणी तरी त्याना प्रश्न विचारला. त्यावर त्यानी अुत्तर दिलें की, "ज्या ठिकाणीं भ्रष्टपणा अधिक, त्या ठिकाणींच आमच्यासारख्या धर्मोपदेशकांची जरूरी आहे."

"कोकण वगैरे ठिकाणातून बहुत लोक पोटाकरितां म्हणून एथे येतात, त्यांतून कित्येकांस हिकडची हिंदुधर्मविरुद्ध भ्रष्टता समजून आल्यावर ते अज्ञ असताही, स्वधर्मरक्षणार्थ परत आपल्या गावीं जातात, तर आपण ब्रह्मच्यारी होत्साता हें भ्रष्ट स्थळ सोडून स्वस्थळाप्रत गमन करावें असें आपल्या ध्यानींमनींही येत नाहीं हें कसें !

आम्ही वेदप्रतिपाद्य धर्माची माहितगारी करून देऊन भ्रष्टता दूर करणारे वस्ताद आहों, या कारणामुळें जेथें फार भ्रष्टता असेल तेथेंच आमचें आगमन, तेथेंच आमचें काम, तेंच आमचें स्थळ, याहून वेगळें आमचें स्थळ तें भगवद्गीता अध्याय पंधरावा श्लोक साहावा प्रमाणें "यद्गत्वा न निवर्तंते तद्धाम परमं मम" यामुळेंच हें कसें याचें अुत्तर हें असें खूप ध्यानात ठेवें."

---

१ वेदोक्तधर्मप्रकाश, पृ.४२५-२६. २ वेदोक्तधर्मप्रकाश, पृ.४४५-४६.
३ वेदोक्तधर्मप्रकाश, पृ.२६४.

बावांचा आत्मविश्वास फार जबर होता. लोक जरी आपला अमोलिक अुपदेश अैकत नाहीत, तरी पुढे त्याना पश्चात्ताप करण्याची पाळी आल्यावांचून राहणार नाही अशी त्यांची पक्की खात्री होती. म्हणून 'खऱ्याखोट्याचा नीट निवाडा करा, नाहीं तर फसाल, व मागाहून पस्तावाल' असें ते लोकाना वारंवार बजावीत असत.

"मजसाठीं रडाल, अरे माझी आठवण कराल. पहा पहा! हाल्लीं तर मजविषयीं, विषयलंपट लोकहो तुमचा विच्यार कसा आहे, व त्या वाईट विच्याराचें ज्ञान कशें आहे; तर काय हो! हा हिराही चमकतो, व काचेचा खडाही चमकतो; तस्मात् कांच व हिऱ्याचें मोल एकच असावें; काय हो! ही पितळही पिंवळी, आणि सोनेंही पिंवळें; तस्मात् सोन्याची व पितळेची किंमत एकच! तसेंच ब्रह्मच्यारी बावाही लंगोटी घालून व कफनी गळ्यात घालून लोकास ज्ञान व नीती सांगतात, तसे तर ब्रह्मच्यारी बावाच्या वेषासारखे आमच्या घरोघर येतात, त्याना ज्ञान नसतें, मग ब्रह्मच्यारी बावाच काय अधिक आहेत! असा विच्यार, लोकहो ज्ञानाच्या श्रेष्ठत्वाकडे द्रव्यमदाच्या योगानें पहात नाहीं, यामुळें तुमच्यात होतो, परंतु फसालें."[1]

विष्णुबावांच्या अंगीं अनेक असामान्य गुण होते. त्यामुळे त्यांनी हजारों लोकांचीं मनें आपल्याकडे ओढून घेतलीं. त्यांच्या अंतःकरणात धर्माभिमान उत्पन्न केला. आपल्या हिंदु-समाजाचा उत्कर्ष साधावयाचा असेल, तर प्रचलित समाजव्यवस्थेत आमूलाग्र बदल केल्या-शिवाय गत्यंतर नाही असें त्यांचें मत होतें. त्याचाहि त्यानी निर्भीडपणें प्रचार केला. परंतु धर्माभिमानाच्या प्रेरणेने एकत्रित झालेल्या लोकाची संघटना करून कोणत्या तरी प्रत्यक्ष विधायक कार्याला त्यांनी हात घातला नाही. त्यांचा स्वभाव कांहीसा विक्षिप्त व लहरी होता. त्यामुळे निरनिराळ्या प्रवृत्तींच्या लोकाशीं जुळतें घेऊन त्यांचा एखाद्या विशिष्ट कार्याकडे उपयोग करून घेण्याइतकी कार्यकुशलता, धीमेपणा व तारतम्य त्यांच्या अंगीं असेल असें वाटत नाही. त्यांच्यासारख्या तडफदार व सडेतोड वृत्तीच्या माणसाचें मन विधायक कार्यापेक्षा विध्वंसक कार्यांतच रमणें जास्त स्वाभाविक होतें. आणि म्हणूनच वादचतुर वक्ते व प्रभावी प्रचारक म्हणून बावाचें नाव महाराष्ट्रभर गाजलें, पण आर्यसमाजासारख्या चिरस्थायी संस्थेची स्थापना करण्याचें भाग्य त्यांना लाभलें नाही.

---

१ वेदोक्तधर्मप्रकाश, पृ.१०९.

# राष्ट्रकूटकालीन मराठी

(ले. ग. बा. तगारे, एम्.ए., बी.टी, कऱ्हाड)

**क्रियापदविचार—**

क्रियावाचक शब्द हा वाक्यांतील अत्यंत महत्त्वाचा भाग आहे. कोणतेंहि वाक्य (अथवा विचार) त्याच्याशिवाय पुरा होत नाही. 'आख्यातजानि नामानि' हें यास्काचार्यांचें मत नामापुरतें मर्यादित नसून विशेषणें व क्रियाविशेषणें याचासुद्धा अंतर्भाव यात केला पाहिजे. भाषेचें वैभव धातूंच्यावर अवलंबून असतें. त्यामुळे संस्कृत किंवा प्राकृत व्याकरणाकार धातुपाठ देण्यास विसरत नाहीत. यातील सर्वच धातु वाङ्मयांत येतात असें नव्हे. उदा. संस्कृतमधील १७०६ धातूंपैकी निम्मेसुद्धा वाङ्मयात येत नाहीत. हेमचंद्र व मार्कण्डेय याचे धातुपाठ लक्षात घेतां प्राकृतमध्यें १५४८ धातु आहेत. पैकी ९३० हेमचंद्राने व ६१८ मार्कण्डेयाने दिलेले आहेत. यापैकी २२३ धातूंबद्दल दोघांचें एकमत आहे. अर्वाचीन मराठींत यावनी भाषातून आणखी धातु येऊन ही संख्या वाढली असल्यास नवल नाही. पुष्पदंताच्या वाङ्मयातसुद्धा प्राकृत व्याकरणकारानी न दिलेले पण ज्ञानेश्वरांच्या भाषेत आढळणारे असे अनेक धातु आहेत. संस्कृत किंवा प्राकृतमधून येणाऱ्या धातूंच्या बदललेल्या रूपांना धात्वादेश म्हणतात. प्राकृत व्याकरणकारानी हे धात्वादेश व्युत्पत्तीपेक्षा अर्थाकडे लक्ष देऊन ग्रथित केले आहेत.

पुष्पदंताच्या वाङ्मयांत येणाऱ्या धातूंचें पुढील प्रकारें वर्गीकरण करता येईल.

(१) वर्णप्रक्रियेंत थोडा फरक होऊन थेट संस्कृतमधून आलेले. उदा० चर, खण, घड, अि. (२) विकरणासह संस्कृत धातु, स्वतंत्र मानले गेलेले— जाण, खिज्ज, चिण अि. (३) वरीलप्रमाणे नवीनच विकरण जोडलेले कुण, थुण, अि. (साधर्म्य analogy हेंच याच्या मुळाशीं कारण आहे) व (४) उपसर्गासह धातु स्वतंत्र मानले गेलेले; उदा० आण, उग्घाड, उब्भ, आचक्ख अि. (५) उपसर्गासह देशी धातु स्वतंत्र मानले गेलेले; उदा० अब्भिड, निड्डाड, पलोट्ट अि. (६) संस्कृत धातुसाधितें स्वतंत्र धातुप्रमाणे उदा०—उग्घुठ, ओहट्ट, पवड्ढ (७) देशी धातुसाधितें स्वतंत्र धातूप्रमाणे, उदा०—अब्भिट्ट छिप्प (!) णिच्छट्ट (८) संस्कृत धातु व त्याचे संस्कृतामधील आदेश दोन्ही स्वतंत्र धातूप्रमाणे उदा०—गम, गच्छ, देक्ख, दंस, पास (पाहणें). (९) नामधातु (denominatives). (१०) ध्वन्यनुकारी उदा०— सलसल (सळमळणें) बुक्कर (भुंकरणें), गुमगुम अि. (११) संस्कृत धातूंशीं सदृश पण आजच्या वर्णविकासाच्या नियमाच्या कक्षेंत असलेले उदा०— घुम्म (घूर्ण्) गुंथ (ग्रंथ्), सिप्प (सिच्) पेल्ल (प्रेर्) अि. (१२) संस्कृत धातूंशीं संबंध नसलेले पण आजच्या भाषेंत आढळणारे उदा,—भंड. बोल्ल, रेल्ल, खुप अि. (१३) वैदिक धातूंशीं संबद्ध उदा०— गेण्ह, लोट्ट अि०- (१४) वरील वर्गात न पडणारे धातु उदा०- धिव, खरियाल, ढोक अि.

ग्रियर्सननी Memoirs of the Asiatic Society, Bengal, Vol. VIII.2 1924 यांत दिलेल्या धात्वादेशाच्या वर्गीकरणापेक्षा वरील वर्गीकरण पुष्कळच विस्तृत आहे हें कोणालाहि कळून येईल.

आता दहाव्या शतकात आढळणारे काही मराठी धातु देतों. मी दिलेल्या यादीपेक्षा यांची संख्या कितीतरी जास्त आहे हें यादवकालीन मराठीच्या अभ्यासकास पुष्पदंतवाङ्मय वाचतांना आढळून येईल. धात्वादेशाचें वर्गीकरण केल्यानंतर परिशिष्टाकडे बोट दाखविण्यापेक्षा प्रत्यक्ष काही धातु, त्याचें संस्कृत रूपान्तर व दहाव्या शतकानंतरचें स्वरूप एका कोष्टकांत माडलें तर दहाव्या शतकातील मराठी धातूंसंबंधी अधिक कल्पना येईल असें वाटल्यावरून ही यादी येथे देतों.

## पुष्पदंतवाङ्मयांतील धातु

संक्षिप्त चिन्हाचा खुलासा. हेम– हेमचंद्राचें प्राकृत व्याकरण अध्याय ८; दे– देशी-नाममाला– हेमचंद्र-कृत, पा– धनपालकृत पाइअलच्छीनाममाला. पुष्पदंतवाङ्मयाचीं संक्षिप्त चिन्हें म. पु., य. च., ना. च. पूर्वीप्रमाणेच आहेत.

| क्रमांक | पुष्पदंत | संदर्भ | संस्कृत रूप | १० व्या शतकानंतरचें रूप | स्पष्टीकरण |
|---|---|---|---|---|---|
| १ | अक्ख | ना. च. ३.८.७ | आ+ख्या ॥ | (तेंच) | उदा. अख्यान (नाम) |
| २ | अप्फोड | य.च.३.१०.८ | आ+स्फोट् (अ) | हसडणें | उदा. कीं दुःखव्याघ्राच्या असडून होटी ॥ नवनाथ-भक्तिसार २२.५० |
| ३ | अब्भिड | य. च. २.३२.१ | संमुखं गम् ॥ | भिडणें | मराठींत उपसर्गविरहित असतो |
| ४ | अब्भिट्ट | म. पु. ३२.६.१३ | अभिगत | भेटणें | 'भिड'चें क. भू. धातु-साधित (?) |
| ५ | अवहेर | ना. च. ३.९.१० | अव+धीर | अवहेरणें | म. पु. १.३.५ पाहा. |
| ६ | ,, | ना. च. ४.४.३ | विचारित (टिप्पण) | हेरणें | |
| ७ | आचक्ख | म. पु. १.७.६ | भक्ष् | चाखणें | |
| ८ | आण | ना. च. १.१५.१५ | आ+नी | आणणें | |
| ९ | आउ, आव | म.पु. १.६.२ | आ+इ | ... | आव=लाभ– ज्ञानेश्वरी १८.६.२२ |
| १० | उग्गम | ना. च. २.१२.६ | उद्+गम्, (पण हेम, उद्+घाट् ४.३३) | उगमणे | आपापासूनि पृथ्वी उगमगी –परशरामकृत लावण्या |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ११ | उग्गम | ना. च. ९.१७.१ | उद्+इ | उगवणें | |
| १२ | उग्घाड | ना. च. २.१०.१० | उद्+घाटय् | उघडणें | |
| १३ | उच्छल | य. च. ३.५ | उत्+चल् | उसळणें | उच्छलन– उसळी, महाराष्ट्र शब्दकोश पृ. ३४५ |
| १४ | उज्जव | ना. च. ९.२१.१९ | उद्+याप् | उजवणें | |
| १५ | उट्ठ | ना. च. ४.४.९ | उत्+स्था | उठणें | |
| १६ | उड्ड | य. च. ४.३.१० | उत्+डी | उडणें | |
| १७ | उद्दाल | ना. च. ६.११.८ | आ+छिद् (हेम ४, १२४) | उदाळणें | जैसी खळाळीचिया उदका, सरसि उदाळे चंद्रिका ॥ ज्ञाने. १५.४९८. |
| १८ | उप्फाल | य. च. १.६.५ | उत्+पाटय् | उफाळणें | |
| १९ | उब्भ | म. पु. ७.२१.१८ | उर्ध्वी कृ | उभणें | मायाभूमिकेचेनि पखारे, उभिली लिंगदेहाची धवळारे ॥ शिशुपालवध ९३ |
| २० | उल्ल | य. च. ४.४.१५ | आर्द्रीभू | ओलावणें | |
| २१ | उव्वर | म. पु. ३७.२५.३ | अव+शिष् | (तत्सम) | उदा. उर्वरित |
| २२ | ओसार | ना. च. ८.१५.१० | अप+सृ | ओसरणें | |
| २३ | ओहट्ट | म. पु. ७.१८.७, | हीनंभू | (ओ)हटणें | 'अप+हृत' पासून धातु |
| २४ | कड्ढ | य. च. २३.२२.१२ | कर्षू | काढणें | कड्ढअ (म.पु.२०.१९.२) लोहचुंबक |
| २५ | कढ | य. च. ३.५.११ | क्वथ् | कढ (व) णें | |
| २६ | कर | ना. च. १.३.१० इ | कृ | करणें | |
| २७ | कुट | य. च. २.१७.७ | ... | कुटणें | |
| २८ | खंच | ना. च. ५.४.१२ | कर्षू | खेचणें | |
| २९ | खलहल | य. च. ४.७.४ | ध्वन्यनुकारी | खळखळणें | |
| ३० | खा | य. च. २.९.७ | इ. खाद् | खाणें | |
| ३१ | खिज्ज | ना. च. ५.१.११ | खिद्-हेम ४.२२४ | खिजणें | 'खिद्य' (खिद्+य) पासून |
| ३२ | खुंट | ना. च. ९.७.५ | त्रुट्-हेम ४.११६ | खुंटणें | |
| ३३ | खुड | ना. च. ७.१४.१३ | ,, | खुडणें | |
| ३४ | खुप | म. पु. १.१६.५ | स्खल्(टि) | खुपणें | या ठिकाणीं व ना. च. ७.६.८ मध्यें हा अर्थ योग्य आहे. हेम ४.१०१ व वररुचि ८.६८ मध्यें थोडा निराळा अर्थ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ३५ | खेल्ल | ना. च. ३.१२.१० | खेल (हेम ४.३८२) | खेळणें | |
| ३६ | गंज | म. पु. १४.१२. य. च. ३.३६.५ | क्षुभ्(टिप्पण रोमांचित) | गांजणें | य. च. ३.३६.५ मध्ये गंजोल्लिय-गांजलेला |
| ३७ | गवेस | ना. च. ७.२.५ | गवेषय् | गवसणें | थोडें अर्थांतर (Semantic change) |
| ३८ | गिल(ल्ल) | म. पु. २९.५१. ३२.१३.९ | ग्रस् | गिळणें | डॉ. वैद्यांनी दिलेला म. पु. २९.५.३.चा 'ओले' हा अर्थ दुय्यम आहे; मूळ नव्हे. |
| ३९ | गुंथ | ना. च. ५.८.१४ | ग्रथ् | गुंतणें | |
| ४० | गेण्ह | ना. च. ३.८.१५ | ग्रह् | घेणें | वैदिक गृभ्ण हेम् ४.२०९ वररुचि ८.१५ |
| ४१ | गोंदल | म. पु. १.३.७ ११.१६.९ | मिल् | गोंधळ (नाम) | कानडी 'गोंदलिग' पासून (!) |
| ४२ | घल्ल | म. पु. ३.१६.१० | क्षिप् | घालणें | |
| ४३ | घिव | म. पु. २.१८.६ | ,, | घेव (नाम) | उदा० देवघेव (घेणें) |
| ४४ | घुम्म | ना. च. ५.९.१३ | घूर्ण् | घुमणें | हेम ४.११७ पाहा |
| ४५ | घुल | य. च. ३.१४.५ ना. च. ५.१.१२ | ,, | घुलणें | 'घोळणें'समानार्थक |
| ४६ | घोट्ट | ना. च. ५.५.५ | पिब्-हेम ४.१० | घोटणें | घोटण=घासणें यापेक्षा 'घोट घेणें' यातील अर्थ जास्त सयुक्तिक. कारण हें युद्धाचें वर्णन आहे. |
| ४७ | चक्ख | य. च. ३.२३.६ | आस्वाद- हेम४.२०६ | चाखणें | |
| ४८ | चड | य. च. ३.२६.६ | रुह् | चढणें | हेम ४.२०६ |
| ४९ | सिप्प | य. च. ३.१३.१३ | सिच् | शिंपणें | |
| ५० | हल्ल | म. पु. १४.५.१२ | कम्प् | हलणें | |

वर दिलेली यादी केवळ दिग्दर्शक आहे. याच्या कितीतरी पट धातु राष्ट्रकूटकाल व यादवकाल याची सविस्तर तुलना करतांना आढळून येतात.

पुष्पदंतवाङ्मयातील क्रियापदांच्या रूपांवर परस्मैपदाची छाप जास्त आहे. लगें, कोपे, तरे अित्यादि ज्ञानेश्वरींतील आत्मनेपदाचे अवशेष यादवकालांत संस्कृतला मिळालेल्या अुत्तेजनामुळेच आढळतात. (दहाव्या शतकातील दुसरा ग्रंथ 'भविसयत्तकहा' यात सुद्धा परस्मैपदच जास्त आढळतें. आ. पद महाराष्ट्री भाषेतील रूपात दिसून येतें. डॉ. गुणे सम्पादित-भविस. कहा. प्रस्तावना पृ. २४,२५ पाहा.) धातूंचें वर्गीकरण १० गणात नसून सर्व धातु अकारान्त बनले आहेत. संस्कृतमधील १० लकारापैकी पुढील लकार आढळतात.

१ वर्तमानकाळ (लट्), २ भूतकाळ (लङ्, लिट्, लुङ्), ३ भविष्य (लुट्, लृट्), ४ आज्ञार्थ (लोट्), ५ विध्यर्थ (विधिलिङ्), आशीर्वादार्थक (आशीर्लिङ्) व संकेतार्थ (लृङ्) फार क्वचित् आढळतात. या लकारांची जुनीं रूपें प्राकृत वेषांत मधून मधून आढळतात.

कर्तरि, कर्मणि, भावे व प्रयोजक सर्वत्र आढळतात. पण भावेप्रयोग त्या मानाने फार कमी येतो. पौनः पुन्यार्थक (यङ् लुगन्त) व नामधातु (क्यच्क्यन्त) पुष्कळच आहेत.

भूतकाळाचा जवळ जवळ लोप झाला आहे. अनद्यतन व परोक्षभूत व तृतीयभूतकाळाचे (लुङ्चे) सात प्रकार याचा लोप आढळतो इतकेंच नव्हे तर पानेंच्या पानें उलटलीं तरी क्रियापदाचें भूतकाळीं रूप आढळत नाही. तसेंच संयुक्त क्रियापदें वापरण्याची प्रवृत्ति बरीच आढळते. धातुसाधितांना काही सहायक्रियापदें जोडून क्रियापद वापरण्याची आधुनिक मराठीची पद्धत त्या काळापासून सुरू असावी असें वाटतें.

राष्ट्रकूटकालीन आणि यादवकालीन भाषेची तुलना करतांना या दोन भाषांत नुसतें साम्य नसून या दोन्ही एकच आहेत व राष्ट्रकूटकालीन भाषा ज्ञानेश्वरकालीन भाषेचें पूर्वरूप आहे असें वाटतें.

## १ वर्तमानकाळ (कर्तरि लट्)

### एकवचन

प्र. पु. फेडमि (य. च. ४.६.२) वियाणमि (म. पु. १.८.९) कहउँ, करउँ (य. च. २.१.६)

द्वि. पु. णिवसहि (म. पु. ३.१०.११) रहहि (ना. च. ६.१.५) घिवसि (ना. च. ८.१.७)

तृ. पु. भिडइ (य. च. ३.२५.११) सोअइ (य. च. २.३५.१०)

### अनेकवचन

प्र. पु. गच्छामो (य. च. २.१.१०) अवयरहुँ (ना. च. ६.५.९)

द्वि. पु. *करह

तृ. पु. रहंति (ना. च. १.५.९) हरहिं (य. च. २.२६.१७) हिंडहिं, होंति (म. पु. १.२.१०)

### २ वर्तमानकाळाचे प्रत्यय पुढे दिल्याप्रमाणे आहेत.

(कर्तरि लट्)

| | एक वचन | अनेक वचन |
|---|---|---|
| प्र. पु. | मि अुँ | मो, हुँ |
| द्वि. पु. | सि, हि | * ह |
| तृ. पु. | अि | अंति, िँ |

हे सर्व प. पदी आहेत. प्र. पु. अनेक वचनी 'मो' पूर्वी धातूंतील अंत्य अ चा आ होतो.

### ३ ज्ञानेश्वरकालीन मराठींतील रूपें—

| | एक वचन | अनेक वचन |
|---|---|---|
| प्र. पु. | देखोँ, करीँ | जाणों, करूँ |

| | | |
|---|---|---|
| द्वि. पु. | जाणसि देसि | हसा करा |
| तृ. पु. | पडे, नेणे दावि, फेडी | करँति, होँति |

### ४ प्रत्ययांची तुलना

| | पुष्पदंत (राष्ट्रकूटकाल) | ज्ञानेश्वर (यादवकाल) |
|---|---|---|
| प्र. पु. ए. व. | मि, अुँ | अिँ, ओँ |
| अ. व. | मो, हुँ | ओँ, अूँ |
| द्वि. पु. ए. व. | सि, हि. | सि |
| अ. व. | *ह | अ–आ |
| तृ. पु. ए. व. | अि | अि |
| अ. व. | अंति, हिँ | अँति |

हकारलोप, मचें अनुच्चारित अनुनासिकांत रूपांतर वगैरे गोष्टी वर्णप्रक्रियेच्या नियमाप्रमाणे होतात. वरील पृथक्करणावरून (कांही व्याकरणकार मानतात तसें) मराठी वर्तमानास धातुसाधित काळ मानण्याचें कारण नाही हें उघड आहे.

१० व्या शतकांतील दुसरा अपभ्रंश ग्रंथ भविसयत्त कथा यांत पुढील प्रत्यय आढळतात

### वर्तमानकाळ

| | ए. व. | अ. व. |
|---|---|---|
| प्र. पु. | मि, अु | हँ |
| द्वि. पु. | हि, हिँ | हु |
| तृ. पु. | अि, अिँ (महाराष्ट्रींत ए.) | अंति, हिँ |

ही भाषा महाराष्ट्रांतील नव्हे हें सांगणे नको.

### भूतकाळ

सुरवातीस सांगितल्याप्रमाणे पुष्पदंत भूतकाळ (लिट्, लङ्, लुङ्) करतांना मुख्य क्रियापदांच्या भूतकाळाऐवजी भूतकाळवाचक धातुसाधितांना √अस चीं भूतकाळचीं रूपें लावून हा काळ साधतो. अुदा०— "मअि आसि परबलु खविउं (य. च. २.८.५) किंवा "आसि रिसिहिं वक्खाणियअु (ना. च. ६-८-११) असें "मीं शत्रु सैन्य मारलें" किंवा "ऋर्षींनी व्याख्यानलें आहे" अशा अर्थी तो धातुसाधितांना √अस हें जोड क्रियापद देअून हा काळ साधतो.

अस चीं हुँ (प्र. पु. ए. व.) अत्थि – आसि (तृ. पु.) अशीं भूतकाळीं रूपें आढळतात. 'सहु' (य. च. २.३३.९)–सह प्र. पु. ए. व. सारखीं स्वतंत्र भूतकाळीं रूपें क्वचितच आढळतात.

यादवकालीन मराठींत 'ल(ला)' 'नल' 'न्ला' असे प्रत्यय भूतकाळीं आहेत. अुदा.– अभिवंदिला, खोविन्नली, दिन्हली म्हणे, नसे अि. पैकीं शेवटच्या दोन रूपांवरून हा प्रत्यय

वैकल्पिक असावा असें दिसतें. प्रत्ययात नकार मिसळण्याची प्रवृत्ति द्राविड भाषांपासून आली असें मत (जहागिरदार B.O.R.A.1930) मराठीच्या कानडीशीं असलेल्या सान्निध्यामुळे मान्य केलें तरी द्राविडी भाषांपासून दूर असलेल्या राजस्थानी व पंजाबी या भाषांत तसें का व्हावें कळत नाही. विभक्तिप्रत्ययामधील 'न'प्रमाणे 'नल' 'न्नल' या क्रियापदांच्या प्रत्ययांतील नकार हें अजून न सुटलेलें कोडें आहे.

भूतकाळांतील 'अल' किंवा 'इल' प्रत्यय हा प्राकृतामधील स्वार्थे 'इल' किंवा 'इल्ल' या प्रत्ययाचा अवशेष असावा. ८ व्या शतकांतील मराठीचीं "दिण्णले" "गहिल्ल', हीं वैशिष्ट्यपूर्ण रूपें कुवलय-मालेंत दिलीं आहेत. हा 'ल' प्रत्यय संस्कृत 'त' पासून कांहीं लोक साधतात तो असा— इत–त > इड–ड > इल–ल. पण दन्त्याचें मूर्धन्यीकरण ऋ, र, ष् नंतर बहुधा होतें, त्यामुळे तें सर्व ठिकाणीं लागू होणार नाही. तसेंच स्लाव्हॉनिक भाषात भूतकाळीं 'ल' आहे त्या अर्थी तो वेदपूर्वभाषातून मराठींत आला असें म्हणणें जरा धाष्ट्याचें आहे. हा 'अल' प्रत्यय स्वार्थे असावा असें वाटण्याचें दुसरें कारण राजवाड्यानी ज्ञानेश्वरकालीन भाषेंत 'अल' किंवा 'इल' प्रत्यय न लागता संस्कृत 'लङ्'पासून आलेलीं अनेक रूपें दिलीं आहेत (ज्ञानेश्वरीचें व्याकरण पृ. ८०-८२). तथापि 'प्रायो भूते निष्ठान्त-प्रयोग एव प्राकृते दृश्यते' हा नियम पुष्पदंताचे भाषेस लागू पडतो हें मान्य केलें पाहिजे.

## भविष्यकाळ

संस्कृत 'लुट' हा शुद्धकाळ नाही. धातूला तृ प्रत्यय लावून वर्तमानकाळाचीं √अस्चीं रूपें लावून हा काळ साधतात. प्राकृत व्याकरणकारानी हा काळ कोणत्याहि प्राकृतामध्यें आढळतो असें सांगितलें नाही. राजवाड्यांनी या काळाचीं ज्ञानेश्वरकालीन रूपें देऊन Beams व Hoernle यानी हीं रूपें लक्ष्यात न घेतल्याबद्दल त्याना दोष दिला आहे. पुष्पदंताच्या भाषेचें पृथःकरण करणांना मला हा काळ (लुट्) आढळला नाही. संस्कृत विद्येच्या प्रकर्षामुळे ज्ञानेश्वरींत हीं रूपें आढळणें शक्य आहे.

भविष्यकाळीं पुढीलप्रमाणे रूपें आढळतात :—

### अेकवचन

| | | |
|---|---|---|
| प्र. पु. | कीलिहिमि (य. च. ३.१५.११) परिणेसमि (ना. च. ५.८.३) | |
| द्वि. पु. | भमिहिसि (य. च. ३.३२.६) पडिवजहि (य. च. २.३७.१२) जाअेसहि (ना. च. ५.२.७) | |
| तृ. पु. | लअेसअि, (य. च. १.७.१५) कीलेसइ (ना. च. २.८.५) मुंजेसइ होसअि (कर्मणि) (य. च. ३·३४·११) | |

### अनेकवचन

| | |
|---|---|
| प्र. पु. | होसहिं (य. च. २.२२.५) द्विवचनी |
| तृ. पु. | खाहिंति (य. च. २.१९.५) करिहिंति (ना. च. ४.५.५) |

भ. काळीं संस्कृत स्य प्रत्यय १३ व्या शतकाच्या मराठीपर्यंत होता हें राजवाड्यानी ज्ञानेश्वरीच्या व्याकरणात दाखविलें आहे. लोनि (परळ शिलालेख ) उघटे, वा ँहति (पाटण शिला) यावरून भविष्यकाळचा लप्रत्यय वैकल्पिक असावा असें दिसतें.

## प्रत्ययांची तुलना

| | | संस्कृत | महाराष्ट्री | पुष्पदंत | ज्ञानेश्वर | आज |
|---|---|---|---|---|---|---|
| प्र. प्र. | ए. व. | स्यामि | स्सामि | समि | | |
| | | | हिमि | हिमि | अँ+ल | अिन, ईन |
| | | | | | अिँ+ल | |
| प्र. पु. | अ. व. | स्यामः | स्सामो–मु | सहिं | अुँ+ल | अूँ |
| | | | हिमो | | | |
| द्वि.पु. | ए. व. | स्यसि | स्ससि | सहि | | |
| | | | हिसि | सिहि | सि+ल | सील |
| द्वि.पु. | अ. व. | स्यथ | हिथ | — | आ+ल | आल |
| | | | हिह | — | | |
| तृ. पु. | ए. व. | स्यति | स्सअि | सअि | | सील |
| | | | हिअि | — | अि+ल | ईल |
| | | | | | अ+ल | |
| तृ. पु. | अ. व. | स्यन्ति | स्संति | | | |
| | | | हिंति | हिंति | अिति+ल | अितिल |
| | | | | | अति+ल | अतिल |

'स' व 'ह' या ध्वनींचें साधर्म्य हकारलोप अित्यादि वर्णक्रियेचे नियम लक्षांत घेतां आधुनिक मराठी प्रत्यय थेट संस्कृतशीं कसे संबद्ध आहेत हें लक्षांत येईल. पुष्पदंत-वाङ्मय व ज्ञानेश्वरवाङ्मय हे मराठीचे कालिक भाग आहेत ही गोष्ट यावरून स्पष्ट होत नाही का? कै. राजवाडे व प्रो. कृ. पा. कुलकर्णी याच्या समोर हें वाङ्मय नव्हतें म्हणून त्यांचा थोडा गोंधळ अुडाला.

---

## चुकीची दुरुस्ती

मागील अंकांतील (वर्ष १४ वें, अंक १ ला) पृष्ठ ३२ वरील २ ऱ्या पायटीपेंतील १ ल्या ओळींत "राष्ट्रकूट राजे तिसरा कृष्णराव खोट्टिगदेव" असें चुकीनें छापलें गेलें. तो मजकूर "राष्ट्रकूट राजे तिसरा कृष्णदेव व खोट्टिगदेव" याप्रमाणे वाचावा. —संपादक.

# शास्त्र कीं विद्या ?

(लेखक— प्रा. स. वि. आपटे)

रसायन-शास्त्र म्हणावें कीं रसायन-विद्या म्हणावें ! मानस-शास्त्र असा शब्द वापरणें योग्य का मानस-विद्या असा शब्द-प्रयोग करणें योग्य ! अशातऱ्हेचा प्रश्न साहजिकच विचारवंताच्या मनांत पुष्कळ वेळां उद्भवतो. विवक्षित ठिकाणीं एकच अर्थ अभिप्रेत असताना देखील असें दिसून येतें की कोणी शास्त्र शब्द वापरतो, तर कोणी त्याच कामीं विद्या शब्द वापरतो. यापैकी कोणता शब्द विवक्षित ठिकाणीं समर्पक होईल, असा विचार न करताच केवळ रुचिभेद म्हणून म्हणा, किंवा लहर म्हणून म्हणा, अथवा कल्पित रूढि म्हणून म्हणा, हा किंवा तो कोणता तरी शब्द अभेदाने वापरला जातो. ही गोष्ट इष्ट नाही. कोणता शब्द कोणत्या ठिकाणीं योजणें योग्य याविषयी विवेक झाला पाहिजे. याकरिता दिग्दर्शनासाठी म्हणून शास्त्र आणि विद्या या शब्दाच्या जोडीसंबंधाने आणि तदनुषंगानेच ज्ञान विज्ञान अशाहि काही शब्दांसंबंधाने थोड्या सूचना पुढे माडण्याचें योजिलें आहे.

पारिभाषिक शब्दाच्या अर्थासंबंधाने असें धोरण शक्यतोंवर स्वीकारणें चागलें की त्या त्या शब्दाच्या अर्थांची किल्ली त्या त्या शब्दांतच ठेविलेली आहे असें सहज दिसावें, किंवा दाखवून तरी देता यावें. या दृष्टीने आता आपण प्रथम शास्त्र शब्दाची व्युत्पत्ति तद्विदानी कशी केली आहे तें पाहूं. 'शिष्यते अनेन अिति शास्त्रम्' अशी एक शास्त्र शब्दाच्या व्युत्पादनाची रीति आहे, किंवा दुसरी 'शास्ति त्रायते च' अशीहि अेक व्युत्पत्ति दिलेली सापडते. दोन्हींचाहि मथितार्थ हाच दिसतो की, 'ज्याच्या योगें शिकविण्याची सोय होते तें शास्त्र'. अथवा असेंहि म्हणता येईल की शास्त्र ही अेक ज्ञानाची अशी व्यवस्थित माडणी आहे की, जिच्या योगें केवळ ज्ञानसमूह शिस्तवार मांडला जातो एवढेंच नव्हे तर विचाराला योग्य वळण लागतें आणि गोंधळ-घोंटाळा अवश्य टळतो. आता विद्या शब्द व्युत्पत्तिदृष्ट्या काय अर्थ दर्शवितो तें पाहूं. 'तद् हि विद्यायाः विद्यात्वं यद् वेत्ति.' विद्या ती की, जिचें स्वरूप अनेक जाणिवा मिळून बुद्धींत निष्पन्न झालेला जाणतेपणा हें होय. कार्य-कारण, सत्य-मिथ्या कोणतें, किती, का व कसें, या आणि अशाच इतर बाबतींतला सर्व अनुभव प्रत्यक्ष-परोक्ष इत्यादि सर्व साधनांनी बुद्धींत उतरून जो जाणीवरूपी परिपाक बनला त्याचें नाव विद्या.

यावरून दिसून येईल की, शास्त्र म्हटलें की, प्रामुख्यानें जर विवक्षित विषयावरील ज्ञान ज्यात व्यवस्थित मांडून ठेवलें आहे असा एखादा मान्य ग्रन्थ डोळ्यापुढे उभा राहिला तर त्यांत वावगें कांही नाही; कारण ग्रन्थ हेंच शास्त्राचें प्रमुख आणि मूर्त स्वरूप होय. विद्येचें मात्र तसें नाही. विद्या ही विद्वानाच्या बुद्धींत वास करणारी असून 'ज्ञान-विज्ञान-परिपाकात्मक अशी अमूर्त चीज आहे. मात्र ती मेरु पर्वतावर पडलेल्या अनुपयुक्त अथवा अनुपयोज्य सोन्याच्या राशीसारखी व्यर्थ मानण्याचें कारण नाही. कारण ती जर खरोखर जिवंत स्वरूपाची असेल, तर ती ज्याच्या ठायीं आहे त्या विद्वानाच्या हातून होणाऱ्या कार्यांच्या मिषाने बाहेर दिसून आल्यावांचून राहणार नाही. ती त्याच्या वक्तृत्वांत दिसेल, अथवा लेखनद्वारा प्रकट होईल, अथवा एखाद्या मूर्त कृतींत म्हणजे शिल्पात आपलें अस्तित्व आणि आपला विलास व्यक्त करील.

## शिल्प आणि कला

आता येथे वापरलेला जो शिल्प शब्द त्याच्याकडे थोडें लक्ष वेधणें अिष्ट आहे. 'शील् समाधौ.' शील् या धातूचा अर्थ सुखसमाधान प्राप्त करून देणें असा आहे. त्यापासून शिल्प शब्द व्युत्पादिलेला असून त्याचा अर्थ असा की मानवाच्या सुख-समाधानाकरिता केलेली जी काही मूर्त स्वरूपातली निर्मिति ती. अेखादें अुत्कृष्ट वेश्म* (म्ह. घर)– अर्थात् 'अुत्कृष्ट' शब्द सापेक्ष आहे– निर्माण केलें, अथवा अेखादें सुरेख चित्र काढलें, किंवा अेखादा सुंदर पुतळा घडविला, किंवा अेखादा पदार्थ मनोवेधक बनविला तर हीं सर्व शिल्पें होतील. हीं शिल्पें ज्याच्या हातून होतात तो शिल्पी; अर्थात् त्याच्या शिल्पामध्ये त्याच्या अंगच्या कलेचा आविष्कार साहजिकच होत असतो. ज्या मानाने ही कला अुत्कृष्ट दर्जाची दिसून येअील त्या मानाने कलावान जो शिल्पी त्याच्या बुद्धींत वास करीत असलेल्या विद्येची थोरवीहि बहुतांशाने अजमावितां येअील.

## ज्ञान आणि विज्ञान

विद्या संपादन करण्यासाठी शास्त्राचें जें परिशीलन करावें लागतें त्यांत प्रत्यक्ष-परोक्ष ज्ञान-विज्ञान हींहि संपादावीं लागतात. विज्ञान या शब्दाच्या अर्थाकडे जरा विशेष लक्ष पुरविलें पाहिजे; कारण या शब्दाचा पुष्कळच दुरुपयोग केलेला आढळून येतो. यासाठी आपण ज्ञान आणि विज्ञान याचा अन्योन्यसंबंध काय तें थोडेंसें अुदाहरणांनी पाहूं. पाण्यापेक्षा दूध घनतेंत अधिक असतें, ही अेक लहानशी ज्ञानाची बाब घेअूं. या बाबतींत अनेक बारकावे असूं शकतात, हें थोडया विचाराने सहज दिसून येणारें आहे. अुदाहरणार्थ, दुधादुधांत तरी कित्येक प्रकार असूं शकतात! पाण्यात सुद्धा परिस्थितिपरत्वें (अु० तपमान भिन्न असतां) कितीतरी भेद अुत्पन्न होअूं शकतात. आता हे सर्व बारकावे ध्यानात घेअून पुनः दुधाची घनता १·०३ अितकी असते, किंवा असावयास पाहिजे, ती घनता मापकाने मोजून निश्चित काढता येते, ती तितकी न भरल्यास त्या गोष्टीपासून काय अनुमानें काढणें योग्य; अित्यादि स्वरूपाचें जें ज्ञान– म्हणजे विविधता, विशिष्टत्व अित्यादि तपशिलाची ओळख बरोबर ठेवणारें जें ज्ञान– तें या बाबतींत विज्ञान होय. विज्ञान शब्दाचा अुपयोग वास्तविक अशा रीतीने करावयास पाहिजे असताना तो शब्द वास्तवशास्त्र या अर्थी लोक कसे योजूं लागले आणि तसें करण्यांत काय चूकभूल आहे आणि तें कोणत्या कारणाने अप्रशस्त आहे याचा विचार पुढील अेखाद्या लेखात करूं. प्रस्तुत लेखांत शास्त्र आणि विद्या या जोडीचा विचार मुख्यतः होअून तदनुषंगाने ज्ञान-विज्ञान यांचा थोडासा विचार झाला; आणि शिवाय कला, आणि शिल्प या जोडीच्या अर्थांचेंहि थोडेंसें दिग्दर्शन झालें.

आता अेक आराखडा (पृष्ठ ३३) मांडून दाखवितों. तो यासाठी की त्यावरून मुख्यतः भौतिक शास्त्रें कोणतीं आणि भौतिकेतर कोणतीं, त्यांचीं परस्पर नातीं कशीं लागतात, त्यांतून ठळक ठळक असे चारपाच व्यवसाय कसे गटरूपाने निष्पन्न झालेले दिसतात हें संक्षेपाने आणि एकदम नजरेत भरेल अशा रीतीने दिसून यावें.

---

* वास्तु या शब्दाचा अर्थ plot of land असा असल्यामुळे प्लॉट हा अिंग्रजी शब्द उसना घेण्याचे मुळींच कारण नाही. 'वेश्म' म्हणजे अिमारत. बिल्डिंग शब्द उसना घेण्याचें कांही कारण नाही. 'वेश्मभूर्वास्तुः' अमरकोश.




भौतिक शास्त्राचा गट दुहेरी चौकटींत. व्यवसायाचे मुख्य चार गट साध्या चौकटींत. १, २, ३, ४ अनुक्रमें Law, Agriculture, Medicine, Engineering.

---

## 'गाडीच्या रुपया'बद्दलचा खुलासा

महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेच्या जानेवारी १९४१ च्या अंकात ६१ पानावर 'गाडीचा रुपया' या मथळ्याचा लेख आहे. त्यात "गाडीचा रुपया म्हणण्याचें कारण रुपयावर गाडीचें चित्र असावें असें तर्कानें म्हणता येईल" असें म्हटलें आहे. पण तसा तर्क करण्याचें कारण नाही. पुष्कळ कागदात गाडी सुर्ती रुपया असाहि उल्लेख आढळतो. अिंग्रजांनी सुरतेस वखार घातल्यावर त्यानी नाणें पाडण्याचा अधिकार दिल्ली दरबारातून मिळविला असावा. ते रुपये सुरत या टाकसाळीच्या गावाच्या नावावरून सुरती या नावाने व्यवहारात आले. अु० चांदवडी, हुकेरी, पनाळी वगैरे. हा सुरती रुपया गाडीच्या चाकासारखा पूर्णपणें वाटोळा असल्याने त्यास गाडी किंवा गाडीचा म्हणूं लागले. हा रुपया खाली पडल्यास गडगडत जातो हा अनुभव आहेच. या गाडीसारख्या गतीनेहि गाडीचा असें नाव पडलें असेल. सात आण्यांचा खुर्दा चाकीचा याचाहि अर्थ अिंग्रजी नाणे तांब्याचे पैसे असा स्पष्ट आहे. त्या वेळीं बहुतेक ठिकाणीं शिवराअी पैसाहि चालत असे. त्याच्यापासून भेद दाखविण्यासाठी चाकीचा असें विशेषण योजिलेलें दिसतें. शके १७८६ म्हणजे १८६४–६५ साल येतें. त्या वेळीं सर्व अिंग्रजी नाणींच चालू असल्याने त्याचा निर्देश गाडी या शब्दाने केला आहे.

सुरतेस पाडलेले रुपये अेका आकाराचे, अेका कायम वजनाचे व कंपनी सरकारने पाडल्यामुळे राजाचा मुखवटा न छापतां वर तागडी छाप असलेले असे असत. चांदवडी वगैरे अितर नाण्यांच्या बाबतींत परीक्षा करण्यास सोनाराची गरज लागे. कारण चांदीचा कस

बदले व वजनांतहि फरक असे. म्हणून अेकंदर किंमत करण्याचें काम सोनाराशिवाय होत नसे. या अुलट सुरती रुपयातील चादीचें प्रमाण व वजन यांत फरक नसल्याने केवळ वाजवून आवाजाने खरा, खोटा कोणालाहि पारखता येअी. म्हणून अितर नाण्यांपेक्षा गाडी सुर्ती रुपये घेण्याची प्रवृत्ति पेशवाअीचा अस्त होण्यापूर्वीपासूनच वाढत चालली होती व अितर रुपयांचा भाव गाडी सुर्ती रुपयाच्या प्रमाणात ठरत असे. अु० १०० रु. सुर्ती गाडी = ११९ रु. चादवडी वगैरे.

नाणकसंग्रहात तो अिंग्रजी रुपया या नावाने नोंदला जाणार. गाडी रुपया हा त्याचा पर्यायशब्द नोंदला जाणे शक्य नाही. भास्करराव जाधव.

---

# जयकर-पारितोषिक-ग्रंथ

## मराठी व्युत्पत्तिकोश

१९३८ साली मुंबअी येथे भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनात स्वागतमंडळाचे अध्यक्ष न्या. मुकुंदराव जयकर याच्यातर्फे "मराठी व्युत्पत्तिकोश" हा ग्रंथ तयार करण्याकरिता रु. १००० चें पारितोषिक जाहीर करण्यात आलें होतें. व तें कार्य प्रसिद्ध साहित्यिक व ग्रंथकार श्रीयुत कृष्णाजी पांडुरंग उर्फ नानासाहेब कुळकर्णी, अेम्. अे., अेल्फिन्स्टन कॉलेजातील मराठीचे प्राध्यापक, ह्याजवर सोपविण्यात आले होतें. मध्यंतरीं प्रा. कुळकर्णी हे बरेच दिवस आजारी असल्यामुळे ग्रंथ तयार होण्यास थोडा कालावधि लागला. आता हा ग्रंथ संपूर्ण तयार झाला असून कोश व प्रस्तावना मिळून त्याची छापील ७००-८०० पृष्ठें होतील असा अंदाज आहे. आपल्या विद्वत्तेला व कीर्तीला साजेल अशाच रीतीने प्रा. कुळकर्णी यानी कोशाचें कार्य अत्यंत परिश्रमाने व हौसेने केलें आहे. संमेलनांत केलेल्या जाहीर घोषणेप्रमाणे पारितोषिकाची रक्कम न्या. जयकर ह्यानी प्रा. कुलकर्णी याना नुकतीच दिली आहे.

अशा रीतीने साहित्य संमेलनाच्या अधिवेशनात पारितोषिक जाहीर करून अेका अुत्कृष्ट व अत्यंत अुपयोगी ग्रंथाची भर टाकण्यास कारणीभूत झाल्याबद्दल महाराष्ट्रातील सुविद्य जनता न्या. जयकर याची सदैव ऋणी राहील.

"मुंबअीस भरलेलें साहित्य संमेलन मुंबअी मराठी साहित्य संघातर्फेंच भरविण्यांत आलें असल्यामुळे अेका अर्थी हा ग्रंथ मुंबअी साहित्य संघानेच पुरस्कृत केला आहे असें म्हणता येअील, तेव्हा तो छापून प्रसिद्ध करण्याचें कार्य साहित्य संघानेच आपल्याकडे घ्यावें" अशी विनंती प्रा. कुलकर्णी यानी साहित्य संघाच्या चालकाकडे केली आहे. अेवढी आर्थिक जबाबदारी अंगावर घेणें साहित्य संघाला शक्य न झाल्यास प्रा. कुलकर्णी हा ग्रंथ स्वतःच्या जबाबदारीवर छापून प्रसिद्ध करतील.

संमेलनाच्या अधिवेशनात जाहीर घोषणा करण्यास निमित्तमात्र झालेल्या माझ्या-सारख्या संमेलनाच्या अेका कार्यकर्त्याला घोषणा फलद्रूप झाल्याचें दृश्य पाहून आनंद वाटणें स्वाभाविक आहे. पण त्याचें सर्व श्रेय अर्थातच न्या. बाबासाहेब जयकर व प्रो. नानासाहेब कुलकर्णी ह्यांच्याकडेच आहे.

१९।२।४१

दत्तो अप्पाजी तुळजापुरकर
कार्याध्यक्ष
महाराष्ट्र-साहित्य-संमेलन, मुंबअी

# गेल्या वर्षांतील अध्यक्षीय भाषणें



(लेखक— श्रीकृष्ण केशव क्षीरसागर)

अध्यक्षीय भाषणें म्हणजे वर्षांतील विचारांदोलनांचीं प्रतिबिंबें होत, असें गेल्या वर्षांतील विविध वाङ्मयसम्मेलनाच्या अध्यक्षीय भाषणासंबंधी म्हणता येतें ही आनंदाची गोष्ट होय. कारण, हेच उद्‌गार काही वर्षांमागील भाषणासंबंधी काढता आले असतेच असें नाही. आमचे वाङ्मयीन नेते केवळ शाश्वत तत्त्वाचे संरक्षक व गायक न राहतां जिवंत विचारप्रवाहांचे प्रतिनिधि व नियामक होत आहेत हें आमच्या वाङ्मयीन पुरोगामित्वाचें व चैतन्याचें चिह्न होय.

गेल्या वर्षांत प्रो. फडके, रा. माडखोलकर, रा. खांडेकर व रा. (पुरुषोत्तम यशवंत) देशपांडे या साहित्यिकानी वेगवेगळ्या परिषदांत अध्यक्ष म्हणून भाषणे केलीं. या भाषणांत तीन तऱ्हांच्या विचारप्रवाहाचें स्वरूप पाहावयास सापडते. पहिलें म्हणजे प्रचलित महाराष्ट्रीय विचारप्रवाहाचें, दुसरें म्हणजे जागतिक विचारप्रवाहाचें व तिसरें म्हणजे या दोन्ही प्रबळ प्रवाहांना वळण लावणाऱ्या आमच्या वैचारिक पुढाऱ्यांच्या वैयक्तिक विचारप्रवाहाचें. यांपैकी पहिलें (प्रो. फडके यांचें रत्नागिरी साहित्य संमेलनातील) भाषण पहिल्या दृष्टीने म्हणजे महाराष्ट्रीय विचारप्रवाहाचें प्रतिबिंब या दृष्टीने महत्त्वाचें आहे. या भाषणात त्यानी अितर साहित्यापेक्षा वृत्तपत्रीय साहित्यावर विशेष भर दिला हें कालौघास धरूनच होतें. ग्रंथरूप साहित्यापेक्षाहि आज वृत्तपत्रीय साहित्याच्या ठिकाणीं राष्ट्रीय विचाराना बरें वाअीट वळण लावण्याचें सामर्थ्य पूर्वी केव्हाहि नव्हतें अितकें येअून बसलें आहे. अशा स्थित्यंतराच्या क्षणीं या प्रबल विचारसाधनाचें शुद्धीकरण करण्याची कामगिरी प्रो. फडके यानी आपल्या प्रसादपूर्ण व वक्तृत्वपूर्ण वाणीने योग्य तऱ्हेने केली. आमचीं दैनिकें अशुद्ध भाषांतरानी भरलेलीं गबाळ बातमीपत्रें होत आहेत व साप्ताहिकें हीन अभिरुचीचा अखंड सप्ताह चालविणारीं नियतकालिके होत आहेत अशी धोक्याची सूचना कोणीं तरी देणें आवश्यकच होतें. आणि तें साहित्यसम्मेलनाध्यक्षाच्या अधिकारपदावरून झालें हें सर्वस्वीं युक्तच झालें. तथापि या भाषणानेच आमच्या साप्ताहिक सृष्टीस जवळ जवळ वर्षभर चर्चा-विषय पुरविले !

तथापि प्रो. फडके यानी केलेल्या टीकेंत अवास्तव अथवा अतिरिक्त असें काहीच नव्हतें. आणि त्यांनी आमच्या वृत्तपत्रसंस्थेपुढे ठेवलेलें अमूर्त विश्वविद्यालयाचें ध्येय सर्वथा श्लाघ्य आणि चिरस्मरणीय असेंच आहे. स्वतः प्रो. फडके यांचें ग्रंथरूप वा नियतकालिक वाङ्मय त्याच्याच अुच्च घोषणेच्या कसोटीस अुतरत नाही, हाच जर त्यांच्यावरील टीकेचा प्रमुख रोख असेल, तर त्या टीकेंतूनहि त्याच्या रत्नागिरी येथील ध्येयवादास मंजूरीच मिळत आहे. सारांश, प्रो. फडके याच्या विशाल वाङ्मयाच्या स्वरूपाविषयी केवढाहि वाद माजला तरी त्यांचें गेल्या वर्षीचें अध्यक्षीय भाषण आमच्या वृत्तपत्रसाहित्यास सर्वस्वीं मार्गदर्शक असेंच झालें.

वृत्तपत्रीय साहित्याबरोबर त्यांनी ग्रंथरूप साहित्यालाहि रोगट व गलिच्छ, वळण सोडून बलिष्ठ व तेजस्वी होण्याचा संदेश दिला आहे व शेवटीं जें पुरोगामी तें तेजस्वी, व जें तेजस्वी तें पुरोगामी अशा काहीशा दुतर्फी, अतअेव संदिग्ध, स्वरूपात पुरोगामित्वाचा पुरस्कार केला आहे. पुरोगामित्वाची व्याख्या करणें ही सोपी गोष्ट नाही हें स्वतः प्रो. फडके यानीहि ध्वनित केलें आहे. तथापि, केवळ 'पुढे' ( कालाच्या दृष्टीने असो कीं यांत्रिक प्रगतीच्या दृष्टीने असो ) म्हणजे पुरोगामित्वाकडे असें म्हणण्याअितकें संकुचितत्व किंवा मताधत्व त्याच्या भाषणांत दिसत नाही ही आनंदाची गोष्ट होय. ते म्हणतात, "आपला देश व समाज मानवी संस्कृती-च्या अितिहासाच्या अशा अेका ठिकाणीं येअून अुभा आहे कीं, त्यानं वाटेल त्या दिशेला तोंड फिरवावं ही शक्यता आता अुरलीच नाहीं... शास्त्रीय विज्ञानावर आधारलेले नीति-नियम, बुद्धिप्रामाण्य आणि शुद्ध लोकशाही अित्यादि तत्त्वाकडे तोंड करून आपला समाज आजघटकेला अुभा आहे. आपल्या समाजाला अेक नष्ट तरी झालं पाहिजे किंवा *पुढं म्हणजे या दिशेनं गेलं पाहिजे."

प्रो. फडके यांच्या पुरोगामित्वांत अितिहासप्रधान मार्क्सवाद व बुद्धिप्रामाण्य, विज्ञान-प्रेम वगैरेंचें मिश्रण आहे. पण प्रस्तुत लेखकाच्या मतें मार्क्सवाद, विज्ञान-भक्ति, वगैरे नूतन-जात श्रद्धा बुद्धिप्रामाण्याशीं सर्वंशा सुसंगत नाहीत ' या दृष्टीने प्रो. फडके यांची पुरोगामित्वा-ची कल्पना जुन्या भोळसरपणाप्रमाणेच नवीन भक्तिभावापासूनहि अलिप्त आहे कीं नाही याविषयी त्यांच्या पुढील अेखाद्या भाषणात खुलासा झाल्यास पुष्कळांस समाधान वाटेल.

यानंतरचीं अध्यक्षीय भाषणें म्हणजे रा. माडखोलकर आणि रा. खांडेकर यांचीं होत. रा. माडखोलकर यानी पुणें येथील शारदोपासक संमेलनप्रसंगीं वृत्तपत्राची भूमिका स्पष्ट करून प्रो. फडके यास मुख्यत्वेंकरून अुत्तर दिलें. त्याच्या मतें, वृत्तपत्रें हीं लोकमताचीं नियंत्रक म्हणण्यापेक्षा निदर्शक म्हणता येतील. आज महान् नेता नसल्यामुळे लोकमत व वृत्तपत्रें दोन्हीहि "अधोऽधो—" वाहवत आहेत; अर्थात् दोष वृत्तपत्राचा नाही. यात त्यांनी वृत्तपत्रांचें अधःपतन मान्य करून प्रो. फडके यांच्या भाषणासच पर्यायाने मान्यता दिली. पण त्यानीं मांडलेल्या आणखी अेक-दोन महत्त्वाच्या मतास वृत्तपत्रचालकहि मान्यता देतील कीं नाही सागतां येत नाही. वृत्तपत्रें महान् नेत्याची जागा भरून काढणार नाहीत; पण त्यानी सामान्य शिक्षकाची व सद्विचारी स्नेह्याची जागा देखील कां घेअूं नये हें समजत नाही. तसेंच आज वर्तमानपत्राना व विशेषतः साप्ताहिकांना जें चटोर वळण लागलें आहे तें लोकाच्या अिच्छेवरून लागलें आहे असें म्हणणें हें केवळ अ'वास्तव'च नव्हे, तर अन्यायाचेंहि होअील. रा. खाडेकर यानी तर (दक्षिण महाराष्ट्र सम्मेलन-प्रसंगीं) साप्ताहिकें हीं सप्ताहाच्या अंतीं (शनिवारीं, रविवारीं) निघतात हें त्याच्या चटोर वळणाचें 'खोल' कारण म्हणून दाखविलें आहे. लोक चटोर आहेत, ते शनिवारीं-रविवारीं जास्त चटोर होतात व त्यास पैसे देअून छापील चटोरपणा घेण्याअितकें चटोरपणाचें दुर्भिक्ष्य पडलेलें असतें वगैरे गोष्टींवर लोकाचा विश्वास बसेलसें वाटत नाही. चुरचुरीतपणा व चटोरपणा यांतील अंतर; तसेंच, अेखाद्या प्रश्नाची चटोर मांडणी व मुळातच चटोर विषय यातील अंतर हीं लक्षांत घेतल्यास मनोरंजकता व चुरचुरीतपणाहि कायम ठेवून वर्तमानपत्रें अधिक निर्कोप विचार मांडूं शकतील असें कबूल करावें लागेल. रा. माडखोलकराच्या मुंबअी-साहित्य-संमेलनांतील

*मुळांत या शब्दांस ( मोठा टाअिप घालून ) प्राधान्य दिलेलें नाही.

भाषणाचा विशेष म्हणजे भाषाविषयक राजकारणावर, किंबहुना मुलुखगिरीवर, भर हा होय. मुंबअी शहराची महाराष्ट्रापासून फारकत होअूं देता अुपयोगी नाही असें त्यानी बजावलें. प्रत्यक्ष राजकीय फारकतीचा प्रश्न साहित्यबाह्य आहे. तरी मुंबअींत मराठीचें अग्रस्थान टिकविणें हा प्रश्न साहित्य-प्रांतांतील, निदान भाषाविषयक राजकारणातील, खासच आहे. पण याला भाषेसंबंधी व लोकसंख्येसंबंधी जागृत राहणें हा अुपाय पुरेसा नाही. मराठ्याचें बाहुल्य मुंबअीचें 'मराठ'पण राखूं शकेलच असें नाही; अुलट, मराठ्याचें प्राबल्य (व्यापारात किंवा कोणत्याहि क्षेत्रांत महत्त्व) असल्यास मुंबअी राजकीय दृष्ट्या विभक्त झाली तरी, मुंबअींत मराठीची गळचेपी करणें कठीण जाअील.

पण मुंबअी ही जातिभेदातीत असल्यामुळे तीच महाराष्ट्राच्या अुदार संस्कृतीचें केंद्र होअील, हें रा. माडखोलकर यांचें म्हणणें तितकेंसें मान्य होणार नाही. मूळचेंच अुदार व जातिहीन शहर केन्द्र करून राष्ट्र अुदार करण्यापेक्षा त्यातल्या त्यात अभिमानी व आग्रही शहर अुदार करणें, हें राष्ट्र सुसंस्कृत करण्याच्या दृष्टीने अधिक खरें यश होय. मुंबअी तर जातिहीन व अुदार आहेच; पण पुणें अुदार व जात्यहंकाररहित झालें म्हणजे महाराष्ट्र पुढे गेला असें म्हणतां येअील.

याच भाषणांत रा. माडखोलकर यानी जागतिक घडामोडी व वैज्ञानिक क्रान्ति यांतून नवा समाज निर्माण होणार आहे व यातूनच वाङ्मयाला नवीन स्फूर्ति मिळावयास हवी अशी घोषणा केली आहे. भूतकालांतील अुदात्त घटनाप्रमाणेच भविष्यकालातील भव्य आशामधून स्फूर्ति मिळूं शकते, हें खोटें नाही. तथापि जोपर्यंत जागतिक घडामोडींचा व आपला फक्त वर्तमानपत्रांतूनच संबंध येत आहे, तोपर्यंत त्या घडामोडींतून स्फूर्ति घेणें अेतद्देशीय लेखकास तितकेंसें स्वाभाविक होणार नाही. जगाच्या घडामोडींस वळण लावण्याअितकें स्वतंत्र अस्तित्व असल्याखेरीज भावी मानव्याचीं व शुद्ध लोकशाहीचीं प्रतिबिंबें आमच्या वाङ्मयात दिसणें म्हणजे केवळ अनुकरणात्मक वाङ्मयाचा आणखी अेक प्रकार चालूं होणें होय.

यापुढील महत्त्वाचें अध्यक्षीय भाषण म्हणजे रा. देशपाडे यांचें अुज्जयिनी येथील भाषण. त्यानी आपल्या 'विवेचनास वाङ्मय आणि वास्तवता' हें नाव दिलें होतें. कलेंतील वास्तवता आणि शास्त्रीय वास्तवता वेगळ्या होत या सर्वमान्य सिद्धान्ताचें त्यानी खोल व आवेशयुक्त विवेचन केलें आहे. रा. देशपाडे यानी केलेलें 'वास्तवते'संबंधाचें विवेचन तर्कशुद्ध व तत्त्वगंभीर आहे. तथापि शास्त्रातील वास्तवता व कलेंतील वास्तवता, अथवा व्यावहारिक वस्तुदर्शन आणि भावनात्मक वस्तुदर्शन, यात अंतर आहे; हें सर्वथायुक्त असें तत्त्व अितक्या अट्टाहासाने का माडावें लागलें, हें समजण्यास या वादाचा अितिहास लक्षात घेतला पाहिजे. रा. देशपाडे यानी वास्तवतेसंबंधी केलेलें विवेचन म्हणजे पुरोगामी वाङ्मय या अभिधानाखाली गेल्या पाच वर्षांत महाराष्ट्रात अुत्पन्न झालेल्या विचारप्रवाहाचेंच केलेलें सखोल परीक्षण होय.

पण ज्यांनी पुरोगामित्व आणि वास्तवता याचे काही पंथविशेषानुसारी अर्थ प्रथम बसवून नंतर त्या संज्ञाचा अुच्चार महाराष्ट्रात पांच वर्षांमागे प्रथम सुरू केला, त्यास रा. देशपाडे याची वास्तवतेची व्यापक व्याख्या पटण्याचा मुळीच संभव नाही. जें प्रयोगशाळेंत किंवा सिलॉजिझमूने सिद्ध करता येत नाही तें सर्व काल्पनिक, अद्‌भुत, सब्जेक्टिव्ह, मिस्टिक् असें म्हणून टाकाअू ठरविणारास रा. देशपाडे याची 'वास्तवता' कशी मानवणार ! आणि ज्याचें वस्तुनिष्ठ वर्णन करणें अशक्य असें 'अनुभवाच्या साकल्यांतून निघणारें कलात्मक कैवल्य' हेंहि

वास्तववादीच म्हणावयाचें ठरल्यास धार्मिक आणि गूढानुभववादी वाङ्मय त्यांत साकल्यात्मक अनुभूति असूनहि आधुनिक काळांत प्रतिगामी म्हणून टाकाअू कसें ठरवितां येणार ? सारांश, कलावंतांच्या अनुभूतीला वास्तवतेंत स्थान द्यायचें म्हटल्यास मार्क्सपंथीय जडवादी व विज्ञानभक्त तें मान्य करतीलसें वाटत नाही.

तात्पर्य, व्यक्तिगत अनुभूतीला व अन्तःप्रत्ययाला वास्तवतेंत स्थान देणें, किंबहुना, तीच अधिक जिवंत वास्तवता मानणें, यासंबंधीं कलेच्या प्रांतांत वाद माजण्याचा मुळीच संभव नाही; कारण तो तर कलेचा प्रस्थान-बिन्दु आहे. तरी या प्रकारच्या अुच्चतर अनुभवात्मक वास्तवतेला मान्यता देणारांस मार्क्सवादाचा त्याग करावा लागेल कीं काय, यासंबंधी मात्र मोठाच मतभेद अुरेल. अर्थात् रा. देशपाडे यानी ज्या वादास "**कलेंतील वास्तवता कोणत्या स्वरूपाची असावी ?**" या प्रश्नांत बसविलें आहे, तो वाद वस्तुतः "**कलेतील वास्तवता ही मार्क्सवाद्यांस मान्य करतां येईल काय ?**" या स्वरूपाचा आहे. म्हणजे रा. देशपाडे यांनी केलेलें विवेचन कलावन्तांच्या कलाक्षेत्रांतील अडचणींतून निघालेलें नसून विशिष्ट पंथाच्या अनुयायांस कलेसंबंधी उत्पन्न झालेल्या अडचणींतून निघालेलें आहे.

ज्यांनी पुरोगामित्व आणि वास्तवता याना विशिष्ट अर्थ देअून पुरोगामी वाङ्मयाच्या चळवळीस प्रारंभ केला, ती मंडळी रा. देशपाडे यास जिव्हाळ्याच्या वाटणाऱ्या विशिष्टानुभूतिरूप वास्तवतेस मान्यता देतीलसें वाटत नाही. अुलट, रा. देशपाडे हेहि कलेंतील चतुर्गुणात्मक साकल्य (नेहरूंच्या भाषेंत म्हणजे असाधारण अनुभूति अथवा vision) अध्यात्मानुभवापर्यंत पोहोंचल्यास त्यास मान्यता देतील असा रंग दिसत नाही. म्हणजे भौतिकवादाच्या आड आल्यास, new synthesis आणि नव्या जाणिवेचें नवें क्षितिज कितीहि भव्य आणि प्रगतिपद असलें तरी त्याचा स्वीकार करण्याची त्यांची तयारी दिसत नाही.

अर्थात् रा. देशपाडे हेहि पूर्वीच ग्रहण केलेल्या मताखातर, अुदाहरणार्थ भौतिकवादाखातर, नवीन अनुभवावर पाणी सोडावें म्हणतात; अितर मार्क्सवादीहि त्याच्या आवडत्या सिद्धान्ताखातर तेंच करीत होते व तेंच करीत आहेत; अध्यात्मानुभव हें वास्तवतेचें व प्रगतीचें क्षितिज असूं शकेल असें म्हणण्याची दोघांचीहि तयारी नाही.

कलेच्या प्रांतातील क्षणिक आणि अस्फुट अनुभूतीहून अुच्चतर व चिरंतन अनुभूतीला मार्क्सवादी अुद्या मान्यता देणार नाहीतच असें नाही. तथापि आज तरी रा. देशपाडे यांच्यासारखे अुदार मार्क्सवादीहि वास्तव अनुभूतीच्या सदैव वाढत्या क्षितिजास भौतिकतेचें कुंपण घालीत आहेत व अुच्चानुभूतींचा सूक्ष्म अुगम स्थूल सामाजिक संघर्षांतच सांपडला अशी समजूत करून घेत आहेत हें नाअिलाजाने नमूद करावें लागतें. तथापि दिवसेंदिवस मार्क्सवादी प्रत्येक क्षेत्रात अितकें सूक्ष्म व अितकें निरंकुश सत्यशोधन करीत आहेत* की थोडी परिभाषा बदलून व सत्याकलनावर थोडा भरहि घालून ते अुद्या कलात्मक अनुभूतीहून अुच्चतर अनुभूतीस वास्तवतेस स्थान देणार नाहीतच असें नव्हे.

वाङ्मयांतील पुरोगामित्वाची व वास्तवतेची चळवळ ही अशा प्रकारें एका अुच्चतम new synthesis च्या विरुद्ध आगाअूच वचनबद्ध होअून बसत आहे व या चळवळीच्या अुपरिनिर्दिष्ट संकुचितत्वाबद्दल तिच्या प्रारंभापासूनच प्रस्तुत लेखकासारख्यांनी हाकाटी केलेली

* या दृष्टीने नुकताच दिवंगत झालेला कम्यूनिस्ट ग्रंथकार क्रिस्टॉफर कॉडवेल याचे ग्रंथ सर्व सत्यभक्तांस कम्यूनिझमविषयी नवीन आशा देतील.

होती; पुरोगामित्वाची चळवळ म्हणजे वाङ्मयावर अेका विशिष्ट मताची, सामान्य जड-वादाची अथवा (मार्क्सवादासारख्या) विशिष्ट जडवादाची बंधनें लादण्याची चळवळ होय, निदान तिचें तें अवश्य असें प्रथमांग होय, असें प्रस्तुत लेखकाने या चळवळीच्या जन्मकाळी प्रगति, सह्याद्रि वगैरेंतून मांडलें होतें.

रा. जावडेकर यांनी गेल्या 'लोकशिक्षण'मधील लेखात रा. देशपांडे यांच्या वास्तव-वादातील अध्यात्मविरोध व तन्मूलक अपुरेपणा व संकुचितपणा निःसंदिग्धपणें दाखवून दिला आहे. यावरून पुरोगामी साहित्याच्या १९३६ सालच्या जाहीरनाम्यास ज्यानी मान्यता दिली अशा अनेक साहित्यिकांस पुरोगामी चळवळीचें जडवादाग्रही स्वरूप आता दिसून आलें असे म्हणण्यास हरकत नाही.

पुरोगामित्वाची व वास्तवतेची कल्पना अधिक व्यापक व शास्त्रशुद्ध होण्यास आधुनिक कालातील लेखकाची तीव्रतर सामाजिक जाणीव व मानवी प्रगतीसंबंधीची आच याच्या खऱ्या स्वरू-पाचें परीक्षण व्हावयास हवें. व तें करतांना सामाजिक विरोधाच्या जाणीवेंतूनच कलाकृति निर्माण होते, नवी जाणीव भौतिकच असली पाहिजे, वगैरे पूर्वकल्पना सोडल्या पाहिजेत. या दृष्टीने वास्तवता व प्रगति या कल्पनावरील आधुनिकाच्या कटाक्षाचें निरीक्षण केल्यास कलावन्त आणि संत यात रा. जावडेकर यानी कल्पिलेल्या पायऱ्याचा क्रमहि तितकासा अभेद्य राहणार नाही. अेका जुन्याच पाश्चात्य टीकाकाराने काव्य हें आधुनिकाच्या धर्माची जागा पटकावीत आहे असें म्हटलें आहे. त्याचप्रमाणे आधुनिक वास्तववादी आणि मानव्यवादी कलेच्या स्वरूपाचें पंथनिरपेक्ष परीक्षण केल्यास, कलावन्त हे सन्ताची जागा घेत आहेत असें म्हणावें लागेल. आजची कला शास्त्राना भीत नसून शास्त्रें पचवून अधिक टवटवीत होत आहे, तसेंच, ती धर्मापुढे अपराधिनीप्रमाणे अधोमुखी अुभी न राहता धर्माची साहाय्यकर्ती म्हणून मानाने अुभी आहे. स्वतःच्या दुःखांनी ज्याना नवी "जाणीव" (नवी दृष्टि) प्राप्त झाली व आधुनिक युगाच्या दुःखांनी ज्याना नवा धर्म प्राप्त झाला असे टॉलस्टॉय, रोमाँ रोलाँ, टागोर, ड्युअे, क्यूप्रिन याजसारखे साहित्यिक प्रगत युगाचे प्रगत संत ठरत आहेत हेंहि अशा पंथनिरपेक्ष परीक्षणात दिसून येअील. पण अशी प्रगत कला निर्माण करण्यासच नव्हे, तिचें स्वरूप ओळखण्यासहि, विशिष्ट मताचीं कुंपणें ओलाडून नव्या क्षितिजाची नवी जाणीव स्वीकारण्याचें आध्यात्मिक धाडस केलें पाहिजे.

---

# निवेदन

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या विद्यमानें तिच्या पत्रिकेंतून अशा प्रकारचें 'वार्षिक समालोचन' हें प्रथमच प्रसिद्ध होत आहे. हा नवा उपक्रम कोणालाहि अभिनंदनीय वाटेल.

परिषदेचीं नियत कार्यें वेळच्या वेळीं व सुव्यवस्थितपणें अुरकण्याच्या कामीं संस्थेचे चिटणीस रा. र. लु. जोशी यांनी अुत्तम यश मिळविलें आहे. त्यांच्यासारखा अुत्साही, परिश्रमी, आस्थेवाअीक कार्यवाह संस्थेला लाभला म्हणूनच हें यश तिच्या पदरांत पडत आहे.

तीच गोष्ट 'साहित्य पत्रिके'च्या संबंधात अुत्साही संपादक रा. के.ना.काळे याच्यामुळे होत आहे. तथापि या संस्थेच्या व तिच्या पत्रिकेच्या अुपयुक्त कार्याविषयी अितर अनेक अपेक्षा तिचे हितचिंतक बाळगतात. आणि प्रस्तुतच्या वार्षिक समालोचनाने त्यातील एक अपेक्षा पुरी होत आहे असें म्हणण्यास हरकत नाही.

साहित्य परिषदेचें मुख्य नियत काम मामुली स्वरूपाचें आहे. तें म्हणजे कचेरी चालविणें, हिशेब ठेवणें, समासद मिळविणें, वर्गण्या वसूल करणें, देणग्या मिळविणें, निवडणुकी करविणें, मुख्य मंडळ व अुपमंडळें याच्या सभा भरविणें, साहित्यपत्रिका प्रसिद्ध करविणें अित्यादि. पण यापलीकडे जाअून वेळोवेळीं नैमित्तिक चर्चासभा व स्नेहसंमेलनें भरविणें, उचित सत्कारसमारंभ करणें हीं कार्यें नियत म्हणता येत नाहीत, म्हणजे अैच्छिक स्वरूपाचीं असतात. पण रा. जोशी याच्या अुत्साही योजकतेमुळे तींहि सुरू आहेत.

याशिवाय साहित्यविषयात अभ्यासक्रम ठरवून देअून विद्यार्थ्यांच्या परीक्षा घेअून प्रशस्तिपत्रें देणें हें काम आज दोन वर्षे सुरू आहे.

याशिवाय व्याकरणसमिति, परिभाषासमिति अित्यादि अुपमंडळें नेमण्यात आलीं असून त्याचें काम समाधानकारकपणें चालू आहे हें सांगण्यास आनंद वाटतो.

वर्षभर सभासदाना मधून मधून संस्थेची आठवण करून देण्याचें साधन साहित्य पत्रिका हें होय. तीत येणारें साहित्य, चर्चेला व मराठी भाषेच्या अभ्यासाला अुपयोगी असेंच ठेवण्याचा प्रयत्न करण्यात येतो.

साहित्यपरिषदेस स्वतःचें असें ग्रंथालय पाहिजे. ती अुणीव कै. माधवराव पटवर्धनाचें स्मारक म्हणून जी अिमारत होअील त्या प्रसंगीं, काही त्या स्मारकनिधीच्या व काही स्वतः परिषदेच्या पैशाने लवकरच दूर होअील अशी आशा आहे. मात्र ग्रंथभांडार सजविण्याअितकें द्रव्यबळ आज संस्थेजवळ नाही.

तथापि स्वतःचा ग्रंथसंग्रह नसला तरी या वार्षिक वाङ्मयसमालोचनाचें काम या संस्थेस करिता येण्यासारखें आहे. आणि साहित्यपत्रिकेच्या या अंकात तोच अुपक्रम सुरू केलेला आढळून येअील. या अुपक्रमालाहि पुस्तकाची आवश्यकता असतेच, परंतु ती नड पुण्यात अितर रीतीने भागूं शकते.

समालोचनाचें हें कार्य यशस्वी व्हावयाचें तर त्या कामाला लायख असे साहित्यिक हवेत, व फिरून हें काम स्वतःच्या हौसेने व साहित्यपरिषदेच्या प्रेमाने करणारे हवेत. तसे सहायक प्रस्तुत प्रसंगीं परिषदेला लाभले हें सांगण्यास आनंद वाटतो, आणि सा.प.च्या वतीने मी त्यांचे आभार मानतों. अशा प्रकारचे सहायक प्रतिवर्षी लाभत गेले तर हा अुपक्रम पुढेहि अखंड चालवावा अशी अिच्छा असून ती सफळ होअील अशी आशा वाटते.

न. चिं. केळकर

१।४।४१ — अध्यक्ष, महाराष्ट्र साहित्य परिषद्

# अि. स. १९४० चें सांवत्सरिक साहित्य-समालोचन



## भौतिक शास्त्रीय वाङ्मय

गेल्या वर्षी मराठींतून प्रकाशित झालेल्या भौतिक शास्त्रीय वाङ्मयाचा आढावा घेण्याचें काम काही अंशीं सोपें आहे. अशा वाङ्मयाचे अर्थातच दोन भाग पडतात. अेक भाग निर निराळ्या कालिकांतून वर्षभर प्रकाशित होत राहिलेल्या वाङ्मयाचा, आणि दुसरा म्हणजे स्वतंत्रपणें, ग्रंथरूपात, प्रसिद्ध झालेल्या वाङ्मयाचा. या दोन्ही भागाचा विचार करावयाचा म्हटलें तरी विस्तार फारसा मोठा नाही, अल्पसाच आहे. कालिकेंच प्रथम चाळावयाला घेतलीं तर सहजच कोणाचेंहि लक्ष्य 'अुद्यम' मासिकाकडे जातें. त्यात अुद्योगधंद्याविषयी काही माहिती येत असते. आरोग्य-वैद्यकाविषयीचींहि ४-५ कालिकें आपल्या अिकडे आहेत. तीं सर्व बाजूला काढलीं म्हणजे 'सृष्टिज्ञान' हें अेकटें अेकच मासिक मराठींत असें आढळतें की जें सर्वस्वीं भौतिक शास्त्रानाच वाहिलेलें आहे. या प्रकारच्या वाङ्मयाचें प्रकाशन मराठींतून होत राहण्याला परिस्थितीची जी अनुकूलता पाहिजे ती विशेषशी अुपलब्ध नसताना देखील ज्या चिकाटीने 'सृष्टिज्ञान' मासिकाचें कार्य गेलीं तेरा वर्षे चालू आहे ती चिकाटी आणि तें कार्य, दोन्ही, अभिनंदनीय आहेत. सह्याद्रि, चित्रमयजगत्, प्रावीण्य वगैरेसारख्या कित्येक मासिकांतूनहि प्रसंगोपात्त भौतिकशास्त्रविषयक लेख आलेले आहेत. 'पत्रिकें'तूनहि ते आलेले आहेतच.

दुसऱ्या म्हणजे ग्रंथरूपाने पुढें आलेल्या वाङ्मयाचासुद्धा विस्तार मोठासा डोळ्यात भरण्याजोगा नाही. १९४० सालीं जीं अेकंदर पुस्तकें प्रसिद्ध झालीं त्याची अेक सरकारी यादी आम्हाला पाहावयाला मिळाली. आमच्या माहितीप्रमाणे या यादींत ३-४ पुस्तकें यावयाचीं राहून गेलीं आहेत; तीं बहुधा त्या पुस्तकाचें प्रकाशन वर्षअखेरीस झाल्यामुळे किंवा अितर अशाच कारणामुळे राहिलीं असावींत. हीं पुस्तकें यादींत मिळवलीं तरीसुद्धा अेकंदर संख्या जेम तेम २५ च भरते. वर्गवारी केली तर ७-८ पुस्तकें वैद्यकीय आणि आरोग्यविषयक दिसतात; सुमारें तितकीच संख्या कृषि आणि किरकोळ अुद्योगधंद्याविषयींच्या पुस्तकाची असून १ संगीतविषयक, १ शालेय क्रमिक, २-३ किरकोळ, आणि जेमतेम ५-६ च पुस्तकें अशीं आहेत की ज्याचा थोडाफार संबंध भौतिकशास्त्राशीं आलेला आहे.[1]

ज्या वर्षीतलें हें वाङ्मय आहे त्या सर्व वर्षभर, आणि तत्पूर्वी चार महिने, पृथ्वीपाठीं कोठे तरी अेक महायुद्ध चालू होतें, त्यांत अनिच्छेनेच का होओीना, आपणहि गुंतविले गेलो, अद्यापि आहोंत. ही गोष्ट ध्यानात घेतली तर, या काळात, कोणाहि जिज्ञासूची पहिली अिच्छा असणार ती ही की आपल्याला, आपल्या भाषेतून, युद्धातल्या शस्त्रास्त्राविषयी आणि अितर साधनसामग्रीविषयी भरपूर माहिती वाचावयाला मिळावी. हीं शस्त्रास्त्रें कशा प्रकारचीं असतात, तीं कशीं बनविलीं जातात, त्याच्यामागे शास्त्रीय तत्त्वें कोणतीं आहेत; तसेंच संरक्षणाचीं

---

१ ही वर्गवारी बहुतांशीं पुस्तकाच्या नांवांवरून आणि त्यांतलीं जीं थोडीं पुस्तकें आमच्या वाचनांत येअुं शकली त्यांवरून करावी लागली आहे. यादींतलें एकहि पुस्तक 'परिषदे'कडे भेटीदाखल किंवा अभिप्रायासाठी आलें नाही. पुण्यांतल्या प्रमुख वाचनालयांतूनसुद्धां त्यांतलें जेमतेम एखादुसरेंच पुस्तक आढळलें.

साधनें कोणकोणतीं आहेत, तीं कोणत्या शास्त्रीय तत्त्वांवर आधारलेलीं आहेत, अित्यादि गोष्टीं-विषयीं मिळेल तितकी माहिती आजकाल आपल्याला हवी असते. अशी स्थूल माहिती देणारे चारदोन लेख मराठींतून प्रसिद्ध झालेले दाखवून देतां येतील; पण ते देखील चारदोनच. अेरव्ही, सर्वसाधारण प्रवृत्ति पाहता असें दिसतें की सरकारी नियंत्रणातून गाळून चाळून मिळालेल्या युद्धवार्तांच्या साह्याने दररोज आणि प्रतिसप्ताह यूरोपातील राजकारणाचे धागेदोरे धुंडाळण्यात आपल्याकडील विचारवंतांनी जी श्रद्धा आणि चिकाटी दाखविली तिचा अेक-शतांशहि युद्धाच्या भौतिक विभागाला लाभूं शकला नाही. आमच्या म्हणण्याचा रोख थोडासा ध्यानात यावा म्हणून, केवळ अुदाहरणासाठी, 'चित्रमयजगत्'च्या जाने. १९४० आणि जाने. १९४१ च्या महायुद्धविशेषांकाकडे बोट दाखवतां येअील. यातल्या पहिल्या अंकांत युद्धाच्या भौतिक अंगाविषयीं अेकहि लेख नाही. दुसऱ्या अंकात 'वैमानिक युद्ध', 'अिंग्लंडचें अजिंक्य आरमार', 'ब्रिटिशांचें सैन्य', आणि 'रणगाडे' हे चार लेख आलेले आहेत. त्या सर्वांतली— आणि अितरत्रहि मराठींत प्रसिद्ध झालेल्या लिखाणातली— माहिती केवळ वरवरची आहे, त्यात युद्धसाधनाची मोजदाद आहे, बाहेरून तीं कशीं भयानक, अक्राळविक्राळ, दिसतात याचा ठसा आलेला आहे; पण नेमकें जें विशेष हवें होतें तेंच आलेलें नाही, तें त्या साधनाचें अंतरंगदर्शन, आणि त्याच्या मागचीं शास्त्रीय तत्त्वें. हे जे चित्रमयजगत्मधले चार लेख सांगितले त्यातल्या माहितीसाठी देखील मुंबअीच्या 'टाअीम्स'तर्फे मध्यंतरीं प्रसिद्ध झालेल्या 'ब्रिटन्स फाअिटिंग फोर्सेस' या प्रचारग्रंथाचाच मुख्यत्वें आधार घ्यावा लागला आहे. याचा अुघड अुघड अर्थ असा की आपल्या अिकडे आगाऊ, पुढील अवधान राखून, माहिती जमविली जात नाही. अैन तहान लागल्यावर मगच, बहुधा, खोरीं फावडीं धुंडाळण्यापासून सुरवात होते.

बरें, केवळ कालिकातून असें ज्ञान मिळावयाचें झाल्यास त्याला साहजिकच कांही मर्यादा राहाणार; म्हणून ग्रंथाकडे वळावें तों तेथे अधिकच निराशा पदरीं येते. नाही म्हणायाला श्री. जोशी यांचें 'अंतरिक्षविजय' नावाचें अेक पुस्तक प्रसिद्ध झालें आहे. त्यात वियत्-संचाराच्या साधनाविषयीं कांही माहिती आलेली आहे; पण ती मुख्यत्वें अैतिहासिक स्वरूपाची आहे. पुस्तकाची भाषा अेकंदरींत चांगली आहे. त्यात अनेक वैमानिकानीं आणि वैयानिकानीं[1] केलेल्या विक्रमाचें रसभरित वर्णन आलेलें आहे. अर्थातच, तरुण मराठी वाचकाचें लक्ष्य धाडसाकडे, आणि काही अंशीं शास्त्राकडे, खेचण्याचा अेक योग्य प्रयत्न म्हणून हें पुस्तक निस्संशय स्वागतार्ह आहे. आमची तक्रार अितकीच की त्यात शास्त्र, म्हणण्यासारखें, आलेंच नाही; आणि जें थोडेंसें आलें आहे त्याची मांडणी देखील सदोषच आहे. एवंच, कदाचित् अेवढें अेक पुस्तक वगळल्यास मराठी शास्त्रदृष्ट्या युद्ध जणुं काय घडलेंच नाही.

आता ही दृष्टि सोडून दिली आणि सर्वसाधारण दृष्टीनेच पाहिलें तर मराठी भौतिक-

---

१ विमान हें हवेपेक्षा हलके साधन. वियद्यान किंवा वियान हें हवेपेक्षा जड. विमानाचा नेता वैमानिक; वियानाचा नेता वैयानिक.

हवेंत उंच जाणें, आणि उंचावरून संचार करणें याविषयींचें जें शास्त्र म्ह. वियत्संचारासंबंधींचें जे शास्त्र ते वैयतशास्त्र; तत्संबंधीं जी कला ती वैयतकला. वैयतशास्त्रांत विहरणारे जे लोक ते वैयतिक. वैयतिकांचीं जीं वाहनें त्यांत कांही हवेपेक्षा हलकीं तर कांही हवेपेक्षा जड; त्याचप्रमाणें कांही सेंजन म्ह. इंजनसहित असतात, तर कांही निरिंजन म्ह. इंजनरहित असतात.

वर पाहिलें असतां सभोवार चकाकणारें छतासारखें जें दिसते ते आकाश. आकाश आणि पृथ्वी यांच्या मध्यंतरीं जें आहे तें अंतरिक्ष. वैयतवाहनाचा संचार ज्यामध्यें आहे तें वियत्.

वाङ्मयांतल्या ग्रंथांची वर्गवारी कशी पडते हें वर सांगितलेंच आहे. त्यांतलें शास्त्रीयवाङ्मय हेंच खरोखरीं मौलिक महत्त्वाचें होय. असें असल्यामुळे यात आढळणाऱ्या काही प्रवृत्तिबद्दलच येथें थोडेंसें वक्तव्य आहे.

या दृष्टीने विचारात घ्यावयाचीं पुस्तकें म्हणजे (१) श्री.जोशी याचे वर उल्लेखिलेलें 'अंतरिक्षविजय', (२) श्री. दामले याचें 'यांत्रिक शोधाच्या नावीन्यकथा', (३-४) प्रो. भागवत याचें 'रसायन शास्त्रातील नवलकथा' भाग १,२, (५) प्रो. गो.रा. पराजपे याचे 'शास्त्रीय निबंधमाला', (६) त्यानीच संपादिलेला 'पारिभाषिक शब्दसंग्रहा'तला 'पदार्थविज्ञान' विषयक भाग; आणि (७) डॉ. दि. धों. कर्वे यांनी संपादिलेला 'रसायन परिभाषा संग्रह' हीं होत. यांतल्या पहिल्या पुस्तकांत श्री. जोशी यानी वियत्संचाराचीं निरनिराळीं साधनें घेऊन त्याची एकांतून दुसऱ्यांत, दुसऱ्यातून तिसऱ्यांत परिणति कसकशी होत गेली; ती साधण्याच्या कामीं अनेकांनी आपलें सर्वस्व कसें पणाला लावलें; निरनिराळ्या बाजूंनी विक्रम कसकसे केले हें सोप्या व चटकदार भाषेंत सागितलें आहे. श्री. दामले यांनी शिवणयंत्र, पायगाडी, वगैरेसारखीं बहुतांशीं नित्य परिचयाचीं यंत्रें निवडून त्याचा विकास कसकसा होत गेला हें सांगितलें आहे. प्रो. भागवताच्या दोन्ही पुस्तकांत रसायनशास्त्राची भरपूर महती गायिली गेली आहे; आणि खनिज द्रव्यें, शिसपेन्सिल, रबर, रंग, खतें, रत्नपरीक्षा, घड्याळ इत्यादिकाविषयीं त्रोटक माहितीहि आलेली आहे. प्रो. पराजपे यानी 'सृष्टिज्ञाना'तून पूर्वी प्रसिद्ध झालेल्या निरनिराळ्या लेखकाच्या काही लेखाचें संकलन करून तें 'शास्त्रीय निबंधमाले'च्या द्वारा मांडलेले आहे. 'पदार्थविज्ञान' आणि 'रसायन'विषयक शब्दसंग्रह या दोन पुस्तकात मराठींतल्या कित्येक लेखाग्रंथातून आढळलेली परिभाषा संकलित केली गेली आहे.

हीं सर्व पुस्तकें वाचून झाल्यावर विचारासाठी म्हणून एक प्रश्न मांडावसा वाटतो तो असा की सुबोध शास्त्रीय वाङ्मय कशाला म्हणावे ! तें कसें असावें ! तें कसें नसावे ! आमच्या मतें अनिश्चितींतून निश्चिति काढणें, दिसावयाला अनियमित वाटणाऱ्या पसाऱ्यातून नियम शोधणें, हेंच वस्तुतः शास्त्राचे काम. म्हणून, अशा नियमाची कल्पना व ते शोधण्यासाठीं लागणाऱ्या पद्धतींची आणि साधनसामग्रीची माहिती सोप्या भाषेंत ज्याच्या द्वारा होईल तेंच सुबोध शास्त्रीय वाङ्मय ठरेल.

अशा वाङ्मयातल्या कोणत्याहि ग्रंथात वास्तव-रसायन-जैवादि भौतिक शास्त्रातला एखादा विषय मांडलेला असल्यास तो कसा, किती संकोचविस्ताराने यावा हें ठरवण्याचें स्वातंत्र्य, अर्थातच, लेखकाला आहे. पण शास्त्रीय रूढीच्या आणि युक्तायुक्तेच्या दृष्टीने पाहिल्यास एक आग्रहाची सूचना मात्र, मराठींत लिहिल्या जाणाऱ्या शास्त्रीय वाङ्मयाच्या बाबतींत वेळींच देऊन ठेवणें अिष्ट होईल. ती अशी की लेखकाने शास्त्रीय पुस्तकात आपलें मुख्य प्रतिपाद्य शास्त्रच तेवढें सागून मोकळें व्हावें. याचें कारण असें की या शास्त्रानी सर्वज्ञतेचा आव कधीच आणलेला नाहीं. प्रत्येक शास्त्राच्या आपापल्या म्हणून कांही ठरीव मर्यादा आहेत, प्रयोगप्रधान कसोट्या आहेत, तर्कपद्धति आहे. अर्थात् त्याना संमत होईल तेवढाच भाग त्या त्या शास्त्रात येऊं शकतो. अशा स्थितींत, आपल्या देशबांधवाच्या अज्ञानाचें वा अंधश्रद्धेचें मोजमाप, देशाच्या उन्नति-अवनतीची आपली मीमांसा, गतवैभवाविषयीं हळहळ, नीति-अनीति, धर्म-अधर्म, ईश्वराचें अस्तित्व-नास्तित्व, अित्यादिकाविषयी लेखकाचीं वैयक्तिक मतें आपापल्या परीने कितीहि योग्य असलीं तरी तीं भौतिक शास्त्रात यावयाचीं झाल्यास त्या त्या शास्त्राच्या कसोट्यानी तीं सिद्धासिद्ध

केलीं जावींत तरी अेक, किंवा तीं अगदी निराळीं मांडलीं जावींत तरी अेक. दुसराहि अेक विचार येथे बोलून ठेवावासा वाटतो तो असा की सर्वच भौतिकशास्त्रें श्रमविभागणी करून, परस्परसहकार्याने, अेकाच ध्येयाच्या वाटेवर उभीं ठाकलेलीं असल्यामुळे, आणि सर्व शास्त्रांविषयी अेकाच व्यक्तीला पूर्ण माहिती असणें हल्ली अशक्यप्राय असल्यामुळे, अेक शास्त्र श्रेष्ठ, दुसरें कनिष्ठ, असा यत्किंचितहि ध्वनि कोणत्याहि शास्त्रीय ग्रंथातून येऊं नये. 'रसायनशास्त्रांतील नवलकथा' वाचताना आम्हाला या दोन्ही बाबतींत बरीच ढिलाई आढळली. इतरत्रहि मराठींत ती आढळते म्हणूनच हे विचार बोलून दाखवावे लागले.

मात्र शास्त्रीय वाङ्मयात शास्त्रच यावें असें जेव्हा आम्ही म्हणतों तेव्हा त्याचा अर्थ असा नव्हे की लेखकाने फक्त तराजू, फूटपट्टी आणि घड्याळ याच्या साहाय्याने निरनिराळ्या नैसर्गिक घटनाबद्दलची मिळालेली माहिती केवळ कोष्टकाच्या आणि गणिती समीकरणांच्या द्वाराच तेवढी द्यावी. आमच्या म्हणण्याचा आशय असा की फूटपट्टी, घडयाळ वगैरेंच्या द्वारा मोजमाप करून जी अेक प्रकारची कल्पनानिश्चिति साधली जाते ती, किंवा तशा तऱ्हेची, कल्पनानिश्चिति हा शास्त्राचा पाया आहे. आपल्या भोंवतालच्या जगांत ज्या गोष्टी घडत असतात त्यातल्या कित्येकींच्या घडणुकीचें ज्ञान थोडयाफार बारकाव्याने झालेंसें वाटलें म्हणजे मग अेक शास्त्रज्ञ दुसऱ्या शास्त्रज्ञाशीं गणिती आंकडयांच्या किंवा निश्चित परिभाषेच्या द्वारा विचारविनिमय करूं शकतो. पहिल्याचें म्हणणें दुसऱ्याला स्पष्ट कळूं शकतें.

पण शास्त्र न जाणणाऱ्याना जेव्हा आपलें म्हणणें समजावून देण्याचा प्रसंग शास्त्रज्ञाला येतो तेव्हा साहजिकच लौकिकभाषेशीं संबंध येतो. अशा वेळीं संत्रीमुसंब्यांच्या अेखाद्या चोखंदळ भोक्त्याने जशी काळजीपूर्वक रीतीने सऱ्याची साल बाजूला काढावी, फोडी अलग अलग कराव्यात, आणि अेकेक फोड घेअून हलुवार हाताने तिच्यावरचें पापुद्रेमय आच्छादन अशा कुशलतेने काढावें की तसें करतांना यत्किंचितहि रस तर सांडूं नयेच पण बोटें देखील ओलीं न होता आतले नाजूक, देखणे, दाणेदार, रसकोश त्याला स्वतःला अेकैकशः पाहावयाला मिळावेत, व अितरानाहि दाखवतां यावेत; तद्वतच शास्त्रीय लेखकाला देखील आपल्या कल्पनातला बारकावा स्पष्टपणें, रेखीवपणें, अलग अलग करून स्वतः पाहावा लागतो, व लोकाना त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणे कमी अधिक अलगपणें दाखवावा लागतो. यांत वैचित्र्य साहजिकच कोठें आणि कसें येतें पहा. चारदोन महिन्याच्या अर्भकाला झगझगीत प्रकाश आवडतो, रंगांच्या भडकपणावर तें लोलुप होतें; वर वर पाहणारा अेखादा कवि अिंद्रधनुष्यातल्या स्थूलवर्णांच्या साहचर्याला भाळतो; शास्त्रज्ञाला त्यातल्या अेकेका वर्णांतली छटान्छटा, रेषान्रेषा, घेऊन त्या प्रत्येकीच्या आड दडलेलें विलोभनीय शास्त्रीय सौंदर्य स्पष्टपणें देखा-जोखावयाचें असतें.

साहजिकच त्याला आपल्या कल्पनांची यथोचित माडणी करतांना लौकिक भाषेंतले शब्द तोलून, जोखून, वाजवून, घासूनपुसून, पारखावे लागतात. त्याच्या द्वारा अव्याप्ति, अपव्याप्ति, अतिव्याप्ति होणार नाही, आपली कल्पना स्पष्टपणें, रेखीवपणें, जशीच्या तशीच, माडली जाअील अशी खबरदारी घ्यावी लागते. गवयाने आपल्या कंठांतून काढलेल्या अेकेका अलग अलग सुराचीं सांथ दूर अंतरावर लावून ठेवलेल्या तंबोऱ्याच्या तारेने अेकेकटी, स्पष्टपणें, यत्किंचितहि मिश्रण न होता, केवळ आत्मोल्लासाने दिली म्हणजे योग्य तो तो सूर निघाल्याचें समाधान त्या गवयाला मिळूं शकतें. पण नेहमी आपण अेकमेकांशीं बोलतों तेव्हा अेकाचें म्हणणें दुसऱ्याला जसेंच्या तसेंच समजलें की नाही याची—गवयाला मिळूं शकली तशी—बिन-

तोच प्रतीति मिळूं शकत नाही; आणि तरी सुद्धा गवओ जी अपेक्षा आपल्या सुरांच्या आणि तंबोऱ्याच्या बाबतींत धरतो तशाच तऱ्हेची कांहीशी अपेक्षा शास्त्रज्ञाने आपल्या भाषेच्या आणि श्रोत्यांवाचकांच्या बाबतींत धरलेली असते. म्हणजे असें की शास्त्रज्ञाच्या कंठातून निघालेल्या अकेका शब्दाने सर्व श्रोत्यांवाचकांच्या विवेचक बुद्धीवर प्रत्येक शब्दागणिक निरनिराळ्या—पण प्रत्येकीं केवळ अकेकाच -अर्थच्छटेचा ठसा अुमटेल, आणि ज्या ज्या वेळीं त्याने तो तो शब्द पुन्हा त्याच किंवा निराळ्या संदर्भांत अुच्चारावा त्या त्या वेळीं पुन्हा नेमकी तीच तितक्याच तीव्रतेची छटा प्रत्ययाला येअील अशी सोय त्याला पाहिजे असते. ही सोय जर अुपलब्ध असली तरच त्याने शास्त्र सागण्यांत आणि अितरांनी तें समजावून घेण्यात काही अर्थ आहे. आमच्या मतें मराठींत शास्त्रीय लिखाणाची जरूरी आहे ती अशा प्रकारच्या व्यवस्थित, रेखीव, मुद्देसूद, बुद्धिनिष्ठ लिखाणाची आहे. भरमसाट लिखाणाची नव्हे.

आता, असें लिखाण गोड, सरळ, सोप्या, सर्वांना समजेल अशा ललितभाषेंत लिहिलें जाईल म्हणून आशा धरावी तर आपल्या इकडे ज्यानी थोडीफार शास्त्राराधना केली असावीसें वाटतें, आणि ज्यांना भाषेचीहि थोडीशी कमाई आहे, अशाना देखील नव्या पाअुलवाटा धुंडाळण्यापेक्षा ललितवाङ्मयांतले रहदारीचे हमरस्तेच विशेष परवडतातसें दिसतें. बरें, निव्वळ शास्त्र जाणणाराने आपल्याला जमेल तसें तें सागावें म्हटलें तर त्यांचें लक्ष्य भाषेच्या रंगढंगापेक्षा कल्पनेच्या बारकाव्याकडे विशेष असल्यामुळे त्याला योग्य, सुटसुटीत शब्द सुचत नाहीत, भाषा बोजड येते, आणि तरी देखील आपल्याला जें सागावयाचें होतें तें नीटसें जमलें नाही म्हणून तो अस्वस्थ राहतो. म्हणूनच, प्रो. पराजपे जेव्हा आपल्या पदार्थविज्ञानविषयक शब्दकोशाच्या प्रस्तावनेंत, एका शब्दाचे अनेक अर्थ झाले किंवा एकाच अर्थाचे अनेक शब्द भाषेंत आले तरी चालेल असें म्हणतात, तेव्हा तें केवळ अशा हताश लेखकाना उत्तेजन देअून त्याचा हताशपणा घालवण्यासाठी, त्याना प्रयत्नशील करण्यासाठींच, बहुधा असावें असें वाटतें. एरव्ही, न्यायतः आम्हाला हें म्हणणें पटत नाही. आमच्या मतें एरव्हींच्या, रोजच्या व्यवहाराच्या, भाषेंत जेव्हा विशेषसा अर्थश्लेष दाखवावयाचा नसेल तेव्हा वस्तु, पदार्थ, जिन्नस, गोष्ट वगैरेसारखे शब्द अभेदाने वापरले तरी चालत असतील. पण शास्त्रामध्यें सब्जेक्ट, ऑब्जेक्ट, मॅटर, सब्स्टन्स, थिंग इत्यादि शब्दातल्यासारखा पारिभाषिक अर्थच्छटेचा निरनिराळेपणा आणावयाचा असतो तेव्हा अकेका अर्थाशीं अकेक शब्द जखडून, खिळवूनच टाकणें इष्ट असतें. कथा—कादंबऱ्यातून आकार आणि आकृति हे शब्द कधीं 'साईझ' या अर्थी, तर कधी 'शेप' या अर्थी, अभेदाने वापरणें इष्ट वाटत असेल तर ते खुशाल चालू द्यावें. पण शास्त्रासाठी मात्र आकार म्हणजे 'साईझ' आणि आकृति म्हणजे 'शेप' असें निश्चित करून टाकावें. यंत्र, साधन, हत्यार, उपाकृत, वगैरेसारखे अनेक शब्द भाषेंत असतांना, आणि जरूरीप्रमाणे नवीन बनवण्याची शक्यता असताना, गळ्यात बांधण्याच्या ताईतापासून तों मोठमोठ्या अजस्र जनित्रां (जनरेटर्स) पर्यंत निरनिराळ्या कल्पनाची दावण एका 'यंत्र' शब्दाशीं बाधून सब घोडे बारा टक्के भावाने विकले जाऊ नयेत. शास्त्रीय भाषेंत अशी नीट व्यवस्था स्वीकारल्याने लेखका-वाचकांची, दोघांचीहि, सोय होते. हल्लीच्या अनागोंदी पद्धतींत दोघाचीहि उच्चाराची भाषा मराठी असली तरी विचाराची, बारकाव्याची, निश्चितीची, भाषा इंग्रजीच राहते. केव्हा केव्हा तर लेखकाइतकेंच वाचकालाहि चागलें इंग्रजी यावें लागतें. मग ज्ञानार्जनासाठीं त्याने इंग्रजी पुस्तकेंच वाचावींत, मराठी वाचावयाचीं तीं तिच्यावर मेहेरनजर म्हणून, अशी स्थिति निर्माण होते. ती स्पृहणीय आहे असें कोण म्हणेल !

बरें, कांही तरी नीट व्यवस्थित मांडणी करूं म्हणावें तर आजच्या मराठींतले शब्द परिभाषेच्या दृष्टीने अेकेका अर्थाशी तर खिळवून टाकावे लागतातच; पण शिवाय, ते संख्येनेहि अगदी अपुरे ठरतात. म्हणून मग, प्रचारांतले योग्य ते शब्द निवडून देखील अनेक नवीन शब्द बनविण्याची, निश्चित आयोजना, निश्चित आखणी डोळ्यासमोर ठेवून—केवळ पायाखालचेंच न पाहतां दूरवर, आजूबाजुला, हेरून—त्याचा उपयोग करीत राहण्याची जरूरी पडते. असें करावयाला आपल्याकडचे कांही शास्त्राभ्यासक बिचकतात. उदाहरणार्थ, प्रो. भागवतच असें म्हणतात की 'नवीन परकीय शब्द नव्याने शिकणें काय, आणि तद्वाचक संस्कृत धातुसाधित नवीन तयार करणें व तें शिकणें काय, सारखेंच श्रमाचें ठरेल.' (र. शा. न. भाग १–पृ.२२). आम्हाला हें म्हणणें रुचत नाहीं व पटतहि नाही. मराठी भाषेच्या ओघात अनावश्यक परकीय शब्द शिरतात तेव्हा, निदान आम्हाला तरी, ते अेखाद्या बेफिकीर स्वयंपाक्याने शिजवलेल्या आबेमोहोर तादळाच्या भातात घासागणिक दाढेला लागणाऱ्या खड्यासारखे वाटतात. अुलटपक्षीं आमच्या शेजारच्याच अेखाद्या भाषेंतले, आणि संस्कृतातले, शब्द क्वचित् गव्हातुरीसारखे थोडे निराळे दिसले, आंबट तुरट लागले, थोडे टणकहि भासले, तरी ते फारच थोड्या यत्नाने आपलेसे होतात, सहज पचतात, अन्नरस देअूं शकतात. अिंग्रजी किंवा अितर कोणताहि परकीय शब्द मराठींत येअूंच नये असें आमचें म्हणणें नाही. पण आमच्या भाषेंतला देखील प्रत्येक शब्द न् शब्द पारखला जावा असें जेथे आम्ही म्हणतों तेथे परक्या शब्दाने मराठी भाषेंत शिरताना दिंडीदरवाजाने यावें, आपली जरूरी पटवावी, आणि योग्य त्या जागीं, आम्ही बसवूं तेथे, बसावें अेवढेंच आमचें म्हणणें.

तात्पर्य, आमच्या दृष्टीने मराठींतून शास्त्रीय लिखाण लिहावयाचें तें पूर्णपणें शास्त्रीय असावें, तें तिच्या ओघाशीं मिळतें—जुळतें असावें. आणि सुबोधहि असावें; हा सुबोधपणा साधताना हवी तेवढी मुबलक शब्दसंपत्ति वापरावी, दृष्टान्त द्यावेत, पण तसें करताना मूळ विषयावरची दृष्टि यत्किंचितहि चळू नये; अर्थात् सुव्यवस्था आणि शास्त्राचा बारकावा बिलकुल दुखावला जाऊं नये.

मराठींतून निर्माण होत असलेल्या, आणि व्हावें अशी इच्छा असलेल्या, शास्त्रीय वाङ्मयाविषयींच्या सूचना आणि अपेक्षा थोडक्यात सांगून झाल्यानंतर येथे मुद्दाम, ओघान्तराचा थोडासा दोष पत्करूनहि, प्रस्तुत लेख संपविण्यापूर्वी काही थोडेंसें पुरवणीवजा लिहावेंसें वाटतें तें 'सृष्टिज्ञान' संपादकमंडळाच्या योजनेनुरूप प्रसिद्ध होत असलेल्या पारिभाषिक शब्दसंग्रहाविषयी. कारण, असे शब्दकोश वरचेवर प्रसिद्ध होऊं शकत नाहीत; एकदा प्रसिद्ध झाले म्हणजे अनेकांकडून ते आधारासाठी वापरले जातात. सृ० सं० मंडळाच्या योजनेप्रमाणे आतापर्यंत प्रसिद्ध झालेल्या 'पदार्थविज्ञान' आणि 'रसायन' विभागांचा बराचसा भाग आम्ही बारकाईनें पाहूं शकलों. त्यावरून असें सुचवावेंसें वाटतें की काही मराठी लेखकानी प्राविण्य, विकीरण, ईयत्ता, पुनर्संयोग, शुद्धीकिरण, उच्चात्म्य (!) वजन, लघुतम, गत्याश, कोटयाश, निमजन, अशा सारख्या अशुद्ध रूपात काही शब्द वापरले असले तरी कोशाच्या पुढील विभागांत अशा शब्दांचीं शुद्ध रूपेंच दिलीं जावीत. तसेंच इंग्रजींतल्या 'Displacement, Consumption, Capacity, Cell, Charge वगैरेसारख्या कित्येक शब्दाना, निरनिराळ्या शास्त्रातच नव्हे तर एका शास्त्राच्या निरनिराळ्या विभागात देखील, अनेक अर्थच्छटा असतील तेव्हा मराठी प्रतिशब्द कोणत्या संदर्भात वापरला गेला हें सांगितलें जावें. इंग्रजींतल्या कित्येक शब्दांच्या बाबतींत नीटशी योजना नाही ही गोष्ट सुद्धा ध्यानांत घेऊन इंग्रजीच्या आधाराने मराठी संसारांत

नव्यानेच चुली मांडावयाच्या असतील तेव्हां इंग्रजींत राहून गेलेले दोष मराठींत न येऊं देत, शक्य तितकी चांगली योजनापूर्वक माडणी व्हावी हेंच उचित. मराठींतून जें लिखाण व्हावयाचें त्या लिखाणात समर्पक शब्दांचा उपयोग केला जावा हीच 'शब्दसंग्रहकारा'ची इच्छा असणार. ती नीट सफल होण्यासाठी कोणी तरी, कोठे तरी, निदान एखाद्या वाक्यांत तरी जे, वापरले आहेत तेवढेच शब्द घेतल्याने भागणार नाही. अशा प्रसंगीं शास्त्रीय परिभाषामंडळासारख्यानीं आयोजनापूर्वक तयार केलेले शब्द, क्वचित् न वापरलेले आढळले तरी देखील, दिले जावेत. गुजराथी, हिंदी वगैरेसारख्या भाषाभगिनींकडे कदाचित् न पाहता आलें तरी देखील, मराठी-पुरती वर सुचविल्यासारखी योजना स्वीकारल्याने कोशसंपादनाचें उद्दिष्ट अधिक चागलें सफल होऊं शकेल असें वाटतें. कोश निर्दोष व्हावा, मराठी लेखकाना त्याची अधिकात अधिक मदत व्हावी, मराठी शास्त्रीय वाङ्मय अधिक जोमदार आणि निर्दोष व्हावें अशीच कोणाचीहि अिच्छा असणार. आमची झाली तरी याहून वेगळी अिच्छा काय असणार !

## धर्मशास्त्र आणि समाजशास्त्र

१ जॅन्युआरी रोजीं जें वर्ष समाप्त झालें, त्या वर्षामध्यें धर्मशास्त्र आणि समाज-शास्त्रविषयक जे ग्रंथ महाराष्ट्रांत प्रसिद्ध झाले, त्या ग्रंथावरून अेतद्विषयक अभ्यासात आणि वाङ्मयात काय प्रगति झाली, तिचा आढावा घेण्याची जबाबदारी गुरुजनानी अंगावर टाकल्या-कारणाने 'आज्ञा गुरूणाम् ह्यविचारणीया' या नियमाने ती यथामति आणि यथाशक्ति पार पाडणें हें कर्तव्यच होऊन बसतें. परंतु प्रत्यक्ष आढावा घेण्याच्या पूर्वी, या दोनहि शास्त्राच्या मर्यादा अत्यंत अस्पष्ट असल्याकारणाने आणि शास्त्र हें पद बरेंचसें सैल अर्थाने वापरण्याची पद्धती महाराष्ट्रात पडून गेली असल्याकारणाने, त्या दोनहि मुद्याच्या मर्यादा लेखनसौलभ्याच्या दृष्टीने स्वतःकरिता तरी स्पष्ट करण्याचा प्रयत्न केल्यास तें अस्थानीं होणार नाही असें वाटतें.

जुन्या पद्धतीने धर्मशास्त्राच्या मर्यादा समजून घ्यावयाच्या तर धर्मशास्त्र हें क्रियाचें शुद्धाशुद्धत्व ठरविण्याकरिता मूल्यमापनाचा निकष अगर कसोटी सागणारें शास्त्र आहे. त्यामुळे वैयक्तिक क्रियांचा विचार करण्याकरिता आचार, सामाजिक क्रियाचा विचार करण्याकरिता व्यवहार आणि दोनहि मध्यें कोठे दोष झाल्यास, दूषित व्यक्तीला पुन्हा सामाजिकत्व देण्या-करिता प्रायश्चित अशीं त्याचीं अंगें आहेत. समाजशास्त्राचीं खरोखर हींच अंगें असावयास पाहिजेत. परंतु आजचें समाजशास्त्र वरवर जरी चाळून पाहिलें तरी त्यामध्यें व्यवहार आणि प्रायश्चित्त या दोन खात्याचा विचार केलेला दिसून येअील. आधुनिक समाजशास्त्रावरील कोठलाहि ग्रंथ चाळून पाहिला तर त्यामध्यें वैयक्तिक आचाराला मार्गदर्शक असें कांहीहि सापड-णार नाही. अनंत शास्त्रें झालीं आहेत. तीं आलोडून व्यक्तीने आपला आहारविहारादि कार्यक्रम ठरवावा. असें पाहिजे तर म्हणता येअील की हिंदुधर्म आचारांतील बारकाव्याकडे लक्ष देतो, तर आधुनिक समाजशास्त्र तिकडे मुळीच लक्ष देत नाही.

धर्म याचा आचार, व्यवहार, प्रायश्चित अशा त्रिसंकेताने युक्त अशी मूल्यमापनपद्धति हा अर्थ घेतल्यास धर्माच्या कक्षेत येत नाही असा विषय सापडणें कठीण. परंतु पाश्चात्याच्या संसर्गाने धर्म शब्दाची ही व्याप्ति नष्ट होऊन, त्याची व्याप्ति धर्म म्हणजे religion या शब्दाने दाखविली जाऊं लागल्याकारणाने गोंधळांत आणखी गोंधळ वाढला (पहा धर्म, उद्गम आणि विकास, कृष्णाजी पांडुरंग कुलकर्णीकृत). अर्थात् धर्माची व्याप्ति आणि स्वरूप हीं दोनहि

अस्पष्ट होऊं लागल्याकारणाने धर्मांत काय विषय येतात आणि काय येत नाहीत यावर रणें माजूं लागलीं. अेक पक्ष म्हणेल की विवाह हा धार्मिक प्रश्न आहे, तर दुसरा पक्ष म्हणेल की विवाह हा लौकिक विषय आहे. समाजशास्त्र विचारें या विषयासंबंधी फारसें कांहीच सांगणार नाही.

याचीं कारणेंहि बलवत्तर आहेत. आधुनिक समाजशास्त्र हें अितर आधुनिक शास्त्रांप्रमाणे आरंभवादाची (mechanistic) छटा घेऊन उत्पन्न झालें असल्याकारणाने त्यामध्ये आपणाला अेखादी सामाजिक घटना पूर्वी कशी होती, त्या घटनेमध्यें स्थित्यंतरे कशीं होत गेलीं आणि आज ती घटना कोणत्या अवस्थेमध्ये आहे अित्यादि कालपर्यायदृष्ट्या वर्णन अगर अेकाच कालीं स्थलभेदाने केलेलें वर्णन आपणाला आढळून येअील; परंतु त्यापैकी कोणता पर्याय कोणत्या तऱ्हेच्या समाजाला हितकारक होअील हें मूल्यमापन आपणाला सांपडणार नाही. स्थलकालदृष्ट्या अशा तऱ्हेने अेकाच घटनेचे पर्याय म्हणजेच स्थित्यंतरें सापडत असल्याकारणाने स्थलकालनिरपेक्ष असें कांही स्वरूप कोठल्याहि घटनेला असूं शकेल असें या पद्धतींत दाखविण्याचें काहीच कारण नाही, त्यामुळे समाजाला कोणत्याहि बाबतींत मार्गदर्शन होअील असें या शास्त्रात काहीच सापडणार नाही. उदाहरणार्थ, वेस्टरमार्कचा 'मानवी विवाहाचा अितिहास' अगर लायरचा 'मानवी विवाहाची उत्क्रांति' हे ग्रंथ घ्या. मानवी समाजांत स्थलभेदाने अथवा कालभेदाने विवाहपद्धति कशा होत्या अगर आहेत याबद्दल तपशीलवार माहिती आपणास सापडेल, परंतु कोणती विचारपद्धति विवाहाचीं ध्येयें नजरेस ठेवता समाजाना जास्तींतजास्त हितावह होअील यासंबंधी कोणत्याहि तऱ्हेचा आराखडा त्यात सापडणार नाही. शास्त्राचें स्वरूपच असें आहे की त्याना तसें कांहीच सांगता येऊं नये. भूमीचा पृष्ठभाग कसा बनत गेला तें शोधून काढणारा भूस्तरशास्त्रज्ञ, अगर सूर्यमाला कशी उत्पन्न झाली असेल त्याची कल्पना (hypothesis) मांडणारा खगोलशास्त्रज्ञ, अगर मानव पृथ्वीवर कसा प्रकट झाला असेल त्याची पद्धती सांगणारा प्राणिशास्त्रज्ञ वगैरे वगैरे हे सर्व तऱ्हेचे शास्त्रज्ञ याच वर्गांत मोडतात. अजूनपर्यंत तरी यूरोपीय अभ्यासक मानवी संस्कृतीचा या पद्धतीनेच अभ्यास करतांना दिसून येतात आणि ते अगर त्याच्या पद्धतींत वाढलेले हिंदुस्थानातील लेखक ज्या वेळीं शास्त्र हा शब्द वापरतात त्या वेळीं शास्त्र या शब्दाची आम्हीं वर दिलेली व्याप्ति त्याच्या नजरेसमोर असते.

अुलट ध्येयवादी (teleological) शास्त्रज्ञाला कोणत्याहि घटनेच्या प्राचीन इतिहासाचा येथून पुढे कोणत्या समाजपद्धती हितावह ठरवाव्यात या दृष्टीनेच फक्त असतो आणि तेवढा उपयोग तो करून घेत असतो. त्याचें लक्ष मुख्यतः कोणत्याहि घटनेची क्रिया कोणत्या तऱ्हेची होअील आणि त्याचा सामाजिक परिणाम कसा होअील या बाबीवर खिळून राहिलेलें असतें. त्याला एखादी घटना स्वरूपतः कळल्यास त्या समाजाचा भविष्यकाळ कसा असेल हें सांगता येअील किंवा नाही हें शोधून काढावयाचें असतें आणि मग समाजामध्ये जें घडावें असे वाटत असेल त्याला युक्त घटना कशा तऱ्हेची असावी याचा निर्णय त्याला करावयाचा असतो. खरोखर शास्त्र हें असेंच असावयास पाहिजे. मानवी समाजाला मार्गदर्शक म्हणून जर शास्त्रांचा उपयोग व्हावयाचा असेल तर शास्त्राला कोणत्याहि क्रियेचा अगर घटनेचा परिणाम काय होअील त्याबद्दलचें भविष्यकथन करता आलें पाहिजे; निव्वळ शास्त्रज्ञाचा सद्धेतु असून चालत नाही. ज्या शास्त्रज्ञांनी रसायनशास्त्राची वाढ केली त्यांना आपल्या शास्त्राचा उपयोग भयंकर स्फोटकद्रव्यें आणि विषारी वायु उत्पन्न करून मनुष्यप्राण्याच्या

जीविताचा आणि मालमत्तेचा सार्वत्रिक नाश करण्याकडे केला जाईल हें जर माहिती असतें तर त्यांनी या शास्त्राची वाढ केली असती किंवा नाही हा प्रश्न विचार करण्यासारखा आहे. जीवित आणि त्याची गति यासंबंधी सर्वांगीण माहिती नसल्यास कर्त्याची अिच्छा काहीहि असली तरी त्याच्या क्रियेचा सामाजिक परिणाम त्याच्या मनाप्रमाणेच होअील असें नव्हे. फ्रान्सच्या क्रांतीच्या वेळीं 'जिरांडीन' नावाचा जो पक्ष होऊन गेला तो तत्त्वज्ञान, विद्वान, कार्यकर्ते अशा लोकांचा पक्ष होता; परंतु उसळत्या जीवाची गति त्याला न कळल्या कारणानें तो फ्रान्सचा सुधारक होण्याअैवजी फ्रान्सनेच त्याचा नाश केला. त्यासबंधी थामस कार्लाअील आपल्या फ्रान्समधील क्रांतीवरील ग्रथात लिहितो. 'As for the Gizondin Formula of a respectable Republic for middle classes, all manner of Aristocracies being now sufficiently demolished, there seems little reason to expect *that the business will stop there.*' खरोखर मानवाला आपल्या क्रियेचे परिणाम काय होतील अगर कोणत्या परिणामाला धरून काय क्रिया करावी हें अचूक सांगणारें शास्त्र मिळाल्यास केवढा फायदा होअील ! तसें तें युरोपीय मानवाला सांपडत नाही म्हणून तर यूरोपांतील विद्वान् काहीहि हालचाल झाली कीं तिला प्रगति असें म्हणतात.

ज्याप्रमाणे शास्त्रें अशीं वेगळ्या तऱ्हेचीं आहेत त्याप्रमाणेच समाजविषयात काय तत्त्व प्रधान मानून विचार करावा हें ठरविण्याची दृष्टीहि पण वेगवेगळी असते. समाजामध्ये गट असतात त्याप्रमाणेच गटात कुटुंबें असतात आणि कुटुंबात व्यक्ति असतात. सर्वसाधारणतः समाजाचे गुणधर्म असले तरी गटाचे असे विशिष्ट गुणधर्म असतात, आणि म्हणून तर त्या गटाना आपण वेगळे म्हणतों; त्याप्रमाणेच गटाचे गुणधर्म साधारणतः असले तरी कुटुंबाचे असे काही विशिष्ट गुणधर्म असतात. याचाच अर्थ असा की समाजधर्मानें गटांची प्रवृत्ति सर्वथा नियत होत नाही आणि गटधर्मानें कुटुंबाची प्रवृत्ति सर्वथा नियत होत नाही. असें असल्याकारणाने कार्ल मार्क्स आणि त्याच्या पठडींतील लोक म्हणतात त्याप्रमाणे गट (classes) प्रधान धरूनच अभ्यास आणि विचार का करावा तें विशद होत नाही. गट प्रधान धरून विचार केल्यास समाजाच्या सामान्य धर्मांचा आणि कुटुंबाच्या विशिष्ट धर्मांचा विचार त्या पद्धतींत होत नाही. तसा विचार न झाल्याकारणाने त्या त्या घटना या विचारपद्धतीला विरोधी होतात. मग त्या घटनांचा नाश करावा असें सांगण्याकडे प्रवृत्ति होऊन त्याचीं अैतिहासिक समर्थनें पुढे येऊं लागतात. आज गटपद्धती प्रधान मानल्याकारणाने अेका बाजूला कुटुंबपद्धती आणि दुसऱ्या बाजूला भौगोलिक राष्ट्रें नष्ट झालीं पाहिजेत असें म्हटलेलें आपण प्रत्यही अैकत आहोंत. परंतु या सर्वांचा यथान्याय त्यामध्ये समन्वय होअील तेंच खरें समाजशास्त्र असेंच मानावयास पाहिजे. गटाचे सर्वसाधारण नियम सांगून कुटुंबाची क्रिया निश्चित होत नाही, त्याप्रमाणेच कुटुंबाचे सर्वसाधारण नियम सांगून व्यक्तींचा आचार नियत (predictable) होत नाही; म्हणून व्यक्ति, कुटुंब, गट, समाज याना यथाधिकार नियम सांगणें हें समाजशास्त्राचें आद्यकर्तव्य असावयास पाहिजे.

ज्याप्रमाणे समाजाकडे पाहण्याची दृष्टि अशा तऱ्हेने कांही तरी गृहीत धरलेली असेल त्याप्रमाणेच ध्येयदृष्टीमध्ये फरक असूं शकेल. कोणी समाजनेता संस्कृतीच्या दृष्टीने विचार करील. आम्हीं वर चर्चा केलेल्या कारणास्तव आज महाराष्ट्रात संस्कृति हें पद अुपहासास्पद केलें गेलें आहे; परंतु महाराष्ट्राने अेखाद्या पदाचा अुपहास केला म्हणून ती कल्पना (concept) आणि घटना अस्तित्वांतच नसते असें थोडेंच ठरणार आहे ! दुसरा अेखादा समाजनियंता

सुखाच्या दृष्टीने विचार करील तर तिसरा सत्ता आणि सामर्थ्य या दृष्टीने विचार करील. परंतु संस्कृति, सुख आणि सामर्थ्य हीं कांहीं समव्याप्त नाहींत. त्यामुळे त्या पद्धतींतील नियंत्रकांचे आदेश समान असणें शक्य नाही. म्हणून अेक प्रधान मानल्यास दुसरें अर्थात् गौण मानूं लागणार. खरी गोष्ट अशी आहे की या तीन्हींचेंहि यथायोग्य मिश्रण समाजपुरुषांत दिसून यावयास पाहिजे.

आम्हीं वर ज्या मर्यादा सांगितल्या त्या मर्यादांचा विचार करतां, महाराष्ट्रांत मागील वर्षांत जे ग्रंथ तयार झाले आणि आता आमच्यापुढे आहेत त्याच्यावर नजर टाकली तर, अेक सामान्य अपवाद सोडून दिल्यास, महाराष्ट्रात समाजशास्त्र अजून अवतीर्ण व्हावयाचें आहे असें मोठ्या कष्टाने म्हटल्याशिवाय राहवत नाही. आता आमच्यापुढे अेकंदर सहासष्ट ग्रंथ आहेत. त्याची वर्गवारी करावयास लागलें तर त्यामध्ये परंपरागत धर्म विशद करणारे ग्रंथ आहेत; त्याप्रमाणेच आधुनिक समाजपद्धती सांगणारे ग्रंथ आहेत. परंतु आम्हीं वर सांगितल्याप्रमाणे सर्व दृष्टींचें यथाप्रमाण मिश्रण करणारे ग्रंथ जसे जुन्यांत सापडतात तसे नव्यांमध्यें सापडत नाहीत. अुदाहरणार्थ, वैदिक षड्दर्शन हा ग्रंथ घेअू. त्यामध्ये जगताचें सत्तारूप स्वरूप आणि मूल्यरूप स्वरूप या दोहोंचाहि विचार केलेला दिसतो. आचाराने व्यक्ती कशी तयार करावी याचा विचार पातंजलयोगशास्त्राने केलेला आहे आणि त्याचीं मतें आज शाळाखात्याने मुलांना शारीरशिक्षण देणारे शिक्षक तयार करण्याची जी शाळा काढली आहे तेथे सर्वमान्य करून घेण्याचें श्रेय स्वामी कुवलयानंद यांना द्यावयास पाहिजे. त्या शास्त्रात शरीर आणि मन या दोहोंच्याहि स्वास्थ्याचा विचार केलेला आहे. आचारानंतर व्यवहाराचा विचार जैमिनीकृत पूर्वमीमांसेने केलेला आहे आणि मीमांसकांनी अर्थनिर्णयाचे लावून दिलेले नियम आजहि अगदी ताजे आहेत (जुरसले नाहीत) आणि Maxwell's Interpretation of Statutes या ग्रंथातील नियमांशीं जुळते आहेत हा मुद्दा प्रसिद्ध संस्कृत पंडित आणि कायदेपंडित प्रो. पांडुरंग वामन काणे यांनी कबूल केलेला आहे. आचारव्यवहारानंतर ध्येयाचा विचार बादरायणकृत उत्तरमीमांसेने केलेला आहे. त्याप्रमाणेच जगतावर अस्तित्व अगर सत्तारूप विचार सांख्य, वैशेषिक आणि न्याय या तीन दर्शनांनी केलेला आहे.

तेच आजचे ग्रंथ पाहूं लागल्यास त्यामध्ये समाजाच्या राजकीय घटनांची माहिती देणारे ग्रंथ सापडतात. उदाहरणार्थ, श्री. पा. वा. गाडगीळकृत फॅसिझम, सुलभ समाजवाद आणि अराज्यवाद, भाई गोरेकृत साम्राज्यशाही आणि श्रीयुत जावडेकरकृत लोकशाही. अर्थातच या ग्रंथकाराचा आचार, व्यवहार, प्रायश्चित याच्याशीं कांहींहि संबंध नाही. त्यांच्या मताने या सर्व गोष्टी उत्पादनाच्या पद्धतीने आणि सामाजिक संबंधानी आपोआप निश्चित होतील. त्यामध्ये त्रिकालाबाधित सत्य असें कांहींच नसतें. आहार, विहार, सामाजिक पद्धती या त्या त्या पद्धतीला युक्त अशा आपोआपच ठरतील आणि अर्थातच त्याबद्दल फारशी काळजी करण्याचें कारण नाही. एकदा लोकशाही प्रस्थापित झाली की प्रत्येक क्रियेबद्दलचा निर्णय घेणें म्हणजे अगदी हातचा मळ होअून जाईल, त्याला मार्गदर्शक कांहींहि असण्याची जरूरी नाही. आम्हीं जीं वर पांच तऱ्हेच्या घटनांचीं नांवें सांगितलीं त्या मानवसमाजातच उत्पन्न होत असल्याकारणाने मानवीच आहेत आणि म्हणून त्यांची अधरोत्तर व्यक्ति ठरवितांना फारच जपावें लागतें. एका पद्धतींतील मूल्यमापनें घेऊन तीं दुसऱ्या पद्धतीला लावणें हें अशास्त्रीय आहे आणि त्यामुळे या दोन पद्धतींची तुलना अगर अधरोत्तर व्यक्ति होत नाही हें येथे स्पष्ट बजावावेंसें वाटतें. असें होऊं लागलें म्हणजे जें तात्कालिक

विजयी तेंच हितकारक आणि सत्य असें म्हणण्यासारखें होऊं लागतें. श्री. पां. वा. गाडगीळाच्या-सारखे लेखक जेव्हा 'दारिद्र्य हा सामाजिक रोग आहे.' पण दारिद्र्याचा जो आपण खरोखर तिटकारा करावयाचा असतो तो त्यात सुख नसतें म्हणून नव्हे, त्याने नैतिक अधःपात होतो म्हणून आणि त्या नैतिक अधःपाताला कधीच मर्यादा रहात नाही' (सुलभ समाजवाद पा.४) असें लिहूं लागतात त्या वेळीं त्याना असें विचारावेंसे वाटतें कीं आपण हें कोणत्या नीतीच्या अपेक्षेने बोलत आहांत ती नीति स्थिर आहे का ? तशी नसल्यास अुन्नति आणि अधःपात या दोनहि शब्दांना काहीचाहि अर्थ नाही. अशा तर्‍हेच्या सर्वसाधारण ग्रंथातच 'मानवी कुटुंब आणि हिंदुस्थान' या अत्यत सुदर ग्रंथाचा अंतर्भाव केला पाहिजे. त्यामध्यें आम्हीं वर अुल्लेखिलेली व्यष्टीसमष्टींचा समन्वय करणारी दृष्टि लावलेली आहे, परंतु तो ग्रंथ भाषांतरित असल्याकारणाने त्यांतील पद्धतीचें आणि निष्कर्षाचें श्रेय महाराष्ट्राला घेता येणार नाही.

या सर्वसाधारण माहिती देणाऱ्या ग्रंथातून खाली येअूं लागलें म्हणजे पद्धती आणि निर्णय या बाबतींत पूर्ण गोंधळ असलेला दिसून येतो. ज्या कोणाला जो विषय महत्त्वाचा वाटेल त्यावर तो लिहीत असतो, परंतु आपलीं विधानें अचूक असावयास पाहिजेत, आपण मांडीत असलेले सिद्धान्त सिद्ध करावे लागतात, ते सिद्ध करण्याच्या काही पद्धति असतात हीच जाणीव बऱ्याचशा लेखकांना असलेली दिसत नाही. एखादा मुद्दा सिद्ध केल्यानंतर प्रत्यंतर-पुरावा म्हणून वाटेल तर अितरांचीं वचनें द्यावींत, परंतु अितरांचीं वचनें दिल्याने मुद्दा सिद्ध होत नाही (Ignoratio Elenchii), अगर प्रतिस्पर्ध्याचे दोष दाखविल्यानेहि मुद्दा सिद्ध होत नाही ही गोष्टहि बऱ्याच लोकांच्या नजरेस आलेली दिसत नाही.

जो तो आपल्या अभिरुचीनुसार आपल्या आवडत्या विषयावर असें म्हटलें परंतु स्त्रीपुरुषसंबंध हा सर्वांचा आवडीचा ग्रंथ आहे असें म्हटले म्हणजे त्यावर चांगले जवळ जवळ दहा ग्रंथ लिहिले जावेत यात आश्चर्य नाही. त्यापैकी सौ. कमलाबाई टिळक याचा 'स्त्रीजीवन-विषयक काहीं प्रश्न' हा ग्रंथ आणि आहिताग्नि श्री. शंकर रामचंद्र राजवाडे याचा 'नासदीय-सूक्तभाष्य' हा ग्रथ, हे दोन जवळजवळ ठेवून वाचले म्हणजे बेगडी पांडित्य आणि खरें पांडित्य यामधील फरक कोणाच्याहि तावडतोब नजरेस भरण्यासारखा आहे. या विषयावरील अितर ग्रंथ पहिल्या वर्गांत येत असल्याकारणाने त्याचा वेगळा अुल्लेख करण्याची जरूरी नाही. अुपर्युक्त विदुषींना अचूक विधानें करणे आणि सिद्धान्त सिद्ध करणें हें कशाशीं खातात याचा देखील पत्ता असलेला दिसत नाही. त्यांच्या असख्य अचूक विधानापैकी एक दोन विधानें आणि अचूक सिद्धान्तापैकी अेक दोन सिद्धान्त अुपलब्ध म्हणून येथे देतों, 'संततिनियमनाने लोकसंख्या वाढत जाऊन, अिटली–जर्मनीसारख्या पाश्चात्य देशापुढें जो प्रश्न आज येऊन पडला आहे' पा. ५४, 'ब्राह्मणाच्या कंटाळवाण्या आणि निर्जीव अशा कर्मकांडाच्या वेटोळ्या-मधून निसटण्याची ती शेवटची धडपड होती. शीख व जैन धर्माचा या प्रतिक्रियेपासून जन्म झाला' पा. १० या विधानावर भाष्य न करणेंच उत्तम. स्त्रीजीवनविषयक सिद्धान्त म्हणून जे काही बाईंनी मांडले आहेत ते, आज जीं समाजात प्रचलित मतें आहेत तीं अगदी शास्त्रीय पद्धतीने सिद्ध झालेलीं आहेत, तीं सिद्ध करावयाचें कारण नाही, अशा अभिनिवेशाने मांडले आहेत. खरोखर सामाजिक सिद्धान्त मांडताना देखील पुरावा देण्याची पद्धती अवलं-बावी लागते. हा पक्ष त्याना संमत असलेला दिसत नाही. अेकच अुदाहरण घेऊं. 'हिंदुस्थानात माताची मृत्यु संख्या अितकी अफाट असण्याचीं अनेक कारणें आहेत' पा. ३८ त्यापैकी बालवयांत माता होणें हें अेक कारण देऊन त्या म्हणतात, 'भारतीय महिलापरिषदेने

मुलींच्या विवाहाचें किमान वय अठरा असावें अशी मागणी केली आहे ती योग्यच आहे' पा. ३९, एकदा परिषदेने मागणी अठ्ठावीस किंवा अडतीस केली तरी ती योग्यच ठरेल. परंतु लेखिका, महिलापरिषद् आणि जोशी कमिटी यानी बालवयी मातृत्व आणि स्त्रियांची मृत्युसंख्या यामध्ये कार्यकारणभाव अजून दाखविला नाही अितर्केंच. तुमच्या जोशी कमिटीच्या निर्णयाच्या अगदी आधुनिक पद्धतीने श्री. गो. म. जोशी यानी आपल्या हिंदूंचें समाजरचनाशास्त्र या ग्रंथांत चिंधड्या अुडवल्या आहेत हें आपणास माहीत नाही असें दिसतें. बाईच्या अेकूणअेक लिखाणाला शास्त्र लावण्याचा प्रयत्न केल्यास भोपळा शिल्लक राहील असें जाहीर विधान येथे करून ठेवतों.

खरोखर समाजाचें कल्याण असावें असें मानणारा मनुष्य प्रथमतः स्त्री कशी आहे याचा यावच्छक्य अभ्यास करील आणि मग त्या दृष्टीने स्त्रीजीवनविषयक प्रश्न सोडविण्यास घेईल. या विषयावर प्रचंड शास्त्रीय वाङ्मय तयार झालेलें आहे. अुदाहरणार्थ डॉ. वॉएरचें 'काते, तूं कशी आहेस!', प्लॉस आणि बार्टेलकृत 'स्त्री', हॅवेलाक एलिसकृत 'स्त्री आणि पुरुष'; परंतु अशा तऱ्हेच्या ग्रंथाचा बाईंना पत्ताहि नाही. शारीर आणि मानसशक्तींचा थोडासा अजमास लागल्यानंतर मग संस्कृतीने त्यामध्ये काय नियमन होईल हा प्रश्न उत्पन्न होतो. बाईच्या मताने स्त्रीजीवनविषयक काही प्रश्न असे म्हटलें की अेकंदर् सर्व प्रश्नाचा बोध होतो; परंतु स्त्री आणि हिंदुस्त्री हीं पदें अेक नव्हेत, हिंदुस्त्री आणि ब्राह्मणस्त्री हीं पदेंहि अेक नव्हेत आणि त्याचे प्रश्नहि एकरूप नाहीत.

अुलट रा. राजवाडे यांचें 'नासदीय सूक्त' वाचलें म्हणजे कामशास्त्र हें कसें असतें याची स्फुट कल्पना येअूं लागते. बुद्धीला तें समजावून घेण्याची हिंमत असलेल्या प्रत्येक तरुणतरुणीने हें जीवनातील आत्यंतिक आनंदाचें शास्त्र समजावून घ्यावें असें आमचें मत आहे, परंतु तें सौ. टिळक आणि त्याच तऱ्हेचे अितर लेखक याच्याकडून मात्र समजणें शक्य नाही. कामाचा शब्द, रूप, रस, गंध, स्पर्श वगैरे दृष्टींनी विचार व्हावा लागतो. संभोगाचा स्त्रीपिंडावर अितका परिणाम होतो की थोड्याच वेळात पुरुषाच्या रेताचा गंध तिच्या श्वासोच्छ्वासाला येअूं लागतो ही गोष्ट किती फाकड्या तरुणाना माहिती असते! स्त्रीपिंड आणि पुरुषपिंड हे या दृष्टीने समान नाहीत. स्त्रीपिंडाची संभोगसंस्कारक्षमता पुरुषपिंडांत नाही, त्यामुळे अेतद्विषयक बाबतींत स्त्रीपुरुषाना समान हक्क असूं शकत नाही. श्री. राजवाडे यानी आपल्या ग्रंथांत कामविषयक सर्व बाबतींत जें अमूल्य ज्ञान दिलें आहे तें अवर्णनीय आहे. या विषयावर झालेले अितर ग्रंथ आपले मामुली, म्हणजे ज्या वेळीं समाजात जे मत प्रचलित असेल तें बरोबरच असलेंच पाहिजे असेंच मानणारे आहेत.

काही ग्रंथ जातिभेद आणि अस्पृश्यता या विषयासंबंधी आहेत. त्यांमध्ये देखील समाजरचनेचीं मूलतत्त्वें कोणतीं, समाजरचना कशी असते आणि कशी असावी या मूलभूत तत्त्वासंबंधी आपणाला कांहीहि सापडणार नाही. फक्त अुखाळ्या पाखाळ्या आणि अेकमेकांचा अधिक्षेप. हे ग्रंथ वाचले म्हणजे थॉमस कार्लाइलच्या 'So, however are men made. Creatures who live in confusion; who once thrown together can readily fall into that confusion of confusions which quarrel is, simply because their confusions differ from each other, still more because they seem to differ' — The French Revolution, Vol.II, P.227.

या सर्व भानगडीमध्ये ख्रिस्तीधर्मप्रचारावर सरासरी दहा ग्रंथ तरी अहवालाच्या साली मराठींत प्रसिद्ध झाले आहेत. यावरून ख्रिस्ती पाद्री आपल्या धर्माचें रक्षण करण्याच्या आणि धर्माचा प्रसार करण्याच्या बाबतींत किती जागरुक आहेत ही गोष्ट प्रत्येकाने लक्षात ठेवण्यासारखी आहे. किरकोळ विषयावर जे ग्रंथ आले आहेत त्यामध्ये माहिती अगर मार्गदर्शक या दृष्टीने विचार करण्यासारखा ग्रंथ दिसत नाही. हिंदूंच्या चळवळीचें ध्येय व धोरण अशासारखा तात्कालिक चळवळीच्या दृष्टीने मार्गदर्शक असा अेखादा ग्रंथ जरी सापडला तरी अेकंदरींत पाहता असे ग्रंथ अभावरूपानेच तळपत आहेत.

अेकंदरीने पाहतां धर्मशास्त्र काय अगर समाजशास्त्र काय, याच्या मूलतत्त्वांची आणि परस्परविरोधी सत्कल्पनांची (hypotheses) युक्त पद्धतीने मीमांसा करून त्याची अधरोधर व्यक्ति ठरविण्याचे बाबतींत मनुष्याच्या मनाला मदत करील अशा तऱ्हेचा ग्रंथ मागील वर्षांत झालेला दिसत नाही. श्री. गाडगीळ, गोरे आणि जावडेकर याचे ग्रंथ निदान शुद्ध माहितीच्या दृष्टीने बरे आहेत, परंतु समाजशास्त्रात निर्णयाला मदत करण्यासारखे नाहीत. समाजशास्त्राचीं अंगें-उपांगें पाहूं लागल्यास अेक अंग जें अर्थशास्त्र त्यावर परीक्षणाच्या वर्षांत अेकहि ग्रंथ झालेला नाही. असें का व्हावें तें समजत नाही. अितके साहित्यिक आज मराठी भाषेला नटविण्याकरिता खपत असून अर्थशास्त्रावर अेखादा ग्रंथ नसावा हें मोठें आश्चर्यच म्हटलें पाहिजे. कामशास्त्रावर चार दोन ग्रंथ दिसतात परंतु त्यामध्ये श्री. राजवाडे याचा अेक ग्रंथ सोडून दिल्यास नाव घेण्यासारखा ग्रंथ नाही. अलीकडे मनोविश्लेषणात्मक वाङ्मय होअूं लागलें आहे परंतु मनोविश्लेषणाचीं मूलतत्त्वें काय आहेत त्याची माहिती देणारा अेखादा ग्रंथ अेखादा साहित्यिक लिहील तर बरें. परंतु तसें काम कोणत्या तऱ्हेने परीक्षणाच्या सालीं झालेलें नाही. मनोविश्लेषण अेवढीच काही मानसशास्त्रीय पद्धती जगात अस्तित्वात नाही. दुसऱ्याहि पद्धति आहेत परंतु त्याची महाराष्ट्रसाहित्याला माहिती असलेली दिसत नाही. लैंगिक-सामाजिक परिणाम कसे अजमावावेत ते दाखविणारे ग्रंथ नाहीत. तरी देखील संततिनियमन आणि वेश्यावृत्ति यावर असंबद्ध (in vacuum) चर्चा करणारे ग्रंथ आहेत; प्राणिशास्त्र, आनुवंश शास्त्रावर ग्रंथ नाहीत, शेतकी अर्थशास्त्र कोठे दिसत नाही. समाज शास्त्राला पोषक अशा अुपांगाची जर यादी करावयाचें ठरविलें तर आपणाला असे दिसून येअील की यांतील अेकाही शास्त्रावर श्रम करावयाला बुद्धिमान महाराष्ट्र तयार नाही. ज्याप्रमाणे समाजशास्त्राचीं सर्व साधारण अंगें अुपांगें याच्यासंबंधी फारसें कोणत्याहि तऱ्हेचें काम झालेलें नाही त्याप्रमाणेंच अर्थशास्त्रातहि फारसें काम झालेलें दिसत नाही.

धर्म आणि समाजशास्त्र याचे परस्परसंबंध काय असतात याबद्दल यावच्छक्य निर्णायक शंका झाली तर तेंहि अुपयुक्त असतें. म्हणजे धर्मकल्पना आणि समाजाच्या नैतिक कल्पना यांच्यामध्यें काही समन्वय असतो किंवा नाही, आणि असल्यास तो कोणत्या तऱ्हेचा असतो, अशा तऱ्हेने धर्म आणि नैतिक कल्पना याच्यामध्यें अव्यभिचारी संबंध असल्यास धर्माचें स्वरूप कळल्याबरोबर त्या त्या समाजाच्या नैतिक पद्धतीहि ताबडतोब सांगता येतील.

धर्मशास्त्र आणि समाजशास्त्र याच्या दृष्टीने महाराष्ट्रवाङ्मयाची मागील वर्षांतील प्रगति काही अुत्साहजनक नाही असेंच शेवटीं कष्टाने म्हणावें लागतें.

## अितिहास-राज्यशास्त्र-अर्थशास्त्र-नागरिकशास्त्र

मराठी भाषेंतील वाङ्मय समृद्ध व्हावें, तींत प्रसिद्ध होणारीं सर्व विषयांवरील पुस्तकें प्रतिवर्षी कांही प्रमाणात वाढत जावीं, हें म्हणणें अगदी ठोकळ मानाचें आहे; आणि तशीं पांचपंचवीस पुस्तकें सरकारी यादींत सहज आढळत असल्यामुळे प्रगति ठीक चालली आहे असेंहि कोणी म्हणेल. परंतु तें अुपयोगाचें नाही. कारण जरी अिंग्रजीसारख्या समृद्ध भाषेंतील ग्रंथसंपत्तीशीं आपल्या मराठींतील ग्रंथसपत्तीची तुलना करणें प्रशस्त नसलें, तथापि आपल्या भाषकांच्या गरजा आणि आपल्या लेखकांची व अभ्यासकांची अनुकूलता याचा विचार या बाबतींत अवश्य केला पाहिजे. आणि जर आपल्या गरजा हल्लींच्या ग्रंथसंपत्तीने भागविल्या जात नसतील किंवा आपल्या अभ्यासकांना व लेखकाना या ग्रंथनिर्मितीच्या क्षेत्रात पुरेसें साहाय्य मिळत नसेल तर आपली प्रगति समाधानकारक होत नाही, अशीच खूणगाठ मनाशीं बांधली पाहिजे.

तसें म्हटलें तर प्रस्तुत विषयावरील मराठींतील ग्रंथनिर्मितीचा पुरस्कार करण्याला केवळ 'मराठी भाषेंतील सर्वसामान्य ज्ञानसंग्रह वाढावा' या अगदी ठोकळ आकांक्षेपेक्षा हिंदुस्थानांत आणि विशेषतः महाराष्ट्रांत अधिक जिव्हाळ्याचें असे कारण आहे.

आपला देश परतंत्र असल्यामुळे स्वातंत्र्यासाठी झगडा करणें हें त्यातील प्रत्येक मनुष्याचें आद्य कर्तव्य आहे. प्रचलित जगामध्ये हें आद्यकर्तव्य लोकसंमतीच्या मार्गानेच संपादावयाचें असल्यामुळे त्यासाठी राजकीय शिक्षण लोकांना अवश्य मिळालें पाहिजे. अितिहास, अर्थशास्त्र, राज्यशास्त्र, नागरिकशास्त्र हे विषय म्हणजे राजकीय शिक्षणाचा गाभा म्हणूनच समजले जातात. आणि यासाठीच जगातील सर्व शिक्षणपद्धतींमध्ये या विषयाचा अविकल्पाने समावेश केला जातो.

### शालेय पुस्तकें

आपल्या देशातहि लोकलज्जेस्तव या विषयाची शालेय व विद्यापीठीय अभ्यासक्रमात वर्णी लागलेली आहे; परंतु आंग्लधार्जिणी नोकरशाही, अैक्याच्या मृगजळामागे धावणारे राजकीय पक्ष, तक्रारखोर समाजाच्या समाधानासाठी चालविलेल्या दण्डुकेशाहीची भीति आणि पुस्तकांची निवड करणाऱ्या समित्यामध्ये थैमान करणारी वशिलेबाजी यामुळे अशा कामीं निवड केलीं जाणारीं पुस्तकें म्हणजे बहुताशीं नीरस व निर्गुण मजकुराचा नमुना ठरत असलीं तर त्यात नवल वाटण्यासारखें काही नाही. अेका स्नेह्याने थोडासा सत्यप्रतिपादनाचा आग्रह धरिताच त्याला आपल्या अेका शालेय पुस्तकाच्या बाबतींत किती त्रास झाला याची तपशीलवार माहिती आम्हांला असल्यामुळे जरी या वस्तुस्थितीचा दोष लेखकाच्या माथीं मारणें अुचित वाटत नसलें, तथापि तशा प्रकारच्या श्री. भिडे, चितळे, जोशी प्रभृतींच्या चार सहा पुस्तकांची निपज (कांही पुनरावृत्ति व काही अेक दोन गोष्टीवजाच) ही आपल्या आढाव्यात तितकी महत्त्वाची नाही असेंच कोणाचेंहि मत पडेल.

मंजुरी देणारांच्या डोळ्याला डोळा लावून शाळेंतील विद्यार्थ्यांचें फार मोठें गिऱ्हाअीक मिळविण्यासाठी चालणाऱ्या चढाओढीनें, शालेय पुस्तकाचें हें अेक दालन सोडलें तर लोकानुरंजनाचें हीन प्रदर्शन प्रस्तुत विषयाच्या अितर दालनांत लेखकाकडून होण्याचा संभव संपलाच. परिस्थितीचा फायदा घेअून सर्वसामान्य जनतेचें मन अेखाद्या विषयाकडे आकृष्ट झालें असतां त्याच विषयावर ग्रंथनिर्मिति करून लोकाची जिज्ञासा पूर्ण करण्यास झटणें हें केव्हाहि आक्षेपार्ह ठरणार नाही, किंबहुना चतुराअीचेंच ठरेल; परंतु लोकाची त्या दृष्टीची अभिरुचि

आणि म्हणून पुस्तकें खपण्याची शक्यता फारच मर्यादित असल्यामुळे, अशी अेकंदर ग्रंथ-संपत्ति अत्यल्पसंख्यच आहे.

**प्रासंगिक–युद्धविषयक**

'दुसरें महायुद्ध' व 'महायुद्धाचे हिंदुस्थानावर आर्थिक परिणाम' ह्या छोट्या पुस्तिका (pamphlet) अगदीच प्रासंगिक आहेत. तथापि दुसरीचे लेखक श्री. अेस्. अे. डांगे व पी. बी. वैद्य यानी आपलीं समाजसत्तावादी राजकीय व आर्थिक मतें या निमित्ताने फिरून अेकदा स्पष्ट करून माडलीं आहेत. प्रसंगाप्रसंगाने अेखाद्या विशिष्ट मतप्रणालीचें समर्थन करण्यासाठी असल्या छोट्या पुस्तिका म्हणजे लोकशिक्षणाचें अेक प्रभावी साधन असल्यामुळे त्याचा अधिकाधिक अवलंब होणें अवश्य आहे. 'पहिलें महायुद्ध, १९१४-१९१८' या ग्रंथमालेंत श्री. कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर यानी चित्रमयजगत् मासिकात लिहिलेले त्या महायुद्धाचे मासिक आढावे शब्दशः पुनर्मुद्रित केलेले आहेत. श्री. काकासाहेब हे त्या वेळीं भर संपादकीय अमदानींत असल्यामुळे अुपस्थित ज्ञान, ओघवती भाषा आणि मनोरंजक निष्कर्ष या दृष्टींनी ते लेख अेका विवक्षित सरणीचे आणि आदर्शभूत वाटतील. विशेषतः त्यातील युद्ध-वर्णनाचे कामीं त्यानी वापरलेली परिभाषा पुष्कळाना अभ्यसनीय वाटेल.

**तात्त्विक–शास्त्रीय**

प्रचलित परिस्थितीशीं निकटत्वाने निगडित असा तात्त्विक दृष्टीचा आणि चिरस्थायी महत्त्वाचा विषय हाताळणारें म्हणून श्री. श्री. रा. पोतनीस याच्या 'उद्याचें जग' या पुस्तकाचें स्वागत केलें पाहिजे. ग्रंथकाराच्या म्हणण्याप्रमाणे या ग्रंथात 'लोकशाही विरुद्ध झोटिंगशाही' या लढ्याचा अूहापोह केलेला असून उद्याच्या जगात लोकशाहीचें अमरत्वच मनुष्याच्या अनुभवास येईल असें प्रतिपादन केलेलें आहे. असल्या विषयाचे प्रतिपादन आपल्याकडील वाचकाना आणि लेखकानाहि पेलण्याचें सामर्थ्य येण्यास अजून थोडा अवकाश लागणार आहे, असाच कोणाचाहि हें पुस्तक वाचून ग्रह होअील. तथापि या दृष्टीचा पद्धतशीर प्रयत्न करण्याला आता सुरवात केली पाहिजे अशी वेळ येअून ठेपली आहे, याबद्दल मात्र दुमत होण्याचें कारण नाही.

श्री. य. गो. जोशी या ध्येयवादी प्रकाशकाने प्रकाशित केलेल्या वाद-विवेचन-मालेचा या संदर्भात गौरवयुक्त निर्देश करणें अपरिहार्य आहे. श्री. पा. वा. गाडगीळ या कसलेल्या अभ्यासकाच्या संपादकत्वाखाली ही माला निघत असून तींत सुलभ-समाजवाद, फॅसीझम, साम्राज्यशाही, अराज्यवाद या आधीच प्रसिद्ध झालेल्या पुष्पाच्या परंपरेंतील आचार्य जावडेकर याचें लोकशाही आणि श्री. पा. वा. गाडगीळ याचें **मार्क्सचा भौतिकवाद** अशीं दोन पुस्तकें आढाव्याच्या वर्षात प्रसिद्ध झालेलीं आहेत. प्रचलित असलेल्या मतप्रणालींची सुबुद्ध वाचकाना मूलभूत माहिती देण्याच्या अुद्देशाने ही माला चालविलेली आहे. आणि आचार्य जावडेकरानी जरी स्वभावधर्माप्रमाणें आपल्या 'लोकशाही' या पुस्तकात आपल्या आवडत्या संकर-तत्त्वज्ञानाचा शिडकाव केला असला तथापि अितर लेखकानी संकल्पित मर्यादा सोडलेली नाही असें म्हणण्यास हरकत नाही. लोकशिक्षण लघुग्रंथमालेंतील 'आधुनिक राज्य-मीमांसा' भाग १–महायुद्ध पूर्वखंड, हें श्री. शं. द. जावडेकर याचें पुस्तक विविक्षित दृष्टिकोनाने बहुताशीं 'युरोपीय राज्यशास्त्रज्ञाच्या मीमांसाचाच विचार' करण्यासाठी लिहिलेलें आहे. जावडेकरांचा दृष्टिकोण त्यांच्या कोणासहि हेवा वाटेल अितक्या प्रभूत लेखांच्या व ग्रंथाच्या

वाचनानंतरहि आता कोणास अपरिचित राहिला असेल अशी भीति बाळगावयास नको. तथापि त्याच्याच शब्दात सागावयाचें तर म. गांधींचें 'सत्याग्रही तत्त्वज्ञानाचें खरें स्वरूप केवळ राष्ट्रवादी नसून युरोपांत जन्म पावलेल्या व्यक्तिवाद, राष्ट्रवाद व समाजवाद या तीनहि सामाजिक तत्त्वज्ञानाहुन भिन्न, पण या तिहींचाहि सुंदर समन्वय करणारें असें तें अेक चौथें स्वतंत्र तत्त्वज्ञान आहे, आणि त्याची राज्यमीमांसाहि सर्वांहून भिन्न आहे' असें प्रतिपादन करण्यासाठी हें पुस्तक लिहिलेलें आहे. यामुळे या पुस्तकामध्ये स्वतंत्रतेने अभ्यास किंवा विचार करणाराला आवश्यक असणाऱ्या प्रतिपाद्य विषयाच्या सर्वच पैलूंचें दर्शन घडण्याची सोय झालेली नाही, हें वरवर वाचणाऱ्या कोणाच्याहि प्रत्ययास येअूं शकेल. याच्या अुलट श्री. देवगिरीकर याचा 'वसाहतींचें स्वराज्य' हा ग्रंथ तद्विषयक अभ्यासाचें अेक प्रामाणिक प्रतीक म्हणून जिज्ञासूंपुढे माडता येण्यासारखा आहे. अलीकडील हिंदी राजकारणामध्ये हिंदुस्थानचें अंतिम ध्येय लवचिक व स्वयंवर्धिष्णु असें आणि प्रतिपक्षाला समजूं व पटूं शकेल असें वसाहतींचें स्वराज्य असावें की काँग्रेसच्या आकस्ताळी प्रचाराप्रमाणे आणि ज्याच्या व्याख्या वारंवार लहरीप्रमाणे बदलत आहेत त्या स्वरूपाचें 'संपूर्ण स्वातंत्र्य' हें असावें असा अेक वाद राजकीय पुढाऱ्यामध्यें चालू असतो. त्या वादातील वस्तु श्री. देवगिरीकराच्या प्रस्तुत परिश्रमपूर्वक तयार केलेल्या सुबोध पुस्तकावरून सर्वसामान्य मराठी वाचकाच्या हस्तगत झाली आहे, हा या वर्षाने मिळविलेला महत्त्वाचा लाभ आहे. आणि यद्यपि देवगिरीकराचा आपल्या राजकीय पक्षाच्या मताचा अभिनिवेश ठिकठिकाणीं डोकावणें अशक्य असलें तथापि तो स्वतंत्र निराळा काढून ठेवण्याअितपत संयमाने चमकत असल्यामुळे, प्रस्तुत ग्रंथाची अुपयुक्तता अबाधित राहिली आहे. याशिवाय घटनासमिति (श्री. अच्युत पटवर्धन), घटनापरिषद् (वैद्य) अशा प्रासंगिक विषयांवर अेक दोन चोपडीं प्रसिद्ध झाल्याचें सरकारी यादीवरून दिसतें. शिवाय समाजसत्तावाद हाहि अेक विषय अलीकडे ग्रंथप्रकाशनाच्या क्षेत्रात मोठ्या हिरीरीने प्रविष्ट झालेला दिसतो. भिडे याच्या 'सुलभ समाजशास्त्राचे' चार भाग प्रसिद्ध झाल्याचें सरकारी यादींत नमूद झालेलें आहे. परंतु त्यापेक्षा नागपूरच्या 'पुरोगामी विचार माले'चें ५ वें पुस्तक म्हणून प्रसिद्ध झालेलें श्री. द. ल. जयवंत याचें **'समाजसत्तावाद'** (मनोरथी(!) आणि शास्त्रीय) हें फ्रेड्रीक् एन्जेल्स् या सुप्रसिद्ध ग्रंथकाराच्या 'ॲन्टींडयूरिंग्' (ॲव्हलिंगकृत इंग्रजी भाषान्तर) या पुस्तकाचें भाषान्तर अधिक स्वागतार्ह वाटतें. एन्जेल्स याचें हें पुस्तक मुळातच प्रतिस्पर्ध्याला अुत्तरादाखल लिहिलें असल्याने सुबोध आणि ओघपूर्ण आहे. आणि त्याचे हे गुण प्रस्तुत भाषातरांतहि अुतरले आहेत हें कोणालाहि पटेल.

शास्त्रीय विवेचन ग्रंथांमध्येच अर्थशास्त्रावरील प्रो. वामनराव काळे यांच्या 'बँका आणि त्यांचे व्यवहार' या अेकुलत्या अेका ग्रंथाची नोंद करावी लागेल. प्रस्तुत ग्रंथ हा माहितीच्या दृष्टीने आजतागायत करण्याची लेखकाने काळजी घेतली असली तथापि १९३४ त प्रथम प्रसिद्ध झालेल्या ग्रंथाची ही द्वितीयावृत्तिच असल्यामुळे अर्थशास्त्राचा या वर्षाचा रकाना रिकामाच राहिला आहे असें म्हटलें पाहिजे. नागरिक शास्त्राचीहि तशीच स्थिति आहे. कारण 'तरुण हिंदु नागरिक' हें श्री. न. चिं. केळकर यांच्या पुस्तकाचें पुनर्मुद्रणच आहे.

### अितिहास

अितिहास-संशोधन आणि अितिहास संकलन हा अेक महाराष्ट्राचा अभिनंदनीय विशेष समजला जातो. आणि त्याच विषयाला वाहिलेल्या अनेक संस्था महाराष्ट्रांत असूनहि स्वतःचीं नियतकालिकें कशीं तरी चालविण्यापलीकडे नांव घेण्यासारखी कोणतीच कामगिरी त्या संस्था

करीत आहेत, असें म्हणतां येत नाही. संस्थांबाहेरच्याच लोकांनी या विषयाची आस्था बाळगून स्वतःच्या खर्चानें बारदेसकर गौड सारस्वत ब्राह्मणाचा अितिहास, मराठ्याच्या आपसातील लढाया (भागवत), किल्ले पुरंदर (पुरंदरे), माझा चित्रपट व काशीचा संपूर्ण अितिहास ( भाअूशास्त्री वझे) अशासारखीं पुस्तकें या वर्षी जनतेला सादर केलीं आहेत. शिक्षण आणि पूर्वानुभव या दृष्टीने ह्या पुस्तकाचे सर्वच लेखक निर्दोष ग्रंथरचनेसाठी पूर्णत्वाने सिद्ध होते असें म्हणता येणार नाही, आणि त्याच्या लेखनाबद्दल यथार्थपणें अनेक तीव्र आक्षेप घेता येण्यासारखे आहेत; तथापि या विषयातील प्रयत्न अेकंदरीने काहीसे अनुकरणीय आणि 'किल्ले पुरंदर' हा तर निसंशय अभिनंदनीय आहे.

संस्थान देवास–थोरली पाती–पवार घराण्याचा अितिहास ह्या श्री. मा. वि. गुजर लिखित ग्रंथाचा खास निर्देश करण्याअितका तो ग्रंथ, त्याची पद्धति आणि सजावट या दृष्टींनी महत्त्वाचा आहे. या ग्रंथाच्या यशाचें श्रेय जसें संपादक रा. गुजर याजकडे जातें तसेंच तें आपल्या घराण्याचा अितिहास लिहविण्याचे कामीं उत्साहाने सर्व प्रकारचें साहाय्य करणाऱ्या श्रीमंत विक्रमसिंह महाराजाकडेहि जातें, या गोष्टीकडे महाराष्ट्रातील अितर संस्थानिकानी लक्ष्य देण्यासारखें आहे.

### कुलवृत्तान्त

महाराष्ट्रियाच्या अितिहासप्रेमाचें किंवा काहींच्या टीकेप्रमाणे आत्मगौरवप्रियतेचें प्रतीक म्हणून अगदी अलीकडे रूढ होअूं पाहणाऱ्या कुलग्रंथ-प्रकाशनाच्या प्रथेचें अुदाहरण देता येण्यासारखें आहे. वृत्तान्ताच्या सालात खरे, साठे-साठये, भावे या घराण्याचे सविस्तर कुलवृत्तान्त आणि आपटे कुटुंबीयाची जंत्री अशीं पुस्तकें प्रसिद्ध झालेलीं आहेत. या ग्रंथाच्या निमित्ताने कित्येक अुपयुक्त सामाजिक प्रमेयें (निदान त्या त्या कुटुंबीयापुरतीं) माडण्याची सोय झालेली आहे. या कुलग्रंथाच्या तंत्रात हळूहळू प्रगति होत गेली आणि तुलनेने अेकंदर ब्राह्मणसमाजाच्या गतिस्थितीबद्दल मार्गदर्शक निष्कर्ष काढता येअूं शकले, तर ह्या प्रवृत्तीला निव्वळ अभ्यासाच्या दृष्टीनेहि अुत्तेजन मिळण्यास प्रत्यवाय नाही.

### प्रचलित राजकीय अितिहास

परंतु वस्तुस्थितीचें आणि समकालीन राजकीय परिस्थितीचें अपेक्षित आणि यथार्थ प्रतिबिंब पडलेला, महाराष्ट्राला अनेक दृष्टींनी अभिमान वाटण्यासारखा चालू वर्षातील कोणता ग्रंथ असेल तर तो श्री. वि. अ. पटवर्धन यानी संपादिलेला 'संस्थानातील लोकशाहीचा लढा' हा ग्रंथ होय. देशी संस्थानाच्या प्रजाजनांनी आपल्या म्हटल्या जाणाऱ्या राज्यांत स्वराज्याचे हक्क मिळावे म्हणून प्रतिकूल परिस्थितीशीं चालविलेल्या स्फूर्तिदायक झगड्याचें शक्य तितक्या स्पष्टपणें व शक्य तितकें संपूर्ण असें हें शब्दचित्र आहे. लढाअू महाराष्ट्रापुढील आजच्या अेका महत्त्वाच्या प्रश्नाचें प्रतिबिंब या ग्रंथात पडल्यामुळेच तो ग्रंथ चिरस्मरणीय वाटतो.

### ग्रंथनिर्मिति कशी होअील ?

नियुक्त विषयांवरील हातांत आलेल्या थोड्याशा ग्रंथावरील हा त्रोटक आढावा पुरा करताना या विषयांवरील अगदी थोडी ग्रंथनिर्मिति अधिक समृद्ध कशी होअील याचा विचार करणें अप्रस्तुत होणार नाही. या विषयावरील किंवा तसें म्हटलें तर कोणत्याच विषयावरील अभ्यासकांची संख्या महाराष्ट्रांत कमी आहे असें कोणालाच म्हणता येणार नाही. तेव्हा वाच-

काचा व ग्राहकांचा अभाव अेवढें अेकच सबळ कारण या तुटवड्याचें देता येण्यासारखें आहे. म्हणजे अशा पुस्तकाचा वाचक निर्माण करण्याचा पद्धतशीर प्रयत्न झाला पाहिजे असें झालें. म्हणून वाचकवर्ग निर्माण करण्याचे कामीं या विषयाच्या पद्धतशीर ज्ञानाची वाढ होण्यामध्यें ज्याचे हितसंबंध गुंतलेले आहेत अशा राजकीय पक्षोपपक्षानी चुरशीने परिश्रम केले पाहिजेत, असें आम्ही सुचवितों. चालू प्रश्नावर आपआपल्या पक्षीयांना मार्गदर्शन करण्याचें काम धडाडीने करणारीं वृत्तपत्रें आता आपल्याकडे साधारणपणें बऱ्यापैकी चालतात. परंतु त्याहूनहि अधिक संघटित म्हणजे स्थिरसंख्य वाचकवर्ग निर्माण झाला पाहिजे. कोणतीहि पक्षसंघटना प्रबळ करण्यासाठी परदेशातून लोकप्रिय झालेली पुस्तिकाप्रकाशनाची (pamphleteering) प्रथा आपल्या अिकडे रूढ झाली पाहिजे आणि पुस्तिकालेखनाचा अभ्यासहि लेखकांनीं केला पाहिजे. छोट्या व स्वस्त पुस्तकाच्या माला यशस्वी होण्यासाठी प्रथम प्रथम केवळ वाचक-वर्गावर अवलंबून न राहता संघटित पक्षाच्या निधीवरच त्याचा बोजा टाकावा लागेल. देशाची कधी अेक राष्ट्रभाषा होअील तेव्हा होवो. प्रांतप्रांताच्या भिन्न भाषा आहेत ही सत्यस्थिति डोळ्याआड करून चालणार नाही. आणि म्हणून काँग्रेससारखा अत्यंत प्रबळ पक्षहि मातृ-भाषेतून प्रचारपुस्तिका काढण्याकडे दुर्लक्ष करितो, ह्या औदासीन्याला पायबंदच घालावा लागेल. लोकशाही यशस्वी होण्यासाठी लोकशिक्षण फैलावण्याकडे विशेष लक्ष द्यावें लागेल. आणि लोकशिक्षण फैलावण्यासाठी ललितेतर परंतु जिव्हाळ्याच्या विषयावर स्वस्त किंवा मोफतहि पुस्तिका प्रकाशित कराव्या लागतील.

### मासिकांतील लेख

पुस्तिका-प्रकाशनाने व्हावयाचें कार्य आज काही अंशीं मासिकांतील लेखांनी होअूं शकतें. त्यामुळे पुस्तिका किंवा लघुग्रंथप्रकाशनाची सर्व सिद्धता होअीपर्यंत विद्वान् लेखकानी निरनिराळ्या मासिकातून प्रसंग येअील त्याप्रमाणें ललितेतर विषयावर प्रयत्नपूर्वक लेख लिहि-ण्याचा प्रघात अधिकाधिक ठेवावा असें सुचविल्याशिवाय गत्यंतर नाही. आजकालचीं मासिकें, साप्ताहिकें आणि दैनिकें देखील प्रासंगिक विषयावर अशा प्रकारची माहिती देण्यास अुत्सुक असलेलीं आढळतात. आणि १९४० मधील निरनिराळ्या नियतकालिकातून प्रसिद्ध झालेल्या महत्त्वाच्या लेखांचें निरीक्षण केलें तर अनेक पुस्तिका भरतील अितकी संगतवार माहिती त्याच्या द्वारें वाचकाना मिळाली आहे हें ध्यानात येअील. कांही प्रतिष्ठित मासिकेंच फक्त ललितेतर विषयाना आस्थेने स्थान देताना दिसतात. अितरानी देखील अशा विषयाना अधिकाधिक स्थान द्यावयास पाहिजे. राष्ट्राची प्रतिष्ठा आणि काही अंशीं भवितव्य हें त्यातील घटकाची विद्वत्ता आणि अभिरुची यावर अवलंबून असतें. आणि हे दोन विशेष राष्ट्राची संपत्ति आणि वाङ्मयप्रकाशन यावरून अजमाविण्याचाहि अेक शिष्टसंमत प्रघात आहे. याची जाणीव ठेवून सर्वच नियतकालिकानी थोडासा स्वार्थत्याग करावा लागला तरी त्याला न भितां ललितेतर वाङ्मयाची जोपासना केली पाहिजे. आणि आपल्या भाषेंतील शास्त्रीय आणि लौकिक वाङ्मय कसें वाढीस लागेल आणि त्याला रसवेत्ता वाचकवर्ग कसा प्राप्त होअील याची अहर्निश चिंता वाहिली पाहिजे.

---

## प्राचीन भारतीय संस्कृति व अितिहास

प्राचीन भारतीय संस्कृति व अितिहास या विषयावरील संशोधनात्मक स्वतंत्र ग्रंथ-रचना मराठींत आतापर्यंत फारच थोडी झाली आहे ही गोष्ट मराठी भाषा व वाङ्मय यांच्या अभिमान्यानी लक्षात घेतली पाहिजे. काही वर्षांपूर्वी असा आरोप सामान्यतः सर्वच हिंदी पंडितांविषयी यथार्थत्वाने केला जात असे. पाश्चात्य विद्वानांनी केलेल्या प्राचीन भारतीय संस्कृतिविषयक संशोधनावरच आपल्याकडील प्राध्यापकवर्गाचा व त्यामुळे विद्यार्थ्यांचा मुख्यतः भर असल्यामुळे त्यांच्या हातून या विषयावर कुठल्याहि भाषेंत उच्च दर्जाचें मौलिक संशोधनकार्य झालेलें दिसून येत नाही. अर्थात् त्या कालातहि सर रामकृष्ण भांडारकर, डॉ. भाअू दाजी, पंडित भगवानलाल अिंद्रजी अित्यादि असामान्य संशोधक हिंदुस्थानात निर्माण झालेले आहेत ही गोष्ट खोटी नाही; परंतु अेकंदरींत पाश्चात्य पंडितानी केलेल्या पुराणवस्तुसंशोधन, प्राचीनग्रंथसंपादन, अितिहाससाधनसंग्रह अित्यादि अनेकविध प्रचंड कार्यांच्या मानाने तत्कालीन हिंदी संशोधकाची या प्रांतातील कामगिरी फारच अल्प आहे असें म्हणावें लागतें. मागील अेका अखिल भारतीय प्राच्यविद्यापरिषदेंतील वेदविभागाच्या आपल्या अध्यक्षीय भाषणांत डॉ. बेलवलकर यानी या घटनेस अुद्देशून पुढील सार्थ अुद्गार काढले आहेत– "आपण आपल्या मालकीच्या जमिनीची परिश्रमपूर्वक मशागत करीत नाही. परकीय लोक येतात, आपल्याच देशात पीक पिकवितात व तें घेअून निघून जातात."

सुदैवाने ही स्थिति अलीकडे मोठ्या झपाट्याने बदलत चालली आहे. हिंदुस्थानातील अनेक विद्यापीठानी प्राचीन भारतीय संस्कृति व अितिहास या विषयास उच्च पदवीपरीक्षेसाठी मान्यता देअून या विषयाच्या अभ्यासास चांगलीच चालना दिली आहे. काही विद्यापीठानी तर या विषयासाठी स्वतंत्र ज्ञानशाखा निर्माण केली आहे व तेथे विद्वान अध्यापक व त्याचे विद्यार्थी आज अुत्तम प्रकारचें संशोधनकार्य करीत आहेत. प्राचीन भारतीय संस्कृति या ज्ञानशाखेंत भारतीय सामाजिक व राजकीय संस्थाचा अुद्गम व विकास, भारतीय धर्म व तत्त्वज्ञान, ताम्रपट आणि शिलालेख याचें संशोधन व संपादन, प्राचीन नाणकशास्त्र व मूर्तिविज्ञान, तौलनिक भाषाशास्त्र, संस्कृत व प्राकृत वाङ्मयेतिहास आणि विशेषतः प्राचीन भारताचा अितिहास अित्यादि विषयांचा अन्तर्भाव होतो. हिंदुस्थानातील निरनिराळीं विद्यापीठें व प्राच्यविद्यासंशोधनसंस्था या केन्द्रातून अुपर्युल्लेखित सर्व विषयावर अुच्च प्रकारची मौलिक संशोधनात्मक ग्रंथसंपत्ति आता निर्माण होत आहे. केवळ प्राच्यविद्यासंशोधन या विषयास वाहिलेलीं अनेक नियतकालिकें आज आपल्याकडे प्रसिद्ध होत आहेत ही गोष्ट वरील विधानास चांगलीच पुष्टि देअील; परंतु हें सर्व लिखाण सामान्यतः अिंग्रजी भाषेंतच प्रसिद्ध होत आहे हें लक्षात घेतलें पाहिजे. आपल्या संशोधनाचा परिचय हिंदुस्थानातील सर्व प्रान्तात व हिंदुस्थानाबाहेरील इतर देशांत या विषयाच्या अभ्यासकांना करून द्यावयाचा असल्यास मुख्यतः अिंग्रजी भाषेचाच माध्यम म्हणून अुपयोग करावा लागतो; व त्याबद्दल त्या संशोधकाना फारसा दोषहि देता येणार नाही. अेतद्देशीय भाषात असें संशोधनात्मक लिखाण फारसें निर्माण होत नाही याचें खरें कारण हेंच होय. शिवाय अशा शास्त्रीय स्वरूपाच्या ग्रंथाचा व निबंधाचा प्रचार विश्वविद्यालयीन अध्यापक व विद्यार्थिवर्ग याच्यातच विशेषतः होत असतो. आपल्याकडील विद्यापीठात अजूनहि अिंग्रजी भाषेसच प्राथम्य व प्राधान्य असल्यामुळे असें लिखाण अिंग्रजी भाषेंतच लिहिण्याची प्रवृत्ति वाढत जाते. परंतु

ही स्थिति बदलली पाहिजे व जसजशी प्रादेशिक विद्यापीठांची संख्या वाढत जाअील तसतशी ती बदलेलहि यांत शंका नाही. अर्थात् या कार्याचा प्रारंभ म्हणून आतापासूनच संशोधकानी आपल्या शास्त्रीय लिखाणपैकी काही भाग तरी आपल्या मातृभाषेंत प्रसिद्ध करावयास लागलें पाहिजे. त्यामुळे त्या लिखाणाची व्याप्ति विश्वविद्यालयापुरतीच मर्यादित न राहता अधिक विस्तृत होअील. शिवाय लोकशिक्षणाचें खरें कार्य करण्यास मातृभाषेचाच आधार घेणें अिष्ट आहे हेंहि विसरून चालणार नाही.

मागील वर्षी प्राचीन भारतीय संस्कृति व इतिहास या विषयावरील संशोधनात्मक स्वतंत्र ग्रंथ मराठी भाषेंत जवळ जवळ मुळीच निर्माण झाले नाहीत, एवढेंच नव्हे तर निरनिराळ्या नियतकालिकांत प्रसिद्ध झालेले या विषयावरील संकीर्ण लेखहि संख्येने फार नाहीत ही गोष्ट महाराष्ट्र साहित्य परिषदेने पुरविलेल्या वाङ्मयसूचीवरून सहज कळून येण्यासारखी आहे. त्यापैकी कांही लेखांचें शीघ्रसमालोचन केल्यास मराठी लेखकाची या विषयांतील कामगिरी कोणत्या प्रकारची आहे हें स्पष्ट होईल. या विषयाशीं संबद्ध असलेल्या कांही ग्रंथाचा व निबंधाचा विचार इतर समालोचकांनी केला असल्यामुळे अर्थातच ते ग्रंथ व निबंध येथे विचारात घेतलेले नाहीत.

प्राचीन भारतीय संस्कृतीच्या अभ्यासासच वहिलेलें मासिक म्हणून पंडित सातवळेकर यांच्या 'पुरुषार्था'चा प्रामुख्याने अुल्लेख केला पाहिजे. पंडितजींचें एतद्विषयक कार्य खरोखरच अत्यंत आदरणीय आहे. चारहि वेदसंहिता अपूर्व अशा शुद्ध स्वरूपात प्रसिद्ध करून त्याचा प्रचार सर्वत्र व्हावा म्हणून त्या अत्यंत सवलतीने विकण्याचा त्यानी केलेला अुपक्रम सर्वांस विदित आहेच. ही त्याची आर्यसंस्कृतिसेवा निःसंशय अभिनंदनार्ह आहे. गतवर्षी प्रसिद्ध झालेल्या प्राचीन भारतीय संस्कृतिविषयक लेखांपैकी बहुतेक लेख 'पुरुषार्थ' मासिकांतच प्रसिद्ध झाले आहेत. बाकीचे कांही 'प्रावीण्या'त, अेक 'लोकशिक्षणा'त व अेक 'सह्याद्रीं'त असे प्रसिद्ध झाले आहेत.

प्रथमतः वेदकालीन संस्कृतीचा विचार करावयाचा झाल्यास श्री. सोमण याच्या 'पुरुपार्थो'त प्रसिद्ध झालेल्या 'चार अिन्द्र' या लेखांकाचा अुल्लेख केला पाहिजे. वैदिक देवताच्या मूळ स्वरूपाविषयी आतापर्यंत अनेक पाश्चात्य व भारतीय पंडितानी भिन्न भिन्न मतें पुढे मांडलीं आहेत. 'ऋग्वेदातील अनेक देवतांचें स्थान व स्वरूप याचा निश्चय' करण्याचा संकल्प करूनच श्री. सोमण यानी आपली लेखमाला लिहिली आहे. यापूर्वीहि त्यांचे या विषयावर काही लेख पुरुषार्थातून प्रसिद्ध झालेले आहेत. 'चार अिंद्र' या लेखांत प्रथमतः त्यानी अिन्द्र या शब्दाची व्याख्या करण्याचा प्रयत्न केला आहे. पण त्यांनी अुल्लेखिलेली अिदं + द्र = अिन्द्र, ही व्याख्या आधुनिक भाषाशास्त्रज्ञांना कितपत शास्त्रीय वाटेल याची शंका आहे. ब्राह्मणें आणि अुपनिषदें व निरुक्त यात दिलेली वैदिक शब्दांची व्युत्पत्ति नेहमीच बरोबर असते असें नाही; किंबहुना ती बहुतेक ठिकाणीं काल्पनिकच असते असें म्हणण्यास प्रत्यवाय नाही. अर्थातच या व्युत्पत्तीवरून काढलेले निष्कर्ष कितीहि मनोरंजक वाटले तरी ते शास्त्रीयत्वाच्या कसोटीस कधीच अुतरणार नाहीत. श्री. सोमण याच्या समग्र विवेचनाचें टीकात्मक परीक्षण करावयाचें झाल्यास अेक स्वतंत्र लेखच लिहावयास लागेल. (प्रस्तुत समालोचकाने भांडारकरप्राच्यविद्यासंशोधनमंदिराच्या संशोधनपत्रिकेंत व अितर कांही ठिकाणीं

१ 'पुरुषार्थ'— १९४० जानेवारी, फेब्रुवारी, एप्रिल.

लिहिलेल्या अिंग्रजी लेखांत निरनिराळ्या वैदिक देवताविषयी सांगोपांग विचार केलेला आहे.) तौलनिक भाषाशास्त्र व तौलनिक देवताशास्त्र यांच्या मूलगामी अभ्यासामुळे वेदवाङ्मयावर अलिकडे अगदी नवीनच प्रकाश पडला आहे. परंतु श्री. सोमण यांनी या दोहोंपैकी कुठल्याहि शास्त्राचा आधार न घेतल्यामुळे त्याचें विवेचन अेकागी झालें आहे. इंद्र या देवतेचें स्वरुप सिद्ध होण्यास अनेक विचारप्रवाह कारणीभूत झाले आहेत ही गोष्ट निर्विवाद आहे; परंतु त्यामुळे अिन्द्र चार आहेत असें म्हणणें फारसें सयुक्तिक होणार नाही. 'ऋग्वेद' याचा श्री. सोमण यांनी केलेला 'बृहद् गोल' असा अर्थ व 'ऋग्वेदाचें रहस्य अुघड करून सागण्यासाठी व्यासांनी महाभारत रचिलें' हें त्याचें विधान यावरूनच त्याच्या वेदविषयक विचारसरणीची कल्पना वाचकास चागल्या प्रकारें येईल. "दोन सूर्य हें यास्काचार्यादि प्रदीर्घ अभ्यासकांचे स्वप्नातहि न आलेलें व अर्ध्याअधिक ऋग्वेदावर तत्त्वतः प्रकाश पाडणारें रहस्य असून भौतिक शास्त्राचे दृष्टीने त्याचें दिग्दर्शन" करण्याची प्रतिज्ञा करून लिहिलेल्या श्री. सोमण याच्या 'दोन सूर्य'[२] या लेखातील भूमिकाहि आधुनिक संशोधकांस न पटणारी अशीच आहे. या लेखांतील "सोम हें सूर्याचेंच अेक नामान्तर आहे," "'अंधसूर्य अथवा सूर्यगोल' आणि 'उपटसुंभ, वातावरणात बनलेलें सूर्यबिंब' या दोन सूर्यांचें अलंकारिक वर्णन ऋग्वेदांत अनेक ठिकाणीं आलें आहे", हीं व असलींच अितर विधानें म्हणजे केवळ कल्पनेच्या भराऱ्याच वाटतात. आपल्या विधानाच्या पुष्टयर्थ श्री. सोमण यानी आधुनिक भौतिक शास्त्राचाहि अुल्लेख करून त्यास 'शास्त्रीय' स्वरूप देण्याचा प्रयत्न केलेला आहे. परंतु हल्ली उपलब्ध झालेल्या शास्त्राच्या ज्ञानावरून वेदवाङ्मयाच्या अर्थाविषयी कल्पना करीत जाणें हें अैतिहासिक दृष्ट्या फारसें 'शास्त्रीय' ठरणार नाही. श्री. सोमण याची वेदवाङ्मयविषयक मूळ भूमिकाच फारशी समाधानकारक नाही. अर्थात् वेदविषयक प्रश्न हे अद्यापिहि 'अनिर्णीत प्रश्न' आहेत असें मान्य केल्यास श्री. सोमण याच्या लेखाचें 'पुढील संशोधनास साहाय्यभूत होणारी अशी अेक दृष्टी' या नात्याचें महत्त्व लक्षात येईल. वेदाभ्यासास चागलीच चालना दिल्याबद्दल मात्र त्याचे आताच आभार मानिले पाहिजेत. आपल्या विधानांच्या पुष्टयर्थ जागोजागीं वेदवचनाचा आधार देण्याची त्याची पद्धतिहि योग्य अशीच आहे.

वेदातील 'पुरुषसूक्त'[३] हें युद्धातील अेका व्यूहपद्धतीचें— पुरुषव्यूहाचें— वर्णन आहे ही श्री. ताडपत्रीकर याची कल्पना अभिनव असली तरी चिकित्सक बुद्धीस फारशी समाधानकारक वाटणारी नाही. वेदोत्तर लगेच निर्माण झालेल्या ब्राह्मणादि वाङ्मयात या कल्पनेचा पुरस्कार कोठेहि केलेला नाही ही गोष्ट या संदर्भात लक्षात घ्यावयास हवी. शिवाय ब्राह्मणाची योजना या पुरुषव्यूहाच्या तोंडाशीं— आघाडीला— होत असे ही कल्पनाहि वेदकालीन समाजव्यवस्थेच्या दृष्टीने योग्य वाटत नाही. 'वेदामधील युद्धकला'[४] व 'वैदिककालची युद्धाची तयारी'[५] हे 'पुरुषार्थां'तील लेख संकलनात्मक असून त्याच्या द्वारा लेखकाने वेदकालीन संस्कृतीच्या अेका महत्त्वाच्या अंगावर चागलाच प्रकाश पाडला आहे. या लेखातील विधानाच्या पुष्टयर्थ प्राधान्याने अथर्ववेदातील वचनें अुद्धृत केलीं आहेत हें अुचितच आहे. कारण अथर्ववेदास 'क्षत्रियांचा वेद' असेंहि म्हणण्याचा यथार्थ प्रघात आहे. अथर्ववेदाच्या मूलगामी अभ्यासाचें महत्त्व आता विद्वान् लोकांस पटूं लागलें आहे ही आनंदाची गोष्ट होय. ऋग्वेद हा विशिष्ट

२ 'पुरुषार्थ'— १८४० नोव्हेंबर, डिसेंबर. ३ 'पुरुषार्थ'— १९४० जून, जुलै, आगस्ट, सप्टेंबर. ४ 'पुरुषार्थ'— १९४० नोव्हेंबर. ५ 'पुरुषार्थ'— १९४० डिसेंबर.

वर्गाच्या संस्कृतीचा निदर्शक आहे तर अथर्ववेदांत सर्वसाधारण लोकसमूहाच्या संस्कृतीचें प्रतिबिंब पडलें आहे. अर्थात्‌च संहिताकालीन अितिहास व संस्कृति याविषयीं संशोधन करावयाचें झाल्यास अथर्ववेदाकडे दुर्लक्ष करुन चालणार नाही. 'पुरुषार्थां'तील वेदप्रार्थ[9]यनिर्णयविषयक लेख– त्यातील काही भागास संशोधकास न शोभणाऱ्या अभिनिवेशाचा दर्प आला नसता तर– वेदाभ्यासपद्धतींच्या अितिहासाच्या दृष्टीने महत्त्वाचे ठरले असते.

वेदकालानंतर स्मृतिकालाकडे वळल्यास श्री. रानडे याच्या 'स्मृतिकालीन आर्यावर्त' या विषयावरील परिश्रमपूर्वक लिहिलेल्या 'पुरुषार्थां'तील लेखांचा विशेष प्रकारें अुल्लेख केला पाहिजे. प्रमुख स्मृति विचारात घेअून त्याच्या आधारें स्मृतिकालीन समाजव्यवस्था, राज्यपद्धति, न्यायपद्धति अित्यादि गोष्टींचें अुत्तम विवेचन श्री.रानडे यांनी आपल्या लेखात केलेलें आहे. या विषयाच्या अंगोपागावर यूरोपीय भाषेंत अनेक स्वतंत्र ग्रंथ निर्माण झाले आहेत. मराठी भाषेंतहि या विषयाचा सागोपांग विचार व्हावयास पाहिजे. अशा कार्यांचा प्रारंभ या दृष्टीने श्री. रानडे याचे लेख स्वागतार्ह वाटतील. 'नामूलं लिख्यते किंचित्' या संशोधकास अवश्य असणाऱ्या दंडकांचा त्यानी योग्य तो आदर केला आहे. त्यामुळे त्याच्या लेखात विवाद्य असें फारसें काही नाही. 'प्रावीण्या'त प्रसिद्ध झालेले श्री. देशमुख याचे म[10]नुस्मृतिविषयक लेख संशोधनाच्या दृष्टीने मुळींच महत्त्वाचे नाहीत. मनुस्मृति या पुनः पुनः अुल्लेखिल्या जाणाऱ्या हिंदुधर्मग्रंथाचा सामान्य परिचय करून देण्याचा प्रयत्न या लेखात केलेला आहे.

हल्ली युद्धाच्या सावल्या सर्व जगभर पडल्या आहेत; अशा वेळीं आपल्या पूर्वजांच्या युद्धकलेविषयी कुतूहल निर्माण होणें अगदी स्वाभाविक आहे. श्री गाडगीळशास्त्री यानी 'पुरुषार्थां'त या विषयावर लिहिलेल्या लेखांचें[11][12] परिशीलन केल्यास प्राचीन भारतीयानी युद्धशास्त्राचा कसा सूक्ष्म व सर्वांगीण विचार केला होता हें सहज कळून येअील. कौटिलीय अर्थशास्त्र, कामंदकीय नीतिसार, शुक्रनीति, अश्वविद्या-हस्तिविद्याविषयक ग्रंथ, महाभारत, पुराणें इत्यादिकांच्या आधारें शास्त्रीबुवानी आपले लेख चागलेच माहितीपूर्ण केले आहेत. 'व्यूहरचना' हे प्राचीन भारतीय युद्धकलेचें अेक प्रमुख अंग समजलें जात असें. व व्यूहाच्या अनेक पद्धति त्या वेळीं प्रचारांत होत्या. श्री. गाडगीळशास्त्री यांनी या व्यूहांचें साकृतिक वर्णन केलें आहे. त्या वेळचीं शस्त्रें कोणत्या प्रकारचीं होतीं, बंदुकीच्या दारूचा आपल्याकडे केव्हा प्रचार सुरू झाला, वगैरे प्रश्नांसंबंधी अधिक संशोधन होणें अवश्य आहे. श्री. गाडगीळ यांचे हे लेख व मागे अुल्लेखिलेले वेदकालीन युद्धविषयक लेख यांचें मौलिक संशोधन या दृष्टीने फारसें महत्त्व नसलें तरी मराठीतील युद्धशास्त्रेतिहासावरील वाङ्मयाच्या दृष्टीने त्याचें फार मोठें महत्त्व आहे यात शंका नाही.

श्री. भास्करराव जाधव यानी रामायणावर नवीन प्रकाश पाडणारे कांही लेख पूर्वी लिहिले होते. 'सह्याद्रि' मासिकांत प्रसिद्ध झालेला त्यांचा रामायणकालीन विमानविहारविषय[13]क लेख त्यांच्या चिकित्सक बुद्धीची चांगली साक्ष देअील. रामचंद्राच्या काळीं (वाल्मीकीच्या काळीं!) आकाशयानें प्रत्यक्ष अस्तित्वांत होतीं असें मानण्याअितका पुरावा रामायणांत मिळत नाही हें श्री. जाधव याचें मत सहज ग्राह्य होण्यासारखें आहे. श्री. जाधव यानी रामायण-

६ 'पुरुषार्थ'— १९४० ऑगस्ट, सप्टेंबर, आक्टोबर. ७ 'पुरुषार्थ'— १९४० नोव्हेंबर, ८ 'पुरुषार्थ'— १९४० डिसेंबर. ९ 'पुरुषार्थ'— १९४० जानेवारी, मार्च, एप्रिल, मे, जुलै, ऑगस्ट, डिसेंबर. १० 'प्रावीण्य'— १९४० जानेवारी, मार्च, एप्रिल. ११ 'पुरुषार्थ'— १९४० एप्रिल, मे. १२ 'पुरुषार्थ'— १९४० ऑगस्ट, सप्टेंबर. १३ 'सह्याद्रि'— १९४० ऑक्टोबर.

विषयक अितर लहानमोठ्या प्रश्नांसंबंधीं संशोधनात्मक चर्चा पुढे चालू ठेवावी अशी सूचना त्यांस करावीशी वाटते. 'पुरुषार्थ' मासिकांत श्री. पण्डित यानींहि 'रामायणकालीन आर्य-संस्कृति'विषयी अेक लेख लिहिला आहे.[14] श्री. पण्डित हे रामायण हा अेक अितिहासग्रंथ आहे या मताचे पुरस्कर्ते आहेत ही गोष्ट खरी असली तरी त्यानी केलेलें अेकंदर विवेचन शिथिल व हरदासी पद्धतीचें झालें आहे. रामायणाची निर्मिति होण्यास जे तीन प्रमुख विचार-प्रवाह— ऐतिहासिक, प्रतीकात्मक व वेदातार्गत देवताख्यानात्मक— कारणीभूत झालेले आहेत त्यांचा त्यांनी अुल्लेखहि केलेला नाही. शिवाय मूलातील आधार दिल्याशिवाय कुठलेंहि विधान शास्त्रीयत्वाच्या कसोटीस अुतरत नाही या गोष्टीकडेहि श्री. पण्डित यांनी पूर्ण दुर्लक्ष केलेलें दिसतें.

सर्वसाधारण भारतीय संस्कृतिविषयी लिहिलेल्या अेकदोन लेखांचा अुल्लेख करून हें समालोचन पुरें करू. डॉ. हर्षे यांनी मूळ फ्रेंच भाषेंत लिहिलेल्या अेका प्रबंधाचा 'लामार्तीन व हिंदु संस्कृति'[15] हा साराशात्मक अनुवाद 'लोकशिक्षणां'त प्रसिद्ध झाला आहे. संस्कृत विद्येच्या यूरोपांतील प्रसाराचा अितिहास प्राचीन भारतीय संस्कृतीच्या प्रत्येक विद्यार्थ्यास अत्यत अुत्साहवर्धक वाटेल. लामार्तीन या फ्रेंच कवीचा संस्कृत वाङ्मयाशीं परिचय होअून त्याने भारतीय संस्कृति कशी आत्मसात् केली याचें हृदयंगम चित्र परिश्रमपूर्वक संशोधन करून डॉक्टर हर्षे यानी आपल्या विद्वत्तापूर्ण लेखात रंगविलें आहे. परदेशीय पण्डिताच्या प्राचीन भारतीय संस्कृतिविषयक संशोधनात्मक कार्याची व त्याच्या जीवनावर झालेल्या भारतीय संस्कृतीच्या प्रभावाची ओळख मराठी वाचकास अधिकाधिक व्हावयास पाहिजे. श्री. दिवेकर-शास्त्री याच्या 'आर्यसंस्कृतीचें वैशिष्ट्य'[16] या 'पुरुषार्था'तील लेखाचें स्वरूप बरेंचसें प्रचारात्मक आहे. शिवाय त्यांत नवीन असें काही नाही. 'आर्यसंस्कृति व अमर अनुभव'[17] हा लेखहि केवळ स्वमतप्रदर्शक असून त्यात संशोधनाचा भाग मुळीच नाही असें म्हटले तरी चालेल.

—— ——

## साहित्य शास्त्र

गेल्या वर्षात साहित्यशास्त्रावरील महत्त्वाचे असे ग्रंथ झाले नाहीत; परंतु साहित्यचर्चा झाली नाही असें नाही. त्यातील काही ग्रंथपरीक्षणाच्या अनुषंगाने झाली तर काही शास्त्रीय चर्चा करण्याकरिता म्हणूनच झाली. यात 'ज्वाला' या माधव मनोहर याच्या कादंबरीने बरेंच खाद्य पुरविलें आणि त्यातून स्वप्नरंजन, इच्छापूर्ति, दिवास्वप्न अित्यादि शब्दानी बराच धुमाकूळ घातला. आपल्या कादंबरींतील काही अस्वाभाविक आणि विरुद्धतादुष्ट गोष्टींचें समर्थन करण्या-करिता स्वतः माधव मनोहर यानी ती कादंबरी स्वप्नरंजनात्मक आहे व या दृष्टीने तिच्याकडे पाहिलें पाहिजे असा मुद्दा माडिला; अेवढेंच नव्हे तर कला म्हणजे वास्तवापेक्षा 'काही कमी काही अधिक' या अेका पाश्चात्य लेखकाच्या वचनाचा हवाला देऊन ही वास्तवता फडके, खाडेकर याच्या कादंबऱ्यांतूनहि शंभर टक्के सापडत नाही असाहि प्रश्न अुपस्थित केला. यामुळे या कादंबरीचे टीकाकार प्रक्षुब्ध होअून साहजिकच शास्त्रीय चर्चेस प्रवृत्त झाले. गंमत अशी

१४ 'पुरुषार्थ'— १९४० डिसेंबर. १५ 'लोकशिक्षण'— १९४० ऑगस्ट. १६ 'पुरुषार्थ'— १९४० एप्रिल. १७ 'पुरुषार्थ'— १९४० फेब्रुवारी.

झाली की माधव मनोहर यानी आपली कादंबरी ही 'अरेबियन् नाअिट्स्'च्या धर्तीवर लिहिली आहे हें आधी सांगितलें नाही व मागाहून हल्ले झाल्यावर हुलकावणी देअून निसटून दुरून ते हल्ला करणाऱ्यांना हसत राहिले. हा प्रकार अर्थात् टीकाकाराना चीड आणणारा झाला. आजहि त्याना आपली कादंबरी अगदी 'अरबी भाषेतील सुरस गोष्टी'सारखी मानली जावी असें मनातून वाटतें असें नाही. परंतु कादंबरींतील काही दोषास अुत्तर देता येण्याजोगें नसल्याने ती स्वप्नरंजन आहे असें कबूल करून टीकेच्या 'शिडांतील वारा'च त्यानी काढून काढून टाकला. पण यापुढला त्याचा मुद्दा मात्र वादग्रस्त झाला. कादंबरी ही कलाकृति आहे, कोणतीहि कलाकृति सर्वस्वीं वास्तव असत नाही, किंवा असूंहि नये, मराठींतील अितर प्रसिद्ध कादंबरीकाराच्या बाबतींत तसेंच आहे, त्याना जर तुम्ही थोर मानता तर प्रस्तुत कादंबरीवरहि आक्षेप घेअूं नयेत अित्यादि मतप्रणाली हेत्वाभासपूर्ण आहे हें सांगायला नकोच. ब्राह्मणाच्या पंक्तींत बसलेल्या सोनाराच्या गोष्टींतला हा प्रकार झाला. सोंग बरेंच सजलें, पण चित्राहुतीसारख्या तात्रिक गोष्टीमध्यें ते नीट न जमल्याने अुघडकीस आलें; आणि मग त्याने जातिभेद खोटा आहे, अितर ब्राह्मणातहि १०० टक्के ब्राह्मण कोठे आहेत असा वाद करावा यातलीच ही स्थिति आहे. कादंबऱ्यातून स्वप्नरंजन असतें हें खरें आहे, परंतु हॅम्लेटच्या वेडातहि जशी अेक प्रकारची शिस्त असते त्याप्रमाणे चांगल्या वास्तववादी कादंबऱ्यातूनहि स्वप्नरंजनास काही शिस्त असते ही गोष्ट विसरता येत नाही. ती नसल्यास तें स्वप्नरंजन न राहता उन्मत्तक्रीडित होतें. तसेंच थोर कादंबरीकाराच्या काही दोषावर बोट ठेवून निर्वाह होअूं शकत नाही. अुत्तम टेनिसपटु सुंदर टोला मारण्याच्या भरात क्वचित् बाहेरहि चेंडू दवडतो, म्हणून तेवढ्याचेंच अनुकरण करून बरेच वेळा तसें करणारा खेळाडू क्रीडापटु मानला जाणार नाही. या वादातून जे शब्द योजले गेले त्याचा निश्चित अर्थ काय हेंहि स्पष्ट झालें नाही. स्वप्नरंजन म्हणजे काय हें स्पष्ट झाल्यासच तें साऱ्या कलाकृतींत असतें कीं नाही याचा निर्णय करिता येअील. स्वप्नरंजन म्हणजेच अिच्छापूर्ति, म्हणजेच दिवास्वप्न अित्यादि समीकरणें वाचकाच्या अंगावर फेकलीं गेलीं म्हणजे तो साहजिकच बावरतो. Wish-fulfilment, Day dreaming या अिंग्रजी कल्पनाचीं हीं भाषान्तरें आहेत. (दिवास्वप्न या शब्दाचा संस्कृतामध्यें 'दिवसाची झोप' असा साधा अर्थ आहे व ब्रह्मचाऱ्यास ती निषिद्ध आहे.) स्वप्नातील कल्पनानिर्मितीच अभिप्रेत असेल तर ती मात्र चांगल्या कृतींत नसावी हें बरें. वरील शब्दाचें अवडंबर बाजूस ठेवल्यास ज्या व्यवहारातील व्यक्ति व जे व्यवहारातील प्रसंग आपण सांगण्याकरिता म्हणून निवडले त्याच्या स्वभावास अनुसरूनच सारें लेखन व्हावयास हवें एवढें कोणासहि मान्य करावें लागेल. तसें न झाल्यास तें दोषास्पद होअील; त्या दोषाना कितीहि रमणीय नावें दिलीं तरी त्याचें दोषत्व नाहीसें होणार नाही.

केवळ शास्त्रीय चर्चेच्या दृष्टीने झालेली साहित्यचर्चा वऱ्हाडपाडे याच्या 'रसाचें मानसशास्त्र' या लेखमालेंत आली आहे. प्रथमतः बुद्धि व मन अशा अंतःकरणाच्या दोन वृत्ति मूलभूत व व्यापक अशा त्यानी मानल्या आहेत. (मन ही वृत्ति कीं अंतःकरण = अंतरिंद्रिय?) अद्‌भुत आणि हास्य हे दोन रस बुद्धिनिष्ठ आहेत असें त्याचें म्हणणें आहे. कारण बुद्धि-व्यापारच तेथे चालतो. औचित्यानौचित्यविवेक करून अनौचित्य दिसलें की हास्य अुत्पन्न होतें. आणि ज्या ठिकाणीं बुद्धीच चालत नाही तेथे विस्मय निर्माण होअून अद्‌भुताची निष्पत्ति होते. काव्यातील सुंदर कल्पना की ज्यातून अुपमोत्प्रेक्षादि अलंकार निघतात त्या सुद्धा बुद्धिनिष्ठ असा व्यापारच होत. ज्याना भावना असें म्हणतात त्याचें अधिष्ठान मन असून मन व बुद्धि

यांच्या व्यापारांचा जो परस्परसंबंध असतो त्यातून अिच्छा (will) ही अुत्पन्न होते, व तींतूनच अितर ध्येयसिद्धीच्या आड काही आल्यास वीर व रौद्र, ती न झाल्यास करुण, तींत अपयश येण्याचा संभव दिसताच भयानक अशी रसाची अुत्पत्ति होते. काहीहि मिळविण्याची अिच्छा म्हणजेच प्रेम. या प्रेमाच्या व्यापक कल्पनेंत स्त्री, बाल किंवा अीश्वर यांच्याविषयीच्या प्रेमाचा अंतर्भाव होतो, म्हणून अेक प्रेयान् रस कल्पून त्यांतच शृंगार, वत्सल, भक्ति अित्यादि रसाचा समावेश करणें अशक्य नाही. भक्तींत आदरापेक्षा प्रेमाचा भाग अधिक असतो. शांत रसासहि निराळें करण्याचें कारण नाही. कारण त्यातहि जगातील सर्व वस्तूंविषयी प्रेम अुत्पन्न झाल्यामुळेच मिळणारी मनाची शांति येते. हे व या धोरणाने आलेले विचार या लेखमालेंत ग्रथित झाले आहेत. यातील मानसशास्त्रीय चर्चा आपल्याकडे कदाचित् नवीन वाटली तरी पाश्चात्यास ती जुनी वाटेल. मन व बुद्धि यामध्ये खरोखरच भेद आहे काय अशी शंकाहि घेता येणें अलीकडे शक्य झालें आहे. तसेंच भावनास (emotions) अिच्छेखेरीज (will) स्वतंत्र अस्तित्व नसतें काय असाहि प्रश्न करणें शक्य आहे. भावनास (emotions) आधारभूत अशा अुपजत वृत्ति (instincts) कोणत्या आहेत तें पाहून त्यांच्या अनुरोधाने रसोपपत्ति लावणें कदाचित् अधिक अिष्ट ठरेल. अद्‌भुत व हास्य हे रसहि केवळ बुद्धिनिष्ठ नसून त्यास आधारभूत अशा भावना असण्याचा संभव आहे. असे काही प्रतिविचार या लेखातील विचाराच्या जवळच मांडता येतील. तथापि वऱ्हाडपांडे यांची ही लेखमाला साहित्याच्या विद्यार्थ्यांनी सूक्ष्मपणें अभ्यासावी अशीच झालेली आहे.

साहित्यपत्रिकेंतून श्री. मर्ढेकर यांच्या Arts and Man या ग्रंथाचीं दोन प्रकरणें भाषांतरित करण्यात आलीं आहेत. पुढचीं प्रकरणें आल्याशिवाय आजच काही बोलणें योग्य होणार नाही. कला किंवा सौंदर्य यांच्या मीमांसेंत माध्यमालाच अधिक महत्त्व आहे व म्हणून कलाकृतीचा अर्थ, अुपयोग, हेतु अित्यादींचा विचार गौण किंवा अप्रस्तुत ठरतो असें केवळ कलावादी मंडळींस अनुकूल असें मत त्यांनी प्रकट केलें आहे. सादर्यांचें अिंद्रियगोचर असें स्वरूप शुद्ध स्वरूपात मांडणारी ती ललितकला अशी त्यांची व्याख्या दिसते. सौंदर्य म्हणजे वस्तुजातींचा नाद, रंग, गीति अित्यादि जीं विशिष्ट अिंद्रियगोचर अंगें त्यांची, अुपयुक्तता नीति अित्यादि विचारांनी अस्पृष्ट अशी आकर्षकशक्ति. कलेंत किंवा तिच्या आस्वादात बुद्धिव्यापार शून्यावर असला पाहिजे असें त्यास वाटतें व म्हणूनच संगीत ही सर्वश्रेष्ठ कला आणि काव्य ही कनिष्ठ कला असें त्यास म्हणावयाचें आहे. हें आपलें म्हणणें त्यांनी अत्यंत विद्वत्ताप्रचुर आणि त्यामुळे काहीशा क्लिष्ट भाषणाऱ्या पद्धतीने मांडलें आहे. ज्ञानेंद्रियगोचर अशी कोणत्याहि गोष्टीची हेतुरहित आकर्षकता म्हणजे सौंदर्य हें मान्य केलें तरी त्या त्या ज्ञानेंद्रियास संबद्ध अशा ललितकला अद्यापि निघाल्या नाहीत ही गोष्टहि लक्षांत घ्यावयास हवी. सध्याच्या कला श्रोत्र व चक्षु या अिंद्रियांशींच संबद्ध आहेत असें वाटतें. रसन, घ्राण व स्पर्श या ज्ञानेंद्रियांशीं संबद्ध कला कोणत्या ह्याचाहि विचार व्हावयास हवा, व अशा कला नसतील तर आपली ललितकलाविषयक कल्पनाहि अपूर्ण आहे असें म्हणावें लागेल. कलेंतून सहेतुकतेला हद्दपार करताना सारे बुद्धिव्यापारहि दूर सारण्यांत मानसशास्त्रीय वास्तवता साधत नसावी असें वाटतें. समग्र ग्रंथ पुढे नसल्याने यापेक्षा अधिक लिहिणें योग्य होणार नाही. मराठीमध्यें प्रस्तुत चर्चा अपूर्व अशीच गणावयास पाहिजे.

'सौंदर्यशोध व आनंदबोध' ही लोकशिक्षणातली दोन लेखांकातून आलेली चर्चाहि या अवलोकनात अंतर्भूत करावी लागेल. पहिल्या लेखात सौंदर्याविषयीच्या निरनिराळ्या पौरस्त्य

व पाश्चात्य अुपपत्ति थोडक्यात एकत्रित करण्यात आल्या असून दुसऱ्या लेखांकात आनंद-बोधाची तशीच चर्चा केली आहे. पुढील दोन मुद्दे विचाराकरिता प्रामुख्याने पुढे मांडले आहेत. कलाकृतीच्या दर्शनाने होणारा आनंद हा त्या कलाकृतीचा जो अनुकार्य व्यावहारिक विषय, त्याच्या दर्शनाने होणाऱ्या आनंदापेक्षा स्वरूपतः भिन्न असण्याचें कारण नाही व म्हणून केवळ कलावाद चालणार नाही आणि कलावंताना आपलें स्वतःचें असें कुंपण घातलेलें क्षेत्र जीवनात शक्य नाही व त्याच्या आत आरण कधींहि वागूं असें म्हणून चालणार नाही. दुसरें, करुणरसात होणारी मनाची अवस्था निर्मळ आनंदाची नसून दुःखमिश्रित असते हें आजवर केवलाल्हादवादी समजल्या जाणाऱ्या संस्कृत साहित्यज्ञाच्या मतानेहि सिद्ध होतें. याविषयी अधिक चर्चा व्हावी अशी प्रस्तुत लेखकाची इच्छा असल्याने येथें आणखी काहीं न लिहिणेंच बरें.

---

## भाषाविषयक लिखाण

सन १९४०–मधील नियतकालिकातील लेखाकडे ओझरते पाहता दोनच लेख मराठी-विषयक दिसले—(१) गीर्वाण भाषेचा ठेवा व (२) मराठी भाषेचा विस्तार. हे दोन्ही लेख 'महाराष्ट्र विस्तार' या दिल्ली येथे प्रकाशित होणाऱ्या मासिकातील आहेत. यातील गीर्वाण-भाषेचा ठेवा या लेखात रा. चक्रवर्ती राजगोपालाचार्य यांच्या अेका व्याख्यानाचा अनुवाद आहे. त्यात संस्कृत भाषेची महती व तिचे पठनाहित्व हींच वर्णिलीं आहेत. त्यात मराठी-विषयी अक्षरहि नाही. अर्थात् तो लेख येथे विचार्य नाही.

(२) मराठी भाषेचा विस्तार हा लेख ऑक्टोबरच्या अंकात संपादक रा. भास्कर रामचन्द्र खरे यानीच लिहिलेला आहे. हा हल्लीच्या काळीं विशेष विचारणीय आहे. यात पुढील गोष्टी सांगितल्या आहेत.

(क) महाराष्ट्राबाहेर बरींच विश्वविद्यालये आहेत. त्यात प्रायः मराठीस स्थान नाही. तें स्थान तिला मिळावें म्हणून मराठीभाषाभ्यासी विद्यार्थ्यांची ठळक संख्या कॉलेजात गेली पाहिजे. असें झाल्यास त्याना मराठी शिकण्याची सोय होअील.

(ख) हें घडण्यास विद्यार्थ्यांमध्यें मराठीची आवड असली पाहिजे. ही आवड कशी उत्पन्न होणार? महाराष्ट्रीय मुलास, पुरेशी संख्या असेल तेथे, स्थानिक नगरपालिकेने मराठी शिकवण्याची सोय केली पाहिजे. ही गोष्ट त्या त्या ठिकाणच्या महाराष्ट्रीयाच्या प्रयत्नावर अवलंबून आहे.

(ग) अशी तजवीज झाल्यास आपणास दुहेरी लाभ होअील. मराठीचा अभ्यास वाढेल आणि मराठीच्या यथावधि अभ्यासाभावीं अवश्य शिकाव्या लागणाऱ्या हिंदीचें अध्ययन करावें लागणार नाही. मराठी आणि अिंग्रजी याच्या जोडीला आणखी हिंदी भाषा शिकण्याचा ताण विद्यार्थ्यांच्या मेंदूवर पडणार नाही.

(३) मराठीभाषकाची संख्या — (१९३१ च्या जनगणनेवरून) मुंबअी अिलाखा अेक कोटि, मध्यप्रान्त आणि वऱ्हाड मिळून अर्धकोटि, हैदराबाद व मुंबअी अिलाख्यांतील संस्थानें मिळून अर्धकोटि. या तीन संख्या मिळून दोन कोटि लोक होतात. यांशिवाय अितर प्रांतात विखुरलेले लोक कांही लाख भरतील.

अितर भाषांशीं तुलना करितां पुढील आकडे (कोटींचे) आढळतात—

हिंदीभाषक १२, बंगाली ५।, तेलगू ३॥, पंजाबी २॥, मराठी २.

हे आकडे सांगतात की मराठी भाषेस हिंदुस्थानातील भाषांत पाचवें म्हणजे बरेंच वरचें स्थान आहे. तिच्या भाषकाची संख्या दोन कोटींहून अधिक असल्याने अशी सहज अपेक्षा होते की मराठी भाषेविषयी कालिकांतून संख्येने व महत्त्वाने अधिक असे लेख अवश्य आढळले पाहिजेत. गतवर्षी ही अपेक्षा सफल झाली नाही हें पाहून तरी आपणा मराठी बोलणारास मातृभाषेकडे— मराठीकडे— अधिक लक्ष देण्याची बुद्धि होवो असें अिच्छून वाचकांचा निरोप घेतों.

---

## साहित्यसमीक्षा व वाङ्मयेतिहास

मराठी भाषेंत वाङ्मयीन टीकाग्रंथाची संख्या फारच थोडी आहे. आजपर्यंत साहित्य-समीक्षणपर व वाङ्मयेतिहासात्मक लिखाण बहुधा नियतकालिकांतून स्फुट रूपाने प्रसिद्ध होत आलें आहे. तेव्हा गेल्या सबंध वर्षांत ह्या विभागात अवघ्या पाचसात ग्रंथांचीच भर पडावी यात मुळींच नवल नाही. या तुटपुंज्या टीकावाङ्मयाचा दर्जाहि बराच उन्नत आहे असें नाही. अेखाद्या ग्रंथकाराची तोंडपुजेपणाने मन मानेल तशी स्तुति करावी किंवा दुसऱ्या ग्रंथ-काराची बेसुमार निंदा करून त्याला वाङ्मयीन जगांतून कायमचें उठवून लावावें अशा आत्यंतिक व अशास्त्रीय टीकालेखनाचे नमुने त्यात मुबलक आढळतात; उलट, कोणत्याहि ग्रंथाची सम-तोलपणाने व विवेचक दृष्टीने छाननी करून ग्रंथकाराच्या व अेकंदर वाङ्मयाच्या प्रगतीला पोषक होअील अशा तऱ्हेने केलेली विधायक टीका क्वचितच पाहावयास सापडते. प्राचीन संत-वाङ्मयाबद्दल तर बोलावयासच नको. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास अित्यादिकांच्या वाङ्मयासंबंधींचे टीकाग्रंथ अंधश्रद्धेने व उत्कट भक्तिभावाने ओथंबलेले आहेत. त्यात सूक्ष्म चिकित्सेचा व सर्वांगीण समालोचनाचा अभाव पदोपदी जाणवतो. ह. भ. प. पांगार-करांनी सतत चाळीस वर्षे प्राचीन वाङ्मयाचें परिश्रमपूर्वक आलोडन करून मराठी साहि-त्यात अनेक चरित्रपर व समालोचनात्मक ग्रंथांची बहुमोल भर घातली आहे. त्याशिवाय मराठी वाङ्मयाचा सुविस्तृत अितिहास लिहिण्याचें कार्यहि अेवढ्या उतारवयात अंगावर घेऊन त्यानी तें बव्हंशीं पार पाडलें आहे. या वाङ्मयेतिहासाचा तिसरा रामदास खंड गेल्या वर्षी प्रसिद्ध झाला आहे. पांगारकरांची विद्वत्ता, रसिकता, अुद्योगशीलता, व भाषा-प्रभुत्व याबद्दल कोणाचेंहि दुमत होणार नाही. ते आपल्या रसाळ व प्रासादिक वाणीने वाचकांना वर्ण्यविषयाशीं तल्लीन करून सोडतात, व त्याना महाराष्ट्र-शारदा-मंदिराच्या थेट गाभाऱ्यात नेऊन पोहोचवितात. परंतु त्यांच्या विवेचनाची बैठक मुख्यतः भाविकपणावरच आधारलेली असल्यामुळे त्यांचे टीकाग्रंथ फक्त सामान्य वाचकांना वाङ्मयाची गोडी लावण्याचें प्राथमिक कार्यच साधतात. या तिसऱ्या खंडात आरंभीं त्यानी तुकोबारायांच्या प्रभाव-ळींची थोडक्यात माहिती सांगितली आहे, व त्यानंतर समर्थांचें चरित्र, साहित्य व राजकारण यांचें विस्तृत समालोचन करून शेवटीं वेणाबाई, कल्याण, उद्धवस्वामी वगैरे रामदासी संप्रदायातील साहित्यिकांची ओळख करून दिली आहे. 'श्रीज्ञानदेव' या चरित्रात्मक निबंधात प्रा. अळतेकरानी तत्त्वज्ञ व महाकवि ज्ञानदेव याचा 'मऱ्हाठाविवेक' आधुनिक रीतीने उलगडून दाखविला आहे. ज्ञानेश्वराच्या अलौकिक अवतारकार्याकडे 'विवेकाच्या

डोळ्यांनी' पाहून त्यांनी त्यांची 'काव्यसंपदा' व 'विचारसंपदा' हीं दोन्ही प्रकरणें फार मार्मिक-पणें सजविलीं आहेत. मात्र अळतेकरांची भूमिकाहि चिकित्सक पंडिताची नसून विवेकनिष्ठ रसिकाचीच आहे हें विसरून चालणार नाही.

'पंजाबातील नामदेव' या आपल्या ग्रंथात शंकर पुरुषोत्तम जोशी यांनी महाराष्ट्रांतील व पंजाबातील नामदेवाचें अभिन्नत्व सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. "प्रस्तुत ग्रंथाचें स्वरूप लौकिक व संकलनात्मक असें द्विविध आहे. दीर्घ परिभ्रमण, सतत चिंतन व निर-निराळ्या व्यक्तींशीं विचारविनियम करून" श्री. जोशी यानी हा ग्रंथ लिहिला आहे. घोमान वगैरे ठिकाणीं समक्ष जाऊन अधिकृत माहिती गोळा करण्याचा श्री. जोशी यांचा अुपक्रम प्रशंसनीयच आहे. परंतु अेवढा खटाटोप करूनहि ह्या ग्रंथात मूळ विवाद्य प्रश्नांचा समाधान-कारक निर्णय लागलेला नाही असें मोठ्या खेदाने म्हणावें लागतें. विषयप्रतिपादनांत महत्त्वाच्या मुद्यावर विशेष भर न देता अितर अवांतर गोष्टींचाच निरर्थक पाल्हाळ केला आहे. त्या मानाने श्री. म. गो. बारटक्के याची 'शिखाच्या आदिग्रंथांतील नामदेव' ही लोकशिक्षणातील लेखमाला अधिक मुद्देसूद व विचारप्रवर्तक आहे.

प्रा. मा. का. देशपांडे यानी 'आचार्य अत्रे' या नावाचें अेक लहानसें पुस्तक लिहिलें आहे. शास्त्रशुद्ध टीका ही खोडसाळ व अेकतर्फी कशी नसावी हें सोदाहरण पटवून देण्यास या पुस्तकाचा बराच अुपयोग होअील. बालकवि याचे सहाध्यायी श्री. वा. दा. पंडित यांनी 'बालकवि व त्याची कविता' ह्या आपल्या प्रबंधात प्रा. माटे यानी बालकवींच्या कविता-संग्रहाला लिहिलेल्या प्रस्तावनेंतील विचारसरणीचे संयुक्तिक खंडन केलें आहे. 'नाट्यस्वरूप गडकरी' हा श्री. शंकर नारायण सहस्रबुद्धे याचा टीकाग्रंथ अगदीच निकृष्ट प्रतीचा अुतरला आहे. श्री. कृष्णाकुमार याच्या 'मराठवाड्यातील गद्य वाङ्मय' ह्या लहानशा पुस्तकामुळे मात्र मराठी वाङ्मयेतिहासात्मक ग्रंथात अुत्कृष्ट भर पडली आहे.

## चरित्र व कोशवाङ्मय

मराठी वाङ्मयात अद्यापि चरित्रलेखनाची वाढ योग्य दिशेने होत नाही. नुसती माहिती देणें किंवा भरमसाट स्तुति करणें यापलीकडे आमच्या चरित्रचोपड्यांतून काही सापडत नाही. गतसालीं सुमारे चाळीस चरित्रात्मक पुस्तकें जीं बाहेर पडलीं त्यातील निम्मीं विद्यार्थ्यां-साठी म्हणून लिहिलेलीं दिसतात, व उरलेल्यात बहुतेक लहानलहानच आहेत. असो.

या चरित्रांचें विषयवार वर्गीकरण करूं गेल्यास सध्याच्या जगड्व्याळ युद्धप्रसंगामुळे कीं काय, बाहेरील जगाकडे व त्यातील प्रभावी पुरुषश्रेष्ठाकडे लेखकाचे डोळे लागून राहिलेले दिसतात. तेव्हा 'हिटलर', 'मुसोलिनी', 'स्टॅलिन', 'चियांग कै शिक' हे चरित्रविषय झाले यात आश्चर्य नाही. 'लोकशिक्षण'कार जामेकर याचा 'विजिगीषु हिट्लर' आधुनिक जगाच्या धडामोडींचें अचूक ज्ञान होण्यास अवश्य वाचावा. प्लुटार्कच्या 'अलेक्झांडर'चें भाषान्तर कॅ. गुप्ते यांनी केलें आहे तें व 'जगातील काही प्रसिद्ध व्यक्ति' हें पंचेचाळीस लहान चरित्रें असलेलें चित्रशाळेचें प्रकाशन मुलांना वाचनीय आहे.

संतचरित्रें अधूनमधून निघत असतात, पण त्यापैकी बहुतेक अंधभाविक दृष्टीनेच लिहिलेलीं आढळतात व तीं भक्तगणातच खपतात. 'चांगदेव' (दासगणू), 'श्रीरामचंद्र टाकी महाराज' (दळवी), 'गाडगेमहाराज' हीं अशीं चरित्रें सोडलीं तरी 'श्रीगौरांगप्रभुचरित्र' हें ६५०

पानांचें चरित्र दृष्टीआड करतां येत नाही. वंगसमाजांत गौरांगप्रभूचें केवढें माहात्म्य आहे! तेव्हा त्याच्या लीला रसाळपणें वर्णन करणारीं पुराणपद्धतीचीं चरित्रेंहि थोडींथोडकीं नसणार. अशाच अेका ग्रंथाचा श्री. कृ. ना. ठोंबरे यांनी केलेला हा अनुवाद आहे. हा अेवढा अुत्तरार्ध आहे हें लक्षांत घेतल्यास श्रम आणि पैसा कसा व्यर्थ जातो याची कल्पना येअील. नाही म्हणावयास या सदरांत दोनच चरित्रात्मक पुस्तकें विशेष अुल्लेखनीय आहेत. प्रो. माधवराव अळतेकर हे संस्कृत कवि सोडून आपल्या क्षेत्रात आले व त्यानी आपल्या चटकदार व चिकित्सक शैलीने 'ज्ञानदेवां'चें विवरण केलें याचा आनंद वाटतो. पांगारकर-आजगावकर यांच्यापेक्षा अळतेकरांची दृष्टि निराळी. तेव्हा त्यानी आणखी मराठी संतकवि हाताळावेत अशी त्यांना प्रेमाची सूचना आहे. नामदेव अेक कीं दोन हा प्रश्न पुन्हा पुन्हा डोकें वर काढतो. शीखांच्या आदिग्रंथातील नामदेव व आपला 'नाम्या' वेगवेगळे करो, याचें संशोधनात्मक विवरण सुप्रसिद्ध गोमंतकीय लेखक प्रियोळकर यानी चागलें केले आहे. त्याचें खंडन करण्यास 'लोकशिक्षणा'त श्री. बारटक्के हे सरसावले आहेत. तथापि हा वाद संशोधकांनाच मानवेल.

पौराणिक-अैतिहासिक वर्गांत म्हणण्यासारखी भर नाही. 'आनंदीबाअी पेशवे' या गैरवाजवी कुप्रसिद्ध झालेल्या अैतिहासिक व्यक्तीला योग्य रीतीने अुजळा देण्याचें काम श्री. कर्वे यांनी केलें आहे. सयाजीबालज्ञानमालेंतील हें पुस्तक असल्याने त्याना विवेचनात्मक पद्धति स्वीकारता आली नाही. 'तात्या टोपे' याच्या चरित्राची डॉ. सावरकर यांनी काढलेली दुसरी आवृत्ति आहे. चरित्र निव्वळ कथात्मक बनलें आहे. यावलच्या विदुषी श्रीमती रमाबाअी देशपांडे यांनी मैनावती, पिंगला, चुडाला अित्यादि वेदकालीन महिलांची त्रोटक माहिती 'आमच्या प्राचीन मैत्रिणी' या नावाखाली दिली आहे. हा प्रकार नाविन्यपूर्ण व अनुकरणीय आहे.

शैक्षणिक क्षेत्रात मोडकाचें 'भूगोलावरील साहसी प्रवासी' हें अेकच पुस्तक असून तें विद्यार्थ्यांनी जरूर वाचावें. अशीं आणखी पुस्तकें निघावींत. आग्ल नाटककार अिब्सेन याचें चरित्र टीकापटु साहित्यिक श्री. निरतर यानी लिहिलें आहे हें सांगितल्यास पुरे. आपले प्रथितयश महाराष्ट्रीय नट श्री. गणपतराव बोडस यानी 'माझी भूमिका' हें आत्मचरित्र लिहून मराठी रंगभूमीची जशी सेवा केली आहे तसाच तिच्यावर विदारक प्रकाश पाडला आहे. भिन्न व्यवसाय पडल्यामुळे मांडणी व्यवस्थित न होणें साहजिक आहे. 'कलावंताच्या सहवासात' ही 'किर्लोस्कर' मासिकातून आलेली अुत्कृष्ट चरित्रमाला मुलाखती चरित्राच्या विभागाची आठवण करून देते. श्री. पर्वते आदि पत्रपंडितानी असे वाङ्मय प्रसिद्ध केलेंच आहे. 'प्रकाशातील व्यक्ति' ही 'धनुर्धारी'तील चरित्रमाला अुल्लेखनीय आहे.

सामाजिक क्षेत्रांतील व्यक्ति 'सर मोरोपंत जोशी', 'डॉ. हेडगेवार', 'आदर्श शिक्षक (आठल्ये) याची माहिती थोडक्यात का होअीना पण वेळेवर करून देण्यात आली आहे. श्री विठ्ठल रामजी शिंदे आणि वझेशास्त्री यांचीं आत्मचरित्रें जीं लिहिलीं आहेत तीं महाराष्ट्राच मागील अितिहास अुघडून दाखवितात. शिंदे याची योग्यता फार मोठी आहे. तेव्हा त्याचे आत्मचरित्र किती अुद्बोधक व हृदयंगम झाले असेल याची कल्पना करावी. त्यानी अुत्तरभागहि लवकर काढावा. वझेशास्त्री यानी तर काशीचा महाराष्ट्रीय अितिहास सुंदर वर्णिला आहे व राजकारणाच्या आंदोलनातून पुढे सरकणारा आपला जीवनपट चितारला आहे. 'ज्योतिबा फुले' यांचें चरित्र मोठें असावयास पाहिजे. 'महाराष्ट्राचे अुपेक्षित मानकरी' या मालेंत श्री. गं. बा. सरदार ते ग्रथित करणारच आहेत.

आता राजकीय आखाडा पाहूं. 'स्वराज्यमार्गदर्शक लोकमान्य टिळक' हें पुस्तक येवल्याचे निष्ठावंत काँग्रेससेवक आपटे गुरुजी यानी विद्यार्थ्यांसाठी म्हणून लिहिलें असलें तरी लोकमान्यांच्या अनेक उपलब्ध चरित्रांपेक्षा निराळें आहे. त्यात जिव्हाळा, देशभक्तीची तळमळ, प्रामाणिकपणा हे गुण ओतून दिसतात. 'वीर सावरकर' याचें मो. शि. गोखले यांनी लिहिलेलें हें चरित्र मराठींत सवर्थे म्हणता येईल. क्रांतिकारक, कर्मवीर, संघटक व राष्ट्रपति अशा चार भूमिकांत सावरकरांना ठेवून त्याचें लोकोत्तरत्व दाखविलें आहे. सावरकरांचे जोडीदार 'भाई परमानंद' याचें मोठें चरित्र श्री. बाळशास्त्री हरदास यानी चांगलें लिहिलें आहे. पण पाल्हाळ करूनहि माहिती पुरी नाही. जिवंत व्यक्तींचीं नमुनेदार चरित्रे आम्हांला अद्यापि लिहिता येत नाहीत हेंच खरें. आत्मीयता आणि अलिप्तता हे दोन परस्परविरुद्ध गुण अंगीं बाणवून चरित्रकाराने व्यक्तिचित्र रेखाटलें पाहिजे. फडक्याच्या कादंबरीसारखा त्यात एकसारखा ओघ पाहिजे, रसाळपणा पाहिजे, पण 'माहात्म्य' किंवा 'लीलामृत' नको.

'सह्याद्रि', 'किर्लोस्कर', 'मनोहर', 'महाराष्ट्र (परिचय)' यासारख्या मासिकातून चरित्रें, मुलाखती किंवा परिचय येत असतात. हें लिखाणहि चरित्राच्या सदरात पडेल. 'मनोहरा'त साहित्यिकाचा नुसता एकांगी व अुठावदार परिचय येतो. 'महाराष्ट्र परिचया'तून प्रो. माटे पाश्चात्य पुरुषश्रेष्ठांचीं चरित्रें देत असतात. गेल्या सालीं अब्राहाम लिंकन व जॉर्ज वाशिंगटन याचीं चरित्रें आलीं. महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेतील राजारामशास्त्री भागवत, लोकहितवादी, भाअू महाजन याच्यावरचे लेख चांगले विवेचक होते. 'सह्याद्रि' व 'लोकशिक्षण' यानी माधवराव पटवर्धन विशेषांक काढून या दिवंगत थोर साहित्यिकाच्या चरित्रांत चांगली भर टाकिली. 'महाराष्ट्र परिचया'ने अणे अंकहि असाच चांगला काढला.

कोशवाङ्मय— कोशवाङ्मयात 'व्यायामज्ञानकोश' व 'व्यावहारिक ज्ञानकोश' या दोन मोठ्या कार्यांचा अुल्लेख करणें अत्यावश्यक आहे. 'व्यायामज्ञानकोशा'चा चवथा खंड गेल्या सालीं बाहेर पडला. यात देशी मेहनतीचे प्रकार सविस्तर व सचित्र वर्णिले आहेत. संघव्यायामाची माहिती यावरून चांगली येणार आहे. 'व्यावहारिक ज्ञानकोशा'चे शेवटचे दोन भाग निघून तो पुरा झाला हें चालकांप्रमाणे महाराष्ट्रालाहि भूषणावह आहे. 'महाराष्ट्रीय ज्ञानकोशा'नंतर त्याला पूरक म्हणूनच कीं काय हा पंचखंडात्मक ज्ञानकोश श्री. भिडे यानी मोठ्या परिश्रमाने प्रसिद्ध केला. बडोदें व कोल्हापूर हीं पुण्याप्रमाणेच मरीव मराठी साहित्याचीं केंद्रें आहेत हें वरील दोन ज्ञानकोशांच्या प्रकाशनावरून सिद्ध होतें. डॉ. केतकर यानी प्रवर्तित केलेलें कोशयुग सारखें भरभराटत आहे व हेंच त्याचें खरें स्मारक !

हें धावतें समालोचन झालें. अपुरा वेळ आणि साधनाभाव यामुळे तें नीट वठलेंहि नसेल. तथापि 'पत्रिके'चा हा अुपक्रम अत्यंत अिष्ट वाटल्यामुळेच या हनुमानपाहणीस तयार झालों.

- - -

## चिंतनपर निबंध

वाङ्मयाचे निर्मायक (creative) व समीक्षक (critical) असे दोन भेद केले जातात. निर्मायक वाङ्मयात कल्पनाशक्तीचा विलास दृग्गोचर होतो तर समीक्षक वाङ्मयात प्रज्ञाप्रकर्ष आढळून येतो. कल्पना व भावना याच्या विलासामुळे हें निर्मायक वाङ्मय सर्वांना

ललितमनोहर व लोकप्रिय वाटतें. चिंतनपर वाङ्मयाचा समावेश समीक्षक वाङ्मयांत करता येईल. चिंतनपर वाङ्मयात भावनोल्लासापेक्षा बुद्धिप्रकर्ष व कल्पकतेपेक्षा चिकित्सकता अधिक आढळून येते. म्हणून हें चिंतनपर वाङ्मय ललितवाङ्मयाप्रमाणे सर्वांना आल्हादक वाटत नाही. सुसंस्कृत रसिकच अशा वाङ्मयाच्या वाचनाने समुल्लसित होतो. चिंतनपर वाङ्मय कितीहि विद्वत्ताप्रचुर व विचिकित्सापूर्ण असलें तरी तें रूक्ष असल्यास कंटाळवाणें होतें. चिंतनपर वाङ्मय लिहिताना लेखकाने साहित्यगुणाचें साहाय्य घेतलें पाहिजे. कायदा, अितिहास, समाजशास्त्र, राजकारण अित्यादि शास्त्रीय विषयांवरील ग्रंथ साहित्यगुणानी मंडित असल्यास मनोरंजक होतात. मेनने 'Ancient Law' सारखा कायदेशास्त्रावरील ग्रंथ सुंदर भाषेंत लिहिला आहे. तसेंच काव्यासारख्या रमणीय विषयावर अगदी रूक्ष ग्रंथ लिहिल्याचीं उदाहरणें अगदीच मिळणार नाहीत असें नाही. म्हणून चिन्तनपर वाङ्मय विचारप्रवर्तक तितकेंच विलोभनीय झालें पाहिजे. शास्त्रीयदृष्टि न सोडता साहित्यसौंदर्याने मंडित झालेलें चिंतनपर वाङ्मय वासंतिक वाटिकेप्रमाणे आल्हाददायक वाटतें. प्रस्तुत लेखात गेल्या वर्षी प्रसिद्ध झालेल्या चिंतनपर निबंध-प्रबंधाचें थोडक्यात समालोचन करण्याचा प्रयत्न केला आहे.

'विचारसौंदर्य' हा प्रो. वा. म. जोशी याचा ग्रंथ विचारसौंदर्याने विनटलेला आहे. प्रो. जोशी याचें वाङ्मय हें अभिनव विचाराचें रम्य विलासस्थल आहे. 'विचारसौंदर्य' हें 'विचारविलासा'चें धाकटें भावंड होय. 'शेजवलकराचे लेख' या पुस्तकात प्रसिद्ध झालेल्या श्री. शेजवलकरांच्या विक्षिप्त पण विचारप्रवर्तक लेखाचा संग्रह केला आहे. 'वादळी वारे' या ग्रंथात प्रो. द. के. केळकर याच्या विद्वत्ताप्रचुर लेखाचा संग्रह केला आहे. या पुस्तकात प्रो. केळकराच्या सामाजिक, धार्मिक आणि वाङ्मयविषयक मताचें दिग्दर्शन झालें आहे. तथापि हे वारे कितीहि मधुर, सुगंधित व शीतल असले तरी ते वादळी आहेत असें वाटत नाही. 'रामशास्त्री' या पुस्तकात 'प्रतिभा' पाक्षिकात प्रसिद्ध झालेल्या रामशास्त्री या निस्पृह न्यायाधिशाच्या निर्णयाचा संग्रह केला आहे.

श्री. टिकेकर यानी 'लोकहितवादींचीं शतपत्रें' प्रसिद्ध करून अेका दृष्टीने राष्ट्रीय कामगिरी केली असें म्हणता येअील. लोकहितवादी हे विचारवंत सुधारक होअून गेले. त्याचीं मतें जरी सर्वमान्य होण्याजोगीं नसलीं तरी त्याची विचारसरणी मननीय असते. 'सेनापति बापट समग्र ग्रंथा'त महाराष्ट्राचे निःसीम देशभक्त सेनापति बापट याची सात्त्विक व सोज्वळ 'वाङ्मयी-मूर्ति' प्रकट झाली आहे. 'रागणेकर' हें पुस्तक चुरचुरीत व चटकदार आहे. 'सत्याग्रही महाराष्ट्र' या ग्रंथात प्रेमाबाअी कंटक यानी कॉंग्रेसच्या दृष्टीने राजकारणाची चर्चा केलेली असल्यामुळे अितर पक्षातील व्यक्तींवर अन्यायमूलक टीका झाली आहे. 'भोपटकर गुणगौरव-ग्रंथ' या ग्रंथात श्री. ल. ब भोपटकराच्या कामगिरीचें समालोचन केलें आहे. या पुस्तकातील श्री. भोपटकराच्या योग्यतेची कुणालाहि यथार्थ जाणीव होअील. 'लोकमाता' या पुस्तकात श्री. कालेलकरानी लोकमाता असणाऱ्या पुण्यपावन व परमविमल सरिताचीं वर्णनें केलीं आहेत. त्याचप्रमाणे, 'भावतरंग' (खासनीस), 'वाङ्मयविषयक सात निबंध' (साठे), 'पखरण' (झेविअर कॉलेजसंग्रह), 'गृहसौख्य' (ना. ह. आपटे), 'जाअूं मी सिनेमात' (कु. शांता आपटे), व 'वीणातरंग' या पुस्तकाचा अुल्लेख करावयाला हरकत नाही.

येथपर्यंत गेल्या वर्षी प्रसिद्ध झालेल्या चिंतनपर निबंध-प्रबंधाचें त्रोटक समालोचन केलें. वर अुल्लेखिलेलीं सर्व पुस्तकें सारख्याच योग्यतेचीं नसलीं तरी चिंतनपर निबंधाची निर्मिति

निराशाजनक नाही. विशेषतः, 'विचारसौंदर्य', 'वादळी वारे' व 'समग्र बापट ग्रंथ' हे ग्रंथ मराठी भाषेला सदैव भूषणभूत होतील. धार्मिक विषयावर अेकहि पुस्तक प्रसिद्ध झालेलें नाही. स्वतंत्र ग्रंथ लिहिण्यापेक्षा स्फुट निबंधाचा संग्रह करण्याकडे अधिक प्रवृत्ति दिसून येते. केवळ लघुकथा व कादंबरी यांच्या निर्मितीने वाङ्मयाची अभिवृद्धि होणार नाही. कारण लघुकथा व कादंबरी यांच्या अतिरिक्त वाचनाने वाचकाची अभिरुचि गहनगंभीर विषयांचें आकलन करण्याला असमर्थ बनते. म्हणून सामाजिक, राजकीय, धार्मिक, कायदा, शिक्षणशास्त्र अित्यादि अनेक विषयावर सुंदर भाषेत मौलिक ग्रंथ निर्माण झाले पाहिजेत. अशा प्रकारच्या विद्वत्ताप्रचुर व विचारप्रवर्तक ग्रंथानीच राष्ट्राचा अभ्युदय व भाषेची अभिवृद्धि होत असते. म्हणून प्रतिवर्षी अशा प्रकारचें विदग्धसाहित्य अधिकाधिक प्रमाणात निर्माण होवो अशी अिच्छा व्यक्त करून हा लेख पुरा करितों.

---

## शिक्षणशास्त्र आणि बालवाङ्मय

मराठी वाङ्मयाचा आढावा घेताना अनेक वाङ्मयप्रकारांचा विचार करणें आवश्यक आहे. जगातील कोणत्याहि वाङ्मयात ललितवाङ्मय आणि शास्त्रीय वाङ्मय असे मुख्यतः दोन प्रकार दिसून येतात. सांसारिक दुःखाचा क्षणभर विसर पडावा, काल्पनिक सृष्टींत आपल्या आकांक्षाची— वासनाची पूर्ति करावी व तज्जन्य आनंद अुपभोगावा या दृष्टीने कादंबरी, नाटकें, लघुकथा अित्यादि ललितवाङ्मयप्रकाराची सर्वसाधारण समाजाला आवश्यकता असते. परंतु जीवित आणि सृष्टि यांच्या परस्परसंघर्षाने उत्पन्न होणारी परिस्थिति किंवा जीविताशीं अत्यंत जिव्हाळ्याने निगडित झालेली, सर्वसामान्य बुद्धीला अविज्ञेय अशीं अनेकविध रहस्यें निरीक्षण करून त्यातील नियमाचा शोध लावण्यात अलौकिक बुद्धीचे काही नरश्रेष्ठ आपलें आयुष्य वेंचीत आहेत. त्यांच्या प्रयत्नाचें दृश्यफल म्हणजेच शास्त्रीय वाङ्मय होय.

अध्ययन आणि अध्यापन यासंबंधीचा विचार शिक्षणशास्त्रांत केला जातो. अध्यापन ही अेक कला आहे हें विधान कांही अंशीं सत्य स्वरूपानें असलें तरी अितर नानाविध कलांप्रमाणे यांहि कलेला शास्त्राची— सर्वसंमत सिद्धान्ताची— आवश्यकता असते. शिक्षण या शब्दाने जो अर्थ अभिप्रेत होतो त्या अर्थामध्यें गेल्या काही वर्षांच्या कालावधींत मोठेंच अंतर पडलें आहे. 'नवें शिक्षण' हा शब्दप्रयोग सध्या रूढ होत चालला आहे. शिक्षणांतील हा नवेपणा कां अुत्पन्न झाला याचा बारकाअीने विचार केल्यास आपल्या डोळ्यांपुढे मानसशास्त्र अुभें राहतें. मानसशास्त्राच्या अुदयाने शिक्षणक्षेत्रावर प्रकाशाचा अेक नवीन झोत पाडला, आणि त्यायोगें अध्ययन, अध्यापन याविषयीच्या जुन्या कल्पना त्याज्य ठरल्या. पूर्वकालीं शिक्षक, विषय आणि शिष्य या तीन घटकांत शिक्षक आणि विषय यानाच प्राधान्य दिलें जात असे. 'नवें शिक्षण' शिष्यकेंद्रित झालें आहे. शिक्षणाचें केंद्र बदलल्याबरोबर शिक्षणशास्त्रांतील सिद्धान्त, अध्यापनपद्धति, शैक्षणिक विषय अित्यादि सर्व शिक्षणघटकांत आमूलाग्र बदल झाला. स्वयंशिक्षण, कृतिशिक्षण, व्यक्तिस्वातंत्र्य अित्यादि मानसशास्त्रीय तत्त्वांना प्राधान्य मिळूं लागलें व अध्ययन हें बाह्य नियंत्रणाने आपल्यावर लादलेलें कार्य आहे ही कल्पना पार विरून जाअून अध्ययन ही अेक प्रकारची क्रीडा आहे असे सिद्धान्त आज सर्वमान्य होत आहेत. क्रीडेमध्ये अंतःस्फूर्ति, आत्माविष्कार आणि नवनिर्मितीचा आनंद यांचा प्रामुख्याने

समावेश होतो. अध्ययनांतहि हेच मनोव्यापार दृष्टीस पडले पाहिजेत असें 'नवें शिक्षण' आपणांस सांगत आहे. बालोद्यानपद्धति, मॉंटेसरीपद्धति, व्यवसायपद्धति अित्यादि नवीन नवीन अध्ययनपद्धतींच्या मुळाशी क्रीडेचीं तत्त्वेंच दिसून येतात.

शिक्षणक्षेत्रांत आतापर्यंत झालेला बदल वरील विवेचनावरून वाचकाच्या ध्यानात येअील. परंतु या स्थित्यंतरामुळे मराठी वाङ्मयावर, विशेषतः शैक्षणिक वाङ्मयावर, काय परिणाम झाला याचा विचार करता मन निराश होतें. आधी शास्त्रीय वाङ्मयावर स्वतंत्ररीत्या संशोधनपूर्वक मराठी भाषेत लिहिलेले प्रमाणग्रंथ फारच थोडे. देशातील शिक्षणाकडे लक्ष देण्याचीहि बुद्धि आपल्या महाराष्ट्रीय समाजात जवळ जवळ नाही असें म्हटलें तरी चालेल. दुय्यम व उच्च शिक्षणाचें माध्यम परकीय भाषा असल्यामुळे शिक्षणशास्त्रविषयक ग्रंथ मराठी भाषेंत असले काय किंवा नसले काय याची फिकीर दुय्यम शिक्षक किंवा प्राध्यापक करीतच नाहीत. राहता राहिलें प्राथमिक शिक्षण. या क्षेत्रात तन-मन-धन अर्पण करून कष्ट करणाऱ्या प्राथमिक शिक्षकाचें ज्ञान अितकें संकुचित व मर्यादित असतें की, त्या शिक्षकांकडून शिक्षणशास्त्राच्या ग्रंथाची अपेक्षा करणें अनाठायीं असतें. प्राथमिक शिक्षकाकरिता निघालेल्या अध्यापनविद्यालयात सर्व विषय मातृभाषेंतून शिकवावे लागतात. परतु या विद्यालयातून शिक्षणशास्त्र, मानसशास्त्र अित्यादि शास्त्राची नुसती तोडओळख द्यावयाची असल्यामुळे प्रयोगसिद्ध स्वानुभवावर रचलेली ग्रंथनिर्मिति या ठिकाणीं होणे अशक्यप्राय असतें. जगातील सुधारलेल्या राष्ट्रात चाललेले शैक्षणिक प्रयोग व त्यामुळे निर्माण झालेले ग्रंथ पाहिले म्हणजे आपल्या शिक्षणखात्याची व शिक्षणस्थानाची कीव आल्यावाचून राहत नाही. मॅगडूगल, किलपॅट्रिक अित्यादि सारखे शिक्षणपंडित आपल्याकडे केव्हा होतील ते होवोत!

अशा सर्वतोपरी अननुकूल परिस्थितींत शिक्षणशास्त्रविषयक जे काही पाच दहा ग्रंथ मराठींत अवतीर्ण झाले आहेत त्याचें स्वागत करणें हें आमचें कर्तव्य होय. अध्यापकशाळांतील मानसशास्त्र व शिक्षणशास्त्र या विषयाच्या अभ्यासक्रमाला धरून पुणें येथील ट्रे. कॉ. फॉर मेनचे सेवानिवृत्त प्रिन्सिपल रा. सा. कारखानीस (बालमन, अध्यापन, शिक्षक आणि शिक्षण इ०) व हिंगण्याचे प्रा. भा. धों. कर्वे (अध्यापन आणि मानसशास्त्र) यानी केलेली ग्रंथनिर्मिति विद्यार्थ्यांच्या दृष्टीने फार उपयुक्त आहे. पुणें स्कूल बोर्डाचे अॅ. ऑ. श्री. मोडक (शिक्षणशास्त्र आणि अध्यापनकला) व एज्यु. इन्स्पे. श्री. तावडे (अुत्साही शिक्षकाचें कार्यक्षेत्र) श्री. नेने (शिक्षणकला व मानसशास्त्र) शिवाजी मराठा हायस्कूलचे सुपरिंटेंडेंट श्री. बा. ग. जगताप (शालेय व्यवस्था, अध्यापनाचा परिचय) अित्यादि शिक्षणतज्ज्ञानी या बाबतींत केलेले प्रयत्न अनुकरणीय आहेत. शिक्षणक्षेत्रात ग्रंथसेवेने अमोलिक भर घालण्याचें कार्य कै. न. ल. आठवले यानी केलेलें आहे. 'बालकाचा मनोविकास' आणि 'दुर्वर्तनी मुलाची सुधारणा' हीं श्री. आठवल्याचीं पुस्तके अत्यंत अुच्च दर्जाचीं असून त्यांतील विवेचनाला आत्मानुभवाची जोड दिल्याने हीं दोन्ही पुस्तकें प्रमाणभूत आहेत असें मानावयाला हरकत नाही. मैनाताई शहाणे (बालकाचा मनोविकास) श्री. भावे (मानसशास्त्र) इ. चाहि अुल्लेख करणें आवश्यक आहे.

देशांतील सामाजिक जीवनात दिसणाऱ्या तत्त्वज्ञानाचें प्रतिबिंब वाङ्मयात अुमटल्याशिवाय राहत नाही. अेखादें मूल माझ्या स्वाधीन करा, त्यातून पाहिजे तसा माणूस मी निर्माण करतों अशा प्रकारचें आव्हान अेका शिक्षणज्ञाने समाजास दिलें होतें. या आव्हानाच्या मुळाशीं सामाजिक जीवनाचें तत्त्वज्ञान असलेलें दिसून येतें. शाळेच्या कृत्रिम वातावरणामध्यें

हजारों वर्षांच्या कालावधीत अेकत्र झालेला जागतिक अनुभवाचा साठा अत्यंत मर्यादित अवधीत परंतु परिणामकारक पद्धतीने मुलाच्या पदरीं टाकावयाचा असतो. या अनुभवाच्या साठ्याकडे पाहण्याच्या अनेक दृष्टि असतात. व्यक्तीची सर्वांगीण वाढ हें ध्येय नव्या शिक्षणाच्या पुढे आहे. परंतु व्यक्तीची सर्वांगीण वाढ म्हणजे समाजाची सर्वांगीण वाढ हें विसरून चालावयाचें नाही. यामुळेच शिक्षणाकडे राष्ट्रीय दृष्टीने पाहणें आवश्यक होतें. स्वतंत्र राष्ट्रात, स्वतंत्र वातावरणांत स्वैर विहार करणाऱ्या बालमनाचें संगोपन आणि संवर्धन ज्या दृष्टीने करण्यात येतें ती दृष्टि दास्यात खितपत पडणाऱ्या देशाला आणता येत नाही मुलाची विशिष्ट वैचारिक भूमिका तयार करण्याचें सामर्थ्य जित राष्ट्रात फार कमी प्रमाणात आढळून येतें. या सर्व गोष्टी ध्यानात घेतल्यास आपल्याकडील बालवाङ्मय स्वतंत्र राष्ट्रातील बालवाङ्मयाशीं तुलना केल्यास अत्यंत निकृष्ट प्रतीचें ठरलें तर त्यांत काही आश्चर्य नाही. शिक्षणखातें जसजसें लोकांच्या हातीं येअूं लागलें तसतसा शालेय वाङ्मयात अुपयुक्त बदल होत चालला आहे हें खरें आहे. मात्र शालेय वाङ्मयाचा वृक्ष सध्या जो अितक्या जोराने बहरत आहे त्या त्याच्या बहरात रंगाचें वैचित्र्य असलें तरी मनोहारी परिमलाचा अभावच आहे असें मोठ्या दुःखाने म्हणावें लागते. शालेय वाङ्मयात बालवाङ्मय याची अेक स्वतंत्र जाति आहे. लघुकथा म्हणजे लहान कादंबरी नव्हे तद्वतच बालवाङ्मय म्हणजे सोप्या भाषेंत लिहिलेले ग्रंथ नव्हत.

मानसशास्त्रात बालमानसशास्त्र हा एक स्वतंत्र प्रकार आहे. बाल्यावस्थेंतील मनोव्यापाराचा सूक्ष्म अभ्यास झाल्याविना, त्याचप्रमाणे बाल्य व शैशव या अवस्थाची निरनिराळीं लक्षणें पूर्णपणे आकलन झाल्याशिवाय बालवाङ्मयाची निर्मिति शास्त्रशुद्ध होणें शक्य नाही. शैशव अवस्थेंतील सहज प्रवृत्तीचा स्वैर विहार, कल्पनासृष्टींत रममाण होण्याची तीव्र इच्छा, अनुकरणप्रियता, क्रीडाभक्ति अित्यादि धर्मांचें प्रतीक बालवाङ्मयात अुतरलें पाहिजे. बाल्यावस्थेंत मुलाच्या ठिकाणीं युयुत्सा, संघप्रवृत्ति, संचयप्रवृत्ति, स्पर्धा, अित्यादि मनोव्यापार प्राधान्येंकरून दिसून येतात. या अवस्थेला उपयुक्त वाङ्मय लिहिताना हे मनोव्यापार दृष्टिआड करता येणार नाहीत. बालमानसशास्त्राचे हे सिद्धान्त ध्यानात घेऊन, देशाच्या परिस्थितीला उपयोगी पडतील असे सुनागरिक निर्माण करण्याचे ध्येय दृष्टीपुढे ठेवून, बालवाङ्मय लिहिलें गेलें तरच तें व्यक्तीला, समाजाला, राष्ट्राला हितकारक होअील.

बालवाङ्मय म्हणून लिहिलीं गेलेलीं सध्याचीं पुस्तकें वरील निकषाला कितीशीं अुतरतील हें वाचकानीच पहावे. अेक विशिष्ट आकार, विशिष्ट चित्रें, मर्यादित पृष्ठसंख्या, जाडा टाईप आणि सोपी भाषा अशी चुकीची कल्पना करून घेतल्यामुळे आज मराठीत बालवाङ्मय या नावाखाली चिमुकल्या पुस्तकाचा मोठा संग्रह दिसत आहे. त्यातील बहुतेक पुस्तकात भाषेचा किंवा विचाराचा किंवा कल्पनेचा क्रम (gradation) बहुताशीं राखला जात नाही. बालमनाचा अभ्यास दूरच राहो ! !

या बालवाङ्मयातील मोठा भाग कथा आणि काव्य या प्रकारांनी व्यापिला जातो. मुलांना जात्याच गोष्टींची आवड; आणि कथेशीं तन्मय होअून कल्पनासृष्टींत रममाण होणें हा त्यांच्या मनाचा कल. अद्भुतरम्यता मुलांना जितकी आवडते तितकी अन्यरसनिर्मित सृष्टि त्याना आकर्षक वाटत नाही. या दृष्टीनें आपल्याकडील महाभारत, रामायण अित्यादि पुराणांचा व हितोपदेश, पंचतंत्र वगैरे कथासंग्रहाचा कितीतरी उपयोग करून घेतां येईल. परंतु आमच्या लेखकांचें लक्ष इंग्लंडमधील पऱ्याकडेच अधिक !

बालवाङ्मयातील काव्यविभाग हाहि शिक्षणदृष्ट्या अत्यंत महत्त्वाचा आहे. आवडत्या गोष्टींची पुनरावृत्ति करणें या बालमनोधर्माला प्रोत्साहन देण्याचें कार्य शिशुगीतें करीत असतात. याशिवाय 'आत्माविष्काराला पूर्ण अवकाश मिळाल्यामुळे बालकाच्या मनोविकासाला शिशुगीतांचें बरेंच साह्य होतें.

बालवाङ्मयामध्यें भौतिक शास्त्राची गोष्टीरूपाने तोंडओळख करून देणें किंवा भूगोलासारखा रूक्ष विषय सरस शब्दानी मुलापुढे ठेवणे हेंहि अुपयुक्त असतें.

बालवाङ्मयविषयक अल्पाशाने केलेलें हे विवेचन ध्यानात ठेवून आपण मराठींतील बालवाङ्मयनिर्मितीकडे वळूं या. "बालबोध"कर्ते कै. वि. को. ओक यांना बालवाङ्मयाचे जनक अशी सार्थ पदवी देण्यात येते. त्याच्या 'बालबोधा'त मुलाना वाचनीय असे कितीतरी लेख आले आहेत. याशिवाय 'शाळापत्रक,' 'खेळगडी,' 'बालसन्मित्र' अित्यादि बालमासिकांचाहि या ठिकाणीं उल्लेख केला पाहिजे. या मासिकाव्यतिरिक्त अनेक वाचनीय पुस्तकें सध्या उपलब्ध आहेत व छापलीं जात आहेत. त्या सर्वांचा लेखकांनिशीं उल्लेख करणें या चिमुकल्या आढाव्यात शक्य नाही. प्रकाशकाचा उल्लेख करावयाचा झाल्यास सर्वच प्रकाशक आपापल्यापरी बालवाङ्मयात महत्त्वाची भर घालीत आहेत. त्यातल्या त्यात मुंबअी येथील केशव भिकाजी ढवळे, स्वस्तिक प्रकाशन गृह, कर्नाटक प्रकाशन गृह पुण्याचें चित्रशाळा मुद्रणालय, आनंदकार्यालय वगैरे संस्थाचे प्रयत्न उल्लेखनीय आहेत.

हा आढावा घेताना लेखकाकडे साधनाचा पूर्ण अभाव आहे ही जाणीव वाचकांनी ठेवावी. साहित्यपरिषदेने पुरविलेली बालवाङ्मय पुस्तकावरील अेक अपुरी यादी आणि स्वतःच्या संस्थेतील वाचनालयात असलेले शिक्षणविषयक ग्रंथ आणि आपली स्मरणशक्ति अेवढ्या सामग्रीच्या सामर्थ्यावर 'पत्रिके'सारख्या उच्च दर्जाच्या मासिकांत आढावावजा लेख लिहिणें धाष्टर्याचे आहे. परंतु अशा तऱ्हेचा लेख आला नाही तर समालोचन-अंकाची सजावट अपुरी राहते. म्हणून निदान लहानसा लेख तरी असावा अशी अिच्छा 'पत्रिके'च्या संपादकानी व्यक्त केल्यामुळे हा लेख लिहिला जात आहे. कोणत्याहि व्यक्तीचा अगर प्रकाशन-संस्थेचा मुद्दाम अनुल्लेख करावा अशी अिच्छा नसताहि जे कोणी विस्मृतीमुळे अगर घाअीमुळे अनुल्लेखित राहिले असतील त्याजकडे क्षमेची याचना करून हा लेख संपवितों.

---

## ललितवाङ्मय

### काव्य

काव्याचा बाजारभाव आज बेसुमार घसरला असल्याने अेखादें नवीन काव्यपुस्तक पाहिलें की काव्यरसिकास विशेष आनंद वाटतो. गेल्या वर्षं सव्वावर्षांत प्रसिद्ध झालेलीं काव्यपुस्तकें पुढे घेअून त्यावर निरीक्षणात्मक लेख लिहिताना संतोषाबरोबर कृतज्ञताहि प्रकट करावीशी वाटते. संतोष वाटण्याचे कारण कवितेचे हलाखीचे दिवस असतांनाहि अेवढी काव्यसंपदा अेका वर्षाच्या कालावधींत निर्माण झाली हें होय. कृतज्ञतेची भावना तर संतोषापेक्षाहि अधिक प्रबळ आहे. मागे दुष्काळात देश अुजाड होअून सर्व सामाजिक जीवन नष्टप्राय होण्याच्या मार्गाला लागलें असताना सरस्वती नदीच्या कांठीं असलेल्या कांही ब्राह्मणानी

वेदविद्या कायम ठेवली असें सांगतात, तशा प्रकारची काहीशी कामगिरी आजचे कवि व कवयित्री करीत आहेत. तेव्हा कोणता काव्यरसिक त्यांना कृतज्ञतेने धन्यवाद देणार नाही!

मागील वर्षी 'मधु-लहरी' हा कै. माधव ज्यूलियन् यांचा काव्यसंग्रह प्रसिद्ध झाला. अुमरखय्यामच्या काव्यानें फिट्झेरल्डनें जें अिंग्रजी भाषांतर केलें आहे त्याचा अनुवाद यांत आहे. यांत माधवरावांचें विद्वत्त्व त्यांच्या कवित्वापेक्षा अधिक प्रभावी झालेलें दिसतें. याच पुस्तकांत माधवरावांच्या पूर्वीच्या संग्रहांत न आलेल्या सर्व स्फुट कविता संग्रहित केल्या आहेत. या कवितांतून माधवरावांची कवित्वशक्ति त्यांच्या विद्वत्तेला दिपवीत आहे असें मनोहर दृश्य दिसतें. दीर्घोद्योग व ज्ञानलालसा यांच्या बळावर विद्वद्वर्य झालेले माधवराव लोकमान्यता पावले हें खरें. पण ही लोकमान्यता व्यापक असली तरी खोल नाही. माधवरावांच्या निरागस व हृदयंगम प्रेमगीतांनी वेडावलेल्या रसिकांना माधवरावांविषयी जी भक्ति वाटते तिची अुत्कटता या लोकमान्यतेला कदापि येणार नाही. असो. 'मधुलहरी' हा माधवरावांचा शेवटचा काव्यसंग्रह. आणि तो त्यांच्या मरणोत्तर प्रसिद्ध झाला. त्या कविसूर्याच्या अस्तानंतर पडलेल्या या अल्पशा संधिप्रकाशांत मन जितकें अुचंबळतें तितकेंच अुदासहि झाल्यावाचून राहत नाही!

"भग्नमूर्ति" (अनिल) व "काव्यकिरीट" (यशवंत) हीं दोन सुंदर काव्यें मागच्या सालींच जन्माला आलीं. "काव्यकिरीटा"त राजयशोवर्णनाबरोबरच संस्कृतीटीकाहि आली आहे. मुक्तछंदाच्या खडकाळ व आडवळणी वाटेने "भग्नमूर्ति"कडे रखडत जात असतानाहि भावना व विचार यांचें सौंदर्य पाहून आल्हाद होतो. अनिल व यशवंत हे दोघेहि अुत्कृष्ट भावकवी आहेत आणि त्यामुळेंच प्रदीर्घ काव्यरचनेला रंजकता व आकर्षकता आणण्यात त्यांना एवढें यश मिळालें. वाडिया कॉलेजमधील प्रो. वा. मा. पाठक यांच्या "मानवता" या चिंतनात्मक काव्याचा साभिनंदन उल्लेख करावासा वाटतो. प्रो. पाठक तत्त्वचिंतक असूनहि सौंदर्यवादी आहेत. मुकुंदरायांचें 'रुग्णविलाप' हें अेक सरस काव्य आहे. रेखीव रचना, सूक्ष्म विनोद व मार्मिक अुपरोध यामुळे मुकुंदरायांची जुन्या वळणाची कविताहि हृद्य वाटते.

"सुधा" या प्रो. माधदेव यांच्या खंडकाव्याची जडणघडण सुबक असती, त्यातील भयंकर घटनांच्या धक्क्यांनी सहजतेची हानि झाली नसती, तर त्या काव्यातील रसवत्तेविषयीं विशेष कौतुकाने लिहिता आलें असतें. "कुंदा-मोहन" हें मेहेंदळे यांचें भावगीतात्मक खंडकाव्य वाचून त्या नवशिक्या कवीच्या पुढील कृतींविषयीं आतुरता वाढते.

डॉ. श्रीखंडे यांनी "सुश्लोक कुमार" हें 'कुमारसंभवा'चें भाषांतर प्रसिद्ध करून स्वतःच्या कविकीर्तींत आणि मराठी काव्यवाङ्मयाच्या भाषांतर-शाखेंत भर घातली आहे. हीच विधायक कामगिरी डॉ. श्रीखंडे यांनी पुढे चालू ठेवली, तर क्लिष्टता व ऱ्हस्व दीर्घांची ओढाताण नाहींशी करून अधिक प्रसन्न रचना करण्याचा प्रयत्न करावा अशी त्यांना प्रेमाची सूचना आहे.

अितर रसांप्रमाणे वीररसाचाहि मान आधुनिक कवींनी ठेवला आहे. आफळे व सुचाटे या शाहिरांचे पोवाडे आणि झाशीच्या राणीचें श्रीवरकृत काव्य वाचून, प्रभाकरापासून सावरकरापर्यंत चालत आलेल्या स्फूर्तिदायक काव्यप्रकाराची परंपरा जिवंत आहे हें सहज कळून येतें. मात्र परंपरा नुसती जिवंत ठेवण्यात हंशील नाही, तर तिचें वजन व तिची पातळी कायम ठेवणें हें खरें कार्य होय हें आमच्या या उत्साही नव शाहिरांनी ध्यानीं घ्यावें. जाज्वल्य प्रतिभासाधनाशिवाय हें कार्य होणार नाही.

स्फुट कवितांच्या संग्रहात 'बीजांकुर' हा शांताराम आठवले यांचा काव्यसंग्रह चटकन् डोळ्यांत भरेल. चित्रपटांतील गाणीं शांताराम का सुंदर लिहूं शकतात याचें रहस्य या पुस्तकांतील चटकदार भावगीतें सांगतील. शांताराम यांच्या कवितेला अलीकडे लागलेले अपरोधप्रियतेचें व्यसन ज्यांना रुचत नाही असेहि वाचक शांतारामच्या काव्यगुणावर लुब्ध आहेत. 'सहवास' हें संतदंपतीच्या भावगीतांचें संकलन रमणीय आहे. विशेषतः सौ. अिंदिरा संत यांच्या काव्यातील सहृदयता व रेखीवपणा मनोवेधक वाटतो. नागपुरचे 'हुताश' कवि यांनी प्रसिद्ध केलेला 'कूजन' हा संग्रह विशिष्ट मनोरचनेच्या लोकांना तर आवडेलच पण अितरांनाहि वैचित्र्य या दृष्टीने वाचावासा वाटेल. सौ. शांताबाई नाशिकर यांनी आपल्या मधुर गीतांचा संग्रह प्रसिद्ध केला आहे. वाङ्मयाच्या अितर शाखांत अनेक प्रश्नांवर व भावनातरंगांवर लिहिण्यास त्यांना वाव मिळाल्यामुळेच की काय त्यांच्या प्रस्तुत कवितांत ठरीव विषय व भावना आढळून येतात. प्रो. भवानीशंकर पंडित यांनी शिशुगीतांचे चार संग्रह प्रसिद्ध करून शिशुवर्गाला आनंदित करून सोडलें आहे. प्रो. पंडित यांच्या कवितेंतला सर्वांत मोठा गुण जो शब्दरचना तो या पुस्तकांत प्रकर्षाला गेलेला आहे. मनोहर टेकाडे यांनी 'छाया' हा शिशुगीतसंग्रह काढून आपल्या वाङ्मयसेवेला आरंभ तर चांगला केला. दसनूरकर यांचीं 'अभिनय गीतें' मुलांत प्रिय होण्यासारखीं आहेत.

'विष्णुदास-कविता,' 'गीतामृतशतपदी,' 'सार्थहरिपाठ' अि. पुस्तकांच्या प्रकाशनामुळे 'ब्रह्मविद्येच्या सुकाळा'त आणखी सम्पन्नता आली आहे. सानेगुरुजी यांनी परिश्रमपूर्वक संकलित केलेलीं स्त्रीगीतें (स्त्रीजीवन) अतीव मधुर आहेत. यंदा या मनोरम संग्रहाचा दुसरा भाग हातीं पडेल हें मोठें सुदैव होय. असो.

या आढाव्यात गेल्या वर्षीचीं सर्व काव्यपुस्तकें आलीं आहेत असें नाही. अनुल्लेखाने कुणाचाहि अनादर करावा असा मुळीच अुद्देश नाही. निरीक्षकापर्यंत येअून पोचलेल्या कुठल्याहि पुस्तकाचा परामर्श घेतला नाही असें क्वचितच झालें आहे. काव्याची आवश्यकताच कुठें आहे असें सांगणाऱ्या विद्वान् प्राध्यापकांना ज्यांनी सक्रिय चोख प्रत्युत्तर दिलें त्या सर्वच उल्लेखित व अनुल्लेखित कविकवयित्रींचा आम्ही सानंद गौरव करतों. महाराष्ट्रात 'अर्थकृते' कविता लिहावी अशी स्थिति कधींच नव्हती पण 'यशसे' हाहि हेतु साध्य न होण्याचा काळ आला आहे. अशा स्थितींतहि आपल्या भावना विचारांना काव्यरूप देणाऱ्या कलावंतांची महती विशेष आहे. लय व नाद हे जोंपर्यंत मनुष्याचीं अंतःकरणें हलविण्यास समर्थ आहेत तोपर्यंत काव्याची थोरवी अबाधितच राहील. तथापि सर्व कलाप्रमाणेच काव्य हीहि कला आराधनेशिवाय साध्य होणारी नाही हें कवींनी लक्ष्यांत ठेवलें पाहिजे. काव्याचा अुपहास होण्यास काव्याबद्दल खुद्द कवींनाच तिनकीशी आस्था न वाटणें हें अेक प्रमुख कारण होय. ही अेक सहजसाध्य व जीवनाच्या दुसऱ्या दशकात अुथळपणें हाताळण्याची कला आहे असा बहुतेक रसिकांचाच नव्हे तर कवींचाहि समज असतो. हा समज झटकून टाकून कविवर्य तांबे यांच्याप्रमाणे सारा जीवनानंद व जीवनानुभव याच माध्यमाच्या द्वारें व्यक्त करूं अशी गाढ श्रद्धा आधुनिक कवि बाळगतील तर मराठी कवितेचा अुत्कर्ष फार दूर राहणार नाही.

### नाटक

काव्याप्रमाणेच मराठी नाटकालाहि सध्याचे दिवस बरेचसे प्रतिकूलच असल्यामुळे अि. स. १९४० सालीं, तीस पस्तीसपेक्षा अधिक नाटकांच्या पुस्तकांची निपज झालेली

दिसत नाही. यापैकी चारपांच पुनर्मुद्रणें असून त्यांत 'बासुंदीपुरीचा फार्स', 'वेड्या नाऱ्याचा फार्स', 'चहाडखोर शास्त्री' फार्स, यांसारख्या फार्सोंच्या चोपड्याबरोबरच, श्री. औंधकर यांच्या, अेके काळीं महाराष्ट्र नाटक मंडळीच्या रंगभूमीवर गाजलेल्या 'बेबंदशाही' नाटकाचाहि समावेश होतो. श्री. सहृदय यांची 'पूजा', श्री. शामराव ओक यांचें 'हवेवर' व श्री. तळेकर यांच्या 'श्रुतिगुण नाटिका', हे तीन अुल्लेखनीय नाटिकासंग्रह या वर्षांत प्रसिद्ध झालेले आहेत. या संग्रहांतून स्वतंत्र आणि भाषांतरित अशा दोनहि प्रकारच्या अेकांकिकांचा व नाटिकांचा समावेश झालेला असून, तिन्हीहि लेखकांना विषयाच्या निवडीबाबत व लेखनशैलीच्या संबंधात स्वतंत्र स्थान व वैशिष्ट्य आहे. श्री. सहृदय यांची वृत्ति आत्यंतिक हळुवार व भावनाप्रवण तर श्री. ओक हे खेळकर आणि खोडकर विनोदाचे आणि व्याजोक्तिपरिपूर्ण लेखनाचे पुरस्कर्ते. श्री. तळेकर यांनी आपल्या संग्रहाला जोडलेल्या विस्तृत निबंधात नभोवाणीसाठीं लिहिल्या जाणाऱ्या नाटिकांच्या तंत्राबद्दल व विशेषांबद्दल अुद्बोधक, मार्मिक व मार्गदर्शक चर्चा केली असून, त्या दृष्टीने त्यांच्या नाटिकासंग्रहाला या वर्षीच्या नाट्यविषयक कृतींच्या निर्मितींत महत्त्वाचें व अुपयुक्त स्थान आहे. श्री. मुंडले यांच्या "हंसरीं नाट्यसुमनें" या नाट्यप्रवेशांच्या संग्रहांतील संवाद, शाळामधील विद्यार्थ्यांना संमेलन-समारंभप्रसंगीं प्रयोगरूपाने करण्यासाठी अुपयुक्त होतील अशा रीतीने तयार केलेले आहेत. श्री. ना. धों. ताम्हणकर यांचे 'शाळेसाठी' हें अेक नाटुकलें असून, प्रौढ स्त्रियांच्या संमेलनप्रसंगीं अुपयुक्त होओील अशा दृष्टीने त्यांनी आपल्या 'नव्या जुन्या' या नाटिकेच्या विषयाची, त्यातील पात्रांच्या स्वभावाची व वातावरणाची निवड केली आहे. ओघवती आणि विनोदमिश्रित प्रसन्न भाषासरणी व विषयाच्या मांडणींत कोणत्याच बाजूला जास्त तोल झुकू न देता ज्या बाजूचं जेवढें चांगलें आहे तेवढें तोंड भरून चांगलें म्हणण्याचें निःपक्षपाती धोरण, यामुळे ही नाटिका स्त्रीवर्गांत फारच प्रिय झाली आहे, हें तिचे ठिकठिकाणीं स्त्रियांच्या संमेलनांतून प्रयोग झाल्याचें बारंवार वृत्तपत्रांतून वाचावयाला मिळतें, त्यावरून अुघड आहे. "सं. साक्षरता", "सं. ध्येयवादी", "पाढरपेशा" या नाटिका अनुक्रमें श्री. पा. अ. वेलणकर, कु. सुशीला ढवळे व वि. आ. पाठारे यांनी लिहिल्या असून प्रा. वि. स. गोगटे यांचा "काय म्हणता !" हा नाट्यछटांचा संग्रह नाटकाच्या अुपप्रकारांतील अेक विशेष अुल्लेखनीय भर म्हणून निर्देशित करतां येण्यासारखा आहे.

कांग्रेस सरकारच्या मद्यबंदीच्या धोरणामुळे व त्या प्रकारच्या वाङ्मयाच्या प्रत्यक्ष पुरस्कारामुळे, मद्यपानाचे अनिष्ट परिणाम दर्शविणारीं व कांग्रेस सरकारच्या धोरणाचा पाठपुरावा करणारीं अनेक नाटकें गेल्या वर्षी निर्माण व्हावयास पाहिजे होतीं, परंतु प्रत्यक्ष अनुभवात श्री. अेस्. जी. जोशीकृत "मद्यविडंबन", श्री. निंबगावकरकृत "दारूबंदी" व श्री. भा. वि. वरेरकरकृत "कोरडी करामत" हीं तीनच या विषयावरील नाटकाचीं नावें नजरेपुढें येतात. यापैकीं श्री. वरेरकर हे प्रथितयश नाटककार असल्यामुळे, त्यांच्या कृतीच्या परिणामकारकतेबद्दल व अुपयुक्ततेबद्दल फार मोठ्या अपेक्षा त्यांच्या चहात्यांनी व भक्तांनी बाळगलेल्या होत्या, परंतु साक्षात् महसूलमंत्र्यांची मैत्रीसुद्धा पुरी न पडल्यामुळे तें नाटक अखेर दुर्दैवाने रंगभूमीवर येअूं शकलें नाही; तरीहि पण ते पुस्तकरूपाने प्रसिद्ध केल्याबद्दल श्री. वरेरकर यांचें अभिनंदन करणें जरूर आहे.

मुंबअी पुणें येथील पांढरपेशे, त्यांच्या वस्तींतील नाटकगृहांच्या अभावीं नाट्यप्रयोगांना पारखे झाले असले, तरी परळ पोयबावडीच्या दामोदर हॉलमुळे श्री. सावंत यांचा "मिल-

मजूर" किंवा श्री. परब यांच्या "गिरणगावांत," याना थोडासा तरी अवसर मिळणें शक्य होतें, ही त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट आहे. श्री. वि. गो. शेट्ये, श्री. शिवराअीकर, श्री. भिडे, श्री. लिमये, श्री. बर्वे, वगैरे लेखकांचीं नावें या वर्षीच्या नाटकांच्या लेखकात दिसतात, परंतु त्यापैकी शेट्ये यांच्याखेरीज दुसरा कोणी परिचितसा दिसत नाही. "पंढरपूर" हें रत्नागिरी संमेलनाच्या प्रसंगीं प्रसिद्ध केलेलें अेक व "बनावट बायको" हें दुसरें; अशीं दोन नाटकें श्री. शेट्ये यांच्या नांवावर या वर्षीं दिसतात. "गृहपाश" हें रूपांतरित नाटक, डॉ. लेले व डॉ. घारपुरे यांच्या संयुक्त परिश्रमाचें फळ आहे. डॉ. हरमान सुडरमान यांच्या ज्या मूळ जर्मन नाटकावरून हें भाषांतर केलें गेलें आहे, त्याचीं इंग्रजींत दोन वेगवेगळ्या नावांखाली भाषांतरें झालेलीं असल्यामुळे; पत्रिकेच्या गेल्या अंकीं गृहपाशाचें परीक्षण करताना हीं दोन अिंग्रजी भाषांतरें त्याच्या वेगवेगळ्या नाटकाचीं भाषांतरें असावीत अशा समजुतीने मूळ ग्रंथ जवळ नसल्यामुळे अनवधान होअून चुकीचें विधान केलें गेलें होतें; तें दुरुस्त करणें जरूर आहे. परंतु त्याव्यतिरिक्त त्या लेखातील अितर मूल्यमापन यथायोग्यच आहे. "सर्वदमन" या श्री. रा. न. कीर्तनेकृत शाकुंतलाच्या कथवर आधारलेल्या नाटकाचें परीक्षण गेल्याच अंकीं आलें असल्यामुळे, केवळ त्याचा नामनिर्देश करण्यापलीकडे अधिक विस्तार, आवश्यक असूनहि, स्थलाभावीं करीत नाहीं. प्रा. ना. बा. पराडकर यांचें "घरंदाज" ही प्रस्तुत लेखकाच्या दृष्टीने १९४० सालची अुत्कृष्ट नाट्यकृति आहे. ती भाषांतरित आहे कीं काय अशी शंका तींत वापरण्यांत आलेल्या घटना, योजलेली वाक्यरचना यावरून पत्रिकेच्या गेल्या अंकातील तिच्यावरील परीक्षणात घेण्यात आली होती; पण तो अंक प्रसिद्ध झाल्यावर, प्रा. पराडकर यांनी ती सर्वस्वीं स्वतंत्र कृति असल्याचें ग्वाही देअून कळविलें असल्यामुळे, आता तीहि शंका अुरली नाही व यामुळे 'घरंदाज' हें १९४० मधील सर्वोत्कृष्ट स्वतंत्र नाटक होय, असें म्हणण्यास प्रस्तुत लेखकास काहीच संकोच वाटत नाही.

## कादंबरी

ललितवाङ्मयात कादंबरी हें सदर नेहमीच भरदार असतें. आधुनिक काल, लघुकथा, भावगीतें, नाटिका अित्यादि अल्पविस्तारि वाङ्मयप्रकारासच पोषक आहे असें म्हणण्यात येतें तरी वाङ्मयाचें व्यापक समालोचन करताना आपणास बहुविस्तारि ग्रंथहि बरेच आढळून येतात. मराठी वाङ्मयात तरी कादंबरी विभागाची सद्दी अद्याप चालू आहे असें त्या वाङ्मयविभागातील प्रकाशन पाहिल्यावर दिसून येईल. मराठीतील प्रथितयश लेखक कादंबरीकार म्हणूनच प्रथम प्रतिष्ठा पावले ते आजहि कादंबरीवाङ्मयांत आपला प्रभाव दाखवीत आहेत. अितकेंच नव्हे तर लघुकथा, लघुनिबंध अित्यादि प्रांतांतहि ते आपला प्रभाव दाखवीत आहेत. गद्य वाङ्मयाच्या या प्रकारांत सर्वत्र लीलया संचार करणाऱ्या लेखकांत श्री. वि. स. खांडेकर यांचें नाव अग्रस्थानीं झळकत आहे. श्री. खांडेकर यांचा संचार अितका वेगवान् आहे कीं त्यांच्या विपुल लेखनाबद्दल जाहीरपणें वादविवादसुद्धा सुरू झाले आहेत. विपुल लेखनाविषयीचीं काही ढोबळ अनुमानें लावून ज्या अर्थी ते पुष्कळ लिहितात त्या अर्थी त्याची प्रतिभा हीनबल झाली असली पाहिजे असेंहि अनुमान कांहींनी ठोकून दिलें आहे! विपुल लेखनाचा हा नियम अशाच पद्धतीने वाङ्मयास लावला तर वाङ्मयाचा वाढता संभार हाहि प्रतिभेच्या दुर्बलपणाचें लक्षण आहे असें म्हणावें लागेल!

अल्पवयी माणसें गुणी असतात, देवास आवडतात म्हणून दीर्घायू हे देवाने नाकारलेले अव-गुणी आहेत असें म्हणण्यासारखेंच आहे !

वाङ्मयाचा साकल्याने विचार केला तर मराठींतील विपुल लेखन बहुविध प्रतिभेचे निदर्शक आहे असें दिसून येईल. कादंबरी विभागापुरतें पाहिलें तरी किती तरी नवें नवें लेखक या विभागात चमकूं लागलेले दिसतात. 'पाणकळा' कर्ते श्री. दीघे, 'काळे ढग' कर्ते प्रा. आवेकर, 'ज्वाला' कर्ते माधव मनोहर, 'राक्षसविवाह' कर्ते श्री. क्षीरसागर, 'आदिमाया' कर्ते प्रा. वनमाली आणि 'लपंडाव' कर्ते श्री.रमाकांत हीं नावें कादंबरीविभागांत नुकतींच चमकूं लागूनहि अविस्मरणीय झाली आहेत. खांडेकर, माडखोलकर, फडके, वरेरकर यानी कादंबरीविभागात मोलाची वार्षिक भर घातली आहे. बोकील लघुकथेच्या प्रांतातून कादं-बरीवाङ्मयाकडे मोठ्या डौलाने मोर्चा वळवीत आहेत. पु. य. देशपांडे आपला जीविताकडे पाहण्याचा दृष्टिकोन 'विशाल' झाल्याचें दाखवीत आहेत. स्त्रीलेखिकांत सौ. शांताबाई नाशिककर, कुमुदिनी शंकर प्रभावळकर यानी चाळीस साली कादंबरी विभागात हजेरी दिली आहे. साने गुरुजी यांच्यासारखे लेखक वाङ्मयाचा अेक दुय्यम माध्यम म्हणून अुपयोग करणारे, त्यांचीहि कादंबरीविभागात चाळीस साली भेट होते. श्री. तात्यासाहेब केळकर यांची 'कावळा आणि ढापी' ही कादंबरी या विभागात पाहिल्यानंतर या विभागाच्या वैभवात मोठ्या माननीय प्रतिष्ठेची भर पडली आहे असें दिसून येतें. अितिहासात विहार करता करता श्री. आबासाहेब चांदोरकर हेहि छत्रसालाच्या निमित्ताने या विभागात अुपस्थित असलेले दिसतात. या विभागांत दीर्घकाल वावरून आपली अेक स्वतंत्र पेठ तयार करणारे श्री. ना. वि. कुळ-कर्णी 'महाराष्ट्र कुटुंबमाले'च्या निमित्ताने येथे आपल्या 'मुकामार' कादंबरीसह हजर आहेतच. याशिवाय श्री. गोपीनाथ तळवलकर, श्री. निरंतर, श्री. वि. ल. बर्वे, लोहोकरे, अपाध्ये अित्यादि लेखक या विभागात सालाबादप्रमाणे अेक फेरी मारून गेले आहेत. आणि आता जसजसे स्थिरपणें हिंडूं लागावें तसतसें किती तरी लेखक कादंबरीकदंबाच्या तरुतळीं विहार करीत बसलेले दिसतात. अेकल्यादुकल्या प्रवाशाला त्या सर्वांची ओळख असणें शक्य नाही. परंतु समालोचनासाठी निघालेला प्रवासी हा सर्व 'मेळा' पाहत उभा आहे. आणि आदर कुतूहल, अुत्सुकता, अपेक्षापूर्ति अित्यादि अनेक भावना त्याच्या मनात डोकावत आहेत. कादंबरीविभागातील प्रथितयशापासून नवोदितापर्यंत सर्वांचे ग्रंथ वाचून वर्षाच्या शेवटीं क्षणभर थांबून या ग्रंथातील जीवनाचीं विविध प्रतिबिंबें आठवलीं तर असें अनुभवास येतें कीं, जीवनाचे नवें नवें अंतरंग आपणास दिसूं लागले आहे.

उदाहरणार्थ, या विभागांत सर्वव्यापी झालेला स्त्री-पुरुषसंबंध (प्रेम, विवाह, प्रेमोत्तर विवाह, विवाहोत्तर प्रेम, विवाहबाह्य प्रेम, विवाह आणि व्यक्तिमत्ता इत्यादि इत्यादि) हा विषय घेतला तरी त्यात कांहीं नव्या बाजू आपणास या वर्षीच्या कादंबरीविभागात दिसतील.

विवाहपूर्व प्रेम किंवा पहिलें प्रेम हें अतृप्त राहिलें तर त्या निराशेची छाया सर्व जीवि-तावर पसरते; प्रसंगीं वैवाहिक जीवनासहि त्याची झळ लागते आणि पत्नीचा कांहीहि अपराध नसतां त्यांचीं जीवनमंदिरें भंग पावतात, उध्वस्त होतात, इत्यादि प्रकार वाङ्मयांत रूढ झालेला आहे. परंतु पहिल्या प्रेमाचा हा फाजील बडेजाव श्री. खांडेकर यानी आपल्या कादं-बरीत अुतरवला आहे. पहिलें प्रेम अतृप्त राहिलें तरी सर्व आयुष्य त्यासाठी अडून बसत नाही. आयुष्यांत आपण अनेक अपेक्षाभंग पचवतों त्याप्रमाणेच पहिलें प्रेम. पहिल्या प्रेमाची अपूर्तीहि पचवता येते असें श्री. खांडेकर यानी दाखविलें आहे. परंतु हें सगळें सिद्ध करतांना

श्री. खांडेकर यांनी निवडलेलें पहिलें प्रेम हें मुळातच इतकें दुर्बल आहे की, त्याच्या गैर-हजेरीची फारशी जाणिव कादंबरींत दिसत नाही. ज्या पहिल्या प्रेमाची अुत्कटता हवापालट केल्याबरोबर कमी होते तें पहिलें प्रेम हें एखाद्या लहरीसारखें असलें पाहिजे. याच विषयावर इतर लेखकांस हें मान्य झालेलें दिसत नाही. या वर्षीच्या कादंबऱ्यांत कांही कादंबऱ्यांतून दुहेरी जीवनाचें जवळ जवळ समर्थन केलेलें दिसून येतें. प्रेम ही अेक नैसर्गिक वासना आहे, तिची क्रिया अमर्याद आहे, पुरुषाचें मन हें सौंदर्यसंपन्न स्त्रीच्या सहवासास कायमचें लाचार झालेलें आहे, असेंहि दाखविणारे लेखक आहेत. श्री. माडखोलकर यांनी 'दुहेरी जीवन' कादंबरींत पुरुषाच्या या वृत्तीचें एका पत्नीकडूनच समर्थन केलें आहे. या समर्थनाच्या भरात पुरुषाच्या विकृत जिज्ञासातृप्तीचेंहि समर्थन करण्यापर्यंत मजल मारली आहे; आणि तें पत्नीच्या तोंडून ! श्री. माधव मनोहर यानी ज्वाला कादंबरींत जणु काय प्रेमाचेंच विडंबन केलें आहे. आपल्या अप्राप्त प्रियेसाठी झुरणारा नायक दुःखाचा भार हलका करण्यासाठी आपली पत्नी व मोलकरीण याच्या सहवासांत अुन्मादकारक जीवन घालवीत असतो, आणि तरी त्याची प्रिया विवाहबंध तोडून त्याच्याकडे येते. तिच्या प्रमाथी सौंदर्यासाठी तो हापापलेला आहेच ! सौंदर्य-संपन्न स्त्रियाच्या सहवासात कामातुरतेने थयथयत असणें हेंच जणू काय पुरुषाचें जीवन आहे, तेथे पहिल्या प्रेमाला वासनापूर्तीचें अेक जुनें ठिकाण यापलीकडे किंमत दिसत नाही. प्राप्त जीवनांतील कटु परिस्थिति असह्य झाली की त्यावर अुतारा म्हणून पहिल्या प्रेमाकडे कांही नायक धावत आहेत. पत्नी आणि प्रिया या संभ्रमांत काही शेवटीं भ्रष्ट होतात, कांही सावध होतात. श्री. बोकील याचा नायक या झंझावातांतून बाहेर पडला आहे. दारिद्याने गांजून अत्यंत प्यार झालेल्या पत्नीशींहि खटका उडाल्यावर श्रीधरला आपली प्रेयसी शांता भेटते. ती त्याला वासनामय जगात खेचीत असता श्रीधर सावध होऊन आपल्या घरीं धावत येतो आणि झंझावातातून बचावतो. परंतु श्री. गोपीनाथ याचा नायक आकाशमंदिराचें संरक्षण असूनहि स्वतःस सावरूं शकत नाही. भक्ति आणि प्रणय यांत पुरुष प्रणयाकडेच खेचला जातो; आणि तो जर सावध नसेल तर संयमाची दैनिक स्नानसंध्या करीत राहूनहि मोहाचे प्रसंग त्याला खेचून नेतात हें श्री. तळवळकर यांनी दाखविलें आहे. प्रिया आणि पत्नी या दोन ध्रुवांमध्यें पुरु-षाच्या आयुष्याची होणारी रस्सीखेच निरनिराळ्या प्रकारांनी कादंबरीकारांनी वर्णिली आहे. प्रियेचें प्रेम हे पत्नीविषयक कर्तव्याशीं सारखें झगडत राहतें. पत्नीची पतिभक्ति आणि प्रियेची ओढ यांचें तुमुलयुद्ध आधुनिक विवाहितांच्या जीवनात चालू असतें. कादंबरीकाराना यांची स्पष्ट जाणीव आहे. या तुमुल युद्धांत प्रेमभंगामुळे आत्महत्या करणें हा मार्ग नव्हे. पत्नीला लाथाडून प्रेमाकडे धाव घेणें हेंहि कर्तव्यबुद्धीस पटत नाही. प्रेमाची ओढ पत्नीच्या भक्तीने कमी होत नाही. अशा स्थितींत पत्नीवर अन्याय न करता प्रियकर व प्रिया यांचें मीलन घडवून आणण्याचा मार्ग शोधण्यांत कादंबरीकार आपलें कौशल्य व प्रतिभाबल कसोटीस लावीत आहेत. या मार्ग शोधनांत कांहींनी पहिलें प्रेम हें पुष्कळ वेळां तारुण्यसुलभ वासना असें ठरवून मार्ग काढला आहे. तर कांहींनी पुरुषाचें मन हें असेंच असावयाचें ! पत्नीची फसवणूक झाली तर त्याला काय इलाज आहे; पुरुष (पति) तरी काय करणार ! पत्नींनी समजूतदारपणा दाखविला पाहिजे; अशा विवेचनाने समजूत घालण्याचा कांही प्रयत्न करीत आहेत. तर कांहींनी प्रियेला वैध-व्याच्या मार्गाने विवाहबंधनांतून मुक्त करून प्रियकराच्या सहवासाचा योग आणून जीवनांत अुन्मादी वातावरण अुत्पन्न करण्याचा मार्ग दाखविला आहे. प्रेम आणि कर्तव्य या कटकटीला कंटाळून 'अभिसारिका' कादंबरींतील पात्रांसारखीं कांही पात्रें स्वैराचार करीत हिंडत आहेत.

प्रीतिविवाहाने तरी विवाहाचा प्रश्न सुटतोच असें नाही. तेव्हां विवाहसंबंधाचीं बंधनें सांभाळण्याची वणवण तरी कशाला असा मोठा मोहक विचार अभिसारिका सुचवीत आहे. आधुनिक जीवनाचे प्रश्न सोडविता येत नाहीत तोपर्यंत निदान त्यातील प्रमादाविषयी क्षमावृत्ति बाळगावी असें 'धबधब्याच्या धारेंत' सापडलेले प्राणी सांगत आहेत. कुमारी माता, दीर-भावजय, बहीण-भाऊ याच्यात अुत्पन्न होणारीं अनैतिक नातीं याविषयी क्षमावृत्ति अुत्पन्न करण्याचा प्रयत्न काही लेखकानी केला आहे.

परंतु कांही लेखक अद्याप प्रिया आणि पत्नी याची तेढ सोडविण्याविषयी आशा बाळगून आहेत. ही तेढ उत्पन्नच होणार नाही असें जीवन काही कादंबऱ्याच्या नायकाचें दिसून येतें. ध्येयवादी माणसाने स्त्रीसहवासाचा लोभ आवरला पाहिजे. आवरल्यावर अनुरक्त असलेली प्रियाहि ध्येयमार्गावर आपल्याला साथ देअू शकत नाही. कारण कार्यकारी माणसावर, ध्येयवादी तरुणावर, प्रेम करणाऱ्या स्त्रिया आपल्या प्रियकराच्या ध्येयाविषयी अज्ञानी असतात. प्रियकराचें प्रेम मिळविण्यासाठी त्या त्याच्या ध्येयावर प्रेम करूं लागतात. परंतु प्रेम आणि ध्येय याच्यात तेढ आली तर प्रियकरानें ध्येयमार्ग सोडून प्रेमाला जवळ करावें अशी त्याची तीव्र इच्छा असते. 'काळे ढग' या कादंबरींतील नायकाने ही परिस्थिति बरोबर ओळखलेली दिसते आणि प्रेमाच्या उन्मादावस्थेंतहि आपण व आपली प्रिया याच्या जीवनपद्धतींतील फरक तो विसरला नाही आणि त्याने प्रियेला निरोप दिला. प्रा. आंबेकर याचा नायक या दृष्टीने आधुनिक जीवनातील एक जागरुक कर्तबगार तरुण आहे. काळे ढग या कादंबरीतील नायक व नायिका याच्या ठिकाणची आत्मनिरीक्षणवृत्ति प्रशंसनीय आहे. 'उन्माद'काराच्या नायिका अद्याप आपल्या रोमॅन्टिक जगातून बाहेर आल्या नाहीत. त्या कम्युनिझमवरहि प्रेम करतात परंतु कम्युनिझम कळतो म्हणून नव्हेतर 'तिकडे कम्युनिझम आवडतो म्हणून !–' आणि त्या नायकाना राजकारणाचा अेक षौक आहे एवढेंच ! वैवाहिक जीवनाचीं विविध चित्रें कादंबऱ्यांतून वाचतांना वाचकास, जीविताचे प्रश्न सोडविण्याची लेखकाची अेकच धादल अुडालेली दिसून येते. वेश्याहि आदर्श गृहिणी असूं शकतात असें पाथर ही कादंबरी सांगते. कादंबरीमय जीवनाच्या मोहाने फसलेल्या स्त्रियाना खलपुरुषाच्या कपटजालातून सोडविणारीं वडील माणसें गृहप्रवेश या कादंबरींत रंगवून पुस्तकी ज्ञानापेक्षा वृद्धानें अनुभवच मार्गदर्शक होतात असें लेखकाने दाखविलें आहे. 'निखारा' लेखकानी वडील मंडळींना विरोध करण्याचें सामर्थ्य नसल्याने त्याना नकळत नायक नायिका रात्रीबेरात्रीं एकान्तात विस्तृत भेटी घेअून आपलें दुःख कमी करतात असें दाखविलें आहे. जीवनतरंगाचे लेखक श्री. शशिनाथ यानी आधुनिकात रूढ होअूं पाहणाऱ्या रजिस्टर मॅरेजवर विदारक टीका केली आहे आणि नायिका विवाहापूर्वीच गर्भाशय काढून मोकळी होते असें विडंबनासाठी दाखविलें आहे. सावधानपद्धतीच्या लग्नावर दृढ श्रद्धा बाळगणारेहि लेखक आहेत. प्रा. गोरे यांनी विद्याविनोद ही कादंबरी लिहून कॉलेजातील तरुणाच्या जीवनक्रमावर विदारक प्रकाश पाडण्याचा प्रयत्न केला आहे. कॉलेजातील प्रेमें हीं अत्यंत क्षणिक असतात. त्यांची विवाहसंबंधात परिणति होण्याचा संभव नसतो. तारुण्यसुलभ जीवनातील ती अेक उन्मादाची लहर असते असें विद्याविनोद कादंबरींत दाखविलें आहे. प्रा. वनमाली यांची आदिमाया अेका प्रोफेसराचें जीवन रंगवून स्त्रिया आराधकापेक्षा विरोधकावरच जास्त प्रेम करतात हा अेक आधुनिक तरुणींचा स्वभावविशेष दाखवला आहे.

कादंबरीविभागात कांही कादंबऱ्यानी नवीं नवीं वैशिष्ट्यें साधण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. अुदाहरणार्थ श्रीमंतांतहि, श्रीमंती संभाळूनहि आदर्श जीवन चालविणारीं माणसें

असतात. हें दाखविण्यासाठी **पुरुषस्य भाग्यम्** ही कादंबरी जन्मास आलेली दिसेत. त्यांतील सर्व पात्रें एकजात गर्भश्रीमंत आहेत. आणि तरी आचरणाने अत्यंत सत्त्वशील आहेत! असेंहि असूं शकतें हें कळण्याऐवजीं असेहि लिहिता येतें अेवढेंच या कादंबरीवरून कळून येतें. डॉक्टरच्या जीवनाचें व विशेषतः त्या व्यवसायाचें हुबेहूब चित्र शब्दचित्र हें **डॉक्टरची तपासणी** या कादंबरीचें वैशिष्टय आहे. पोलीसखात्यात नोकरी करणाऱ्या लोकास जीवनाचे किती रहस्यमय प्रसंग अनुभवास येतात आणि या दृष्टीने त्या व्यवसायांतील लोकांचे अनुभव स्वभावतःच किती चित्तवेधक असतात तें 'रहस्यभेद' या कादंबरींत दिसून येतें. जीवनाची ती बाजू त्या खात्यांतीलच अेका अधिकारी गृहस्थाने रंगविली आहे. **पाणकळा** ही किसानजीवनाचें दर्शन देणारी मराठींतील अुल्लेखनीय कादंबरी ठरली आहे. त्या कादंबरीबरोबरच **मुचकुंदरी** या कादंबरीचीहि आठवण होते. खेडीं व शहरें यांच्यातील जीवनात संघर्ष कसे होतात तें या लेखकानी फार परिणामकारक भाषाशैलीने दाखविलें आहे. मद्यपानबंदीच्या चळवळीस पुनः अेकदा भाग्याचे दिवस आल्यानंतर त्या निमित्ताने श्री. वरेरकर यानी **'पेटतें पाणी'** ही कादंबरी लिहून वाङ्मयद्वारा मतप्रचार व विशेषतः स्त्री-प्रभाव दाखविला आहे. मानवी व्यवहारातील प्रेमाचीं वर्णनें वाचून कंटाळलेल्या वाचकाना **पिशाच्चप्रेमाने** करमणूक होअील. या कादंबरींत पिशाच्चयोनींतील तरुणीवर प्रेम करणारा अेक 'शेख महंमद' आहे!

सिनेमाव्यवसायातील जीवनाचें सत्य स्वरूप दाखविण्याचा प्रयत्न **मयसभा** या कादंबरींत केला आहे. त्या जगातील भेसूर सत्य अुठवून दाखविण्यासाठीं लेखकाने अेका विवाहित स्त्रीस तिच्या पतीकडून सक्तीने सिनेमात पाठविलें आहे आणि तिच्या जीवनात सिनेमासृष्टींतील अतिप्रसंग दाखविले आहेत. **अुर्वशी** या कादंबरींतहि सिनेमानटींचीं दुःखें दाखविलीं आहेत. त्याबरोबर चालू समाजस्थितींत वेश्यानी आपला व्यवसाय सोडून संभावित जीवन जगण्यास वाव नसल्याने आत्मोद्धाराची अिच्छा असूनहि त्याना गर्तेंत खिचपत पडावें लागतें हें दाखविलें आहे. लेखनपद्धतींतील विशेष या दृष्टीने **वातचक्र** ही ना. धों. उपाध्ये याची कादंबरी अुल्लेखनीय आहे. वृत्तपत्रानेंच माध्यम करून त्यानी कादंबरी रंगविली आहे. राजकीय नावाखाली प्रसिद्ध होणाऱ्या कादंबऱ्यातील अप्रस्तुत कात्रणापेक्षा वृत्तपत्राचा कादंबरीवाङ्मयात हा बरा अुपयोग आहे! कथानकात राम नसला तरी लेखनपद्धतींतील वैशिष्टयाने वातचक्र वाचकाच्या खास लक्ष्यात राहील.

स्त्रीलेखिकात **माझीं कोरीव लेणीं** ही सौ. शांताबाअी नाशिककराची कादंबरी १८५७ सालानंतरच्या कालातील समाजस्थितीचें शब्दचित्र म्हणून उल्लेखनीय आहे. त्यांतील समाजस्थिति परिचिताची स्मृति जागृत करून देते परंतु त्या परिस्थितीशीं गोवलेल्या पात्रांच्या भूमिका काही प्रसंगीं असंभाव्य वाटतात. अेक पदवीधर शिक्षिका शाक्तपंथीय भवानी विरूपाक्ष मंडळात पाहून ती पदवीधर असली तर शिक्षणाचा तिला गंध नसावा असें वाटतें. यावर्षीच्या कादंबरीलेखिकात दुसरें नाव कुमुदिनी प्रभावळकर याचें आहे. त्याच्या **विरलेलें वस्त्र** या कादंबरींत कुस्करलेल्या हृदयाचा उत्तरार्ध आहे. आधुनिक स्त्रीच्या वैवाहिक जीवनात पुरुषाच्या विवाहबाह्य प्रेमामुळे प्रथम पत्नीवर गृहत्यागाचे प्रसंग कसे येतात हें लेखिकेने दाखविलें आहे. परंतु यापेक्षा विशेष या प्रसंगातून खरी स्त्री शेवटीं आपल्या निसर्गदत्त गुणाच्या पराक्रमानेच विजयी होते हें त्याना दाखवावयाचें आहे. गृहत्याग करून मनुताअीने आपल्या कर्तबगारीने स्वावलंबी जीवन घालविते. शेवटीं पतीच्या आजारीपणात त्याची सेवा करण्याचा

योग आल्याने ती आपल्या सेवाधर्माने पतीचें मन जिंकून पुन्हा गृहप्रवेश करून वैवाहिक जीवनाचें विरलेलें वस्त्र वेळेवर सावरते. पतीच्या अन्यायाचा प्रतिकार करताना पत्नीची अनत्याचारी असहकाराची वृत्तिच हृदयपालट घडवून आणूं शकते असा लेखिकेचा विश्वास आहे. पुरुषाच्या चांगुलपणावर स्त्रीमनाची केवढी दृढ श्रद्धा आहे हें अशा कादंबऱ्यांतून पाहावयास सांपडतें. तेंच 'वणवा' या कादंबरीतील नायिका पाहा. ती गृहत्याग केल्याबरोबर मंगळसूत्र तोडून मोकळी होते! परंतु स्त्रियांच्या अमर्याद सहनशक्तीवर व स्वार्थत्यागाच्या सामर्थ्यावर श्रद्धा ठेवणारे पुरुषलेखकहि आहेत. उदा० उंबराचें फूल लिहिणारे श्री.सरमळकर पहा. दोन तरुणी अेका तरुणावर प्रेम करतात. परंतु अेक दुसरीसाठी प्रेमाचा त्याग करते. प्रेमसंबंधांतील प्रतिस्पर्धी तरुण असा आत्मत्याग करण्याचा समजूतदारपणा दाखवितील का? असा सवाल लेखकाने या कादंबरीच्या द्वारें विचारला आहे. स्त्रीवाचकवर्गांत स्त्रीस्वभावाचा अशा तऱ्हेने केलेला अुपयोग फारसा मान्य ठरणार नाही! कारण स्त्रियानी पुरुषांच्या हृदयपालटाची शतकानुशतकें वाट पाहिली आहे. त्यांचा आंतला आवाज आता त्यांना क्रांतीचा संदेश देअूं लागला आहे! अेकच सामाजिक प्रश्न लेखक व लेखिका निरनिराळ्या तऱ्हेने कसा सोडवितात (निदान वाङ्मयात) हें विस्तृतपणें अभ्यासून पाहण्यासारखें आहे. त्यात असें दिसून येअील. की पुरुषलेखकांच्या नायिका बहुधा अद्भुतरम्यवादी क्वचित् शब्दशूर परंतु आचारांत पुरुषापुढे दुय्यम भूमिका घेणाऱ्या, परतु लेखिकाच्या नायिका या वास्तवाची जाणीव असूनहि 'सहन' करीत राहून असह्य गोष्टी संपविण्याच्या किंवा पचविण्याच्या प्रवृत्तीच्या अशा दिसतील! जीवनाचे चालू प्रश्न सोडविण्यासाठी दोन्ही वृत्तींचा समन्वय होणें जरूर आहे.

'राक्षसविवाह' ही एक भावकथा आहे. कथावाङ्मयात वैवाहिक जीवनाचे जे प्रश्न उभे आहेत त्यापेक्षा एक निराळाच प्रश्न श्री. क्षीरसागर यानी या कथेंत माडला आहे. सुशिक्षित, सुसंस्कृत प्रौढ तरुणीहि समाजातील चालू विवाहपद्धतीच्या पोलादी चौकटीपुढे अगतिक होतात आणि दैववादी होतात हें कारुण्यपूर्ण दृश्य यमूच्या रूपाने या कथेंत वाचकासमोर उभें आहे. मनाविरुद्ध वैवाहिक संबंध पत्करावे लागणें या अन्यायाचें अभिनव स्वरूप या भावकथेंत आहे. यमूचे नियोजित पति म्हणजे एक भला माणूस आहे. यमूहि तशीच. तरी त्याच्या वैवाहिक जीवनात (विशेषतः यमूच्या) आरंभींच तीव्र दुःख उत्पन्न झालें. याचें कारण ज्याच्याविषयी आपल्याला काहीहि आस्था वाटत नाही अशा माणसास वैवाहिक हक्कामुळे पत्नीस शरीरार्पण करावें लागणें! यमूची ही करुण कथा सागणारा नायक यमूचें रक्षण करूं शकत नाही. यमूविषयी त्याला वाटणारी ओढ सौंदर्यासक्तींत जन्म पावून केवळ मानसभूमीवर विकास पावत आहे. मनाचा हा विशिष्ट पद्धतीचा प्रवास हा या कथेंतील दुसरा अुल्लेखनीय विशेष आहे. प्रचलित प्रेमकथेपेक्षा या भावकथेचें स्वरूप अगदी निराळें असूनहि तें वास्तव आहे.

चित्रपटकथांच्या आधारें लिहिलेल्या कादंबऱ्यात 'अर्धाङ्गी' आणि 'लपंडाव' या दोन कादंबऱ्या आहेत. त्यात चित्रपटांतील पात्राची मनोभूमि अतिशय सूक्ष्मपणाने विशद करून एकप्रकारें चित्रपटाची समस्यापूर्ति करण्याचा प्रयत्न श्री. निरंतर यानी 'अर्धाङ्गी' या कादंबरीत केला आहे. आचार्य अत्रे याना आपल्या चित्रपटात व्यावहारिक सोअीसाठी ज्या महत्त्वाच्या गोष्टी अर्धवट सोडून द्याव्या लागल्या त्याचा विस्तार अर्धाङ्गी या कादंबरींत आहे. मध्यमवर्गीय सुशिक्षित तरुणाच्या जीवनात परिस्थितीपुढें काही वृत्तींची कुचंबणा होत असते. आधुनिकतेविषयीच्या त्याच्या काही योजना अतृप्त राहतात. तें असमाधान दूर करण्यासाठी तो धडपड करता करतां आधुनिकतेच्या नांवाखाली नावीन्याच्या मोदमय वातावरणांत गुरफटतो आणि

कांही कटु अनुभवाने त्याला कळून येतें की, नाविन्य आणि आधुनिकता यांच्या गोंधळांत आपलें सामान्य जीवन हेंच निवाऱ्याची जागा आहे ही महत्त्वाची गोष्ट चित्रपटकथेंत बरीचशी दुय्यम ठरली आहे. तिचें उद्‌बोधन करून श्री. निरंतर यांनी चित्रपटकथेची समस्यापूर्ति केली आहे.

श्री. रमाकांत यांच्या 'लपंडावां'तील प्रयत्न मूळ चित्रपटकथेच्या लोकप्रियतेस वाङ्‌मयीन भूषणांनी जास्त शोभा आणण्याचा आहे. चित्रपटकथेंतील पात्रांच्या मनाची चित्रपटावर जेवढी ओळख होते तींत कादंबरीने भर पडत नाही. तसा लेखकाचा हेतु आहे. श्री. रमाकांत यांची कादंबरी कांही गुणविशेषामुळे लोकप्रिय झाली आहे. तिचें वैभव या कादंबरींत विस्तारशः पाहावयास सांपडतें परंतु त्यानीं चित्रपटामागे जाऊन पात्राच्या मनोभूमिकांचें निरीक्षण करण्याचा प्रयत्न केलेला नाही.

कादंबरीविभागांत गेल्या वर्षी जें काम झालें त्याचें हें अतिशय धावतें समालोचन आहे. लेखकांची भाषाशैली वगैरे तंत्रांचा विचार न करतां फक्त मंत्राचें टांचण केलें आहे. त्यावरून असें दिसून येईल की गेल्या वर्षीपर्यंत कादंबरीविभागांत आधुनिक वैवाहिक जीवनांत प्रिया आणि पत्नी किंवा प्रियकर आणि पति या दोन गोष्टींतील तेढ हाच विषय बहुतेकांच्या वाहत आहे. प्रिया आणि पत्नी या व्यक्ति अेकच असणें, प्रियेचें पत्नीत्वांत व प्रेमाचें विवाहांत रूपांतर वा अुत्क्रांति होणें ही परिस्थिति वाङ्मयातून दुर्मिळ होत चालली आहे. स्त्रियांचाच काय परंतु पुरुषांचाहि विवाह मनाविरुद्ध असावयाचा हा कादंबरीप्रांतांत अेक सिद्धान्त ठरूं पहात आहे. वैवाहिक अन्यायाचा हा अेक नवा प्रकार आहे. या गोष्टीबरोबरच दुसरी अेक गोष्ट दिसते ती ही की, प्रेमभंगाचा बाऊ जवळ जवळ नाहीसा झाला आहे. सामाजिक जीवन बरेंचसें शिथिल झाल्यामुळे प्रिया प्रियकरांची विवाहानंतर पूर्वीअितकी ताटातूट होत नाही. तीं आपलीं हृदयें रितीं करण्यापुरतीं तरी भेटूं शकतात. तिसरी गोष्ट अशी की, विवाहानंतर प्रियेविषयीची ओढ मनमोकळेपणाने अनुभवणें रूढ झालें आहे. पूर्वी अपूर्तप्रेमी मनांतल्या मनांत झुरत व प्रेमभंगाचें काव्य करून जीव रमवीत. आता अितका गुदमराट होत नाही. चवथा विशेष फरक असा की, पत्नींचा वर्गहि पतीच्या आंतरजीवनाशीं बराच परिचित झालेला दिसतो, आणि पुरुषांच्या मनाचा परिचय झाल्यामुळे त्या वैवाहिक जीवनांत अुत्पन्न होणारी तेढ पूर्वीच्या पत्नीअितकी मनास लावून घेत नाहीत! त्याचीं देवळें जरी मोडकळीस आलीं तरी भंगत नाहीत. स्वतःची पत्नी ही दुसऱ्याची प्रिया असणें अशा परिस्थितीचा अनुभव आलेल्या पतीचें चित्र अद्याप कोणीं रंगविलेलें दिसत नाही! पुरुषांच्या मनास ती कल्पना क्षणभरहि सहन होणार नाही असें दिसतें!

पांचवी गोष्ट म्हणजे कादंबरीविभागांत माजत असलेलें राजकारणाचें रान! हिंदुस्थानांतील राजकीय चळवळी या पांढरपेशा समाजाच्या जीवनाशीं, निदान मनाशीं, निगडित असतात. त्यामुळे राजकारणाविषयीचे विचार वा चर्चा हा पांढरपेशा समाजाच्या जीविताचा अेक भागच झाला आहे. आणि कादंबरीविभागात बहुधा त्याच समाजाचे चित्रण असल्याने त्यांत राजकारणहि येतें! परंतु कादंबरींत राजकारण आणण्याची अेक प्रथा सुरू झाल्याने कादंबरीतंत्राचा तो एक भाग होऊं पाहत आहे. आणि लेखकास राजकीय वातावरणांतच वावरणाऱ्या व्यक्तींच्या मनोभूमिकेशीं परिचय नसल्याने लेखकाचीं पात्रें अितरांच्या राजकीय जीवनांत लुडबुड करूं लागतात. ज्या पात्रांची राजकीय वातावरणांत श्वास घेण्याचीसुद्धा कुवत नाही तीं पात्रें संपाच्या पुढारीपणाच्या गप्पा मारताना आढळतात! श्रीमंतांच्या आधुनिक होशीपैकी

प्रा. फडके यांच्या नायकांची राजकारण ही अेक रिकामपणाची कामगिरी आहे. श्री. माड-खोलकर यांच्या पात्रांना राजकीय वातावरणांतील कुलंगडीं जास्त प्यार आहेत. प्रा. फडके यांनी आपल्या कादंबऱ्यांत वर्तमानपत्राची रद्दी रिचवण्याचा प्रयत्न चालू केला तो राजकीय घडामोडी-च्या कालानुक्रमानें चालू आहे. गेल्या सालच्या त्यांच्या 'उन्मादा'तील नायक, मजुरांच्या संपांचा फार भोक्ता आहे! श्रीनिवास पाऊल टाकील तेथे संप उभे राहतात. तो कम्युनिस्ट आहे! सगळें कांही असेल. परंतु कादंबरींत त्याच्या जीवनाचा जो भाग वर्णिला आहे त्यावर राजकीय हकीगतींच्या रिपोर्टांमुळे कांही प्रकाश पडत नाही. कम्युनिस्टाविषयी विकृत ग्रह करून ठेवण्याची कामगिरी मात्र या कादंबरीच्या तरुण वाचकासाठी करून ठेविली आहे. श्री. तळ-वळकर यांचाहि कम्युनिस्टांवर फार दात आहे! परंतु त्यांचें कॉंग्रेस सोशिआलिस्टावरचें प्रेमहि त्यांनी मनमोकळेपणाने व्यक्त केलें आहे. श्री. माडखोलकर यांनी 'मुखवटे' कादंबरींत मध्यप्रांतीय प्रधानमंडळातील भानगडी अैसपैस मांडल्या आहेत आणि गांधीवादावरचा मुखवटा (!) काढून टाकल्याचें समाधान मानलें आहे. 'काळे ढग' या कादंबरींत प्रा. आंबेकर यांनी ध्येयवादी कामगारपुढारी रंगविला आहे. गांधीपंथातून समाजसत्तावादातून तो कामगार चळवळीकडे जात आहे. मार्गावर या लेखकद्वयाच्या कादंबरींत कामकरीवर्गाचे प्रश्न सोडविण्यात नायक अहर्निश झटत आहे. माडखोलकरांचा 'दुहेरी जीवन' घालविणारा नायक तर कामगारप्रतिनिधि म्हणून जीनेव्हापर्यंत गेला आहे. मात्र सरकारनियुक्त म्हणून! अशा कार्यकर्त्याला दुहेरी जीवन माफ करावें अशी माडखोलकरांची वकिली आहे! 'तिसरा प्रवाह' या श्री. लोहोकरे यांच्या कादंबरींत दारिद्र्याचा, प्रेमनिराशेचा विसर पडावा म्हणून राजकारणात घुसणारा तरुण दाखवून राजकारणातील सरंजामदारीवर टीका केली आहे. वरेरकर यांनी हिंदुमहासभेवर टीका करण्याचा मोका 'न पुजलेल्या देवते'त साधला आहे. राजकारणाचा कादंबरींतील पात्रांच्या जीवनाशीं संबंध मोफत वाचनालयातील वाचकांचा वृत्तपत्रातील राज-कीय मताशीं असतो तेवढाच! राजकीय वातावरणात खरोखरच अशा लायकीचे लोक असतील तर भविष्यकाळ मोठा कठीण आहे!

कादंबरींत राजकारणाचा अत्यंत सुसंगत अुपयोग केल्याचें अुल्लेखनीय अुदाहरण 'विशाल जीवन' या कादंबरीचें. लेखकाचा राजकीय जीवनातील अनुभव या यशास पुष्कळच सहायक झालेला दिसतो. त्याहि कादंबरींत गांधी आश्रम-जीवनावर व सत्य-अहिंसादिकांवर ताशेरे झाडले आहेत. परंतु ते कथासूत्राशीं विसंगत नाहीत. यावरून असें म्हणता येअील की राजकीय जीवनाचा प्रत्यक्ष अनुभव असल्याखेरीज नुसत्या प्रतिभेच्या जोरावर जीवन व राज-कारण यांचा समन्वय करता येणें शक्य नसतें. मूळ पात्रें अद्‌भुतरम्यतावादी आणि राजकीय वातावरण मात्र अस्सल या दोहोंचा गोपालकाला करताना विनायकं प्रकुर्वाणो॰ सारखी स्थिति होते.

## लघुकथा

कादंबरीविभागानंतर लघुकथाविभागात प्रवेश केला तर वाचकास यंदाहि श्री. य. गो. जोशी, श्री. वि. स. खांडेकर, श्री. बोकील, श्री. सरदेसाअी, या प्रथितयश कथालेखकांच्या भेटी होतात आणि त्यानंतर कथासंग्रहाचे किती तरी संग्रह सगळीकडे दिसतात. या संग्रहात कांही विशेष हेतूने निरनिराळ्या लेखकाचे अेकत्र केलेले संग्रह आणि नवा वाङ्मयप्रकार म्हणून अेकत्र केलेले 'नवें निशाण' यासारखे संग्रह आहेत.

गेल्या वर्षातील वाङ्मयाचा धावता आढावा घेताना लघुकथातील प्रमुख विचारप्रवाहाची नोंद करणें अतिशय कठीण आहे. कारण विशिष्ट आकार, मुखपृष्ठ, किंमत, प्रस्तावना अित्यादि 'ग्रंथ' या वस्तूच्या बाह्य खुणा क्षणभर बाजूस ठेवल्या तर मराठीतील मासिकें आणि साप्ताहिकें हीं लहानमोठे कथासंग्रहच आहेत. 'यशवंत' मासिकासारखीं मासिकें केवळ लघुकथावाङ्मयाच्या अभ्युदयासाठीच अवतीर्ण झालीं आहेत. आजच्या प्रथितयश लघुकथालेखकाच्या शेजारीं जे कथालेखक दिसत आहेत त्यांपैकी कित्येकाना यशवंत मासिकाने अगदी अक्षरशः पुढे आणलें आहे. अुदा. आज कथेच्या प्रांतात कथासम्राट झालेले श्री. य. गो. जोशी पाहा. अलीकडे श्री. जोशी यांची प्रवृत्ति कथनापेक्षा विवेचनाकडे जास्त कललेली असली तरी कथावाङ्मयांत ते सुप्रतिष्ठित आहेत. गेल्या वर्षीच्या त्यांच्या कथामध्यें चिंतनपर भाग बराच दिसून आला. प्रचलित वाङ्मयातील वादविषय झालेल्या प्रश्नावरील आपलीं मतें कथेमधून सांगण्याची त्यांची अेक विशिष्ट हातोटी आहे. परंतु ते सांगताना ते कथेचा संदर्भ सोडून देतात आणि त्यामुळे त्यांच्या कथांत नेहमी दिसून येणारा ओघ नाहीसा होतो. त्यांच्या अलीकडच्या कथाना लघुनिबंधच म्हटलें पाहिजे. विचारप्रवाहाच्या दृष्टीने पाहिलें तर श्री. य. गो. जोशी हे चांगलेच पुरोगामी आहेत असें त्यांच्या अलीकडच्या कथांवरून स्पष्ट दिसूं लागलें आहे. चालू तरुण पिढीच्या जीवनातील खाचखळगे त्याना माहीत आहेत. आणि त्या पिढीला केवळ तारुण्याच्या वशिल्याने न चढविता ते त्यातील विसंगति, बेजबाबदारी, खोटा आशावाद, बनावट प्रयत्नवाद अित्यादि गोष्टींवर प्रसंगीं विदारक टीका करतात. प्रभात कंपनीशीं त्यांचा आलेला संबंध व त्याचें विचित्र पर्यवसान यासंबंधीचे विचार त्यांच्या अलीकडील कथातून बरेच डोकावतात! समाजात वाङ्मय, राजकारण, चित्रपटसृष्टि अित्यादि विभागात चाललेली भंपकगिरी ते आपल्या विशिष्ट पद्धतीच्या विडंबनाने झोडपीत आहेत आणि त्या ठिकाणचा त्यांचा आवेश अगदी आचार्य अत्रे यांच्या आवेशासारखा असतो. श्री. य. गो. जोशी हे एक असे लेखक आहेत की, ज्यांची प्रतिभा स्वभावतःच कथालेखनास अत्यंत अनुकूल आहे. एकेका प्रसंगावर आपली भेदक दृष्टि खिळवून ते वाचकाचेंहि मन तेथे अेकतान करून टाकतात.

श्री. ग. त्र्य. माडखोलकर यांच्या या वर्षी प्रसिद्ध झालेल्या कथासंग्रहात कादंबऱ्यांप्रमाणेच समाजवादी वृत्तीचा विस्तार बराच दिसून येतो. कादंबरीपेक्षा लघुकथेवर कथानकाचा बोजा हलका असल्यामुळे आपलें सामाजिक तत्त्वज्ञान श्री. माडखोलकर यानी लघुकथेपेक्षा कादंबऱ्यातून जास्त स्पष्टपणें मांडलें आहे. परंतु त्या तत्त्वज्ञानाविषयी त्यांच्या वैयक्तिक समजुतींत समाजसत्तावादात, काही वेळा धार्मिक वृत्तींतून अुदय पावणारी 'दया' आणि अन्यायाने वाटणारी विकारप्रधान चीड किंवा बेपर्वाअी यांचें मिश्रण झालेलें दिसतें. त्यामुळे वैयक्तिक प्रसंगावरून त्यानी केलेलीं सामाजिक अनुमानें प्रसंगीं अतिव्याप्त ठरतात. काही लघुकथांतून त्यांच्या वासनोद्दीपक लेखनप्रवृत्तीस भलताच वाव मिळाला आहे.

श्री. अनंत काणेकर यांच्या दृष्टिकोनात अतिशय वेगाने पडत चाललेला फरक त्यांच्या इतर लेखनाप्रमाणेच लघुकथातहि दिसतो आणि चांदरातींतील कल्पनावादात खडबडून जागें झालेलें त्यांचें मन समाजवादाकडे धाव घेत आहे. परंतु समाजवादात ते अद्याप रमले नाहीत. धुक्यातून ते बाहेर आले आहेत आणि ध्येयवाद्याच्या निष्ठेने ते 'लाल ताऱ्या'वर नजर ठेवून धीमे धीमे तिकडे चालले आहेत. भोंवतालच्या पुरोगामी लेखकात आणि श्री. काणेकर यांच्यात एक महत्त्वाचा फरक म्हणजे श्री. काणेकर हे केवळ नावीन्याच्या हौशीने पुरोगामी होत नाहीत तर त्यांच्या ठिकाणीं आत्मप्रत्ययाची बैठक आहे. त्यामुळे आज जरी त्यांचा वेग

झोळ्यांत भरण्यासारखा नसला तरी ते हा दीर्घ प्रवास संपविणारे यशस्वी प्रवासी ठरतील त्या वेळीं इतर कित्येक वाटेंतच स्वरंजनांत गुंग झालेले आढळतील. लघुकथा आणि लघुनिबंध या प्रांतांत त्यांची लेखणी कार्य करीत आहे. कारण त्यांची प्रतिभा भावगीतास अनुकूल अशी आहे.

श्री. वि. वि. बोकील हे आपल्या दीर्घनिद्रेंतून जागृत झालेले या वर्षी भेटले. मध्यंतरींच्या काळांत त्याची पूर्वीची प्रसहनप्रवृत्ति कमी झालेली दिसते आणि व्याख्यानबाजी वाढलेली दिसते. त्याचें पर्यवसान ते कादंबरीकार होण्यांत झालेलें असावें. प्रेमळ थट्टेखोर वहिनी, तिच्या वृत्तीशीं संवादी असलेला एक अल्लड भावजी आणि निमित्तमात्र असा वडील भाऊ हा त्यांचा त्रिकोण शाश्वत आहे. नैसर्गिक प्रवृत्ति व सामाजिक बंधनें किंवा दंडक यांचें युद्ध त्यांनी आपल्या लघुकथांतून फार चांगलें दाखविलें आहे. परंतु पाल्हाळिकपणामुळे त्यांची परिणाम-कारकता कमी झालेली दिसते.

लघुकथेच्या प्रांतात श्री. र. गो. सरदेसाई हे विश्रुत आहेत. परंतु तरी कथासंग्रहाच्या रूपाने त्यांची भेट होण्यास वाचकास बरीच वाट पाहावी लागली. या वर्षी त्यांची ग्रंथरूपाने भेट झाली आहे. मध्यमवर्गीय समाजाचें बहुविध जीवन जिव्हाळ्याने रंगविणाऱ्या लेखकात श्री. सरदेसाई यांनी संस्मरणीय लेखन केलें आहे. बालमनाचीं त्यांनी रंगविलेलीं शब्दचित्रें हा या वर्षीच्या त्याच्या कथातील विशेष आहे. गंभीर प्रसंगांतहि विनोदाचें मधून मधून मिश्रण करून ते वाचकाच्या मनाचें प्रबोधन करतात. खडबडून जागे करणाऱ्या लेखकापेक्षा त्यांचा प्रकार कांहीसा निराळा आहे. वैवाहिक अन्यायाची चीड येऊन अस्वस्थ झालेली गृहिणी त्यांच्या लघुकथांतून आढळेल परंतु छडी घेऊन नवऱ्याच्या अंगावर धावणारी नाही तर आपल्या संसाराची अब्रत संभाळून संतापणारी.

गोमांतकीय प्रांतांतील कांही लेखक आपल्या यशस्वी लेखनाने महाराष्ट्र व गोमांतक यांच्या जीवनाचें सख्य घडवून आणीत आहेत. प्रो. सरदेसाई यांनी या बाबतींत पुष्कळ लिहिलें आहे. त्यांच्या लघुकथात गोमांतकीय समाजातील दोन पिढ्यांच्या संघर्षाचें चित्र दिसतें आणि प्रांतविशिष्ट असें प्रणयी जग ते यशस्वी रीतीने रंगवितात. श्री. कंटक हे त्याच जीवनाचा दुसरा भाग आपल्या लघुकथांतून रंगवीत आहेत. त्या लघुकथा वाचल्यावर संसारी जीवन हें प्रांतभेदातीत आहे हें पटतें. गोमांतकीय जीवनाविषयी मराठी वाचकाची सहानुभूति उत्पन्न होण्याच्या कामीं कंटक आणि सरदेसाई यांचें कथात्मक लेखन फार सहायक आहे.

प्रांतविशिष्ट जीवनाची ओळख देणारे दुसरे लेखक श्री. बी. रघुनाथ हे होत. त्यांनी मोगलाईतील जीवनाचीं शब्दचित्रें आपल्या कथांतून रंगविली आहेत. आपली भेदक दृष्टि व वर्णनशैली यामुळें बी. रघुनाथ हें नाव सर्वश्रुत झालें. त्यांनी मुसलमानी जीवनाच्या विलासी स्वभावाचीं उद्बोधक चित्रें रेखाटलीं आहेत. सुप्रतिष्ठित लघुकथा-लेखकांच्या यादींत श्री. कवठेकर यांचें नाव दाखल झालें आहे. चाळीस सालीं लघुकथांच्या रूपाने त्यांची पुनर्भेट झाली आहेच. महाराष्ट्रांत सुपरिचित असलेल्या कौटुंबिक जीवनाचें सूक्ष्म दर्शन त्यांच्या कथातून होतें. महाराष्ट्रीय जीवनांतील जे प्रश्न अत्यंत जिव्हाळ्याचे आहेत परंतु ज्यांकडे कोणाचें लक्ष्य जात नाही त्या प्रश्नांवर कवठेकरांच्या गोष्टी प्रकाश पाडतात. मराठी वाङ्मयांत ज्या सामाजिक जीवनाचें प्रतिबिंब सहसा दिसत नाही तें ग्रामीण मध्यमवर्गीयांचें

जीवन कवठेकरांच्या कथांतून दिसतें. गेल्या वर्षी प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या कथासंग्रहांत त्या जीवनाच्या कित्येक संस्मरणीय छटा व्यक्त झाल्या आहेत.

अेका पारितोषिकाच्या निमित्ताने श्री. र. वा. दिघे यांची मराठीच्या वाचकांस आतां चांगली ओळख झाली आहे. 'पाणकळा' या कादंबरीत त्यांनी दाखविलेलें आपलें वैभव त्यांच्या कथासंग्रहांतहि आहे. त्यांचा भर चित्ताकर्षक प्रसंगांत आलेल्या व्यक्तींच्या मनोविश्लेषणाकडे विशेष आहे. कथानकाच्या दृष्टीनेहि ते मराठी वाङ्मयात विशेष भर घालीत आहेत. यौवनसंपन्न सुखासीन तरुणतरुणींखेरीज जगात पाहण्यासारखें आणि विचारमग्न करील असें पुष्कळ आहे हें श्री. दिघे यांच्या कथासंग्रहावरून वाचकास पटेल. दीर्घ कथांच्या द्वारें काही सामाजिक प्रश्नांचेंहि विस्तारपूर्वक चित्रण त्यांनी केलें आहे.

व्यवसायभिन्नतेमुळे श्री. रं. कृ. चिंचलकर यांचें कथालेखन फार दुर्मिळ झालें होतें. परंतु १९४० मध्यें प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या कथासंग्रहाने त्यांनी वाचकास विस्तृत भेट दिली आहे. ध्येयवादाचा मंत्र न जपता ध्येयवादास सहायक असा वास्तववाद ते आपल्या कथांतून रंगवितात. विशेषतः प्रेमभावनेचीं त्यांनी रंगविलेलीं स्वरूपें नुसतीं अुन्मादक नसून विचारास चालना देणारीं आहेत. प्रा. फडके यांच्या पंथातील हे गृहस्थ असावेत असा आभास लेखनशैलीवरून अुत्पन्न होतो. परंतु कथाभाग व विवेचन यांत त्यांचें व्यक्तिमत्व प्राध्यापकमहाशयांपेक्षा निराळें आहे असें स्पष्ट दिसून येतें. कै. श्री. कृ. कोल्हटकर यांच्या संप्रदायांत जसे नामांकित शिष्य तयार झाले आणि आज वाङ्मयाचे प्रणेते झाले त्याप्रमाणे श्री. चिंचलीकर हे प्रा. फडके यांच्या पंथास आपल्या वैशिष्ट्याने ऊर्जितावस्थेस आणतील यात शंका नाही.

लिहिण्याची जातिवंत स्फूर्ति असल्याने लेखन करणारे श्री. पां. गो. लोहोकरे हे लेखक आहेत. भोवतालच्या जीवनांतील प्रसंगांनी मनात येणारे विचार ते कळकळीने मांडतात आणि आपल्या कल्पनेप्रमाणे काही मार्गहि सुचवितात. अवलोकन व भाषा यांची त्यांजजवळ वाण नाही. त्यामुळे त्यांचें लेखन परिणामकारक होतें. त्यांच्या भाषेवर अद्याप गडकरी वळणाचा पुसट छाप असला तरी विचारांचीं स्फूर्तिस्थानें आधुनिक जीवनांत असल्याने त्यांच्या कथा परिणामकारक होतात. सुसंस्कृत, समंजस माणसें दारिद्र्याने कशीं पिचलीं जातात तें त्यांच्या कथांतून पार्श्वभूमीसारखें वावरत आहे.

प्रथितयश झालेले लेखक आपला परिचित प्रांत म्हणून लघुकथेच्या प्रांतांत निर्धास्तपणें वावरत आहेत आणि कित्येक नवे लेखक गद्य लेखनाचा ओनामा म्हणून लघुकथालेखनास सिद्ध झाले आहेत. कथावाङ्मयाची नुसती गेल्या सालांतील प्रगति पाहिली तरी मराठी गद्य किती समृद्ध होत आहे याबद्दल अभिमान वाटावयास हरकत नाही. परंतु अभिमानाचा विचार थोडा निवल्यावर गद्य वाङ्मयाच्या विषयाकडे लक्ष्य जातें आणि तेथें मन खट्टू होतें. प्रणय हा विषय मराठी वाङ्मय व्यापून दशांगुळें अुरला आहे असें गोविंदाग्रजांच्या वेळीं वाटत असे. आता तितकें वाटत नाही. प्रणयाचें स्थान बदललें आहे. जीवनाचा तो अेक भाग आहे हें लेखकास समजलें आहे. परंतु अद्याप अितर भाग असंशोधित राहिले आहेत. प्रणयाचें नैसर्गिक स्वरूप स्पष्टपणें कळलें आहे, तें सर्व मानवी मन व्यापून टाकण्याअितकें व्यापक नाही हेंहि माहीत झालें आहे. परंतु त्याच्या पलीकडे मनाचीं दालनें अद्याप सांपडलीं नाहीत. पूर्वी फक्त सुशिक्षित प्रियकर आणि प्रिया याच्याच ठिकाणीं दिसणारा प्रणय आता जीवनाच्या सर्व स्थितींत व अवस्थांत प्रतीत झाला आहे. परंतु कादंबरी म्हणजे वाढलेली लघुकथा आणि लघुकथा म्हणजे अपूर्ण कादंबरी यापलीकडे विचार-

प्रवाहाच्या दृष्टीने कादंबरी आणि लघुकथा यात फरक दिसत नाही. कांही प्रसंग क्षणभर मन रमवितात. कांही दीर्घकाल मन गुंतवितात अेवढाच फरक दिसतो. प्रादेशिक वाङ्मयाची मराठींत भर पडत आहे ही अत्यंत अभिनंदनीय गोष्ट आहे. गोमांतक, हैदराबाद अित्यादि प्रांतांतील लेखक आपल्या प्रांतविशिष्ट जीवनाचें यथातथ्य चित्र रंगवून मराठी वाचकांचें अनुभवक्षेत्र समृद्ध करीत आहेत.

## लघुनिबंध

लघुकथानंतर लघुनिबंधाचा विचार केला तर त्या प्रांतांत यंदा श्री. र. गो. सरदेसाअी यांचा ग्रंथ प्रथम आठवतो. लघुकथेच्या प्रांताप्रमाणेच लघुनिबंधप्रांतांतहि श्री. र. गो. सरदेसाअी यांनी 'कागदी विमानें' या ग्रंथात आपलें कौशल्य दाखविलें आहे. वृत्तपत्रव्यवसायांत वावरणारा माणूस नावापुरता पडद्याआड असला तरी वृत्तद्वारा तो जगाच्या अनेक विविध गोष्टींशीं परिचित असतो. अनुभवावाचून त्याची श्रुति आणि स्मृति संपन्न होते. श्रुति-स्मृतींनी जमविलेले अेकेक प्रसंग निरानिराळ्या विचारप्रवाहास निमित्तमात्र होतात. हा प्रकार 'कागदी विमाना'त आहे. मिळालेल्या माहितीची सजावट करण्यांत त्यांनी आपलें सर्व कौशल्य दाखविलें आहे. समाजातील निरनिराळ्या व्यवसायातील प्रतिनिधींचीं शब्दचित्रें त्यांनी फार परिणामकारक वठविलीं आहेत. अुपरोध, अुपहास, अतिशयोक्ति यांचा ते विनोदासाठी अुपयोग करुनहि कोणासहि बोचक होणार नाही अशा प्रमाणशीर पद्धतीने आपलें काम करतात. स्वतः पत्करलेल्या व्यवसायावरहि ते विनोदाचा तडाखा लगावूं शकतात. आणि विनोदविषय झालेल्या व्यक्तीबद्दल क्षणभर हसूं आल्यावर वाचकाच्या मनात शेवटीं सहानुभूति कायम राहते अशी त्यांची लेखनपद्धति आहे.

लघुनिबंधांच्या प्रांताविषयी शेवटीं असें म्हणावें लागतें की, त्या प्रांतात प्रा. फडके यांच्यानंतर नांव घेण्यासारखा लघुनिबंधलेखक गेल्या सालपर्यंत दिसला नाही. नाट्यछटेच्या प्रांतांत जसे दिवाकर त्याप्रमाणे लघुनिबंधप्रांतात प्रा. फडके यांचें स्थान आहे. श्री. खांडेकर हे त्या प्रांतावर मोहिमा करूं लागल्याचें दिसतें, आणि पुढील वर्षीं आढावा घेताना प्रा. फडके यांच्या शेजारीं श्री. खांडेकर हे दिसूं लागतील. प्रा. वि. पां. दांडेकर हे लघुनिबंधप्रांतात काही वैशिष्ट्याने प्रवेश करीत आहेत. श्री. अनंत काणेकर श्री. दोंडकर, श्री. ग. खं. पवार, श्री. शंकर साठे अित्यादि या प्रांतातील मंडळी गेल्या सालीं फारशी भेटली नाहीत. आणि अेकंदर प्रकाशनाच्या दृष्टीनेहि कथावाङ्मयापेक्षा निबंधवाङ्मयाचें प्रकाशन गेल्या वर्षी फार कमी झालेलें दिसतें. याचें कारण प्रकाशनव्यवसायातील आर्थिक परिस्थितींत कदाचित् सापडेल. वाचकवर्गास आधीच चिंतामय झालेल्या मनःस्थितींत आणखी गंभीर वाचनाचा त्रास नको म्हणून प्रकाशक प्रथितयश लेखकाच्याहि निबंधवाङ्मयापेक्षा कथावाङ्मय जास्त पसंत करतात. आणि त्यामुळे लघुनिबंध साप्ताहिकांच्या स्तंभात विखुरलेले दिसतात. लघुनिबंधक्षेत्रांत विनोदाचें प्राबल्य वाढत चाललें आहे. साध्या विषयातून काही मोठा आशय दाखवावा या अपेक्षेने लघुनिबंधाकडे लेखक वळतात परंतु पुन्हा वाचकाच्या आवडीनिवडीचा विचार मनांत येअून ते साध्या विषयांतील विसंगतीचा आधार घेअून अुपरोध, अुपहास, विडंबन अित्यादिकांच्या साहाय्याने अेकंदर लेख किंवा लघुनिबंध लोकाश्रयास पात्र करतात.

तरी सूक्ष्म अवलोकन केल्यास अनुभवाच्या क्षेत्राची व्याप्ति वाढली नसली तरी अव-

लोकनांतील सूक्ष्मता वाढली आहे हें लघुनिबंधावरून दिसून येईल. आणि जीवनाविषयी अुगाच फाजील गांभीर्य माजविण्याचें वेड कमी होअून ती अेक जगून पाहण्यासारखी चीज आहे अशी वृत्ति वाचकाच्या ठिकाणीं अुत्पन्न करण्याचा हेतु लघुनिबंधवाङ्मयात दिसून येतो.

विनोदाच्या वाढत्या बडेजावामुळे लघुनिबंधाच्या तयारींत विनोदाचें कार्य अुरकून घ्यावें असा प्रकार फार दिसून येतो. वृत्तपत्रसृष्टींत अशा लेखनास भाव आला आहे आणि पूर्वी ज्या तऱ्हेचा मजकूर वाचण्यास १।-१॥ रुपया खर्च करावा लागत असे तो ४।६ आण्यांचीं साप्ताहिकें घेतलीं कीं मिळूं लागला आहे.

अनुभवाचा अभाव आणि आर्थिक परिस्थितीचें वाढतें दडपण या कचाट्यांत मराठी वाङ्मय सापडलें आहे. अशाहि परिस्थितींत कादंबरी, लघुकथा, लघुनिबंध या क्षेत्रांत १९४०-४१ सालीं बरेंच कार्य झालें आहे यात शंका नाही.

---

# परिभाषाचर्चामंडळ

## (१९४० सालचें अितिवृत्त)

परिभाषाचर्चामंडळाची रीतसर स्थापना होअून त्याच्या कार्याला फेब्रुवारी १९४० पासून सुरवात झाली.

तूर्त, साधारणतः, मंडळाच्या कार्याची दिशा स्वीकारली गेली आहे ती अशी:— मंडळाची बैठक प्रतिमासीं अेकदा सोअिस्कर अशा गुरुवारीं भरते. त्यावेळीं कोणत्याहि अेखाद्या भौतिक शास्त्रातल्या लहानशा विषयावर कोणातरी जाणत्याचें लहानसें व्याख्यान होतें. वक्त्याला योग्य वाटेल ती परिभाषा तो वापरतो. ती अैकायला निरनिराळ्या भौतिक शास्त्राचे अभ्यासक हजर असल्यामुळे व्याख्यानानंतर त्याच बैठकींत निरनिराळ्या शास्त्रांच्या दृष्टीने, आणि अेकंदर शास्त्रीय व्यवस्थेच्या दृष्टीने, ही परिभाषा कितपत योग्य वाटते याविषयी चर्चा होते. त्यातला योग्य तो भाग पत्रिकेंतून प्रसिद्ध होतो.

या स्थूल धोरणानुसार वर्षअखेरीपर्यंत मंडळाच्या अेकंदर ११ मुख्य बैठकी झाल्या. त्यांतल्या ३ बैठकी औद्भिदशास्त्रविषयक होत्या, सावाहिक (रेडिओ) आणि अनुवंशता-विषयक प्रत्येकीं २, आणि ज्योतिष, ध्वन, अुत्पीडविद्युत्, यंत्रशास्त्र, गणित व रसायन यां-विषयी प्रत्येकीं १ अशी त्यांची विभागणी झाली. 'मंडळा'चें संक्षिप्त अितिवृत्त 'पत्रिके'च्या अंकांत वेळोवेळीं प्रसिद्ध झालेलें आहे त्यात या बैठकींविषयी माहिती आलेली आहेच.

मध्यंतरीं, कलकत्याचे डॉ. शं. पु. आघारकर हे कांही काळ पुण्यांत लाभूं शकल्यामुळे त्यांच्या अुपस्थितीचा फायदा मंडळाला घेतां आला. तो असा कीं त्यांच्याच अध्यक्षत्वाखाली औद्भिदपरिभाषेचा विचार करण्यासाठी, अेक अुपसमिति बनवितां आली. तिच्या २१ बैठकी झाल्या, आणि औद्भिदशास्त्रांतल्या बाह्यरूपविचारा (morphology) विषयाची परिभाषा तयार केली गेली. ती पक्की करण्यापूर्वी, सर्वांच्या विचारासाठी लवकरच 'पत्रिके'तून प्रसिद्ध होईल.

अहवालाच्या सालीं अर्थशास्त्राच्या परिभाषेसाठीहि अेक अुपसमिति बनविली गेली असून तिचेंहि कार्य चालू आहे.

व्यं. गो. ढवळे

# संपादकीय



महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचा हा चौदाव्या वर्षाचा दुसरा व क्रमांक ५८ चा अंक, सोलापूर येथे भरणाऱ्या मराठी साहित्य संमेलनाच्या अधिवेशनाच्या सुमारास निघत असल्या-मुळे, त्या प्रसंगाला साजेल अशी त्याच्या अंतरंगाची सजावट करावी हा हेतु धरून त्यांतील मजकूर संकलित करण्यांत आलेला आहे.

या अंकाच्या पहिल्या विभागांत नेहमीच्या पद्धतीने, श्री. ना. ग. जोशी यांची कविता, संमेलनाचे नियोजित अध्यक्ष श्री. खांडेकर यांचा संदेश, श्री. सरदार याचा विष्णुबावा ब्रह्मचारी याचें चरित्र व कार्य यावरील निबंध, श्री. तगारे यांचा राष्ट्रकूटकालीन मराठी भाषेंतील क्रियापदप्रक्रियेबद्दलचा लेख, श्री. क्षीरसागर यांचा गेल्या वर्षांतील संमेलनांमधील अध्यक्षीय भाषणातून प्रदर्शित झालेल्या विचाराबद्दलचा चर्चात्मक निबंध, प्रा. आपटे यांचीं शास्त्रीय शब्दयोजनेबद्दलचीं काही स्फुटें, व श्री. भास्करराव जाधव याचें श्री. ना. गो. चापेकर याच्या 'गाडीचा रुपया'बद्दलच्या गेल्या अंकातील शंकेचें अुत्तर, वगैरे संकीर्ण लेख आले आहेत. श्री. तगारे याच्या मागील अंकातील व या अंकातील लेखाबद्दल तज्ज्ञांनी प्रशंसापर अुद्गार काढले असून, श्री. सरदार यांच्या लेखमालेंतील 'लोकहितवादी' व 'भाअू महाजन' या आतापर्यंत प्रसिद्ध झालेल्या दोन निबंधांबद्दल सर्व बाजूंनी स्तुतिपर अुद्गारच अेकूं येतात. या लेखमालेंत यापुढे ज्योतिबा फुले व विष्णुशास्त्री पंडित, हीं दोन चरित्रप्रकरणें यावयाचीं असून, त्यानंतर या वर्षअखेर हीं सर्व चरित्रें पुस्तकरूपाने "महाराष्ट्राचे अुपेक्षित मानकरी" या नावाने प्रसिद्ध व्हावयाचीं आहेत. गेल्या वर्षी पत्रिकेंतून क्रमशः प्रसिद्ध झालेली 'रुपेरी पडद्यामागे' ही चित्रपटविषयक लेखमाला आता पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाली असून, त्या पुस्तकाने सर्वसामान्य जनतेला अत्यंत कुतूहलपूर्ण वाटणाऱ्या चित्रपटव्यवसायाबद्दल बरीचशी अंतरंगातली माहिती मिळेल व त्यामुळे त्याच्या अनेक भ्रामक कल्पना दूर होअून चित्रपट अधिक चोखंदळपणें व समजूतदारपणें पाहण्यास त्याना मदत होअील, अशी आशा आहे.

अंकाचा दुसरा विभाग, १९४० च्या सावत्सरिक साहित्य समालोचनाने व्यापलेला असून, या विभागाला साहित्याचार्य न. चिं. केळकर, अध्यक्ष, महाराष्ट्र साहित्य परिषद्, यांनी पुरस्कार लिहिला आहे. श्री. तात्यासाहेब केळकर यांचा मी त्याबद्दल अत्यंत आभारी आहें.

या समालोचनविभागात, वेगवेगळ्या साहित्यशाखोपशाखामधून १९४० सालीं जी ग्रंथ व निबंधनिर्मिति झाली, तिचा स्थूल मानाने आढावा घेअून त्यावरून काही ठोकळ निष्कर्ष काढण्याचा प्रयत्न करण्यांत आलेला आहे. या विभागांतील लेख त्या त्या विषयाचे अभ्यासक व तज्ज्ञ याच्याकडून लिहिले जावेत, अशी शक्य तेवढी खबरदारी घेण्यांत आली असून, तो विभाग करता येअील तेवढा परिपूर्ण करण्याचा प्रयत्न झाला आहे.

तरीहि पण त्या विभागांत अनेक अुणीवा, अपुरेपणा व प्रमाद राहून गेले असतील याची संपादक व त्या त्या विषयाचे समालोचक यांना जाणीव आहे. साधनसामग्रीचा अभाव हें या अुणीवाचें मुख्य कारण होय. समालोचनाची ही कल्पना निघाल्यावर तें काम आत्मी-

यतेने व अधिकाराने करूं शकतील अशा विद्वानांच्या मदतीची अुणीव मला मुळींच जाणवली नाही, पण आयत्या वेळीं त्यांना साधनसामग्री कशी पुरवावयाची हा मोठा बिकट प्रश्न होता. महाराष्ट्र साहित्य परिषदेसारख्या मध्यवर्ती संस्थेकडे वर्षांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लहान-मोठ्या पुस्तकाची प्रत असावी, निदान त्याची नोंद होण्यासाठी त्याची माहिती तरी पाठवली जावी, अशी व्यवस्था होणें अत्यंत जरूर आहे. लेखक व प्रकाशक यांनी याबाबत सहकार्य केल्यास साहित्य परिषदेला आणि साहित्य पत्रिकेला कितीतरी साहित्यविषयक गोष्टी अधिक निर्दोषपणें आणि अधिकृत रीतीने करता येतील. म्हणून सर्व लेखक व प्रकाशक यांनी याबाबत साहित्यपरिषदेशीं सहकार्य करावें, अशी मी त्याना विनंती करतों.

परंतु या अंकाच्या योजनेच्या वेळीं तरी तशी कांही सोय नसल्यामुळे, १९४० सालीं प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांची नुसती यादी तयार करणें, हेंहि मोठी कष्टाची आणि जवळ जवळ अशक्यप्राय गोष्ट आहे असें आढळून आलें. या कामीं सरकारी गॅझेट्चा अुपयोग करण्याचें प्रथम सुचणें स्वाभाविक आहे. परंतु गॅझेटमध्यें १९३९ सालचींहि कांही पुस्तकें १९४० सालीं नोंदलीं गेलीं असल्यामुळे, या दोन वर्षांच्या पुस्तकांच्या गल्लतींतून १९४० चीं पुस्तकें निवडून काढणें, हेंहि अेक कामच होअून बसलें. गॅझेटच्या जोडीला केसरी, महाराष्ट्र, ज्ञानप्रकाश व विविधवृत्त यांमधील ग्रंथपरीक्षणांच्या सदरांचाहि अुपयोग यादी पुरी करण्याकरिता करून घेतला गेला; परंतु तेथेंहि ही अडचण तितक्याच प्रमाणांत अुपस्थित झाली, हें सागावयास नकोच. याच्या भरीला, मध्यप्रांत-वऱ्हाड, हैदराबाद संस्थान, बडोदें संस्थान आणि मध्यहिंदुस्थानातील मराठी संस्थानें, यांत प्रसिद्ध झालेलीं सर्वच मराठी पुस्तकें मुंबअी सरकारच्या गॅझेटमध्यें निर्देशित होतीलच असें नाही; ही शक्यता ध्यानांत घेतली म्हणजे नुसती अेका वर्षांत प्रसिद्ध झालेल्या मराठी पुस्तकांची संपूर्ण आणि अधिकृत यादी तयार करणें, हेंहि काम कसें अशक्यप्राय आहे, याची कल्पना येते. मग तीं सर्व पुस्तकें मिळवून, त्याचें यथार्थ आणि शास्त्रोक्त समालोचन करणें, तर त्याहूनहि दूरचें. परंतु असें असलें तरी 'अकरणात् मंदकरणं श्रेयः' या न्यायाने त्या कामीं संपूर्ण यशाची आशा, आणि अपेक्षा नसताहि, होअील तितकेंच काम चांगल्या रीतीने करण्याच्या प्रयत्नाला निदान सुरवात तरी करावी, या विनीत कल्पनेने या अंकातील समालोचन-विभागाची ही योजना आखण्यात व अंगीकारण्यात आली. ती कितपत यशस्वी व अुपयुक्त झाली आहे, तें वाचकांनी ठरवावयाचें आहे. माहितींत व अितर तपशिलाच्या बाबतींत ज्या कांही चुका, अुणीवा राहिल्या असतील त्या नजरेस आणून देण्याबद्दल सर्व साहित्याभ्यासकास माझी नम्र व आग्रहाची विनंती आहे. पत्रिकेचा पुढील अंक तीन महिन्यानी निघणार, तेव्हा तेवढ्या अवधींत ज्या काही महत्त्वाच्या दुरुस्त्या सुचविल्या जातील, त्या संकलित करून, अेक समालोचनात्मक पूरक लेख पुढील अंकीं देता येण्यासारखा असल्यामुळे, कोणाहीकडून ज्या कांही दुरुस्त्या व पुरवण्या सुचविल्या जातील त्याचा अवश्य विचार व अुपयोग केला जाअील. या अंकीं १९४० सालीं प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांची समग्र यादी प्रसिद्ध करण्याची अिच्छा होती. वेगवेगळ्या विभागांतील पुस्तकांच्या कच्च्या याद्या समालोचनाच्या कामासाठी तयारहि करण्यांत आल्या होत्या. परतु अजूनहि त्या अपूर्ण असण्याचा व त्यात १९३९ व १९४० या दोन वर्षांतील पुस्तकांची गल्लत झाली असण्याचा बराचसा संभव वाटत असल्यामुळे, अशी अपुरी व चुकीची यादी संपूर्ण व अधिकृत यादी म्हणून प्रसिद्ध करणें अिष्ट वाटलें नाही. वर लिहिल्याप्रमाणे लेखक व प्रकाशक याच्याकडून सहकार्य लाभल्यास ती यादीहि पुढे मागे प्रसिद्ध करतां येअील. अशा प्रकारच्या यादीची अुपयुक्तता व महत्त्व किती आहे, हें कोणी

सांगावयास पाहिजे, असें नाही. यामुळे अशा वर सांगितल्या प्रकारचें सहकार्य या अंकांतील समालोचन-विभाग पाहून आम्हाला मिळेल, अशी मी आशा करतों.

वर सांगितल्याप्रमाणे कच्च्या याद्या करण्याचें काम अत्यंत किचकट आणि वेळखाऊ असतांहि, तें करण्यासाठी स्वयंस्फूर्तीने पुढे आल्याबद्दल व तें अत्यंत कसोशीने पार पाडल्याबद्दल, माझे मित्र श्री. कृष्णराव मराठे यांचा व त्याना मदत केल्याबद्दल श्री. ग्रामोपाध्ये व श्री. सरदार यांचा, मी अत्यंत आभारी आहें. ज्या पायावर समालोचकाना आपापल्या समालोचनाची अिमारत अुभी करतां आली, तें श्री मराठे, ग्रामोपाध्ये व सरदार यांचें प्राथमिक काम किती महत्त्वाचें व अुपयुक्त होतें, याची साक्ष ते ते समालोचन-लेखकच देतील.

या समालोचनविभागाबद्दल झटकन् नजरेंत भरणारी गोष्ट म्हणजे, त्यातील कोणत्याहि लेखाच्या खाली किंवा वर लेखकाचें नाव दिसत नाही ही होय. अर्थात् हे सर्व लेख त्या त्या विभागांतील वेगवेगळ्या अभ्यासूंनी व तज्ज्ञांनी लिहिलेले आहेत, हें ते वाचीत असता सांगितल्यावांचूनहि सहज समजण्यासारखें आहे. व्यक्तिशः लेखकाचें नांव न देण्याची प्रथा, साहित्य पत्रिकेंत गेल्या अंकांतील परीक्षणांच्या विभागांत प्रथम अनुसरलेली आढळेल. लेखक-नाम-निर्देशपूर्वक टीकालेख लिहिण्याच्या अिष्टानिष्टतेबद्दल, योग्यायोग्यतेबद्दल दोनहि बाजूंनी पुष्कळशीं प्रमाणें देअूनहि अखेरचा असा कांही निर्णय करतां येअीलसें वाटत नाही. याबाबत कांही तरी सोअिस्कर असें निश्चित धोरण ठरवून ते अनुसरणें अेवढेंच व्यवहार्य आहे. त्याप्रमाणे सध्यापुरतें, साहित्यपत्रिकेच्या संपादकांशीं सहजस्फूर्तीने सहकार्य करणारी जी विद्वान् साहित्यिकांची समिति आहे, तिने लेखकांच्या नामनिर्देशाशिवाय त्यांचे परीक्षणात्मक व टीकात्मक लेख पत्रिकेंतून दिले जावेत, असें ठरविलें आहे. अनुभवाने ही प्रथा अनिष्ट वाटली, तर ती बदलतां येअील; अिष्ट ठरली, तर तशीच पुढे चालू ठेवतां येअील. समितीच्या सभासदांच्या मर्जीवर ती गोष्ट अवलंबून आहे, व ही समिति अनौपचारिक असल्यामुळे, तींत बहुमत आणि अेकमत असे दोन प्रकारच संभवत नाहीत. जें अेकमताने ठरेल, तेंच अंमलांत यावयाचें, असाच या समितीचा अनौपचारिक दंडक आहे. गेल्या अंकीं या समितीबद्दल ओघाने आलें म्हणून लिहितांना, "ज्यांचें सहाय्य मला सहजसुलभतेने मिळण्यासारखें होतें, अशा कांही सन्मान्य स्थानिक साहित्यिकांचीं मदत करण्याचीं आश्वासनें मीं मिळविलीं असून त्याचेंच दृश्यफल म्हणजे या अंकांतील परीक्षणविभाग होय." असा अुल्लेख मीं केला होता. यातील समितीच्या सदस्यांबद्दलच्या माझ्या विनयात्मक वर्णनाचा अप्रस्तुत फायदा घेअून, शाळा-कॉलेजांमधील अर्धकच्चया विद्यार्थ्यांकडून तो विभाग लिहून घेतला जात असावा, असें ध्वनित करण्याचा खोडसाळपणाचा प्रयत्न झालेला माझ्या पाहण्यांत आलेला आहे. समितींतील विद्वानांची, डॉ. रा. ना. दांडेकर, प्रा. रा. श्री. जोग, प्रा. स. वि. आपटे, प्रा. के. ना. वाटवे, प्रा. ज. नी. कर्वे, प्रि. वा. दा. गोखले, श्री. दि. वि. काळे, श्री. गं. बा. सरदार, श्री. गं. भा. निरंतर, श्री. नी. शं. नवरे, श्री. गो. म. जोशी, श्री. चिं. ग. कर्वे, श्री. य. रा. दाते, श्री. वि. अ. कुलकर्णी, श्री. त्र्यं. गो. ढवळे, श्री. श्री. के. क्षीरसागर, श्री. गो. कृ. मोडक, श्री. गो.ग. तळवलकर, श्री. अ. ज. करंदीकर, श्री. रा. प्र. कानिटकर, अित्यादि नुसती नामावली देण्यापलीकडे या संबंधांत मला अधिक कांहीच सांगण्याची जरुरी नाही; कारण तींतील सदस्यांच्या योग्यतेचे आणि विद्वत्तेचे गृहस्थ अन्यत्र कोठे नसतीलच असें विधान जरी मी करणार नाहीं, तरी ते अितर कोणापेक्षा अुणे नाहीत अेवढें मात्र मी निःशंकपणें म्हणूं शकेन. ते स्थानिक आहेत, अेकत्र येअूं शकतात आणि त्याचें साहाय्य मला सहज-

सुलभतेने मिळूं शकतें, हा माझा आणि त्यांचा दोष आहे; आणि त्या दोन गोष्टींमुळे महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचें काम पूर्वी कधी झालें नव्हतें अितकें नजरेंत भरण्यासारखें होतें, हा जरूर आमचा गुन्हा आहे. पण ही योजना साहित्यपत्रिका व्यवस्थित चालण्यासाठी केली असून, बंद पडण्यासाठीं केलेली नसल्यामुळे, त्याला आमचा नाअिलाज आहे, यापलीकडे अधिक काय म्हणणार ? असो.

यानंतर, अुगाच गैरसमज राहावयाला व वाढावयाला नकोत म्हणून, आणखी अेका आक्षेपाविषयीं खुलासा करणें मला जरूर वाटतें. तो आक्षेप म्हणजे मी पत्रिकेचा संपादक या नात्याने प्रचलित विषयांवर संपादकीय मतप्रदर्शन करीत नसल्यामुळे, आपल्या नियुक्त कर्तव्याला चुकत आहें, हा होय. याबद्दल मला अेवढेंच सांगावयाचें आहे की, साहित्य परिषद् ही सर्व मतांच्या छटांच्या साहित्यिकांची अेक सामवायिक संस्था आहे, असें मी समजत असल्यामुळे, तिचें मुखपत्र जें साहित्यपत्रिका, तें कोणत्याहि विशिष्ट मताच्या रंगापासून अलिप्त राहिलें पाहिजे, असें मी मानतों; यामुळे संपादकाच्या पदावर काही विशिष्ट दृष्टीने नेमणूक झाल्यामुळे स्थानतः मिळालेल्या सवलतींचा फायदा घेअून, त्या अधिकारवाणीने आपल्या वैयक्तिक मतांचा प्रचार करावा, हें मला न्याय्य वाटत नाही. साहित्यपरिषदेच्या कार्यकारी मंडळाची घटना मुख्य प्रधानाच्या मंत्रीमंडळासारखी असती व कार्याध्यक्षाने विशिष्ट धोरणाने आपलें कार्यकारी मंडळ निवडलें असतें, तर त्या परिस्थितींत संपादक या नात्याने पत्रिकेचा स्वतःच्या मतप्रचारार्थ अुपयोग करण्यालाहि मला दिक्कत वाटली नसती; कारण तेव्हा मी त्या पदावर स्पष्ट अपेक्षेनेच निवडून दिला गेलों असतों. परंतु आजच्या परिषदेच्या निवडणुकीच्या पद्धतींत ही कल्पना नाही, याची मला जाणीव असल्यामुळे, मी तसें करूं अिच्छीत नाहीं. परिषदेच्या नियामक व कार्यकारी मंडळाचें जें काही मथित, सामुदायिक आणि अधिकृत धोरण असतें व त्याप्रमाणे जें काही कार्य केलें जातें, त्याचा आढावा परिषद्वार्तांच्या रूपाने पत्रिकेंत येतोच; तेव्हा संपादकीय मतप्रदर्शनाची वेगळी जरूरी नाही, असें मी समजतों. आज जितक्या जास्तींत जास्त विद्वान् साहित्यिकांना परिषदेच्या कार्यांत लक्ष घालण्याची अिच्छा अुत्पन्न करता येअील तितकी साध्य करण्यासाठीं, मतप्रदर्शनापेक्षा विधायक आणि व्यापक स्वरूपाच्या मतभेदातीत कार्यक्रमानुसार कार्यकारी मंडळाने आपलें लक्ष्य केंद्रित करणें आवश्यक आहे, असें मला वाटतें, व त्याच धोरणाने कार्यकारी मंडळाचा अेक सदस्य या नात्याने मी आपली संपादकीय कामगिरी बजावण्याचा प्रयत्न करीत असतों. यात स्वतःवरील संपादकीय स्फुटें लिहिण्याची जबाबदारी टाळणें, हा माझा अुद्देश नसून, साहित्य पत्रिका प्रत्येक साहित्यिकाला आपलीशी वाटेल अशा रीतीने तिचें संपादकीय धोरण व्यापक व पक्षभेदातीत ठेवण्याचा प्रयत्न करणें, हा माझा त्यांतील हेतु आहे. माझ्या आक्षेपकाना माझा हा खुलासा पटेल कीं नाही याची मला खात्री नाही, पण निदान त्यामुळे माझा दृष्टिकोण तरी त्याना समजून येअील, अशी मला आशा आहे.

शेवटीं केवळ ज्यांच्या साहाय्यामुळेच हा अंक व त्यातील समालोचनविभाग शक्य झाला, त्या माझ्या विद्वान् लेखकमित्रांचे त्यांच्या लेखनसाहाय्याबद्दल मी अंतःकरणपूर्वक आभार मानतों. आणि त्यात ज्या काही अुणीवा व प्रमाद राहिले असतील त्याबद्दल त्यांची आणि समग्र वाचकवर्गाची क्षमा मागून, हें संपादकीय पुरें करतों.

के. नारायण काळे

---

## मराठी व्याकरणसमितीच्या ता. १-८-१९३७ ते ता. ९-२-१९४१ पर्यंतचा

# अहवाल



मराठी साहित्यपरिषदेच्या विद्यमानें ता. २५ आणि २६ डिसेंबर १९३६ या दिवशीं वे. शा. सं. रंगाचार्य रड्डी यांच्या अध्यक्षतेखाली पुणें येथें महाराष्ट्र अेज्यु. सो.च्या हाय-स्कूलच्या सभागृहात मराठी व्याकरणपरिषद् भरली होती. तिने व्याकरणपरिषदेच्या पुढील कामासाठी काही सद्गृहस्थांची समिति नेमिली आणि समितीला नवीन सभासद घेण्याचा अधिकार दिला. त्या समितीचे अेकंदर सभासद पुढीलप्रमाणे—

(१) वे. शा. सं. रंगाचार्य रड्डी, (२) प्रा. कृ. पा. कुलकर्णी, (३) प्रा. प. ल. वैद्य, (४) प्रा. वा. गो. परांजपे, (५) प्रा. श्री. म. माटे, (६) प्रा. ग. ह. केळकर, (७) श्री. य. ग. फफे, (८) श्री. गो. कृ. मोडक, (९) श्री. रा. दा. देसाअी (चिटणीस); मागाहून घेतलेले (१०) श्री. नी. शं. नवरे.

समितीच्या अेकंदर २९ सभा झाल्या. त्यांपैकी चर्चा होअून २२ सभांचा सारांश लिहिण्यात आला. अितर दिवशीं चर्चा पुरेशी झाली नाही. सभासदांच्या उपस्थितीची संख्या पुढीलप्रमाणे— वे. शा. सं. रड्डी २, श्री. देसाअी २६, श्री. मोडक २५, श्री. फफे २०, प्रा. परांजपे १६, प्रा. वैद्य ४ (यांनी पुढे आपला राजीनामा पाठवून दिला.), प्रा. केळकर १, प्रा. माटे २, श्री. नवरे १३. याखेरीज विनंती केल्यावरून श्री. फाटक व श्री. ना. वि. आपटे, रा. सा. म. का. कारखानीस, श्री. फणसळकर अेकअेका सभेस हजर होते.

व्याकरणपरिषदेने ठरविल्याप्रमाणे मराठी भाषा स्वतंत्र भाषा समजून शक्य तों स्वतंत्र रीतीने पण संस्कृत व्याकरणाची परिभाषा शिल्लक ठेवून तिच्या व्याकरणाची रचना करावी असें सर्वानुमतें ठरलें (१-८-३७).

अेकंदर पुढील ८ मुद्यांवर चर्चा झाली. जथे मतभेद स्पष्ट रीतीने दिले नाहीत त्या ठिकाणीं अैकमत्य झालें असें समजावें. (१) शब्दांचें वर्गीकरण, (२) अव्ययांचें कार्य-दृष्ट्या वर्गीकरण, (३) विभक्ति, प्रत्यय आणि विभक्तिपर्याय, प्रथमेचा अर्थ कर्म, (४) संयुक्त क्रियापदें, (५) सिद्ध आणि प्रक्रियाघटित रूपें, (६) अकरणरूप मानावें कीं न मानावें, (८) 'जाअीचना' यातील ना हें क्रियाविशेषण कीं प्रत्यय, (८) करूं, जाअूं, पोहता, करितां अित्यादि धातुसाधित अव्ययांचें स्वरूप.

(१) **शब्दांचें वर्गीकरण**— शब्दांच्या वर्गीकरणात दोन भिन्न तत्त्वांचा संकर करूं नये.

रूपसिद्धिदृष्ट्या वर्गीकरण पुढीलप्रमाणे—




## वरील वर्गीकरणावर टिप्पणी

(१) करून, करितां, करितांना, करूं यांमध्यें धातु + प्रत्यय अशा अर्थाची कल्पना वाक्याचा घटकांश म्हणून येते म्हणून या रूपांना सव्यय म्हणावें, हें एक मत, हीं अव्ययें मानावींत हें दुसरें मत.

(२) करणारा, जाणारा, हीं शुद्ध प्रातिपादिकें आहेत.

(३) विभक्तींचा अर्थ प्रत्ययांनीं किंवा अव्ययांनी बोधित होतो; पण प्रातिपदिकाशीं अवियोज्य आणि नामार्थशून्य तो प्रत्यय आणि वियोज्य तें अव्यय.

(४) शुद्धशब्दयोगी अव्ययांमुळे जो अर्थ निघतो तें अर्थकार्य आहे, व्याकरणकार्य नव्हे.

(५) नाम आणि विशेषण यांतील भेद— नामाला निसर्गसिद्ध स्थिर लिंग असतें. विशेषणाला विशेष्याचें लिंग येतें; पण विशेषणाचा नामाप्रमाणें उपयोग होतो.

(६) नाम आणि सर्वनाम ह्यांतील भेद— नामांची रूपें नियमबद्ध असतात. सर्वनामांची पूर्वेतिहासामुळे अनियमबद्ध असतात; म्हणून सर्वनामांना रूपदृष्ट्या केलेल्या वर्गीकरणांत स्वतंत्र स्थान आहे.

(७) क्रियापदांची व्याख्या (१८-१२-१९३८), (१-१-१९३९) — धातूचें पुरुषभेददर्शक रूप. अुद्गारवाचक वाक्यनिर्बद्ध, पण अर्थदृष्ट्या संबद्ध, म्हणून वाक्यांतर्गत, हें एक मत. उद्गारवाचक वाक्यपर्याय आणि म्हणून वाक्यांतर्गत नव्हे हें दुसरें मत.

म. सा. प. (१४-२-११)







चर्चाविषय २ राः—विभक्ति आणि प्रत्यय ( ३-४-३८, ३-७-३८, ४-९-३८, १८-९-३८, २-१०-३८, १३-११-३८.)

प्रातिपादिक आणि धातु ह्यांव्यतिरिक्त ज्यांचा अर्थ वाक्यांश म्हणून प्रतीत होतो त्यांना प्रत्यय म्हणणें अिष्ट आहे. अुलट पक्षीं ज्याचा अर्थ रूढीने लुप्त झाला आहे ते प्रत्यय नव्हत.

धातु किंवा प्रातिपादिक यांच्याशीं अवियोज्य आणि ज्यांना स्वतंत्र अर्थ राहिला नाही ते प्रत्यय; प्रत्ययांचा अर्थ पुष्कळदा अव्ययांनी बोधित होतो (हे विभक्तिपर्याय मानावेत). करून, करितांना ह्यांत धातूखेरीच स्वतंत्र असा वाक्यार्थाचा अंश आहे म्हणून हीं अव्यय रूपें मानावींत; हें अेक मत; तीं अव्ययें आहेत हें दुसरें मत. अुलट पक्षीं करणारा, बोलणारा

यांतील धात्वर्थ आणि प्रत्ययार्थ यांना वाक्यार्थांत स्वतंत्र स्थान नाही म्हणून हीं प्रातिपदिकें होत ह्याविषयीं मतभेद नाही.

मराठींत द्वितीयेचा पूर्ण लोप झाला आहे आणि प्रथमेचे कर्ता आणि कर्म हे दोन अर्थ आहेत. द्वितीयेचें कार्य चतुर्थीने संपादिलें जातें, असें एक मत.

चतुर्थी लुप्त मानावी हें दुसरें मत; दोन्ही मानाव्यात हें तिसरें मत. कर्म हा अर्थ द्वितीयेचाच आणि त्यामुळें द्वितीयेचा शून्य प्रत्यय मानावा, हें एक मत; शून्य प्रत्यय प्रथमेचाच हें दुसरें मत.

षष्ठी मानूं नये हें एक मत; षष्ठी तत्त्वतः मानूं नये, व्यवहारतः मानावी हें दुसरें मत

षष्ठी स्वतंत्र विभक्ति मानावी, षष्ठीच्या रूपाना जरी विशेषणाचें स्वरूप असलें तरी त्याच्यामुळे सामान्यरूप होतें आणि मागील विशेषणाचीं सामान्य रूपें होतात असें एक मत होतें पण पुढे तें मत पालटलें.

संबोधनापुढें येणारें 'हो' हें अव्यय आहे, प्रत्यय नव्हे.

विभक्तींचें परिगणन आणि विभक्तिप्रत्ययः—

| | एक० प्रत्यय | अनेक० प्रत्यय |
|---|---|---|
| प्रथमा | ० (शून्य) | ०, (दीर्घत्व), आ, ई, ए, ऐं, ई |
| द्वितीया | स ला [ते आ](शून्य प्रत्यय मानावा हें एक मत) | स ला ना [ते आ] (०) |
| तृतीया | ने [एं ई आं] शी | नी [हीं ईं] शीं |
| चतुर्थी | स ला [ते] | स ला ता [ते] |
| पंचमी | ऊन हून | ऊन हून |
| (षष्ठी) | | |
| सप्तमी | त ई [आं] | त ई [आं] |
| संबोधन | ०, आ, | ०, नो |

चर्चाविषय चौथा— संयुक्त क्रियापदें ५-३-३९, २-४-३९, १७-९-३९, १०-९-३९, १७-१२-३९, १३-६-४०.

दोन मतें— एक मत– संयुक्त क्रियापदें नाहीत. २ रें मत (याला बहुमत आहे.) काल, अवस्था आणि प्रयोग दर्शविण्याकरिता अस, हो आणि जा यांचा सहायक म्हणून उपयोग होतो, तेवढींच संयुक्त क्रियापदें मानावींत; अितर शुद्ध क्रियापदें मानावींत.

अपूर्ण, पूर्ण, आणि अुद्दिष्ट या तीन क्रियापदाच्या अवस्था आहेत. अस अित्यादि सहायक धातूंना स्वतंत्र अर्थ राहत नाही. आज्ञार्थात सहायक लुप्त होतें ही त्याची अेक कसोटी आहे. स्वतंत्र क्रियापदाचा लोप होत नाही. ये, दे, पाहिजे अित्यादि क्रियापदें नव्हेत.

**विषय ५ वा**— सिद्ध रूपें— आहे, नाही, नोहे, (हवें), नको, नये हीं सिद्ध रूपें आहेत. प्रक्रियाघटित नव्हेत.

**विषय ६ वा**— अकरणरूप मानूं नये.

**विषय ७ वा**— जाअीचना यांत ना हें क्रियाविशेषण मानावें आणि अपवादादाखल स, त अित्यादि प्रत्यय विकल्पाने नाच्या पुढे लागतात (हें सर्वानुमतें मान्य).

विषय ८ वा— करूं (शकतो), जाअूं (अिच्छितो), पोहतां (येतें) अित्यादि स्थळीं करूं, जाअूं, पोहतां ह्या धातुसाधितांविषयी दोन पक्ष (१) हीं गुणप्रधानभावाने कर्म होअूं शकतात. त्यांच्यावरून नामकार्य होतें व (२) त्यांचें लिंगवचन त्यांच्या कर्मावरून समजावें.

अुदाहरणें— (१) रामाने पोहूं अिच्छिलें. (२) रामाने चित्रें काढूं अिच्छिलीं. (५) रामाला चित्रें काढतां येतात.

---

## महाराष्ट्र-साहित्य-परिषद्
## १९४० चें अितिवृत्त

वर्षारंभीं पटावर सभासदांची संख्या ९२७ होती. या वर्षात ५ तहहयात व ४६ साधारण असे एकूण ५१ नवीन सभासद झाले. परंतु यांपैकी ३ सभासद वर्गबदलीने वरील वर्गांत घातले असल्याने नवीन सभासदाची खरी संख्या ४८ ही आहे. मृत्यूमुळे १ तहहयात व ५ साधारण असे पुढील ६ सभासद कमी झाले— डॉ. भा. सी. सुकथनकर, श्री. द. वि. देशमूख, श्री. गो. पां. पावशे, श्री. द्वा. गो. वैद्य, डॉ. वा. ल. नूलकर व रा. सा. पु. सी. वैद्य. १७ सभासदांचे राजीनामे स्वीकारण्यात आले. वर्षाच्या शेवटीं सभासदांची संख्या येणेंप्रमाणे आहे:—

अुपकर्ते १, आश्रयदाते ३, साहाय्यक १, हितचिंतक १०, तहहयात १२७ व साधारण ८१०; एकूण ९५२.

या वर्षी १ नवीन संस्था संलग्न करण्यांत आली असून ४ संलग्न संस्था पटावरून कमी करण्यांत आल्या. आता पटावर असलेल्या संलग्न संस्थांची संख्या २३ ही आहे.

आर्थिक परिस्थिति— हिशेबात दाखविलेल्या शिल्केंत इमारतीसाठी आलेल्या देणग्यांची रक्कम रु. ९००, तह. सभासदांची वर्गणी रु. ७, पैठणकर पारितोषिकाची रक्कम रु. १०० व कारकुनाचा प्राव्हिडंट फंड रु. १०७ या रकमांचा समावेश झाला असल्यामुळे निवळ शिल्लक रु. ४२४-९-० आहे.

देणग्या— इमारतनिधीसाठी खालीलप्रमाणे रु. ९०० च्या देणग्या आल्या:—

श्रीमंत सौ. इंदिरामहाराणीसाहेब होळकर, इंदूर, ७००; डॉ. आ. श्री. परांजपे, दादर, ५०; दि. ब. ल. पा. कुलकर्णी, कुरुंदवाड, ५०; प्रो. त्र्यं. शं. शेजवलकर, पुणें, ५०; डॉ. श्री. स. भावे बडोदें, ५०.

वरील सर्व देणगीदाराची परिषद् ऋणी आहे.

संमेलन—मराठी वाङ्मयमंडळ, रत्नागिरी, या संलग्न संस्थेकडून ता.४, ५ व ६ मे या दिवशीं प्रो. ना. सी. फडके यांच्या अध्यक्षतेखाली रत्नागिरी येथे महाराष्ट्र साहित्य-संमेलनाचें २४ वें अधिवेशन भरविण्यांत आलें. या संमेलनास जोडून चित्रकलाविषयक विभाग संमेलनहि भरविण्यांत आलें होतें.

परीक्षा— प्रतिवर्षाप्रमाणे यंदाहि नोव्हेंबरांत प्राज्ञ व विशारद या परीक्षा घेण्यांत आल्या. प्राज्ञ परीक्षेसाठी ६९ व विशारद परीक्षेसाठी ११ याप्रमाणे अर्ज आले होते. प्राज्ञ व विशारद या परीक्षांत यशस्वी झालेल्या उमेदवाराची संख्या अनुक्रमें ४६ व ४ अशी असून यापैकी दुसऱ्या कक्षेंत अनुक्रमें १४ व ४ अुमेदवार यशस्वी झाले.

अुमेदवारांच्या सोयीसाठी नूतन मराठी विद्यालय, पुणें, व गांधी ट्रेनिंग कॉलेज, पुणें, या दोन संस्थांमार्फत विशेष वर्ग चालविण्यात आले व मुंबई मराठी साहित्य संघानेहि प्रतिवर्षाप्रमाणे व्याख्यानांच्या कार्यक्रमाची योजना केली होती. त्याचप्रमाणे परीक्षक व केंद्राधिकारी यांनी विनावेतन साहाय्य दिलें. वरील सर्व साहाय्यकारी संस्था व व्यक्ति यांची परिषद् आभारी आहे.

**सभा**— या वर्षी कार्यकारी मंडळाच्या ९, नियामक मंडळाच्या २ व वार्षिक साधारण सभेची १ याप्रमाणे बैठकी झाल्या. याशिवाय पटवर्धन स्मारकसमितीकडून मिळणाऱ्या देणगीबद्दलच्या प्रश्नाचा विचार करण्यासाठी १ विशेष साधारण सभा भरविण्यांत आली. या सभेंत पटवर्धन स्मारक समितीकडून येणाऱ्या देणगीचा स्वीकार करून पटवर्धन स्मारक सभागृह बांधण्यात यावें असें ठरलें.

**पोटमंडळें**— अितिवृत्तवर्षी परिभाषा चर्चा मंडळाच्या १३ मुख्य बैठकी झाल्या. निरनिराळ्या विषयाच्या अभ्यासकाचें लक्ष केंद्रित व्हावें आणि विषयाची विविधता लाभावी या दृष्टीने औद्भिद्विषयक ३, रेडिओ व अनुहरणशास्त्र प्रत्येकीं २, ज्योतिष, ध्वनिशास्त्र, अुत्पीडविद्युत्, यंत्रविज्ञान, गणित व रसायन यासाठी प्रत्येकी १ अशा बैठकी होअून त्यातील लहान लहान विभागावर परिभाषाविषयक चर्चा करण्यात आली. केवळ औद्भिद्विषयक परिभाषेसाठी नेमण्यांत आलेल्या अुपसमितीच्या अेकूण २१ बैठकी होअून त्या शास्त्रांतील बाह्यरूप विचाराविषयींची परिभाषा पुरी झाली आहे. अर्थशास्त्रविषयक परिभाषेसाठी अेक निराळी अुपसमिति नेमण्यात आली असून तिच्या कार्यास आरंभ झाला आहे.

व्याकरणसमितीच्या ता. १-८-१९३७ ते ता. ९-२-१९४१ पर्यंत अेकंदर २९ सभा झाल्या. या सभांतून झालेल्या कार्यांचा संक्षिप्त अहवाल पत्रिकेंतून प्रसिद्ध करण्यांत आला आहे.

**अितर**— 'भग्नमूर्ति' व 'सुश्लोककुमार' या दोन पुस्तकांवर परिषदेतर्फे चर्चा झाली. श्री. पु. मं. लाड यांचें 'ब्राह्मणाची विद्या' या विषयावर अेक व्याख्यानहि करविण्यात आलें.

लोकनायक अणे व विद्वद्वर्य पा. वा. काणे यांच्या षष्ठ्यब्दपूर्तिसमारंभाच्या वेळीं त्यांस पुष्पहार अर्पण करून वरील अुभयतांचा सत्कार करण्यात आला.

सिंध प्रांतांतील प्राथमिक मराठी शाळांना देण्यात येणारी सरकारी मदत १९४२ पासून बंद करण्यांत यावी अशा आशयाचा सिंध सरकारने हुकूम काढल्याने व याचा परिणाम मराठी भाषेची गळचेपी होण्यात होणार असल्याने या प्रकारचा निषेध करण्यासाठी टिळक मंदिरात ता. १५ डिसेंबर रविवारीं श्री. ज. स. करंदीकर यांच्या अध्यक्षतेखाली पुणें नागरिकांची जाहीर सभा परिषदेच्या वतीने भरविली. निषेधाचा ठराव योग्य त्या अधिकाऱ्याकडे पाठविण्यांत आला. (हा हुकूम सिंध सरकारने परत घेतल्याचें वृत्त नुकतेंच प्रसिद्ध झालें आहे.)

हिंदी साहित्य संमेलनाच्या निमित्ताने पुण्यास आलेल्या काही हिंदी साहित्यिकांनी परिषदेच्या कार्यालयास भेट दिली. भेट देणाऱ्या गृहस्थांत प. श्रीराम शर्मा, संपादक 'विशाल भारत', डॉ. सत्यप्रकाश, हिंदुस्तानी अॅकॅडमीचे श्री. रामचंद्र तंडन, लखनौचे श्री. दुलारेलाल भार्गव वगैरे प्रमुख मंडळी होती.

अुन्हाळ्याच्या सुटीनिमित्त पुण्यास येणाऱ्या परगांवच्या साहित्यप्रेमी पाहुण्यांचा स्थानिक सभासदांशीं परिचय होअून विचारविनिमय व्हावा या अुद्देशाने प्रतिवर्षाप्रमाणे ५ जून या दिवशीं परिषदेच्या जागेत स्वागताच्या कार्यक्रमाची योजना करण्यांत आली.

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

## जमाखर्च १९४०

**जमा**

१०१७८-१३-५ मागील शिल्लक
१४९८-१४-० साधारण सभासद वर्गणी
१९४० ची १४६०- ६-०
१९४१-४२ ची ३८- ८-०
१४९८-१४-०
७- ०-० तहहयात सभासद वर्गणी
९३-१४-० पत्रिका वर्गणी
५०- ०-० संलग्न संस्था वर्गणी
१००- ० ० अिमारत निधि देणगी
२७-१४-६ ग्रंथविक्री
४७४-१३-९ परीक्षा शुल्क इ.
३२- ० ० जाहिरात
२००- ०-० मुंबई संमेलन देणगी
७६२- ७-४ व्याज
ट्रस्टी ७५०-०-०
खजिनदार १२-७-४
७६२-७-४
३२- ८-० प्रॉव्हि. फंड
६-१२-० किरकोळ

१४२६५- १-० एकूण

**खर्च**

९०५-—१-९ कचेरीखर्च
पगार ६१४- ८-०
प्रॉव्हि. फंड ६५- ०-०
भुअीभाडें १५- ०-०
म्युनि. कर ३१- १-०
वीज १६- ५-०
टपाल ७३-१२-६
लिखाई ७-—६-०
छपाई ५९-१५-०
सादिल २२- २-३
९०५- १-९
१७०६- ८-६ पत्रिका खर्च
छपाई १३८७- ४-०
टपाल ३११-१५-६
किरकोळ ७- ५-०
१७०६- ८-६
३६- ८-६ संमेलनखर्च
८५- ९-३ प्रवास, प्रचार
१५६-१३-९ परीक्षाबाबतचा खर्च
६८-१४-३ किरकोळ खर्च
११३०५- ९-० शिल्लक-पुढील सालाकरिता
१४२६५- १-० एकूण

र. लु. जोशी
चिटणीस

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

## जमाखर्चाचा आढावा (१९४०)

| देणें | | येणें | |
|---|---|---|---|
| ११३०५-९-० | शिल्लक | ७८६६- ८- ६ | इमारत |
| १००-०-० | पैठणकर पारितोषिक देणगी | ६१६- ०- ९ | सामान |
| १०७-०-० | कारकून प्रॉव्हि. फंड | १३६०- ७- ३ | ट्रस्टी (तह.सभा.वर्गणी) |
| | | १२७-१५- ६ | ट्रस्टी (इमारत निधि देणगी) |
| | | ३- ०- ० | श्री. ग. स. जोग |
| | | १२१७- ८-११ | खजिनदार (बँक) |
| | | ५-१५- ४ | चिटणीस ,, |
| | | ३१५- ०- ९ | चिटणीस (रोख, चेक व पोस्टाचीं तिकिटें) |
| ११५१२-९-० | | ११५१२- ९- ० | |

र. लु. जोशी
चिटणीस

## हिशेबतपासनिसांचा शेरा

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे पुणें कचेरीचे ता. ३१ डिसेंबर १९४० अखेर पुऱ्या होणाऱ्या वर्षाचे हिशेब मीं तपासले. हिशेब चांगले ठेविले आहेत. मला पाहिजे असलेली माहिती, खुलासे मला मिळाले. सदरहु जमाखर्चाचे तक्ते परिषदेच्या पुणें कचेरीच्या येण्या-देण्याची व जमाखर्चांची वस्तुस्थिति दाखवीत आहेत. गतसालीं लिहिल्याप्रमाणे महाराष्ट्र साहित्य परिषदेचे असे संपूर्ण हिशेब, निधिधारकांकडील जमाखर्चाचा हिशेब धरून तक्ते तयार केल्याशिवाय होणार नाहींत. अिमारत व सामान यावरील झीज काढण्यास सुरुवात करावी अशी माझी सूचना आहे.

म. वि. गोखले
हिशेबतपासनीस.

१६।३।४१

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

## अंदाजपत्रक १९४१

| उत्पन्न | | खर्च | | | गतवर्षांतील खर्च |
|---|---|---|---|---|---|
| ४२४-९-० | शिल्लक | ९६०-०-० | कचेरीखर्च | | ९०५-१-९ |
| ७५०-०-० | व्याज (ट्रस्टी) | | पगार | ६२५ | |
| १२०-०-० | व्याज (अिचल-करंजी ट्रस्ट) | | प्राव्हि. फंड | ३५ | |
| | | | भुअीभाडें | १६ | |
| १९०-०-० | साधारण सभासद वर्गणी | | म्युनि. कर | ३२ | |
| | | | वीज | २२ | |
| ७५-०-० | पत्रिका वर्गणी | | टपाल | १०० | |
| ६६-०-० | संलग्न संस्था वर्गणी | | लिखाअी | २० | |
| | | | किरकोळ छपाअी | ६० | |
| ५०-०-० | ग्रंथविक्री | | सादिल | ५० | |
| ४००-०-० | परीक्षा (शुल्क अित्यादि) | | | ९६० | |
| १५०-०-० | पत्रिका जाहिराती | २०००-०-० | पत्रिकाखर्च | | १७०६-८-६ |
| | | | छपाअी | १६०० | |
| | | | टपाल व अितर | ४०० | |
| | | | | २००० | |
| | | ५०-०-० | संमेलनखर्च | | ३६-८-६ |
| | | १००-०-० | शाखासभांस द्यावयाची रक्कम | | ०-०-० |
| | | १५०-०-० | प्रवास, प्रचार | | ८५-९-३ |
| | | २५-०-० | अुपसमित्या | | ०-०-० |
| | | १७५-०-० | परीक्षाखर्च | | १५६-१३-९ |
| | | ५०-०-० | सामान | | ३१-७-६ |
| | | ७५-०-० | किरकोळ | | ६५-१०-३ |
| | | ३५०-०-० | संमेलन परिषद् अितिहास | | |
| | | ०-९-० | शिल्लक | | |
| ३९३५-९-० | | ३९३५-९-० | | | |

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

## अंदाजपत्रकाशीं जमाखर्चाचा पडताळा (१९४०)

| अुत्पन्न | अंदाजपत्रका-प्रमाणे | प्रत्यक्ष | अंतर | खर्चबाब | अंदाजपत्रका-प्रमाणे | प्रत्यक्ष | अंतर |
|---|---|---|---|---|---|---|---|
| व्याज (ट्रस्टींकडून) | ७५० | ७५० | × | कचेरीखर्च | ९५० | ९०५ | − ४५ |
| व्याज (इचलकरंजी ट्रस्टकडून) | ६० | ० | − ६० | पत्रिकाखर्च | १५०० | १७०६ | + २०६ |
| साधारण सभासद वर्गणी | १७०० | १४९८ | − २०२ | संमेलनखर्च | ५० | ३६ | − १४ |
| पत्रिका वर्गणी | ७५ | ९३ | + १८ | शाखासभास द्यावयाची रक्कम | १०० | ० | − १०० |
| संलग्न संस्था वर्गणी | ६० | ५० | − १० | प्रवास, प्रचार | २०० | ८५ | − ११५ |
| मुंबई संमेलन देणगी | २०० | २०० | × | अुपसमित्या व संपादकमंडळ | २५ | ० | − २५ |
| ग्रंथविक्री | ४० | २७ | − १३ | परीक्षा | १०० | १५६ | + ५६ |
| परीक्षाशुल्क इत्यादि | ३०० | ४७४ | + १७४ | सामान | ५० | ३१ | − १९ |
| जाहिराती | ५० | ३२ | − १८ | किरकोळ | ६० | ६८ | + ८ |
| किरकोळ | ० | ६ | + ६ | परिषद् अितिहास | २०० | ० | − २०० |

म. सा. प. (१४-२-१४)

# परिषद्वार्ता



ता. २२ फेब्रुवारी या दिवशीं कार्यकारी मंडळाची सभा होऊन खालील दुखवट्याचे ठराव झाले :—

"(१) कोल्हापूरचे कै. छत्रपति राजाराममहाराज हे ता. २६ नोव्हेंबर १९४० रोजीं अकालीं निधन पावले हें ऐकून परिषदेच्या कार्यकारी मंडळास खेद होत आहे. कै. महाराजांची परिषदेच्या कार्याविषयी सहानुभूति होती आणि त्यांनी कांही वर्षे आर्थिक साहाय्यहि केलें होतें. त्यांच्या निधनाने त्यांच्या आप्तस्वकीयांसच नव्हे तर अखिल महाराष्ट्रीय जनतेस जें दुःख होत आहे त्यात परिषदेचें कार्यकारी मंडळ सहभागी आहे.

(२) बडोदें येथील विद्वान् प्राध्यापक ग. ग. पेंडसे, सेवानिवृत्त असिस्टंट पोस्टमास्तर जनरल व पुणें येथील डेक्कन सभेचे एक कार्यकर्ते रावसाहेब पु. सी. वैद्य, केसरी संस्थेचे विश्वस्त श्री. धोंडोपंत वासुदेव ऊर्फ बाबासाहेब विद्वांस यांच्या निधनाने परिषदेच्या कार्यकारी मंडळास खेद होत आहे आणि त्यांच्या आप्त मंडळीस होणाऱ्या दुःखात कार्यकारी मंडळ सहभागी आहे."

या सभेस सादर केलेले १९४० या वर्षांचे हिशेब व १९४१ या वर्षाकरिता अंदाजपत्रक मंजूर करण्यात आलें.

नाशिक येथील महाराष्ट्र नाट्यमंदिर ह्या संस्थेस संलग्न संस्था म्हणून मान्यता देण्यात आली.

हीं कामें झाल्यानंतर राहिलेल्या कामांचा विचार करण्याकरिता ता. २८ रोजीं सभा घ्यावी असें ठरलें. त्याहि दिवस सभासदांस सोयीचा नसल्याने ही तहकूब राहिलेली सभा ता. ३ मार्च या दिवशीं भरली. या सभेंत १९४० या वर्षांचें अितिवृत्त मान्य करण्यांत आलें.

वाङ्मयसमीक्षणशास्त्रावरील ग्रंथास कै. पैठणकर यांच्या नांवें द्यावयाच्या रु. १०० च्या पारितोषिकाची मुदत १९४० अखेर संपल्याने व या वर्षी अशा तऱ्हेचा ग्रंथ प्रसिद्ध ना झाल्याने या पारितोषिकाचे देणगीदार श्री. काळे यांच्या सूचनेवरून ही मुदत १९४१ अखेरपर्यंत वाढविण्यांत आली.

**संमेलन—**

महाराष्ट्र साहित्य संमेलनाचें २५ वें अधिवेशन सोलापुरास १२, १३ व १४ अेप्रिल या तारखांस भरण्याचें निश्चित झालें असून संमेलनाध्यक्ष म्हणून सुप्रसिद्ध कथालेखक व कादंबरीकार श्री. वि. स. खांडेकर यांची योजना स्वागतमंडळाने केली आहे. सभासद संमेलनास अगत्य अुपस्थित होतील अशी अपेक्षा आहे.

पुढील संमेलनाचें अधिवेशन भरविण्याबद्दल महाराष्ट्र नाट्यमंदिर, नाशिक, या संलग्न संस्थेकडून निमंत्रण आलें आहे.

रत्नागिरी संमेलनाच्या स्वागतमंडळाने देणगी म्हणून रु. १०० ची रक्कम परिषदेस नुकतीच पाठविली आहे. या देणगीबद्दल रत्नागिरी संमेलन-स्वागतमंडळाची परिषद् अत्यंत आभारी आहे.

**इतर**

डेक्कन कॉलेज कौन्सिलच्या घटनेसंबंधाच्या सरकारी ठरावांत महाराष्ट्र विद्यापीठाच्या स्थापनेसंबंधाने व्यक्त करण्यांत आलेल्या सरकारी धोरणाचा निषेध करण्याकरिता म. सा. परिषदेच्या वतीने पुण्यांतील नागरिकांची जाहीर सभा ता. २२ फेब्रुवारी रोजीं गोखले स्मारक-मंदिरात भरविण्यांत येवून या सभेंत मंजूर झालेला निषेधाचा ठराव जिल्हाधिपति व या प्रश्नांशीं संबद्ध असलेल्या सरकारी अधिकाऱ्याकडे पाठविण्यांत आला.

सोलापूर येथे भरणाऱ्या २५ व्या म. सा. संमेलनाचे नियोजित अध्यक्ष श्री. वि. स. खांडेकर यांचा परिषदेतर्फे ता. ९ मार्च या दिवशीं परिषदेच्या सभागृहांत सत्कार करण्यांत आला.

## २४ व्या ( रत्नागिरी ) महाराष्ट्र साहित्य संमेलनांत झालेल्या ठरावांच्या अंमलबजावणीचा वृत्तान्त

[ या वृत्तान्तांत जुजबी स्वरूपाच्या ठरावांचा व जे ठराव सरकाराकडे व इतरांकडे पाठविण्यापलिकडे कांहीच करिता आलें नाही अशांचा उल्लेख केलेला नाही.]

ठराव १५—मराठी हस्तलिखितांची बृहत्सूची तयार करण्याच्या उद्देशाने नेमिलेल्या समितीने परिश्रमपूर्वक कार्य केलें आहे. या समितीचें कार्य पुढे चालू ठेवण्यास अवश्य तो ठराव पुढील संमेलनापुढे येणार आहे.

ठराव १७—महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या धोरणासंबंधी केलेल्या सूचनांचा विचार करण्यास कार्यकारी मंडळाने एक उपसमिति नेमून शक्य तेवढ्या सूचना अंमलांत आणण्याची व्यवस्था केली आहे.

ठराव १९—महाराष्ट्र शब्दकोश तयार करण्याच्या उद्देशाने प्राचीन कवींच्या ग्रंथांच्या समग्र शब्दसूची तयार करण्यास नेमलेल्या समितीने उत्तम कार्य केलें आहे. याहि समितीचें कार्य पुढे चालू ठेवण्यासाठी योग्य असा ठराव पुढील संमेलनापुढे येणार आहे.

ठराव २१ व २२— पैशाच्या अभावीं महाराष्ट्र ज्ञानकोशाचें काम चालू ठेवण्याविषयीची योजना व बालवाङ्मयासंबंधी नेमलेल्या समितीचें कार्य होऊं शकलें नाही.

ठराव २४— मराठी लघुलिपीसाठी नेमलेल्या समितीने आपला अहवाल न पाठविल्याने त्या समितीने काय कार्य केलें आहे याचा वृत्तान्त देतां येत नाही.

# नवीन सभासद

## हितचिंतक

श्रीमंत राजे मालोजीराव निंबाळकर, फलटण
श्रीमंत मातोश्री सौ. राणीसाहेब, फलटण
श्री. वि. ह. दामले, पुणें
श्री. रा. वि. मराठे, माटुंगा
,, श्री. रा. शिंदे, मेहसाणा
,, ह. गो. गोखले, गोरेगांव
,, ग. स. मराठे, पुणें (तहह्यात वर्गातून)

## तहह्यात

श्रीमंत विक्रमसिंह महाराज पवार, देवास (थोरलें)
श्रीमंत सरदार बाबासाहेब विंचूरकर, पुणें
श्री. वा. रा. पुराणिक, नागपूर
न्या. मू. म. वि. भिडे, लाहोर
श्री. ल. ना. गोडबोले, पुणें
,, रा. वा. राऊत, मुंबई
,, प्रभाकर नानाजी राजूजी लामगे, मुंबअी
,, रघुनाथराव वाळवेकर, पुणें
डॉ. य. वा. मोडक, पुणें
सौ. शालिनीबाअी रानडे, दादर
डॉ. वि. त्र्यं. पटवर्धन, मलाया
श्रीमती अुमाबाअी पटवर्धन, पुणें
सौ. कमलाबाअी शिंदे, मेहसाणा
श्री. मा. रा. जोशी, पुणें
,, शा. आ. सबनीस, मुंबअी
दि. ब. प. भा. शिंगणे ,,
डॉ. शं. रा. जोगळेकर ,,
दि. ब. ज. शं. नेरूरकर ,,
श्री. शं. प. भागवत, सोलापूर

## तहह्यात (साधारणांतून)

श्री. ल. ना. चापेकर, पुणें
सौ. शांताबाअी कशाळकर, दादर
प्रो. श्री. बा. रानडे, दादर
श्री. ज. अे. नरवणे, पुणें
रा. ब. न. बा. देशमूख, नगर
सौ. आनंदीबाअी शिर्के
वा. गो. मायदेव, पुणें
सौ. वत्सलाबाअी घाटे, दादर
श्री. प्र. ब. मडगांवकर, दादर
डॉ. पु. वि. घारपुरे, माटुंगा
श्री. के. नारायण काळे, पुणें
रा. ब. भा. ल. मोडक, पुणें

## साधारण

श्री. शारंगधर शामजी पहिलवान, मुंबअी
,, अेल्. डी. सुर्वे, अक्कलकोट
,, महादेव दामोदर रिसबूड, पुणें
,, गोविंद महादेव जोशी, ,,
,, भा. दी. दीक्षित, रत्नागिरी
,, गणेश हणमंत पाध्ये, कोल्हापूर
,, रामचंद्र सदाशिव जोशी, पुणें
,, यशवंत गणेश वझे, पुणें
श्री. रामचंद्र सदाशिव ढवळे, कऱ्हाड
,, राम अेल्. गोगटे, मुंबअी
,, दिनकर विठ्ठल अमोणकर, मुंबअी
,, अेकनाथ मोरेश्वर जोशी, सांगली
,, बाबूराव गोविंद नाअीक, ,,
,, रामचंद्र विनायक साठये, ,,
,, विश्वनाथ सखाराम कानेटकर, सांगली

# साभार स्वीकार

१ हिंदूंचें अर्थशास्त्र— ले० गो. म. जोशी; प्रका० बा. ह. मुंजे, वॉकर रोड, नागपूर, मूल्य २ रुपये.

२ वृाजी (भाग २ रा)— ले० श्री. ना. धों. ताम्हनकर; प्रका० किर्लोस्कर प्रेस, किर्लोस्कर वाडी; मूल्य १॥ रु.

३ दोन झरे— (कवितासंग्रह) ले० श्री. ना. ग. तळेगांवकर व श्री. निशिकान्त कालगांवकर; प्रका० मानसप्रकाशनमंडळ; मूल्य ८ आणे.

४ पाणपोई— (कथासंग्रह) ले० श्री. पां. गो. लोहोकरे; प्रका० श्री. हे. ग. करमरकर, २० नारायण, पुणें २; मूल्य १॥ रु.

५ शहाळीं— ले० श्री. सां. घ. कंटक; प्रका० श्री. बा. द. सातोस्कर, सागर-साहित्य, त्रिभुवनरोड, मुंबई ४; मूल्य १४ आणे.

६ उंबराचीं फुलें— (कथासंग्रह) ले० श्री. ह. वि. देसाअी; प्रका० श्री. बा. द. सातोस्कर, सागरसाहित्य, मुंबअी ४; मूल्य १४ आणे.

७ विव्यावरती अधेर— ले० श्री. अनंत काणेकर; प्रका० श्री. बा. द. सातोस्कर, सागरसाहित्य, मुंबअी ४; मूल्य १। रु.

८ शेजवलकरांचे लेख— ले० श्री. त्र्यं. शं. शेजवलकर; प्रका० श्री. ह. वि. मोटे, दादर, मुंबअी; मूल्य २ रु.

९ सुधा— ले० व प्रका० प्रो. वा. गो. मायदेव; डे. जि., पुणें ४; मूल्य १ रु.

१० प्रो. ब्लोककृत मराठी भाषेचा विकास— ग्रंथकार : प्रो. झुल ब्लोक; भाषांतरकार व प्रका० प्रा. वा. गो. परांजपे, फर्ग्युसन कॉलेज, पुणें ४; मूल्य ४ रु.

११ एल्. पी. जैन ह्यांची संकेतलिपी मराठी शॉर्ट हँड (भाग १ व २)— आविष्कारक व प्रका० एल्. पूनमचंद जैन, ब्यॅवर; मूल्य अनुक्रमें ८ आणे व १। रु.

१२ जगांतील धर्मपंथ— ले० व प्रका० रा. ब. डॉ. द. ल. सहस्रबुद्धे, पुणें ४; मूल्य २ रु.

१३ विभूतिपूजा (संगीत नाटिका)— ले० नन्दु खोटे; प्रका० एम्. के. सुखठणकर, शां. ना. मापळे, समर्थ हाऊस, मुंबअी ४; मूल्य ८ आणे.

१४ व्यक्तिचित्रें— ले० प्रो. वि. ह. कुलकर्णी; प्रका० श्री. रा. ज. देशमुख, २६४ नारायण पेठ, पुणें २; मूल्य २ रु.

१५ सेनापति तात्या टोपे— ले० डॉ. ना. दा. सावरकर; प्रका० श्री. श्री. द. वैद्य, भारत प्रकाशन ग्रंथसंस्था, २९२ शनिवार, पुणें २; मूल्य १२ आणे.

**श्री. केशव भिकाजी ढवळे, गिरगांव, मुंबअी ४, यांचीं प्रकाशनें :—**

१६ थोरांच्या गोष्टी (भाग १, २, ३)— ले० श्री. ग. म. वैद्य; मूल्य प्रत्येकीं ६ आणे.

१७ बीजेची कोर, चौथीचा चांद, अष्टमीचा चंद्र, पौर्णिमेचें चांदणें— ले० श्री. भ. श्री. पंडित; मूल्य अनुक्रमें आणे ४, ४, ५, ५.

१८ मोठीं माणसें (भाग १ ला)— ले० श्री. के. ह. सहस्रबुद्धे; मूल्य ५ आणे.

१९ शाळेसाठी— ले० श्री. ना. धों. ताम्हणकर; मूल्य ४ आणे.

२० नदीकांठच्या गोष्टी— ले० श्री. का. रा. पालवणकर; मूल्य ३ आणे.

२१ गोष्टया— ले० श्री. ना. धों. ताम्हनकर; मूल्य ४ आणे.

२२ मालतीमाधव— ले० श्री. म. का. कारखानीस; मूल्य ४ आणे.

२३ विभूतींचा प्रसाद— ले० शेख सुलेमान मोहिमुद्दीन व रा. द. गुरव; मूल्य ४ आ.

२४ हंसरीं नाट्यसुमनें— ले. श्री. चिं. आ. मुंडले; मूल्य ६ आणे.

२५ फुलबाग— ले० श्री. भा. म. वैद्य, श्री. ग. पां. पाटील; मूल्य २॥ आणे.

२६ सादीच्या गोष्टी— ले० श्री. द. ग. प्रधान; मूल्य २ आणे.

२७ हीं लहानगीं मुलें काय करणार !— ले० श्री. ग. म. वैद्य; मूल्य ४ आणे.

२८ स्वधर्ममार्गदर्शक ज्ञानेश्वर— ले० श्री. शिवराम वाशीकर; मूल्य ३ आणे.

२९ जगाचे उपकारकर्ते— ले० श्री. का. ना. भिडे; मूल्य ४ आणे.

३० मराठी वाङ्मयाचा इतिहास-तिसरा (रामदास) खंड— ले. ह. भ. प. ल. रा. पांगारकर; मूल्य ४ रु.

३१ पंजाबांतील नामदेव— ले० श्री. शं. पु. जोशी; मूल्य १२ आ.

३२ प्रा. फडके यांचें वाङ्मयदर्शन — ले० प्रा. मा. का. देशपांडे; मूल्य १ रु.

३३ स्वराज्यमार्गदर्शक लोकमान्य टिळक— ले० आपटे गुरुजी; मूल्य १२ आ.

३४ शालिनीचीं निवडक पत्रें (२ री आवृत्ति) — ले० श्री. गो. ब. माकोडे; मूल्य १२ आणे.

३५ स्मृतिचित्रें (संक्षिप्त आवृत्ति)— ले० दे. ना. टिळक; मूल्य १ रु.

३६ संगीत संवाद— ले० त्रि. ज. कामत; मूल्य ६ आणे.

३७ हास्यकळ्या— ले. प्रा. वि. मा. दी. पटवर्धन; मूल्य ८ आणे.

३८ बिलोरी आरसे — ले० ना. धों. उपाध्ये; मूल्य २॥ आणे.

३९ छान गोष्टी (भाग १, २, ३) —ले० सौ. मालतीबाई दाडेकर; मूल्य प्रत्येकीं ३ आणे.

४० उंदिरमामाचें लग्न— ले० श्री. द. के. बर्वे; मूल्य २ आणे.

४१ मराठी गद्यविलास— ले० प्रो. कृ. पा. कुलकर्णी; श्री. श्री. रा टिकेकर, मूल्य १२ आणे.

४२ टिळकांची कविता (भाग १, तिसरी आवृत्ति)— सं० दे. ना. टिळक; मूल्य १। रु.

———

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेचीं पहिलीं बारा वर्षें

अर्थात्

## पत्रिकेच्या अंकांचीं वर्षशः बांधलेलीं बारा पुस्तकें

दर पुस्तकांत अभिप्राय, अैतिहासिक, चरित्रें, निबंध, पुस्तकपरीक्षण, भाषिक शंकाचर्चा, सामाजिक, अित्यादि विषयांवर सदरें असून, सर्व मिळून महाराष्ट्र-भाषा, वाङ्मय, समाज, अितिहास यांसारख्या विविध क्षेत्रांतील नवीन विद्वत्ताप्रचुर विचार आणि माहिती मिळणार आहे.

**किंमत** — सुंदर कापडी बांधणी विषयसूचीसह दर वर्षाच्या पुस्तकास ४ रुपये, परिषदेच्या सभासदास २ रु.; ट. ख. निराळा.

**वि. सू.** — तेराव्या वर्षाच्या पुस्तकाच्याहि बांधीव प्रती तयार आहेत, परंतु या प्रत्येक प्रतीस सभासदांसहि ४ रुपये पडतील; ट. ख. निराळा.

---

## 'मराठी भाषेचा व वाङ्मयाचा अितिहास'

### महानुभावअखेर

लेखक — कै. **बाळकृष्ण अनंत भिडे**, आकार — रॉयल अष्टपत्री, पृष्ठें — १२५. अुत्तम बांधणी किंमत फक्त अेक रुपाया. परिषदेच्या सभासदास बारा आणे; ट. ख. वेगळा.

विशेष माहितीसाठी लिहा : —

चिटणीस,

म. सा. परिषद्, टिळक रस्ता, पुणें २.

---

आर्यसंस्कृति मुद्रणालय, निमणबाग, टिळक रस्ता, पुणें, येथे लक्ष्मण नारायण चापेकर यांनी छापिलें व पुणें येथे महाराष्ट्र-साहित्य परिषदेच्या कार्यालयात परिषदेकरिता वामन मल्हार जोशी यांनी प्रसिद्ध केलें.

महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

[त्रैमासिक]

१२९

संपादक--के. नारायण काळे
बी.ए., एलएल.बी.

आषाढ १८६३

वर्ष १४ वें] जुलै १९४१ [अंक ३ रा

## वर्गणीविषयक माहिती

म. सा. पत्रिकेची वार्षिक वर्गणी — रु. ४॥ (ट.ख.सह).

परिषदेचे सभासद व संलग्नसंस्था — वा. व. रु. ३ (म. सा. पत्रिका विनामूल्य पाठविली जाते).

पत्रव्यवहाराचा पत्ता— **महाराष्ट्र साहित्य परिषद्, टिळक रस्ता, पुणें २.**

---



---

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका



वर्ष १४ वें ] अनुक्रमणिका [ अंक ३ रा

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका



## जीवनयोग *



सुभव्यशा अंबररंगभूवरी
अपूर्व चाले कुणि नाट्यदर्शन;
अदृश्यरूपें तिथही करी कुणी
प्रवीण अत्यद्भुत सूत्रचालन ! १
अमूप नानाविध तेथ भूमिका
स्वसूत्रयोगें नटवी नटेश्वर;
असंख्य ताराग्रह आपआपुलीं
नियुक्त कार्ये करिती परस्पर. २
नितान्त वर्ते तिथ अेकवाक्यता
अनन्त नाचे जरि भूमिकागण !—
स्फुरत्कणांची रचि रम्य पार्श्वभू
सहस्ररश्मी— परि दृष्टिआडुन ! ! ३
असंख्य अुल्का, तुटत्या, स्फुलिंगशा;
सपुच्छ तेजोनिधि धूमकेतुही !—
नटानटाला अनुरूप हो अशी
प्रकाशशोभा रचिती हिरण्मयी ! ! ४
खगोलकांचें सुविशाल अंबरीं
सुरू असे नाटक आदिपासुन !—
न चक्रनेमिक्रम बंद राहिला
कधींहि; चाले प्रतिवत्सरांतुन ! ५
खरें—! न त्यांनी निजकार्ययोजना
स्वयें नियोजून कृतींत आणिली !
स्वलीलया गोल निसर्गशक्तिनें
अबुद्ध ते खेळविले महाबली. ६
परी स्वकार्यांतरिं दाखवीत ते
अपूर्व अंतर्गत जी व्यवस्थिति—
तिच्यापुढें "अुत्तम जीवयोनिची"
दिपूनिया लज्जित हो विसंगति ! ! ७
अचेतनीं ही जर भव्यता वसे,—
न का वसो ही तर चेतनामधी ?
अभिन्नता दाविति भिन्नतेंत ते—
न का समानांतरिं ती दिसो कधी ? ८
तशीच जी हो रचनासुसंगति
कनिष्ठ योनींतरिं गौरवास्पद—
न ती "सजीवांतिल अुत्तमांतही"
दिसून यावी...! किति लांछनास्पद ! ! ९
अभंग त्यांची किति अेकवाक्यता
कितीहि ते क्षुद्र असोत गोलक !
अपूर्वशी भासत अेकरूपता
कितीहि ते सान दिसोत कीटक ! ! १०
लुटावयाला मधुला वनोवन
भ्रमे सगुंजारव मक्षिकागण;—
नि शोषुनियां मधु बिंदुबिंदुही
श्रमूनियां संतत आणिती गृहीं ११
जधीं गहूं माजुन पीक लोंबतें,
तधीं किती हर्षति पांखुरें मनीं !—
रचूनियां लांबच लांब माळका
सुसज्ज होती निजभक्ष्यशोधनीं. १२
थवे रचूनी जळिं मासळी वसे
परिस्पराना जरि भक्षि ती सदा !—
रचुनि टोळी बळि टोळधाड ये
जरी करी भक्षणिं नाश सर्वदा ! १३

---

* "जीवनयोग" या आगामी खंडकाव्याचा अन्ताचा भाग. वृत्त वंशस्थ.

विवेक याच्यामधिं ना दिसे कधीं,
न बुद्धिसंयोजन कार्यकारणीं;
खरेंच—! त्यांचें जड सृष्टिसंगरीं
समूळ अस्तित्वहि नष्ट हो क्षणीं ! १४
विवेक नाही— नहि बुद्धिचापल;
निसर्ग त्या मंदमतीस चालवी— !
—तरी व्यवस्था, रचना, सुसंगति—
किती तयांच्या लघुतेस शोभवी ! १५
विकासकार्यी नरयोनि राहिली
समग्रयोनींमधिं अुत्तमा—! —फुका ! !
बने कनिष्ठाहुनिही कनिष्ठ ती
भयाण संहारयुगात हिंसका ! ! ! १६
परस्पराना गिळता दिसून ये
न मत्स्यस्पर्धा जितुकी भयाणता—
मनुष्यस्पर्धा तितुकी प्रतीत हो
स्वक्षुधार्ता अतिघोर हिंस्रता ! ! १७
विनिर्मितातीं जितुका महानल
खगोल अन्योन्यशरीरघर्षणीं—
तयाहुनी लक्षगुणें भयंकर
मनुष्य निर्मी निजलाभशोषणीं ! १८
असंख्य योनीतुनि हिंडहिंडता
अपारपुण्यें धरि देह मानवी;
म्हणूनिया संतमहंत वानिती
किती नराची अनुरूप थोरवी ! १९
कुणी म्हणे होअुनि मच्छकच्छप
सजे नियन्ता हरि विश्वरक्षणीं—
तरीहि दावी निज भव्यता निकी
नरावतारें परिपूर्ण होअुनी ! २०
कुणी म्हणे हा प्रभुनेंच निर्मिला
निजस्वरूपावरुनीच अुज्ज्वल,
प्रतिक्षणीं जो स्मरवी स्मरोपम
जगत्प्रभूची स्फुरती प्रभावळ ! २१
असा नटे जो परमात्मसद्गुणे
महाविचारी मननीय मानव;
तयेंच ना जागविला जगामधे
महाविकारी दमनीय दानव ! ! २२
सबंध सृष्टीतिल संगरामधे
विवेकयोगें स्थिर होय मानवी;
तया विकासा दिधल्या सुबुद्धिचा
विनाशकार्यी विनियोग चालवी ! ! २३
सुबुद्धिशाली मनुजें स्वबुद्धिनें
विकासिली ही अभिरूप संस्कृति !—
विराट्स्वरूपी निजशास्त्र भौतिक
तयेंच नेलें परमोन्नतीप्रति ! २४
निसर्गशक्ती जरि चालवी सदा
तयावरी राज्य अनेकरीतिनीं,—
तरी नरें सृष्टिबलास लाविलें
मतिप्रभावें अुपयोगकारणीं ! २५
समुन्नती साधुन भौतिकी-अहा !-
चिदुन्नती साधिल काय जीवनीं,—
स्वतंत्र नी सुस्थिर बुद्धिजीवि हा
नरानरातील समत्व लक्षुनी ? २६
विवेकमार्गे व्यवहार जाणुनी
परस्पराशीं सहकार साधिता—
अपूर्वशी संस्कृति या जगामधे
नरप्रयत्नें स्थिर होय निश्चिता ! २७
वसुंधरापृष्ठिं विशाल वाढला
कबीरवृक्षापरि वंशवृक्ष जो—
हळूहळू हो विपलाग दुर्भग-
युगायुगाच्या परिवर्तनात तो ! २८
फिरून फांद्या लववील लाबशा ?—
पुन्हा मुळ्या हा अनिरुद्ध लोंबवी ?
अरे ! ! विकारी वणव्यात पोळला—
फुटेल का त्यास वसंतपालवी ? ? २९
जिच्यामुळें साधित भौतिकोन्नति,
जियेमुळें जिंकित तो परिस्थिति :—
तया निसर्गीय महान शक्तिने
स्व—'बुद्धिनें' शोधित—'युद्धसाधनें' ! ३०
न जीवनींचे अनुबंध लक्षिले,
न पाहिलें विश्व समग्र दृष्टिनें;
निरुंद संकोच करून, आपुले
विकासिलें जीवन अेकबाजुनें ! ! ३१
दुजें परी अंग विकासहीन तें
जगात संहारक होय भीषण;
सुरम्य संजीवनरत्न दावुनी
जहाल हालाहल डंखि नागिण ! ! ३२

जिच्या प्रभेनें दिपती विलोचन,
स्फुरे अशी मोहकशी तडिद्द्युति;-
न विस्मयांतून विमुक्त हो मन
असह्य तों भीषण घाव घालि ती ! ३३
सुधारसानें रसलें महाफल
मनुष्यमात्रास मिळेल भक्षणा,-
म्हणून संगोपित वृक्ष रक्षिला-
तयें धरावें विषवृक्षरूप ना ! ! ३४
महानुभावी सुविवेकि धीरधी
जगास दावी शुभ राष्ट्रकल्पना,-
जगांत मांडीत अकांत तीच हो
प्रमत्त मायाविनि साच पूतना ! ३५
स्वतंत्रता अन् समता नि बंधुता
जगीं अुभारी नव लोकसंस्कृति;-
नसे तियेचा अजि मागमूसही,-
न जानकी !-रावण मात्र मातती ! ! ३६
समग्र मानव्य धरून चिन्तनीं,
चराचरीं देखुन अेकरूपता,-
न जोंवरी आंतरराष्ट्र जीवनीं
सहिष्णुता, तोंवरि केंवि शांतता ? ? ३७
अखंड विश्वांत अशांति नाचते,-
जणूं नटे हे प्रलयार्थ भैरवी !-
प्रकोपवी सर्व चराचरातले
विकीर्ण संहारक तत्त्व ताण्डवीं ! ! ३८
भयाण संहारलयीस साधुनी
विनाशरंगीं भवकालि रंगली,-
परंतु ती होअिल शांत शेवटीं
मुलांचिया प्रेमरसेच माअुली ! ३९
अुफाळल्या विश्वसमुद्रमंथनीं
फिरे सुमेरू स्थिर कच्छपावर;
परंतु हालाहल फुंकि वासुकी-
पिअील तें कोण विरक्त शंकर ? ४०
समग्र अंगी निज जीवनातल्या
अुपायसंयोजन ना जरी करी,
न साधणे त्या नवनिर्मिती कधीं
समाजजीवीं नरजातिला तरी ! ४१
जगांत नांदेल समृद्धिशांतता
न शांतिचा केवळ मंत्र गाअुनी;-
न साधितां जीवनिंच्या समन्वया
कशी वसावी समतोलता जनीं ? ४२
जधीं 'अनासक्त' असंख्य शंकर
सुसिद्ध कंठीं विषदाह साहण्या-
तधीच हा जीवनयोग शक्य हो
करावया ध्येयसमान साधना ! ४३

ना. ग. जोशी

# कवींद्र रवींद्रनाथ



(लेखक— अ. ज. करंदीकर)

कवींद्र रवींद्रनाथाना गेल्या मे महिन्यांत ८० वर्षें पूर्ण झालीं, याकरिता सर्व सुबुद्ध भारतीयाप्रमाणे आम्हा महाराष्ट्रीयांनाहि अत्यंत आनंद वाटत आहे. हिंदुस्थान हा चमत्काराचा देश म्हणून प्रसिद्ध आहे. पण या चमत्कारपूर्ण देशातसुद्धा अिंग्रजी शिक्षणाने अश्रद्ध बनलेल्या मनाचाहि ज्याच्यावर विश्वास बसूं शकेल, असा चमत्कार अेकच आहे. हा अेकमेव चमत्कार म्हणजे रवींद्रनाथाची सर्वतोमुखी प्रतिभा होय. या प्रतिभेच्या पूर्ण विकासाला भारतभाग्यविधात्याने आजपर्यंत भरपूर अवसर दिला, याकरिता सर्वच भारतीय त्याचे शतशः ऋणी आहेत.

रवींद्रनाथांनी भारतीय संस्कृतीच्या अितक्या विविध क्षेत्रांतून अितकी विराट कामगिरी करून दाखविली आहे की ही सर्व कामगिरी अेकाच व्यक्तीच्या हातून घडली असेल कीं नाही, याविषयी सकृद्दर्शनीं कोणालाहि संशयच वाटावा. आपल्या अेकव्यक्तित्वाविषयी संशय प्रदर्शित करून स्वतः रवींद्रनाथांनीच दोन वर्षांपूर्वी अेका पत्रांत लिहिलें होतें, 'आमार मते पंचिश बछर अंतर मानुषेर जन्मांतर घटे. सेअी अनुसारे तार नाम बदल करले तार परिचयटा जटिल हय ना कतबार शुनेछि सोनार तरीर परे रवि ठाकूर आर कविता लेखेन नि. ता जदि हय ताहले घटा करे टाअूनहले सेअी रवि ठाकुरेर अेकटा श्राद्ध यथासमये करा अुचित छिल. तार परे क्षणिकार युगे तार नूतन जन्मदिनेर पर्याय सुरू करे तार पारिवारिक नामटा घूचिये अेकटा सार्वजनीन नाम दिले अितिहास विशुद्ध थाकत'. (२५ वर्षांनी मनुष्याला नवजन्म प्राप्त होतो, असें माझें मत आहे. त्या जन्मांतराच्या बरोबरच त्याचें नामांतर केलें तर त्याच्याविषयी लोकांना परस्परविरोधी कल्पना कराव्या लागणार नाहीत. मीं कितीदा तरी अेकलें आहे की 'सोनार तरी'च्या नंतर रवि टाकुरने कविताच लिहिली नाही. हें जर खरें असेल तर यापूर्वीच टॉअूनहॉलमध्ये अेक समारंभ करून त्या रवि ठाकुराचे योग्य वेळीं श्राद्ध अुरकायला पाहिजे होतें. त्यानंतर 'क्षणिका' काव्याच्या प्रकाशनापासून नवीन जन्मदिवस धरून या नव्या कवीला अेक नवें सार्वजनिक नांव द्यावयाला पाहिजे होतें. म्हणजे मग विशुद्ध वस्तुस्थिति लोकांना दिसली असती.) श्राद्ध करून नाव बदलण्याची कविवर्यांची कल्पना आपल्या धर्मशास्त्राशीं सुसंगतच आहे. मात्र हें श्राद्ध लोकांनी टॉअूनहॉलमध्ये करावयाचें नसून आपण स्वतःच संन्यास घेतांना करावयाचें असतें ही गोष्ट संन्यासाच्या शत्रुत्वामुळे त्यांच्या लक्ष्यांत आली नाही अितकेंच.

अेखाद्या व्यक्तीच्या मानसिक आणि सामाजिक जीवनांत अकस्मात् आमूल परिवर्तन घडून येणें, यालाच नवजन्म ही संज्ञा द्यावयाची असल्यास, असला नवजन्म रवींद्रनाथांच्या पूर्वीच्या पिढींतील वंगवाङ्मयाचे सम्राट् बंकिमचंद्र चट्टोपाध्याय आणि मायकेल मधुसूदन दत्त यांनाहि लाभला होता. विद्यार्जन करीत असतांना अिंग्रजी शिक्षणाच्या प्रभावाने पूर्णपणें पाश्चात्य भावापन्न झालेल्या त्यांच्या अंतःकरणामध्ये यौवनांत अेकाअेकीं क्रांति होअून त्यांना आपला देश आणि आपली संस्कृति यांच्याविषयी अुत्कट प्रेम वाटूं लागलें. या प्रेमाचा प्रभाव त्यांच्या वाङ्मयांत सर्वत्र आढळून येतो. परक्यांचें अनुकरण करण्याच्या अिच्छेच्या मागे अेक प्रकारची

विश्वबंधुत्वाची भावना वसत असते. या भावनेच्या विरुद्ध प्रतिक्रिया झाल्यावांचून आपल्या राष्ट्राच्या वैशिष्ट्याची जाणीवहि होत नाही आणि त्याचा अुत्कट अभिमानहि वाटत नाही. बंकिम किंवा मायकेल यांच्याप्रमाणे रवींद्रनाथाच्या अंतःकरणांत या विश्वबंधुत्वाच्या भावने-विरुद्ध कधीच प्रतिक्रिया झाली नाही. यामुळे त्या अुभयतांचें वाङ्मय आणि रवींद्रनाथांचें वाङ्मय यांच्यामध्ये आकाशपाताळाअितकें अंतर पडलें आहे. रवींद्रनाथांच्या अंतःकरणांत पूर्वगामी लेखकांच्या प्रमाणे प्रतिक्रिया न होण्याचें मुख्य कारण म्हणजे त्यांचा आत्मकेंद्रित स्वभाव होय. स्वतःच्या व्यक्तित्वाच्या आवर्तात गिरक्या खाण्याची सवय असणाऱ्यांना स्वपर-जनांपैकी कोणाचेंच अनुकरण करण्याची बुद्धि होत नाही. अितकेंच नव्हे तर स्वजन हे आपल्याला अधिक सन्निध असल्यामुळे त्यांचा प्रभाव आपल्या जीवनावर पडूं नये आणि त्यांचें अनुकरण आपल्या हातून चुकून सुद्धा घडूं नये, याविषयी असल्या व्यक्ति अतिशय सावध असतात. १९०५ सालीं वणव्याप्रमाणे पसरलेल्या वंगभंगाच्या चळवळींत रवींद्रनाथांच्या मनाची अशीच अवस्था झाली आणि त्यामुळे त्यांच्या मनांत राष्ट्रधर्माविषयी अगदी विपरीत कल्पना दृढमूल होअून बसल्या. म्हणजे व्यक्तित्वप्रधान रवींद्रनाथांच्या मनांत प्रौढपणीं जी महत्त्वाची क्रांति झाली, ती त्यांच्या पूर्वगामी लेखकांच्या अुलट दिशेने अर्थात् स्वदेशप्रेमाच्या विरुद्ध विश्वबंधु-त्वाच्या दिशेने झाली. रवींद्रपूर्व वंग साहित्यिक मुख्यतः त्यांच्या चारित्र्यविषयक कल्पना प्रकट करण्याकरिता लेखणी चालवीत असत. राममोहन राय, अीश्वरचंद्र विद्यासागर, बंकिमचंद्र चट्टोपाध्याय अित्यादि सर्व श्रेष्ठ लेखकांना समाजाच्या चारित्र्याला कांही विशिष्ट वळण देण्याची तळमळ लागलेली होती आणि त्यांचें सारें लेखन हें त्या हेतूने प्रेरित झालें होतें. यामुळे त्यांच्या वाङ्मयांत चारित्र्यविषयक प्रश्नांचा म्हणजे नीति आणि अनीति यांच्या अूहापोहांचा सर्वत्र पसारा आढळून येतो. याच्या अुलट रवींद्रवाङ्मयाची प्रेरणा ही त्यांच्या व्यक्तित्वप्रदर्शनापासून झालेली आहे. स्वतःच्या आवडीनिवडी, स्वतःच्या क्षणिक लहरी किंवा प्रकृतीच्या विविध परिवर्तनाचा आपल्या कविमनावर होणारा परिणाम हाच त्यांच्या वाङ्मयाचा विषय आणि विशेषहि होता. शैशवामध्ये शाळा आणि शिक्षक याना चुकवून प्रकृतीच्या सान्निध्यात, घरांतील अेका जीर्णोद्यानात कालक्रमणा करण्याची त्याना सवय लागली होती आणि पुढे यौवनांत आल्यावर अपरिचित रहस्यानी भरलेलें असें स्वतःचें मन आणि त्या मनाने निर्माण केलेली मनोहारिणी यांच्या चिंतनांत निमग्न होअून जाण्याची नवीन व्याधि जडली. कविरायांच्या लहरींचीं आणि त्यांच्या मानससुंदरीचीं, रवींद्रवाङ्मयाअितकीं हृदयंगम चित्रें अन्यत्र कोठेहि पाहायला मिळावयाचीं नाहीत.

आपल्या साहित्यरचनेसंबंधी स्वतः रवींद्रनाथांनीच अेके ठिकाणीं लिहिलें आहे 'अेक-दिन निश्चित स्थिर करे रेखेछिलेम सौंदर्यरचनाअी साहित्येर प्रधान काज.' सौंदर्यरचना हेंच साहित्याचें प्रधान कार्य, या सिद्धान्ताचा परिणाम असा होतो की समकालीन सौंदर्याची अभि-व्यक्ति ही भूतकालीन सौंदर्याच्या अभिव्यक्तीहून अधिक दुष्कर असल्याने, 'मणौ वज्रसमुत्कीर्णे सूत्रस्येवास्ति मे गतिः' असा विचार करून नवोदित कवि भूतकालीन सौंदर्याच्या आदर्शांच्या चिंतनांत निमग्न होतात. अशा रीतीने कविमन अेकदा भूतकालात रमूं लागलें म्हणजे विगत सौंदर्योपासकांविषयी त्या मनाला विलक्षण सहानुभूति वाटूं लागते; त्यांच्याप्रमाणेच सौंदर्याच्या अग्निशिखेंत स्वतःची आहुति टाकण्याचें भाग्य विधात्याने आपल्या ललाटीं लिहिलें असेल काय, या प्रश्नाचें उत्तर कळण्याची तळमळ मनाला लागून राहते. या प्राचीन सौंदर्योपासकांच्या जीव-नांच्या चिंतनांत मन गढून गेलें म्हणजे कवीला भास होअूं लागतो की मी चिरप्रवासी,

निद्रेच्या देशांत सुप्तसुंदरीच्या शोधार्थ भ्रमत आहें, याच देशांत आपली मानससुंदरी कोणा मांत्रिकाने मंत्रनिद्रेत निमग्न करून ठेविली आहे; वेताळाचे अनुचर तिला वेष्टून पहारा करीत आहेत, तिच्याकडे जावयाच्या मार्गावर मोहिनी टाकली आहे आणि हा दुर्गम पथ मी अंत-हीन आशा आणि अजेय निश्चय यांचें पाथेय घेऊन क्रमीत आहें. या तंद्रींतून तो कांही काळ भानावर आला तरी त्याच्या मनस्थितींत कांही मोठेंसें परिवर्तन होत नाही. कारण कवीचें प्रथमयौवन हें त्याच्या जीवनांतील ऋतुसंहाराचें युग असतें. यौवनाच्या प्रारंभीं जेव्हा रंग आणि गंध, सौंदर्य आणि संगीत यांचें मायाजाल मनावर पसरलेलें असतें आणि प्रत्येक ऋतूंतील विशिष्ट सृष्टिसौंदर्यसुरेच्या सेवनाने प्रणयसंशयाची निवृत्ति करून घ्यावी आणि प्रियेच्या चरणांशीं समागमसुखाची याचना करावी, अशी मनाची प्रवृत्ति असते, तें हें युग. पण या प्रणयोन्मुख युगांत युवककवीचें मन 'क्षणक्षण विलक्षणं' अशा अवस्थेत असल्याने किंवा त्याच्या दुर्ज्ञेय हृदयारण्यामध्यें दुःसाहसी व्यक्तींच्या आगमननिर्गमनाने अद्यापि पाऊलवाटा पडलेल्या नसल्याने त्याला अन्य कोणाचाहि यथार्थ परिचय होऊं शकत नाही. आणि त्यामुळे षड्ऋतूंच्या विचित्र वैभवामध्ये, अखिल वसुंधरेच्या आनंदोत्सवामध्ये आपण एकाकी आहोंत, याची त्याला प्रतिक्षणीं जाणीव व्हावयाला लागते. कळीमधे कोंडलेला विरही सुगंध जसा मलया-निलाच्या भेटीकरिता आतुर होऊन आपल्या बंदिशालेच्या अल्प परिसरांत भ्रमत असतो, त्याच-प्रमाणे कवीच्या अंतःकरणांत कोंडलेल्या अव्यक्त भावना आणि अमूर्त कल्पना आपल्या कामनामूर्तीला शोधीत हृदयारण्यांत भ्रमूं लागतात. म्हणजे सौंदर्योपासक कवि प्रथमयौवनांत असतांना भूतकाळांत भ्रमत असला अथवा वर्तमानकाळांत भ्रमत असला तरी आपल्या मानससुंदरीचा साक्षात्कार करून घेणें हाच त्याच्या मनोजगतांतील भ्रमणाचा हेतु असतो. स्वतः रवींद्रनाथांनीहि विमलेच्या विश्वासघाताने विदीर्णहृदय झालेल्या निखिलेशाच्या मुखाने म्हटलें आहे, 'कालिदासेर ऋतुसंहार काव्येर अुपर बराबर आमार अेकटा घृणा आछे. पृथिवीर समस्त फूलेर साजि, समस्त फलेर डालि केवल मात्र प्रेयसीर पायेर काछे पडे पंचशरेर पूजार अुपचार जोगाच्छे; जगतेर आनंदलीलाके अेमन करे क्षुण्ण करते मानूप पारे कि ! अे कोन मदेर नेशाय कविर चोख दूले पडछे ? आमि जे मद अेतादिन पान कराछिलूम, तार रंग एत लाल नय, किंतु तार नेशा त अेमनअी तीव्र.' (कालिदासाच्या ऋतुसंहारकाव्याचा मला पूर्वीपासूनच तिटकारा वाटत आला आहे. पृथ्वीवरील सारीं फुलें आणि सारीं फळें प्रेयसीच्या पायाशीं अेकत्रित होऊन केवळ कामदेवाच्या पूजेची सामग्री बनत आहेत ! पृथ्वीवरील सर्व आनंदलीला अितकी वैचित्र्यशून्य करून संतुष्ट राहणें मनुष्याला शक्य तरी आहे का ? त्या वेळीं कुठल्या मदिरेच्या सेवनाची धुंदी कवीच्या डोळ्यांवर चढली होती ? मी ज्या मदिरेचें सेवन अितके दिवस करीत होतों, तिचा रंग अितका लाल नसेल; पण तिची मादकता अितकीच तीव्र होती.) रवींद्रनाथांचे हे अुद्गार किती सार्थ आहेत, हें त्यांच्या अुर्वशी या अनुपम कवितेंतील पुढील ओळींवरून स्पष्ट दिसून येअील.

जगतेर अश्रुधारे धौत तव तनूर तनिमा,
त्रिलोकेर हृदिरक्ते आंका तव चरणशोणिमा,
मुक्तवेणी विवसने, विकशित विश्ववासनार
अरविंदमाझखाने पादपद्म रेखेछ तोमार
अति लघुभार.
अखिल मानसस्वर्गे अनंत रांगिणी,
हे स्वप्न संगिनि.

जगताच्या अश्रुधारांनी तिची तनुलता सुस्नात झाली आहे, त्रिलोकांच्या हृदयरक्ताने तिच्या चरणांना रक्तिम आभा दिली आहे, विकसित विश्ववासनेच्या अरविंदाच्या गाभ्यांत तिने आपलीं अति लघुभार चरणकमले ठेविलीं आहेत आणि अखिल मानसस्वर्गात ती अनंत क्रीडा करीत आहे, हें सारे वर्णन स्वतः उर्वशीपेक्षाहि रवींद्रनाथाच्या कवितेलाच अधिक लाग पडतें, असें प्रत्येक मर्मज्ञ वाचकाला वाटल्यावाचून राहणार नाही.

भूतकालीन सौंदर्याच्या चिंतनात निमग्न होण्याची रवींद्रनाथांची वृत्ति, क्षुधित पाषाण या त्याच्या कथेमध्येहि प्रकट झाली आहे. अुर्वशीप्रमाणेच या विख्यात कथेचा विषयहि अवास्तव आणि अलौकिक मानससुंदरीचा साक्षात्कार हाच आहे. मात्र अेखाद्या स्त्रीवर आपण आसक्त होणें आणि अेखाद्या स्त्रीने आपल्यावर आसक्त होणे, या दोन अवस्थांमध्ये जो प्रभेद असतो, तोच प्रभेद अुर्वशी आणि क्षुधित पाषाण या दोन कविकृतींमध्यें दिसून येतो. स्वतः रवींद्रनाथाच्याच भाषेत बोलायचे म्हणजे अुर्वशीमध्ये मधुमत्त भृंगसम मुग्ध कवि लुब्ध चित्ताने अुद्दाम संगीत गात त्या भुवनमोहिनीच्या भोवतीं भ्रमत आहे, तर क्षुधित पाषाणांतील त्या अवास्तव, अलौकिक आणि अनाभिक अंतःपुरवासिनी आपल्या प्रभावकक्षेंत आलेल्या अेका सामान्य कारकुनाला अगतिक करून अुन्मादावस्थेच्या प्रलयलोकाकडे नेत आहेत. अुर्वशी ही सर्वस्वीं काल्पनिक असल्याने तिचा प्रभाव कोणत्याहि अेका विशिष्ट स्थानाशी निगडित झालेला नाही. पण क्षुधित पाषाणातील अंतःपुरवासिनींचा प्रभाव त्याच्या इहलोकातील लीलाभूमीशीं निगडित झालेला आहे. असल्या स्मृतिसंकुल स्थळाचा भूतकालीन सौंदर्याच्या चिंतनात निमग्न झालेल्या व्यक्तींच्या मनावर किती प्रभाव होतो, याची या कथेवरून सामान्य जनाना किंचित् कल्पना येअील. कवींनी वर्णिलेल्या, सम्राटांनी शोभविलेल्या आणि प्रकृतिदेवीने आपले विहारक्षेत्र बनविलेल्या स्मृतिसंकुल स्थळाचे ध्वंसावशिष्ट स्वरूप पाहून अेकाच क्षणीं मन भारले जाते आणि हृदय कंपित होते. मानवी आकांक्षांच्या लीलाभूमीचे दर्शन घेण्याच्या अपेक्षेने आपण जातों, पण त्या विगत युगाच्या स्मशानातून शक्य तितक्या लौकर सुटून जाण्याविषयी आपल्याला अुत्कंठा वाटूं लागते. पण या अकरुण पुराण अवशेषांच्या आकर्षणातून सुटून जाण्याचें सामर्थ्य विगत सौंदर्यग्रस्त व्यक्तींच्या मनात नसतें. हे विगत जीवनाचे अवशेष अेकाच क्षणीं मनाला मोहतात आणि हृदयाचे विदारण करतात. कल्पनाप्रवण मानवाला आपला दास बनवितात आणि त्याचें जीवन शोषून घेतात. असल्या स्थळाना अलौकिकपणा मिळवून देण्याकरिता, स्वर्गाशी स्पर्धा करूं अिच्छिणाऱ्या मानी जनांनी जीवन आणि यौवन, धन आणि मान सर्व काही अर्पण केलेले असतें. तरी त्या सर्वांचा ग्रास करून हीं पुन्हा बुभुक्षितच. याच्याकरिता सर्वस्व समर्पण केलेल्याच्या अंतरवेदना मात्र या ठिकाणीं चिरंतन होअून राहिलेल्या असतात. पूर्वी जिथे पाअूल टाकताक्षणीं मानवाला प्रेमस्वप्नें दिसूं लागावीं, तिथे आता त्या स्वप्नाच्या कृष्णछाया मात्र पसरलेल्या असतात आणि निराशप्रेमाच्या युगांतराच्या वेदना सर्वत्र संचार करीत असतात. हा सर्व अनुभव प्रथम अहमदाबादच्या शाहीबागेत नित्य निद्राहीन रात्री कंठीत असताना रवींद्रनाथाना आला होता आणि तोच त्यानी अति निपुणपणाने क्षुधित पाषाणात ग्रथित केला आहे.

अुर्वशी आणि क्षुधित पाषाण याच्यासारख्या रवींद्रनाथाच्या अतिप्रसिद्ध कृतींच्या समालोचनेवरून हे स्पष्ट दिसून येते की या कृति विस्मयजनक असल्या तरी विकृतिप्रसूतहि आहेत वर्तमानकाळाची अवज्ञा करून भूतकाळातील अेखाद्या विशिष्ट प्रसंगाच्या स्मृतीत नित्य निमग्न होअून राहणें हेंच आपले जीवनसर्वस्व मानणारा मनुष्य वेडा या संज्ञेला पुरता पात्र बनला नाही तरी फॉसिल या संज्ञेला सर्वस्वी पात्र होतो. स्मृति आणि सृष्टि

यांच्यामध्ये नित्याचाच विरोध आहे. दुष्यंतचिंतनांत निमग्न झालेली शकुंतला दुर्वासाच्या हाकेला उत्तर देण्याला असमर्थ झाली, त्याप्रमाणेच अेखाद्या स्मृतींत निमग्न झाल्याने फॉसिल बनलेला मानव सद्यःस्थितीच्या हाकेला उत्तर देण्याला, आपलीं वर्तमानकाळचीं कर्तव्यें पार पाडण्याला असमर्थ होतो. स्वतः फॉसिल बनलेला मानव आपल्याप्रमाणेच या अक्षययौवना पृथ्वीला वृद्धा आणि वंध्या बनवीत असतो. 'नवे तस्मिन्महीपाले सर्वं नवमिवाभवत्' या कालिदासोक्तिप्रमाणे आपल्या हृदयाच्या नाविन्याने अखिल महीला नवीनपणा मिळवून देणें, हें सर्वच राष्ट्रधुरीणाचें कर्तव्य असते. पण कल्पनेच्या ठिकाणीं आत्मसमर्पण करणाऱ्यांना हे कर्तव्य पार पाडणें अशक्य असतें. कारण कल्पना ही नेहमीच वर्तमानकाळ विसरून भूत किंवा भविष्यकाळांत रमत असते. आपल्या कल्पनेचा हा दोष स्वतः रवींद्रनाथानाहि चागला माहीत होता. अुर्वशीच्या पूर्वीच लिहिलेल्या 'अेबार फिराओ मोरे' या कवितेंत ते म्हणतात—

एबार फिराओ मोरे, लये जाओ संसारेर तीरे
हे कल्पने, रंगमयि, भूलायो ना मोहिनी मायाय
विजन विषादघन अंतरेर निकुंजच्छायाय
रेखो ना बसाये.

पण ही प्रार्थना बलाका या कवितासंग्रहाच्या रचनेपर्यंत सफळ झाली नव्हती. बलाकेच्या रचनाकाळी रवींद्रनाथाच्या सौंदर्यविषयक कल्पनेत आमूल परिवर्तन घडून आलें होते. साहित्येर स्वरूप या प्रबंधात त्यानी स्वतःच लिहिलें आहे. 'बोलछिलूम, सुंदर आनंद देय, ताइ साहित्ये सुंदरके निये कारबार. वस्तुत बोला चाइ, जा आनंद देय ताकेइ मन सुंदर बोले आर सेटाइ साहित्येर सामग्री. साहित्य कि दिये अेइ सौंदर्येर बोधके जागाय से कथा गौण, निबिड बोधेर द्वाराअी प्रमाण हय सुंदरेर. ताके सुंदर बोलि वा ना बोलि ताते किछू आसे जाय ना.' सुंदरापासून आनंदलाभ होतो, याकरिता सुंदर हाच साहित्याचा विषय; या मताच्या जागीं, ज्यापासून आनंदाचा लाभ होतो तें सुंदर आणि तें सुंदरच साहित्याचा विषय, मग त्याला जगात सुंदर म्हणोत किंवा न म्हणोत या मताची प्राणप्रतिष्ठा झाल्याने रवींद्रनाथांचें मन हें भूतकालीन सौंदर्याच्या आदर्शाच्या दास्यापासून मुक्त झालें होतें. याच वेळीं बेर्गसोनच्या तत्त्वज्ञानाचा परिचय झाल्याने त्याच्या जीवनविषयक कल्पनाहि वस्तुस्थितीशीं अविसंवादी अशा बनूं लागल्या होत्या. या विधानाच्या सत्यतेविषयी वाचकाना संशय येअूं नये, याकरिता कलकत्याचे अेक प्रसिद्ध तत्त्वज्ञानी डॉ. सुरेंद्रनाथ दासगुप्त यांनी बलाका काव्यावर लिहिलेल्या प्रबंधातील कांहीं वाक्ये अुतरून घेतो. बलाकेंतील 'हे विराट नदी' या कवितेविषयी लिहितांना डॉ. दासगुप्त लिहितात, 'अेअी कविताटि पढिले देखा जाय जे सृजनीशक्ति अेअी जगत् रचना करियाछे ताहा अेकटि प्राणस्रोत, अेकटि प्राणवेग मात्र, a vital impulse जे शक्तिर निजेर कोन रूप नाअी वस्तु नाअी अथ च ताहा हअीते निरंतर रूप ओ वस्तु फूटिया अुठितेछे ।' याचा अर्थ असाच होतो की बेर्गसोनच्या तत्त्वज्ञानाचा परिचय झाल्यानंतर त्याच्या प्राणप्रवाहाच्या तत्त्वाचे वर्णन करण्याकरिता रवींद्रनाथानी ही विराट नदीवरील कविता लिहिली आहे. असो. या तत्त्वज्ञानाचा परिचय झाल्यानंतर रवींद्रनाथांना स्मृति आणि सृष्टि यांचा विरोध कळून आला. त्यामुळे, माझ्या मतें या काव्यसंग्रहांतील अत्यंत सुंदर कविता जी भारत-अीश्वर शाजहान, त्या कवितेंत स्मृतीचे अवास्तव स्तोम माजविण्याच्या विकृतीचा रवींद्रनाथांनी स्पष्ट निषेध केला आहे.

मिथ्या कथा,— के बोले जे भोलो नाइ ?
के बोले रे खोलो नाइ

स्मृतिर पिंजरद्वार ?
अतीतेर चिर-अस्त-अंधकार
आजिओ हृदय तव रेखेचे बाधिया ?
विस्मृतिर मुक्तिपथ दिया
आजि ओ से हय नि बाहिर ?

'जेते नाहि दिबो' ही कविता लिहिणाऱ्या कवीच्या मुखातूनच वरील उद्गार निघालेले पाहिले की नवीन कल्पना आत्मसात् करण्याच्या त्याच्या शक्तीचे नवल वाटल्यावाचून राहत नाही.

बेर्गसोनच्या प्रभावाने रवींद्रसाहित्यातील अेका विकृतीचा निरास झाला असला तरी तिच्या जागीं दुसऱ्या अेका विकृतीची स्थापना केली आहे. ती म्हणजे रूप आणि भाव या साहित्यांतील सनातन तत्त्वाना पदच्युत करण्याचा प्राणतत्त्वाचा प्रयत्न होय. प्राण या तत्त्वाचा वाङ्मयात संचार सुरू झाला म्हणजे कवीची रचनारीति आणि विषयाची निवड या दोहोंतहि अकस्मात् परिवर्तन होतें. अभिजात भाषेत अभिजात विषयावर काव्य लिहावयाचें, हा अजरामर आदर्श सोडून देअून क्षणिक भाषेंत आणि क्षणिक विषयावर कवि काव्यें लिहूं लागतो. मग, आपली कविता ही अेखाद्या अेकांतवासी रसिकाच्या सिगारेटची सहचरी झाली तरी तिचें जीवन सफळ झालें, असे मानण्याकडे स्वतः कवीचीहि प्रवृत्ति होऊं लागते. ज्या क्षणिका काव्याच्या प्रकाशनापासून आपला नवजन्म मोजावा, असे रवींद्रनाथ सांगतात, त्या काव्याचा स्वाद आणि विस्वाद ग्रहण करण्याची वाचकांना विनंति करिताना त्यानी स्वतःच लिहिलें आहे-

आशा करि निदेन पक्षे
छटा मास कि अेक बछरअी.
हबे तोमार विजनवासे
सिगारेटेर सहचरी.

असली सिगारेटशी स्पर्धा करूं इच्छिणारी कविता ही मुख्यतः गंभीर विषयाचे विडंबन करणारी कविताच असते. कारण,

गभीर सूरे गभीर कथा
शुनिये दिते तोरे
साहस नाहि पाई.

गंभीर कथा बोलण्याचें साहस होत नाही तर बोलायच्या कोणच्या कथा, याचा खुलासा करताता कवीने म्हटलें आहे,

पश्चाते जारा फिरे ना ताकाय,
नेचे छूटे धाय, कथा ना शुधाय,
ताहादेरि गान गारे आजि प्राण,
क्षणिक दिनेर आलोके.

जे मागेपुढे कधी पाहत नाहीत, धावण्यात आणि नाचण्यात नेहमी दंग असतात, कुणाला कधी प्रश्न करीत नाहीत, असल्या तुच्छ प्राण्यांचीं गाणीं रचण्याची आज्ञा रवींद्रनाथानी आपल्या प्राणाला का दिली, या प्रश्नाचा आता अुलगडा केला पाहिजे. रवींद्रनाथाची समजून अशी आहे की मनुष्याचे शरीर म्हणजे अेक अविभक्त कुटुंब आहे. या कुटुंबात प्राण तेवढा मिळविणारा, कर्ता आणि भिन्न भिन्न मनोवृत्ति ही प्राणाच्या आश्रयाने आपली जीवनयात्रा चालविणारी मंडळी; या मनोवृत्तींपैकी अेकेक मनोवृत्ति किती काळ झोंप घेअील, त्याचा सुमार नाही आणि अेकदा जागृत झाल्यावर तिच्या सर्वनाशी क्षुधेला कुणाचा बळी पडेल, त्याचा नेम नाही. प्राणधारणे-

च्या क्षणिक क्रीडेंत मनाला गुंतविलें तरच या मनोवृत्तींच्या कुंभकर्णी क्षुधेपासून आपला बचाव होण्याचा संभव आहे, असें प्राणभीरू जनाना वाटत असते मात्र ही गोष्ट ते प्रामाणिकपणाने कधीच बोलून दाखवीत नाहीत. अुलट असा आव आणतात की अेखादी कोमल भावना अनुरूप शब्दात ग्रथित करण्याने आपल्या पौरुषाला बट्टा लागतो. डॉन या इंग्लिश कवीने म्हटलेंच आहे,

I am two fooles, I know
For loving and for saying so
In whining Poetry.

रम्योदात्त भावनांचें आणि भाषेचें विडंबन करण्याची मनाला अेकदा चटक लागली म्हणजे 'आत्मानं सततं रक्षेद्दारैरपि धनैरपि' हें लक्ष्मीधराचें तत्त्व त्या लेखकाला रुचायला लागतें. ही कोणाची कुचेष्टा नव्हे. मेटर्लिंकसारख्या विख्यात लेखकाने गंभीरपणाने लिहिले आहे, 'To me there can be no moral or physical evil that is not preferable to death, cold and horrible death with its eternal silence. Believe me, nothing can equal the saving of life. Virtues, ideals, all that we know as honour and loyalty,' are mere trifles compared with that.' आम्हा भारतीय जनाना अभिमान वाटण्याजोगी गोष्ट ही आहे की प्राणतत्त्वाच्या या अंतिम विकृतीचा रवींद्रनाथाच्या मनावर काहीहि परिणाम झाला नाही. मात्र आपले प्राण वाचविण्याच्या विपरीत दिशेची विकृति जी प्राणार्पणाची सिद्धता, तिची बाधा त्याना बरीच झालेली दिसते. आत्मबलिदान हाच जगातील सर्व अन्यायाचा प्रतिकार करण्याचा अेकमात्र अुपाय, अशी रवींद्रनाथाचीहि समजूत झालेली दिसते. बलाकेमध्ये अेके ठिकाणी त्यानी लिहिलें आहे, 'तोर चेये आमि सत्य ए विश्वासे प्राण दिब देख।' अन्यायाचा प्रतिकार करण्याअैवजी आपण स्वतःच अन्यायाना बळी पडण्याने, आपण स्वतःचें अुत्तरदायित्व अितरावर लोटून देण्याचे पाप करीत असतो, हे या बलिदानवाल्याच्या मेंदूंत कधी शिरेल कोण जाणे.

अत्याचाऱ्याचा प्रतिकार करण्याचें कर्तव्य कोणीना कोणी तरी आपल्या शिरावर घेणें आवश्यक असते, याची अितर बंगाली कवींना चांगली जाणीव आहे. याकरिताच काजी नजरुल अिस्लाम यानी घोषणा केली आहे,

आमि सेअि दिन हब्रो शान्त,
जबे अुत्पीडितेर क्रंदनरोल आकाशे बातासे ध्वनिबे ना,
अत्याचारीर खड्ग कृपाण भीम रणभूमे रणिबे ना.

दुसऱ्याहि एका बंगाली कवीने लिहिले आहे,

हाय से कि सुख एअि गृह छाडि,
अत्याचारीर वक्षे बसिया हानिते तीक्ष्ण छूरि.

असो. राजकारण हा प्राण देण्याघेण्याचा खेळ आहे, हे चिरंतन सत्य न कळल्याने किंवा न वळल्याने रवींद्रनाथाच्या राजकारणविषयक कादंबऱ्या आणि नाटके अजबखान्यात ठेवण्याच्याच लायकीची बनली आहेत. पण त्याची अधिक चिकित्सा करण्याची आता आवश्यकताहि अुरलेली नाही. कारण घरे बाअिरे किंवा चार अध्याय या कादंबऱ्यातून रवींद्रनाथानी केलेल्या प्रचाराला, पथेर दाबी ही विख्यात कादंबरी लिहून शरच्चंद्रानी तितकेच कलात्मक अुत्तर दिलें आहे. तेव्हा पर्यायाने पथेर दाबीच्या रचनेला कारणीभूत झाल्याबद्दल रवींद्रनाथांना दोष देण्याची कल्पना शरच्चंद्राच्या अभिमान्याना रुचणे शक्य नाही.

# महाराष्ट्रांतील जानपद ओवी



## ( लेखांक २ रा )

( लेखिका– **कु. अनसूया भागवत** )

पुराणविषयक जानपदओव्यांपैकी रामायण व महाभारत या दोन महाकाव्यांतील कथाप्रसंगावर रचल्या गेलेल्या काही ओव्या मागे दिल्या. त्यानंतर अितर अठरा पुराणे व अुपपुराणे यामधील व्यक्ति व प्रसंग यावर रचल्या गेलेल्या ओव्यांचा विचार या ठिकाणीं करीत आहें. यामधेहि आपल्याला हें लक्षात ठेवले पाहिजे की पुराणे व अुपपुराणे यामधून वर्णिलेले अनेक कथाप्रसंग आधारभूत घेअून त्यावर स्वतःच्या कल्पनांनी रचलेल्या अनेक दंतकथा सामान्य जनतेत प्रचलित आहेत.

सर्व पुराणें व अुपपुराणें यांचे त्यांच्या विषयानुरूप मुख्यत्वेंकरून दोन भाग पाडलेले आपल्याला दिसतात. अेक शैवपुराणें व दुसरा विष्णुपुराणें. शैवपुराणात शिव व पार्वती हीं मध्यवर्ती पात्रे असून त्यांच्या स्तुतिप्रीत्यर्थ ही पुराणे रचलेलीं आहेत. विष्णुपुराणात विष्णूचे अनेक अवतार हा विषय प्रामुख्याने असून विष्णु किंवा त्याचा लोकप्रिय अवतार कृष्ण व रुक्मिणी यांची महति गायलेली आहे. पुष्कळदा अेकच पुराण शिव व विष्णु दोघांच्याहि स्तुतीला वाहिलेले आढळतें. पुराणविषयक ओव्यामध्येहि ब्रह्मपुराण, वायुपुराण, स्कंदपुराण किंवा अितर अुपपुराणातून वर्णन केलेल्या शिवपार्वतीच्या लोकप्रिय कथा व पद्मपुराण, भागवतपुराण वगैरेतून मिळणाऱ्या विष्णूचा प्रमुख अवतार कृष्ण याच्या मनोरंजक कथा यांचे अुल्लेख प्रामुख्याने आढळतात. या बाबतींतहि तात्त्वज्ञानिक किंवा बोधप्रद असा कथाभाग सर्वस्वीं वर्ज्य करून मनोरंजक असा भाग तेवढा अुचललेला दिसतो व त्यावर मानवी कल्पनाची कुंचली कुशलतेने फिरलेली असल्याने पुष्कळशा ओव्या सहजसुंदर व मनोरंजक वाटतात.

**शिवपार्वती**– शिवपार्वतीचा कैलासपर्वतावरील सारीपटाचा खेळ व त्या वेळीं घडलेला प्रसंग हा कथाभाग अत्यंत लोकप्रिय झालेला दिसतो. शिवपार्वती सारीपट खेळत असता नारदमुनि येअून त्यांच्यामधे कळ लावून जातो, नंतर प्रत्येक डाव पार्वतीच जिंकते व शंकराचे सर्वस्व हिरावून घेते, शंकर रागावून अरण्यात निघून जातो व नंतर पार्वती भिल्लीणीच्या रूपाने जाअून त्याला मोहिनी घालते अशी ही कथा आहे. यावर बऱ्याच ओव्या रचलेल्या मिळतातः–

१७

शंभूच्या शिखरावरी गिरजा खेळती सारंगफासे[1]।
देवावरी आला डाव गिरिजा मनामधीं हासे[2] ॥

१८

सोंगट्याचा डाव आलाया अेकामेकीं ।
गिरजानार पकी शंभुदेवाच डोळ झाकी ॥

---

१ सारिपट किंवा सारंगपट : पटावर सोंगट्यांफाशांनी खेळावयाचा खेळ.

२ किंवाः— शंभुच्या शिखरावर गिरजा खेळे आकीबिकी । (एकी का बेकी ?)
देवावरी आला डाव गिरजानार किती पकी ॥

९९

कळीचा नारद कळ लावती दावून ।
रुसला शंभुदेव गेला वनात अुठून ॥

१००

भिल्लणीची फटी[1] चोळी घातली अुलटी ।
शंभुदेवासाठी गिरजा डोंगर पालटी ॥

१०१

रुसला शंभुदेव डोंगरीं घाली-धुनी ।
गिरिजानार बोल तुमाविगर नाहीं कुणी[2] ॥

१०२

रुसला शंभुदेव डोंगरीं घाली तप ।
समजावी गिरजानार त्याला भिल्लणीच्या रूप ।

शंकराचा भोळेपणा प्रसिद्धच आहे. खालील ओव्यातून त्याचा अुल्लेख दिसतो. परंतु शंकर वर वर कितीहि भोळा असला तरी गंगामाअीला आपल्या जटात गुप्तरूपाने ठेवण्याचे कसब त्याच्या अंगात आहे ही कल्पना मजेदार आहे. मात्र शंकराने आवडत्या गंगेला आपल्या जटात जागा दिलेली पार्वतीला खपत नाही.

१०३

शंभुदेव बोल अुभी राहिली भिल्लणी ।
केसाच्या झुंबड्यानं दिस माझ्या गिरजावाणी[3]॥

१०४

भोळ्या शंभुदेवा भोळपण कोठवरी ?
पाठीची मंदुदरी[4] दिली रावणाच्या घरीं ॥

१०५

भोळा शंकर याला भोळा म्हणूं नाहीं ।
याच्या जटामधीं गुपित गंगाबाई ॥

१०६

भाडल्या सवती सवती शंभुदेव तो बोलना ।
सागती जनलोक गंगा गिरजेला तोलना ॥

खालीलप्रमाणे काही ओव्या शंकरपार्वतीच्या संसारावर अुभारलेल्या दिसतातः—

१०७

शंभुदेव वाणी गिरजानार गवळ्याची ।
सर्व्या लेण्यावरी माळ ल्येली पवळ्याची ॥

१०८

शंभु शंभु म्हणूं शंभु बेलाच्या खोरीला[5] ।
सरता सोमवार त्याच्या गिरजा नारीला[6] ॥

१०९

शंभुदेव बोल गिरजा अवखळ तुझी नीज ।
केसाच्या झुंबड्यानं शिणली माझी डावी भुज[7] ॥

११०

शंभुदेव ते म्हातार गिरजानार कर्णकोर[8] ।
दोघाचं अिमान बेलाच्या पानावर ॥

**कृष्ण**—शिवपार्वतीच्या कथेपेक्षाही पुराणातील विष्णूचा आठवा अवतार कृष्ण याचें चरित्र अत्यंत लोकप्रिय झालेलें आहे. महाभारतातील कृष्णाची तात्त्विक भूमिका किंवा रणा-

१ फटी चोळी = जुनी किंवा फाटकी चोळी. २ किंवा दुसरा ओळ : "गिरजानारीला पुसतो वनाची सुध तुला सांगितली कुणी ?"

३ किंवाः— "बोल सदाशिव भिल्लणी उगी बस ।
तुझा अबाडी बुचडा माझ्या गिरजावाणी दिस ॥

४ मंदोदरी ही शंकराची बहीण असल्याचा अुलेख कुठेच आढळत नाही. ५ खोड=खोगिराची चौकट. ६ भोळा सोमवाराच्या व्रताची जी कहाणी प्रचलित आहे तिला उद्देशून ही ओवी असावी. प्रथम पार्वतीच्या शापापासून मुक्त होण्याकरता अेका गुरवाने हें व्रत केलें पण पुढे त्याच्यापासून शिकून आपला रागावून गेलेला मुलगा कार्तिकस्वामी परत मिळवण्याकरता पार्वतीने तेंच व्रत केलें. ७ "झोपी जाऊं इच्छिणाऱ्या नायकाने स्त्रीच्या उजव्या बाजूला डाव्या अंगावर निजावें हा प्रकार सार्वत्रिक आहे" (श्रीवात्स्यायनमुनिप्रणीत काममूत्रम् । प्रथम भाग, अध्याय ६ – भाषा०- बाळाचार्य माधवाचार्य खुपेरकर, पृ.२००). ८ कर्णकोर = कर न कर्या; कर म्हणून सांगितलेलें, न करतां, नको करूं म्हणून सांगितलेलें मुद्दाम करणारा. (म० श० को०) = तरुण (?)

गणावर त्याने दाखविलेलें शौर्य याचा अुल्लेख ओवींत कुठेहि आढळत नाही. पुढील पुराणें व अुपपुराणें यातून वर्णन केलेल्या त्याच्या मनोरंजक लीला हाच कथाभाग सामान्य जनतेत सर्वतोमुखीं झालेला आपल्याला आढळतो. यावरच अनेक ओव्या रचल्या गेलेल्या आहेत.

कृष्णजन्माच्या वेळीं गोकुळात झालेला आनंद व कृष्णाचा काळा रंग यांवर खालील ओव्या आहेत—

१११

पाटच्या पाऱ्यात[1] पिंगळा बोली बात ।
जल्मिला कृष्णनाथ तेव्हा कितीक होती रातं[2] ॥

११२

जल्मिला कृष्णनाथ झाला गोकुळीं आनंद ।
मुठीनं साखर वाटितो राजा नंद ॥

११३

जल्मिला कृष्णनाथ गोकुळीं दिवा लावा ।
सावळं त्याचं रूप त्याच्या मावशीला[3] दावा ॥

११४

यस्वदेबाई हरी तुझा कुणावाणी ?
सावळं याचं रूप जवसेच्या फुलावाणी ॥

११५

काळा कृष्णनाथ जसा अुडदाचा दाणा ।
देवयाबाईनं[4] धाडीला वानवळा[5] ॥

११६

वेडी येसवदा हाका मारिती ज्याला त्याला ।
काय गोता झाला गोविंदा गोपाळाला ?

गोकुळांतील कृष्णाच्या बाललीला, लहान वयात त्याने करून दाखविलेलें कालियामर्दन वगैरेसारखे अद्‍भूत चमत्कार, सुदामासारख्या गरीब मित्राच्या बाबतींत त्याने दाखविलेले औदार्य व कंसवध करण्यांत लढविलेले शौर्य अित्यादि प्रसंगाचा अुल्लेख खालील ओव्यात आढळतो—

११७

वेडी येसवदा वेड लागलं गोटीचं[6] ।
यमुनेच्या तीरीं बाळ बुडालं टोपीचं ॥

११८

कृष्ण बुडाला झाली गोकुळीं आरोळी ।
भुजंगाला टोचुनी येमण वर वाजवीतो टाळी ॥

११९

शेपावर बसून कृष्ण वाजव बासरी ।
कंबळजा[7] बोल पाया पडतं तुझ्या हरी ।
तुझ्या देवकीमातेला घेअूं दिवाळीची चोळी ॥

१२०

गटोरे चुडाचुड करीन मामाच्या गेला ।
कमलजा भरी चुडा कृष्ण नोवरी झाला ॥

१२१

यशेवन[8] चुडा मामी भरीतों तुम्हाला ॥
माझा राम राम सांगा कुंवसमामाला ॥

१२२

मारिला कंसमामा शिळाऱ्या केल्या धजा[9] ।
बोल कंबळजा भाचा नव्हं वैरी माझा ॥

१२३

येवढं दुबळंपण आलं सुदामदेवाला ।
बाधी पदरात लाह्या जातो श्रीकृष्णाच्या गांवाला ॥

१२४

सुदामदेवाची गरिबी कोणीं नेली ?
देव श्रीकृष्णानीं द्वारका सोन्याची बांधिली ॥

---

१ पहाटेचा प्रहर. २ किंवा चौथा चरण "दोन घड्यांची झाली रात ।" ३ कृष्णाच्या मावशीचा विशेषेंकरून अुल्लेख कुठेच आढळत नाहीं, परंतु घरांत मूल जन्माला आलें की त्याच्या मावश्यांना त्याचें कौतुक फार असतें हा सामाजिक अनुभव घेअूनच ही कल्पना केलेली दिसते. ४ देवकी. ५ वानोळा = विक्रय-वस्तु. ६ गोष्टीचें. ७ कमलजा हें खरं कंसाच्या पत्नीचें नांव. या ठिकाणी हें नाव कालिया नागाच्या स्त्रियांपैकी — ज्या पतीस सोडविण्याकरिता पाण्यावर येअून कृष्णाची विनवणी करीत होत्या — अेकीला लावलेलें असावें. ८ यशोदायक; बांगड्या (चुडा) हा सौभाग्याचा अलंकार आहे. कृष्णाला तर कंसाचा वध करायचा असतो, तेव्हा 'यशवनचुडा' हे शब्द या ठिकाणीं व्यंगोक्तीने वापरले आहेत. ९ दगडावर रक्त पडून ते तांबडे झाले व ध्वजाप्रमाणे दिसूं लागलं असा भाव.

अशिक्षित जनता व विशेषतः स्त्रिया यांच्यांत घरोघर लोकप्रिय झालेला कथाभाग म्हणजे गोकुळातील गोपींच्यात आकर्षणविषय झालेला कृष्ण, त्याने केलेल्या खोड्या व शृंगार-चेष्टा आणि यशोदेकडे नित्य येणारी गाऱ्हाणीं यावर रचलेल्या पुष्कळच ओव्या आढळतात.

१२५
स्वर्गीं देखिला विठ्ठल अवधूर्त[1] ।
घेऊनी अवतार कृष्ण खेळे गोकुळांत ॥

१२६
काळा कृष्णनाथ जस दोडक्याच दाण ।
त्याला भुलल्यात गवळणी गोपीगण ॥

१२७
जन्मिला कृष्णनाथ गोकुळीं उडे रंग ।
आठ वरसाची मूरत गोपिका केल्या दंग ॥

१२८
यसवदेबाई हरी तुझा वरसाचा ।
फोडिल्यात माठ सडा देतो गोरसाचा ॥

१२९
यसवदेबाआी साग तूपल्या कारट्याला ।
शिंक्याचं पितो दही लाज नाहीं चोरट्याला[2] ॥

१३०
यसवदेबाआी हरी तुझा पक्का चोर ।
गवळवाड्यावरला त्यानं चोरला रवीदोर ॥

१३१
यसवदेबाआी हरी तुझा ग नेणता ।
डोआीवरी घोंनतो[3] हिंड गवळणीसंवता ॥

१३२
यसवदेबाआी संभाळ तुपलं कारटं ।
यमुनच्या नआीं यानं पेरलं सराट ॥

१३३
गवळयाच्या सुना अेका शिणच्या सारख्या ।
नको कृष्णा जाऊं गाया गवळयाच्या मारक्या ॥

१३४
गवळवाड्यामधीं कशाचा गलबला ।
गवळयाच्या सुना कृष्ण जाऊं देआीना पाण्याला ॥

१३५
यसवदेबाआी कृष्ण तुझा अरबट[4] ।
गवळयाच्या सुना कोंडिल्या बारवंतं[5] ॥

१३६
मथुरेच्या वाट कृष्ण खेळे सारंगपाट ।
सोड हरी वाट शिरीं गोरसाचा माठ ॥

१३७
मथुरेला जाया गौळणी चीमतीम ।
सोड श्रीरंगा दुधाचा झाला नास ॥

१३८
दुडीवरी दुडी गवळण निघाली झाडुनी ।
कळंबाच्या[6] खोडीं कृष्ण बसला दडुनी ॥

१३९
दुड्यावरी दुड्या गवळण निघाली बारातेरा ।
सोडा कृष्णा वाट दहीदुधाच्या झाल्या तारा ॥

१४०
दुडीवरी दुडी गवळण निघाली शेलाटी[8] ।
चुकली मारग पुस गवळयाची राहुटी ॥

१४१
यसवदाबाआी साग तुझ्या ग हरीला ।
मारील चुमखड[9] पाण्या गेलेल्या नारीला ॥

१४२
सोड श्रीरंगा पदर साडीचा फाटला ।
घरीं तान्हं बाळ पान्हा जोबनीं दाटला ॥

गोकुळातील हजारो गोपींमध्ये कृष्णाच्या खास आवडत्या अशा काही गोपी होत्या. त्यापैकी राधा तर प्रमुख होतीच; पण दुसऱ्या दोन राआी व चंद्रावळ या बहिणी होत्या. या

१ विरक्त. २ किवा– "यसवंदबाआी तुझ्या हरीला साग कांहीं । गवळयाच्या राशींच खातो चोरून दूधदही ॥ ३ घोंगता–पावसापासून रक्षण करण्याकरता कांबळ्याची केलेली खोळ. ४ उद्धट. ५ विहिरीजवळ. किंवा– "यस्वदेवाआी कान्हा तुझा वाटवरी । जमुना नआीवरी आडवी गवळयाच्या नारी ॥ ६ घागर. ७ कदंबवृक्ष. ८ अुंच व सडपातळ स्त्री. ९ चिमखडा–लहान खडा (कामटीवरून बोटाच्या जोराने फेकावयाचा).

दोघींच्याविषयी अेक मनोरंजक लोककथा प्रचलित आहे. या दोघी अेका गवळ्याच्या मुली होत्या. राअी मोठी व चंद्रावळ धाकटी. कृष्ण राअीवर भुलला होता. म्हणून गवळ्याने तिचें लग्न कृष्णाशीं लावून दिले. चंद्रावळीचें लग्न दुसऱ्या अेका गवळ्याशीं करून दिलेलें होतें. अेकदा चंद्रावळ मथुरेच्या बाजारांत दही, दूध विकण्याकरिता निघाली. तेथूनच पुढे बहिणीला भेटण्याचा तिचा बेत होता. पण वाटेंतच कृष्णाने तिला पाहिलें. तो मोहित झाला व तिला वळविण्याचा प्रयत्न करूं लागला. ती संतापली व आपला बेत फिरवून तशीच परत घरीं गेली. आपली मनोवासना तृप्त करण्याकरिता अिकडे कृष्णाने दुसरीच युक्ती योजली. राअीचे कपडे व दागिने त्याने तिच्याकडून मागून घेतले. ते घालून व राअीचें रूप घेअून तो चंद्रावळीकडे गेला. बरेच दिवसानी बहीण भेटायला आली म्हणून चंद्रावळीला आनंद झाला. त्या रात्रीं चद्रावळ व राअीरूपी कृष्ण अेकाच पलगावर पडून गुजगोष्टी करूं लागलीं. तेव्हा कृष्णाने आपलें सत्य स्वरूप प्रकट केले व ती रात्र सहा महिने लांबवून आपली वासना तृप्त केली. खालील ओव्या या कथेस अुद्देशून आहेत:—

१४३

कळंबाच्या झाडावरी कृष्ण वाजव बासरी ।
दहीदूध डोअीवरी नाची गवळ्याच्या पोरी ॥

१४४

ठकड्या गोविंद याचं ठकडं चालणं ।
यानं भुलविली राअी गवळ्याची मालणं[१] ॥

१४५

दुडीवरी दुडी दुडीला कोरा श्यालां[२] ।
गवळाच्या राअी चढ कोणावरी केला ?

१४६

दुडीवरी दुडी दुडीचा तांब्या डुल ।
आडवा पदर राअी गवळ्याशीं बोल ॥

१४७

राअी रुकमीण चंद्रवळ ती धाकटी ।
देवा गोविंदाची याची नजर वोकटी[३] ॥

१४८

ठिकडा गोविंद अेका गोठीनं ठकला ।
मथुऱ्या बाजारी चंद्रवळीनं लुटला ॥

१४९

ठिकड्या गोविंद पड राअीबाअीच्या पाया ।
कंठी दुलडी मागीलियों[४] चंद्रवळीच्या
महाली जाया ॥

१५०

चंद्रवळीआड वेड लागल गोविंदाला ।
टाकली मोहिनी[५] साऱ्या गवळवाड्याला ॥

कृष्ण व राधा याच्यासंबंधीच्या ओव्या अत्यंत श्रृंगाररसपरिप्लुत आहेत:—

१५१

पहाटच्या पाऱ्यांत राधिका अुभी दारी ।
हिला भुलला कृष्णजी बैलाची धार काढी ॥

१५२

देव कृष्णजी गाया चारी वनमाळी ।
घेअूनी गुप्तरूप गेला राधेच्या रंगम्हालीं ॥

१५३

मथुऱ्या बाजारीं राधा गवळण येडवली ।
नथ सैरजाची मोडली चोळी भिंगाची फाटली ॥

१५४

येमवदेवाअी कान्हा तुझा रंडी खातो ।
गवळ्याच्या राधेच्या जोबनीं झाड घेतो ॥

१५५

यस्वदेवाअी कान्हा अुतला मातला ।
गवळ्याच्या राधेच्या हात मिरीला घातला ॥

१५६

मोळा महस्र नारी कृष्णें भोगिल्या अंधारीं ।
जळनी समया रुक्मिणीच्या[६] मंदिरीं ॥

---

१ सुदर स्त्री. २ शेला. ३ ओखटी—वाईट. ४ किंवा, ३ रा चरण:— "मागी बिदवा जोडवी." ५ सहा महिन्याची रात्र करून सर्वांवर मोहिनी टाकली त्याला उद्देशून. ६ मोलांची.

याशिवाय कृष्णाच्या सोळा हजार स्त्रियांचा अुल्लेखहि ओव्यांतून सांपडतो. राम व कृष्ण हे दोघेहि विष्णूचे अवतार पण राम अत्यंत सात्त्विक व अेकपत्नीव्रत तर कृष्ण स्त्रियांचा भोक्ता. दोघांच्यातील हा फरक खालील ओव्यातून दर्शविला आहे:—

१५७

सोळा सहस्र नारी कृष्ण भोगून आले रात्री ।
सोन्याची आरती रुक्मीण वाट पहाती ॥

१५८

सोळा सहस्र नारी कृष्ण घालितो धिंगाणा ।
बत्तीस पानाचा विडा मुखात रंगाणा ॥

१५९

सात अवतारातला राम होता नाडबंदी ।
आठव्या अवतारात कृष्ण गोपिकाच्या छंदीं ॥

१६०

सातव्या अवतारी राम होता ब्रह्मचारी ।
आठव्या अवतारी कृष्णे भोगिल्या सहस्र नारी ॥

वरील ओव्यातील कथाभाग सर्वतोमुखी असल्याने त्यात विशेष नावीन्य किंवा मौलिकता काहीच दिसत नाही; परंतु पुराणातील कृष्णविषयक काही उल्लेख केवळ आधारभूत घेअून त्यावर संतकालीन कथा व लोकरूढि यांच्या साहाय्याने व मानवी कल्पनेच्या भराऱ्यांनी अुभारलेलीं चित्रे ज्या ओव्यातून आढळतात त्या ओव्या मात्र अत्यंत नावीन्यपूर्ण आहेत. खालील सर्व ओव्यांचा समावेश पुराणविषयक ओव्यात करणे जरा धोक्याचेंच आहे. परंतु त्यातील मध्यवर्ती कल्पना पुराणातील अेखाद्या प्रसंगावर आधारलेली असल्यानेच त्यांचा अंतर्भाव या ठिकाणी केला आहे! या ओव्या पुराणातील कृष्ण-रुक्मिणीसंबंधी असल्या तरी, त्या सर्वांमध्ये, कृष्ण-रुक्मिणींचा पंढरपुरातील लोकावतार, विठ्ठल-रखुमाअी यांचाच अुल्लेख आहे. विठ्ठल हा विष्णूचा लोकनिर्मित अवतार— केवळ अेक दैवत— असला तरी रुक्मिणी ही त्याची पुराणातील पट्टराणी त्याच भूमिकेत ठेवून तिच्या भावनांना स्वतःच्या अनुभवाप्रमाणे व कल्पनेप्रमाणे आविष्करण देण्याचा प्रयत्न या ओव्यातून केलेला आहे. तुळशीबद्दलचा अुल्लेख पुराणातच आहे. त्यावरच विठ्ठल-तुळशीला अुद्देशून रचलेल्या ओव्या आधारलेल्या आहेत. संतकालीन दंतकथांचा परिणाम या सर्व ओव्यांवर प्रामुख्याने झालेला आढळतो. यातील चित्रांना पार्श्वभूमि पंढरपूर व तेथील लोकरूढि व कल्पना यांची घेतलेली आहे. अैतिहासिक दृष्ट्या या सर्व ओव्यातील स्थलकाल-विषयक घोटाळा अयोग्य दिसला तरी अशिक्षित मनाच्या कल्पनेच्या दृष्टीने पुराण, अितिहास व स्थानिक लोकरूढि यांचें हें कौशल्याने केलेलें समीकरण असेच आपल्याला म्हणावें लागेल. पुराणातील कृष्ण-रुक्मिणी असोत किंवा पंढरपुरातील त्यांचा लोकावतार असो, त्यांना या ओव्यात मानवी पातळीवर आणून बसविल्यामुळेच या ओव्या अितक्या मनोरंजक होअून त्यात रसवत्ता आली आहे.

कृष्णेची राधेशीं असलेली मैत्री रुक्मिणीला पाहवत नाही, असा अुल्लेख खालील ओवींत आहे:—

१६१

रुसली रुक्मिण जशी आगाशी तापली ।
देवाच्या पलंगावर तिनं राधिका देखिली[2] ॥

१ ब्रह्मचारी  २ अेकदा रुक्मिणी कृष्णभेटीस आली असताना त्याच्या पलंगावर— किंवा मांडीवर— तिने राधेला बसलेली पाहिली. कृष्णाच्या सोळा हजार स्त्रिया असल्या तरी त्या सर्वांमध्ये रुक्मिणीचा दरारा अितका असे की तिच्यासमोर सवजणी अत्यंत आदराने वागत. रुक्मिणी आल्यानंतरहि राधा पलंगावरून अुठली नाही तेव्हा रुक्मिणी संतापली व दिंडीरवनात (पंढरपुरांत) तप करण्यास निघून गेली अशा तऱ्हेची संतकालीन दंतकथा प्रचलित आहे.

तुळशीचा कृष्णाशी—किंवा विष्णूशीं—आलेला जो संबंध पुराणात वर्णिलेला आहे तो आधाराला घेऊन त्यावर पुष्कळच ओव्या रचलेल्या दिसतात. यांतील फक्त मध्यवर्ती कथाबिंदु तेवढा पुराणांतून घेतला आहे. परंतु कल्पनासौंदर्याची जोड त्याला दिल्याने त्यात मौलिकता अुत्पन्न झालेली आहे. विष्णूच्या पूजेला तुळशीची पानें घेतात किंवा त्याच्या देवळामोवती तुळशीच्या बागा लावतात, या प्रथेचा आधार घेअून तुळशीचा विष्णूला घडत असलेला सहवास रुक्मिणीला सहन होत नाही व तिचा सवतीमत्सर जागृत होतो अशी मनोरंजक कल्पना करून ती या ओव्यातून विकसित केलेली आहे. तुळशीचें या ओव्यातील चित्र साधेपणाने ओतप्रोत भरलेले असलें तरी अेका ओवींत मानवसुलभ असा अभिमान व स्त्रीसुलभ सवतीमत्सर तिच्याहि ठिकाणी दाखवलेला आहे.

१६२
पंढरीचं रान दिसतं हिरवं गार ।
विठ्ठलमहाराजाच्या तुळशीवनाला आला भार[१] ।।

१६३
पंढरपुरात रहायाला नाही जागा ।
देवाविठ्ठलाच्या लाविल्या तुळशीबागा ।।

१६४
विठ्ठल विठ्ठल हाका मारिती वनात ।
हातांत टाळविणा अुभा तुळशीबनात ।।

१६५
तुळशीचा पाला वाऱ्यायानं गेला ।
देवा विठ्ठलानें आवडीनें गोळा केला ।।

१६६
पंढरी शहरात तुळशी आल्यात हुरड्याला[२] ।
विठ्ठल प्राणसखा विणा वाजवितो मरुड्याला[३] ।

१६७
विठ्ठल देवाचा शालु कशायानं फाटला ?
तुळशीच्या वनीं वारा मंजुळ सुटला ।।

१६८
विठ्यलादेवा शेला कशानं भिजला ?
पडत दहींवर होतं तुळशीच्या शेजेला ।।

१६९
तुळशीच्या माळा वाळून झाल्या कोळें[४] ।
देवा विठ्ठलाच्या दोंदलावरी लोळ ।।

१७०
तुळयाशाबाअी लुसलुशी कवळी ।
देवा गोविंदाची लअी सुग्त सावळी ।।

१७१
तुळशी तुळशी तुझ्याग्वालती काळी माती ।
तुझ्या सेवाराला देव आले रातोराती ।।

१७२
तुळशी तुळशी किती वाऱ्यानं डुलशी ?
रात न् दिवसाच गोविंद तुझ्यापाशीं ।।

१७३
राअी रुकमीण दोघी मांडती परसदारीं ।
विठ्ठलदेवाची तुळशी धाकलीनें पिर्त[५] नेली सारी ।।

१७४
रुकमीण बोल माझ्या विठ्ठला पिर्तीच्या ।
वाड्याला नका जाअूं तुळशी गरतीच्या ।।

१७५
रुकमीण बोल देवा पिरतीची कोण ?
काय सागूं रुकमिणी माझ्या तुळशीच गुण ?

१७६
रुकमीण बोल जळो तुळशीचं जिणं ।
वर्षाच्या वर्षी लावी देवाशीं लगीन ।।

१७७
रुकमीण बोल तुळस कशाच्या कामाची र ?
पाडुरंग म्हण आधीं लेतोया तिचा हार मंग तुझा सअीवार[७] ।।

---

१ बहर. २ मंजुळांनी भरल्या. ३ मराड=डौर वाजवून व नाचून देवापुढे मराड्यांने (गोसाव्यांचा एक पंथ) लेलेलें भजन. ४ शुष्क. ५ स्वयंवर. ६ प्रीति. ७ शृंगार.

१७८

रुक्मिणीला साडीचोळी सत्यभामेला लुगडी ।
पतिव्रता तुळस तप घालिते उघडी[१] ॥

१७९

रुक्मिणीला साडीचोळी सत्यभामेला बोंडबुंड[२] ।
तुळशी नारीचा नित पाणावला दंड[३] ॥

१८०

तुळसबाई म्हण रुकमीण कशानं थोरली ।
माझ्या मंजुळाची तिच्या नथला अरली[४] ॥

---

## स्त्रियांच्या म्हणी

(५७ व्या अंकावरून पुढे)

(५२५) वांझेच्या घरची माग्वर मरत नाही, लेकुरवाळीच्या घरीं शेण पुरत नाही.
(५२६) समोरची वसती कपाळात, मागची येती स्वप्नात.
(५२७) तेलवाल्याचें तेल जळतें, नि मशालजीचे पोट दुखतें.
(५२८) ज्याचें त्याला रुचतें, आपल्याला का डाचतें ?
(५२९) आहे त्याला संताप, नाही त्याला निताप. (निताप शब्द खानदेशी आहे.)
(५३०) लढाईमें बढाई, खजिनेमें गबऱ्या.
(५३१) चोपडी एकाच्या नावाची, शिंदळ सगळ्या गांवाची.
(५३२) खाणें म्हशीचें, त्राण घुशीचें.
(५३३) आला जावयाचा भाऊ, नेंग शेजारणी आपले गहू.
(५३४) जावयाचें पोर, हरामखोर.
(५३५) घरात नसावा साला (मेहुणा), शेतात नसावा नाला.
(५३६) जो बायकोशी नीट, त्याच्या घरीं सोन्याची वीट.
(५३७) पहिलीचा असा तसा, दुसरीचा गुलाम जसा.
(५३८) जो संगतीला, तो पंगतीला.
(५३९) दुकान चुरमुऱ्याचें, आकार बाबासाहेबाचा.
(५४०) बारश्याला गेला, अन् बाराव्याला आला.

नीळकंठ शंकर नवरे

---

१ किंवा "लुगडी" व "उघडी" या ठिकाणी अनुक्रमे "बनात" व "उन्हांत' अशीहि शब्दरचना आढळते. २ साधें लुगडें किंवा "बोंडबुंड" या ठिकाणीं "बारवा" ( = साधें लुगडें) व दुसरी ओळ "तुळशीबाईला थंड्या पाण्याचा गारवा" अशीहि आढळते. ३ या ठिकाणी "दंड" शब्दावर फारच उत्कृष्ट श्लेष आहे. रुक्मिणी ही कृष्णाची खरीखुरी पट्टराणी तर तुळस ही पुराणांतील साध्वी वृंदा व सांप्रत तुळशीचें रोप अशा दोन भूमिकात कल्पिलेली आहे. आणि तुळशीच्या रोपाला पाणी व अन्न यांच्याशिवाय कसली जरुरी असणार ?- या सर्व गोष्टींचा सुंदर समन्वय करून या ओव्यांतून रुक्मिणीच्या भावनांना शृंगार व विलास यांची आणि तुळशीच्या चित्राला साधेपणा व कष्टमय जीवन यांची जोड देताना जो कल्पनाविलास दिसून येतो तो अत्यंत उत्कृष्ट नाही असे कोण म्हणेल ? ४ अरली = नथेच्याखाली असणारी पांच किंवा तीन मोत्यांची झुरमुळी.

# अखिल भारतीय शास्त्रीय परिभाषा

(लेखक– श्री. यशवंत रामकृष्ण दाते)

दिवसेंदिवस देशी भाषातून निरनिराळे विषय शिकविण्याची प्रथा अधिकाधिक वाढत आहे. शास्त्रीयेतर विषय देशी भाषातून शिकविण्याची पद्धत आज हळूहळू सर्वत्र रूढ होत आहे. व शास्त्रीय विषयहि देशी भाषातूनच शिकविले गेले पाहिजेत ही विचारसरणीहि दिवसें-दिवस मान्य होत चालली आहे. नागपूर विद्यापीठात दुय्यम शाळातून सर्व शिक्षण गेलीं वीस वर्षें देशी भाषांतून दिले जात आहे. व कॉलेजमध्येहि तसेच दिले जावें अशा तऱ्हेची खटपट चालू आहे. कलकत्ता विश्वविद्यालयानेहि दुय्यम शिक्षण बंगालीमध्ये देण्याची पद्धति स्वीकारली असून अुच्च शिक्षणहि बंगालींतून देण्याची प्रथा सुरू करण्याचें योजिलें आहे. अशा रीतीने हळूहळू सर्व विद्यापीठातून सर्व विषयाचें शिक्षण देशी भाषातून दिलें जावे ही गोष्ट मान्य होत जाण्याचीं चिन्हे दिसूं लागलीं आहेत. तसेच या प्रांतिक स्वायत्ततेच्या काळात देशी भाषांना दिवसेंदिवस अधिकाधिक महत्त्व येत जाणार ही गोष्ट स्पष्ट आहे.

देशी भाषातून शिक्षण देण्याच्या कामीं मुख्य अडचण शास्त्रीय विषयाच्या बाबतींत येते व ती म्हटली म्हणजे शास्त्रीय परिभाषेची होय. आतापर्यंत सर्व शिक्षण अिंग्रजी भाषेच्या माध्यमाच्या द्वारा होत गेलें असल्यामुळे व त्याच भाषेत सर्व शास्त्रीय ग्रंथ असल्यामुळे आज शिक्षकवर्गास अिंग्रजी भाषेंतूनच शिक्षण देणे अधिक सुलभ वाटते. परंतु अिंग्रजी भाषेचें ज्ञान विद्यार्थ्यांच्या ठिकाणीं फार मर्यादित असल्यामुळे त्यास प्रत्येक विषयाची परिभाषा शिकण्याच्या कामींच फार परिश्रम करावे लागतात व त्यामुळे विषयाचें ज्ञान अगदी मर्यादित स्वरूपात होतें; व कित्येकदा भाषेचे ज्ञान नीट न झाल्यामुळे विषय दुर्बोध होतो. तसेच अिंग्रजी भाषेंतील ग्रंथहि विद्यार्थ्यांच्या हातीं फारच थोडे पडतात, त्यामुळे अेकाच विषयाची निरनिराळया पद्धतीची मांडणी असलेले निरनिराळे ग्रंथ वाचण्याची त्यास संधि मिळत नाही. व त्यामुळे विशिष्ट विषयाचें त्यांचें वाचनहि अत्यंत मर्यादित असतें. हेच विषय जर देशी भाषातून शिकविले गेले तर विद्यार्थ्यास तितकी भाषेची अडचण पडत नाही व विषय सुलभतेने शिकतां येतो. तसेंच देशी भाषात निरनिराळ्या विषयावरचे ग्रंथ तयार झाले तर ते सुलभपणें व थोड्या किंमतींत विद्यार्थ्यास मिळूं शकतात व भाषेची अडचण फारशी नसल्यामुळे अेकाच विषयावरचे निर-निराळ्या लेखकांनी निरनिराळ्या पद्धतीने लिहिलेले ग्रंथ वाचणें त्यास सुलभ होतें. अशा रीतीने तो विषय समजून घेण्याच्या कामीं त्यास अधिक साहाय्य होतें. याकरिता देशी भाषेतून ग्रंथ तयार करण्याकडे व निरनिराळे विषय शिकविण्याकडे दिवसेदिवस अधिकाधिक प्रवृत्ति होत आहे ही गोष्ट अिष्ट आहे.

याकरिता निरनिराळ्या शास्त्राची शास्त्रीय परिभाषा तयार करण्याचे प्रयत्न आज अनेक ठिकाणीं होत आहेत. महाराष्ट्रामध्ये शास्त्रीय परिभाषा तयार करण्याचे प्रयत्न आज गेलीं ५० वर्षें चालू आहेत. मुंबअी येथील ग्रँट मेडिकल कॉलेजमध्ये वैद्यकीय विषयाचें शिक्षण देशी भाषें-तून देण्याकरिता डॉ. सखाराम अर्जुन, डॉ. भिकाजी अमृत चोभे व डॉ. पांडुरंग गोपाळ याची

नेमणूक केलेली होती व त्यानी निरनिराळ्या वैद्यकीय विषयावर ग्रंथरचना मराठीत केली होती. कोल्हापूर येथील प्रो. बाळाजी प्रभाकर मोडक यानी बी.एस्सी. पदवी-परीक्षेपर्यंतचा अभ्यासक्रम मराठी भाषेतून तयार केला होता. याप्रमाणे अनेक ग्रंथ मराठींत तयार होत होते. शास्त्रीय विषयावर प्राथमिक पुस्तकें सरकारच प्रसिद्ध करीत होते. परंतु मध्यंतरीं हा अुपक्रम बंद पडून अिंग्रजीकडेच लोकाची प्रवृत्ति अधिकाधिक झुकूं लागली. तथापि गेल्या २० वर्षांत या बाबतींत पुनः विचाराची दिशा अुलट बाजूस फिरून मराठींत शास्त्रीय विषयांवर ग्रंथलेखन करण्याची व परिभाषा तयार करण्याची प्रथा सुरू झाली. श्री. रानडे यानी प्रसिद्ध केलेल्या अिंग्रजी मराठी कोशात अनेक शास्त्रीय पारिभाषीय शब्दास मराठी प्रतिशब्द दिलेले आढळतात व त्या कोशाच्या शेवटीं अेक परिशिष्टहि जोडण्यात आलें आहे.

यानंतर निरनिराळ्या विषयात काही लेखकानी ग्रंथ लिहून परिभाषा तयार करण्याचा अुपक्रम केलेला आढळतो. अुदाहरणार्थ, प्रो. साठे यानी रसायनशास्त्राची परिभाषा तयार केली होती. तसेंच प्रो. र. वि. दामले यानी वनस्पतिशास्त्राची परिभाषा तयार केलेली आहे. असेच आणखीहि काही प्रयत्न झाल्याचें आढळते.

यानंतर शास्त्रीय परिभाषेच्या बाबतींत झालेला अेक महत्त्वाचा प्रयत्न म्हणजे महाराष्ट्रीय ज्ञानकोशरचनेच्या वेळीं झालेला होय. महाराष्ट्रीय ज्ञानकोशात शास्त्रीय विषयावर अनेक लेख देण्यात आलेले आहेत आणि ते विषय निरनिराळ्या शास्त्रज्ञांकडे सोपवून दिलेले असून त्यांनी आपापल्या विषयाची परिभाषा तयार करून ती त्या लेखात वापरली आहे. याच संस्थेमार्फत अेक संज्ञाकोश तयार करावयाची योजना होती; परंतु ती प्रत्यक्ष स्वरूपांत येअूं शकली नाही.

यानंतर झालेले विशेष अुल्लेखनीय प्रयत्न म्हणजे सृष्टिज्ञान या मासिकांत जे निरनिराळे शास्त्रीय विषयावर लेख येत असतात त्यातील परिभाषा अेकत्र करून तयार करण्यांत आलेले पदार्थविज्ञान व रसायनशास्त्र या विषयातील संज्ञाकोश हे होत. तसेंच पुणें येथे स्थापन झालेल्या परिभाषामंडळानेहि आजपर्यंत अनेक निरनिराळ्या विषयावरील परिभाषा तयार केलेल्या आहेत.

याचप्रमाणे अितर प्रांतातहि शास्त्रीय परिभाषा तयार करण्याचे प्रयत्न चालू आहेत. बनारस येथील नागरी प्रचारिणी सभेने फार वर्षांपूर्वी अेक वैज्ञानिक शब्दसंग्रह तयार केला होता. त्या समितीवर प्रो. गज्जर व कोशकार रानडे हे कार्य करीत होते. यानंतर याच सभेने काही विषयावरील स्वतंत्र परिभाषा तयार करून प्रसिद्ध केल्या आहेत. बनारस येथील हिंदु विश्वविद्यालयातहि या बाबतींत प्रयत्न चालू आहेत. प्रयाग येथे स्थापन झालेल्या विज्ञानपरिषद् या संस्थेनेहि शास्त्रीय परिभाषा तयार करण्याचा अुपक्रम सुरू केला आहे. कलकत्ता विश्वविद्यालयाने निरनिराळ्या विषयाबद्दल समिति स्थापून पदार्थविज्ञान, रसायन, गणित, भूगोल वगैरे शास्त्रासंबंधी परिभाषा तयार करून प्रसिद्ध केल्या आहेत. तेलगू भाषेंतहि अेक लहानसा परिभाषाकोश तयार झालेला आहे व मद्रास विश्वविद्यालयाने ना. श्रीनिवासशास्त्री याच्या अध्यक्षतेखाली या प्रश्नाचा विचार करण्यासाठी व नियम करण्याकरिता अेक समिति नेमली आहे. गुजराती भाषेतहि वैज्ञानिक परिभाषा या नांवाचा लहानसा पारिभाषिक संज्ञाकोश प्रसिद्ध करण्यात आला असून गुजरात विद्यापीठातर्फे या बाबतींत कांही परिश्रम चालू आहेत. बडोदें येथेहि या बाबतींत काही प्रयत्न झाले आहेत.

---

[ **टीप**— परिषदेच्या परिभाषामंडळाकडून झालेलें काम वेळोवेळी 'पत्रिके'तून प्रसिद्ध झालेलें आहेच. —संपादक]

हैदराबाद येथे अुस्मानिया विद्यापीठातर्फे अुर्दूमध्ये पारिभाषिक संज्ञा तयार करण्याचें काम चालू आहे.

अशा तऱ्हेने आज देशी भाषांत शास्त्रीय परिभाषा तयार करण्याचे जे प्रयत्न सुरू आहेत ते त्या त्या प्रांतिक भाषांच्या दृष्टीने महत्त्वाचे आणि अिष्ट असेच आहेत. परंतु या सर्व प्रयत्नांचें सहकार्य व अेकीकरण होअून जर सर्व हिंदुस्थानास अुपयोगी पडेल अशी सर्वमान्य परिभाषा तयार झाली तर तिचा अुपयोग अधिक होअील. आज हिंदुस्थानांत ज्या निरनिराळ्या भाषा प्रचलित आहेत त्यांतील मुख्य चार भाषा मराठी, हिंदी, गुजराती व बंगाली या संस्कृत भाषेपासूनच बनलेल्या व तिच्या अुपभाषा आहेत. तसेच दक्षिण हिंदुस्थानांतील तेलगू, तामीळ, कानडी व मल्याळी या भाषा जरी प्रत्यक्ष संस्कृतापासून निघालेल्या नसल्या तरी त्यातील शब्दसंपत्ति बरीचशी संस्कृत तत्सम व तद्भव शब्दाची बनलेली आहे. व त्या भाषा जाणणाऱ्या लोकांस संस्कृत शब्द बव्हंशाने परिचित असतात.

याकरिता सार्वभारतीय अशी जी शास्त्रीय परिभाषा बनवावयाची ती संस्कृत भाषेवर आधारलेली अशीच बनविणें अिष्ट आहे. संस्कृत भाषेमध्ये अुपसर्ग व प्रत्यय लावून मूळ धातूपासून अनेक निरनिराळे शब्द बनविण्याची जी शक्ति आहे तिचाहि परिभाषा बनविण्याच्या कामीं अतिशय अुपयोग होण्यासारखा आहे. तसेच संस्कृतमध्ये समास करण्याची प्रथा असल्यामुळे अेकाच शब्दापासून अनेक तद्भव शब्द बनविणें पुष्कळ सुलभ होतें. यामुळे विशिष्ट प्रकारचे पारिभाषिक शब्दांचे गट बनविण्याच्या कामीं संस्कृत भाषेचा अुपयोग पुष्कळच होण्यासारखा असतो. तेव्हा शास्त्रीय परिभाषा बनविण्याच्या कामीं संस्कृत भाषेस प्राधान्य देणें अवश्य व अपरिहार्य आहे. कोणत्याहि देशी भाषेत अेका शब्दापासून अनेक शब्द बनविण्याची शक्ति संस्कृत भाषेअितकी असणें शक्य नाही. कारण देशी भाषा ह्या अधिकाधिक पृथक्करणात्मक भाषा बनत चालल्या आहेत; व संस्कृत भाषा ही संकलनात्मक भाषा आहे.

सार्वभारतीय परिभाषा बनविण्याची आज विशेष निकडीची आवश्यकता अशा दृष्टीने आहे की, निरनिराळ्या प्रातात त्या त्या देशी भाषेत शास्त्रीय परिभाषा बनविण्याचे प्रयत्न आज चालू आहेत. अशा परिभाषा बनवून व त्यात ग्रंथरचना होअून त्या अेकदा रूढ होअून बसल्या म्हणजे त्यात बदल करणे दिवसेंदिवस कठीण होत जाअील. आज जोपर्यंत त्या तयार होत आहेत व त्यास अजून निर्णायक व स्थिर असे स्वरूप प्राप्त झाले नाही, फारशी ग्रंथरचना झाली नाही व ती परिभाषा प्राध्यापक व विद्यार्थी याच्या तोंडात अजून पक्की बसली नाही तोपर्यंतच तींत काही फेरफार करणे शक्य आहे. जसजसा काळ लोटत जाअून प्रातीय परिभाषास स्थिरत्व येत जाअील तसतसें त्याची अेकवाक्यता करण्याचे कार्य दुर्घट होत जाअील. याकरिता आजच अशा प्रयत्नांची आवश्यकता विशेष आहे.

सर्व प्रांतिक भाषा जर संस्कृतसंभव किंवा संस्कृतभाषाभिवर्धित आहेत तर निरनिराळ्या प्रातांत बनलेल्या परिभाषात फारसा फरक असणार नाही असें सकृद्दर्शनीं वाटतें, परंतु संस्कृत शब्द देशी भाषात सर्वतः अेकाच अर्थाने वापरले जातात असें नाही. तसेंच अेका प्रान्तात काही विशिष्ट धातूपासून शब्द बनविण्याची प्रथा अधिक असते तर दुसऱ्या प्रांतांत त्याच अर्थाचा दुसरा अेखादा धातुविशेष परिचित असतो. अुदाहरणार्थ, ताप हा शब्द हिन्दी भाषेमध्ये सामान्य अुष्णता या अर्थी वापरला जातो, तर मराठीमध्ये ज्वर या अर्थी वापरला जातो. तसेंच संशोधन हा शब्द मराठींत नवीन तत्त्वाचा, नियमाचा किंवा वस्तूचा शोध लावणें या

अर्थी वापरला जातो तर अुलट हिंदीमध्ये दुरुस्ती किंवा अुपसूचना या अर्थी वापरला जातो. तसेंच अुष्णतावाचक शब्द बनविण्याकरिता मराठीमध्ये अुष् धातूपासून बनविलेले शब्द वापरण्यांत येतात तर हिंदीमध्ये तप् या धातूपासून बनविलेले शब्द वापरण्यात येतात. याप्रमाणे प्रत्येक प्रांतिक भाषेंत बनविल्लेल्या परिभाषेमध्ये त्या त्या प्रांताचें काहीतरी विशिष्ट वळण हें असणारच व अशा निरनिराळ्या वळणाच्या प्रांतिक परिभाषा तयार झाल्या व त्या रूढ होऊन बसल्या म्हणजे त्यामध्ये फरक करणें दिवसेंदिवस कठीण होत जाअील. याकरिता या बाल्यावस्थेत असतांना अेकी करण्याचा प्रयत्न करणें अवश्य आहे.

परंतु या बाबतींत मोठी अडचण म्हणजे निरनिराळ्या प्रांतांत अशा तऱ्हेचे शास्त्रीय परिभाषा बनविण्याचे प्रयत्न करणारी मंडळी अेकत्र येअून विचारविनिमय करणे शक्य होत नाही. या कामीं मध्यवर्ती सरकारने वास्तविक पुढाकार घेतला पाहिजे. किंवा निरनिराळ्या प्रांतातील विद्यापीठानी या बाबतीत सहमत करून कांही तरी योजना केली पाहिजे. परंतु या दोन्ही संस्था सरकारी किंवा निमसरकारी असल्यामुळे त्याच्याकडून कोणत्याहि प्रकारचे साहाय्य मिळणं फार जिकीरीचे असतं व त्या कार्यांत दिरंगाअीहि फार होत असते. दुसरा अुपाय म्हटला म्हणजे निरनिराळ्या प्रांतातील साहित्यिक संस्था किंवा साहित्यपरिषदा यानी सहकार्य करून काही योजना करणे हा होय. दिवसेंदिवस हिंदी व मराठी या साहित्य संमेलनात सहकार्य अधिकाधिक होत आहे. असेंच जर सर्व साहित्यपरिषदाचें सहकार्य झालें तर ती गोष्ट करणें सुलभ होअील.

आतापर्यंत शास्त्रीय परिभाषा बनविण्याच्या कामीं जे प्रयत्न झाले आहेत ते निरनिराळ्या ठिकाणीं स्वतंत्रपणे करण्यात आले असून त्यातील कोणीहि सर्व शास्त्राचा परामर्श घेतलेला दिसत नाही. तसेंच या प्रयत्नातहि निरनिराळ्या शास्त्रामधील प्रयत्नात परस्परसुसंगति असावी असें दिसत नाही. याकरिता या झालेल्या सर्व प्रयत्नाचा शक्य तो फायदा घेअून सर्वांगीण व सुसंगत अशी सर्व भरतखंडास अुपयोगी पडेल अशी परिभाषा बनविण्याचा प्रयत्न होणें अत्यंत अवश्य आहे.

परंतु हे काम बरेंच परिश्रमाचे, दीर्घ काल लागणारें व त्यामुळे अत्यंत खर्चाचें असें होणार आहे व या कामी कोणीतरी संस्थेने पुढाकार घेअून व तीस अनेक संस्थानी व व्यक्तींनी द्रव्यसाहाय्य केल्यावाचून ते होणार नाही.

महाराष्ट्र-कोश-मंडळाने सध्या या बाबतींत जो अुपक्रम सुरू केला आहे त्याचें स्वरूप असें आहे की आजपर्यंत महाराष्ट्रात व अितर प्रांतात जे शास्त्रीय परिभाषा बनविण्याचे प्रयत्न करण्यात व जे ग्रंथ शास्त्रीय विषयावर आजपर्यंत प्रसिद्ध होअून त्यांत जी परिभाषा योजण्यांत आलेली आहे त्या सर्व पारिभाषिक शब्दाचें संकलन करून त्याचा वर्णानुक्रमरचनेने अेक संपूर्ण असा कोश तयार करावयाचा. त्यामध्ये ज्या शास्त्रीय शब्दास प्रतिशब्द आतापर्यंत योजिलेले नसतील ते नवीन बनवून समाविष्ट करावयाचे. अशा तऱ्हेने हा कोश प्रसिद्ध झाल्या-नंतर जे लेखक शास्त्रीय विषयावर ग्रंथरचना करीत असतील त्यास जो योग्य शब्द वाटेल त्याची योजना ते आपल्या ग्रंथात करतील. अशा रीतीने अनेकाच्या दृष्टीने त्यातील शब्दाची निवड होअून ते तज्ज्ञांच्या दृष्टीने अधिक पात्र ठरतील ते भाषेमध्ये रूढ होतील. व अशा रीतीने सुमारे दहा वर्षांत बऱ्याचशा शब्दाची योग्य निवड होअून बाकीचे शब्द मागे पडतील. अशा वेळीं प्रस्तुत कोशावरूनच अेक निर्वाचित व रूढ अेवढेच शब्द देणारी नवीन आवृत्ति काढ-

त्यास ते पारिभाषिक शब्द सर्वसामान्य समजण्यास हरकत वाटणार नाही. अशा रीतीने सार्व-भारतीय शास्त्रीय परिभाषा बनविणें सुलभ व शक्य होईल.

अुस्मानिया विश्वविद्यालयाने अेक समिति नेमून अुर्दू भाषेंत शास्त्रीय परिभाषा बन-विण्याचा अुपक्रम केला आहे; परंतु ती परिभाषा आरबी भाषेस मूळ भाषा धरून बनविली असल्यामुळे तिचा अुपयोग संस्कृतसंभव अथवा संस्कृतप्रभावित भाषाच्या बाबतींत मुळींच होणार नाही हे अुघड आहे. आणि आरबी भाषा जाणणारे पंडित साप्रत अगदीच अत्यल्प असल्यामुळे त्या भाषेवर आधारलेली परिभाषा बहुजनसमाजास अगदीच निरुपयोगी होईल.

हा प्रश्न निकडीने हातात घेण्याची आवश्यकता आणखीहि अेका कारणामुळे अुत्पन्न झालेली आहे. हिंदुस्थान सरकारच्या मध्यवर्ती शिक्षणमंडळाने (Central Board of Education) अेक शास्त्रीय परिभाषा समिति नेमिली आहे. या समितींत पुढील सभासद आहेतः—

१ सर अकबर हैदरी (अध्यक्ष).
२ दि. ब. सर के. रमुन्नि मेनन.
३ श्री. अेस्. सी. त्रिपाठी, आय्. अी. अेस्., ओरिसाचे शिक्षणाधिकारी.
४ श्री. डब्ल्यू. अेच्. अेफ्. आर्मस्ट्रॉंग, आय्. अी. अेस्., पंजाबचे शिक्षणाधिकारी.
५ डॉ. सर झियाअुद्दिन अहंमद.
६ पं. अमरनाथ झा, प्रयाग विश्वविद्यालयाचे अुपकुलपति.
७ शं. सु. अु. डॉ यू. अेम्. दाअूद पोता, सिंधचे शिक्षणाधिकारी.
८ हिंदुस्थान सरकारचे शिक्षणविभागाचे कमिशनर.

या समितीत पुढील समासद स्वीकृत करून घेण्यात आले आहेत:

९ डॉ. अब्दुल हक, अखिल भारतीय अंजुमन तरक्की अुर्दू, दिल्ली, या संस्थेचे मंत्री.
१० डॉ. अेस्. अेस्. भटनागर, शास्त्रीय व औद्योगिक विषयाचे डायरेक्टर.
११ डॉ. मुझफरुद्दीन कुरेशी, अुस्मानिया विश्वविद्यालयाचे रसायनविभागाचे अध्यक्ष व अध्यापक.

विशेषत्वाने आमंत्रित:—

१२ नवाब मेहदी यारजंग बहादुर, अुस्मानिया विश्वविद्यालयाचे अुपकुलपति आणि निजाम सरकारचे शिक्षणमंत्री.

वरील यादीकडे पाहिल्यास यात महाराष्ट्र व बंगाल या प्रांताची पूर्णपणें अुपेक्षा करण्यात आली आहे. जे सभासद आहेत त्यामध्ये अुर्दू भाषेशीं विशेष परिचित असलेल्या सभासदाची अितकी बहुसंख्या आहे की या समितींतून अुस्मानिया विश्वविद्यालयाने तयार केलेली परि-भाषाच अखिल भारतीय परिभाषा समजावी असा प्रस्ताव मान्य होणें अगदी स्वाभाविक आहे. वरील सभासदात अेक पं. अमरनाथ झा याचा अपवाद केल्यास संस्कृत भाषेशीं परिचित असा अेकहि सभासद दिसत नाही त्यामुळे संस्कृतसंभव परिभाषेची कल्पना वरील समितीस ग्राह्य होण्याचा अथवा या समितीपुढे पद्धतशीरपणे हा प्रश्न चर्चिला जाण्याचाहि संभव दिसत नाही. प्रस्तुत समितीसंबंधी आपणास काही माहिती आहे काय अशी विचारणा मुंबअी अिलाख्याच्या शिक्षणाधिकाऱ्याकडे केली असता आम्हास या गोष्टीची दखल नाही असे त्याजकडून आम्हास पत्र आले आहे. तेव्हा या गोष्टीकडे विशेष लक्ष देणे आज मुंबअी प्रातातील व विशेषतः महा-राष्ट्रीय जनतेचें कर्तव्य आहे.

या प्रश्नाचा आज आपण जर विचार केला नाही व त्याची अुपेक्षा केली तर लौकरच हिंदुस्थानची अखिल भारतीय शास्त्रीय परिभाषा म्हणून आरबीभाषासंभव अशी परिभाषा हिंदुस्थान सरकारकडून मान्य होअून अधिकृत म्हणून समजली जाण्याचा पूर्ण संभव आहे. या बाबतींत आपल्या प्रांतिक सरकारचें अथवा शिक्षणाधिकाऱ्याचें काय मत आहे तें कळत नाही. मुंबअी विश्वविद्यालयानेहि या गोष्टीची दखल घेतलेली दिसत नाही. कोणाहि महाराष्ट्रीय प्राध्यापकाने यासंबंधी आतापर्यंत अवाक्षरहि कोठे काढलेलें आढळत नाही. युक्त प्रांतांत नागरी प्रचारणी सभेने या बाबतींत आंदोलन सुरू केले आहे. महाराष्ट्र साहित्य परिषदेनेहि या बाबतीत पुढाकार घेअून काहीतरी चळवळ महाराष्ट्रांत करणें अवश्य आहे. या दृष्टीने या प्रश्नाचा विचार करून अखिल भारतीय शास्त्रीय परिभाषा बनविण्याच्या प्रश्नास चालना मिळून संस्कृतभाषासंभव देशी भाषास या बाबतींत योग्य ते स्थान व अुत्तेजन मिळेल अशी आशा आहे. महाराष्ट्र शब्दकोश मंडळ या बाबतींत शक्य तें साहाय्य करण्यास तयार आहे.

---

## संलग्न-संस्था-वृत्त



अहमदनगर वाङ्मयोपासक मंडळाची वार्षिक सभा ता. ३० मार्च १९४१ दिवशीं अुपाध्यक्ष कर्नल चितळे यांच्या अध्यक्षतेखाली भरली. अितिवृत्त (१९४०) वाचून झाल्यावर जमाखर्च व अंदाजपत्रक मान्य करण्यात आले. यानंतर निवडणूक झाली ती येणेंप्रमाणे:—

अध्यक्ष— रावब. देशमूख. अुपाध्यक्ष— (१) सरदार मिरीकर व (२) कर्नल चितळे. कार्याध्यक्ष— श्री. हिवरगावकर. चिटणीस— (१) श्री. डावरे व (२) श्री. पटवर्धन.

या सभेनंतर मंडळाचा बारावा वार्षिक समारंभ प्रा. के. ना. वाटवे यांच्या अध्यक्षतेखाली साजरा करण्यात आला. अध्यक्षाचे 'वाङ्मयाचे प्रयोजन' या विषयावर अुद्बोधक व्याख्यान झाले. या प्रसंगी कर्नल चितळे यानी मंडळास रु. १० ची देणगी दिली व मॉडर्न हायस्कूलचे मुख्याध्यापक श्री. द. वि. आपटे हे मंडळाचे तहहयात सभासद झाले.

---

# अेक वाङ्मयीन अुणीव*

(लेखक– श्री. ग. वा. तगारे)

म. सा. पत्रिकेच्या अेप्रिल १९४१ च्या अंकातील वाङ्मय-समीक्षण वाचताना आनंद व अुद्वेग वाटला. विज्ञान, धर्म, समाज, अितिहास, साहित्य अि. शास्त्रातून व लघुकथा, कादंबरी, नाटक अि. ललितविषयातून स्वैरसंचार करणारी महाराष्ट्र-सरस्वती पाहून कोणाचें अन्तःकरण आनंद, आदर व अभिमानाने भरून जाणार नाही ? पण वाअीट अितकेच वाटलें की, ज्या कथावाङ्मयाने आज आमच्या मनावर अेवढी विलक्षण मोहिनी घातली त्याचा अैतिहासिक विकास पाहण्याचा आपण कधी प्रयत्न केला नाही. कथाप्रियता आम्हा भारतीयाचे वैशिष्ट्य आहे. वैदिक काळापासून (वस्तुतः त्यापूर्वीपासून) आजपर्यन्त प्रसिद्ध झालेल्या वाङ्मयांत कथावाङ्मयाने फारच मोठा विभाग व्यापला आहे. ऋग्वेदातील आख्यानसूक्तें[1], कृष्णयजुर्वेदातील यज्ञविषयक व अितर आख्यायिका[2], अैतरेय, तैत्तिरीय आणि शतपथब्राह्मणातील गोष्टी[3] व वैदिक देवताच्या हाकिकती यावरून अितक्या प्राचीन काळींसुद्धा गोष्टी रचण्याची आवड आपणांमध्ये होती असें दिसते.

कोणत्याहि गोष्टीचें मूळ वेदात शोधण्याच्या प्रवृत्तीला बळी पडून मीं वरील ओळी लिहिल्या नाहीत. संहिता, ब्राह्मण, आरण्यकें आणि अुपनिषदें यामधून अितस्ततः विखुरलेल्या कथा काल्पनिक असल्या व ग्रंथातील तात्त्विक चर्चेला अुदाहरणें वा पार्श्वभूमि पुरविण्यासाठी त्या अुपयोजल्या असल्या तरी त्यात आपल्या प्राचीन समाजस्थितीचे– धर्म व संस्कृति याचें– यथातथ्य चित्र रेखाटलेलें आढळतें.

वैदिक वाङ्मयानंतर शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छन्द व ज्योतिष हीं वेदांगें येतात. पण तीं सूत्रबद्ध असल्यामुळे कथावाङ्मयाच्या दृष्टीने आपल्यास त्याच्याशीं फारसें कर्तव्य नाही.

अुपनिषत्कालात आढळणारी विचारस्वातंत्र्याची लाट वाढत जाअून ६३ किंवा ३६३ पंथ बुद्धपूर्वकालात निर्माण झाले[4]. त्यापैकी वेदनिरपेक्ष असे दोनच संप्रदाय आज अस्तित्वांत आहेत. त्यांनी (जैन व बौद्धसंप्रदायानी) भारतीय कथावाङ्मयात बहुमोल भर घातली.

---

१ अुदा० :—ऋ.सं. १०.१०, १०.८५, १०.९५.

२ अुदा० :— तै.सं. १.७.१, २.१.३, २.३.५ अि. तसेंच मैत्रायणीसंहिता १.५.१२, १.१०.१३ अि.

३ अुदा० :– शुनःशेप, नचिकेता, मनु व मत्स्य (जलप्रलयाची हकीकत), च्यवन व सुकन्या अि. गोष्टी.

४ Dr. Farquahar–An Outline of the Religious Literature of India.

* "भारतीय कथावाङ्मयाचा अितिहास" लिहिण्याची आवश्यकता प्रतिपादन करताना मीं मध्ययुगीन प्राकृत कथावाङ्मयावर भर देण्याचें कारण तो अेक अुपेक्षित वाङ्मयविभाग आहे, संस्कृत कथावाङ्मयाबद्दल अनादर नव्हे. या विषयाला चालना मिळून मराठींत चिकित्सक दृष्टीने लिहिलेले वाङ्मयेतिहास व समीक्षणात्मक वाङ्मय निर्माण व्हावें ही अिच्छा आहे. — लेखक.

धर्मशिक्षणात कथावाङ्मयाचें महत्त्व महावीर व गौतमबुद्ध यांना आणि त्यांच्या शिष्य-प्रशिष्याना पुरेपूर माहीत होते. त्यामुळे प्रचलित कथाना आपणास अिष्ट असें वळण देणें, नवीन कथा निर्माण करणे आणि कथांच्या द्वारा आपला मतप्रसार अधिकांत अधिक करणें याचा पद्धतशीर प्रयत्न जैन व बौद्ध ग्रंथकारानी केला. खुद्दकनिकायातील जातककथा, भगवती, ज्ञाताधर्मकथा, अन्तकृद्दश अि. अंगग्रंथांतील जैन कथा ह्या त्याचे अुदाहरण आहे. हा निर्माण झालेला प्रदेश व काल यात पुष्कळच निकटपणा असल्यामुळे व दोघाचा अुद्देश सारखा असल्यामुळे जैनबौद्धकथांत साम्य बरेंच आढळेतें. आणि गंमत ही की, वेदप्रामाण्य बाजूला सारून मानवधर्माचा प्रसार करणाऱ्या या दोन प्रचारकाच्या संवादाच्या आणि प्रवचनाच्या आठवणींना त्याच्या अनुयायाकडून आप्तत्व प्राप्त झाले. मानवी स्वभावात श्रद्धा ही विलक्षण शक्ति आहे.

पाली आणि अर्धमागधी वाङ्मयाचा मध्ययुगीन वाङ्मयावर स्पष्ट ठसा अुमटलेला असल्यामुळे या भाषातील कथावाङ्मयाचें लक्षण लक्षात घेणं जरूर आहे. आज अस्तित्वांत असलेलें तिपिटकवाङ्मय ख्रि. पू. २४२ या वर्षी तिसऱ्या संगितींत संहित झाले. तथापि त्यांतील बरेंच कथावाङ्मय बुद्धकालीन व बुद्धपूर्वकालीन आहे.

पाली कथावाङ्मयात आपल्याला पुढील प्रकारच्या गोष्टी आढळतात.[७] नीतिपर किंवा वैराग्यपर कल्पितकथा (fables), २ दृष्टान्त (parables, allegories), ३ विनोदी व चातुर्य-दर्शक; अुदा. महापिंगलकथा (जातक क्र. २४०, तसेच जातक क्र. २१९), कुमजातक (जातक क्र. ५३१) ४ अद्भुतकथा किंवा साहसकथा वगैरे वगैरे. यापैकी काही कथा गद्य असून त्यात पद्यमय सुभाषित असते. काहीत सवादरूपी आख्याने आहेत, कांहीत पद्यमय संवाद व कथानक याचें मिश्रण आहे. काही आख्याने फार मोठी असून त्यात गद्यपद्याचे मिश्रण आहे. काही अेकपानी लघुतम कथा असून काही मोठ्या कादंबऱ्या आहेत. समाजाच्या निरनिराळ्या थरातून येणाऱ्या सर्व लोकाना आकर्षण वाटण्याअितकी विविधता आणि सागण्यात शोभणारी व वाचताना कंटाळवाणी वाटणारी पुनरुक्ति त्यात फार आहे. 'आणि' हें अुभयान्वयी अव्यय व सर्वनामे याचा अुपयोग बौद्ध भिक्षूंना माहीत होता की नाही अशी शंका ओल्डेनबर्गने या पुनरुक्तीमुळे घेतली होती.

अर्धमागधी कथावाङ्मय हें मध्ययुगीन कथावाङ्मयाच्या दृष्टीने अधिक महत्त्वाचें आहे.

५ हें साम्य कथापुरतें मर्यादित नसून अनेक गाथा संस्कृत, पाली व अर्धमागधी ग्रंथांत समान आढळतात. चार्पेंटियरच्या अुत्त ाध्ययनसूत्राच्या टिप्पणीत अशा अनेक गाथा त्याने नमूद केल्या आहेत. 'मिथिला जळली तरी माझें कांहीहि जळत नाही' ही जनकाची अुक्ति त्यापैकी अेक आहे.

६ याबद्दल अधिक माहिती Rhys Davids कृत Dialogues of the Buddha, Buddhist India, Winternitz कृत Indian Literature, मेहेताकृत Pre-Buddhist India या व पाली ग्रंथांच्या प्रस्तावना व भाषांतरें यांतून मिळेल. श्री. मेहेतांनी सर्व जातककथा बुद्ध-पूर्व आहेत असं गृहीत धरून आपल्या प्रबंधास 'बुद्धपूर्वभारतवर्ष' असें नांव दिले आहे. सर्व जातककथा बुद्धपूर्व नाहात. हा दोष सोडला तर त्यांनी जातककथांचा चांगला अभ्यास केलेला दिसतो.

७ पालीकथ वाङ्मय म्हणजे नुसत्या जातककथा नव्हे. जातककथा हा पालीकथावाङ्मयाचा अेक महत्त्वाचा भाग आहे अितकेंच. विनय, सुत्त व अभिधम्म या पिटकातील रूक्ष अशा विनयपिटकांतसुद्धा दृष्टान्तादाखल कथा व कांही प्राचीन दंतकथा आढळतात. सुत्तपिटक तर अघड अुघड कथामहोदधि आहे. त्यात कांही कथा बुद्धपूर्वकालीन आहेत पण बौद्धांचा हात त्यावरून फिरल्यामुळे त्यांना धार्मिक स्वरूप आलें आहे. त्यापैकी कांही कल्पितकथा (fables) असून अिसापनीति, पंचतंत्र, हितोपदेश याप्रमाणे नीतितत्त्वें ठसवणें हें त्यांचें कार्य आहे. सिंहाचें कातडें पांघरणारें गाढव (जातककथा क्र. १८९), कोल्ह्याच्या

आज श्वेतांबर जैनांचाच आगम फक्त आपल्यास अुपलब्ध आहे. दिगंबरांचा आगम अुपलब्ध नसला तरी कथावाङ्मयास 'प्रथमानुयोग' म्हणून आगमांत ते पहिलें स्थान देतात. श्वेतांबराच्या आगमांत ४५-४६ ग्रंथ आहेत. त्यांपैकी ११ ग्रंथ 'अंग' या नावाने प्रसिद्ध आहेत. हा विभाग सर्वांत महत्त्वाचा आहे. या अंगग्रंथांपैकी ६ वें ज्ञाताधर्मकथांग, ८ वें अंतकृद्दशांग, ९ वें अनुत्तरोपपातिक हे कथासंग्रह आहेत. ३ रें अंग स्थानांग सूत्रमय असून त्यांत अनेक कथांचे सूत्रमय अुल्लेख आहेत व त्यांवरील प्रख्यात टीकाकार अभयदेव याने त्यांचें स्पष्टीकरण केलें आहे. कांही ठिकाणीं महावीर, स्त्रीतीर्थंकर मल्ली, भावी तीर्थंकर महापद्म यांच्या गोष्टी सूत्रांनीच सविस्तर सांगितल्या आहेत. ५ वें व अतिशय महत्त्वाचें अंग भगवती यांत आपल्यास आजीवक तीर्थंकर मंखली गोशाल, तसेंच पूरण, तामलि इत्यादिकांच्या गोष्टी आढळतात. यांखेरीज 'अुत्तराध्ययन' किंवा 'दशवैकालिक' सूत्राच्या तात्त्विक भागाला पार्श्वभूमि म्हणून कांही गोष्टी आहेत त्या वेगळ्या. सारांश पाली वाङ्मयाप्रमाणे अर्धमागधी वाङ्मयसुद्धा कथांनी संपन्न आहे. त्या वाङ्मयाप्रमाणे या वाङ्मयातसुद्धा पौराणिक कथा, अैतिहासिक गोष्टी, रूपकें, कल्पित नीतिकथा, दृष्टान्त वगैरे सर्व प्रकार आढळतात. याहि कथा मूळ गुरुशिष्यपरंपरेने तोंडी रक्षिल्यामुळे यांत पुनरुक्ति फार आढळते. या वाङ्मयाच्या शेवटच्या संहितीकरणाच्या वेळीं (अि. स. चें ६ वे शतक) पुष्कळ वर्णनें 'वर्णक' असा शब्द वापरून गाळलीं तरी अजून हा दोष पुष्कळच शिल्लक आहे. महाराष्ट्री किंवा शौरसेनी भाषातील मध्ययुगीन वाङ्मय (निदान आज प्रसिद्ध असलेलें) पुष्कळ अंशीं जैनानी लिहिल्यामुळे (कारण ब्राम्हण बहुधा संस्कृतमध्ये लिहीत) अर्धमागधी वाङ्मयाची छाप त्यावर असणें अपरिहार्य आहे. आणि मध्ययुगीन प्राकृत वाङ्मयाचा अभ्यास करताना अर्धमागधी वाङ्मय अभ्यासणें आवश्यक झालें आहे.

प्राकृत कथावाङ्मय फार अफाट आहे. महाकाव्ये, पुराणे, चरित्रें, नाटकें, काव्यें, चंपू, दंतकथा, आख्यानें, रूपकें अि. विविध रूपानी ते नटलें आहे. बहुजनसमाजांत वावरणाऱ्या कवींनी बहुजनसमाजाच्या भाषेंत बहुजनसमाजासाठी केलेल्या लिखाणात मध्ययुगीन चालीरीती, समाजव्यवस्था, राजकीय स्थिति, धर्म व नीतिविषयक कल्पना, वाक्प्रचार व म्हणी

काव्याला बळी पडून परस्परास मारणारे सिंह व बैल (जातक क्र. ३४९), सुंदर तलावांत बगळ्याबरोबर जाणारा मासा, माकड आणि सुसर अि. अनेक गोष्टी पाली वाङ्मयांत आढळतात. स्त्रियांच्या कृतघ्नपणाबद्दल किंवा कपटीपणाबद्दल पुष्कळ गोष्टी निर्माण करून वैराग्यप्रवृत्तीचा विकास करण्याचा प्रयत्न जाणूनबुजून केलेला दिसतो. जातक क्र. ३८३ मधील 'मांजरी व कोंबडा' ही कल्पित कथा, नवऱ्याचें रक्त पिअून स्वतःचा प्राण वांचवणाऱ्या बायकोचा कृतघ्नपणा (दशकुमारचरितांत 'किं क्रूरं स्त्रीहृदयं' याच्या स्पष्टीकरणार्थ आलेली) तसेंच जातक क्र. ६१-६६ यांमध्ये तर अशा गोष्टींची मालिका दिली आहे. जलपर्यटनाच्या कथांत फुटलेल्या गलबतावरील नाविकांना यक्षिणी प्रथम फसवून आपल्या बेटावर नेअून प्रेम दाखवतात व नंतर मारून टाकतात असें आढळतें. जैन आगमात अशाच गोष्टी आहेत (अुदा० माकंदी अध्ययन ज्ञाताधर्मकथा) युरोपियन वाङ्मयांतून या गोष्टी अिकडे आल्या असाव्या असें विंटरनिट्झचें मत आहे. मेक्सिकोपर्यंत हिंदु वसाहती होत्या हें सिद्ध झाल्यामुळे हिंदुस्थानांतील अर्वाचीन काळातल्या समुद्रगमननिषेधावर बनवलेल्या मतांस आता अितिहासजमा समजलें पाहिजे. या कथात राजा कल्मापपाद व त्याचा बौद्धधर्मस्वीकार, विधुरपंडित जातक (धृतराष्ट्राचा भाअू विदुर याचें बौद्ध लेखणीतून अुतरलेलें चरित्र), महाजनक जातक (जातक क्र. ५३९), ऋष्यशृंग आख्यान (जातक क्र. ५२३,५२६), सामकथा (जातक क्र. ५४०) अथवा श्रावणकथा, वेस्संतर जातक (जातक क्र. ५४७) अथवा बौद्ध हरिश्चंद्राख्यान अि. अनेक जातककथा अुघड अुघड बुद्धपूर्व व हिंदू आहेत. विंटरनिट्झच्या लक्षांत यांतील साम्य येवो किंवा न येवो. भारतीय कथा- ती वैदिक अथवा अवैदिक पंथाची असो— परस्परांशीं भिन्न अथवा परस्परनिरपेक्ष नाहीं अेवढेंच मला येथे दाखवावयाचें आहे.

अि. अि. अनेक गोष्टी प्रतिबिंबित झालेल्या आढळल्या तर नवल नाही. त्यामुळे सामाजिक अितिहासकाराम याचे महत्त्व अमोल आहे या वाङ्मयाचा बराचसा भाग महाराष्ट्री, शौरसेनी (व पैशाची) या भाषात व हिंदुस्थानातील अर्वाचीन आर्यभाषाचें पूर्वरूप 'अपभ्रंश' यांतसुद्धा लिहिला गेला आहे. हें सर्व वाङ्मय अजून प्रकाशले गेलें नसले तरी प्रसिद्ध झालेल्या वाङ्मयावरून हा आपल्या पूर्वजाचा बहुमोल ठेवा आहे असे दिसतें. स्वमतप्रचार हा यातील प्रधान हेतु असून मनरंजन ही गौण बाब होती. त्यामुळे प्राकृत महाकाव्यें, चरित्रें किंवा पुराणें वाचताना वेळीं-अवेळीं प्रवचनाची झोड आणि जिनस्तुतीचा वर्षाव केलेला त्यात आढळतो. कोणताहि वीर किंवा मोठा मनुष्य मागील जन्मीच्या कर्माने श्रेष्ठपदास पोचतो हें कर्मवादाचें तत्त्व बिंबवण्यासाठी कोणत्या तरी केवली (ब्रह्मज्ञान्या)शीं त्याची गाठ पडून (बहुधा जैनधर्मातील तत्त्वाप्रमाणे) गेल्या पाच सात जन्मांपैकी कशात तरी घडलेले पुण्यकृत्य व त्या जन्मांचा अितिहास व तो किंवा ती मोक्षाला पोहोचेपर्यंतच्या अनेक जन्मात घडणारें भविष्यकथन केलेले आढळतें. यामुळे कथेमध्ये कथा, अुपकथा याची विलक्षण गुंतागुंत झालेलीं कथानकें निर्माण करून काव्याचा शेवट होअीपर्यंत वाचकाची अुत्सुकता ताणून धरण्याचा प्रयत्न पुष्कळदा केलेला आढळतो. हरिभद्रसूरीने केलेल्या कथाच्या वर्गीकरणातील 'कामकथा' जैनश्रमणांना नापसंत असल्या तरी बहुजनसमाजाला त्याबद्दल सनातन आकर्षण असणार. अशा वेळीं स्वतःच्या धर्मतत्त्वाना धक्का न देता अेखाद्या राजपुत्राला शिकारीला पाठवून त्याला प्रेमपाशांत गोवण्यापेक्षा त्याला अेका बेताल घोड्यावर बसवून, वाट चुकवून अेखाद्या राजकन्येजवळ नेणे श्रेयस्कर असतें आणि हाच मार्ग बहुधा मध्ययुगीन जैनलेखक अंगीकारतात.

मध्ययुगीन जैन कथाचे विषयसुद्धा विविध आहेत. तथापि स्थूल मानाने त्यांचे पुढीलप्रमाणे विभाग पडतील: १ रामायणकथा, २ महाभारतीय कथा, ३ तीर्थंकरचरितें, ४ शलाकापुरुषचरितें, ५ 'अैतिहासिक' प्रबंध, ६ अद्‌भुत कथा, ७ धर्मकथा अथवा धार्मिक कादंबऱ्या अि. अि.

राम, कृष्ण, द्रौपदी, नल, दमयंती, सगर वगैरे लोकाच्या छोट्यामोठ्या गोष्टी या लेखकानी वापरल्या असे नसून या कथावर मोठमोठी पुस्तकें लिहिलीं आणि कित्येकदा या कथाच्या पार्श्वभूमीवर नवीन कल्पितकथा रचण्याची संधि या लेखकानी साधली आहे. उदाहरणार्थ सगराचे ६०००० मुलगे वारले ही संधि साधून शांतवनपर भाषणात जगाचें क्षणभंगुरत्व आणि त्या त्या मुलाच्या पूर्वजन्मातील कर्माचें प्रायश्चित्त त्याला मिळाल्याची कथा निर्माण करण्याचा प्रयत्न आपल्याला आढळतो. महाभारतातील अभिमन्युवधपर्वातील षोडषराजकीय आख्यान त्या लेखकासमोर असण्याचा संभव आहे. तसेच नलदमयन्ती आख्यानात त्या जोडप्यातील विरहाचा काल दमयन्तीने जैनधर्मप्रसारात घालवला असे दाखविलें आहे. (सोमप्रभकृत कुमारपालप्रतिबोध G.O.S. XIV.).

अतिशय प्राचीन जैनरामकथा विमलसूरीच्या पद्मचरित्रात आढळते. त्यातील राम जैनधर्माचा अनुयायी भासवला आहे. अुदाहरणार्थ सीताहरणाच्या वेळीं राम हा मृगयेला गेला नसून राक्षसाशीं लढण्यात गुंतला आहे. अि. स. ६७८ मध्ये रविषेणाने याच विषयावर पद्मपुराण लिहिलें. रामकथा गुणभद्राच्या (९ वे शतक) अुत्तरपुराणाच्या ६८ व्या पर्वात आणि हेमचंद्राच्या (१२ वे शतक) त्रिषष्टिशलाकापुरुषचरित्रात (७वें पर्व) आढळते.

महाभारतातील कथा जिनसेनाच्या (९ वें शतक) हरिवंशपुराणात सविस्तर आहे. कृष्ण आणि बलरामाच्या गोष्टी जैनपद्धतीने सागितल्या आहेत अितकेच नव्हे तर महावीराचा शिष्य गौतम

हा कथा सांगणारा असून वेळप्रसंगीं जैनधर्माचीं प्रवचनें त्यात घातलीं आहेत. अि.स.१२००च्या सुमारास मलधारिदेवप्रभासूरीने पाडवचरित लिहिलें. तथापि जैनमहाभारत म्हणून प्रसिद्ध असलेलें पाण्डवपुराण शुभचंद्राने सन १५५१ मध्ये केलें आहे.

जैनधर्मातील सर्वश्रेष्ठ प्रचारक—तीर्थंकर—२४ असले तरी त्यापैकी लेखकाना आवडणारे ऋषभ, शांतिनाथ, अरिष्टनेमी अथवा नेमिनाथ, पार्श्व व महावीर अेवढेच दिसतात. यापैकी ऋषभ हा पहिला तीर्थंकर अिक्ष्वाकुवंशांतील असल्यामुळे रामकथेच्या प्राथमिक विभागात त्याचा संबंध येतो. आपल्या भागवतात सुद्धा ऋषभदेवाचें चरित्र आलिलें आहे.

कृष्ण व महाभारतीय वीर हे अरिष्टनेमीचे समकालीन होते आणि त्याच्या व अरिष्टनेमीच्या गोष्टी अंतकृद्दश, उत्तराध्ययन अि. प्राचीन जैन आगमग्रंथातून सुद्धा आढळून येतात. अुपर्युक्त पाचहि तीर्थंकराचीं चरित्रें अेकत्र अशीं महापुरुपचरितांत मेरुतुंगाने गाअिलीं आहेत, पण नेमिनाथचरितावर सुराचार्य, मलधारि हेमचंद्र, हरिभद्र (१२ व्या शतकातील), वाग्भट अि. नी स्वतंत्र काव्यें लिहिलीं. अि.स पूर्वी ८ व्या शतकात होअून गेलेल्या पार्श्वनाथाचें चरित्र वादिराज, माणिक्यचंद्र, सकलकीर्ति, अुदयवीरगणि अि. कवींनी गाअिलें आहे. यापैकी माणिक्यचंद्र व सकलकीर्ति यानी शातिनाथचरित्र लिहिले. लक्ष्मणगणीने ७ वा तीर्थंकर सुपार्श्वनाथ याचें प्रचंड चरित्र लिहिलेलें आहे. प्रसिद्ध असलेल्या प्राकृत वाङ्मयातील काही महत्त्वाचे ग्रंथ व ग्रंथकार याचा अुल्लेख प्राकृत वाङ्मयाचा अफाटपणा दाखवण्यासाठी केला. आपल्या दृष्टीने महत्त्वाचे ग्रंथ म्हणजे 'महापुराण' अथवा जैनधर्मात होअून गेलेल्या ६३ महापुरुषाचीं (शलाकापुरुषाचीं) अेकत्रित केलेलीं चरित्रें होत. या ६३ महापुरुषात २४ तीर्थंकर (अर्हत् मतप्रसारक), १२ चक्रवर्ती राजे आणि २७ प्राचीन वीर (९ वासुदेव, ९ बलदेव, ९ प्रतिवासुदेव) याचा समावेश होतो. मौज ही की तीर्थंकर, बलदेव किंवा वासुदेव याचें व्यक्तित्व जाअून त्याना जातीचें स्वरूप आले आहे. त्याच्या चरित्राचें तपशील—त्याच्या माताना पडणारी स्वप्नें, आयुष्यात होणारे संस्कार अि.— सर्व सारखें आहे. व्यक्ति आणि स्थलाचीं नावें बदललीं म्हणजे झालें[८]. या ६३ महापुरुषाचीं चरित्रें श्वेतांबर व दिगंबर लेखकानी मोठ्या भाविकपणाने गाअिलीं आहेत.

आज प्रसिद्ध झालेल्या महापुराणविषयक ग्रंथापैकी पहिला ग्रंथ जिनसेनकृत आदिपुराण (अि. स. ८५०-८७५) हा होय. त्याच्या ग्रंथाचें खरें नाव 'त्रिषष्टिलक्षणमहापुराणसंग्रह' आहे. यावरून त्याच्या डोळ्यासमोर अुपर्युक्त ६३ महापुरुषाचें चरित्र लिहावयाचें होतें. तथापि आदिपुराणाचीं पहिलीं ४२ पर्वे लिहिल्यावर तो बहुधा वारला असावा. कारण आदिपुराणाचीं अुरलेली ५ पर्वे व महापुराणाचा अुत्तरार्ध 'अुत्तरपुराण' त्याचा शिष्य गुणभद्र याने शके ८२० (अि. स. ८९८) मध्ये वंकापूर येथे पुरा करून गुरूच्या कार्याचा शेवट लावला. त्या वेळीं वंकापूर येथे लोकादित्य राजा असून राष्ट्रकूट राजा अकालवर्ष तथा दुसरा कृष्ण (८८०-९१४ अि.स.) याचा तो मांडलीक होता. हे महापुराण संस्कृतमध्ये असून दिगंबरपंथाचें आहे. त्यानंतर दुसरें महापुराण पुष्पदंताचे (अि.स.चे १० वें शतक) आहे.

तिसरें महापुराण हेमचंद्रकृत 'त्रिषष्टिशलाकापुरुषचरित' असून हे श्वेतांबरपंथाचे आहे. हें संस्कृतमध्ये असून सन ११७०-७२ च्या सुमारास पुरें झालें असावें.

वि. सं. १९६५ च्या जैनग्रंथावलीत शीलाचार्याने (अि. स. ८८८) प्राकृतमध्ये

८ डॉ. वैद्यांनी सम्पादलेल्या महापुराणाचें परिशिष्टात किंवा जैनीकृत Outlines of Jainism मध्ये तीर्थंकर-चरित्रांतील तपशीलाचें अेक कोष्टक दिलें आहे.

लिहिलेल्या महापुराणाचा अुल्लेख असून अमरसूरिनामक लेखकाने याच विषयावर अेक प्राकृत ग्रंथ लिहिला आहे. तसेंच पाटण व अहमदाबाद येथील जैनभाण्डारांत मेरतुंगकृत संस्कृत महापुराण आहे असें अुपर्युक्त ग्रंथावलीवरून कळते.

'अैतिहासिक प्रबंध' हे अैतिहासिक नाहीत आणि प्रबंध (thesis) तर नाहीतच नाहीत. अैतिहासिक व्यक्तींच्या नावावर असलेले कथांचे वलय त्यात आढळतें. प्रभाचंद्राचें प्रभावक-चरित्र, मेरुतुंगाचा प्रबंधचिंतामणि, राजशेखरकृत प्रबंधकोश अि. ग्रंथ 'प्रबंध' या सदरांत मोडतात. अद्भुत कथा (Fairy Tales) सर्वत्रच विखुरल्या असल्यामुळे त्याबद्दल स्वतंत्र लिहिण्याचें कारण नाही.

पादलिप्ताने 'तरंगवती' नामक धर्मकथा अथवा धार्मिक कादंबरी लिहिल्यापासून अनेक धर्मकथा लिहिल्या गेल्या. हरिभद्रकृत समरादित्यकथा, धनपालकृत भविष्यदत्तकथा, सिद्धर्षिकृत अुपमितिभवप्रपंचकथा अि. अनेक धार्मिक कादंबऱ्या त्या काळीं लिहिल्या गेल्या.

याखेरीज कालकाचार्य, रत्नचूडा, पापबुद्धि, धर्मबुद्धि यांच्या गोष्टी, अॅरेबियन् नाअिट्स-प्रमाणे असलेले सम्यक्त्वकौमुदी, कथाकोश, कथामहोदधि अि कथासंग्रह किती तरी आहेत. प्राकृतकथावाङ्मयाचा विस्तार अितका मोठा आहे की त्याची योग्य कल्पना देण्यास स्वतंत्र ग्रंथ लिहिला पाहिजे. तथापि वर दिलेल्या जंत्रीवरून मध्ययुगीन कथावाङ्मयाचा अेक भाग जैन-कथावाङ्मय किती प्रचण्ड आहे याची अधुक कल्पना येअील. पुराणें, चरित्रे व कथनपर काव्यें अेका माळेंत घेण्याचें कारण पुराणात व चरित्रात जैनधर्मांतील अेक अेक तत्त्व प्रतिपादण्यास अनेक गोष्टी सांगितल्या आहेत.

हा मजकूर लिहिताना मी आपल्या अितिहासपुराणांना किंवा कथासरित्सागरासारख्या कथामहोदधीला विसरलों नाहीं. संस्कृतमधील कादंबरी-दशकुमारचरितादि ग्रंथ, चम्पू व चरित्र-वाङ्मय यांना विसरणें म्हणजे जागतिक वाङ्मयांतील अेका महत्त्वाच्या भागाला मुकणें होय; परंतु संस्कृतवाङ्मयावर बरेंच लिखाण प्रसिद्ध झाल्यामुळे त्यावर या ठिकाणीं लिहिण्याचें कारण नाही.

संस्कृत, प्राकृत (पाली व अर्धमागधी यांचा समावेश यातच होतो) आणि अपभ्रंश या भाषांतील कथांतून आम्हा भारतवासीयांची प्रतिभा नटली आहे.[१०] वेदपूर्वकालापासून वाहत आलेल्या या सरस्वतीमध्ये निरनिराळे मानव-संघ व त्यांच्या कलाकृतींचे अुपप्रवाह येअून मिळाल्यामुळे हिला नितान्तसौंदर्य व गांभीर्य आलें आहे. निरनिराळ्या कालखंडात होअून गेलेल्या कथाविभागाचा चिकित्सक दृष्टीने सूक्ष्म अभ्यास करून लिहिलेला अितिहास आपल्या भाषेंत अत्यन्त बहुमोल भर समजली जाअील. महाराष्ट्रातील विद्वान लोकानी मनात आणल्यास "भारतीय कथावाङ्मयाचा अितिहास" हें वाङ्मयेतिहासातील मोकळे दालन अुत्तमोत्तम ग्रंथानी सुशोभित होअून आपल्या प्रतिभेचे निरनिराळे पैलू माझ्यासारख्या विद्यार्थ्याला पाहण्यास मिळून हल्लीच्या कथावाङ्मयाकडे पाहण्याची नवीन दृष्टि लाभेल. महाराष्ट्रातील विद्वान अिकडे लक्ष देतील का ?

---

९ अधिक माहिती : Keith, Winternitz, Glassenhap यांच्या हिंदी वाङ्मयेतिहासांतून मिळेल

१० या भाषांप्रमाणे या कथासुद्धा परस्परनिरपेक्ष नाहीत. प्राचीन संस्कृत, पाली, अर्धमागधी कथांप्रमाणे मध्ययुगीन संस्कृत, प्राकृत व अपभ्रंश भाषांतील कथांत अुसनवारी, विडंबन, संस्करण वगैरे सर्व प्रकार होत असत. हा फार मोठा विषय असल्यामुळे या बाबतींत तज्ज्ञांनीच अधिकारयुक्त वाणीने बोलणें बरें.

# यादवकालीन मराठींतील द्विरुक्त शब्द*

("यादवकालीन मराठीचा भाषाशास्त्रीय अभ्यास" या आगामी ग्रंथांतून)



( लेखक : डॉ. शंकर गोपाळ तुळपुळे )

[ टीपः— पुढील लेखातील अुदाहरणें ज्या यादवकालीन ग्रंथातील आहेत त्यांचीं संक्षेपचिन्हें अशीं— ज्ञा– ज्ञानेश्वरी; अु– अुद्धवगीता; शि– शिशुपालवध; ऋ– ऋद्धिपुरवर्णन; व– वच्छहरण; दृ– दृष्टान्तपाठ; स्मृ– स्मृतिस्थळ; ली– लीळाचरित्र; ध. अु-पू.– धवळे, अुत्तरार्ध, पूर्वार्ध; मास्व– मातृकीरुक्मिणीस्वयंवर ]

**यादवमराठींतील द्विरुक्त शब्द.** शब्दाची किंवा त्यातील काही भागाची द्विरुक्ति करून नवीन शब्द वा शब्दाची जोडी साधणे हा यादव-मराठीतील शब्दसिद्धीचा अेक महत्त्वाचा प्रकार आहे. द्विरुक्तीच्या या सदराखाली ध्वन्यनुकारी शब्द, सादशब्द, सामासिक शब्द, पौनःपुन्यवाचक शब्द अित्यादि अनेक भाग येतात. हे सर्व प्रकार मराठीने संस्कृत-महाराष्ट्री-अपभ्रंश या परंपरेनेच घेतले आहेत. मात्र साद-शब्दाची प्रथा द्राविडीपासून आली. शब्दसिद्धीचे अितर प्रकार संस्कृत-महाराष्ट्रींत आहेतच. संस्कृतातील 'किकिराकृ,' 'मस्मसाकृ,' 'घुरघुरायते', 'कोकिल' अित्यादि नादानुकारी, व 'प्राचीं प्राचीम्', 'गृहेगृहे', 'अुत्तरोत्तर', 'पूर्वापूर्व', 'अितरेतर' वगैरे आम्रेडित शब्द प्रसिद्धच आहेत. वैदिक संस्कृतात 'पिब पिब', 'यजस्व यजस्व', 'स्तुहि स्तुहि' अित्यादि द्विरुक्त क्रियापदें सापडतात. संस्कृतातील शब्दसिद्धीच्या या प्रकारांची वाकरनागल[१] आणि रेनो[२] यानी दिलेलीं अुदाहरणें पाहून कल्पना येते. प्राकृतातील 'अन्नमन्न', 'अेक्कमेक्क', 'खंडाखंडी', 'घुम्माघुम्मी', 'अलट्टपलट्ट', 'कअिल्लअिल्ल' हे प्राकृतांतील द्विरुक्त शब्द संस्कृत-पालीच्या धर्तीवरच आहेत. प्राकृतातील द्विरुक्तशब्दांची मीमांसा डॉ. कात्रे[३] यांनी विस्ताराने केली आहे, त्यावरून यादव-मराठीने शब्दसिद्धीचीं हीं साधनें परंपरेने कशी अुचललीं याची कल्पना येअील. डॉ. कात्रे म्हणतात—

"All these different types in reality go to form but one category which plays an important role in the development of Middle and Modern Indo-Aryan languages, and the term 'Reduplication' properly expresses the totality of these formations."[४] वर्तमान मराठींत द्विरुक्त शब्दाची संख्या साधारण १५०० पर्यंत मानली जाते. पुढे यादव मराठींतील द्विरुक्त शब्दाचे प्रकार सोदाहरण व सटीक देतो—

---

* Reduplicatives in Yadava Marathi.

१ Wackernagel: Altindische Grammatik II, 1, pp.6-9, 329, 143.

२ L. Renou, in B. S O. S. Vol. X.

३ S. M. Katre : "Reduplicatives in Indo-Aryan",—Bulletin of the Deccan College Research Institute Vol.I, No.1.

४ Ibid, p.60.

(१) **ध्वन्यनुकारी** :— नादानुरोधाने शब्द बनविणें हा प्रत्येक भाषेचा स्वभावच आहे. मराठीने ध्वन्यनुकारी शब्दाची प्रथा द्राविडीपासून घेतली असावी हें कांही पंडितांचें म्हणणं कसे भ्रांत आहे हें मीं पुढील भागांत विस्ताराने दाखविलें आहेच. संस्कृत-महाराष्ट्री-पेक्षा अपभ्रंशात ध्वन्यनुकारी शब्दाचें प्राबल्य विशेष आढळतें. अुदाहरणार्थ, 'णायकुमारचरिउ' या अपभ्रंश काव्यातील काही शब्द पाहा—

"कणरणंति, किलकिलंति, गुमुगुमुगुमंत, जिगिजिगिजिगंत, झलझलह, टणटणटणंत, ललललंति, सलमलंति." अितक्या प्रमाणात नव्हे, पण यादव-मराठीने अपभ्रंशाचीच परंपरा पुढे चालू केली. येथे द्राविडी संसर्गाचा अगदी संबंध नाही. काही ध्वन्यनुकारी शब्द पाहा—

| | |
|---|---|
| झिळिमिळी अु. ७४ | खळाळ अु. ११० |
| कडाडिले अु. १०१ | झळाल अु. १९२ |
| कुडकुडा अु. ३१६ | कडकडी, गडबडी अु. २०४ |
| गुळळा ऋ. ५३८ | झीगीमीगी अु. ३४० |
| झाजेरे ऋ. ५३३ | खुरखुरित अु. ३६३ |
| बोंबी ऋ. ५६९ | घुरघुरी, खाकरी अु. २८५ |
| गजंबु ध. अु. ३२ | टाहुवा ऋ. ९१ |
| झनानिती मा. स्व. ३० | मीटिमीटि ऋ. ५१४ |
| कीलुकीलु ली. १-२२ | रूं रूं, ठकठक स्मृ. ६१ |
| बुडडा ज्ञा. ७-६७. | पचकरूनि थुंकली स्मृ. १०६ |

(२) **सादशब्द** (Echo-words[१]). सादशब्दात पहिल्या शब्दाची संपूर्ण पुनरुक्ति होत नसून किंचित् पुनरुक्ति होते. मूळ शब्दाचा अर्थ व नाद हे सादशब्दात कायम असतात. परंतु मूळ शब्दातील अेका वर्णाचा मात्र सादशब्दात बदल होतो (अु. घोडा-बिडा; घर-बीर). सादशब्दाना 'किंचित् द्विरुक्त' शब्द म्हणता येअील. परंतु मूळ अिंग्रजी शब्दाचे 'सादशब्द' हें भाषांतरच अधिक बरें वाटते.

वर्तमान भारतीय आर्य भाषात सादशब्द साधण्याची रीत द्राविडी भाषापासून आली आहे. सादशब्दातील किंचित् द्विरुक्तीचा सादवर्ण प्रत्येक भाषेपुरता स्वतंत्र ठरलेला असतो, व त्याचा उपयोग 'वगैरे वगैरे' चा अर्थ ध्वनित करण्याकडे होतो. संस्कृतात, महाराष्ट्रींत आणि अपभ्रंशात सादशब्द नाहीत. यादव-मराठींत ते आहेत. मात्र वर्तमान-मराठींत जसा 'बि' हा सादवर्ण निश्चित आहे तसा तो यादवकालीं नव्हता. द्राविडीपासून ही प्रथा नुकतीच घेतल्याने यादव-मराठी अेकच सादवर्ण न वापरता 'त, द, प, ब, ग' असे अनेक वापरी. ही विविधता पुढील अुदाहरणात दिसेल—

| | |
|---|---|
| पाटेफुटे उ. ११२ | अशेषविशेष द. १०२ |
| बळोवळी उ. २२२ | उटेरेटे शि. १३६ |
| चळबळ उ. ४५२ | पेणोवेणा शि. ५७६ |
| जातीजुती ध. उ. ५४ | बाहिरीबाहिरी शि. ४९४ |
| गीतामातु स्मृ. ८९ | आहाळबाहाळीं शि. ४११ |

१ Dr. S K. Chatterji : 'Origin and Development of Bengali Appdx. B.

लाळले-ताळले स्मृ. १७५ धडगोड दृ. ९४
हळवैली-पळवैली स्मृ. १७५ आफळसाफळ दृ. ८८
नेटेंबोटें उ. ७ उगुमुगु ली. ३-४३
हाडगुड ली. १-४७; दृ. ९२

आता वर्तमान भारतीय-आर्य भाषातील कांही सादवर्ण पाहाः –

| | | | |
|---|---|---|---|
| मराठी | ... बि | : | माणसंबिणसं, आंबेबिंबे, साबूबिबू |
| बंगाली | ... ट | : | घोराटोरा |
| हिंदी | ... अु | : | घोडाअुडा |
| गुजराती | ... बो | : | घोडोबोडो |
| तामीळ | ... कि | : | नीरुकीरु |
| कानडी | ... गि | : | कुडिरेगिडिरे, नीरुगीरु |

सादशब्द बनविण्याची ही लकब संस्कृत-प्राकृतांत नाही. मराठींत ती द्राविडीपासून आली. यादव-मराठींत तर कानडीचा 'गि' हा सादवर्ण वापरून साधलेले दोन सादशब्द मीं टिपले आहेत. ते असे–

"यऱ्हवीं थडिये पडतां : तरि **हाडगुड** नुरतें : मरतां ।" (लीळा.१–४७)
"समेकडे पाहे तो पडे : तयाचे **हाडगुड नुरे** । ' (दृ.९२)
"**गीतमातुचां** ठाइं ।" (स्मृ.८९)

(का० 'मातु' –का० सादशब्द ' मातगीत––म० गीतमातु.) येथे मूळशब्द आणि सादशब्द दोन्ही कानडी आहेत. फक्त, मराठीने त्यांची उलटापालट केली आहे. आता, द्राविडी धर्तीवर बनविलेले इतर शब्द पाहा–

'आमतें गोसावीं **लाळले ताळले**' –स्मृ. १७५
'**हळवैली पळवैली**' –लीळा. ३, पा. ३८
'**पाटेफुटे**' –अुद्धव. १२२
'**झीगीमिगी**'–,, ३४०, ६४४
'सेवटीं नेति भणौनि आपैसी : **गजबजीमिली** ' –शि. ८६

वरील सादशब्दांत सादशब्द साधण्याचें साधन, म्हणजे सादवर्ण, वर्तमान मराठीप्रमाणे एकच नाही, तर " त, प, ब, फ, म " असे विविध आहेत. वर्तमान मराठींत ' बि ' वापरण्याची एकविधता आहे, तर यादव-मराठींत विविधता आहे. तात्पर्य, कानडीपासून मराठीने तत्काळीं ही साद-शब्द-सिद्धि नुकतीच घेतली होती, व अनेक वर्णांचे प्रकार यादव-मराठी करून पाहत होती. पुढे यांतील ' बि ' निश्चित होऊन अितर गळले.

**(३) आम्रेडित** :—या प्रकारात नामें, सर्वनामें, विशेषणें, संख्यावाचकें, आणि क्रियापदें यांची द्विरुक्ति होतांना दिसते. व्यापकत्वाचा अर्थ सूचित असतो. अु. ह.

दिहेंदिहूं शि. ८३७ धालाधाली शि. १००६
लांबलांबे शि. ८९१ दडवादडवी शि. ४८०

१ अद्यापिहि कर्नाटकांतील महाराष्ट्रीयांच्या तोंडीं ' खुर्ची-गिर्ची, ' ' मराठी-गिराठी ', ' मास्तर-गिस्तर ' असे प्रयोग ऐकू येतात.

| | |
|---|---|
| आणआणूं शि. ८१ | आनानीं अु. ७२८ |
| वळितपळित अु. ५२१ | खणौखणीं ध. अु. ५७ |
| सीतेंसीते ली. १-१९ | दीपोदीपीं ध. ड. ४१ |
| खेंवाखेंवी ली. ३ | आळुमाळु ज्ञा. ९-५२९ |
| सारवासारवी शि. ५०१ | पळपाळित दृ. ८९ |
| पुसपुसों स्मृ. १६ | रवरवां शि. १००४ |
| वाटवाटे ली.३ पा.३४ | वेगेवेगु ध. अु. १८ |
| आटाआटी शि. ९८८ | |

(४) **सामासिक जोड-शब्द**:—यादव-मराठींत द्राविडी भाषातून बरेच शब्द शिरले. क्वचित् अशा परकीय शब्दाने अर्थव्यक्तीचे कार्य नीटसें होत नसावे. अेतावता, त्याच अर्थाचा अेक तत्सम अथवा तद्भव, म्हणजे आर्य शब्द जोडून अर्थ सुस्पष्ट केला जाअी. अेक स्वकीय व दुसरा परकीय अशा दोन शब्दाची जोड होअून हा समास बने. अुदा० वर्तमान-मराठींतील 'चिल्ली-पिल्ली' हा शब्द पाहा:—

सं. शाबाल > शावाल > चावाल > 'चील'

+

तामील : पिल्लअि

येथे चील व पील्लअि या समानार्थक परंतु विजातीय शब्दांचा जोड झाला आहे. यासंबंधी डॉ. चतर्जी[१] लिहितात:—

"This has the form of a compound word, but the idea expressed is only *one*. This may be called *translation compound*, and ascribed to linguistic conflict and compromise in Indo-Aryan."

याचींच आणखी कांही अुदाहरणे म्हणून डॉ. चतर्जी 'पहाड-पर्वत' व 'अिक्षुगंडेरी' हे शब्द सागतात. असले जोड-शब्द संस्कृतात नाहीत, प्राकृतांत नाहीत, परंतु वर्तमान आर्य भाषांत मात्र आहेत. अिंग्रजींतहि साधारण याच धर्तीवर शब्दाचे जोड बनूं शकतात, व क्वचित् दोन समानार्थक शब्द जवळ आल्यास त्याच्या वर्णांची परस्परांत भेसळ होअून स्वतंत्र शब्द तयार होतो. अुदा०—

Blunt = Blind and Stunt.
Glaze = Glare and Gaze.
Knoll = Knell and Toll.
Slender = Slight and Tender.
Slide = Slip and Glide.

मिस् लुअिसा पाअुंड[२] हिने अशा भ्रांत संयोगाचीं इंग्रजींतील विपुल अुदाहरणें देअून शब्द-सिद्धीचा हा प्रकार विस्ताराने वर्णिला आहे. दोन समानार्थक शब्दाचा संयोग करण्याची ही पद्धति मात्र यादव-मराटीत नाही. वर्गीकरणाच्या दृष्टीने भिन्न परंतु अर्थाने अभिन्न असे शब्दांचे जोड यादव-मराटी बनविते. पाहा—

१ 'Polyglottism in Indo Aryan'—S. K. Chatterji, Proceedings of the Seventh Oriental Conference, 1933.

२ Miss Louise Pound; 'Blends—Their Relation to English Word Formation.' 1914.

पाटपीढी अु. ४७६ (सं. पृष्ठम् > १ पाट; २ पीढें)
मांदीमेळावा अु ५३६
दगडगुंडे अु. ७३१ (तद्भव+देशी)
मालीमर्दना ध. पू. ६८ (तद्भव+तत्सम)
कंवातिके कोडे शि. ९४५ (तत्सम+तद्भव)
केळिक्रीडा शि. ३-५९ (तद्भव+तत्सम)
डाळखांदी द. ११ (देशी+तद्भव)

वरील जोड्यांत दोन्ही शब्दाचा अर्थ अेकच असून त्यांचीं स्वरूपें मात्र भिन्न आहेत. अिंग्रजींतील भ्रात संयोगाहून हे शब्द वेगळे आहेत. यादव-मराठीने ही शब्दसिद्धि नव्याने सुरू केली. हिचाच आणखी अेक प्रकार यादव-मराठींत दिसतो. वाक्यांतील अेका शब्दाचा अर्थ त्याच वाक्यांत दुसऱ्या शब्दाने व्यक्तविण्याची लकब तत्कालीन गद्यांत दिसते. म्हणजे दोन समानार्थक शब्दाचा जोड न करितां ते अेकामेकापासून अलग ठेवून अर्थव्यक्ति साधली जाते. या प्रकाराला **साभिप्राय समानार्थक शब्द** असें नाव मी देतों. अु. ह.

"मग भटोबासीं **संभाषूनि म्हणितलें** ।"– स्मृ. ९५
"हें **आअिकौनि परिसौनि** केशवाचार्यें म्हाणितलें ।"– स्मृ. ११६
"अैसें **म्हणौनि म्हणीतलें** : आन सागीतलें ।"– ली. १–१४
"मियां तुमतें **झांकवीले : चाळवीले** ।"– ली. ३–२१ पा.
"गोसावियासि **मर्दना** जाली : **माजणें** जालें ।"– ली. ३–२९ पा.
"तयावरि पावो **देऊंचि तथा ठेऊंचि नअे** ।"– दृ. २६
"**कुंभचासी तथा भार** आथौनि पीके ।"– दृ. २८
"**सिंचा वो सिंपा** कनकधारा ।"– शि. ७०४
"परि कैसीहि कांहीं घृणा **नुपजैचि होय** ।"– ली. १–२०

समानार्थक शब्दाचा हा वापर खास यादव-मराठीचा होय. कारण तो प्राकृतात–अपभ्रंशात नव्हता.

**(५) विरोधी जोडशब्द :** परस्परविरोधी शब्द यादव-मराठी 'अ' किंवा 'अु' या वर्णांनी दाखविते. पुढील जोड्या पाहा—

पवाडु– अपवाडु अु. १४१
वेढा– अुवेढा अु. १०५
टाळे– अुटाळे अु. ६८३
रंग– अुरंग अु. १४०
भरे– रीचवे दृ. १२
पहुड– अुपहुड ली. ३

**(६) संकीर्ण सामासिक व जोडशब्द:**– वरील चार प्रकारात जे येऊं शकत नाहीत असे कितीतरी द्विरुक्त व जोडशब्द यादव-मराठींत आढळतात. वर्तमान आर्य-भाषांचा व त्यातील शब्दांचा या वर्गीकरणाच्या दृष्टीने अद्यापि अभ्यास झालेला नाही. तो झाला, म्हणजे आणखी सूक्ष्म वर्गीकरण करणें शक्य होईल. तोवर, संकीर्ण जोड-शब्दांतच त्याची गणना केली पाहिजे. असे काही पुढे देतों–

गोरागोमटाधारेधाकुटा द. १३
सांदीसवडी द. ४०
सेजियासाअिलिया द. ४४
आडीदरडी द. ४४
पालापाणी द. ९४
ढळमळीतु ऋ. ३९४
दुनीदेहुडी शि. ५६२
तिळतेलिण ली. १–१८

## डे. व्ह. ट्रा. सोसायटी या संस्थेने १९४०-४१ सालच्या पहिल्या सहामाहींत बक्षिस दिलेल्या व प्रशंसापत्रें दिलेल्या पुस्तकांची यादी

| पुस्तकाचें नाव | कर्त्याचें नांव | बक्षिसाची रक्कम |
|---|---|---|
| १ रॉयवाद | रा. बा. रं. सुंठणकर | रु. ४० संस्थेच्या फंडांतून |
| २ व्यावहारिक ज्ञानकोश भाग ४ था | रा. ग. रं. भिडे | रु. ६० |
| ३ प्राणयंत्र अथवा रेडिओ | रा. वि. वि. रानडे | रु. ४० ,, |
| ४ रसायनशास्त्रांतील नवलकथा भा. २ | प्रो. रा. ना. भागवत | रु. ४० ,, |
| ५ व्यायामज्ञानकोश खंड ४ था | रा. द. चिं. मुजुमदार | रु ९० ,, |
| ६ मध आणि मधमाशा | रा. जी. अनन्तन् | रु. ३० ,, |
| ७ वसाहतींचें स्वराज्य | रा. त्र्यं. र. देवगिरीकर | रु. ३० ,, |
| ८ विश्वविहार | रा. ब. द. ल. सहस्रबुद्धे | रु. ४० ,, |
| ९ पाणकळा | रा. र. बा. दिघे | रु. ५० ,, |
| १० वासनाक्षय हाच मोक्ष | रा. रा. पु. नाडकर्णी | प्रशंसापत्र |
| ११ श्रीरमण प्रस्थानत्रयी | रा. ना. वा. गुणाजी | ,, |
| १२ नवजीवन व अितर शास्त्रीय लेख | डॉ रा. अ. राअीरकर | ,, |
| १३ तिसरा प्रवाह | रा. पां. गो. लोहोकरे | ,, |
| १४ अिंद्रप्रकोप काव्य | रा. के. ना. वैद्य | ,, |
| १५ तरंग | सागरिका | ,, |
| १६ बँकेचे व्यवहार व साधनें | रा. ग. कृ. मोपटकर | ,, |
| १७ स्त्रीजीवन | साने गुरुजी | ,, |
| १८ शेतकरी ऋणविमोचन | रा. म. द. वाघ | ,, |
| १९ पं. रंगाचार्य रड्डी याचा लेखसंग्रह | पं. रंगाचार्य रड्डी | ,, |
| २० क्रांति | साने गुरुजी | ,, |
| २१ प्ल्यूटॉर्ककृत अलेक्झांडरचे चरित्र | कॅ. प्र. शं. गुप्ते | ,, |

# औद्भिदशास्त्र



## बाह्यरूपविचार

मराठींतून निरनिराळ्या शास्त्रीय विषयांवरील लेख, ग्रंथ वगैरे लिहिणाऱ्यांनी आपापल्या तात्कालिक गरजा भागविण्यापुरती मराठी परिभाषा वेळोवेळीं तयार केलेली आहे. अशी कामचलाअू परिभाषा बनवितांना त्या त्या शास्त्राच्या आणि तत्संलग्न अितर शास्त्राच्या आजच्या सर्व गरजा ध्यानांत घेअून परिभाषेची नीट, व्यवस्थित मांडणी करण्याचें अवधान नेहमी राहतेंच असें नाही. म्हणूनच मराठींतील आणि अितर प्रांतीय भाषातील यावच्छक्य सर्व नवी जुनी परिभाषा विचारांत घेअून समर्थक आणि समर्पक — भाषेचा प्रपंच चालविण्याच्या दृष्टीने समर्थक आणि शास्त्रीय कल्पना मांडण्याच्या दृष्टीने समर्पक — अशी परिभाषा निवडणें, आणि जरूरीप्रमाणे नवीन बनविणें, आवश्यक ठरतें. हें कार्य साधण्यासाठी साहित्यपरिषदेच्या वतीनें 'परिभाषाचर्चामंडळा'ची स्थापना १९४० च्या आरंभीं झाली. तेव्हापासून 'मंडळा'चें कार्य व्यवस्थितपणें चाललें असून त्याचा अहवाल 'पत्रिके'च्या वाचकाना वेळोवेळीं सादर केलेला आहे.

मध्यंतरीं, गतवर्षीं, कलकत्त्याच्या सायन्स कॉलेजमधील औद्भिदाध्यापक डॉ. शं. पु. आघारकर हे कांही दिवस पुण्यात होते. या संधीचा फायदा घेअून 'मंडळा'ने त्यांच्या अध्यक्षतेखाली औद्भिदपरिभाषेचा विचार करण्यासाठी अेक समिति बनविली. तिच्या कार्यांत पुढील सभासदांनी भाग घेतला:—

| | |
|---|---|
| (१) प्रो. डॉ. शं. पु. आघारकर | (२) प्रो. श्री. ल. आजरेकर |
| (३) श्री. ह. पु. परांजपे | (४) श्री. रा. का. भिडे |
| (५) प्रो. स. वि. आपटे | (६) श्री. पु. वि. साने |
| (७) श्री. ग. म. चक्रदेव | (८) श्री. त्र्यं. गो. ढवळे |

याखेरीज लोणावळा येथील डॉ. म. वि. आपटे आणि चरकतीर्थ श्री. दिगंबरजी बक्षी यांनीहि प्रसंगोपात्त चर्चेंत भाग घेतला. समितीच्या अेकंदर २२ बैठकी होअून औद्भिदशास्त्रांतील बाह्यरूपविचार (External Morphology) या विभागातील अिंग्रजी पारिभाषिक संज्ञांना मराठी प्रतिशब्द निश्चित केले गेले तेच आता प्रसिद्ध होत आहेत.

परिभाषेची यादी बनवितांना समितीने बहुतांशीं अिंग्रजींतील ग्रीन्सचें औद्भिदशास्त्राचें पुस्तक दृष्टीसमोर ठेवून प्रकरणशः पारिभाषिक संज्ञांवर चर्चा केली. मराठी पुस्तकांपैकी श्री. भाटवडेकरकृत वनस्पतिमूलतत्त्वें, श्री. परांजपेकृत वनस्पतिग्रंथमाला, श्री. गोखलेकृत बगीचाचें पुस्तक, श्री. गोळे यांचा द्राक्षाचा बाग, प्रो. आजरेकर यांचें वनस्पतिजीवन, प्रो. परांडेकर यांचें सुलभ वनस्पतिशास्त्र, अित्यादिकांतील परिभाषा विचारात घेतली गेली आहे. तसेंच चरकतीर्थ श्री. बक्षी यांनी संस्कृत ग्रंथांतून निवडलेल्या आणि स्वतः बनविलेल्या परिभाषेचाहि अुपयोग समितीला झालेला आहे. रानडे वगैरेंचे लौकिक शब्दकोशहि विचारांत घेतले गेले हें अर्थातच निराळें सांगावयास नको.

मराठींतल्या या संज्ञा म्हणजे केवळ अिंग्रजीचें भाषांतर करून बनविलेल्या नसाव्यात; त्या त्या अिंग्रजी संज्ञेभोवती जमा झालेला सर्व अर्थ ध्यानांत घेअून योग्य तो अर्थच मराठी संज्ञेतून अुतरावा; प्रत्येक शब्द हा मराठीच्या धाटणीला जुळता असावा, तत्साधितें बनविण्याला सोअिस्कर असावा अित्यादि गोष्टींकडे समितीने शक्य तें लक्ष्य पुरविलें आहे. समर्थकता आणि समर्पकता या दुहेरी कसोटीला जे अुतरले ते जुने शब्द समितीने स्वीकारले. नवे सुचविताना साहजिकच संस्कृत शब्दभांडाराचा आसरा घ्यावा लागला. संस्कृत कोशांत अेकाच अर्थाचे अनेक शब्द अभेदाने अेकत्रित दिलेले आढळले, तेव्हा निवड करतांना शास्त्राच्या सोअीसाठीं त्यांतल्या अेकेका शब्दाचा अर्थ, केवळ संकेतानेच मर्यादित करावा लागला. अुदाहरणार्थ, 'रोम' आणि 'लोम' हे शब्द संस्कृत कोशात अभेदाने दिलेले असले तरी औद्भिदशास्त्रापुरते लोमश–Hairy, रोमश–Bristly असें संकेताने मानावें असें समितीचें मत आहे. अितरत्रहि कोठे कोठे संकेत स्वीकारावा लागला आहे.

समितीचें हें धोरण ध्यानात घेअून पत्रिकेच्या वाचकानी, विशेषतः औद्भिदशास्त्राचें अध्ययन, अध्यापन वा लेखन करणाऱ्यानी, या संज्ञाचा विचार करावा. त्यातल्या काही अयोग्य वाटल्या किंवा त्यापेक्षा अधिक चागल्या सुचवितां आल्या तर त्या 'परिभाषाचर्चामंडळा' कडे अवश्य कळवाव्यात अशी विनंती आहे.

चिटणीस
**परिभाषा-चर्चा-मंडळ**

# Botany औद्भिदशास्त्र, अुद्भिज्जशास्त्र, वनस्पतिशास्त्र

## About seeds– बीजांसंबंधी

Seed बी, बीज
Seed coat बीजावरण, फोल, टरफल (Husk)
Tegumen अंतःकवच
Testa बाह्यकवच
Aril अध्यावरण, अुपावरण
Caruncule (निराळ्या शब्दाची गरज नाही. 'अध्यावरणा'चाच प्रकार आहे.)
Embryo गर्भ
Plumule रोह, रोहक
Radicle मोड, आदिमूल, मूलक
Cotyledon बीजदल, डाळिंबी (गर्भदल)
Monocotyledon अेकदल
Di-cotyledon द्विदल
Polycotyledon बहुदल
Heterocotyledon नानादल
Hypocotyledon दलाधर
Epicotyledon दलोत्तर
Mesocotyledon दलमध्य
Albumen पुष्क (गर्भपोषक द्रव्य)
Endosperm अंतःपुष्क, आतरगर्भपोषक
Perisperm परिपुष्क, बाह्यगर्भपोषक
Albuminous सपुष्क
Ex-albuminous विपुष्क
Micropyle (बीज) रंध्र
Hilum बीजनाभि
Placenta बीजाधार, अुपाधानी
Funicle बीजबंध, बीजनाल
Chalaza आवरणोद्गम (आवरणाचें अुगमस्थान), छदारम्भ

## About root— मूलासंबंधी

Root मूळ. Tap-root—प्रधानमूल, सोटमूळ
Primary-root आद्यमूल, प्रधानमूल
Secondary-root अनुमूल, अुपमूल
Adventitious-root आगंतुक (मूळ)
Fibrous-root जटामूल, पागोरे
Prop-root आधारमूल
Aerial वायवी, हवेंतील
Pneumatophores श्वासोच्छ्वासी मुळें
Haustorium आशोषिका, शोषणेंद्रिय, शोषक
Root-cap मूलत्राण, मुळाचें टोपण
Root-hair मूलरोम, मूलकेश
Fusiform वीटाकृती, कुकडीसारखें
Conical शंक्वाकृति, शूलाकृति
Napiform भ्रमकाकृति, भोवऱ्यासारखी
Moniliform मणिमालाकृति
Tuber ग्रंथि, गांठ
Tuberous ग्रंथिल, गांठाळ (मूळ)

## About stem— स्कंधासंबंधी

Stem स्कंध, खोड
Cauline स्कंधीय
Ramal शाखेय
Branch शाखा, अुपशाखा

## Kinds of branching— शाखाप्रकार

Definite कुंठित
Indefinite अकुंठित
Monopodial अेकस्तंभ
Sympodial संयुक्तस्तंभ
Recemose अकुंठित
Cymose कुंठित
Corm गुल्म, गड्डा
Tuber ग्रंथि, गाठ
Bulb कंद, कादा
Thorn शूल
Runner धावरें खोड
Offset (धावऱ्या खोडाचाच अेक प्रकार, निराळ्या शब्दाची जरूरी नाही).
Sucker मुनवा
Tendril प्रतान
Stolon दाबा, अुदवरोही
Spine कंटक
Prickle शल्य
Rhizome कुडें
Tillers पिल्ले
Tillering पिलावण
Phylloclade, Cladode } पर्णस्कंध

## About leaves - पर्णासंबंधी

Primordium प्रथमावस्था
Leaf-bud पर्णकलिका
Scale-(leaf) खवल्यासारखें (पान)
Stipule अुपपर्ण
Leaf पर्ण, पान
Hypopodium (Leaf-base) पानाचा बुंधा
Mesopodium देठ
Epipodium, Blade, Lamina } पातें, पत्र
Petiolate देठी
Sessile बिनदेठी, बैठे
Axil पर्णकक्ष, बगल, कोपरा
Axillary कक्षस्थ
Node पर्व, पेर
Internode कांड, कांडें
Leaf sheath पर्णच्छदन
Sheath आच्छादक, छदन
Sheathing petiole आच्छादक देठ
Sprout अंकुर
Phyllotaxis पर्णबंध
Leaf insertion पानाची माडणी
Alternate अंतरित
Opposite सन्मुख, संमुख
Whorl of leaves पर्णमंडल
Whorled arrangement मंडलवर्ति-चक्रस्थित रचना (व्यवस्था)

Decussate सांतरचतुष्क (रुईच्या पानासारखा)
Simple साधे, असंयुक्त
Compound संयुक्त
Leaflet दल
Palmate हस्ताकृति
Pinnate पिच्छाकृति
Bipinnate द्विगुण पिच्छाकृति
Tripinnate त्रिगुण ,,
Pari-pinnate समदली पिच्छाकृति
Impari-pinnate विषमदली पिच्छाकृति
-fid अल्पखंडित (e. g. pinnatifid अल्पखंडित पिच्छाकृति)
-partite अर्धखंडित (e. g. palmatipartite अर्धखंडित हस्ताकृति)
-sect अतिखंडित (e. g. palmatisect अतिखंडित हस्ताकृति)
Ligule जिभली
Blade पत्र, पातें
Entire अखंड (कडा)
Margin कडा
Crenate मुरडीव
Dentate दंतुर
Oblong प्रायत
Serrate करवती, क्रकच
Biserrate द्विधाकरवती
Peltate ढालीसारखे, छत्राकृति
Floral leaf पौष्पपर्ण
Foliage पर्णसंभार
Sporophyll रेणुधारक पर्ण

### About veins of leaves–
### पर्णांच्या शिरांसंबंधी

Vein शिरा, सीर
Venation शिराव्यवस्था
Reticulate जाळीदार
Parallel समान्तर
Midrib मध्यशिरा
Multicostate बहुशिरी; बहुसीरक(शि)(सि)
Unicostate अेकशिरी, अेकसीरक
Convergent अभिसारी
Divergent विसारी

### About forms of leaves–
### पर्णांच्या आकृतिसंबंधी

Symmetrical, equal सममात्र, समात्र
Asymmetrical, unequal असममात्र, असमात्र,
Stipulate अुपपर्णी, अुपपर्णयुक्त
Ex-stipulate अनुपपर्णी, अुपपर्णरहित
Stipule अुपपर्णिका, अुपपर्ण
Cuneate कीलाकृति
Cordate हृदयाकृति, हृदाकृति
Ovate अंडाकृति
Obovate व्यस्त अंडाकृति
Lanceolate भाल्यासारखे, कुंताकृति, प्रासाकृति
Rotate चक्राकृति
Hastate शराकृति
Spatulate डावेसारखे
Sagittate बाणाकृति
Auriculate सकर्ण
Reniform वृक्काकृति, काजूच्या बियासारखें
Elliptical विवृत्ताकृति, लांबट वाटोळें, लंबवर्तुळाकृति.
Linear रेखाकृति
Needle-shaped, Acicular सूच्याकृति
Wavy अूर्मिल, नागमोडी
Axillary कक्षस्थ
Extra-axillary कक्षबाह्य
Deciduous हंगामी, गलनशील, पतिष्णु.
Caducous शीघ्रगलनशील
Persistent चिरायु, स्थायी, चिरायुषी
Strap-shaped वरत्राकृति
Cylindrical दंडाकृति
Amplexicaul समाश्लेषी, पूर्णाश्लेषी
Semi-amplexicaul आश्लेषी, अर्धाश्लेषी
Ochreate आच्छादक (अुपपर्णाविषयी)

Phyllode पर्णरूपी देठ
Lobe पाळी
Perfoliate स्कंधविद्ध
Connate सन्मुखालग्न, समुखलग्न
Crisp (margin) मुरडलेले, कुंचित
Pectinate फणीसारखे, कंकताकृति
Lyrate सलगमाकृति
Fiddle-shaped फिडलसारखे
Runcinate पाथरीच्या पानासारखे
Digitate अंगुल्याकृति, मात्ररीसारखे
Pedate हंसपदाकृति
Apex पर्णाग्र
Obtuse बोथट
Acute टोकदार
Oval वित्तृत्ताकृति, लंबवर्तुलाकृति
Retuse खोलगट, निम्न
Emarginate खात, खाचदार
Truncate सपाट, छुरित
Praemorse कुरतडलेले, दष्ट
Acuminate लांबट
Cuspidate अणकुचिदार
Mucronate कोचदार
Awl-shaped आरीसारखें, आराकृति
Prismatic लोलकाकृति
Pyramidal प्रचिताकृति

**About insertion of leaves–**

## पर्णांच्या अुगमासंबंधी

Radical leaves मूलीय पर्णे
Cauline leaves स्कंधीय पर्णे
Ramal शाखेय
Secondary द्वैतीय
Tertiary तार्तीय
Quaternary चातुर्थीय
Tuft } Fascicle } झुबका, समूह, गुच्छ
Divergence अरान्तर
Orthostichy पर्णोद्गमसूत्र, अवलंबपर्णोद्गमसूत्र

Genetic Spiral पर्णोद्गम-वलयावली
Cycle पर्णपर्यय
Primary प्राथमिक
Pentastichous पंचपर्णोद्गमसूत्री
Recti-serial सरलसूत्रगत
Curvi-serial वक्रसूत्रगत
Homodromous अेकमार्गी
Heterodromous भिन्नमार्गी

**About vernation and praefoliation**

## कलिकान्तर्गत पर्णव्यवस्था

Praefoliation (अुद्भेदपूर्व)पर्णकव्यवस्था
Vernation (कलिकान्तर्गत) पर्णकस्थिति
Bent, folded दुमडीची, चूर्णित
Rolled गुंडाळीची, वलित
Reclinate, Inflexed अूर्ध्वनत, अववलित
Conduplicate मिटलेली, संमीलित
Plicate } Plaited } चुणीदार, चूर्णित, अनुचूर्णित
Circinate वळकटीची, अवसंवलित*, वळकटलेली
Convolute सुरळीदार,संवलित,अनुसंवलित*
[*सम्: टोंकापासून टोंकापर्यंत वळकटी
अनु: अन्वायत, लांबट, अुभी
अव: आडवी, मध्यनाडी काटकोनात]
Involute अंतर्वलित
Revolute बहिर्वलित
Induplicate अंतस्सन्निहित
Valvate संनिहित
Imbricate संमिश्र, विविधावृत्त (अेक सर्वस्वीं बाहेर, अेक आत, बाकीचीं अर्धी आत बाहेर)
Twisted, Spiral परिवृत
Equitant अध्यारोही, अधिरूढ
Half-equitant } Ob-volute } अर्धारोही
Supervolute अुपरिवलित
Leaf-tendril पर्णप्रतान

Aecidium or Leaf-pitcher } पर्णकलश, पानाची सुरअी
Leaf-spine पर्णशल्य
Scaly आच्छादक

**Kinds of plants- वनस्पतिप्रकार**

Climbing plants लता (सार्वत्रिक शब्द)
Climber आरोहिणी
Herb शाक
Twiner वलयिनी, आलिंगिनी
Herbaceous stem शाकस्कंध
Woody काष्ठमय
Tree वृक्ष
Shrub क्षुप
Undershrub क्षुपक
Liana महालता

**About reproduction- पुनरुत्पत्तिविषयक**

Vegetative कायिक, अमत्र
Embryo-sac गर्भपेशी
Asexual अलिंग
Asexual, by spores ससत्र अलिंग
Asexual, without spores or without specialised structures, like tubers, bulbs } असत्र अलिंग
Anther परागपेटिका
Sexual सलिंग
Pollen sac परागकोश
Reproduction पुनरुत्पत्ति
Ovule बीजाण्ड, अण्डक
Spore रेणु
Thallus निरवयव अुद्भिद
Gene जनीन
Parthenogenesis अयोनिसंभव
Gamete पिंड (युञ्जान), युज्य (युयुक्षु)
Sporophyte रेणूत्पादक
Gametophyte युज्योत्पादक, पिंडोत्पादक
Zygote योगज

Budding कलिकोत्पत्ति
Fission द्विधाभवन
Gemma, bud कलिका
Sporangium रेणुजनिका
Zoo-spore चररेणु
Macro-spore, Mega-spore } गुरु-महा-रेणु
Micro-spore लघुरेणु
Homosporous, Isosporous } समरेणुक
Heterosporous विषमरेणुक
Pollen grains परागकण

**About flowers- पुष्पांविषयी**

Inflorescence, Sporophore } पुष्पबंध, फुलोरा, रेणुधारक
Flower पुष्प
Axis अक्ष
Perianth (परिपुष्प), परिकर, परिवर्त
Sporophyll रेणुपर्ण
Sporophyte रेणूत्पादक (अवस्था)
Stamen लघुरेणुपर्ण, केसर (पुंकेसर)
Carpel गुरुरेणुपर्ण, किंजल्क (स्त्रीकेसर) किंज
Panicle शाखित मंजरी
Spikelet सतुषमंजरी
Spadix मासलाक्षमंजरी; मासलमंजरी
Catkin कूर्चकमंजरी
Strobile वासिकामंजरी
Staminate केसरीय
Pistillate किंजल्कीय
Ovary अंडकाशय
Thalamus, Receptacle } पडघी (पुष्पाधार), (पुष्पासन), पुष्पस्थली
Palea of the receptacle } छदक, पडघीवरील छद
Bract छद
Bracteole छदक
Leafy (Bracts) पानासारखें छद
Woody कठिण

Membranous पापुद्र्यासारखा
Scaly खवल्यासारखा
Empty वांझ, वंध्य
Bracteate सच्छद
Ebracteate विच्छद
Deciduous पतिष्णु
Persistant स्थायी
Cupule छदपुट (in oak)
Cup पुट
Involucre छदावरण
Spathe पोय
Glume तुस
Glumaceous तुषसदृश
Definite कुंठित
Indefinite अकुंठित
Centrifugal अुन्मध्य
Centripetal अभिमध्य
Raceme मंजरी
Cyme वल्लरी
Racemose मंजरीक
Cymose वल्लरीक
Corymb समपृष्ठमंजरी
Anthella निम्नमंजरी
Spike अवृन्तमंजरी
Amentiferous कूर्चकधारी
Compound शाखित
Umbel गुच्छ
Compound Umbel शाखित गुच्छ
Capitulum, head स्तबक
Verticillaster पुंजक
Glomerule पुंजकद्वय
General Inflorescence संकलित, प्रधान पुष्पबंध
Partial ,, अंगभूत पुष्पबंध
Coenathium द्रोणासनी, द्रोणमंजरी
Hypanthodium कुम्भमंजरी, कुंभासनी
Terminal अग्रस्थ
Solitary अेकपुष्पी

Axillary कक्षस्थ
Monochasium अेकशाख
Dichasium द्विशाख
Polychasium बहुशाख
Pseudaxis संयुताक्ष
Helicoid आवर्ति
Scorpioid cyme कुटिलमंजरी
Mixed मिश्र
Reverse व्यस्त (मंजरी)
Thyrsus द्राक्षवल्लरी
Awn कूस, कुसळ
Peduncle (पुष्प) वृंत, देठ
Pedicel (पुष्प) वृंतक
Scape स्तंभमंजरी
Sporophyll रेणुपर्ण
Perianth परिवर्त, परिकर
Tepal परिवर्तदल
Achlamydeous flower अनावृत पुष्प अपरिकर पुष्प
Monochlamydeous अेकपरिवर्त
Dichlamydeous द्विपरिवर्त
Homochlamydeous समपरिवर्त
Heterochlamydeous विषमपरिवर्त
Cyclic मंडलित
A cyclic अमंडलित
Spiro-cyclic वलिमंडलित
Heterocyclic असममंडलित
Homocyclic सममंडलित
Isomery समदलत्व
Heteromery असमदलत्व
Oligomery न्यूनदलत्व
Pliomery अधिकदलत्व
Plane तल
Zygo-morphic अेकतल समात्र
Actino-morphic अनेकतल समात्र, अनेक-युग्य
Symmetrical समात्र
Asymmetrical असमात्र

Plane of symmetry समात्रनातल
Abortion अविकास, अविकमन
Chorisis द्विगुणीभवन, दलागम
Collateral chorisis अेकतली द्विगुणीभवन
Transverse chorisis भिन्नतली ,,
Longitudinal section अनुच्छेद, अुभा छेद
Transverse section अवच्छेद, आडवा छेद
Tangential section स्पर्शिकेय छेद
Radial अरीय, अरानुगत

### About calyx-संवर्ताविषयी

Calyx संवर्त, (पुष्पकोश) पेला
Sepal संदल, पुष्पकोशदल
Petal प्रदल, पाकळी
Corolla प्रावर्त
Gamosepalous युतसंदल, युत
Polysepalous अनायुतसंदल, अनायुत
Calyx united युत संवर्त
Calyx free अनायुत संवर्त
Calyx tube संवर्त पात्र
Tubular नलिकाकृति
Pappus पलित
Hairy लोमश
Bristly रोमश
Trimerous त्रिदली (मंडलें)
Dimerous or two-membered } द्विदली (मंडलें)
Complete पूर्ण
Incomplete अपूर्ण
Regular समाकृति
Irregular असमाकृति

### About corolla-
### प्रावर्त अथवा पुष्पमुकुटासंबंधी

Corolla प्रावर्त
Gamopetalous युत प्रदल
Apetalous or Monochamydeous } अेकपरिवर्त
Polypetalous अनायुत प्रदल
Clawed or Unguilate } सपद, पदयुक्त
Limb गात्र
Cruciform स्वस्तिकाकृति
Rosaceous गुलाबाकृति
Papilionaceous आगस्तिक
Vexillum, standard ध्वज
Wings, alae पक्ष
Tubular नलिकाकृति
Campanulate, bell shaped घंटिकाकृति
Infundibuliform, Funnel shaped. } गालन्याकृति, नरसाळ्यासारखें, धत्तुराकृति
Carina, Keel नौका
Hypocrateriform or Salver shaped } पारिजाताकृति, कुंदाकृति
Rotate Wheel shaped } बकुलाकृति
Ligulate जिह्वल
Urceolate or Urn-shaped } मधुकाकृति, मोहोडाच्या फुलासारखा
Labiate Bilabiate Lipped } तुलस्याकृति, ओष्ठयुक्त, द्व्योष्ठी
Personate, masked मीलितोष्ठ
Ligulate, strap shaped सजिह्व
Digitiform, Finger-shaped अंगुष्ठाकृति
Saccate, Gibbous पेशित, पेशिक
Spur लांगूल. Spurred लांगुलित
Simple अेकमंडली, अेकेरी
Multiple बहुमंडली
Scaly appendage खवल्यासारखें, खवलेदार—अुपांग
Corona किरीट

### About stamens and carpels-
### केसर आणि किंजासंबंधी

Nectary मधुग्रंथि
Anther परागपेटिका

Androecium केसरमंडल
Stamen केसर
Staminate केसरिक
Pollen Sac / Microsporangium } रेणुकोश
Lobe, or Theca पालि, पाळें
Monothecal or One-lobed (anther) } अेकपालिक
Unisexual or Monosporangiate } अेकविध रेणुधारी
Bi-sporangiate द्विविध रेणुधारी
Filament सूत्र
Filiform तंतुल
Capillary कैशिक
Club-shaped याष्टिक
Petaloid प्रादलिक (केसर)
Forked द्विशाख
Appendiculate सोपांग, अुपांगयुक्त
Erect ताठ, अुन्नत
In-curved अंतर्नत
Re-curved बहिर्नत
Declinate तिर्यङ्नत
Connective संधायक, जोड
Locule कोश
Bilocular द्विकोशक
Quadrilocular चतुष्कोषक
Multilocular बहुकोषक
Introrse अन्तर्मुख
Extrorse बहिर्मुख
Suture सीवनी, शिवण
Face मुख
Back पृष्ठ.
Adnate / Dorsifixed } पृष्ठलग्न
Basifixed / Innate } अधोलग्न
Versatile मध्यलग्न
Distractile दूरान्वयी
Rounded गोल

Linear रेखाकृति
Dehiscence स्फुटन (स्फोटन), फुटणें
Longitudinal dehiscence अनुस्फुटन, अुभें फुटणे
Transverse dehiscence अवस्फुटन, आडवें फुटणें
Porous dehiscence छिद्रस्फुटन, छिद्रित स्फुटन सच्छिद्र स्फुटन
Valvular dehiscence द्वारस्फुटन, सद्वार स्फुटन, द्वारित स्फुटन
Isostemonous (flower) तत्संख्य केसर-मंडलयुक्त
An-isostemonous अतत्संख्य केसरमंडल-युक्त
Diplostemonous द्विगुणसंख्ययुक्त
Ob-diplostemonous व्यस्त द्विगुणसंख्य-युक्त
Polystemonous बहुसंख्ययुक्त
Hypogynous अधःकिंज
Perigynous परिकिंज
Epigynous अुपरिकिंज
Mono-androus अेककेसरिक
Di-Tri-Poly ,, द्वि-त्रि-बहु-केसरिक
Ovary अंडकाशय
Ovule अंडक
Style किंजदण्ड
Stigma किंजाग्र, मूद
Carpel किंज
Syngenesious or Synantherous } संयुक्तपेटिक
Adelphous जुडगा
Mono-di–tria–poly-adelphous अेक-द्वि-त्रि-बहु-संघी
Di-poly-morphic द्वि-बहु-रूपी (पुष्पें)
Didynamous द्विदीर्घक
Tetradynamous चतुर्दीघक
Pollen grain परागकण

Extine बहिःकवच
Intine अंतःकवच
Pollinium परागगुलिका, परागगुटिका
Caudicle देठ, डेंख
Rentinaculum बंधक
Rostellum चंचुक
Simple Gynaecium अेककिंज
Compound Gynaecium बहुकिंज
Placentation अुपाधान (अंडकबंधन)
Placenta अुपाधानी (बंधकस्थान)
Sessile दंडहीन, आसीन
Stalked अुद्धृत
Ventral Suture अुरस्थ शिवण, उरस्थ-सीवनी
Dorsal Suture पृष्ठस्थ शिवण, पृष्ठस्थसीवनी
Apocarpous पृथक्‌किंज
Syncarpous संयुक्तकिंज, सहकिंज
Dissepiment पटल, पडदी
Loculus पुट, (कोष्ठ) कप्पा
Mono-locular अेकपुट
Spurious मिथ्या
Superior अूर्ध्वस्थ
Inferior अधःस्थ
Gynophore किंजधर
Gynandrophore किंजकेसरधर
Marginal प्रांतस्थ
Perietal प्राकार-संधि-स्थ
Basal तलस्थ
Free central स्वतंत्र मध्यस्थ
Axile अक्षस्थ
Superficial पृष्ठस्थ, सर्वतःस्थित
Apical अग्रोद्गामी (दंड)
Lateral पार्श्वोद्गामी
Gynobasic, Gynobasilar, Basilar (style) } किंजतलोद्गामी
Carpophore फलोद्धारक अक्ष
Bifid, Bilobate } द्विपालिक, द्विपाली
Trifid, Trilobate } त्रिपालिक, त्रिपाली
Fissured, cleft छिन्न
Capitate गेंदासारखे, गेंदुक
Lamellate पापुद्र्यासारखे
Praefloration पुष्पदलकव्यवस्था; पुष्पदलकस्थिति
Crumpled सुरकुतलेला
Corrugated चुणलेला
Cochlear हरणखुरीसारखे
Anterior पुरोवर्ती, प्राग्भव
Posterior पश्चाद्वर्ती, पश्चाद्भव

**About ovules- अंडकासंबंधी**

Ovule अंडक
Synangium संयुक्तरेणु-जनिका
Sorus रेणुजनिकासंघ
Nucellus गर्भपेशीजननी
Embryo sac गर्भपेशी
Integument आवरण
Synergidae सहचरी-साहाय्यक पेशी
Antipodal अभिमुख, संमुख
Secondary, Definitive (nucleus) } अनुषंगी (पेशीकेंद्र)
Orthotropous सरल
Inverted, Anatropous } (वि)पर्यस्त
Raphe स्यूत, संसक्तनालाश
Curved, Campylotropous } वक्र
Amphitropous अर्धवक्र
Erect अुन्नत, अुभे
Pendulous लंबित, लोंबतें
Ascending आरोही
Suspended अवरोही
Reclinate प्रतिलंबित
Horizontal आडवें
Collateral अेकतलस्थ
Superposed भिन्नतलस्थ

Zygospore समयोगज
Isogamy, Conjugation } समसंयोग
Potential Gametophyte } अव्यक्त-अप्रकट युज्योत्पादक
Antheridium नरयुज्यजनिका (युञ्जानजनिका)
Oogonium स्त्रीयुज्य जनिका(युञ्जानाजानिका
Archegonium स्त्रीयुज्यकलश
Pollinodium यष्टयाकृति नरयुज्यजनिका
Antherozoid, Spermatozoid } चर नरयुज्य
Sperm, Spermatium } स्थिर नरयुज्य
Procarp शलाटु
Archicarp आदिफल
Trichogyne चूडा
Perichaetium परिवेष्टन
Paraphysis सहवासी, अन्तेवासी
Conceptacle युज्य-कमंडलु, युञ्जान-कमंडलु
Prothallium आद्यांग, प्रोथ, प्रस्थाल
Suspenser अुद्बंधक
Embryo गर्भ
Polyembryony गर्भबाहुल्य, वहुगर्भत्व
Polyembryonic बहुगर्भी
Irregularity of parts दलविक्षेप
Multiplication of parts दलबहुलीभवन
Augmentation मंडलागम
Chorisis दलागम
Suppression लोप
Abortion अविकास, अव्यक्तता
Displacement स्थानच्युति
Cohesion संसक्ति, संसक्त
Adhesion प्रासक्ति, प्रासक्त
Change in phyllotaxis पर्णबंधान्तर
Homo सविध
Hetero विविध
Metamorphosis रूपान्तर

## About fruits - फलांसंबंधी

Fruit फल
Texture पोत
Structure रचना
Septum-(wall) भित्तिका
Pseudocarp मिथ्याफल
Simple अेककिंजोद्भव
Compound बहुकिंजोद्भव
Apocarpous स्वतंत्रकिंज
Syncarpous संयुक्त किंज
Pericarp फलच्छाल
Epicarp बाह्यच्छाल
Mesocarp मध्यच्छाल
Endocarp अंतश्छाल
Stone बाटा, कोय
Foliaceous पर्णसदृश
Dehiscent स्फुटनशील, तडकणारे
Indehiscent अस्फुटनशील
Valve शकल
Valvular dehiscence शकलकारी स्फुटन
Transverse or circumcessile अवस्फुटन, आडवें फुटणें
Sutural अनुसीवनी
Columella स्तंभक
Septicidal पटलविभेदी
Loculicidal पुटकविभेदी
Septifragal पटलच्छेदी.
Replum फलक
Coccus कुडी
Schizocarp विभेदनशील (फल)
Operculate सपिधान
Aggregated, Anthocarpus } अेकपुष्पज सांघिक
Composite बहुपुष्पज सांघिक
Simple साधें
Dry शुष्क, सुकें
Succulent रसाळ, ओलें
Achenial मोरवेलीसारखें

Schizocarpic मुद्रेसारखें
Drupaceous आम्रफलसदृश
Baccate, Berry } वाग्यासारखें, वृताकीय
Cypsella कारळ्या निळासारखें, झेंडूसारखें
Caryopsis शस्य
Samara मधुमालतीसारखे
Nut पूग
Follicle रुईसारखें, अर्कसदृश
Legume शिंबी, शेंग
Siliqua सर्पपसदृश, मोहरीसारखें
Capsule बोंड
Lomentum मणकेदार शेंग
Cremocarp धन्यासारखें, धानेय
Carcerulus तौलस, तुळशीसारखे
Regma अेरंडीय, अेरंडासारखें
Drupe आम्रीय
Fibrous nut पूगीय
Etaerio संघ, सोनचाफ्यासारखें, चंपकीय
Composite सांधिक, बहुपुष्पक
Sorosis अननसासारखें, तुतीसारखें
Perisperm परि(गत) पुष्क
Endosperm आंतरपुष्क
Albumen पुष्क
Fleshy मासल
Oily स्निग्ध
Mucilaginous श्लेष्मल
Horny शार्ङ्ग, शिंगासारखें
Ruminated पुटित, अंतस्तरित
Scutellum ढालीसारखे छादन
External बाह्य
Internal आंतर
Peripheral परिहित, परिगत
Axile अक्षस्थ
Eccentric विमध्य

# व्यंजनरहित स्वर कसे लिहावे ?



**१ प्रस्ताव**— आपण स्वर पुढीलप्रमाणे लिहितों– अ, आ, इ, ई, उ, ऊ, ऋ, ए, ऐ, ओ, औ. हे स्वर येथे ११ आहेत. ॠ आणि ऌ हे येथे गाळले आहेत. कारण दीर्घ ॠ-चा प्रयोग मराठींत मुळीच आढळत नाही; तसाच ऌ-चा. अेवढेंच नव्हे, ऌ संस्कृतांत सुद्धा क्लृप्ति ह्या अेकाच शब्दांत आहे; अितरत्र आढळलाच तर तो क्लृप्-धातूत्पन्न क्रियापदातच होय. अशा रीतीने संस्कृतातील १३ स्वरांपैकी मराठींत आरंभीं दिलेले ११–च विचारणीय आहेत. ह्यांच्या लेखनाची तुलना क-च्या दशाक्षरीशीं आपण करूं. ही दशाक्षरी कशी? नेहमीच्या बाराखडींतील अनुस्वार आणि विसर्ग यांनी युक्त अक्षरें येथे गाळलीं आहेत. कारण, त्याचा विचार साध्या क-बरोबरच होअील. ह्या दशाक्षरींत ऋ-युक्त कृ-ची भर घातल्याने ११ अक्षरे होतील. म्हणजे अ, आ अित्यादि अक्षराशीं क, का अित्यादि अक्षरें तुल्यसंख्य होतील. हीं द्विविध अक्षरें लिहिण्याचे प्रकार बरेच भिन्न आहेत. या भिन्नतेचा विचार येथे करूं.

**२ एकविधता**— व्यंजनांनी रहित अ, आ अित्यादि ११ स्वर आणि क, का अित्यादि ११ अक्षरें यांच्या लेखनाची तुलना करिता दिसते की– अ, आ, ओ, औ हीं चार अक्षरें क, का, को, कौ यांच्या धर्तीवरच सर्वथा लिहितात. अ + उ = ओ. त्याचप्रमाणे अ+इ=ए. अशा स्थितींत ए-ची उत्पत्ति ओ-प्रमाणेच अ-मध्ये अेक स्वर मिळविल्याने होते. या अुत्पत्ति-साम्यास अनुसरून दोहोंचें लेखन समान असणें योग्य होतें. म्हणजे ओ-च्या धर्तीवर ए-चें रूप अे असें प्राप्त होतें. याच्याच पाठोपाठ ऐ-चें लेखन अै असें सहजच होअील. म्हणजे परंपरेस अनुसरूनच ११–पैकी ६–चें लेखन क-च्या बाराखडीच्या धर्तीवर जातें. राहिले स्वर पांच. यांची व्यवस्था अितर ६–प्रमाणेच करणे योग्य आहे. कारण ६ ही संख्या पांचाहून मोठी आहे. तेव्हा त्या पांचांचें लेखन अि, अी, अु, अू, अृ असें अुचित होतें. म्हणजे व्यंजनरहित, अर्थात् केवळ, स्वरांची अक्राक्षरी अशी सिद्ध होते– अ, आ, अि, अी, अु, अू, अृ, अे, अै, ओ, औ.

**३ आक्षेप आणि त्यांचें खंडन**— या लेखनाविरुद्ध पुढील आक्षेप संभवतील–

(१) हें लेखन परंपरेविरुद्ध आहे.

**खंडन**— ओ-च्या धर्तीवरच अे-चा आकार आधारलेला आहे. तेव्हा ओ-चें लेखन जर परंपरा-शुद्ध तर अे-चेंहि तसेंच ठरतें; अै-चेंहि तसेंच (महाजनो येन गतः स पंथाः). **महाजनानुसरण-न्यायाने** अितर सहा अक्षरांबरोबर अि, अी, अु, अू, अृ ह्याचेंहि नवीन धर्तीवरील लेखन परंपरापूत ठरते.

(२) अ-मध्ये स्वर मिळून अे, अै, ओ, औ हे स्वर तयार होतात; तशी स्थिति अि, अु, अृ अित्यादिकांची नाही. करिता यांचें लेखन क-च्या अक्राक्षरींतल्याप्रमाणे करूं नये.

**खंडन**— क्रम + अिक = क्रमिक
विद्यालय + अीन = विद्यालयीन
वात + अुल = वातुल
कर + अून = करून

या वरील चारी ठिकाणीं मि, यी, तु आणि रू यांतील स्वर त्या-त्या स्वरांचा पूर्वीच्या अ-शीं पररूप-संधी होअून झाले आहेत. म्हणजेच येथे पररूप-संधीने—

| | |
|---|---|
| अ + अि = अि | अ + अी = अी |
| अ + अु = अु | अ + अू = अू |

यावरून दिसतें की अ-मध्ये भर पडून जसे अे अित्यादि स्वर बनतात, तसेच अ-मध्ये त्या-त्या स्वरांची भर पडून पररूपसंधीने अि, अी, अु, अू हेहि स्वर बनतात. यामुळे अि-प्रभृति स्वरांचें अे-प्रभृति स्वराशीं याहि गोष्टींत साम्य ठरतें. अर्थात् ह्या साम्याच्या बळावर लेखनाचें सादृश्यहि ओघाने प्राप्त होतें. आता क + इ = के; या धर्तीवरच अ + इ = अे. त + उ = (पररूसंधीने) तु; या धर्तीवर अ + उ = अु. तेव्हा अि, अी, अु, अू असें लेखन शास्त्रशुद्ध ठरतें.

(३) अृ-चे लेखनाचा काय विचार?

अ-मध्ये स्वर मिळून अृ बनल्याचें अुदाहरण नाही. करिता त्याचें लेखन ऋ असेंच ठेवावें.

**खंडन—** ११-पैकी १०-ची जी गति, तीच ११-व्याची. विक्रीते करिणि किमंकुशे विवादः? (हत्ती विकल्यावर अंकुशाकरिता घासाघीस कोण करील?) साराश– ११ अक्षरापैकी अ, आ, ओ, औ ह्याचें लेखन पूर्वीचेच आहे. अे-अै-ची घटना ओ-औ-शीं समातर असल्याने, त्याचें लेखन अे, अै असें योग्य ठरते. अ-मध्ये भर पडूनच ए-प्रभृति स्वराप्रमाणे इ-प्रभृति स्वर होतात. तेव्हा ह्याचेंहि लेखन नवीन पद्धतीने क-च्या बाराखडीचे धर्तीवर करणे योग्य होते. शिवाय सहा या मोठ्या संख्येस पाचाने अनुसरणें योग्य आहेच. करिता अ, आ अित्यादि सर्वच अका अक्षरें क-च्या बाराखडीप्रमाणे लिहावीं.

(४) नवीन पद्धतीने लिहिताना घोटाळा होअील; हा त्रासच आहे.

**खंडन—** कोणत्याहि नवीन पद्धतीने घोटाळा व त्यामुळे त्रास हा प्रथम कांही दिवस होणारच. जुन्या विहिरीचें पाणी खारें असल्यास गोड पाण्यासाठी नवीन विहीर खणणें हाहि आरंभीं त्रासच आहे. पण पुढील सुखाच्या दीर्घ काळाकडे नजर देअून आरंभीचा त्रास मोजण्यांत येत नाही. म्हणून, या नवीन पद्धतीने आरंभीं घोटाळा संभवनीय असला तरी, तिची अेकाविधता, परंपराशुद्धि आणि शास्त्रीयता पाहून तिचा स्वीकार करावा.

**४ आणखी लाभ—** पूर्वीच्या पद्धतींत के-ला मात्रा आहे; पण ए-ला मुळीच नाहीं. यामुळे नवीन शिकणाऱ्या मुलास कठीण जातें; व तीं वारंवार चुकतात. हा शिकणारांचा त्रास ह्या नवीन पद्धतीने निश्चयाने वांचेल.

**५ निगमन—** अ अित्यादि व्यंजनरहित स्वर मराठींत सामान्यतः ११ येतात. त्यांतील आ, ओ, औ या स्वरांत अ हा आकार विद्यमान आहे; व ह्यामुळे त्यांचें का, को, कौ ह्यांच्या लेखनाशीं साम्य आहे. ओ, औ प्रमाणे अे, अै हे संधिस्वर असल्याने त्यांचेंहि लेखन क-च्या बाराखडीच्या वळणावर करणें अिष्ट ठरते. ह्या सहाच्या मागून पांचानी जाणें योग्य असल्याने सर्वच अकरा स्वराचें लेखन क-प्रभृतींच्या पद्धतीवर करणे ओघानेच येतें. मोरोपंती लिखाणांतहि क्वचित् अे, अै अशीं अक्षरें आढळतात. यांत अेकाविधता साधत असून परंपरेचा भंग नाही, अशास्त्रीयता नाही; अुलट शिकणाराची सोय हा लाभ आहे. हें सर्व लक्षांत घेअून-विद्वान पुढील लेखन आदरितील अशी आशा आहे. तें लेखन म्हणजे व्यंजनरहित स्वरांचे पुढील आकार–अ, आ, अि, अी, अु, अू, अृ, अे, अै, ओ, औ.

गोविंद कृष्ण मोडक

# सोलापूर येथील २५ व्या म. सा. संमेलनांत
# मान्य झालेले ठराव

### ठराव १

कोल्हापूरचे कै. श्रीमंत छत्रपति राजाराममहाराज यांच्या अकालीं निधनामुळे या संमेलनास खेद होत आहे. त्यांच्या निधनाने त्याच्या आप्तस्वकीयांस व प्रजाजनासच नव्हे तर अखिल महाराष्ट्रीय जनतेस जें दुःख होत आहे त्यांत हें संमेलन सहभागी आहे.

### ठराव २

(१) श्री. केशवराव बागडे, (२) श्री. बाबासाहेब विद्वांस, (३) प्रा. ग. ग. पेंडसे, (४) प्रा. वा. गो. अूर्ध्वरेषे, (५) रावसा. पु. सी. वैद्य, (६) श्री. आनंदराव तेलंग, (७) प्रा. र. श्री. जोगळेकर, (८) रावब. मुळे, (९) श्री. श्रीनिवास देशपाडे, (१०) डॉ. गोगटे, (११) श्री. पांडुरंग जावजी, (१२) श्री. किल्लेदार वकील, (१३) श्री. करंदीकर वकील, (१४) कवि कुमार पाटणकर, (१५) श्री. मावकर, (१६) डॉ. ग्रीयर्सन इत्यादि जे साहित्यभक्त व साहित्यसेवक कालवश झाले त्यांच्या निधनाबद्दल या संमेलनास अतिशय दुःख होत आहे.

### ठराव ३

महाराष्ट्र साहित्य परिषदेने पुरस्कारिलेल्या शुद्धलेखनपद्धतीचा स्वीकार नियतकालिकानी, ग्रंथकारांनी, शिक्षणखात्याने व मुंबअी विद्यापीठाने त्वरित करावा अशी त्यांस या संमेलनाची आग्रहपूर्वक विनंती आहे.

### ठराव ४

मराठी हस्तलिखिताची बृहत्सूची तयार करण्यास रत्नागिरी संमेलनाने नेमलेल्या समितीचें कार्य महत्त्वाचें असल्यामुळे ते सतत चालू ठेवण्याची व्यवस्था महाराष्ट्र साहित्य परिषदेने करावी अशी या संमेलनाची शिफारस आहे.

### ठराव ५

मराठी भाषेचा सर्वांगीण स्वरूपाचा कोश होण्याच्या अुद्देशाने प्राचीन कवींच्या ग्रंथांत समग्र शब्दसूची तयार करण्यास रत्नागिरीस संमेलनांत नेमलेल्या समितीचा वृत्तान्त परिषदेस सादर झाला. म. सा. परिषदेने अेक कोशमंडळ नेमून हें कार्य सतत चालू ठेवावें अशी या संमेलनाची शिफारस आहे.

### ठराव ६

महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे आद्यकल्पक, संस्थापक आणि प्रवर्तक कै. न्यायमूर्ति म. गो. रानडे याना जन्मून १९४२ या वर्षी शंभर वर्षे पूर्ण होतात म्हणून संमेलनाच्या या आद्यप्रवर्तकाच्या स्मरणार्थ त्या प्रसंगीं योग्य वाङ्मयस्मारक केलें जावें अशी या संमेलनाची अिच्छा आहे. या कामासाठी खालील समिति नेमण्यात येत आहे :—

(१) श्री. वि. स. खांडेकर, (२) प्रा. वा. म. जोशी, (३) श्री. भा. वि. वरेरकर, (४) रावसा. र. लु. जोशी, (५) प्रा. श्री. ना. बनहट्टी (आमंत्रक).

या समितीस अधिक सभासद स्वीकृत करून घेण्याचा अधिकार देण्यांत येत आहे.

### ठराव ७

हें संमेलन श्रीमंत महाराज होळकर सरकार यास आग्रहपूर्वक विनंती करितें की, होळकर कॉलेजांत अेम्.अे. करिता मराठी विषय शिकविण्याची सोय व्हावी.

### ठराव ८

हें संमेलन अलिजाबहादुर श्रीमंत महाराज शिंदे सरकार यास आग्रहपूर्वक विनंती करीत आहे की व्हिक्टोरिया कॉलेजात अेम.अे. करिता मराठी विषय शिकविण्याची सोय व्हावी.

### ठराव ९

हें संमेलन श्रीमंत महाराज होळकर यास विनंती करीत आहे की पूर्वी मराठी ग्रंथोत्तेजक मंडळास रु. २५०० वार्षिक साहाय्य दिले जात होतें व जें अलीकडे थांबविण्यात आलें आहे तें पुन्हा चालू व्हावें.

### ठराव १०

आग्रा विद्यापीठाच्या अेम.अे. परिक्षेच्या अभ्यासक्रमांत मराठी भाषा आणि वाङ्मय या विषयाला हिंदी, अुर्दू अित्यादि भाषांप्रमाणे स्थान देण्यांत येणे आवश्यक आहे असें या संमेलनाचें मत असून आग्रा विद्यापीठाने बी. अे. परीक्षेप्रमाणे अेम. अे. परीक्षेच्या अभ्यासक्रमात या विषयाचा त्वरित समावेश करावा आणि त्यासाठी योग्य ती तजवीज करावी अशी या संमेलनाची मागणी आहे.

### ठराव ११

मराठी भाषा, परंपरा व संस्कृति यांची जोपासना व महाराष्ट्रीयांच्या हितसंबंधाचें योग्य संरक्षण हीं होण्याकरिता मराठी बोलणारे बहुसंख्य लोक असलेल्या प्रदेशाचा निराळा प्रांत बनविणे आवश्यक आहे असे या संमेलनाचें मत आहे, व नवीन संयुक्त राज्यघटनेचा विचार होण्यापूर्वी हा प्रात अस्तित्वात आणिला जावा अशी या संमेलनाची मागणी आहे.

### ठराव १२

(अ) महाराष्ट्र साहित्य संमेलनाची हिंदुस्थान सरकारास अशी आग्रहाची व निकडीची सूचना आहे की, महाराष्ट्र देशाचा विस्तार, संस्कृति आणि वैशिष्ट्य हीं लक्षांत घेअून हिंदुस्थान सरकाराने पुणें व नागपूर येथे अेक अेक स्वतंत्र नभोवाणी-केंद्र स्थापन करण्याची त्वरा करावी. मद्रास अिलाख्यात ज्याप्रमाणे तामीळ प्रांताकरिता त्रिचनापल्ली येथे किंवा पूर्वबंगालमध्ये डाक्का येथे स्वतंत्र नभोवाणी-केंद्रे स्थापन करण्याला हिंदुस्थान सरकार तयार झालें आहे, त्याप्रमाणे पुणें व नागपूर येथेहि तशी व्यवस्था करणे हें न्याय्य व अिष्ट होअील असें या संमेलनाचे मत आहे.

(आ) तसेच महाराष्ट्र साहित्य संमेलनाची अशी मागणी आहे की, दिल्ली येथील नभोवाणी-केंद्रावरून निवेदन केल्या जाणाऱ्या मराठी बातम्याच्या निवेदनाला सध्यापेक्षा अधिक वेळ देण्याची व्यवस्था करावी; तसेच मुंबअी-केंद्रातर्फे केल्या जाणाऱ्या पुस्तकपरीक्षण, कथानिवेदन, काव्यगायन, लोकगीतगायन या कार्यक्रमात मराठी भाषेंतील कार्यक्रमांना प्राधान्य आणि सध्यापेक्षा अधिक वेळ दिला जाणे हे मुंबअी इलाख्यातील मराठीभाषकाच्या दृष्टीने आवश्यक आहे.

(अि) त्याचप्रमाणे मुंबई-नभोवाणी-केंद्राच्या सल्लागार मंडळात महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या प्रतिनिधींचा समावेश केला जावा अशी या संमेलनाची मागणी आहे.

(अी) ऑल अिंडिया रेडिओचे मुखपत्र 'दि इंडियन लिसनर' या नियतकालिकाच्या हिंदी, अुर्दू, बंगाली व तामीळ अशा आवृत्त्या ज्याप्रमाणे निघतात त्याप्रमाणे अेक मराठी आवृत्तिहि निघावी अशी या संमेलनाची मागणी आहे.

(अु) मुंबअी केंद्राचा मराठी भाषेचा कारभार व्यवस्थित चालला आहे किंवा नाही हें पाहण्यासाठी खालील समिति नेमिली जावी व नभोवाणी-केंद्राने तिचा वारंवार सल्ला घ्यावा अशी या संमेलनाची मागणी आहे:—

१ श्री. वि. स. खांडेकर, २ प्रा. वा. म. जोशी, ३ श्री. के. नारायण काळे, ४ श्री. अनंत काणेकर, ५ प्रा. शं. के. कानेटकर, ६ डॉ. अ. ना. मालेराव, ७ श्री. पु. य. देशपांडे, ८ श्री. प्रभाकर पाध्ये [आमंत्रक].

### ठराव १३

मराठी भाषेवर ठिकठिकाणीं जें निरनिराळ्या प्रकाराने सरकारी व संघटित स्थानिक स्वराज्य संस्था यांच्या पक्षपाती धोरणामुळे किंवा निकटच्या परभाषाभाषी समाजांच्या विरोधी धोरणामुळे आक्रमण होताना दिसेल त्याची दखल घेण्यासाठी सर्व स्थानिक कार्यकर्ते आणि मराठी भाषेचे अभिमानी यानी महाराष्ट्र-साहित्य-परिषदेस अशा सर्व घडामोडींची अवश्य ती माहिती सदैव पुरवावी व अन्यतऱ्हेने साहाय्य करावें अशी या संमेलनाची त्यास विनंती आहे. मराठी नियतकालिकें आणि त्याचे बातमीदार यांनीहि या प्रकारच्या घटनांचे प्रकाशन करून त्वरेने मतप्रकाशन करावे व लहानमोठ्या सर्व प्रकारच्या आक्रमणाची दाद लावून घेण्यास झटावें अशीहि या संमेलनाची शिफारस आहे.

### ठराव १४

डेक्कन कॉलेज कौन्सिलच्या घटनेसंबंधाच्या मुंबअी सरकारच्या ठरावांत महाराष्ट्र विद्यापीठाच्या स्थापनेसंबंधाने व्यक्त करण्यात आलेल्या सरकारी धोरणाचा हें संमेलन तीव्र निषेध करितें. तसेंच डेक्कन कॉलेजच्या कौन्सिलात अिलाख्यातील निरनिराळ्या भागातील सभासद त्या त्या विभागांचे प्रतिनिधि या नात्याने प्रतिनिधि म्हणून समाविष्ट करण्यालाहि या संमेलनाचा विरोध आहे. या दोन्ही बाबतींत सरकाराने आपल्या निर्णयाचा फेरविचार करावा अशी या संमेलनाची मागणी आहे.

### ठराव १५

(अ) मराठी लिपीमध्ये 'अ'ची बाराखडी ज्याप्रमाणे आता रूढ होत चालली आहे त्याप्रमाणे अुकाराचीं चिन्हें ओळींत घालण्याची व 'र'फार अेवजीं अर्धा 'र' ओळींत घालून वापरून पाहण्याची प्रथा व्यवहारात कितपत आणता येअील तें अजमावून पाहाण्याकरिता साहित्य पत्रिकेमध्ये अशा तऱ्हेचा कांही मजकूर छापून प्रासिद्ध करण्याचा प्रयोग करून पाहावा अशी या संमेलनाची विनंती आहे.

(आ) मराठी लिपी सुधारणेमध्ये करावयाचे नवीन नवीन प्रयोग प्रत्यक्ष करून पाहण्याकरिता व सुधारलेल्या लिपी जनतेपुढे येण्यास संधि मिळावी याकरिता अशा नवीन तऱ्हेने जुळविलेला मजकूर साहित्य पत्रिका हें त्रैमासिक व अितर मासिकांत वरचेवर देण्याची तजवीज परिषदेने करावी अशी या संमेलनाची विनंती आहे.

### ठराव १६

बृहन्महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं असलेल्या कॉलेजातील वाङ्मयमंडळें व प्रांतिक संमेलनें मराठी साहित्याच्या संवर्धनाकरता अभिनंदनीय प्रयत्न करीत आहेत. मराठी भाषेच्या आजच्या अडचणी दूर करणें व तिच्या पुढील प्रगतीकरिता भरीव कार्य आंखणें सुलभ व्हावें आणि मराठीवाचकांची संघशक्ति वाढावी यासाठी या सर्व प्रयत्नांत एकसूत्रीपणा येणें अगत्याचें आहे. म्हणून शिक्षणसंस्थांतील वाङ्मयमंडळास व प्रांतिक संमेलन भरविणाऱ्या संस्थांस या संमेलनाची

आग्रहाची विनंती आहे की, त्यांनीं 'संलग्न' संस्था म्हणून अगर अन्य तऱ्हेने महाराष्ट्र साहित्य-परिषद् या मध्यवर्ती संस्थेशीं विलंब न करतां नियुक्त व्हावें.

### ठराव १७

गेल्या फेब्रुवारीच्या २८ तारखेस झालेल्या शिरगणतींत मुंबअींतील व विशेषतः दक्षिण कोकणातील पुष्कळ मंडळींनी आपली जन्मभाषा किंवा पाळण्यांतील भाषा (Language of the cradle) 'कोंकणी' अशी सांगितली असल्यामुळे कोंकणी ही मराठी भाषेपासून अगदी निराळी अशी स्वतंत्र भाषा आहे अशी चुकीची नोंद १९३१ च्या शिरगणतीप्रमाणे १९४१ च्या शिरगणतींतहि होण्याचा संभव आहे. त्याचप्रमाणे कोकणातील 'चित्पावनी' याहि बोलीचा अंतर्भाव 'कोंकणीं'त केला गेला असल्यामुळे अितर कोंकणी बोलींप्रमाणे 'चित्पावनी' बोलीहि मराठी भाषेपासून निराळी अशी नोंदली जाणार आहे. 'कोंकणी' ही बोली सध्याच्या ग्रांथिक मराठी भाषेचेंच अेक जुनें स्वरूप असून तिचा अन्तर्भाव पूर्वीप्रमाणेच मराठींत करण्यांत आला पाहिजे. या सर्व साधकबाधक प्रमाणाचा विचार करून अेक अधिकृत निवेदनपत्र (Representation) शिरगणती खात्याच्या मुख्य अधिकाऱ्याकडे पाठवून त्या कामीं आणखी आवश्यक ती माहिती त्यांना पुरविण्याकरिता हें संमेलन पुढील गृहस्थांची एक समिति नेमीत आहे. या समितीस अधिक सभासद स्वीकृत करून घेण्याचा आधिकार आहे:—

१ डॉ. वि. सि. सुकथनकर, अेम्.अे., पीअेच्.डी., भांडारकर रीसर्च अिन्स्टिट्यूट.
२ प्रो. पांडुरंग वामन काणे, अेम्.अे., अेल्‌अेल्.बी.
३ श्री. शिवराम वि. पालेकर, बी.अे., अेल्‌अेल्.बी.
४ डॉ. व्यंकटराव कैकिणी, अेम्.आर.सी.अेस्.आी. (अेडिनुबरो).
५ श्री. अनंत काकबा प्रियोळकर, बी.अे. [आमंत्रक].
६ डॉ. जे. अे. कोलॅसो, अेल्.अेम्. अँड अेस्., अेम्.अेल्.अे., मेयर, मुंबअी कार्पोरेशन.

### ठराव १८

निजाम सरकाराचे सध्याचे भाषाशिक्षण आणि नियतकालिकविषयक धोरण निजाम-प्रांतीय महाराष्ट्राची भाषा, वाङ्मय आणि संस्कृति याच्या वाढीस अपकारक आहे असें या संमेलनाचें मत आहे. आणि निजाम सरकाराने आपलें धोरण ताबडतोब बदलून लोकमतानुवर्ती करावें अशी या संमेलनाची आग्रहाची मागणी आहे.

### ठराव १९

मराठी भाषा व महाराष्ट्रांतील सांस्कृतिक जीवन यांच्या अभिवृद्ध्यर्थ महाराष्ट्र विद्या-पीठाची स्थापना होणें अत्यावश्यक आहे असें या संमेलनाचें मत आहे. हें विद्यापीठ स्थापन होण्यासाठी शक्य ती खटपट महाराष्ट्र-साहित्य-परिषदेने अितर संस्थांच्या सहकार्याने करावी अशी या संमेलनाची परिषदेस आग्रहपूर्वक विनंती आहे. तसेंच विद्यापीठ स्थापन होण्याच्या आधीहि निरनिराळ्या संस्थांत सहकार्य घडवून आणून महाराष्ट्रातील ज्ञानप्रसार व संशोधन यांच्या साधनांची संघटना करण्याचा प्रयत्न म. सा. परिषदेने करावा असें या संमेलनाचें मत आहे.

### ठराव २०

महाराष्ट्रभाषेची सेवा करणाऱ्या निष्ठावंत साहित्यिकांत ज्ञानकोशकार कै. डॉ. केतकर यांचें स्थान पहिल्या दर्जाचें असल्याकारणाने त्यांच्या कीर्तीस व साहित्यसेवेस साजेसें स्मारक महाराष्ट्रांत मराठीभाषाभिमानी लोकांनी करावें अशी या संमेलनाची सर्व महाराष्ट्रभाषाभिमानी लेखकांना, साहित्यिकांना व जनतेला कळकळीची विनंती आहे.

### ठराव २१

साक्षरताप्रसाराच्या व्यापक प्रमाणांत सुरू झालेल्या मोहिमेमुळे ज्या बहुसंख्य अशा अशिक्षित वर्गाला अक्षरओळख झाली आहे नि ज्ञानार्जनाचा मार्ग खुला नि सुलभ झाला आहे अशा वर्गाला आवश्यक नि अुपयुक्त असें वाङ्मय हवें त्या प्रमाणांत लिहिलें जात नाही. नव्यानेच अक्षरओळख झालेल्या व बहुतांशीं प्रौढ असलेल्या जनतेच्या हातीं राजकीय, सामाजिक, धार्मिक, सर्वांगीण अुन्नति होओील, त्याना जीवनाकडे पाहण्याची नवी दृष्टि येओील, त्याच्यातील रूढिप्रियता नष्ट होओील नि त्यांना आपल्या मूलभूत हक्कांची जाणीव होओील नि याचबरोबर कर्तव्याचीहि ओळख होओील अशा प्रकारचें वाङ्मय निर्माण होणें जरूर आहे. हल्लीचे आघाडीवरचे साहित्यिक नि नियतकालिकें याची दृष्टि या बहुजनसमाजाकडे वळलेली नाही; त्यांचें वाङ्मय पुढारलेल्या वर्गासाठीच आहे; त्यांचा विनोद नि शास्त्रीय दृष्टिकोन बहुजन-समाजाच्या आटोक्यांतील नाही; तरी नव्या युगाचा ओघ लक्षांत घेअूनच नवोदित लेखकांनी नि हल्लीच्या मान्यवर साहित्यिकानी असें बहुजनोपयोगी साहित्य निर्माण करण्याकडे विशेष लक्ष पुरवावें अशी या सभेची विनंती आहे.

### ठराव २२

मराठी भाषा बोलणारात व लिहिणारात जैनधर्मीयाचें स्थान महत्त्वाचे आहे. मराठी भाषेतील आज अुपलब्ध असलेल्या लेखात म्हैसूर संस्थानातील श्रवण बेलगोळा येथील श्री-गोमटेश्वराच्या भव्य जिनमूर्तीखालील शिलालेखच पहिला आहे. तसेंच मराठीची माता महाराष्ट्री व जैनमहाराष्ट्री, अर्धमागधी, अपभ्रंश वगैरे मराठीशीं व्याकरणदृष्ट्या साम्य असणाऱ्या भाषात जैनाचें वाङ्मय विपुल प्रमाणात अुपलब्ध आहे. तेव्हा प्राचीन जैन वाङ्मयाचें संशोधन केल्यास महाराष्ट्री वगैरे प्राकृत आणि मराठी यामधील दुवा सांपडण्याची व जुनें मराठी लिखाण मिळण्याची शक्यता आहे. हा दुवा सापडल्यास मराठी भाषेच्या अुत्पत्तीच्या दृष्टीने आपणांस बरेंच मागे जाता येओील म्हणून असें संशोधन करावें असें या संमेलनाचें मत आहे व हें संशो-धनकार्य करण्याकरिता खालील सद्‌गृहस्थाची अेक समिति हें संमेलन नियुक्त करीत आहे:—

१ डॉ. प. ल. वैद्य [अध्यक्ष], २ डॉ. अ. ना. अुपाध्ये, ३ प्रा. कै. शि. मेहता [आमंत्रक], ४ श्री. रतनलाल डी. शहा, ५ प्रा. भू. अ. चौगुले, ६ श्री. जीवराज गौ. दोशी, ७ प्रा. ना. के. भागवत, ८ प्रा. श्री. नी. चापेकर, ९ श्री. रा. ने. शहा.

### ठराव २३

निरनिराळ्या भारतीय विद्यापीठांतून अर्धमागधी, पाली व तत्सम अितर भाषा यांना अभ्यासक्रमात स्थान दिल्याबद्दल या संमेलनास आनंद होत आहे.

यापुढची पायरी म्हणजे जैन वाङ्मयांतील नीतिबोध, अध्यात्म व इतर अभिजात वाङ्मय यातील मराठींत भाषांतरित किंवा रूपांतरित केलेले ग्रंथ मराठीच्या निरनिराळ्या परिक्षांच्या अभ्यासक्रमात समाविष्ट करणें ही होय. या ग्रंथांचा अभ्यास निरनिराळे धर्म व संस्कृति यांच्या शैक्षणिक अभ्यासास व मूलमापनास अुपयोगी पडल्याशिवाय राहणार नाही असें या सभेचें मत आहे.

यासाठी मुंबअी, नागपूर, श्रीमती नाथीबाअी टाकरसी, बनारस हिंदु विद्यापीठ, डाक्का विद्यापीठ वगैरे विद्यापीठें यानी या बाबतीत सक्रिय प्रोत्साहन देअून या वाङ्मयाचा अभ्यास जारीने सुरू करावा अशी या संमेलनाची या संस्थांना आग्रहाची विनंती आहे.

ठराव २४

मॅट्रिक्युलेशन परिक्षेच्या संस्कृत, अितिहास, भूगोल व शास्त्रीय विषय ह्या विषयांच्या प्रश्नपत्रिका अिंग्लिश आणि त्या त्या प्रांतिक भाषांतून काढल्या जाव्यात अशी सूचना हें संमेलन मुंबअी विश्वविद्यालयास करीत आहे.

ठराव २५

मुद्रणस्वातंत्र्य साहित्याला अत्यंत पोषक असल्याने हे संमेलन सरकारच्या सध्याच्या मुद्रणनियंत्रणाच्या पद्धतीचा तीव्र निषेध करीत आहे व मुद्रणस्वातंत्र्यावरील हे सर्व निर्बंध सरकारने शक्य तों लवकर दूर करावे असें हें संमेलन सरकारास सुचवीत आहे.

ठराव २६

रत्नागिरी साहित्य संमेलनांत मान्य झालेल्या ठरावांच्या अंमलबजावणीचा छापील वृत्तान्त महाराष्ट्र साहित्य परिषदेकडून संमेलनास सादर करण्यांत आला तो हे संमेलन दाखल करून घेत आहे.

ठराव २७

पुढील साहित्य संमेलन नाशिक येथील महाराष्ट्र नाट्य मंदिर या संस्थेमार्फत भरविण्यांत यावें ही विनंती या संमेलनास संमत आहे.

ठराव २८

कांही मराठी नियतकालिकातून आजकाल बीभत्स व असभ्यतासूचक मजकूर छापला जातो व ग्राम्य कुचाळी व दुष्ट वैयक्तिक टीका केली जाते. या अनिष्ट लेखनास प्रतिबंध होणें सार्वजनिक हितदृष्ट्या अिष्ट असल्यामुळे अशा प्रकारच्या लेखनाचे परीक्षण करून योग्य तें मार्गदर्शन करण्याकरिता महाराष्ट्र साहित्य परिषदेने पुढील पाच गृहस्थांची अेक समालोचन-समिति स्थापन करावी. या समितीने आपल्या कार्याचें अितिवृत्त व सूचना दर तीन महिन्यांनी परिषदेच्या त्रैमासिकात प्रसिद्ध कराव्या अशी या संमेलनाची आग्रहाची सूचना आहे:—

१ श्री. वि. स. खांडेकर (अध्यक्ष), २ प्रा. द. वा. पोतदार, ३ प्रा. वा. म. जोशी, ४ श्री. चिं. ग. कर्वे, ५ श्री. कृ. गो. मराठे (आमंत्रक).

---

# जोतीराव फुले



(लेखक— प्रा. गंगाधर बाळकृष्ण सरदार)

"Perhaps it would have been useless to repine over what has been suffered and what has passed away, had the present state been all that is desirable. We know perfectly well that the Brahman will not descend from his self-raised high pedestal and meet his Kunbee and low caste brethren on an equal footing without a struggle.... At present not even one has the moral courage to do what duty demands, and as long as this continues, one sect distrusting and degrading another sect, the condition of the Shudras will remain unaltered, and India will never advance in greatness or prosperity.

Perhaps a part of the blame in bringing matters to this crisis may be justly laid to the credit of the Government. Whatever may have been their motives in providing ampler funds and greater facilities for higher education and neglecting that of the masses, it will be acknowledged by all that in justice to the latter this is not as it should be. It is an admitted fact that the greater portion of the revenues of the Indian Empire, are derived from the Rayat's labour—from the sweat of his brow."[1]

महाराष्ट्रांत कंपनी सरकारचा अंमल सुरू झाल्यावर आरंभींआरंभीं तरी मुंबअी अिलाख्याचीं राज्यसूत्रें अेल्फिन्स्टन, माल्कम यांच्यासारख्या चतुरस्र मुत्सद्यांच्या हातीं गेलीं, आणि त्यांनी या परमुलखांत मोठ्या दक्षतेने व दूरदर्शीपणाने आपला जम बसविला. मराठ्यांचा भगवा झेंडा जाअून शनवारवाड्यावर 'फिरंगी बाहुटा' फडकला; पण ह्या राष्ट्रीय मानखंडनेचें शल्य फारच थोड्या लोकाच्या चित्तांत सलत होतें. अुलट "—ह्या राज्यात पेशवाअीप्रमाणे व मोंगलाअीप्रमाणे लढाया, बंडें, धामधुमी व जुलूम हीं अगदीच नाहीत. अेकसूत्री म्हणतात त्याप्रमाणे राज्य चाललें आहे[2]—" असाच सार्वत्रिक समज होता. वास्तविक पाहता या नव्या अमदानींत हजारो शूर मराठ्यांना आपल्या कमरेच्या तरवारीला सोडचिठ्ठी देअून हातांत नांगर धरण्याची पाळी आली होती; परंतु ह्या दुःखद स्थित्यंतराची चिकित्सा करण्याची कुवतच त्याच्या अंगीं नसल्यामुळे त्यांनी आल्या प्रसंगापुढे मुकाट्याने मान तुकविली. पांढरपेशा वर्गाची मनःस्थिति याहून जरा निराळी होती. शास्त्रीपंडिताचा राजाश्रय तुटला होता. ब्राह्मण व मराठे सरदारांच्या पदरीं लिखापढी करणारे कारकून बेकार झाले होते. त्यामुळे साहजिकच ह्या दोघाच्याहि मनांत अिंग्रजी राज्याबद्दल अप्रीति वसत होती. मूठभर अुच्चवर्णीयांच्या या स्वार्थमूलक असंतोषाची नागी ठेचून टाकून त्यांना कोणत्या तरी निरुपद्रवी कार्योत गुंतवून ठेवण्याची अेल्फिन्स्टनप्रभृति जबाबदार अधिकाऱ्यांना जरूरी भासली. शिवाय राज्यकारभार सुयंत्रित चालविण्यासाठी आपल्या

१ जोतीराव फुले– गुलामगिरी– प्रस्तावना (अिंग्रजी.)        २ वाटसराची गोष्ट, पृ. ८१.

खास तालमींत तयार झालेल्या नोकरांचीहि त्यांना आवश्यकता होतीच. अशा दुहेरी धोरणाने सरकारने शिक्षणप्रसाराच्या कार्याकडे आपली कृपादृष्टि वळविली.

कंपनी सरकारचें शिक्षणविषयक धोरण सुरवातीस फार अुदार आणि व्यापक होतें असें सकृद्दर्शनीं वाटते. परंतु अेल्फिन्स्टनप्रभृति अधिकाऱ्याचे खलिते (Minutes) लक्षपूर्वक वाचले, विद्याखात्याचीं वार्षिक प्रतिवृत्तें बारकाअीने पाहिली, म्हणजे हा भ्रम आपोआप दूर होतो. प्रजेच्या नैतिक आणि भौतिक प्रगतीची जबाबदारी सर्वस्वी सरकारवरच आहे अशा तऱ्हेच्या अुच्च व आकर्षक तत्त्वाना त्या वेळच्या सरकारी ठरावातूनहि जरी साळसूदपणे मान्यता दिलेली होती, तरी देखील तत्कालीन अधिकाऱ्यानी बहुजनसमाजाच्या शिक्षणाकडे जाणून-बुजून दुर्लक्ष केलें होतें. समाजातील बुद्धिमान् व वजनदार वर्गाला सरकारी नोकरीच्या रुपेरी बेडीने जखडून टाकून त्याच्या मदतीने या देशात आपलें आसन स्थिर करण्याचा त्याचा मनसुबा होता; आणि याच दृष्टीने त्यानी आपल्या शिक्षणकार्याची रूपरेषा आखली होती. दक्षिणेंतील कमिशनर मि. चापलीन यानी अि. स. १८२१ त पुणें संस्कृत पाठशाळेची स्थापना केली. त्या वेळीं त्यानी वरिष्ठ अधिकाऱ्याकडे केलेल्या निवेदनांत (Report) पाठशाळा स्थापन करण्याचा अुद्देश स्पष्ट केला होता. पेशवाअी बुडाल्यामुळे ब्राह्मणांची स्थिति फार हलाखीची झाली आहे. शिवाय समाजात ह्या असंतुष्ट वर्गाचें बरेंच वजनहि आहे. तेव्हा त्याना थोडाबहुत आश्रय देअून अिंग्रजी राज्याविषयी त्याच्या अंतःकरणांत निष्ठा अुत्पन्न करावी हें त्या अुद्देशपत्रिकेंतील अेक प्रमुख कलम होते.[१] या पाठशाळेत न्याय, अलंकार, व्याकरण, धर्म, वैद्यक अित्यादि प्राचीन भारतीय शास्त्राचें शिक्षण देण्याची व्यवस्था केली होती; आणि त्यासाठी सुमारें शंभर विद्यार्थ्यांना दरमहा पांच रुपयेप्रमाणे शिष्यवृत्ति देत असत. अि. स. १८५१ पर्यंत पुण्यातील ह्या अेकमेव सरकारी शिक्षणसंस्थेचीं द्वारें ब्राह्मणाव्यतिरिक्त अितर जातींच्या विद्यार्थ्यांना बंद होतीं. याच वर्षी संस्कृत पाठशाळा व बुधवार वाड्यांतील अिंग्रजी शाळा अेक करण्यांत आली, आणि त्यानंतर अितर जातींच्या विद्यार्थ्यांनाहि तींत प्रवेश मिळूं लागला.

मुंबअी अिलाख्यात मौंट स्टुअर्ट अेल्फिन्स्टन यानी अर्वाचीन शिक्षणक्रमाचा पाया घातला. त्याची दृष्टीहि मुख्यतः राजकीयच होती. त्यामुळे अुच्चवर्णीयांच्या धर्मभावनाना ते फार जपत असत. समाजाच्या वरच्या थरात पाश्चात्य विद्येचा व संस्कृतीचा प्रसार अगोदर व्हावा अशी त्याची अपेक्षा होती. बहुजनसमाजाच्या शिक्षणाबद्दल मात्र त्यांना तेवढी अुत्कंठा नव्हती. अुलट खालच्या वर्गातील विद्यार्थ्यांना सरकारने हात राखूनच अुत्तेजन द्यावें असा त्याचा अभिप्राय होता.[२] अि. स. १८२० मध्ये मुंबअीच्या शिक्षामंडळीची स्थापना झाली;

१ "Another object was to preserve the attachment of learned Brahmins who had suffered severely by the change of Government, and who had considerable influence over the feelings and conduct of the people at large."

—Report of the Board of Education for the year 1840-41. P.24.

२ "It is observed that the missionaries find the lowest castes the best pupils. But we must be careful how we offer any special encouragement to men of that description. They are not only the most despised, but among the least numerous of the great divisions of society; and it is to be feared that if our system of education first took root among them, it would never spread further, and that we

व लवकरच तिला सरकाराकडून सालीना ५००० पौंडाची मदत मिळूं लागली. अेवढ्या मामुली रकमेत मुंबअी अिलाख्यातील लाखो लोकांच्या शिक्षणाची तरतूद करणें शक्यच नव्हतें. त्यामुळे मुंबअींत व मुंबअीच्या आसपास दहापंधरा शाळा काढून पाचपंचवीस अिंग्रजी पाठ्यपुस्तकाचीं भाषान्तरें करण्यापलीकडे ह्या मंडळीला अधिक काही साधता आलें नाही. पुढे अि. स. १८४० त 'बोर्ड ऑफ अेज्यूकेशन' या नावाची निमसरकारी संस्था अस्तित्वात आली; परंतु सरकारी शिक्षणविषयक धोरणात त्यामुळे तिळमात्र फरक झाला नाही. अि. स. १८४७-४८ च्या सुमारास, ज्या वेळी मुंबअी अिलाख्यात शिक्षणप्रसाराच्या माध्यमाचा वाद धसाला लावण्याची वेळ आली, त्या वेळीं बहुमतवाल्या पक्षाने आपलें तात्कालिक अुद्दिष्ट असंदिग्ध शब्दात व्यक्त केले आहे. "—सरकारने शिक्षणकार्यासाठीं मंजूर केलेली ठराविक रक्कम लक्षांत घेतां तूर्त तरी जनता-शिक्षणाचा (Mass education) अवाढव्य कार्यक्रम हातीं घेणें बोर्डाला शक्य नाही असाच त्यातील मथितार्थ होता[१]—". अशा रीतीने खेड्यापाड्यातील लक्षावधि लोकांच्या प्राथमिक शिक्षणाची हेळसाड करून शहरातील मूठभर अुचवर्णियांच्या अुच्च शिक्षणातच सरकारने आपलें शक्तिसर्वस्व वेंचले. हा अित्थंभूत अितिहास चोखंदळ दृष्टीने पाहिला, म्हणजे सरकारचें शिक्षणविषयक धोरण सुरवातीपासूनच कसे प्रतिगामी व संकुचित होतें तें सहज समजते.

खेडेगांवांतील स्पृश्य हिंदूंच्या शिक्षणाची जिथे एवढी अनास्था तिथे धार्मिक, सामाजिक व आर्थिक दृष्ट्याहि निकृष्टावस्थेत असलेल्या अस्पृश्याच्या शिक्षणाची किती दुर्दशा होत असेल तें सांगावयासच नको. त्या वेळीं शाळाखात्यातील शिक्षक, तपासनीस, व अन्य अधिकारी बहुधा ब्राह्मणच असत; आणि त्याना तर अंत्यजाच्या सावलीचाहि विटाळ होत असे. त्यामुळे सरकारी शाळेत देखील अस्पृश्याच्या मुलांना प्रवेश मिळत नसे. त्याच्या न्याय्य हक्काची अशा रीतीने पायमल्ली होत असताहि अिंग्रज अधिकारी तिकडे डोळेझाक करीतें[२]. कारण हिंदुस्थानांतील बहुजनसमाजाच्या सुखदुःखाचें त्याना कांहीच सोयरसुतक नव्हते. खिस्ती धर्मोपदेशकांनी या प्रश्नाला काही ठिकाणीं तोंड फोडलें. नाशिक, धारवाड अित्यादि शहरात वाद अुपस्थित झाले, आणि शेवटीं अि. स. १८५८ त सरकारी विद्याधिकारी मे. हॉवर्ड यांना आपला निर्णय जाहीर करावा लागला[३]. ह्या त्याच्या हुकुमामुळे अस्पृश्याच्या विद्यालय-प्रवेशाला

---

might find ourselves at the head of a new class superior to the rest in useful knowledge, but hated and despised by the castes to whom these new attainments would always induce us to prefer them."

—Official Writings of Mountstuart Elphinstone. P.105.

१ "With the very limited means at the disposal of Government for educational purposes, it is impossible to undertake such a gigantic scheme as the education of the masses of India."

—Report of the Board of Education, 1847-48. P.3.

२ "अेकंदर सर्व भट पंतोजी लोक असें म्हणतात कीं अति शूद्रांचीं मुलें शाळेंत घेतल्याबरोबर हिंदुस्थानांत मोठा धिंगाना होअील म्हणोन सरकार भितें" गुलामगिरी— पृ.१००.

३ "आमच्या समजण्यात आलें आहे की, मेहेरबान हावार्डसाहेब विद्याखात्याचे डैरेक्टर्स यांणीं आपल्या ताब्यांतील शाळेंतून येक असा हुकूम फरमाविला आहे कीं ज्या शाळेस लोकांकडून पैसा देण्याची मदत होत असल्ये त्या शाळाखेरीजकरून बाकीच्या शाळेंतून कोणत्याही ज्ञातीचीं मुलें आलीं असतां घेण्याची मनाअी स्कूल मास्तर यांणीं करूं नये. आतां हा ठराव होण्यास कारण प्रथम धारवाडापासून अुत्पन्न झालें व येविषयीं वादविवाद होअून हा हुकूम कलकत्ता सरकारांतून आला आहे असें समजतें."

—ज्ञानप्रकाश, १ फेब्रुवारी १८५८.

कायदेशीर मान्यता मिळाली; तरी देखील प्रत्यक्ष व्यवहारात त्याची अंमलबजावणी करून घेताना गरीब बिचाऱ्या अस्पृश्याना अनेक अडचणींचे डोंगर ओलाडावे लागले असतील यांत बिलकूल शंका नाही. हंटर कमिशनपुढे साक्ष देताना म. मो. कुंट्यांसारख्या व्युत्पन्न पंडितांनीहि अंत्यजाच्या विद्यालयप्रवेशासंबंधी काढलेले अनुदारतेचे उद्गार वाचले[1] म्हणजे अव्वल अिंग्रजींत या सुधारणेला अुच्चवर्णीयाचा किती तीव्र विरोध असेल याचा सहज अंदाज करतां येअील.

सरकारी विद्याखात्याने जरी शूद्राची व अतिशूद्राची अुपेक्षा केली, तरी ख्रिस्ती धर्मोपदेशकाच्या प्रयत्नाने त्याच्या शिक्षणाला थोडी बहुत चालना मिळाली होती. त्यांचा अुद्देश अगदी स्पष्ट होता. महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यात येशू ख्रिस्ताच्या शुभवर्तमानाचा प्रसार करण्याचें त्यानी कंकण बाधलें होतें. हिंदुसमाजातील हजारो लोकाना ख्रिस्ताच्या कळपात ओढण्याची त्याची महत्त्वाकाक्षा होती, परंतु अुत्साहाच्या भरात त्यानी वस्तुस्थितीकडे दुर्लक्ष केले नाही. महाराष्ट्राची परंपरा स्वातंत्र्याच्या व स्वाभिमानाच्या वातावरणात पोसलेली आहे. तेव्हा या ठिकाणीं आपण आपला धर्मप्रचार फार धूर्ततेने व सावधपणाने चालविला पाहिजे हें त्यानी आरंभीच ओळखलें. सुशिक्षित अुच्चवर्णीयाचा नाद सोडून देअून त्यानी खेड्यापाड्यातील असंख्य निरक्षर लोकाकडे आपला मोर्चा वळविला. ज्ञानेश्वर-तुकारामाच्या पुण्याअीने महाराष्ट्रातील खालच्या वर्गाच्या अंतःकरणातहि धर्माभिमानाची ज्योत तेवत होती. पण अुच्चवर्णीयातील अहंमन्य पंडितानी व द्रव्यलोभी धनिकानी त्याच्याकडे कधी ढुंकूनहि पाहिलें नाही. त्याचे अुद्योगधंदे बसत चालले होते. दिवसभर काबाडकष्ट करूनहि त्याच्या कुटुंबीयांचें पोट भरण्याची वानवा होती. सामाजिक विषमतेमुळे चाऱ्ही बाजूंनी त्याची कुचंबणा होत होती. अशा वेळीं ख्रिस्ती धर्मोपदेशकानी त्याना जवळ केले. त्याच्या मुलाबाळाच्या शिक्षणाची व्यवस्था केली. त्याच्या घरातील आजाऱ्याची शुश्रूषा केली. दुष्काळपीडितांना अन्नपाणी पुरविले. शाळेतील विद्यार्थ्यांना पाट्यापुस्तकें व कपडेलत्ते दिले. आम्हाला आमच्या देशबाधवाची दया आली नाही. पण परधर्मीय अुपदेशकांनी प्रचाराच्या निमित्ताने का होअीना, आस्थेने व आपुलकीने त्याना साहाय्य केलें. त्यामुळे त्यांच्याबद्दलचे गैरसमज हळूहळू निवळत चालले. त्यांच्या शाळातील मुलांची संख्या वाढूं लागली. खेडेगांवातील गरीब व अडाणी लोकात जागृति घडवून आणून त्याना शिक्षणाची गोडी लावण्याचे श्रेय खरोखर स्टिव्हेन्सन-निब्जिट-मिचेलप्रभृति ख्रिस्ती धर्मोपदेशकानाच द्यावयास हवें. 'विद्या केवळ ब्राह्मणानींच शिकावी. शूद्रातिशूद्राना मोलमजूरी करून पोट भरण्याशिवाय गत्यंतर नाहीं' हा न्यूनगंड त्यानी नाहीसा केला. अुच्चवर्णीयाच्या बरोबरीने अभ्यास करून आपल्या मुलानी शहाणे व्हावें, निरनिराळ्या व्यवसायात मन घालून पैसा व प्रतिष्ठा प्राप्त करून घ्यावी असें निरक्षर खेडवळानाहि वाटूं लागलें. ख्रिस्ती धर्मोपदेशकाचे विद्यादानाचें हें पवित्र कार्य अप्रत्यक्षपणे हिंदुसमाजाच्या पथ्यावरच पडलें यात बिल्कूल शंका नाही. मात्र सबंध महाराष्ट्राच्या मानाने त्याच्या शाळाची संख्या अगदीच अपुरी होती. शिवाय कित्येक लोक धर्मांतराच्या भयाने त्याच्या शाळेत मुले धाडण्यास कचरत असत. कित्येकाना गरिबीमुळे आपल्या मुलाचे

१ "The question of the admission of children of Mahars and Dhers into Government schools is not raised by the Mahars and Dhers themselves. It is not real, and has no practical bearing. It is a groundlesss agitation caused by sentimental English officials and unpractical native reformers."

—Report of the Education Commission, 1883, P.514.

शिक्षण शेवटपर्यंत पुरें करणें जड जाओ. यामुळे अव्वल अिंग्रजींत कनिष्ठ जातींतील फारच थोड्या विद्यार्थ्यांना अिंग्रजी शाळेचा अुंबरठा ओलांडण्याची संधि मिळाली, व 'सुशिक्षित' या संज्ञेला पात्र होता आलें.

सरकारने अुच्चवर्णीयाना हाताशीं धरलें. खिस्ती धर्मोपदेशकानी खालच्या वर्गांना शिक्षण दिलें. दोघाचाहि यामध्ये स्वार्थच होता. परंतु त्यामुळे हिंदुसमाजांत आधीच धुमसत असलेल्या जातिवैमनस्याच्या आगींत भरपूर तेल ओतले गेलें. ब्राह्मणादि अुच्चवर्णीयानी अिंग्रजी शिक्षणाची संधि प्रथम साधली. तेव्हा साहजिकच सरकारी राज्ययंत्राच्या सर्व विभागांत त्याचा आरंभींच शिरकाव झाला. कारकून-तलाठ्यापासून शिरस्तेदार-मुनसफापर्यंत सगळे सरकारी कामदार बहुधा ब्राह्मणच असत. मात्र त्याची वृत्ति अतिशय संकुचित होती. समाजाशीं आपला कांही जिव्हाळ्याचा संबंध आहे याची त्याना बिलकूल जाणीव नव्हती. रात्रंदिवस ढोरमेहनत करूनहि शेतकरी व कारागीर रोजच्यारोज अर्धपोटी राहत होते. त्याच्या मुलाबाळाची अन्नान्नदशा पाहून पाषाणालाहि पाझर फुटला असता. पण पाश्चात्य विद्येच्या वारुणीने अुन्मत्त बनलेल्या आमच्या सुशिक्षित कामदारानी त्याच्या अडीअडचणीचा कधीहि सहानुभुतिपूर्वक विचार केला नाही. अुलट स्वतःच्या क्षुद्र स्वार्थासाठी लोकाच्या अज्ञानाचा व दुबळेपणाचा फायदा घेअून त्याना अमानुषपणे पिळून काढण्याचा मात्र त्यानी पुरुषार्थ गाजविला. त्याच्या ह्या किळसवाण्या स्वार्थांधतेचा लोकहितवादींनी आपल्या शतपत्रात अत्यंत कडक शब्दात निषेध केला आहे. ज्या अर्थी लोकहितवादींसारख्या थोर सत्त्वशील मनुष्यानेहि आपल्या ज्ञातिबांधवावर अितक्या निष्ठुरपणें प्रहार केले, त्या अर्थी आम्हा अुच्चवर्णीयाच्या सामाजिक नितिमत्तेचें त्या वेळीं दिवाळेंच निघालें असलें पाहिजे हें स्पष्ट आहे. बहुतेक सरकारी नोकर बेधडक लाच खात असत. कित्येकांना यासाठी तुरुंगाचा मार्गहि पत्करावा लागला होता. अिंग्रज अधिकाऱ्यापेक्षा अेतद्देशीय अंमलदारांशींच खेडेगावातील लोकाचा नेहमी संबंध येत असे. त्याना कधीमधी जे साहेब भेटत ते खिस्ती धर्मोपदेशकच होत. त्याच्या चांगुलपणाची व अुदारतेचीं अुदाहरणे लोकाना आपल्या डोळ्यासमोर मूर्तिमंत दिसत होतीं. त्यामुळे अिंग्रजाचें अंतरंग त्याना अुमगलें नाही. ब्राह्मण कामदार आपणाशीं किती बेमुर्वतखोरपणे वागतात, व खिस्ती धर्मोपदेशक आपली किती काळजीपूर्वक चौकशी करतात, हीं दोन्ही परस्परविरोधी दृश्यें पाहून 'साहेब परवडला, पण ब्राह्मण नको' अशी लोकाची वृत्ति बनली असल्यास नवल नाही. शिवाय हिंदुसमाजरचनेवर चौफेर हल्ला चढवून चाऱ्ही बाजूंनी गांजलेल्या गरीब व अडाणी जनतेला खिस्ती धर्माचे महत्त्व पटवून देण्याची खिस्ती धर्मोपदेशकाची अविश्रांत खटपट होती. हिंदुसमाज जातिभेदाच्या विकृत कल्पनेने पछाडलेला होता व आहेहि. आमचे हें मर्मस्थान त्यानी अचूक ओळखलें; व त्यावरच आपल्या टीकेचा भडिमार सतत सुरू ठेवला. 'ज्ञातिभेदनिर्णय', 'ब्राह्मणाचें महत्त्व', 'हिंदुधर्मप्रसिद्धीकरण' यासारखी लहानसहान चोपडीं प्रसिद्ध करून भोळ्याभाबड्या लोकाचा बुद्धिभेद

१ "हिंदु लोक लांच खातात, याचा संशय नाही. कंपनी सरकारचे चाकरांत हजारांत लाच न खाणारा व ईश्वराम भिअून चालणारा क्वचित् असतो. बाकी सर्व शिपायांपासून प्रिन्सिपाल सदर अमीनपर्यंत शपथेचा व्यभिचार करितात.

जरी इंग्रजांनी भागीरथप्रयत्न केला, तरी हे लोक अडून अडून लाच खातात, हें जगप्रसिद्ध आहे. आणि वास्तविक पाहिलें, तर जो मनुष्य मुनसफाचें काम करितो, तो वेतनाअितका खर्च ठेअून पांच वर्षांत दहा हजार रुपये जवळ करितो, तसेंच शिरस्तेदार आपले सर्व वेतनाअितका किंबहुना जास्तीच खर्च करून सालांत पांच हजार रुपये जवळ करितात. तसाच नाझरही सालाचे पांच हजार मिळवतो. सामान्य कारकूनही दहा वर्षे काम करतो, तर तो दोन हजार रुपये जवळ करितो" —शतपत्रें पृ ५७–५८.

करण्याचा त्यांनी सपाटा चालविला. दुर्दैवाने त्यांच्या आक्षेपांना पुष्टि देण्याजोग्या गोष्टी आमच्या अुच्चवर्णीय अंमलदाराकडून पदोपदीं घडत होत्या. ह्याचा परिणाम अर्थात् व्हावयाचा तोच झाला. ब्राह्मणाविषयी कनिष्ठ जातींतील लोकाना वाटणारा आदर साफ मावळला. साजसकाळ हे लोक साहेबाचे आर्जव करीत, परंतु त्या राज्यकर्त्या साहेबाचे धर्मबांधवच आपल्यातील गरिबातल्या गरिबाच्या झोपडीकडे अितक्या आस्थेने का वळतात याचा शोध घेण्याची त्याना मुळीच जरूरी वाटली नाही. लोकहितवादींसारख्या राष्ट्रपुरुषाला या आगामी संकटाची बरोबर कल्पना होती; म्हणूनच त्यांनी अुच्चवर्णीयाच्या दोषावर निर्भीडपणे टीका करून त्याना ताळ्यावर आणण्याचा प्रयत्न केला. अेकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धातच त्यानी ज्या गोष्टी जीव तोडून सांगितल्या त्यापैकी कांही गोष्टी जरी आम्हीं अंमलांत आणल्या असत्या, तरी देखील महाराष्ट्रात सत्यशोधक समाजाची स्थापना होण्याचें प्रयोजन अुरलें नसते. परंतु द्रव्यलोभाने अंध झालेल्या अुच्चवर्णीयाना अेवढें शहाणपण कोठून सुचणार? त्यानी आपला अन्याय्य वर्तनक्रम पूर्वीप्रमाणेच चालू ठेवला. त्यामुळे खालच्या वर्गातील जाणत्या लोकांच्या मनांतील तेढ वाढतच चालली, व शिवाजी-रामदासांच्या ह्या पुण्यभूमींत ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादाचें बीज पेरले गेलें.

खिस्ती धर्मोपदेशकांच्या तालमींत शिकून तयार झालेल्या कनिष्ठ जातींतील तरुणांना आपल्या सभोवतालची उद्वेगजनक परिस्थिति पाहून काय वाटलें असेल त्याची सहज कल्पना करतां येअील. आपल्या आप्तस्वकीयांची दुरवस्था बघून त्यांच्या चित्तात निःसंशय कालवाकालव झाली असेल. यदृच्छेने आपणांस चार अक्षरें शिकावयास सापडलीं, परंतु आपल्याच रक्तामांसाचे अितर असंख्य लोक अज्ञानांत व दारिद्र्यांत खितपत पडले आहेत. दिवसभर काबाडकष्ट करूनहि त्याना पुरेशी मीठभाकर मिळत नाही. शेतीमध्ये कस नाही. अुद्योगधंद्यांत बरकत नाही. अशा तऱ्हेने आपल्याच आप्तेष्टांचा चाऱ्ही बाजूंनी होणारा कोंडमारा त्यांना अुघड्या डोळ्यांनी पाहावा लागत होता. त्यांतच सरकारी कामदार व आपमतलबी सावकार नीतिअनीतीची चाड न धरतां त्यांना बेलाशक लुबाडीत आहेत याची त्यांना जाणीव होती. त्यामुळे उच्चवर्णीयाच्या अमर्याद स्वार्थबुद्धीची त्यांना चीड येणें स्वाभाविक होतें. सगळ्याच सुशिक्षित शूद्राच्या मनात त्या वेळीं असंतोषाचें काहूर माजलें असेल, परंतु उच्चवर्णीयाच्या नांवाने निव्वळ बोटें मोडीत न बसता आपल्या दलित बांधवाच्या उद्धारासाठीं प्रत्यक्ष कार्यप्रवृत्त होण्याचें फारच थोड्या लोकांनी मनावर घेतले. अशा निरपेक्ष कार्यकर्त्यांच्या परंपरेचे आद्यप्रवर्तक जोतीराव गोविंद फुले हे होत. त्यांच्यासंबंधीचे विपरीत पूर्वग्रह दिवसानुदिवस कमी होत चालले आहेत. तेव्हा लवकरच त्यांच्या सत्यस्वरूपाची लोकांना यथार्थ जाणीव होअील अशी आशा बाळगावयास काही हरकत नाही. त्याचें चरित्र खरोखरीच अत्यंत उज्ज्वल व स्फूर्तिदायक आहे. ज्या वेळीं महाराष्ट्रातील थोर थोर विचक्षण पंडितहि सरकारी नोकरीच्या मोहपाशात गुंतले होते, त्या वेळीं जोतीरावानी द्रव्याची व अधिकाराची हाव झुगारून देअून दरिद्रनारायणाच्या चरणीं आपलें आयुष्य वाहिलें. आपल्या लक्षावधि देशबांधवांची दुःस्थिति पाहून त्यांचे मन अस्वस्थ झालें. दारिद्र्याच्या दुःखाग्नींत त्याना होरपळत ठेवून केवळ आपल्या टीचभर संसाराची काळजी घेत बसणें त्यांना प्रशस्त वाटलें नाही. बहुजनसमाजाचे सामाजिक व राजकीय हक्क पायदळीं तुडविले जातात. त्यांच्या मेहनतीचा मोबदलाहि पुरेपूर त्यांच्या पदरांत पडत नाही. सरकारी कामदार त्याना लुबाडतात; अन्यायी सावकार त्यांना फसवतात; त्यांच्या गाऱ्हाण्याची कोणी दाद घेत नाही; त्यांच्या दुःखांची कोणाला दया नाही. ह्या सर्व अनर्थांचें मूळ जनतेच्या गाढ अज्ञानांतच आहे अशी जोतीरावानी आपल्या मनाशीं खूणगांठ बांधली, व शिक्षणप्रसाराच्या

पवित्र कार्यातच आपलें सर्व सामर्थ्य खर्च करण्याचा निश्चय केला.

आपण अितरांपेक्षा जन्मतःच श्रेष्ठ आहोंत अशी आमच्यांतील अुचवर्णियाची भावना होती. त्यामुळे कनिष्ठ जातींतील लोकाना ते निष्कारण तुच्छ लेखीत असत. ह्या जन्मसिद्ध अुचनीचभावाच्या कल्पनेमुळे हिंदुसमाजाचें अपरिमित नुकसान झालें आहे. कोट्यवधि अस्पृशाना पिढ्यानूपिढ्या साध्या माणुसकीच्या हक्कानाहि मुकावें लागलें आहे. ह्या सामाजिक विषमतेविरुद्ध जोतीरावांनी बंड पुकारलें व समतेच्या ध्वजाखाली हजारो शूद्रातिशूद्राना संघटित करण्याचा प्रयत्न केला. 'शिक्षण' व 'समता' या दोन शब्दातच त्यांच्या जीवनाचें सारसर्वस्व ग्रथित झालें आहे. ते नुसते बोलघेवडे सुधारक नव्हते. ज्या ज्या गोष्टी त्यांना समाजाच्या दृष्टीने हितावह वाटल्या, त्या त्या गोष्टी अंमलात आणण्यासाठी त्यांनी जिवापाड परिश्रम केले. त्यामुळे त्याच्यावर अनेक आपत्ति ओढवल्या. त्यांना वेळोवेळीं अपमान व छळ सहन करावा लागला. तरी देखील कोणाचीहि भीडभाड न धरता त्यानी आपले कार्य आमरण चालू ठेवलें.

फुले घराण्याचें मूळ गांव सातारा जिल्ह्यांतील कटगुण हें होय. तेथून जोतीबांचे पणजे पुरंदर तालुक्यात खानवडीस येअून राहिले. पुढे त्यांचा अेकुलता अेक मुलगा शेटीबा यास गरिबीमुळे खानवडी गाव सोडून अुदरनिर्वाहाकरिता पुण्यास यावें लागलें. येथे त्यांनी आपल्या तिघां मुलांस आरंभीं शेळ्या राखण्याच्या कामांत गुंतविलें, परंतु त्यांच्या धन्याने त्यांची हुपारी व कष्टाळूपणा पाहून त्याना फुलांचे शेले, गाद्या, लोड वगैरे गुंफण्याचें कसब शिकविलें. ह्या व्यवसायांत त्यानी थोडाबहुत पैसा व बराच नावलौकिक मिळविला. त्यामुळे त्याचें आधीचें 'गोन्हे' अुपनाव मागे पडून लोक त्याना 'फुले' या नावाने ओळखूं लागले. शेटीबाचा सर्वांत धाकटा मुलगा गोविंदराव हा आपल्या चरित्रनायकाचा पिता होय. जोतीरावांचा जन्म पुणें येथे अि. स. १८२७ त झाला. त्याच्या मातोश्रीचें नाव चिमणाबाअी. जोतीरावासारख्या कुलदीपक सुपुत्राला जन्म देअून ही साध्वी अवघ्या अेक वर्षाच्या आतच दिवंगत झाली. तथापि गोविंदरावाने त्यांचें अतिशय काळजीपूर्वक संगोपन केलें.

वयाच्या सातव्या वर्षी जोतीबा मराठी 'गावठी' शाळेत जाअूं लागले. त्याच्याभोवताली विद्याभ्यासंगाचें वातावरणच नसल्यामुळे दोनतीन वर्षातच त्यानी वडिलाच्या सागण्यावरून शाळेला रामराम ठोकला, व बागकामात लक्ष घातलें. गोविंदरावांच्या मनात आपल्या मुलाने स्वकष्टाने चार पैसे मिळवून सुखाचा संसार थाटावा अशी अिच्छा असणें स्वाभाविक होतें; परंतु अीश्वरीसंकेत काही निराळाच होता. लक्षावधि दलिताच्या मूक भावनाना वाचा फोडण्याचें पवित्र कार्य जोतीरावाच्या हातून व्हावयाचे होतें. त्यामुळे लवकरच त्यांचा शिक्षणक्रम पुढे चालूं होण्याचा योग आला. गफ्फार बेगमुनशी व मे. लिजिट या दोघां सद्गृहस्थाच्या सदुपदेशाने जोतीरावांचें मन पालटलें, व अि. स. १८४२ च्या सुमारास त्यानी अिंग्रजी शाळेंत आपलें नाव दाखल केलें.

जोतीरावांनी पांच सहा वर्षांत आपलें इंग्रजी शिक्षण पुरें केलें. लहानपणापासूनच त्याना गुलामगिरीची, मग ती राजकीय असो वा सामाजिक असो, मनापासून चीड होती. त्यामुळे विद्यार्थिदशेत त्यानी इंग्रजी राज्य उलथून पाडण्याच्या बुद्धीने लहुजीबुवा नावाच्या मांग पहिलवानापाशीं नेमबाजी, दांडपट्टा वगैरे गोष्टींचें शिक्षण घेतलें. परंतु लवकरच त्यांचा हा भ्रम दूर झाला. पांचपंचवीस तरुणाच्या हुल्लडीने कोलमडून पडण्याइतकी ब्रिटिश राजसत्ता

लेचीपेची नाही हें त्यांना कळून चुकलें; आणि देशसुधारणेच्या पायाशुद्ध मार्गाकडे त्यांची दृष्टि वळली. मिच्जिट, मिचेल प्रभृति ख्रिस्ती धर्मोपदेशकाशीं पुढे त्यांचा दृढ परिचय जडला. साक्षरताप्रसाराच्या दृष्टीने त्यांच्या शिक्षणकार्याचें महत्त्व जोतीरावानी ओळखलें. ख्रिस्ती धर्मोपदेशकाचें धोरण जरी आपणास विघातक होतें, तरी त्याची कार्यनिष्ठा, विद्याव्यासंग व सेवावृत्ति खरोखर वाखाणण्यासारखी होती. त्याच्या त्यागमय जीवनापासूनच जोतीबाना समाजकार्यांत आपलें शक्तिसर्वस्व वेचण्याची स्फूर्ति झाली, आणि सरकारी नोकरीचा शिष्टसंमत व सीधा मार्ग सोडून त्यांनी लोकसेवेचा खडतर मार्ग स्वीकारला. त्या वेळीं गोपाळराव देशमुख, गंगाधरशास्त्री फडके, महादेवशास्त्री कोल्हटकर, कृष्णशास्त्री चिपळूणकर याच्यासारखे बडे बडे पंडित महाराष्ट्रात विद्यमान होते. त्याच्या पांडित्याच्या पासंगालाहि जोतीरावाचें तुटपुंजें ज्ञान पुरले नसतें. परंतु जोतीरावाचें मनोधैर्य विलक्षण होतें. त्यानी आपल्या सद्सद्विवेकबुद्धीशीं कधीहि प्रतारणा केली नाहीं. सामाजिक क्रांतीच्या अत्युच्च ध्येयाने ते प्रेरित झाले होते. उच्चवर्णीयानी बहुजनसमाजात रूढ केलेल्या प्रतिगामी प्रवृत्तींना प्राणपणाने धक्के दिल्याशिवाय आपला हेतु साध्य होणार नाही याची त्याना पूर्ण जाणीव होती. म्हणून समाजातील प्रतिष्ठित व वजनदार वर्गाचा रोप पत्करूनहि त्यानी आपलीं मते निर्भीडपणें बोलून दाखविलीं, व त्यातील प्रत्येक शब्द आचरण्यात आणण्यासाठी प्रयत्नाची पराकाष्ठा केली.

जोतीरावाच्या विचारसरणीवर ख्रिस्ती धर्मोपदेशकाच्या मताची छाप होती असा आक्षेप त्याच्यावर वारंवार घेण्यात घेतो; परंतु महाराष्ट्रातील त्या वेळची परिस्थिति बारकाईने लक्षांत घेतल्यास या दुःखद घटनेबद्दल बिलकूल आश्चर्य वाटत नाही. हिंदुधर्मग्रंथातील तत्त्वज्ञान कितीहि अुच्च व श्रेष्ठ असलें, हिंदुसंस्कृतीचें अंतरंग कितीहि अुदात्त व व्यापक असलें, तरीदेखील आमच्या तत्कालीन अुच्चवर्णीयाच्या आचारविचारात स्वार्थ आणि संकुचितपणा, अन्याय आणि अनीति याचेंच प्रस्थ माजलें होतें हें खोटें नाही. जो समाज आपण आपला म्हणून मानतों त्यात आपल्या आप्तेष्टांच्या वाट्याला दुःख व दारिद्य, अपमान व अुपेक्षा याशिवाय दुसरे काही नाही हें जोतीरावाना धडधडीत दिसत होतें. पाश्चात्य देशातील वस्तुस्थितीची त्याना नीटशी कल्पना नव्हती. त्यामुळे बायबलातील नम्रतेची, समतेची, बंधुभावाची, व परोपकाराची साधी शिकवण त्याच्या मनाला चटकन पटली. वेदान्तातील सूक्ष्म व गहन तत्त्वज्ञानाच्या बौद्धिक कसरतीने त्याचें समाधान होण्याजोगें नव्हतें. सामाजिक दास्याच्या दडपणाखाली पिढ्यानूपिढ्या खुरटलेल्या त्याच्या मनाला सहानुभूतीचा जिव्हाळा हवा होता. ख्रिस्ती धर्मोपदेशकाच्या खेळीमेळीच्या व बंधुभावाच्या वागणुकींत त्याना तो आढळला. त्याच्याच प्रोत्साहनाने शूद्रातिशूद्राचीं मुलें शिकत असलेलीं ते पाहात होते. तेव्हा ख्रिस्तासंबंधी व ख्रिस्ती धर्मोदेशकांविषयी त्यानी वेळोवेळीं स्तुतिपर अुद्गार काढावे हें स्वाभाविकच होय. अि. स. १९३६ मध्येहि डॉ. आंबेडकरासारख्या समाजशास्त्रवेत्त्या पंडिताला अुद्वेगाने धर्मांतराची घोषणा करण्याचा मोह होतो, मग अव्वल अिंग्रजींत जोतीरावाचा ख्रिस्ती धर्माकडे थोडा कल असल्यास त्याबद्दल त्याना कसा दोष देता येअील? अुलट ख्रिस्ती धर्मोपदेशकांच्या मतातील ग्राह्यांश घेअूनहि ते शेवटपर्यंत त्यांच्या जाळ्यात सापडले नाहीत याबद्दल त्यांस धन्यवादच दिले पाहिजेत.

ज्या ज्या ठिकाणीं अन्याय आणि विषमता आढळून येअील त्या त्या ठिकाणीं त्याच्या परिमार्जनासाठी जोतीराव आपपरभाव न ठेवता झटत असत. अव्वल अिंग्रजींत शूद्रांच्याच नव्हे तर ब्राह्मणांच्या मुलींच्या शिक्षणाचीहि आबाळ होत असे. स्त्रियाना शिक्षण देणें हें धर्मबाह्य आहे अशी तत्कालीन सनातन्यांची समजूत होती. सरकारी अधिकाऱ्यांनीहि या कामीं

फारशी आस्था दाखविली नाही;[१] कारण अुच्चवर्णियाच्या धर्मभावना दुखविण्याची त्यांची तयारी नव्हती. त्यामुळे पुण्यांत स्त्रीशिक्षणाची बिलकुल सोय नव्हती. मंगळवारपेठेत खिस्ती धर्मोपदेशकांनी काढलेली अेक शाळा होती. परंतु अुच्चवर्णियाच्या मुली सहसा तिकडे फिरकत नसत. म्हणून जोतीरावांनी इ. स. १८५१ त आपल्या अनेक ब्राह्मण मित्राच्या साहाय्याने बुधवार पेठेंतील अण्णासाहेब चिपळूणकराच्या वाड्यात मुलींची शाळा स्थापन केली. त्याच्या पत्नी सावित्रीबाअी ह्या अतिशय प्रेमळ, सहनशील व पतिपरायण होत्या. स्त्रीशिक्षणाच्या ह्या कार्यात जोतीरावांना त्यांची फारच मदत झाली. आरंभीं त्या स्वतः आपल्या पतीजवळ तीन वर्षे शिकल्या, व नंतर शाळेंतील मुलींना शिकविण्याचें काम त्यांनी आपल्या अंगावर घेतलें. जोतीरावांच्या शाळेचा अुत्तरोत्तर अुत्कर्ष होत चाललेला पाहून सनातनी लोक चिडून गेले, व त्यांनी गोविंदपंतांचे कान फुंकले. कुलीन व घरंदाज स्त्रियानी सार्वजनिक ठिकाणीं जाअून मुलींना शिकवण्याचें काम करणें प्रशस्त नाही असा गोविंदरावांना त्यानी पोक्त सल्ला दिला. त्यामुळे म्हाताऱ्याचें मन बिथरलें, व त्यानी सावित्रीबाअींना घराबाहेर न पडण्याची सक्त ताकीद दिली. जोतीरावांनी आपल्या वडिलाची समजूत घालण्याचा शक्य तेवढा प्रयत्न केला, परंतु तो निष्फळ झाला. अखेरीस ते आपल्या अेकनिष्ठ पत्नीसह शान्तपणें घराबाहेर पडले, पण हातीं घेतलेलें कार्य त्यांनी सोडले नाही. जोतीरावाच्या या करारीपणामुळे विरोधकांचे पित्त खवळलें; व त्यांनी शाळेंतून जातां-येतांना सावित्रीबाअीच्या अंगावर बेशरमपणे दगड फेकण्यासहि कमी केलें नाही. मात्र त्या माअुलीने अेक चकारशब्द देखील न काढता आपलें पवित्र कार्य अव्याहत चालूं ठेवलें.

ह्या कार्याला सुव्यवस्थित स्वरूप प्राप्त व्हावें म्हणून जोतीरावानी आपल्या मित्राच्या सहकार्याने अेक कार्यकारी समिति स्थापन केली, व तिच्याकडे मुलींच्या शाळेची व्यवस्था सोपविली. या समितींत खालील सभासद होते. त्या सर्वांचा सामाजिक दर्जा लक्षात घेतला, म्हणजे जोतीरावांच्या कार्यकुशलतेची व संग्राहक वृत्तीची कल्पना येते.

| | |
|---|---|
| १ जोती गोविंद फुले, | २ जगन्नाथ सदाशिव, |
| ३ अण्णा सहस्रबुद्धे, | ४ केशव शिवराम जोशी, |
| ५ विष्णु मोरेश्वर भिडे, | ६ बापू रावजी माडे, |
| ७ कृष्णशास्त्री चिपळूणकर, | ८ विष्णुशास्त्री पंडित. |

या समितीचे चिटणीस जगन्नाथ सदाशिव हे होते. अनेक अेतद्देशीय व युरोपियन गृहस्थांनी या संस्थेला सुरवातीपासून मुक्तहस्तानी मदत केली. बोर्ड ऑफ अेज्युकेशनचे अध्यक्ष सर अर्स्किन पेरी हे स्वतः दरमहा ५० रु. देत असत. त्यामुळे अेका वर्षाच्या आंतच या संस्थेने आणखी दोन शाखा काढल्या. अेक शाखा २ सप्टेंबर १८५१ रोजीं रास्ता पेठेंत स्थापन झाली, व दुसरी ३ मार्च १८५२ रोजीं वेताळ पेठेंत निघाली. पालकांना बिनधोकपणें आपल्या मुली शाळेंत धाडतां याव्या म्हणून त्याना आणण्यासाठी चालकांनी मुद्दाम पट्टेवाला ठेवला होता. इ. स. १८५३ त या तिन्ही शाळातील मुलींची संख्या २३७ होती. संस्थेने सरकारकडे या कार्यासाठी दरमहा १०० रु. प्रमाणे मदत मागितली होती, परंतु सरकारी शिफारशीवरून दक्षिणा प्राइज कमिटीने दरमहा ७५ रुपयाची मदत देण्याचे ठरविलें; व सदर रकमेचा

---

१ "All Indian Governments were formerly slow in promoting education, especially among females. The Bombay Government was so until 1850." — The History of Protestant Missions in India, P.241.

विनियोग योग्य तऱ्हेने होतो किंवा नाही तें तपासण्याचें काम मे. क्यॉंडी यांच्याकडे सोपविलें. ह्या शाळांच्या दुसऱ्या वार्षिक परीक्षेच्या समारंभाला (१२ फेब्रुवारी १८५३) विश्रामबागवाड्यांत ३००० लोक जमले होते. यावरून जोतीरावांच्या कार्याचा त्या वेळीं किती बोलबाला झाला होता तें स्पष्ट दिसतें. अशा रीतीने जोतीरावांनी स्त्रीशिक्षणाच्या कार्याला महाराष्ट्रांत प्रथमतःच सक्रिय चालना दिली. या त्यांच्या अभिनव अुपक्रमाबद्दल सरकारने विश्रामबाग वाड्यांत त्यांचा जाहीर सत्कार करून त्याना २०० रुपयाची शालजोडी समर्पण केली.

जोतीरावानी लहानपणीं लहुजीबुवा नांवाच्या मांग तालीमबाजाच्या आखाड्यांत शारीरिक शिक्षण घेतलें होतें. तेव्हापासूनच त्याच्या मनांत अस्पृश्याबद्दल सहानुभूति होती. मुलींच्या शाळेचे काम सुरळीतपणें चालूं लागल्यावर त्यानी अतिशूद्रांच्या शिक्षणाकडे आपलें लक्ष पुरविलें. अि. स. १८५२ च्या मे महिन्यांत त्यांनी वेताळ पेठेंत स्वखर्चानें महार, मांग, परवारी वगैरे अस्पृश्य जातीच्या मुलासाठी दोन शाळा स्थापन केल्या. परंतु जागेच्या वगैरे अडचणींमुळे बरेच दिवस त्यांची कुचंबणा होत होती. म्हणून त्यांनी १० सप्टेंबर १८५३ रोजीं आपल्या जिवलग मित्रांच्या साह्याने 'महार-मांग अित्यादि लोकांस विद्या शिकविण्याकरितां मंडळी' स्थापन केली. खालील लोक तिचे सदस्य होते:—

१ सदाशिव बल्लाळ गोवंडे— मुख्य स्थानीं
२ मोरो विठ्ठल वाळवेकर— चिटणीस
३ सखाराम यशवंत परांजपे— खजिनदार
४ जोतिराव गोविंद फुले } सभासद
५ बाबाजी मनाजी ढेंगळे } सभासद

अस्पृश्यांच्या शाळेसाठी त्या वेळीं गावांत जागा मिळणेंहि मुष्कील होतें. तेव्हा रा. ब. गोवंडे यांनी आपल्या मालकीची जागा शाळेसाठी वापरण्यास दिली, व शाळेचें काम सुव्यवस्थित सुरू झालें. त्यानंतर अनेक युरोपियन व अेतद्देशीय शिक्षणप्रेमी गृहस्थांचें या संस्थेला साहाय्य मिळालें, व प्रतिवर्षी संस्थेची भरभराट होत चालली. रीव्हज, मॅन्स्फील्ड, हॅरिसन प्रभृति सरकारी अधिकाऱ्यांनी व्यक्तिशः दरमहा १० रु. पासून २५ रु. पर्यंत या शाळेला मदत केली. दक्षिणा प्राइझ फंडांतूनहि दरमहा २५ रुपये मिळूं लागले[१]. त्यामुळे संस्थेच्या सदस्यांना मोठा हुरूप आला. जोतीरावांनी लहुजी मांग व राणबा महार यांना हाताशीं धरून महार, चांभार, धेड अित्यादि अस्पृश्य जातींत शिक्षणाची गोडी अुत्पन्न केली. दिवसानुदिवस शाळेंतील मुलांची संख्या वाढूं लागली. अि. स. १८५८ त या संस्थेच्या पुण्यांत तीन शाळा होत्या, व अेकंदर मुलांची संख्या २५८ होती. शाळेंत मुलांना पाणी पिण्याची अडचण पडे, म्हणून जोतीरावांनी आपल्या राहत्या घराजवळील हौद अस्पृश्यांना खुला केला. गरिबीमुळे मुलें वारंवार शाळा सोडून जात, त्यामुळे त्यांच्या शिक्षणात व्हावी तशी प्रगति झाली नाही. तथापि अतिशूद्रांची शाळा

---

१ "जोती गोविंदराव फुले याणी म्हार, मांग, कैकाडी अित्यादि अतिनीच मानलेल्या जातींस कांहीं विद्येचा संस्कार घडून त्यांचें दुर्भाग्य व दुराचार घालवावे म्हणून शाळा, पेठ जुनी गंज येथें घातली, त्यांत शंभर मुलें आहेत, व दुसरी एक त्याच जातीचे मुलींची शाळा आहे. त्या दोन्ही शाळा आजपर्यंत त्यानी आपले पदरचा खर्च करून शिकविल्या, हल्ली दक्षणा कमीटीनें गरीब लोकांची दया करून व शाळा घालणाऱ्यांची "सर्वभूतहिते रताः" अशी बुद्धि पाहून तीनशें रुपये दरसाल दक्षणेंतून त्यांस खर्चास देण्याचें ठरविले आहे. असें ऐकून आम्हांस फार संतोष वाटतो, कारण कीं हा विद्यावृद्धीचा नवा मार्ग आहे."

—ज्ञानप्रकाश, १६ आगस्ट १८५२.

स्थापन करण्यांत जोतीरावांनी जें नीतिधैर्य प्रकट केलें त्याला तत्कालीन महाराष्ट्राच्या अितिहासांत दुसरी तोड नाही.

जोतीराव ब्राह्मणद्वेष्टे म्हणून गणले जातात; परंतु ब्राह्मण असो वा शूद्र असो, स्त्री असो किंवा पुरुष असो, कोणाच्याहि दुःखाने द्रवण्याअितकें त्याचे अंतःकरण थोर होतें. अतिशूद्राची दुरवस्था पाहून त्यांचें चित्त विरघळलें; त्याचप्रमाणेच ब्राह्मणकुटुंबातील विधवा स्त्रियांचे हाल बघूनहि त्यांचें मन अस्वस्थ झालें. म्हणूनच लेखनाच्या व भाषणाच्या द्वारें त्यानी पुनर्विवाहाचा धडाडीने पुरस्कार केला, व अि. स. १८६४ त पुण्यास गोखल्यांच्या बागेंत सारस्वत ज्ञातींतील अेक पुनर्विवाहहि घडवून आणला. ही सुधारणा अुच्चवर्णीयाच्या पचनीं पडण्यास बराच काळ लागणार असें स्पष्ट दिसत होतें. तेव्हा अेखाद्या गतभर्तृकेचे चुकून वाकडें पाअूल पडल्यास तिच्यावर भ्रूणहत्येचा अनवस्था प्रसंग ओढवूं नये व तिच्या अब्रूचे धिंडवडे निघूं नयेत म्हणून अि. स. १८६३ तच त्यानी आपल्या घराशेजारीं बालहत्याप्रतिबंधकगृह अुघडलें होतें, व त्यांत अशा अभागी व निराश्रित स्त्रियानी गुप्तपणें येअून प्रसूत होअून जाण्याची व्यवस्था केली होती. पुढे न्यायमूर्ति रानडे, गोपाळराव देशमुख यांच्यासारख्या विचाराग्रणींनाहि अशा संस्थेची अुपयुक्तता पटली, व त्याच्या प्रयत्नाने पंढरपूर येथील बालहत्याप्रतिबंधकगृह स्थापन झालें.

अशा रतीने निरनिराळ्या समाजापयोगी कार्यांत जोतीरावानी आपल्या अैन अुमेदींतील वीसबावीस वर्षें खर्च केलीं. त्यांनी आपल्या कार्यापासून परावृत्त व्हावें म्हणून अुच्चवर्णीय सनातन्यांनी आपल्या प्रयत्नांची शिकस्त केली. त्याच्याविरुद्ध अनेक अफवा अुठविल्या. त्यांच्या कुटुंबांत भांडणें लावून दिलीं. त्यांच्या आप्तेष्टांनी त्यांच्यावर बहिष्कार घालावा म्हणून नाना कारवाया केल्या. परंतु जोतीरावांनी आपलें धैर्य खचूं दिलें नाही. अुलट ज्या सामाजिक सामाजिक प्रतिष्ठेच्या बळावर हे अुच्चवर्णीय धर्ममार्तंड त्यांना छळत होते, तिच्या मुळावरच घाव घालण्याचा अुपक्रम त्यांनी हातीं घेतला. ज्याप्रमाणे ज्ञानेश्वर-तुकारामादि साधुसंतांनी चिरकालीन अनिष्ट परंपरा झुगारून देअून, धार्मिक क्षेत्रांत का होअीना पण समतेचें साम्राज्य स्थापन केलें, त्याप्रमाणेच सामाजिक क्षेत्रांत निरपवाद समतेचें अधिराज्य स्थापन करण्याचा जोतीरावांनी निश्चय केला. संतांचें कार्य वैदिक तत्त्वज्ञानाच्या भरभक्कम पायावर अुभारलेलें होतें. जोतिरावाचा दृष्टिकोन मात्र अत्यंत अेकांगी व अशास्त्रीय होता. कोट्यवधि शूद्रातिशूद्रांची स्थिति सुधारावी अशी त्यांना मनापासून तळमळ होती. ह्या अत्युच्च ध्येयाच्या सिद्धीसाठी लागेल तो स्वार्थत्याग करण्याचीहि त्यांची तयारी होती, परंतु आपल्या दलित बांधवांच्या वाढत्या दारिद्र्याचें त्यांना अचूक निदान करतां आलें नाही. ब्राह्मणांच्या द्वेषाने जोतीराव अंध बनले होते. त्यामुळे अिंग्रजांचे राजकीय डावपेंच त्यांना अुमगले नाहीत. ब्राह्मण कामदार त्या वेळीं रयतेला अन्यायाने लुबाडीत असत. त्यामुळे गोरगरिबांचें पुष्कळच नुकसान झालें असेल यांत तिळमात्र शंका नाही; परंतु हिंदुस्थानांतील लक्षावधि कारागीरांच्या बेकारीचें मुख्य कारण परकीयाचा व्यापार होय हें जोतिरावांच्या मुळीच लक्षात आलें नाही; आणि म्हणून अिंग्रज सरकारविरुद्ध ब्रहि न काढतां त्यांनी अुच्चवर्णीयांवरच यथेच्छ तोंडसुख घेतलें. सरकारी नोकरींतील सगळ्या जागा जरी शूद्रांना बहाल केल्या, तरी देशाचें दैन्य संपणार नाही. त्यासाठी येथे अुद्योगधंद्याची वाढ झाली पाहिजे. अेतद्देशीय व्यापाराला सरकारी संरक्षण मिळालें पाहिजे अित्यादि गोष्टींची त्यांना मुळीच कल्पना नव्हती. या दृष्टीने त्यांचें कार्य कितीहि सदोष व अेकांगी असलें, तरी देखील त्याचे सामाजिक महत्त्व बिलकूल कमी होत नाही. त्यांनी सत्यशोधक समाजाच्या निशाणाखाली अठरापगड

जातींतील शूद्रातिशूद्राना संघटित करण्याचा प्रयत्न केला. त्यांना शिक्षणाची गोडी लावली. त्यांच्यांतील सुशिक्षित तरुणात आत्मविश्वास अुत्पन्न करून त्याना कार्यप्रवृत्त केले. जोतिरावांचा मित्रपरिवार फार मोठा होता. त्यात ब्राह्मणापासून अंत्यजापर्यंत सर्व जातीचे लोक होते. त्यांच्या साहाय्याने जोतीरावानी २४ सप्टेंबर १८७३ रोजीं सत्यशोधकसमाज स्थापन केला. त्याच्या त्रैवार्षिक प्रतिवृत्तातील खालील अुताऱ्यावरून त्यांचा अुद्देश व धोरण स्पष्ट होतें:—

"ब्राह्मण, भट, जोशी, अुपाध्ये अित्यादिक लोकांच्या दास्यत्वापासून शूद्र लोकांना मुक्त करण्याकरिता व आपल्या मतलबी ग्रंथाच्या आधारें आज हजारों वर्षे ते शूद्र लोकांस नीच नीच मानून गफलतीनें लुटीत आले आहेत. यास्तव सदुपदेश व विद्याद्वारें त्यांस त्यांचे वास्तविक अधिकार समजून देण्याकरिता म्हणजे धर्म व व्यवहारसंबंधीं ब्राह्मणाचे बनावट व कार्यसाधक ग्रंथांपासून त्यास मुक्त करण्याकरिता काही सुज्ञ शुद्र मंडळींनी हा समाज ता. २४ सप्टेंबर सन १८७३ अिसवी रोजीं स्थापन केला. या समाजांत राजकीय विषयांवर बोलणें अजी वर्ज आहे[1]."

याप्रमाणे पुणें येथे सत्यशोधकसमाजाची स्थापना झाल्यावर हळूहळू महाराष्ट्रांतील अितर शहरांतहि त्याच्या शाखा निघाल्या व त्यांतील समासदांची संख्या तीनशेपर्यंत जाअून पोहोचली. कृष्णराव पाडुरंग भालेकर, धोंडीराम नामदेव कुंभार, राजाराम गोविंदराव फुले, रामय्या व्यंकय्या अय्यावारू, विश्राम रामजी घोले, ग्यानोबा कृष्णाजी ससाणे, सखाराम यशवंत परांजपे, रामसेट बापूसेठ उरवणे, तुकाराम तात्या पडवळ, सदाशिवराव गोवंडे, विनायक बापूजी भाडारकर, शिवराम सखाराम दातार अित्यादि सद्‌गृहस्थ या समाजाचे प्रमुख सभासद होते. कोणत्याहि जांतीच्या मनुष्याला या समाजात दाखल होण्यास प्रतिबंध नव्हता. जोतीरावाचे अनेक ब्राह्मण मित्रहि समाजाचे सभासद होते. दर रविवारीं सामुदायिक प्रार्थना होत असे, व महिन्यांतून दोनदा अुपयुक्त विषयावर व्याख्यानें देण्यांत येत.

'सर्वसाक्ष जगत्पत्ती । त्याला नकोच मध्यस्ती'

हें समाजाचे ब्रीदवाक्य असल्यामुळे जोतीरावानी आपल्या अनुयायांना पुरोहिताशिवाय लग्नें लावण्याचा व मंगलाष्टकें मराठींत म्हणण्याचा अुपदेश केला. त्याना वारंवार धीर देअून अशाप्रकारचे विवाह घडवून आणले. ब्राह्मणेतरांत शिक्षणाची आवड अुत्पन्न होअून जातिभेदाची तीव्रता कमी व्हावी म्हणून या समाजाने पुष्कळ खटपट केली. अि. स. १८८५ मध्ये पुणें येथे सत्यशोधक समाजाच्या झेंड्याची मोठ्या थाटाने मिरवणूक निघाली होती. या समारंभास स्वतः न्यायमूर्ति रानडेहि अुपस्थित होते. ह्या चळवळीमुळे जोतीरावांनी खालच्या वर्गांत चैतन्य निर्माण केले, व कोणताहि अन्याय निमूटपणें सहन करण्याची त्यांची नादानपणाची वृत्ति नाहीशी करून त्याना सुसंघटित रीतीने त्याचा प्रतिकार करण्यास शिकविलें.

जोतीरावाच्या ह्या प्रभावी संघटनेमुळे ब्राह्मणेतरात स्वार्थनिरपेक्ष कार्यकर्त्यांची नवीन परंपरा अुदयाला आली. या परंपरेंत कृष्णराव पाडुरंग भालेकर, ग्यानोबा कृष्णाजी ससाणे, नारायण मेघाजी लोखंडे, गणपत सखाराम पाटील अित्यादिकांची प्रामुख्याने गणना होते. कृष्णराव भालेकर यानी स्वतःच्या हिमतीवर अि. स. १८७७ त 'दीनबंधु' साप्ताहिक काढलें. सत्यशोधक समाजाच्या कार्याचा हिरिरीने प्रसार करणारें हें महाराष्ट्रांतील पहिलेंच वृत्तपत्र होय. जोतीरावहि या साप्ताहिकांत नेहमी लेख लिहीत असत. त्याची ध्येयनिष्ठा अितकी दांडगी होती की, आपल्या कार्यसिद्धीसाठी विरोधकांशींहि सहकार्य करण्यास ते तत्पर असत. तसेंच

१ निबंधमाला, पृ.४६६-६७.

अेकदा अेखाद्या पक्षाला पाठिंबा दिला म्हणजे ते त्यासाठी वाटेल ती झीज सोसण्यास मागे-पुढे पाहात नसत. कोल्हापूर प्रकरणात ज्या वेळीं टिळक-आगरकरावर अब्रुनुकसानीची फिर्याद झाली, त्या वेळीं जोतीरावप्रभृति ब्राह्मणेतर पुढाऱ्यांनी टिळक-आगरकरांना अुचलून धरलें. अितकेंच नव्हे तर जोतीरावानी रामशेट अुरवणे याच्याकडून त्यांना १०००० रुपयांची जामिनकी देवविली; आणि ते सुटून आल्यानंतर पुणें-मुंबअी येथे त्यांचा जाहीर सत्कार केला.

सार्वत्रिक सक्तीच्या शिक्षणाचा प्रश्न सरकारने, ताबडतोब हातीं घ्यावा, त्याशिवाय बहुजन-समाजांची स्थिति मुळीच सुधारणार नाही असें त्यांचें ठाम मत होतें. त्याचा त्यांनी निर्भीडपणें व कसोशीने प्रचार केला. हंटर कमिशनपुढेहि त्यांनी याच आशयाची साक्ष दिली होती. मध्यंतरीं मुंबअी अिलाख्यांत राष्ट्रसभेचें मंत्रिमंडळ अस्तित्वांत आलें, त्यावेळीं पंतप्रधानांनी आपलें शिक्षण-विषयक धोरण जाहीर केलें होतें. 'अितःपर सरकार प्राथमिक शिक्षणाकडेच विशेष लक्ष देअील. देशांतील दानशूर धनिकांनी अुच्च शिक्षणाला अुदार आश्रय द्यावा' असाच त्यांच्या घोषणेचा अित्यर्थ होता. अेका दृष्टीने जोतीरावांच्या विचारसरणीचा हा मोठा विजयच आहे असें म्हणावयास कांही हरकत नाही. रायगडावरील शिवाजीमहाराजाची समाधि मोडकळीस आली होती. तिच्या जीर्णोद्धाराचा प्रश्नहि जोतीरावानीच अुपस्थित केला, व त्या कामीं अतिशय मेहनत घेतली. समाजकल्याणाच्या कोणत्याहि कार्यात ते आनंदाने भाग घेत असत. जनता-जनार्दनाचा असा हा अेकनिष्ठ भक्त अखेर अि. स. १८९० त कालवश झाला.

जोतीरावांनी आपल्या तत्त्वांचा प्रचार करण्यासाठी सातआठ लहानमोठे गद्यपद्यात्मक ग्रंथ लिहिले. त्यांच्या लिखाणाचा मुख्य रोख ब्राह्मणांच्या कपटविद्येवर व स्वार्थलंपटतेवरच आहे. त्यांतील बारीकसारीक तपशीलाबद्दल दुमत होण्याचा संभव आहे, परंतु त्यांनी वेडरपणें वेशीवर टांगलेलीं दलित वर्गाचीं गाऱ्हाणीं रास्तच होतीं असें म्हणावे लागतें. त्यांची भाषा प्रायः अशुद्ध, ओबडधोबड, आणि क्वचित् असभ्य व ग्राम्यहि आहे. तरीदेखील त्यांच्या वाक्या-वाक्यांत त्यांच्या अंतःकरणातील तळमळ व आवेश स्पष्ट दिसतो. जोतीराव काही समाज-शास्त्रज्ञ किंवा तत्त्वज्ञानी नव्हते. हिंदुधर्मीयांच्या समाजरचनेची तात्त्विक चिकित्सा करण्याची त्यांची मुळीच आकांक्षा नव्हती. त्यांना फक्त अन्यायाने व दारिद्र्याने गांजलेल्या मूक व अ-सहाय्य जनतेच्या दुःखाला वाचा फोडावयाची होती. त्यांना कनिष्ठ जातींतील लोकात सामा-जिक असंतोष अुत्पन्न करावयाचा होता. यासाठी समतोल विवेचनाची बिलकूल आवश्यकता नव्हती. शिवाय तेव्हा मराठी भाषेंत आजच्यासारखी प्रगल्भ व सुसंस्कृत गद्यशैली निर्माण झालेली नव्हती. बोलण्याप्रमाणेंच लिहिण्याचा त्या वेळीं परिपाठ होता. लोकहितवादींसारख्या व्यासंगी विद्वानाच्या लेखांतहि पुष्कळ अपशब्द आढळतात. अेवढ्यावरूनच आपण त्यांचें लिखाण टाकाअू समजत नाही. जोतीरावांचे ग्रंथहि त्यांच्या त्यागमय जीवनाच्या प्रकाशांतच वाचले पाहिजेत. तुकारामासारख्या साधुपुरुषानेहि दांभिकांचा समाचार घेतांना कितीतरी ग्राम्य शब्द वापरले आहेत, परंतु त्यांचे अुदात्त विचार व पवित्र आचरण पाहून आपण तिकडे दुर्लक्ष करतों. तोच न्याय जोतीरावांच्या बाबतींतहि लागू केला पाहिजे. त्यांची भाषा ग्राम्य असेल, परंतु त्यांचा हेतु अुच्च होता, त्यांचें मन शुद्ध होतें.

जोतीरावांनी पुढील ग्रंथ लिहिले आहेत—

(१) ब्राह्मणांचें कसब, मुंबअी, १८६९
(२) शिवाजीचा पोवाडा, मुंबअी, १८६९
(३) गुलामगिरी, पुणें, १८७३

(४) शेतकऱ्यांचा आसूड, भाग १-४, पुणें, (?)
(५) सत्सार, अंक १-२, पुणें, १८८५
(६) अिशारा, पुणें, १८८५
(७) सार्वजनिक सत्यधर्मप्रकाश, पुणें, १८९१

जोतीरावांनी अि. स. १८५५ त अेक लहानसें नाटक लिहिलें होतें. त्यांत त्यांनी "भट जोशी आपल्या मतलबी धर्माच्या थापा देअून अज्ञानी शूद्रांस कसकसें फसवून खातात व ख्रिस्ती अुपदेशक आपल्या निःपक्षपाती धर्माच्या आधाराने अज्ञानी शूद्रांस खरें ज्ञान सांगून त्यांस कसकसें सत्य मार्गावर आणितात[1]" याचें वर्णन केलें होतें. यावरून जोतीरावांच्या मनावर ख्रिस्ती मताचा किती पगडा बसला होता ते स्पष्ट दिसतें. हें नाटक त्यांनी दक्षिणा प्राअिज कमिटीस अर्पण केलें, परंतु तिने तें नापसंत केल्यामुळे त्यांनी पुढे तें छापलें नाही. त्यानंतर अि. स. १८६९ त त्यांनी 'ब्राह्मणांचें कसब' या नांवाचें अेक छोटेंसें पद्यात्मक पुस्तक प्रसिद्ध केलें. त्यांतहि त्यांनी स्वार्थसाधु ब्राह्मणांच्या कारवाया अुघड करून दाखविल्या आहेत. याच वर्षी त्यांनी छत्रपति शिवाजीमहाराजांचा 'पवाडा' लिहून प्रसिद्ध केला. हा पवाडा त्यांनी परमहंस सभेचे अध्यक्ष रावबहादूर रामचंद्र बाळकृष्णाजी राणे यांना अर्पण केला आहे. हा चव्वेचाळीस पृष्ठांचा लहानसा पद्यग्रंथ खरोखरीच वाचनीय आहे. याच सुमारास कुंट्यांचें 'राजा शिवाजी' काव्यहि प्रकाशित झालें होतें. अि. स. १८७३ त गणेशशास्त्री लेल्यांनी 'शिवाजीचरित्र' लिहिलें. यावरून निबंधमालेपूर्वीच आमच्यांतील विचारवंतांना स्वदेशाच्या अितिहासाची थोरवी कळूं लागली होती हें स्पष्ट होतें. जोतीरावांना गद्यापेक्षा पद्यच जास्त सफाअीदार रीतीने लिहितां येत होतें असें दिसतें. ह्या ग्रंथरचनेच्या कामीं त्यांना भांडारकर, बाबा पदमजी व गंगाधरशास्त्री यांचें बरेंच साहाय्य लाभलें होतें. या पवाड्याचे अेकंदर आठ भाग आहेत. "माळी कुणब्यास समजण्याजोगी सोपी भाषा होण्याविषयीं फार श्रम करून त्यांस आवडण्याजोग्या चालीने रचना केली आहे. लांबचलांब मोठाले संस्कृत शब्द मुळींच घातले नाहींत. व जेथें अुपाय चालेना तेथें मात्र लहान लहान शब्द निर्वाहापुरते घेतले आहेत.[2]" या पवाड्यांतील कांही भाग नमुन्यासाठी येथे अुद्धृत करतों—

"महाराज आम्हासीं बोला । धरला कां तुम्ही आबोला ।
मावळे गडी सोबतीला । शिपाअी केले अुघड्याला ॥
सोशिलें अुन्हातान्हाला । भ्याला नाहीं पाअुसाला ।
डोंगर कंगर फिरला । यवन जेरीस आणला ॥
लुटलें बहुत देशांला । वाढवी आपुल्या जातीला ॥
लढवी अचाट बुद्धीला । आचंबा भूमीवर केला ॥
बाळगी जरी संपतीला । तरी बेतानें खर्च केला ॥
वाटणी देअी शिपायांला । लोभ द्रव्याचा नाहीं केला ॥
चतुर सावधपणाला । सोडिलें आधीं आळसाला ॥
लहान मोठ्या पागेला । नाहीं कधीं विसरला ॥
राजा क्षेत्र्यांमध्यें पहिला । नाही दुसरा अुपमेला ॥
कमी नाहीं कारस्तानीला । हळू चवळवी लोकांला ॥
युक्तीनें बचवी जीवाला । कधीं भिअीना संकटाला ॥

१ गुलामगिरी, पृ. ९४, २ शिवाजीचा पवाडा– प्रस्तावना,

चोरघस्ती घेअी किल्ल्याला । तसेच बाकी मुलखाला ।।
पहिला झटे फितुराला । आखेर करी लढाईला ।।
युद्धीं नाहीं विसरला । लावी जीव रयतेला ।।
टळेना रयत सुखाला । बनवी नव्या कायद्याला ।।
दाद घेई लँहानँासानाची । हयगय नव्हती कोणाची ।।
आकृति वामनमूर्तीची । बळांपेक्षा चपळाअीची ।।
सुरेख ठेवण चेहेऱ्याची । कोंदिली मुद्रा गुणरत्नाची ।।
भिडस्त भारी । साबडा घरी ।।
प्रिय मधुरी । भाषण करी ।।
मोठा विचारी । वर्चड करी ।।
झटून भारी । कल्याण करी ।।
आप्त सोयरी । ठेवी पदरी ।।
लाडावरी । रागावे भारी ।।
इंग्लीश ज्ञान होतां म्हणे मी पुत्र क्षेत्र्याचा ।
अुडवी फट्टा ब्रम्ह्याचा ।।
जोतीराव फुल्याने गाअीला पुत क्षुद्राचा ।
मुख्य धनी पेशव्याचा ।।
जिजाबाअीचा बाळ काळ झाला यवनाचा ।
पवाडा गातीं शिवाजीचा ।।
कुळवाडी भूषण पवाडा गाती भोसल्याचा ।
छत्रपती शिवाजीचा ।।८।।'[1]

अि. स. १८७३ त जोतीरावांनी 'गुलामगिरी' नांवाचा ग्रंथ लिहिला. तो त्यांनी गुलामगिरीचा नायनाट करणाऱ्या 'युनाअिटेड स्टेट्समधील सदाचारी लोकांना' अर्पण केला आहे. त्यांतील मराठी व अिंग्रजी अशा दोन्ही प्रस्तावना मननीय व अुद्बोधक आहेत. त्यांत जोतीरावांनी आपला दृष्टिकोन निर्भिडपणें मांडला आहे; आणि सरकारच्या शिक्षणविषयक संकुचित धोरणावरहि सडेतोड टीका केली आहे. या सुमारें सव्वाशे पानांच्या छोटेखानी पुस्तकांत लेखकांनी ब्रह्मदेवाच्या अुत्पत्तीपासून तों भटपांड्यांच्या बंडापर्यंत आर्यावर्ताचा समग्र अितिहास ग्रथित केला आहे. अिराणांतून येअून आर्यांनी आपल्या कपटविद्येने येथील मूळ 'क्षेत्रवासी' शूद्रातिशूद्रांची कशी धूळधाण केली त्याचा रसभरित वृत्तांत यांत आपणांस वाचावयास सांपडतो. ह्यांतील अेखाद-दुसरें प्रकरण जरी सहज चाळलें, तरी हा तथाकथित (so-called) अितिहास केवळ कपोलकल्पित आहे हें तेव्हाच लक्षांत येते. अडाणी शूद्रातिशूद्रांसाठीच ज्यांनीं महाराष्ट्रांत 'मोक्षाची गवांदि' घातली त्या ज्ञानदेवादि संतांनाहि जोतीरावांनी आपमतलबी ब्राह्मणांच्या मालिकेंत गोवलें आहे हें पाहून जोतीरावांच्या अैतिहासिक ज्ञानाची कींव करावीशी वाटते. मात्र शेवटच्या चार पांच प्रकरणांतील विवेचन, ज्यात अव्वल अिंग्रजींतील वस्तुस्थिति निवेदन केली आहे, तें बव्हंशीं विश्वसनीय व विचारार्ह आहे. जोतीरावांच्या लेखणींत 'अेक घाव दोन तुकडे' अशा तऱ्हेचा आडमुठेपणा दिसून येतो. त्यांना सुशिक्षितांचे छक्केपंजे माहीत नव्हते. गोड शब्दांच्या आवरणाखाली गरळ ओकण्याची कला

१ शिवाजीचा पवाडा, पृष्ठें ४३-४४.

त्यांनी हस्तगत करून घेतलेली नव्हती. त्यामुळे त्यांचे पथ्यकर विचारहि तत्कालीन समाजाला कटु व अप्रिय वाटले. त्यांच्या प्रस्तुत पुस्तकांतील दोन अुतारे येथे सादर करतों.

"आजपर्यंत जे भट मामलेदार झाले त्यांपैकीं कित्येक आपल्या वाअीट आचरणामुळें सरकारचे गुन्हेगार ठरून सजेस प्राप्त झाले. ते आपलें काम करीत असतां अितके कुनीतीनें वागत व गरीबगुरीब लोकांवर जुलूम करीत कीं, त्याचा अेक ग्रंथ होअील. अरे या पुण्यासारख्या शहरात भट मामलेदार कुळकर्ण्यापासून आणलेली लायकी दाखविल्याशिवाय मोठमोठ्या सावकारांची देखील हमी कबूल करीत नाहींत, मग तेथें गरीबगुरीबांची दाद कोठून लागणार ? अरे हे कुळकर्णी तें लायकी तिकिट देताना आपला देव्हारा घुमवित नसतील काय ? त्याचप्रमाणें या शहरची म्युनिसिपालिटी कोणी अेकाद्या घरवाल्यास त्याच्या जुन्या शेतखान्याच्या जाग्यावर नवा शेतखाना, भट मामलेदाराच्या द्वारें त्या पेठेच्या कुळकर्ण्याचा अभिप्राय पाहिल्याशिवाय बाधू देत नाहीं. अरे त्या कुळकर्ण्याजवळ त्याच्या पेठेचा नकाशा असून ज्यांत अेकंदर सर्व नवी खरेदी करणाराचीं नावे सामील करून साल दरसाल त्याची प्रत मामलेदाराच्या दप्तरीं दाखल्याकरिता ठेवण्याची चाल नसून कुळकर्ण्यांचा त्या जाग्याविषयी अभिप्राय खरा तरी कशावरून समजावा ? या सर्व कारणांवरून असा संशय येतो की, भट मामलेदाराने आपल्या जातीच्या कलमकसायाचें काही तरी त्यात हीत व्हावें म्हणून ही वहिवाट चालू ठेविली असावी यावरून तूंच विचार करून पहा कीं, अशा युरोपियन लोकाच्या बस्तिशेजारच्या पुणें शहरांत भट मामलेदार जर अशी झोटिंग बादशाअी करून आपल्या जातीच्या कलमकसायाची पोळी पिकवितात, तर खेड्यापाड्यात त्याचा काय जुलूम असेल बरें ?"[1]

"काया पुरती लंगोटी ।। फिरती नागराचे पाठी ।।१।।
अेका घोंगड्या वांचूनी ।। स्त्रिया नसे दुजे शयनीं ।।२।।
ढोरा मागें सर्व काळ ।। पोरें फिरती राणोमाळ ।।३।।
ताक कण्या पोटभरी ।। धन्य म्हणे संसारी ।।४।।
असे वस्त्राची कमती ।। अेकमेका चिकटती ।।५।।
सरकारी पट्टी नेट ।। पडे तीन शेंड्या गाठ ।।६।।
कर्ज रोखीं लिहिणे आट ।। निर्दय मारवाडी काट ।।७।।
अज्ञान्याला समजत नाहीं ।। कुळकर्ण्याने लिहिलें काही ।।८।।
वकीलाची माहागाअी ।। न्यायाधिशा दया नाहीं ।।९।।
पाप पुण्य जेथें नाहीं ।। पैशापुरते दादा भाअी ।।१०।।
नित्य जमती अेकाठायीं ।। शूद्राची दाद नाहीं ।।११।।
राजे धर्मशील म्हणविती ।। आता कारे मागें घेती ।।१२।।
विद्या द्यावी पट्टी पुरती ।। धिःकारूनी सागे जोती ।।१३।।"[2]

अि स. १८७७ सालीं महाराष्ट्रात मोठा दुष्काळ पडला. त्या वेळीं शेतकऱ्यांची अन्नान्नदशा होअून गेली. तेव्हा जोतीरावानी 'शेतकऱ्यांचा आसूड' या नांवाचे चाळीस चाळीस पानी दोन निबंध लिहिले, आणि ते तावडतोब छापून घेअून सरकारी अधिकाऱ्यांकडे रवाना केले. त्यांत त्यांनी शेतकऱ्यांच्या केविलवाण्या स्थितीचें यथार्थ चित्र रेखाटून त्याना सर्वतोपरी साहाय्य करणें सरकारचें आद्य कर्तव्य आहे असे दाखवून दिलें होतें. कांही वर्षांनंतर याच विषयावर त्यांनीं आणखी दोन निबंध लिहिले, परंतु ते प्रसिद्ध झाले नाहीत. या निबंधांत ते अेके ठिकाणीं

१ गुलामगिरी, पृ ७५-७६. २ गुलामगिरी, पृ.११४-११५.

म्हणतात, "ब्राह्मणेतर लोकांच्या धर्मसंबंधीं व सामाजिक स्थितीसंबंधीं मी जों जों विचार करितों तों तों मला अेखाद्या महासागराकडे दृष्टि फेंकल्यासारखे होतें" गोरगरिबांच्या सुखदुःखाशीं जोतीराव किती समरस झाले होते याचे दाखले त्याच्या चरित्रांत ह्याप्रमाणे जागोजाग आढळतात.

श्रीमंत सयाजीराव गायकवाड सन १८८५ च्या पावसाळ्यात पुण्यास आले होते. त्यावेळीं मराठासमाजाने त्याना मानपत्र दिलें. ह्या समारंभांत बोलताना न्या. मू. रानड्यानी "जातिभेद असला म्हणून आपल्या अिष्ट हेतूस तो बिलकूल आडवा येत नाही" असे अुद्गार काढले होते. त्याचें खंडन करण्यासाठी जोतीरावानी 'अिशारा' नावाचें लहानसे पुस्तक लिहिले त्यात जातीभेद समाजाच्या अैक्यास व प्रगतीस कसा विघातक आहे याची त्यानी आपल्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणे चर्चा केली आहे.

सत्यशोधक समाजाच्या तत्त्वाचा गावोगावीं प्रसार व्हावा म्हणून 'सत्सार' नांवाचें नियतकालिक काढण्याचे जोतीरावानी योजिले होतें. त्याचा पहिला अंक सन १८८५ च्या जून महिन्यात निघाला. "या आमच्या अल्पशा प्रयत्नास आमचे निःपक्षपाती विचारशील महंमदी, खिस्ती व हिंदू बाधवानी अुदार आश्रय दिल्यास यापुढचे अंक दर आठवड्यासुद्धा सादर केले जातील" असे पहिल्याच अंकाच्या अुपोद्घातात म्हटले आहे; परंतु अवघे दोनच अंक निघून हें नियतकालिक बंद पडलें. त्याकाळीहि अेक महिन्याच्या आंत या पहिल्या अंकाच्या १०५० प्रती खपल्या; यावरून महाराष्ट्रात जोतीरावाचा अनुयायी वर्ग काही थोडाथोडका नव्हता हें अुघड होतें. पहिल्या अंकात त्यांनी शूद्रांचीं गाऱ्हाणीं जनतेपुढे माडलीं आहेत. दुसरा अंक ऑक्टोबरामध्ये प्रसिद्ध झाला. त्यांत स्त्रीजातीच्या अुपेक्षेबद्दल पुरुषवर्गाची सणसणीत हजेरी घेतली आहे भागवतधर्मीय संतांप्रमाणे जोतीरावानीहि वेळोवेळीं स्त्रीशूद्राचा कैवार घेतला हें त्यांस भूषणावहच आहे.

आपल्या आयुष्याच्या अखेरीस जोतीरावानी 'सार्वजनिक सत्यधर्मपुस्तक' हा ग्रंथ लिहिला. मध्यंतरी पक्षघाताच्या विकाराने ते अंथरुणास खिळले होते, परंतु डॉ. घोले याच्या औषधोपचाराने व गायकवाड सरकारच्या द्रव्यसाहाय्याने ते त्यातून निभावले. नंतर त्यानी आपल्या अनुयायाच्या हितासाठी डाव्या हाताने हें पुस्तक लिहून काढले. "अेकंदर सर्व मानव स्त्रीपुरुषाच्या अुपयोगी हा ग्रंथ पडावा म्हणून या ग्रंथास 'सार्वजनिक सत्यधर्मपुस्तक' असें नाव दिलें आहे[१]." यात त्यानी धार्मिक, सामाजिक, नैतिक, व्यावहारिक वगैरे विविध विषयावरील आपलीं मते व्यक्त केलीं आहेत. सुख, पूजा, नामस्मरण, नैवेद्य, स्वर्ग, स्त्रीपुरुष, पुण्यपाप, जातिभेद, नीति, दैव अित्यादि अनेक प्रश्नाचा संवादरूपाने त्यानी यात अूहापोह केला आहे. त्याचे विचार बरेच प्रगल्भ व व्यापक आहेत. ग्रंथ छापण्याच्या बाबतींतहि त्यांना पैशाची अडचण भासली होती, परंतु त्यांचे जिवलग मित्र मोरो विठ्ठल वाळवेकर यानी ती दूर केली, तरी देखील त्याच्या हयातींत हा ग्रंथ प्रसिद्ध होअू शकला नाही.

'बोले तैसा चाले' अशी जोतीरावाची वृत्ति होती. त्यामुळे त्यांच्या लिखाणांत जरी गहन तत्त्वज्ञान न आढळलें, तरी ध्येयनिष्ठ पुरुषाचे स्वयंस्फूर्त अुद्गार या दृष्टीने त्याला फार महत्त्व आहे. जोतीरावाची समतेची कल्पना निरपवाद होती. महार, माग, चाभार, धेड वगैरे अस्पृश्याबद्दल तर त्याच्या अंतःकरणात पराकाष्ठेची सहानुभूति होती. अडाणी शूद्र, अंत्यजाना हलके लेखतात याबद्दल त्यांनी स्वजातीयाना दोष दिला आहे. वास्तविक पाहता महारमागाचे व आपले पूर्वज अेकाच घराण्यातील आहेत असे ते आग्रहाने प्रतिपादीत असत.

१ सार्वजनिक सत्यधर्मपुस्तक—प्रस्तावना.

"हल्लींचे शूद्र जे आपणास मोठ्या अहंपणानें माळी, कुणबी, सोनार, शिंपी, लोहार, सुतार अित्यादि मोठमोठ्या संज्ञा केवळ तो तो धंदा केल्याचे योगानें म्हणवून घेतात, तर तेच लोक आपले पूर्वज अेकाच घराण्यांतील असतां त्यांचे पूर्वज स्वदेशासाठीं भट लोकाशीं मोठ्या निकरानें लढले, सबब भट लोकांनीं त्यांची अशी दुर्दशा करून त्यांस अन्न अन्न करावयास लाविलें, हे आतील गुह्य त्यांच्या लक्षात न येता ते त्यांचा भट लोकाचे सांगण्यावरून द्वेष करावयास शिकले[1]."

खालच्या वर्गातील लोकाना सरकारी विद्याखात्याचा मुळींच लाभ मिळत नाही अशी त्यांची न्याय्य तक्रार होती. दिवसभर काबाडकष्ट करून शेतकरी व कारागीर पट्टीच्या रूपाने लक्षावधि रुपये सरकारी तिजोरीत भरत असतां, त्यांच्या प्राथमिक शिक्षणाचीहि तजवीज होअू नये हा धडधडीत अन्याय आहे असें त्यांचें मत होतें. मात्र विद्याखात्यातील अुच्चवर्णीय अधिकाऱ्याच्या कारवाअीमुळेच हा अनर्थ घडत आहे, अेरव्ही अिंग्रज फार दयाळू व निःपक्षपाती आहे, अशी त्यांची भाबडी समजूत होती.

"आपल्या अिंग्रज सरकारने सर्व जातींच्या मुलास शाळेंत घेण्याविषयीं जरी मोकळीक दिली आहे तरी अतिशूद्राच्या जातीतील पंतोजी तयार करण्याविषयीं त्यांनीं कांहीं तजवीज केली नाहीं. यावरून आर्यधर्म अनुयायी भटब्राह्मण पंतोजीकडून अतिशूद्राचीं मुलें विद्वान होअून मोठे कामगार कधींच होणार नाहींत. याविषयीं आमच्या भोळसट सरकारनें विचार केला आहे काय? कारण, आर्य लोकाच्या अेकतर्फी ग्रंथांत शूद्रादि अतिशूद्रास विद्या न देण्याविषयीं कडेकोट बंदोबस्त केला आहे. आणि धूर्त आर्य भटब्राह्मण आपलीं पोटें जाळण्याकरिता विद्वान झालेले पोटार्थी भट पंतोजीकडून खेडेगांवांतील अतिशूद्रांचीं मुलें शाळेंत शिकून विद्वान होणार नाहींत असें मी खात्रीनें सांगतों[2]."

"आजपावेतों लक्षावधी रुपये विद्याखात्याकडे जरी खर्चीं पडले, तथापि त्यांपासून शूद्रांच्या समाजाच्या मानाप्रमाणें त्यांच्यात विद्वान् लोकाचा भरणा वाढला नाहीं. अितकेंच नव्हे, परंतु महार, मांग आणि चांभार यापैकी कोणी अेक शिकलेला कामगार आढळत नाहीं. मग अेम्.अे. अथवा बी.अे. औषधास मिळण्याची मारामार. अरेरे! या आपल्या सरकारच्या अेवढ्या दिगंबर विद्याखात्याच्या गोऱ्या तोंडावर या काळ्या तोंडाच्या भटपंतोजींनीं हा केवढा काळोखाचा डाग लाविला? अरे ही "कडु कारलीं" आमच्या सरकारनें अितकीं तुपात तळून साखरेंत घोळून मळलीं, तथापि त्यांनीं आपला जातिस्वभाव न सोडिता ती अखेरीस कडूचीं कडूच राहिलीं[3]."

नीच जातींतील लोक चोऱ्यामाऱ्या करून पोट भरतात याचें कारण मुख्यतः त्यांच्यातील शिक्षणाचा अभाव हेंच होय. तेव्हा सरकारने खेडोपाडीं शाळा स्थापून त्यांच्या बौद्धिक व औद्योगिक शिक्षणाची तजवीज करावी, म्हणजे साहजिकच ते दुराचरणापासून परावृत्त होतील व न्याय्यमार्गाने पोट भरूं लागतील. हे लोक कदाचित् अडाणीपणामुळे आपलीं मुलें नियमितपणें शाळेंत धाडणार नाहीत म्हणून सरकारने त्यांच्यावर बेधडक सक्ती करावी, व जनतेला सुखी केल्याचें पुण्य पदरांत घ्यावें असें त्या काळातहि जोतीराव आवर्जून सांगत होते.

"आपलें सरकार जर म्हणावें तर तें जिकडे घुगऱ्या तिकडे अुदय अुदय म्हणणारें आहे. कारण अतिशूद्रांस स्पर्श करण्यास बंदी असल्यामुळें त्यांस सहजच सर्व रोजगारधंद्यांचें द्वार बंद झालें व त्याजमुळें त्यांजवर पोटाच्या आगीमुळें चोऱ्यामाऱ्या करण्याचा प्रसंग गुजरतो[4]."

---

१ गुलामगिरी—प्रस्तावना पृ.१८. २ सार्वजनिक सत्यधर्मपुस्तक पृ.११३.
३ गुलामगिरी पृ.७१. ४ गुलामगिरी पृ.९८-९९.

"आपल्या कनवाळू सरकारानें या बळिस्थानांतील शेतकऱ्यांच्या शाळांशिवाय घिसाडी, लोहार बटओी, सुतार, कढओी, चामार, सोनार, तांबट, साळी शिंपी वगैरे कारागिरांच्या मुलांकरिता निरनिराळ्या शाळा घालून त्यामध्यें त्या सर्वांच्या कसबांसंबंधीं सर्व प्रकारच्या विद्या शिकविण्याच्या कामीं थोडा थोडा खर्च केल्याबरोबर त्या सर्व शाळांत शिकलेलीं कारागिराचीं मुलें फारच थोडीं चोर निपजतील, असें मी खात्रीनें सांगतों[1]."

"अेकंदर सर्व अज्ञानी शेतकऱ्यांसह कारागिरानीं आपआपलीं मुलें त्यांच्या शाळेंत हट्टानें जर पाठविली नाहींत; तर सरकारनें असल्या हेकड लोकाचीं मुलीमुले शाळेंत शिकविण्याविषयीं बेलाशक सक्तीचा कायदा करावा आणि सरकारी सत्यपाळकांकडून त्या सर्व लोकांस असा बोध करावा कीं तुम्ही आपलीं मुलें जर आपापल्या शाळेंत पाठविलीं नाहींत तर तीं मुले आळसामुळें अुनाड होतील आणि आपलीं पोटें जाळण्याकरिता तीं चोऱ्या करूं लागतील. यामुळें त्यास सक्तमजुरीची शिक्षा देअून त्याच्या पायांत बिड्या घालून त्यांच्या संरक्षणासाठीं सरकारास खबरदारी घ्यावी लागेल[2]."

जोतीराव खिस्ताळलेले होते असा ठराविक आक्षेप त्यांच्यावर वारंवार घेण्यांत येतो. येशू खिस्ताच्या अुदात्त शिकवणीचा त्यांच्या मनावर दृढ संस्कार झाला यात तिळमात्र शंका नाही. तरी देखील खिस्ती धर्माची दीक्षा घेण्याची त्यांना आवश्यकता भासली नाही. कारण त्याच्या ठिकाणीं संकुचितपणाचा व दुराग्रहाचा लवलेशहि नव्हता. त्याचीं धर्मविषयक मतें अत्यंत अुदार होतीं. ते खरेखुरे सत्यान्वेषक होते. 'सत्यापरता नाही धर्म' अशी त्यांची ठाम श्रद्धा होती. जगांत कोणताहि धर्म परिपूर्ण नाही, तथापि प्रत्येक धर्मांत काही तरी सत्यांश आहेच आहे याची त्याना जाणीव होती; म्हणून सर्व धर्मांतील चागलीं तत्त्वें ग्रहण करण्यास ते नेहमी तत्पर असत. मात्र धर्माच्या नावाखाली तंटेबखेडे व्हावे हें त्याना बिलकूल मान्य नव्हतें.

निर्मीकाचा धर्म सत्य आहे अेक । भाडणें अनेक कशासाठी ॥

शाश्वत सत्य हाच खरा मानवधर्म आहे. अितर धर्म त्याचे अंगभूत आहेत. ज्याची ज्या धर्मावर श्रद्धा असेल त्यानी तो निष्ठापूर्वक आचरावा, त्यात अितरांनी ढवळाढवळ करूं नये, असें त्याचें प्राजल मत होतें.

"या पृथ्वीच्या पृष्ठभागावर जेवढी म्हणून मानवानीं धर्मपुस्तकें केलीं आहेत, त्यांपैकीं अेकाही ग्रंथांत आरंभापासून शेवटापर्यंत सारखे सार्वजनिक सत्य नाहीं. कारण प्रत्येक धर्मपुस्तकामध्यें काहीं अेक व्यक्तींनीं त्या वेळच्या प्रसंगास अनुसरून हेकडपणा केल्यामुळें ते धर्म-अेकंदर सर्व मानवी प्राण्यास सारखे हितकारक न होतां सहजच त्यामध्ये अनेक फळ्या होअून त्या अेकमेकांचा मनापासून हेवा व द्वेष करूं लागतात[3]."

"जे ते आपल्या धर्मावरून व दुसऱ्याच्या धर्माविषयीं सारासारविचार न करितां माझाच धर्म खरा आहे, म्हणून बेलगामी हट्ट घेअून बसतात, परंतु अेकमेकांच्या धर्माविषयीं सारासारविचार केल्याबरोबर कोणीच कोणाच्या धर्माला खोटें म्हणणार नाहींत असें माझ्या विचारानें ठरतें[4]."

"या भूमंडळावर महासत्पुरुषांनीं जेवढीं म्हणून धर्मपुस्तकें केलीं आहेत; त्या सर्वांत त्या वेळेस अनुसरून त्यांच्या समजुतीप्रमाणें काहींना काहीं सत्य आहे, यास्तव कोणत्याहि कुटुं-

---

१ सार्वजनिक सत्यधर्मपुस्तक पृ १४६. २ सार्वजनिक सत्यधर्मपुस्तक पृ. १४७.
३ सार्वजनिक सत्यधर्मपुस्तक पृ. ४. ४ सार्वजनिक सत्यधर्मपुस्तक पृ. १२६.

बातील अेका मानव स्त्रीनें बौद्धधर्मी पुस्तक वाचून तिच्या मर्जीप्रमाणें पाहिजे असल्यास तिनें तो धर्म स्वीकारावा, व त्याच कुटुंबांतील तिच्या पतीनें जुना व नवा करार वाचून त्याच्या मर्जीप्रमाणे पाहिजे असल्यास त्यानें खिस्ती व्हावें. व त्याच कुटुंबातील त्याच्या कन्येनें कुराण वाचून तिच्या मर्जीप्रमाणें पाहिजे असल्यास तिनें महंमदीधर्मी व्हावें. आणि त्याच कुटुंबातील त्याच्या पुत्रानें सार्वजनिक सत्यधर्मपुस्तक वाचून सत्यधर्मी व्हावें; आणि या सर्व मातापित्यासह कन्यापुत्रानी आपला प्रपंच करीत असतां प्रत्येकानें कोणी कोणाच्या धर्माचा हेवा करून द्वेष करूं नये आणि त्या सर्वांनी आपण सर्वांच्या निर्माणकर्त्यानें निर्माण केलेली लेकरे असून त्याच्याच (निर्मीकाच्या) कुटुंबातील आहोत असें समजून प्रेमाने व गोडीगुलाबीनें अेकमेकानीं वर्तन करावें म्हणजे ते आपल्या सर्वांच्या निर्माणकर्त्याच्या राज्यात धन्य होतील."

जोतीरावाच्या चरित्राची व समाजकार्याची आपण येणेप्रमाणे तोंडओळख करून घेतली. त्याचें जीवन निष्ठा व त्याग या जोडगुणाची केवळ मूसच होती असे म्हणावयास हरकत नाही. हिंदुसमाजांतील दलिताच्या अुद्धारासाठी ते कायावाचामनाने आजन्म झटले. वैयक्तिक स्वार्थाचा मोह त्याच्या मनाला कधींहि शिवला नाही, कारण त्यांनी आपलें व्यक्तिजीवन समाज-जीवनात विलीन करून टाकलें होतें. ब्राह्मणांच्या सामाजिक प्रतिष्ठेवर त्यानी हल्ला चढविला; परंतु त्यांचा रोख जातिसंस्थेवर होता, कोणाहि व्यक्तीवर नव्हता. अनेक ब्राह्मण गृहस्थांशीं त्यांचे स्नेहसंबंध होते. खरोखर जोतीराव हे आदर्श समाजसेवक होते. त्याची दृष्टि नेहमी कार्याकडे असे. त्यासाठी कोणाशींहि सहकार्य करण्यास ते तत्पर असत. कोणाच्याहि हाताखाली काम करण्यास त्यांची ना नसे. दुसऱ्याला मोठेपणा देअून कार्यभाग साधण्यासारखा असल्यास ते स्वतःकडे आनंदाने कमीपणा घेत असत. यामुळे त्यानी शेकडो लोकाचा विश्वास संपादन केला, व महाराष्ट्रांत प्रबळ संघटना निर्माण केली. त्याच्या जीवनाचें सार त्याच्याच शब्दात खालीलप्रमाणे देतां येअील —

सार्वभौम सत्य स्वतः आचरावें। सुखें वागवावे। पंगू लोकां।
अशा वर्तनानें सर्वा सुख द्याल। स्वतः सुखी व्हाल। जोती म्हणे॥

---

## मराठीभाषासंरक्षक मंडळ

बृहन्महाराष्ट्र मंडळातर्फे पुणें येथे मराठीभाषासंरक्षक मंडळ नुकतेंच स्थापन करण्यात आलें असून या मंडळातर्के मराठी भाषेचें अध्ययन, अध्यापन व प्रचाराच्या बाबतींतील अड-चणी दूर करणें, मराठी भाषेचें शिक्षण व संवर्धन करण्यास साहाय्य करणें, मराठी भाषा व वाङ्मयाचा प्रचार करणें वगैरे कामें होणार आहेत. मंडळाचे अध्यक्ष श्री. ज. स. करंदीकर असून श्री. य. रा. दाते व ल. गं. काळे हे चिटणीस आहेत. कार्यकारी सदस्यात पुण्याचे रावसाहेब र. लु. जोशी व शं. रा. दाते, दिल्लीचे पु. शं. पतके, कराचीचे रा. प. शिंदे, आज्मीरचे श्री. कृ. आपटे, कानपूरचे ग. कृ. प्रधान, हैदराबादचे पां. वा जोशी वकील, व मद्रास, बंगाल, कर्नाटक व गोमंतकातील प्रत्येकीं अेक प्रतिनिधि घेण्यांत येणार आहे. वरील मंडळाचा हेतु लक्षांत घेअून साहित्यप्रेमी जनतेने या मंडळास सर्व माहिती पुरवून व अितर मदत करून मराठी भाषेच्या अभिवृद्धीस मदत करावी अशी नम्र विनंती आहे.

**पु. शं. पतके**
चिटणीस— बृहन्महाराष्ट्र मंडळ, न्यू दिल्ली

१ सार्वजनिक सत्यधर्मपुस्तक पृ. १२८.

# परीक्षणें

## धर्म-समाजशास्त्र

**जगांतील धर्मपंथ**– ले० व प्रका० रा. ब. डॉ. द. ल. सहस्रबुद्धे, डेक्कन जिमखाना, पुणें ४; मूल्य २ रुपये.

रावबहादुर सहस्रबुद्धे यांनी आपला ग्रंथ पूर्ण अभ्यास करून लिहिला आहे असें म्हणण्यास हरकत नाही. हिंदु बौद्ध, यहुदी, खिस्ती, झरतोस्ती, अिस्लाम अि० धर्मांतील तत्त्वज्ञान आणि नीतिशास्त्र यांची तोंडओळख होण्यास हें पुस्तक अुपयुक्त ठरेल. विवेचनात पाल्हाळ नाही आणि भाषा अत्यंत साधी आहे, हे दोन गुणविशेष प्रामुख्याने सांगावेसे वाटतात. पुस्तकांत मुख्य अुणीवा दोन भासतात. विशिष्ट धर्मकल्पनांचा अुदय होण्यास कोणती सामाजिक परिस्थिति कारणीभूत झाली याचा विवेक ग्रंथकारांनी केलेला नाही. गिबन-रॉय यांच्यासारखे शास्त्रीय दृष्टीचे अितिहासकारच केवळ नव्हेत तर जाडे राधाकृष्णन्‌सारखे शाश्वत मूल्याचे कैपक्षीदेखील धर्म व नीति याची चर्चा करतांना सामाजिक पार्श्वभूमि वठवीत नाहीत. रा. ब. सहस्रबुद्धे यांनी या पद्धतीने विचारच केलेला दिसत नाही. दुसरें, तत्त्वज्ञान अथवा नीतिशास्त्र यातील कांही प्रमुख प्रमेये घेअून निरनिराळ्या धर्मांत त्यांचा कसा अूहापोह केला आहे, हें दाखविणें विचारप्रवर्तक ठरलें असते. फक्त हिंदुस्थानांत प्रचलित असलेल्या धर्मपंथाची अशी अुत्कृष्ट चर्चा सर अेस् राधाकृष्णन् यांनी आपल्या "The Heart of Hindustan" या ग्रंथांत अधिकारवाणीने केली आहे. ती रा. ब. सहस्रबुद्धे यांच्या वाचनांत असेल. प्रस्तुत ग्रंथाची अुभारणी अशा पद्धतीने करण्यांत आली असती तर ग्रंथातील अितर गुणाचा प्रभाव अधिक पडला असता. 'देवकल्पने'वरील ग्रंथकाराने केलेली चर्चा आणि बुद्धिप्रामाण्याविषयीचा ग्रंथकाराचा आग्रह प्रशंसनीय आहे.

---

## अितिहास

**श्रीसमर्थवाग्देवतेच्या चरणीं अर्पिलेला चौथा सुमनहार** – संपादक : श्री. गणेश शंकर देव, राजशक २६७ ज्येष्ठ शु. १३; पृ. १०२+२०; मूल्य १। रु.

श्रीसमर्थभक्त श्री. शंकर श्रीकृष्ण देव आणि अलीकडे त्यांचे चिरंजीव श्री. गणेश शंकर देव यांनी सत्कार्योत्तेजक सभेमार्फत चालविलेलें रामदास आणि रामदासी हें मासिक श्रीसमर्थवाग्देवतामंदिर ही संस्था, आणि त्याशिवाय अन्यत्र त्यांच्याच प्रेरणेने चाललेलीं कार्यें यांचें आदरमिश्रित कौतुक आज ज्याला वाटत नाही असा महाराष्ट्रीय विरळा. आणि त्यामुळे जरी सकृद्दर्शनीं त्यांच्या प्रदीर्घ परंपेरेतील तो 'अेकोणचाळिसावा' भाग, 'चौथा सर', 'सहावा मणि' आणि 'चौथा सुमनहार' अित्यादि पारिभाषिक अभिधानाचा नेमका बोध होण्याअितपत अेखाद्याचा त्यांनी प्रसिद्ध केलेल्या अफाट वाङ्मयाशीं परिचय नसला तथापि देवांनी संपादित केलेल्या कोणत्याहि ग्रंथात, 'आता आपल्याला शिवाजी, रामदास अशा खऱ्या महाराष्ट्रीय विभूतींबद्दल

अभिमानाने ओतप्रोत भरलेलें व बहुधा साधार असें काहीतरी वाचावयाला 'मिळेल,' अशा आशेने कोणीहि वाचक काही वेळ तरी रमून जातो. प्रस्तुत ग्रंथातील श्री. करंदीकर, अळतेकर, भट, वणीकर, अनंतदास रामदासी याचे लेख या दृष्टीने अभ्यसनीय आहेत. शिवाजीच्या राज्यघटनेचें सूत्र हा श्री. शेजवलकरानी माडलेला विपय तसा नवा नसला तरी अितक्या सुबोध तऱ्हेने प्रथमच माडला गेला आहे असें वाटतें. प्रस्तुत अंक हा रामदास-रामदासी मासिक निघून पंचवीस वर्षे झाल्याप्रसंगाचा मिळून अेका अर्थाने रौप्यज्युबिलीचा अंकच आहे. त्या दृष्टीने संपादकानी घेतलेला प्रस्तावनेतील आढावा आणि शेवटीं समारोपादाखल शोभणारा 'सत्कार्योत्तेजक सभा, धुळे' हा, स्वतः संस्थापक श्री. शंकरराव देव यानी दिलेला संस्थेची स्थापना, घटना, कार्यें, भवितव्य अित्यादि वर्णन करणारा प्रासादिक वृत्तान्त, हे दोन्ही औचित्यपूर्ण आणि संस्मरणीय असेच आहेत. समर्थांच्या कार्याशी निगडित अशीं स्थलें व कार्यकर्ते याचीं चित्रे आणि विशेपतः श्री. शकरराव देव याचेहि छायाचित्र या निबंधसंग्रहात असल्यामुळे प्रस्तुत संग्रहाला चागलेंच स्वरूप मिळालेलें आहे. प्रथम पिता व त्याच्यानंतर पुत्र, अशी वाङ्मयीन परंपरा— अखंड, अेकरूप परंपरा— चालल्याचे अेकमेव प्रतीक म्हणून 'देवा'चे अभिनंदन करण्याचा मोह विशेपतः प्रस्तावनेतील पृ. १७ व १८ वाचून कोणालाहि टाळता येणे अशक्य आहे.

---

## भापाशास्त्र- लिपि

१ **प्रो. ब्लोककृत मराठी भाषेचा विकास**- ग्रंथकार प्रो. झुल् ब्लोक; भाषांतरकार व प्रकाशक प्रा. वा. गो. परांजपे, फर्ग्युसन कॉलेज, पुणें ४; मूल्य ४ रु.

२ **एल्. पी. जैन ह्यांची संकेतलिपी-मराठी शॉर्टहॅन्ड** (भाग १ व २)- आविष्कारक व प्रकाशक श्री. एल्. पूनमचंद जैन, ब्यॅवर; मूल्य अनुक्रमें ८ आणे व १। रु.

१ **पुस्तकाचें स्थूल स्वरूप**— आरंभीं अुपोद्घात पाने सुमारें ४०, नंतर वर्णप्रक्रिया पानें १५०, रूपप्रक्रिया पानें १००, वाक्यरचना पाने १०, भापातरकारानी ज़ोडिलेली परिशिष्टें अि० पानें २५ आणि शेवटी व्युत्पत्ति सूचि पानें १५०,-मिळून सुमारें ५०० पाने या पुस्तकात आहेत. भापेच्या विकासात वाक्यरचनेलाहि महत्त्व आहे. अमरीं भाटा होअिजे। (ज्ञानेश्वरी ६।४५४) अि० रचना म्हणजे अेक कोडेंच आहे असल्या वाक्याचा तरी विचार यात यावयास हवा होता पण खेदाची गोष्ट अशी की या वाक्यरचनेला केवळ दहाच पाने मिळालीं आहेत, व तींतील विषयहि मोठे महत्त्वाचे नाहीत. ब्लोकसारख्या विद्वानाने आपल्या लिखाणाने वाक्यरचनेंतील वरीलसारखीं कोडीं सोडविलीं असतीं, पण तसें न झाल्याने हळहळ वाटते.

२ **ग्रंथकाराच्या सोयी व गैरसोयी**— प्रा. ब्लोक फ्रेंचमन् असल्यामुळे त्यास मेय्ये-सारखे मार्गदर्शक मिळाले (पान ३२७). युरोपांत त्यास अलोट ग्रंथसंपत्ति व संदर्भग्रंथ लाभले व याचा अुपयोग करण्याला त्याजवळ दीर्घ अभ्यासाने कमाविलेली बुद्धि होती. असल्या सोयींबद्दल कोणासहि, निदान आपणां महाराष्ट्रीयांस तरी, हेवाच वाटावा. परंतु फ्रान्समध्ये झालेली ही सोय केवळ सामान्य भापाशास्त्रासंबंधानेच होती विशिष्ट भाषा म्हणून मराठीचे अध्ययन करण्यास तेथे साधनें शून्यप्राय. अशा स्थितींत त्यास (पा. ३२९) प्रत्यक्ष महाराष्ट्रात येअून ग्रंथ व विद्वान यांचा परिचय करून घ्यावा लागला. हे ग्रंथ म्हणजे मुख्यतः मोल्स्वर्थ्-कृत मराठी कोश आणि जोशी व नवलकर यांनी केलेलीं व्याकरणें. जुन्या गोडबोल्यां-

च्या व्याकरणाचाहि त्याने अभ्यास केलेला आहे तरी पण मराठीच्या अध्ययनाविषयी मराठी-भाषकांच्या मानाने ग्रंथकाराची स्थिति अनुकंपनीयच ठरते. जन्मापासून मराठी बोलणारा व मराठीच्या वातावरणात वाढलेला विद्वान जसा मराठीचा ज्ञाता होअील तसा प्रवासी पर-भाषक कसा होणार? अर्थात् हे वैगुण्य मोठेंच हानिकारक होय. तरी पण अशा स्थितींतहि त्याने लिहिलेला हा ग्रंथ पाहतां त्याच्या चिकाटीचे, फ्रान्समधील साधनसंपत्तीचें, त्याच्या बुद्धिमत्तेचें जितकें कौतुक करावें तितकें थोडेंच. पुस्तक वाचून ग्रंथकाराविषयी आदरपूर्ण अंतःकरणानेच तज्ञ तें खाली ठेवील. येथे शंका येते की दामलेकृत विस्तृत व्याकरण यानी का अभ्यासिले नाही? आधुनिक व्याकरण-पुस्तकामध्ये पुष्कळच अधिक शुद्ध व मूलगामी ज्ञान या ग्रंथाच्या अवलोकनाने त्यास झालें असतें.

**३ भाषांतरकार**— रा० वासुदेवराव पुस्तकांत पहिल्याच वाक्यात आरंभी म्हणतात 'मी भाषाशास्त्रज्ञ नाहीं.' या त्याच्या विधानावरून त्याच्या ठिकाणीं विनय अधिक आहे की असत्यकथन अधिक आहे, हें सागता येत नाही. कारण यानी स्वतः जोडिलेल्या परिशिष्ट २ मध्ये (३३५) 'वर्णांच्या संज्ञा' या परिच्छेदांत आढळणारीं वर्णांचीं स्थाने, त्याचे भेद, अि० माहिती पाहून 'मी भाषाशास्त्रज्ञ नाहीं' हे विधान मिथ्या ठरतें. अितकी शुद्ध विशद माहिती अन्यत्र क्वचितच सापडेल; निदान मराठींत तरी सापडणार नाहीच. अर्थात् या वरील विधानाच्या मुळाशीं शुद्ध विनय असल्यानेच अेका प्रकारें हें मिथ्यावादित्व दूषण ठरत नाही. ग्रंथकाराप्रमाणे भाषातरकारहि प्राध्यापक आहेत. या लेखकाच्या साधर्म्यामुळेच कीं काय, ग्रंथप्रकाशनात सुद्धा (३२७) यादृच्छिक साम्य आले आहे. मूळ पुस्तक १९१४-२० अशीं सहा वर्षे छापलें जात होतें; तर भाषातर सुद्धा (३३०) १९२८-४१ अशीं बारा वर्षे छापलें जात होतें. या विलंबाचीं कारणें मात्र दोघाच्या संबंधांत पृथक् आहेत. या विलंबाबद्दल अनुवादक दोषी ठरतोच. आम्ही मराठी भाषेचे अभ्यासू लोक या फ्रेंच ग्रंथाच्या मराठी अवताराची वाट आतुरतेने दीर्घकाल पाहत होतों पण शेवटी, भाषातर अेकंदरींत समर्पक, आणि शुद्धिपत्र कसोशीने केलेले, पाहून या विलंबाबद्दल विशेष तक्रारीला जागा दिसत नाही.

**४ मुख्य प्रतिपाद्य**— मराठी भाषा ही भारतीय भाषापैकीं अेक आहे. या भारतीय भाषाच्या पश्चिमेस अिराणी भाषा. व अुत्तरेस तिबेटी व ब्रम्ही भाषा, व पूर्वेसहि ब्रम्ही भाषा, व दक्षिणेस द्राविडी भाषा आहे या सीमाच्या मध्ये मराठी, गुजराथी, पंजाबी, हिंदी, बंगाली अि० मुख्य भाषा आहेत. वेदाची भाषा नीटनेटकी करण्यांत येअून ती **संस्कृत** म्हणण्यांत आली. तिचेंच पहिलें रूपातर म्हणजे पाली (१९). पालीचे रूपातर महाराष्ट्री. तींतून अपभ्रंश व त्यांतून जुनी मराठी म्हणजे ज्ञानेश्वरी भाषा निघाली. तिचीच क्रमागत परिणती म्हणजे वर्तमान मराठी. ही मराठी अर्थात् परंपरेने संस्कृतापासून निघाली आहे, असें स्पष्ट विधान (९) आहे. ही व असली अन्य माहिती चाळीस पानाच्या अुपोद्घातात आढळते. ही माहिती पौर्वापर्य संबंध कार्यकारणभाव यांनी युक्त असल्यामुळे हा सर्वच अुपोद्घात महत्त्वपूर्ण व वाचनीय असा आहे. मराठीचें आजचें स्वरूप ग्रंथकाराच्या मतानुसार पुढीलप्रमाणे सांगतां येअील—

साक्षात् प्राकृतसंभूता बहुवाङ्मयभूषिता ॥
आक्रांता लेशतोऽन्याभिः अदूरा व्यवहारतः ॥
गीः सकोशव्याकरणा **मराठी** सत्कृत-श्रमा ।

**अर्थ**— मराठी, (संस्कृतापासून परंपरेने पण) महाराष्ट्री या प्राकृतापासून साक्षात् निघाली आहे हींत वाङ्मय विपुल व अुच्च दर्जाचें आहे. अन्य भाषांचा संसर्गजन्य विकार

हिच्यांत विशेष नाही. मराठीचे रोजच्या व्यवहारांतील रूप आणि लेखारूढ रूप हीं जवळ-जवळ सारखींच आहेत. (विस्तृत) कोश आणि (तर्कशुद्ध) व्याकरणग्रंथ यानी ही सनाथ आहे आणि विद्वानांनी हिच्यावर पुष्कळ परिश्रम केले आहेत व ते अजूनहि करीत आहेत. हें प्रशस्तिपत्र आपणांस निःसंशय अुत्तेजक व भूषणावह आहे.

**५ गुणग्रहण**— अुपोद्घातानंतर वर्ण व रूपें यांची प्रक्रिया दिली आहे. तींत ठिकठिकाणीं नानाविध प्राच्य व प्रतीच्य भाषांची तुलना, सर्वंकष विवरणपद्धति व अेकेक वर्ण घेअून शब्दातील त्याच्या स्थानानुसार मूलवर्ण देण्याचा प्रयत्न सर्वत्र दिसून येतो. यामुळे मराठीच्या बनावटीचा, विशेषतः वर्णप्रक्रियेचा, सूक्ष्म कीस निघालेला सांपडतो. यामुळे तिच्या अैतिहासिक अभ्यासास चांगलेंच साहाय्य झालें आहे. यांत विशेष अुल्लेखार्ह गोष्ट म्हणजे मतांतर जरी असंमत असलें तरी त्याचा विचार अत्यंत औदार्याने केलेला दिसतो. विरुद्ध मतवाल्याबद्दल कुत्सा, हेटाळणी, किंवा तुच्छता बिलकूल आढळत नाही. सर्वत्र अुदात्त खेळाडूवृत्ति दिसते. तसेंच, आपल्या अज्ञानाबद्दल कबुली देण्यांत ग्रंथकारास कमीपणा वाटत नाही. भविष्यकाळाचा प्रत्यय 'ल' याविषयीं स्पष्ट माहिती नाही (२८४). तसेंच, 'बायकोचें' माहेर कोणतें याचाहि पत्ता लागत नाही अशी स्पष्ट कबुली त्याने दिली आहे (१०२). ग्रंथकाराच्या या अुदाहरणांवरून आपले मराठी ग्रंथकार परस्पराशीं वागतांना खिलाडूवृत्ति ठेवून, वृथाभिमानास निरोप देतील काय ?

**६ मतभेदाच्या कांहीं गोष्टी— (१) भाषा स्वकालातिजीवी कशाने होते?—** याचें अुत्तर ग्रंथकाराच्या मतानुसार पुढीलप्रमाणे देतां येअील (२६)—

शास्त्रेषु धर्मविधिषु शासने च प्रयोगतः ।
आदर्शग्रंथनिर्माणात् महिमा जायते गिरः ।
ततोऽध्ययनमस्याश्च, व्याकृतिर्जडता ततः ॥

**अर्थ**— शास्त्राच्या भाषेत, धर्मसंस्कारांमध्ये, राजाच्या आज्ञापत्रामध्ये भाषेचा अुपयोग होअूं लागला व तिच्यांत आदर्शभूत ग्रंथ झाले म्हणजे भाषेला महत्त्व प्राप्त होतें. यामुळे साक्षर लोकांत तिच्या अध्ययनाबद्दल अगत्य वाटतें व हे अगत्य सफल करण्यासाठी प्रमाणभूत व्याकरणग्रंथ अुत्पन्न होतात व त्याना योग्य कालापलीकडेहि महत्त्व दिले गेल्याने भाषेंत अेक प्रकारचा ठराविकपणा येअून ती आपणात कालक्रमाने होणारे बदल सामावूं शकत नाही. पण तीच लेखनात राहून, बोलभाषा तिच्यापासून अधिकाधिक दुरावते.

या यथार्थ मतावरून दिसतें की संस्कृत भाषा, जी सामान्यतः येशु पूर्व शतक पांच-पर्यंत बोलभाषा होती ती, त्या कालापुढेहि अजूनपर्यंत अभ्यासिली जात आहे, तिच्यात मधून-मधून ग्रंथहि निष्पन्न होत आहेत. याचें कारण तिच्या धार्मिक महत्त्वाबरोबर वाङ्मयीन श्रेष्ठता हेंहि आहे. पाणिनीचें व्याकरण पाहून विद्वान लोक त्यावर अितके मोहित झाले की रोजच्या बोलींत कितीहि फरक होवोत, परंतु लेखभाषा या व्याकरणानुसारच राखिली पाहिजे असा त्यांनी निश्चय केला. याचा परिणाम अिष्टानिष्ट असा द्विविध झाला. संस्कृत व्याकरणाच्या अध्ययनाने पंडितांच्या बुद्धीस कुशाग्रता लाभली व तदनुसार रचलेल्या काव्यांपासून शुद्ध सात्त्विक आनंदहि त्यांस मिळाला पण तेवढ्यापुरतें चालू वर्तमान जीवंत बोलभाषांकडे त्यांचें लक्ष कमी गेलें व त्यांची बरीच हेळसाड झाली. अशा रीतीने कधी-कधी उत्कृष्ट प्रमाणभूत ग्रंथापासूनहि कांही गोष्टींत लोकांची हानि होते.

(२) **चतुर्थीचा प्रत्यय 'स'** (२३८)— प्राकृतातील व परंपरेने मराठींतील चतुर्थी संस्कृतांतील षष्ठीपासून बनली आहे हें सर्वसंमत आहे; तरी पण तिच्या 'स' प्रत्ययाच्या अुत्पत्ती-संबंधी भिन्न-भिन्न मतें आहेत व त्यांत अंतरहि पुष्कळ आहे. अशा मतापैकी अेक म्हणजे **आसपास** या जुळ्या शब्दापैकी आस (किंवा आर्श्व) व तद्द्वारा अश्र (कड) यापासून **स** प्रत्यय निघाला असावा असें आहे. यात बरेच दोष आहेत. अश्र-चा अर्थ मुख्यतः टोक असा आहे, बाजू नाही. तेव्हा पार्श्व-पासून झालेल्या पास या शब्दाच्या मागे बसण्यास तो योग्य नाही. माझ्या मतें पुढील व्युत्पत्ति असावी. **अन्य** शब्दाचीं मराठीत रूपें **आणि, आन** अशीं दोन होतात. या रूपांच्या धर्तीवर **रथस्य** या षष्ठीची **रथासि, रथास** अशीं रूपें सहज प्राप्त होतात. या 'स्य'हून इतरत्र स-चे मूळ पाहण्याचे कारण दिसत नाही. जुन्या शब्दातील पूर्वार्ध प्रायः अुत्तराशी नादाने सम, पण अर्थाने शून्य असतो. आवळाजावळा, अिडापिडा, औरस-चौरस यातील आवळा, अिडा, औरस अशीच आपली अर्थशून्यता सागतात. अर्थात् पास याच्या पूर्वीचा आस अर्थशून्यच असल्याने त्या अर्थशून्यातूनसुद्धा प्रत्यय काढूं पाहणें व्यर्थ होय.

(३) **स्वराघात** (६७)— स्वराघाताचा स्वराच्या गुरुत्वाशीं वारंवार घोटाळा होतो अि. बीम्सचें मत सागून स्वराघातास मराठीत महत्त्वाचें स्थान नाही; अर्थात् तो विचार्य नाही, असा अभिप्राय ग्रंथकाराने दिला आहे. तरी पण माझ्या मतें या गोष्टीचा अधिक विचार होणें अवश्य आहे.

**७ कांही आनुषंगिक गोष्टी (१) हिंदी व हिंदुस्थानी** (२५)— ग्रंथकार म्हणतो '**हिंदुस्थानी** भाषेचें यवनी-शब्द-प्रचुर असें रूप म्हणजे **उर्दू**, आणि संस्कृत-शब्द-प्रचुर रूप म्हणजे **हिंदी**.' अशा रीतीने ग्रंथकाराच्या मतें हिंदुस्थानी भाषा मध्यवर्ती ठरत असली तरी तिचें खरें स्वरूप संस्कृतानुगामीच असले पाहिजे हें अुघड आहे. कारण या हिंदुस्थानीचें व्याकरण संस्कृतोत्पन्न भाषानाच अनुसरणारें आहे. अर्थात् यामुळे हिंदुस्थानीच्या कोशात शिरण्यास संस्कृतोत्पन्नच शब्द अधिकारी आहेत, यवनी शब्द नाहीत. तेव्हा हिंदुस्थानीची वाढ संस्कृता-नेच झाली पाहिजे.

(२) मराठीचें वर्तमान रूप कोणीं ठरविलें,– देशस्थानी की कोकणस्थानी ?– आपले पूर्वज दोआबातून दक्षिणेकडे येत-येत काही पश्चिम किनाऱ्याने गुजराथेतून व कांही वऱ्हाडातून असे आले. यापैकी पहिले किनाऱ्याने वसत-वसत रत्नागिरीकडे गेले. हे लोक म्हणजे कोकणस्थ होत, दुसरे ते देशस्थ. महाराष्ट्रामध्ये या दोघांचीहि वस्ती झाली. तरी पण अुत्तर व मध्यमहा-राष्ट्रांत गुजराथीच्या लकबा प्रायः मुळीच दिसत नाहीत. त्या रत्नागिरीकडे दक्षिणेस कोंकणी भाषेंतच आढळतात. मुख्य महाराष्ट्रात म्ह० अुत्तर व मध्यमहाराष्ट्रात त्या कां न दिसाव्या ? तेथे (४९) ज्ञानेश्वरादिसंत, तुकाराम-नामदेवादि भक्त, रामदासारखे लोकगुरु, याच्या भाषेची छाप पडल्यामुळे, गुजराथी वळण टिकूं शकलें नाही. सारांश, आपली मुख्य महाराष्ट्रांतील **प्रमाण मराठी भाषा** ही कोकणस्थ छापाची नसून देशस्थछापाची आहे.

(३) **शुद्धलेखन** (३३०)— अव्यय असलेला 'ही' शब्द ह्रस्व लिहण्याची भाषांतर-काराची मनापासूनची अिच्छा दिसते. परंतु ही अिच्छा केवळ अस्थानी आहे. गुरू, हरी अि. शब्द संस्कृतांत ह्रस्वान्त असता, मराठींत दीर्घान्त कां झाले ? मराठीचा हा स्वभावच दिसतो की तिला शब्दाच्या अंतीं अुच्चाराचा खटका खपत नाही. हरि-शब्दाच्या अंतीं अिकार ह्रस्व अुच्चारून थांबणें जिव्हेस कष्टकारक वाटतें. यामुळे **दीर्घान्तत्व मराठीचा विशेष** ठरतें. 'रामाबरोबर लक्ष्मण**ही** वनात गेला.' अशा ठिकाणीं आपण कानोसा घ्यावा म्हणजे 'ही'चा

स्वर दीर्घच अैकूं येअील. नवीन शुद्धलेखन म्हणून रा. परांजपे जिचा गौरव करितात ती पद्धति अनेक प्रमादांनी युक्त आहे. तिच्यांत तत्त्वाहून लहरीलाच अधिक महत्त्व दिसतें. तसेंच—, रा. परांजपे म्हणतात **'पुल्लिंग** हें रूप चुकीचें आहे.' मी विचारितों– 'यास प्रमाण काय ?' या शब्दाच्या अुचाराचा कानोसा घेतल्यास असाच स्पष्ट अुचार अैकूं येतो. हाच अुच्चार, संस्कृत मूलानुसारी नसला तरी, आपणांस लेखनांत प्रमाण मानला पाहिजे. **'प्रथम अुच्चार, नंतर लेख.** प्रावृष्-चा अुचार **पाऊस** असा प्रथम झाला व नंतर तसा तो लिहिण्यांत आला. करिता संस्कृत संधीस सोडून असलें तरी, **पुल्लिंग** हेंच रूप मराठींत ग्राह्य आहे.

**८ ग्रंथांतील दोषागम**— मधूनमधून या ग्रंथांत दोष आढळतात,– परिहार्य व अपरिहार्य. पैकी कांही **परिहार्य** दोष— ग्रंथकाराने (२९५) भूतविशेषणाचा 'ला' प्रत्यय त-पासून निघाला आहे अेवढेंच सांगितलें आहे. त्याची चर्चा त्याने अवश्य करावयास हवी होती. काही पारिभाषिक शब्द परिशिष्टानंतर देण्याचे राहिले आहेत. पान अुघडिलें असतां परिच्छेदाचा अंक वर दिसल्यास सोयीचें असतें. अशी व्यवस्था या पुस्तकात केलेली नाही. **अपरिहार्य दोष**— ग्रंथकारास काही माहिती चुकीची मिळाल्यामुळे पुढीलसारखे दोष दिसून येतात—

ज्ञातेयं बंधुता तेषां क्रमात् भावसमूहयोः । 'अमरकोश'

**अर्थ— ज्ञातेय** म्हणजे (बंधुपणा अथवा) नातें आणि बंधुता म्हणजे नातेवाईकांचा समुदाय.

यावरून स्पष्ट आहे की **ज्ञातेय**-वरून **नातें** शब्द आला आहे. पण (१६९) तो **ज्ञातित्व**-वरून साधला आहे. **वणवा** वनवह्नि-वरून साधला असावा; वनवात (४६५) हें त्याचें मूळ चूक दिसतें. **शिमगा** (४८४) हा **सीम-ग** वरून साधला असावा असें मला वाटतें. ग्रंथकाराने तो सुग्रीष्मक यावरून साधला आहे. याविषयी ज्योतिःशास्त्रज्ञांनी निर्णय करावा. **सांडणें** हा शब्द **स्यंद्**-वरून बनलेला दिसतो; पण (४८०) **छर्द्**– वरून तो व्युत्पादिला आहे. **सुगी** (४८५) या शब्दाचें मूळ **सु-ग** (सुखाची स्थिति) हें असावें. (दुर्ग)दुग्ग या धर्तीवर सुग्ग होअून त्यावरून हा शब्द निघाला हें म्हणणे चिंत्य दिसते.

**९ भाषांतर कसें झालें आहे ?**— मूळ ग्रंथाच्या भाषेविषयी अज्ञान असल्याने, मला हें भाषांतर मुळाशीं ताडून पाहणें शक्य नाही; अर्थात् 'स्वतंत्र निर्मिति' या दृष्टीनेच या भाषांतराकडे मी पाहतों. यांत मी आनंदाने सांगतों की या पुस्तकाचे अध्ययनाने मराठी वाचकास अेक अपूर्व, मूल्यवान्, अुपयुक्त असे भाषाशास्त्राध्ययनाचे साधन लाभलें आहे. शिवाय तौलनिक भाषाशास्त्र म्हणजे काय, त्यावर जगांत काय-काय परिश्रम झालेले आहेत, यांत आपला अंश किती अल्प आहे, अि० गोष्टी या पुस्तकावरून कळून येतील, व त्यांनी कूपमंडूक-वृत्ति कांही कमी होअून दृष्टि भाषाशास्त्रोन्मुख होअील. या लाभाकडे पाहतां प्रस्तुत भाषांतर करून, मराठी-भाषकांवर केलेल्या मोठ्या अुपकाराबद्दल रा. परांजपे हे निःसंशय अभिनंदनास पात्र आहेत. तरी पण पुढील दोषहि सांगणें अवश्य आहे.– मूळ ग्रंथाची भाषा फारच संक्षेप-प्रवण आहे, असे विद्वानांचे मत आहे. भाषाशास्त्रासारख्या किचकट विषयाचें यथावत् आकलन होण्यास भाषा वेळेस पाल्हाळिक झाली तरी चालेल. पण ग्रंथकाराचा सूर निराळाच आहे, व भाषांतरकारानेहि प्रायः त्याचेंच अनुकरण केलें आहे. मराठी वाचकवर्गाकडे तरी लक्ष देअून विषयाचा विस्तर भाषांतरात अिष्ट होता. यांत अनेक ठिकाणें अशीं आहेत की अेकाधिक वेळां वाचूनहि मला तीं कळलीं नाहीत. तज्ञांची गोष्ट वेगळी, पण माझ्या-

सारखेच अ-तज्ञ असतील ते हें पुस्तक वाचतांना क्लेशच पावतील. अुदाहरणादाखल अेक स्थान दर्शवितों (२२३). **साक्षात् आणि परोक्ष विभक्तींची** प्रत्ययमाला असा मथळा आहे. यांत कितीतरी घोटाळे आढळतात. अनुक्रमणिकेनुसार येथील प्रत्ययमाला १९० परिच्छेदापर्यंत पसरली आहे. (१) पण या परिच्छेदात माला कोठेच दिसत नाही व तिचे घटकहि दुष्प्रापच दिसतात, निदान सुखाने तरी कळत नाहीत. (२) साक्षात् आणि परोक्ष या शब्दांनी काय समजावें, याची फोड येथे केली नाही. किंवा (३४५-६) पारिभाषिक शब्दकोशांतहि नाही; त्यांत मुळी हे शब्दच नाहीत. भीत-भीत म्हणतों की साक्षात् वि० म्हणजे प्रथमा, परोक्ष वि० म्हणजे प्रथमान्य विभक्ति आणि सामान्य विभक्ति म्हणजे सामान्यरूप अशी विवक्षा असावी. ही विवक्षा खरी असेल तर साक्षात् आणि परोक्ष हे शब्द अत्यंत गचाळ ठरतात. तें असो. संज्ञा कोणतीहि वापरा, पण त्या संज्ञेचा परिचित पारिभाषिक संज्ञाशीं तुलना करून तरी अर्थ स्पष्ट करावा तेंहि यांत केलें नाही. त्यातच (२३७) परोक्ष (सामान्य) विभक्ति असें विधान आहे. याने अशी शंका येते की परोक्ष आणि सामान्य हे शब्द तुल्यार्थकच आहेत काय? सारांश, या विभक्तिसंज्ञांच्या घोटाळ्यामुळे पुनःपुन्हा डोकें खाजवूनहि ग्रंथकाराचा अभिप्राय गळीं अुतरत नाही. हे हाल व ही गैरसोय भाषांतरकारांनी थोडासा अधिक विस्तर करून टाळणें अवश्य होतें. अशा विस्तराने धनव्यय वाढत असला तरी त्यापासून होणारा लाभ आणि तदभावीं होणारी हानि ही विचारांत घेतलीं असता हा विस्तर क्षम्य व अिष्टच ठरला असता. या संज्ञांच्या संबंधात पुढीलप्रमाणे म्हणता येअील.—

> साक्षादादिविभक्त्यर्थं ग्रंथकारः स्वयं खलु ।
> तथा वेदानुवदिता, तृतीयो वेत्ति वा न वा ॥

**अर्थ**— साक्षात्, परोक्ष, सामान्य या विभक्तींचा अर्थ ग्रंथक व अनुवादक हेच जाणतात. तिसऱ्या जाणणाऱ्याची वानवा आहे.

(२२३) देव हा शब्द व्यंजनान्त म्हणून दिला आहे व त्याची प्राकृत प्रथमेचीं रूपें देवो, देवा अशीं दिलीं आहेत. देव शब्द व्यंजनान्त कसा? अन्त्य 'अ' अैकू येत नाही म्हणून? वृक्ष, विप्र, समुद्र या शब्दात अन्त्य 'अ' अवश्य स्पष्ट अैकू येणार. तदभावीं अन्ताक्षरांतील पोटव्यंजनांचा अुच्चारच शक्य नाही. तेव्हा (अुच्चारतः) वृक्ष 'अ'कारान्त आणि ग्रंथकारमतें 'देव' व्यंजनान्त. या अंतभेदावरून असें अनुमान अिष्ट आहे काय की वृक्ष शब्द देव-प्रमाणे चालवावयाचा नाही? पण हे दोन्ही सारखेच चालणार. मराठीचें धोरण याच्या अुलट आहे. व्यंजनान्त शब्दास ती अुलट स्वरान्त करूं पाहते. भगवान्-ची तृतीया भगवानाने, जगत्ची सप्तमी जगतांत. अशा रीतीने हे शब्द व्यंजनान्ताचे स्वरान्त होतात. ग्रंथकार अुलट स्वरान्तास व्यंजनान्त करतात. मग त्यांचा अभिप्राय असा तर नाही की व्यंजनान्त केलेला देव् भाषेच्या स्वाभाविक प्रवृत्तीने फिरून अ-कारान्त व्हावा? या अभिप्रायाने रूपसिद्धींत हानि होत नसली तरी स्वर काढून जोडण्यापेक्षा, असलेलाच ठेवणें काय वाअीट? निरर्थक खटपट कशाला? हा मुळातील घोटाळा अनुवादकाने काढणें अिष्ट होतें.

**१० मूलग्रंथावरील अभिप्राय**— ग्रंथकाराचे गुरुजी (३२७) मेय्ये म्हणतात 'ग्रंथाची भाषा अत्यंत संक्षिप्त आहे, व त्यास कारण म्हणजे ग्रंथकार दुसऱ्याने आपली स्तुति करावी याविषयी सर्वथा निरपेक्ष आहे हें होय. अुलट—(३२८) भाषाशास्त्रज्ञ गीयर्सन म्हणतात या ग्रंथांतील प्रतिपादन सुबोध आहे (३२९). स्थानिक विद्वान रा. कत्रे म्हणतात की या

पुस्तकाने आर्यभारतीय भाषाशास्त्राचा प्रत्यक्ष पायाच घातला आहे. या अभिप्रायांतून सार वाचकांनी पुस्तक वाचून आपापल्या अनुभवानुसार काढावें.

११ **सारोद्धार**— वर या ग्रंथाचे गुण-दोष विवेचिले आहेत. गुणांबद्दल ग्रंथक व अनुवादक दोघेहि स्तुत्य आहेत; मात्र दोघांनींहि विषमस्थळीं अधिक विस्तार करून विषय विशद केला असता तर मराठी भाषाशास्त्राभ्यासकांवर त्यांचे मोठे अुपकार झाले असते. वाअीट वाटतें तें हेंच की दोघाची मार्मिक विद्वत्ता **सविस्तरपणाच्या अभावीं** अभ्यासूंस जेवढी फलद व्हावी तेवढी झाली नाही. शेवटीं, पुढील अिच्छा व्यक्त करून आपला निरोप घेतों. येथील विद्वान डॉ. वैद्य व कत्रे याच्या दाडग्या व्यासंगाचें अनुकरण होतकरू विद्वानानी करून अशा विद्वानाची संख्या वाढवावी आणि डॉक्टरेट-सारख्या पदव्या मिळविण्यासाठी युरोपातील विद्वानांस हिंदुस्तानात येणें अिष्ट वाटावें, अितक्या तोलाचें भाषाशास्त्राध्यन येथे चालू व्हावें !

ब्यावर (अजमीर) येथील श्री. अेल् पुनमचंद जैन यानी अुच्चारानुसारिणी (Phonetic) संकेत-लिपी बनविली असून, तिजमध्ये अक्षराना प्राधान्य नसल्यामुळे कोणत्याहि भाषेच्या शीघ्रलेखनासाठी तिचा अुपयोग करतां यावा, असें तिचें स्वरूप आहे.

या लिपींत फक्त सहा प्राथमिक चिन्हे आहेत. हिन्दीमध्ये प्रत्येक वाक्याच्याशेवटी देतात त्याप्रमाणे अळ, कंसाचा पूर्व व अुत्तरार्ध, मराठी मोडी अेकाचा आंकडा, अिंग्रजी U आणि O अशा पाच चिन्हाची तींस अुभीं आडवी तिरकस ठेवल्याने वीस व्यंजनें बनतात. कण्ठय तालव्यादि प्रत्येक वर्गातील पहिल्या (कठोर) व्यंजनास एक चिन्ह व तिसऱ्या (मृदु) व्यंजनास अेक चिन्ह आहे. दुसरे कठोर व्यंजन व चवथे मृदु व्यंजन याच चिन्हांला टिंब वा तत्सम खुणा देअून साधतात. अुदा. क साठीं (।) हा संकेत आहे. त्याखाली टिंब दिल्याने ख होतो व ग या चिन्हा (Ↄ) खाली टिंब दिल्याने घ होतो. अुर्दू वर्ण देवनागरींत लिहिताना त्याच्या कठोरत्वाचें निदर्शक टींब ज्याप्रमाणे देतात त्याचप्रमाणे ही पद्धति आहे.

या लिपींत फक्त चार स्वर आहेत. अ = Ↄ अु U अि व ऋ = C यासच टिंबादि खुणा देअून अ ची बाराखडी बनते. ह्या खूणा वर किंवा खाली लागतात. बाणाच्या टोकाची खूण लावल्यावर अर्धव्यंजनाचा बोध होतो. त्याचप्रमाणे द्वित्व जोडाक्षर अित्यादींचे संकेत ठरविले आहेत. याप्रमाणे तीन पायऱ्यात जुळणी होते तरी पण लिहिताना टाक न अुचलता लिहिण्याच्या सोअीने व गतीने त्या तीन पायऱ्या अेकमेकात मिळून जातात.

याच्या पद्धतींत प्राथमिक चिन्हें फारच थोडीं असल्यामुळे अेकाच संकेताला अनेक अक्षरांचा संभ्रम अुत्पन्न होण्याचा संभव आहे. पिट्मन किंवा तत्सम अितर अिंग्रजी शॉर्टहॅन्ड पद्धतींत हा दोष कमी प्रमाणात आहे. परंतु श्री. जैनाच्या संकेतचिन्हें जोडण्याच्या पद्धतींतील सुधारणेमुळे हा संशयजनक दोष टाळला जाअील असें वाटतें. त्याची प्राथमिक चिन्हे ठसठसीत अन् साधीं असल्यामुळे आणि सरळ रेषाचा जास्त अुपयोग असल्यामुळे त्यांना ही सुधारणा शक्य झाली आहे.

प्राथमिक चिन्हें कमी करण्याच्या प्रयत्नामुळे अुर्दूप्रमाणे बारीक बारीक चिन्हे वाटतात आणि लेखनातील किचकटपणा वाढतो. हा दोष याहि पद्धतींत आला आहे. त्यामुळे या लिपींत आवाजानुसार लिहिणें सुलभ होत असले तरी वाचणें कठीण जाअील असें वाटतें, परंतु अभ्यासाने ती अडचण दूर होणारी आहे.

'व्यापक संकेत' 'लिखाणांत सुलभता' आणि 'गति' हे गुण संकेतलिपींत अवश्य असावे लागतात. या दृष्टींनी श्री. जैनांचा प्रयत्न परिपूर्ण नसला तरी बराच समाधानकारक आहे. देवनागरीसारख्या अुच्चारानुसारी अुत्कृष्ट लिपीवर संकेतलिपी जितक्या सुलभतेने बसेल तितक्या प्रमाणांत तिची अुत्कृष्टता दिसून येअील. श्री. जैनांचा प्रयत्न या दृष्टीने बऱ्याच प्रमाणात यशस्वी झाला असून त्याची लिपि हिंदी लिपिसाठी आज अनेक ठिकाणीं वापरलीं जात आहे. तींत १४० शब्द मिनिटांस लिहिण्यापर्यंत गति जाअूं शकते असें श्री. जैनाचें मत आहे व तें श्री. मुलामाअींच्या अध्यक्षतेखाली झालेल्या चढाओढींत त्यांच्या विद्यार्थ्यांने सार्थ करून दाखविलेंहि आहे. अखिल भारतीय साहित्य संमेलन, लंडन, आणि दिल्लीची व्यापारी परिषद् (Chambers of Commerce) या संस्थातून तीस मान्यता मिळाली आहे. मराठीसाठी आपल्याकडील लघुलेखकांनी व वृत्तप्रतिनिधींनी तिचा स्वीकार केल्यास मराठी वृत्तलेखनातील अुणीव दूर होअील.

---

## साहित्य-शास्त्र

**वाङ्मयीन महात्मता**— ले० श्री. बा. सी. मर्ढेकर; प्रका० श्री. कृ. ना. सापळे; रामकृष्ण प्रकाशन मंडळ, त्रिभुवन रोड, मुंबअी ४; मूल्य १। रु.

'वाङ्मयीन महात्मता' हें अपरिचिततेमुळे औत्सुक्य वाढविणारे नाव धारण करणारें हें पुस्तक 'आर्ट्स् अॅण्ड मॅन्' या अिंग्रजी टीकाग्रंथाचे लेखक श्री. बा. सी. मर्ढेकर यानी लिहिलें आहे अेवढें सागितलें की त्याचे वैशिष्ट्य साहित्यिकांस तरी कल्पनेने जाणतां येअील. पाअुणशे पानाच्या या लहान ग्रंथास पंचवीस प्रानांची प्रस्तावना प्रो. वा. म जोशी यानी लिहिली आहे व तीमध्ये मूळ ग्रंथामधील श्री. मर्ढेकर यांच्या विचाराचा सविस्तर परामर्श घेतला आहे. मूळ ग्रंथाचें स्वरूप लेखसंग्रहात्मक आहे. सह्याद्रींत वेळोवेळीं लिहिल्या गेलेल्या टीकात्मक लेखात 'वाङ्मयीन महात्मता' या मुद्दाम लिहिलेल्या लेखाची भर घालून व काही प्रास्ताविक जोडून हा संग्रह तयार केला आहे. पांचसहा स्फुट व निरनिराळ्या वेळीं लिहिल्या गेलेल्या लेखांतून अेक सलग अशी विचारसरणी प्रतिपादिली असणें अशक्यच होते, व त्याप्रमाणें ल्यु. पिरादेल्लोवरील लेख किंवा अरिस्टॉटलच्या 'संभवनीयते'वरील लेख हे अितर तीन लेखांपासून वेगळे पडलेले दिसतात. अितर तीन लेख व प्रास्ताविक भाग मिळून मात्र अेकच विचारसरणी आहे, आणि या ग्रंथाचें खरें प्रतिपाद्य यातूनच दृग्गोचर होतें.

श्री. मर्ढेकर यांची सारी विचारसरणी थोडक्यात अशी आहे. मराठी वाङ्मयास जागतिक वाङ्मयात मानाचें तर राहोच पण नावाचे सुद्धा स्थान नाही. याचें अेक कारण आमचें हें वाङ्मय अिंग्रजीमधील वाङ्मयावरच फार अवलंबून आहे, व जगातील अितर भाषांमधील वाङ्मयाचा आणि मराठी वाङ्मयाचा परिचय मुळीच नसल्याने समग्र वस्तु पाहिल्याने येणारी सर्वांगीण, म्हणून खरी, अशी दृष्टि मराठी वाङ्मयास प्राप्त झाली नाही. त्या वाङ्मयांत ठराविकपणा, श्री. मर्ढेकर यांच्या शब्दात 'आवर्तपणा'—फिरून फिरून तेंच तें येणे— आलेला आहे. त्यांत जीवनाची विविधता किंवा विस्तृतता याचें दर्शन होत नाहीच, पण यापेक्षाहि अधिक लक्ष्यांत घ्यावयाची गोष्ट म्हणजे विचार किंवा भावनाची सखोलता मुळीच नाही. 'शिळी कल्पना, पदलालित्य, भावनांचा गुळगुळीतपणा, आणि विचारांचा निर्जीवपणा हींच या वाङ्मयांत पाहावयास मिळतात.''

या परिस्थितीची मीमांसा करीत असतांना श्री. मर्ढेकर यांनी वाङ्मयीन श्रेष्ठता अथवा 'महत्मता' कोणकोणत्या कारणांनी येते याची चर्चा केली आहे, व तीच या पुस्तकाचा गाभा म्हणावयास पाहिजे. वाङ्मय श्रेष्ठ होण्यास लेखकाने आपल्याशीं निष्ठा ठेवून तें जसें प्रतीत झालें तसेंच चित्रित करणें आवश्यक आहे. या बाबतींत प्रतारणा झाली की वाङ्मय हिणकस झालेंच म्हणून समजावें. आपल्या अनुभवांशीं तादात्म होण्याची शक्ति किंवा पात्रता मराठी लेखकांत दिसत नाही. उपरिनिर्दिष्ट आत्मनिष्ठा ही लेखनपूर्व व लेखनांतर्गत अशी द्विविध असूं शकते आणि या प्रत्येकींत दोष अुत्पन्न होअूं शकतो. तसेंच वाङ्मयीन 'महात्मते'स आवश्यक असणारी मुख्य गोष्ट म्हणजे प्रसंगाची व्यापकता नसून भावनांची खोली, त्यांचें तात्कालिक नसलेलें देशकालातीत महत्त्व व सत्यता, जीवनदृष्ट्या मूल्य यावर प्रकाश पाडणारी दृष्टि हीच होय. हें व यासारखे तात्त्विक विचार यात सांगण्यात आले असून मधूनमधून स्पष्टीकरणार्थ आधुनिक काव्यातून कांही अुदाहरणे येअून मोठ्या मार्मिकपणें या तात्त्विक विचाराचें विवरण लेखकाने केलें आहे. कोणत्याहि लेखकाचा मुलाहिजा न ठेवतां, पण तोल सुटूं न देतां, विपुल वाङ्मय निर्माण करण्याची घाअी, शब्दावडंबराचें प्रेम, अर्थव्यक्तीकडे होणारें दुर्लक्ष्य अित्यादि सद्यःकालीन मराठी लेखकांचे दोष श्री. मर्ढेकर यांनी सडेतोडपणें बोलून दाखविले आहेत. त्यांचें हें सारें विवेचन आज झालें आहे त्यापेक्षा अधिक सुगम त्यांना करतां आलें असतें तर दुधात साखर पडती.

श्री. मर्ढेकर यानी प्रतिपादलेल्या मुख्य विचारसरणीशीं कोणाचाहि तीव्र मतभेद होण्याचें कारण दिसत नाही पण तीमधील कांही अंगभूत बाबींशीं होणें शक्य आहे, व तो तसा प्रो. वा. म. जोशी यांनी आपल्या प्रस्तावनेंत व्यक्त केलाच आहे. मराठी वाङ्मयास जागतिक वाङ्मयांत स्थान नसण्याचें कारण केवळ त्याची अपात्रता अेवढेंच नसून हिंदुस्थानाचें व त्यांत महाराष्ट्राचें जागतिक घडामोडींत असणारें अल्प स्थान हेंहि द्यावें लागेल. सध्याचें जग म्हणजे युरोपामधील काही मोठीं राष्ट्रे व अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें; याना आपल्या भाषेखेरीज अितर भाषांत कांही होतें आहे व तें बघण्याजोगें आहे असें जेथे वाटत नाहीं, तेथे आपल्या वाङ्याचा विचार होअून त्याची योग्य ती बूज होअील ही आशा कशाला? किंबहुना आम्हीच आमच्या वाङ्मयाची कदर कितीशी बाळगतों? अिंग्रजीमधील चॉसर–पोप आम्ही वाचूं पण ज्ञानेश्वर–मोरोपंत वाचणार नाही. अरिस्टॉटलूचें 'पोअेटिक्स्' अभ्यासूं, पण आनंदवर्धनाचा 'ध्वन्यालोक' पाहणार नाही. पाश्चात्य वाङ्मयाचा पीरचय असणाऱ्या पंडितांनी वा प्राध्यापकांनी मराठी लेखकाची दृष्टि व्यापक व्हावी म्हणून प्रस्तुत ग्रंथांतल्याप्रमाणे थोड्या अवघड भाषेंत कां होअीना, पण त्या त्या वाङ्मयासंबंधी कितीसें लिहिलें आहे? असो.

श्री. मर्ढेकरांनी आपली विचारसरणी वाङ्मयीन अुदाहरणांस लावून दाखवितांना जें जें म्हटलें आहे त्याविषयीचा आपला मतभेद प्रस्तावनाकारांनी ठिकठिकाणीं व्यक्त केला आहे. अेखाद्या कवितेचें रसग्रहण करितांना वाचक आपल्या भावना व विचार कवीवर लादण्याचा संभव असल्याने हें रसग्रहणच अनेक वेळां निर्दोष न होण्याचा संभव असतो व अशा वेळीं कवि आत्मनिष्ठ असतो कीं नसतो हें ठरविणें फार कठिण होतें, निदान अचूक न होणें शक्य असतें. 'काहूर' या पटवर्धनांच्या कवितेचें मार्मिक परीक्षण करतांना असा कांहीसा प्रकार झाला आहे असें वाटतें. या कवितेंत पहिल्या दोन ओळींतले शब्दप्रयोग व त्यांची विशिष्ट रचना यांवरून कवि आपल्या अनुभवाशीं अिमानी राहिला नाही हें मर्ढेकरांनी योग्य म्हटलें; कारण 'डोळ्यांत पाणी जमलें' याचा अर्थ काहूर संपून अेका भावनेची निश्चिति झालेली असते. पण

या गझलामधील यमकरचनेवरून जीं अनुमानें काढलीं आहेत तीं मात्र सपशेल चुकलीं आहेत. मर्ढेकर म्हणतातः— "न कळत पण किती बहारीनें लेखनगर्भ आत्मनिष्ठा योग्य ते परिणाम घडवून आणते पहा. पहिल्या दोन ओळींत यमक साधलें, पण पुढील दोन ओळींत नाही. काहुराचा किती उत्कृष्ट परिणाम हा! पण या साशंक काहूराला प्रेमानें सुसंगतता आणली आहे; तशी गझलाला २, ४, ६, ८, १०, १२ या ओळींतील यमकांनीं आणली आहे. साशंक काहूरच नसतें तर सर्वच ओळी 'उरा'न्त झाल्या असत्या; आणि काहूराला प्रेमातुरतेचा मध्यबिंदु नसता तर कोठल्याच ओळींत यमक साधलें नसतें." पण साऱ्याच गझलातून यमक-रचना अशीच असते. पहिल्या दोन ओळी ध्रुवपदासारख्या सयमक असतात. पुढील युग्म-कांतील शेवटचा चरण मेळाप्रमाणे ध्रुवपदाशीं म्हणजे पहिल्या दोन ओळींशीं सयमक असतो. मधल्या ओळीशीं (साधारणपणें) नसतो. काहूर नसलेल्या 'भिल्लीण' कवितेंत अशीच रचना आहे. व प्रेमातुरता नसलेल्या 'असो देव किंवा' यांत अशीच यमकरचना साधली आहे. कवीने प्रस्तुत कवितेंत साधलेली विशिष्ट यमकरचना 'नकळत' आलेली नसून जाणीवेने आली आहे, कारण आपण गजल लिहीत आहों व म्हणून अशी यमकरचना साधली पाहिजे ही जाणीव त्याला असते. या कवितेवरील अितर टीका-ग्राह्य असूनहि गजलाच्या यमक स्वरूपच्या अज्ञानामुळे जीं वरील विधानें झाली त्यानी रसग्रहणाच्या अतिरिक्त रसिक निष्ठतेविषयी मन साशंक होतें. रसिकाला अेखादी कविता अशी अशी निष्पन्न झाली असें वाटावें व वस्तुस्थिति मात्र निराळीच असावी असें होणें अगदी शक्य आहे. काणे-करांच्या कवितेची अुत्पत्ति कशी झाली असावी याविषयी मर्ढेकरांच्या बरोबर त्यांचे रसिक प्रस्तावनाकार अगदी सहमत नाहीत. 'माहूत' या यशवंतांच्या कवितेविषयी असाच मतभेद होण्याचा संभव आहे. जें दृश्य कल्पनाचक्षूंवर 'आढळलें' असेल तेंच तसेंच काव्यांत आलें पाहिजे असा श्री. मर्ढेकर यांचा आग्रह, तर प्रस्तावनाकारांच्या मताने त्याला अन्योक्तिरूप ग्रावयास प्रत्यवाय नसावा—फक्त अन्योक्तीकरितां वस्तूची निवड चांगली असावी. या कवितेंत लेखनपूर्व आत्मनिष्ठा नसावी असे मर्ढेकरास वाटतें. पण तशी असूनहि लेखनावर प्रभुत्व साधलें नसल्यास कविता त्यांच्याच 'काहूर'वरील परीक्षणात आल्याप्रमाणे सदोष अुतरूं शकेल. आमच्या मतें काव्यनिष्पत्तीच्या कवींच्या तऱ्हा अनंत असतील व खरी वस्तुस्थिति तो बुद्ध्या सांगणार नाही. मर्ढेकरांस ही आत्मवंचना वाटते, वा. म. जोशी यांस ती कला वाटते. किंब-हुना त्यांचा आग्रह कलेंत यथा-प्रतीत लेखन असूंच नये. कला कोठे आहे हें टीकाकारापेक्षा कलावंतास अधिक समजते. ती केवळ यथाप्रतीत लेखनांत असेल, किंवा वामनराव म्हणतात त्याप्रमाणे स्मरणोज्जीवित कलानुरूप बदल करून केलेल्या लेखनांत किंवा काढलेल्या चित्रांत असेल. बहुधा ती आत्मप्रतीतीशीं सर्वसामान्य निष्ठा ठेवून बारिकसारिक कलानुरूप फरक केलेल्या कृतींत असते. विहिणींच्या मांडणांतील सहजोद्गार 'आत्मनिष्ठापूर्ण' असले तरी कलाकृति होणार नाहीत हे जसें खरें, तसेंच केवळ सहज स्फूर्त अशाहि पण कांही कलाकृति असूं शकतील. सामान्यपणें ती वर दर्शविल्याप्रमाणे मिश्र अशीच असावयाची.

अरिस्टॉटल्च्या 'संभवनीयता' तत्त्वासंबंधीहि श्री. मर्ढेकर आणि वामनराव जोशी याचा काहीसा मतभेद झाला आहे. कलाकृतीस लावावयाचीं तत्त्वें सौंदर्यमूलक असावी, **Probability** चें हें तत्त्व तसें नसून तार्किक— बौद्धिक— आहे असा मर्ढेकराचा आक्षेप. त्यांचे प्रस्तावनाकार या बाबतींत त्याच्याशीं सहमत आहेत. मात्र अरिस्टॉटल्ने यावरच भर दिला आहे असें त्यांना वाटत नाही. सौंदर्यविषयक अितर तत्त्वाबरोबर याचाहि विचार व्हावयास

हवा अेवढेंच त्यास वाटत असावें असें ते म्हणतात. पण सौंदर्यप्रतीतीची मर्ढेकर यांची कल्पना काहीशी आकुंचित आहे. बाह्येंद्रियास प्रतीत होतें तेवढेंच सौंदर्य असें त्याना वाटतें. बुद्धि हें अिंद्रिय सौंदर्यग्रहणात त्याना मान्य नाही व तिचें कार्य वाङ्मयात अधिक असल्याने ललित-कलांच्या श्रेणींत वाङ्मयाची पायरी त्यांना अगदी खालची वाटते. सत्याविष्कार हें कलेचें अेक ध्येय आहे ही गोष्ट जर मान्य असेल तर 'संभवनीयते'चें तत्त्व हेहि बौद्धिक वा तार्किक असलें तरी सौंदर्यतत्त्वच म्हणावयास पाहिजे. सौंदर्याची व तर्कशुद्धतेची अितकी फारकत असण्याचें कारण नाही.

याप्रमाणे काही मतभेदाच्या जागा असल्या तरी श्री. मर्ढेकराची मुख्य विचारसरणी मान्य होण्याजोगीच आहे. ललितवाङ्मयनिर्मिति करूं अिच्छिणाऱ्या होतकरू लोकानी ती अवश्य लक्षात घ्यावी. आजच्या मराठी वाङ्मयाच्या प्रकृतीचे निदान करूं पाहणारानाहि ती अुद्बोधक वाटेल. श्री. मर्ढेकराना विनंती ही की, पाश्चात्य टीकावाङ्मयाप्रमाणे त्यांनी पौरस्त्य टीकावाङ्मयाकडेहि आपलें लक्ष पुरवून, त्यावर आपल्या शोधक बुद्धीचा प्रकाश पाडून, कांही लेखन करावें. मराठीमधील टीकावाङ्मयाचा याने फायदाच होअील.

---

## चरित्रें

**फ्रान्सची झांशीवाली**— ले० न. चिं. केळकर; प्रका० दि अिंटर नॅशनल बुक सर्व्हिस, पुणें ४; मूल्य १२ आणे.

**स्वराज्यमार्गदर्शक लोकमान्य टिळक**— ले० आपटे गुरुजी; प्रका० के. भि. ढवळे, मुंबअी नं. ४; मूल्य १२ आणे.

**सेनापति तात्या टोपे**— ले० डॉ. ना. दा. सावरकर; प्रका० श्री. द. वैद्य; भारत प्रकाश ग्रंथमाला, पुणें २; मूल्य १२ आणे.

**स्मृतिचित्रें** (संक्षिप्त)— संपादक श्री. दे. ना टिळक; प्रकाशक के. भि. ढवळे, मुंबई ४; मूल्य १ रु.

श्री. तात्यासाहेब केळकर यानी आतापर्यंत अितके विपुल आणि विविध लेखन केलेलें आहे की, कांही कांही लेखकांच्या हातून तितके वाचनहि झालेलें नसेल. त्यांच्या लेखणीची तरतरी अितकी विलक्षण आहे की, त्यानी सत्तरी गाठली तरी नव्या नव्या प्रांतांत संचार करीतच आहे. त्रिखंडात्मक तिलक-चरित्र लिहिणारी त्यांची लेखणी या पुस्तकांत फ्रान्समधील जोन ऑफ् आर्क या वीरबालेचें वर्णन करण्यास सिद्ध झाली. अवघ्या अेकोणीस वर्षांच्या आयुष्यांत या अलौकिक मुलीने स्वतःला मिळणाऱ्या दैवी संदेशानुसार जे अकल्पित पराक्रम केले व नंतर धर्माचार्यांकडून जीवंत जाळलें जाण्यापूर्वी जे अनन्वित हाल सोसले त्यांचें साठ पानांत दिलेलें वर्णन वाचतांना अंगावर रोमांच व डोळ्यांत आसवें अुर्मी राहतात. शेवटीं प्रश्न असा अुभा राहतो की, धर्मसंस्थेने मानवजातीचें अेकंदरींत कल्याण अधिक केले कीं अकल्याण ? कांही ज्ञानवंताना आत्मसुखाचा अत्युच्च लाभ धर्मविचाराने मिळवून दिलेला असला, तरी येशू खिस्त, श्रीज्ञानेश्वर अशा विभूतींच्या छळापासून गंगेच्या प्रवाहात, पुलाच्या पायाखाली, देवीच्या, स्थंडिलावर दिलेल्या हजारो-हजार नरबलि-पशुबलीपर्यंत जो प्रचंड संहार झाला, त्याचें मूळ भ्रष्ट धर्मकल्पनेतच सांपडत नाही काय ? १४३१ सालीं सत्तर मुद्दे काढून ज्या बालिकेला

अपराधी ठरविण्यांत आलें व चितेवर जिवंत जाळण्यांत आलें, तीच अवघ्या पंचवीस वर्षांनंतर १०१ कारणांवरून निर्दोषी ठरली, तिचा फ्रान्समध्ये पुतळा अुभारला गेला, व्हेनरेबल, ब्लेसेड अशा पदव्यांच्या पायऱ्या चढत चढत ती सेंट बनली आणि आताच्या युद्धांत जनरल डी गॉल याने स्वातंत्र्याचें जें निशाण अुभारलें तें जोन ऑफ् आर्क अिचेंच! फाशीची शिक्षा बंद व्हावयास पाहिजे आणि तिचें प्रथम अुचाटन धर्मक्षेत्रातून व्हावयास हवें. झाशीची राणी लक्ष्मीबाअी हिच्याशीं या जोनचें साम्य पुष्कळच आहे. पण स्वार्थाने प्रेरित होअून का होअीना परंतु झाशीवालीचा पराक्रम बुद्धिपुरस्सर, आत्मप्रेरणेने, स्वेच्छेने केलेला दिसतो तर फ्रान्सवालीचें शौर्य दैवी प्रेरणेचें, परेच्छाप्रेरित, स्वप्नात—न कळत घडल्याप्रमाणे वाटतें. 'चरित्र-चिकित्से'मध्ये म. गांधींच्या 'आंतल्या आवाजा'चें श्री. केळकरांनी केलेलें समर्थन वाचनीय आहे.

लो. टिळकांना दिवंगत होअून वीस वर्षे होअून गेलीं. या कालात पुढे आलेल्या पिढीला लोकमान्यांच्या लोकोत्तर कर्तृत्वाची, त्यागाची, धैर्याची व राष्ट्रभक्तीची ओळख जितक्या रीतींनी करून दिली जाअील तितकी हवीच आहे. या चरित्राचा विशेष गुण म्हणजे सोप्या व सालंकृत भाषेमध्ये टिळकांच्या चरित्रांतहि प्रमुख प्रसंग आवेशाने व अभिमानबुद्धीने रंगविले आहेत. फोटो वगैरेंनी बाह्यांग मनोरम केलें आहे. श्री. दादासाहेब माळवंकर यांची प्रस्तावना वाचनीय आहे.

सत्तावनचें स्वातंत्र्ययुद्ध लढविणारे शेवटचे पेशवे नानासाहेब यांचे पराक्रमी सेनापति तात्या टोपे यांच्या चरित्रासारखा विषय आणि स्वातंत्र्यवीर सावरकरांचे बंधु डॉ. सावरकर यांच्यासारखा प्रभावी लेखक, असा मेळ जमल्यामुळे अगदी अपुरी सामग्री असतांहि, प्रस्तुत चरित्र बरेंच अुद्बोधक आणि अत्यंत वाचनीय झालेलें आहे. असले तेजस्वी लेखक अितिहास-संशोधनाच्या रूक्ष कामगिरींत गुंतून पडण्याचें चाहीत नाहीत, आणि प्रस्तुत (प्रयत्न) त्रोटक स्वरूपाचा होणें अपरिहार्य आहे याची जाणीव असल्यानेच 'विस्तृत चरित्रलेखनाची अिच्छा अन्य कोणा समर्थ चरित्रलेखकास झाली तरी या चरित्रचिंतनाचें अेक कार्य सफल झालें' अशी सदिच्छा लेखकानेच व्यक्त करून ठेविली आहे. प्रस्तुत चरित्रात सेनापति तात्या टोपे यांच्याबद्दल आणि त्यांनी ज्या रणसंग्रामातील सेनापतित्वाची धुरा साक्षेपाने सावरली त्या १८५७ च्या क्रांतीबद्दल आवश्यक वाटली ती माहिती लेखकाने आपल्या अुत्तेजक शैलीने प्रस्तुत छोटेखानी पुस्तकांत समाविष्ट केली आहे. प्रा. बेहेरे आदिकरून पूर्वलेखकांचा आधार घेअून हा ग्रंथ शक्य तों पूर्ण केलेला आहे. आणि शेवटीं १९३२ च्या प्रथमावृत्तींत नसलेला स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या भाषणांतील अुताऱ्यांचा भाग देअून आणि मागाहून मिळालेली माहिती परिशिष्टांत देअून विषय आजतागायत करण्याची काळजी घेतलेली आहे. अैतिहासिक पुरुषांचीं छोटेखानी चरित्रें आपल्या देशाच्या अितिहासांतून स्वतंत्र काढून छापल्याने अितिहासविषय अधिक लोकप्रिय होअील यांत शंका नाही, आणि अितिहाससंशोधनालाहि त्यामुळे थोडा अधिक अवसर मिळेल.

शकुन्तलेचें वर्णन कालिदासाने ज्या दोन शब्दात केलें आहे त्या दोन शब्दांतच लक्ष्मीबाअी टिळकां'च्या 'स्मृतिचित्रां'च्या चार पुस्तकांचें वर्णन करितां येअील. तें म्हणजे हीं चित्रें 'अव्याज मनोहर' आहेत. १९३४ या वर्षी तीं 'चित्रें' प्रसिद्ध झालीं. आता लक्ष्मीबाअींचे चिरंजीव श्री. देवदत्त टिळक ह्यांनी आपल्या मातुःश्रींनी लिहिलेल्या चार पुस्तकांचा संक्षेप प्रस्तुत पुस्तकांत केला असून ६७० पृष्ठातील मजकूर २२० पृष्ठांत बसविला आहे. संक्षेप

करितांना जुळणीसाठी म्हणून टिळकांना मधून मधून पदरचीं वाक्यें घालावीं लागलीं आहेत. तीं त्यांनी तिरप्या खिळ्यांत दिलीं आहेत; पण अशीं वाक्यें फार थोडीं आहेत.

गेल्या सात वर्षांत अत्यंत लोकप्रिय झालेल्या आणि आबालवृद्धांस वाचनीय वाटणाऱ्या आत्मचरित्रपर पुस्तकाचें नांव सांगा असें कोणीं विचारल्यास लक्ष्मीबाईंच्या स्मृतिचित्रांचेंच कोणासहि प्रथम स्मरण होईल इतकी या पुस्तकाची योग्यता आहे. "माझें चरित्र घडलें तसें लिहा. माझ्या दोषांवर पांघरूण घालण्याचा प्रयत्न करूं नका" असें रे० टिळकांनी इह-लोक सोडताना आपल्या कुटुंबीय मंडळींस सांगितलें होतें. अगदी तसेंच लक्ष्मीबाईंनी केलें. यामुळेच त्यांच्या लेखनांत जिवंतपणा वाटतो. त्यांचें लिहिणें बालबोध व गोड आहे. त्यांचा विनोद सूक्ष्म व न बोंचणारा आहे. "मला नवल वाटतें तें मी टिळकांना कशी पसंत पडलें याचें. माझें रूप, रंग अगदीं बेताचें होते. बाकी नाक डोळे जरी रेखीव नव्हते तरी ते होते आणि अगदी जागच्या जागीं होते" असे त्यानी स्वतःविषयी लिहिलें आहे तें वाचून कोणा-च्या मुखावर स्मित दिसणार नाही?

सर्व पुस्तक वाचून खाली ठेवतांना एकंदर ग्रह मात्र असा होतो की, रेव्हरंड टिळक खरे कवि म्हणजे वेडेपीर (?) होते आणि लक्ष्मीबाई कवयित्री असूनहि व्यवहारचतुर होत्या. असो; प्रस्तुत संक्षिप्त आवृत्तीने एक सोय झाली आहे. साडेसाहा रुपये मोजून चार पुस्तकें वाचण्याची सवड नसणाराना ह्या पुस्तकाने एका रुपयात आपली तहान भागविता येईल.

---

## कविता

१ **टिळकांची कविता** (भाग १) तिसरी आवृत्ति— संपा० श्री. दे. ना. टिळक, प्रका० श्री. के. भि. ढवळे, मुंबई ४; मूल्य १।। रु.

२ **प्रेमसुधा** (स्वामी रामदास याच्या कवितांचा मराठी अनुवाद)— अनुवा० श्री. श्री. रं. देशपांडे, प्रका० आनंदाश्रम, रामनगर, कान्हनगड; मूल्य ६ आणे.

३ **जलधारा**— कवि : बाबुलनाथ, प्रका० श्री. ल. ना. चाफेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, टिळक रस्ता, पुणें २; मूल्य १२ आणे.

४ **सहवास**— कवि : 'इन्दिरा' व श्री. ना. मा. संत, प्रका० श्री. ल. ना. चाफेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, टिळक रस्ता, पुणें २; मूल्य बारा आणे.

रे. नारायण वामन टिळक यांची कविता पुनः सुंदर स्वरूपांत पुनर्मुद्रित करून बाजारांत आणल्याबद्दल प्रकाशक केशव भिकाजी ढवळे आणि रे. टिळकांचे सत्पुत्र रा. दे. ना. टिळक अभिनंदनास पात्र आहेत. 'आधुनिक कविपंचकां'त रे. टिळक हे ज्येष्ठ-पैकी कवि होत. धर्मांतराने रे. टिळकांचें स्वभाषाप्रेम अथवा स्वदेशप्रेम मुळीच कमी झालें नाही. आणि त्यांच्या संस्कृतींतहि अस्सल मराठी बाणा कायम राहिला. उलट, खिस्ती मंडळींत टिळकांनी मराठी भाषा, महाराष्ट्र, व महाराष्ट्राची आध्यात्मिक परंपरा यांविषयी सादर कुतूहल निर्माण केलें.

साधी, गोड, रसाळ भावकविता ज्याची मना रञ्जवी
वेडा सृष्टिसखा, जयास पदवी लाभे फुलांचा कवी

या दोन ओळींत कविवर्य माधव जूलियन् यांनी रे. टिळकांचें समर्पक वर्णन केलें आहे असें म्हणतां येअील. अुच्च संस्कृति, गाढ श्रद्धा, निर्मल प्रसाद यांचें रमणीय प्रतिबिंब रे. टिळक यांच्या कवितेंत पाहावयास सापडतें. टीकेच्या तडाख्यातून रे. टिळकाची कविता सुखरूपपणें अधिक कांतिमती होअून बाहेर पडली आहे आणि 'शाळेच्या चिमण्या जगां'त व बाहेरील रसिक जनांत विलक्षण मान्यता पावली आहे.

टिळकांच्या भाषेंत त्यांच्या कवितेचें स्वरूप वर्णन करा असा प्रश्न घातल्यास रसिक वाङ्मयविद्यार्थी

'ममत्त्वाचें मोवती आलवाल
वरुनि विरहाचें ऊनही विलोल
आसवांचें जल सदा वाहताहे
प्रीतिवल्ली यापरी वाढताहे'

ह्या चार ओळी अुद्धृत केल्याशिवाय खास राहणार नाहीत.

प्रेमसुधा हें भक्तिगीतांचें पुस्तक साधकांना वाचनीय वाटेल. कर्नाटकांतील अेका आधुनिक सिद्धाने (स्वामी रामदासानी) वेळोवेळीं रचलेल्या अिंग्रजी गीतांचा हा मराठी अनुवाद आहे. मराठी भाषा बरीच सफाअीने लिहिलेली असली तरी 'संयोग ह्रस्वास गुरुत्व देतो' या नियमाला पानोपानीं आलेला बाध पाहून विरस होतो. कांही वृत्तांची निवड रसपरिपोषक नाही. तथापि मूळ कवि ज्या वृत्तींत तल्लीन आहे त्याच वृत्तीशीं अनुवादक समरस झाला असल्यामुळे अनुवादांत रसाळपणा मात्र भरपूर आला आहे.

जलधारा या संग्रहाचे कवि बाबुलनाथ यांचा परिचय मराठी वाचकांना आता बराच झाला आहे. त्यांच्या रचनेंतील सफाअी वाखाणण्यासारखी असते. आधुनिक प्रीतिगीतांप्रमाणेच 'मर्द मराठ्या', 'अगंळची शूर राणी' अि० अैतिहासिक दणकेबाज कविताहि त्यांनी रचिल्या आहेत. विडंबन काव्यावर श्री. बाबुलनाथ यांचें प्रेम दिसतें. पण त्या नादात ते पुष्कळदा वाहवतहि जातात. 'पहिली केस', 'नागिणी' अि० कवितातील अभिरुचि सौंदर्यपूजकाला शोभण्यासारखी नाही. अध्ययनाबरोबर अभिरुचीहि वाढविणें अगत्याचें आहे असें श्री. बाबुलनाथाना सप्रेम सांगावेंसें वाटतें.

"हें 'सन्त'- काव्य फार पसंत आहे" असा प्रा. श्रीपाद महादेव माटे यांनी जो आपला अभिप्राय या 'सहवास' काव्यसंग्रहाबद्दल प्रकट केला आहे, त्याच्याशीं कोणाचा मतभेद होअीलसें शक्य वाटत नाही. 'श्री-मनोरमा' या रानडेदंपतीच्या काव्यसंग्रहाप्रमाणे 'सहवास' हा या सन्त पतिपत्नींचा काव्यसंग्रहहि मराठी काव्याला भूषणभूत होअील असाच आहे. श्री. मा. मा. सन्त यांची कविता त्यांच्या पत्नीच्या कवितेशेजारीं ठेवल्यास रचनेच्या दृष्टीने काहीशी राकट, कमी भावार्द्र व जास्त शब्दगौरवयुक्त वाटली तरी तो तुलनेमुळे होणारा परिणाम आहे. ही सापेक्षता बाजूला सारली व अितर आधुनिक कवींच्या कवितेच्या तुलनेने तिचें मूल्यमापन केलें तर ती बरीच अुच्च दर्जाची, स्वत्वपरिपूर्ण व हृदयंगम आहे, असेंच आढळून येअील. 'कांही तरी !' या सुनीतांत आपल्या काव्याचा अुद्गम आणि विकास त्यांनी सांगितला आहे तो वाचतांना रूपर्ट ब्रुक्च्या "The Great Lover" या नितान्तसुंदर कवितेची तिचा यत्किंचितहि पडसाद हींत नसतांना केवळ दोहोंमधील काव्यसौंदर्याच्या साम्यामुळे आठवण

झाल्यावाचून राहत नाही. 'बोलावितें मजला कुणी' या कवितेने श्री. सन्त यांच्याकडे रसिकांची दृष्टि प्रथम खेचली. 'अूठ गडे' ही रेंदाळकराच्या 'प्रबोधना'शीं शब्दसौष्ठव आणि नाजुक भावच्छटादर्शन या गुणानी स्पर्धा करणारी आहे.

"पांढऱ्या मअु अुशांत। चेहरा तुझा प्रशान्त
रेलुनी तरी निवान्त। झोपलाच हा !
हीं मिटलीं नेत्रदळें। मंद मंद ऊर हले
ओठ जरा विलगले। उकलुनी अहा !
ओठाच्या विलगतेंत। भुवयांच्या वक्रतेंत
स्वप्नींचा भाव पुसट। बिंबला पहा !"

या नितान्तमधुर ओळी व त्यांतून रंगलेलें शब्दचित्र कोणाच्या अंतःकरणाला चटका लावून त्यात घोळत राहणार नाहीं ? 'क्षितिजाच्या काठावर' या कवितेंतील आर्तता सहृदय रसिकाला वेडावणारी आहे. तींतील नाजूक शब्दरचना आणि त्याच्याद्वारा चितारलेलें निसर्गालेख्य बालकवींच्या सहज ललितरचनेशीं तुलनीय असून तींतील अुत्कट व आर्त मानवी भावनेचा स्पर्श तर त्यानाहि मागे सारणारा आहे, असें म्हणण्यात अतिशयोक्ति होणार नाही. ही कविता सर्वच्या सर्वच अुद्धृत करण्याचा मोह अनिवार्य आहे.

"क्षितिजाच्या काठावर। अुमटला सायंतारा
नाचणाऱ्या लाटेवर। खेळतसे सांजवारा
किनाऱ्याच्या नारळींत। झाली कोठें सांजवात
आणि कोणी झोपडींत। कांही तरी होतें गात
सागराचें काळे पाणी। चमचमे हिंदोळत
जरा दूर अंतराला। नाव होती झोके खात
लाटेवरी लाट येता। फेस दिसे पाढरासा
ओसरता वाळूवरी। नाद होअी नाजूकसा
दूरावला कोणी जीव। फेकलेला लाटेवर
काळोखल्या दिशातून। खिन्न पाहे दूरवर
नकळत वाळूवरी। होअी त्याचा बोटचाळा
अुमटल्या अक्षरांना। जीव त्याचा फार भ्याला
थरकत्या तळव्यानें। वाळू लोटी त्यांजवर
आणि धरी आवरूनी। तुटणारा अश्रुसर

'पाअूस' या शेवटल्या कवितेतील

"ओसरून सर गेली। टपटपे पानोपानीं
वृत्ति माझी बावरली। कुजबूज गडे कानीं
... ... ...
आता पाझरून व्योम। येवो कोसळून वीज
स्कंधीं तुझ्या सुखाराम। आली मज गोड नीज"

या ओळीहि अत्यंत हृद्य आहेत.

श्री. सन्त यांच्या सुनीतापैकी "माझीं कवनें", "बूच", "कांहीतरी", "पूर्तता", "कां आतां उरणार !" अित्यादि सुनीतें संस्मरणीय आहेत.

कवयित्री 'अिंदिरा' यांच्या कवितांमध्ये सरसनीरस ठरवणेंच कठीण काम आहे. याच्या शब्दरचनेंत आणि कल्पनाप्रतिमांत व्यक्तिमत्व अितकें ओतप्रोत भरलेलें दिसतें की मराठी कवितेंत त्यांच्या कवितेला स्वतःचे असें अगदी स्वतंत्र आणि स्वयंविशिष्ट स्थान आहे, यात संशय नाही. त्यांच्या कवितेचें अंतरंग जानपद ओवींतील भावनेप्रमाणे हळुवार आणि भावसांद्र आहे. 'आई' या विषयावर यशवंत आणि माधव ज्यूलियन यांच्याहि अुत्कृष्ट कविता आहेत पण–

"कळ्या माझ्या आनंदाच्या । सांठविल्या माझ्याकडे
फुलवाया तुझ्यापुढें.
आसवें मीं सांठविलीं । पापणीच्या कांठोकाठ
तुझ्यापाशीं देण्या वाट
ठरविलें मनापाशीं । बोलायाचें कितीतरी
निजूनिया माडीवरी

या 'अिंदिरा' यांच्या 'आई' कवितेमधील भावनेची अुत्कृष्टता, कोमलता आणि सहजता फक्त जानपद ओवीमध्येच सापडूं शकेल, अन्यत्र नाही. तीच स्थिति "कसें हांसूं" मधील

"गुलाबाचे लाल कळे । डुलतात मागेंपुढे
आत आंत मन कुढे :
झुळ झुळ येअी वारा । पानें फुलें हालवीत
मनपरी थरारत."

यांसारख्या ओळींची अवीट माधुरी त्याच्या प्रत्येक कवितेंत कांठोकाठ भरून ओसंडत असलेली दिसते. अुतारे घ्यावयाचे म्हटलें तर संग्रहांतील बहुतेक सर्वच कविता जशाच्या तशा अुतरून काढाव्या लागतील. म्हणून जागेची अडचण लक्ष्यांत घेअून तो मोह आवरणें भाग आहे. तरी पण– "केव्हांपासुन ही—" या कवितेंतील

नवीनच कांहीं, मना अुमगलें । हळूच हांसले पंचप्राण–
दिवसाच्या मनीं, चादणें दाटलें । मन मारावलें, तसें माझें
सूर्योदयापूर्वी नभ कोंदाटतें । आणिक हांसतें त्याच वेळीं
तसेंच हृदयीं कांहींसें दाटलें । तरीही वाटलें गोड कांही

या ओळीं, त्यांत या कवयित्रीला अिंद्रियग्राह्य अनुभवांना सौंदर्यात्मक प्रतिमांचें रूप देअून रसिकाना अुत्कट काव्यानंदाचा अनुभव देण्याचीच शक्ती आहे अितकेंच नव्हे, तर अेडिथ सिट्वेलप्रमाणे, बाह्यज्ञानेंद्रियांच्या सूक्ष्म अंतःप्रतिनिधींना संवेद्यमान होणाऱ्या भावप्रतिमानाही अैंद्रिय अनुभवाच्या स्वरूपांत रसिकाना "दिवसाच्या मनीं चांदणें दाटलें", "ऊन कोळें ओलसर" यांसारख्या लोकविलक्षण शब्दप्रतिमा अुमअून त्यांच्याद्वारा प्रत्यक्ष भासमान करण्याची विलक्षण करामत तिच्यांत आहे, हें दाखवून देण्यासाठी अुद्धृत केल्यावाचून राहवत नाही.

---

## नाटक

**१. पानपतचे पडसाद**— (एकांकी नाटक) ले० श्री. पुरुषोत्तम महादेव वैद्य, प्रका० नवरसकार्यालय, इन्दोर शहर; मूल्य ४ आणे.

**२ विभूतिपूजा**—(संगीत नाटिका) ले० नन्दू खोटे, प्रका० अेम. के. सुखटणकर, शांताराम नारायण सापळे, समर्थ हाअूस चौबळलेन, मुंबअी नं. ४; मूल्य ८ आणे.

या दोन नाट्यलेखनाच्या प्रयत्नांपैकी पहिला अैतिहासिक लिखाणाचा व दुसरा सामाजिक वातावरण चितारण्याचा आहे. सुभेदार मल्हारराव होळकर यांच्यावर "पानपतावरील पळपुटे असा आरोप आज पावणेदोनशें वर्षें परकीयांकडून व स्वकीयांकडून सरसहा चालू होता." त्याचें निराकरण रा. सा. सरदेसायांसारख्या अितिहासज्ञाकडून झालें, परंतु "ते निराकरण स्थलकालव्यक्तींनीं परिमित झालें. तें परिमित स्वरूप, स्थलकालव्यक्ति अतीत करून सुभेदाराचें अुज्ज्वल वर्तन सूर्यप्रकाशाप्रमाणे सतत जनतेपुढे तळपत राहावें म्हणून माझे मित्र रा. पुरुषोत्तम महादेव वैद्य यांनी त्यास अर्थ-अलंकारादिकांनी मंडित करून जनताजनार्दनास आज सादर केलें आहे." असें 'पानिपतचे पडसाद' या चिमुकल्या चोपड्याचे 'परिचयकार' श्री. वासुदेव वामन ठाकूर हे म्हणतात. या शब्दावडंबराचा अर्थ व त्यांत त्यांना काय म्हणावयाचें आहे त्याचें मर्म लेखक व परिचयकार या दोघांखेरीज तिसऱ्या कोणाला समजलें कीं काय याची शंका आहे. पळपुटेपणाच्या आरोपाचा निरास म्हणजे "बंदुकीची गोळी लागून विश्वासराव पडल्याबरोबर 'आमचे पारणें झालें' असें म्हणून ब्राह्मण-मराठ्यांच्या कुटुंबकबील्यास मुसलमानांच्या हातीं लागूं न देतां, खाशा जनान्यासह देशीं पोहोचविण्याचा भाअुसाहेबांनी आम्हास हुकूम दिला" हें मल्हाररावानी आपल्या आक्षेप घेणाऱ्या पत्नीस दिलेलें खुलाशाचें अुत्तर! घरचे आक्षेपक म्हणजे मल्हाररावाची पत्नी गौतमाबाअी आणि परकीय म्हणजे नानासाहेब पेशवे! नाट्यरचनेच्या या प्रयत्नाचा दर्जा अेखाद्या दुय्यम शाळेंतील विद्यार्थ्यांच्या परिक्षेच्या प्रश्नपत्रिकेंतील प्रश्नाला उत्तर म्हणून लिहिलेल्या संवादाच्या तोडीचा आहे. त्या मानाने विभूतीपूजेंतील संवाद व स्वभावलेखन अधिक चटकदार व जिवंत आहे. त्या नाटिकेंतील 'शिवाजी' हें पात्र स्वतः-बद्दल प्रेक्षकवाचकांच्या मनांत आपलेपणा निर्माण करणारें आहे. नाटकाचा अेकंदर विषय व तो मांडण्याची पद्धति, त्यांमधला दृष्टिकोण जरी अुथळ, सहानुभूतीचा व तर्कशुद्ध विचारसरणीचा अभाव असलेला व सामान्य कुटाळकंपूतील व्यक्तींच्या बौद्धिक दर्जाचा प्रश्न असला व त्यामुळे नाटिकेला जरी फारच थोडें साहित्यिक महत्त्व असलें तरी श्री. खोटे यांनी शिवाजी हें पात्र निर्माण करून त्याच्याद्वारा जो सहजद निरागस असा खुमासदार विनोद साधला आहे, तो पाहता मात्र त्यानी आपल्या या प्रकारच्या निरीक्षणशक्तीचा योग्य उपयोग करून या शिवाजीसारख्या भूमिका केल्या तर नाट्यरचनेंत ते लौकरच पुढे येतील अशी आशा करण्यास भरपूर जागा करून दिली आहे.

---

## लघुकथा

१ **दिव्यावरती अंधेर**— ले० श्री. अनंत काणेकर, प्रका० श्री. बा. द. सातोस्कर, सागर साहित्य, त्रिभुवन रोड, मुंबअी ४; मूल्य १। रु.

२ **शहाळीं**— ले० श्री. सां. घ. कंटक, प्रका० श्री. बा. द. सातोस्कर, सागर साहित्य, त्रिभुवन रोड, मुंबअी ४; मूल्य १४ आणे.

३ **उंबराचीं फुलें**— ले० श्री. ह. वि. देसाअी, प्रका० श्री. बा. द. सातोस्कर, सागर साहित्य, त्रिभुवन रोड, मुंबअी ४; मूल्य १४ आणे.

सद्यःस्थितींतील समाजांत प्रामाणिक आणि अप्रामाणिक, सद्गुणी आणि दुर्गुणी, किंवा अुद्योगी–आळशी अित्यादींचें मूल्यमापन आपल्या अपेक्षेप्रमाणे होतेंच असें नाही;

किंबहुना अपेक्षाभंगच होतो. तेव्हां अशा 'समाजाचा पाया जितक्या लवकर अुखडला जाअील' आणि 'नवीन समाज जितक्या लवकर अस्तित्वांत येअील तितकें बरें' या अूर्मीतूनच 'दिव्यावरती अंधेर' या श्री. अनंत काणेकर यांच्या लघुकथासंग्रहांतील लघुकथांचा जन्म झाला आहे. दिव्यावरती अंधेर पाहतांच 'दिव्याखाली अंधार' ही म्हण अुराशीं बाळगणाऱ्यांना धक्का बसेल; परंतु विजेच्या दिव्यांच्या चालू काळांत जुन्या म्हणींचाहि जीर्णोद्धार करण्याची आवश्यकता किती आहे याची जाणीव सहज पटेल. श्री. काणेकरांनी या संग्रहांतील सर्व लघुकथांतून याच जाणीवेचें सूत्र ओविलें आहे. 'बहिणी' या लघुकथेंत बेफाम नखरा करणारी आणि देवाच्या बापालाहि अुद्धट अुत्तरें देणारी, कॉलेजमधील पोरांत बिनदिक्कत मिसळणारी आणि अफाट वागणुकीमुळे त्यांनाहि लाजविणारी, आअीबापांच्या अपेक्षांची मुलाहिजा न ठेवणारी आणि सिनेमांतील काळोखांत मोहन मलकानी या नवपरिचित सिंधी तरुणाचा हात चुकून तिच्या हातावर पडतांच पटकन तिथल्या तिथे दाबून धरणारी— किंबहुना आपलें लग्न अुरकून घेअून मगच 'ही मी त्याच्याकडे राहायला चाललें' असें सांगणारी सुली रूपाने सामान्य असली तरी आयुष्यांत यशस्वी ठरते. तर याच्या अुलट, देखणी, शान्त, सालस अित्यादि अित्यादि सद्गुणसंपन्न शान्ति— सुलीचीच थोरली बहीण—गिरगावांतल्या चाळींत नवरा आणि तीन हडकुळीं मुलें यांसह जीवन रखडत असते. 'कामकरीण' या लघुकथेंतील पिरता कामकरीण शील सांभाळून राहत असते तोवर तिचे हाल कुत्राहि खात नाही; पण तीच शामजीशेटची रखेली होतांच घरदार करून सुखासमाधानाने राहूं लागते. 'ताडाच्या झाडासारखी अुंच... गालफडें बसलेली, छाती आंत गेलेली' सत्तावीस वर्षांची 'कुमारिका' विधवेपेक्षा वाअीट जिणें जगत होती; पण तीच आप्पासाहेबासारख्या म्हाताऱ्याच्या गळयात माळ घालतांच वर्षाभराच्या आंत गोऱ्यापान गुटगुटीत मुलांला मांडीवर खेळवीत सुखाचा संसार करूं लागली.

विषाची भीति वाटावी तेथे अमृत सांपडतें आणि अमृताची अपेक्षा करावी तेथे नेमकी विषाची बाधा होते. 'बहिणी', 'कुमारिका', 'कामकरीण' अित्यादि कथांतून पहिल्या प्रकारचा अपेक्षाभंग होतो तर 'प्रोफेसर', 'सृष्टिमाता', 'कविवर्य' अित्यादींत दुसऱ्या प्रकारचा कटु अनुभव येतो.

या संग्रहांतील काणेकरांच्या सर्वच लघुकथा चटकदार असून विचाराला धक्का देणाऱ्या आहेत; पण त्यांतल्या त्यांत 'कम्युनिस्ट' आणि 'क्रांतिकारक' यांचा विशेष अुल्लेख केला पाहिजे. या दोन्ही गोष्टींना मानसशास्त्राची बैठक आहे. क्रांतींत रक्त सांडून आणि सोव्हिअेट भूमींत अितकीं वर्षें काढूनहि अँड्रीच्या अंतःकरणांतील मालकी हक्काची जाणीव पूर्णपणें नाहीशी होत नाही. रिटाच्या दर्शनाने तो 'बूर्ज्वा' विकारांच्या आधीन होतो, आणि असूयेच्या भरांत अलीला धडधडणाऱ्या अिंजिनमध्ये फेकून देण्यास अुद्युक्त होतो. अंतःकरणाच्या गाभ्यांत खोलवर रुजलेले संस्कार समूळ नाहीसे होत नाहीत. याअुलट 'क्रांतिकारक' या लघुकथेंत अेकुलता अेक मुलगा कामगारचळवळींत शिरल्यामुळे घरदार नोकरीधंदा यांकडे पाहीना म्हणून त्याला आणि त्याच्या पुढाऱ्यांना लाखोली वाहणारी जनाभावशी पोटच्या गोळयावर अन्याय झालेला पाहतांच गोळीबार होत असतांनाहि स्वतः संपावर जाअून पिकेटिंग करूं लागते. सामाजिक अन्यायाची चीड अशा रीतीने वैयक्तिक अन्यायांतून जागी होते; आणि जनाभावशीसारख्या कडव्या म्हातारींत ती अितक्या थराला जाते की, पोरगे सरकारी अधिकाऱ्यांना फितूर झालेलें पाहतांच 'कपाळात पाटो घालून मारून टाकीन मेल्या' म्हणून संतापाने ती त्याच्या अंगावर धावून जाते आणि ग्लानि येअून बेशुद्ध पडते. या ठिकाणीं वाचकाला गॉर्कीच्या 'आअी'ची आठवण होते; आणि

ती तशी होईल असें काणेकरांनीच प्रस्तावनेंत सांगून टाकलें आहे. गॉर्कीबरोबर मॉमचाहि काणेकरांनी कृतज्ञतापूर्वक अुल्लेख केला आहे. मॉमच्या 'The Ant and The Grass-hopper' या कथेचा आणि काणेकरांच्या 'बहिणी' या कथेचा विषय अेकच आहे. खरें पाहिलें तर या दोन्ही कथांत पात्रें, प्रसंग, घटना अित्यादि सर्व भिन्न आहेत. तेव्हा हा अुल्लेख केला नसता तरी चालला असता. परंतु अेखाद्या आक्षेपकाने काही आक्षेप घेतलाच तर केवळ त्याच्या समाधानाकरिता म्हणून 'मॉमच्या गोष्टीचा माझ्या मनावर परिणाम झालेला असणारच' असें ते प्रस्तावनेंत लिहितात.

'प्रोफेसर' या गोष्टींतील गीताबाअींना दिलेला छडीचा चोप, नंतरची तिची फिर्याद आणि विशेषतः कथेचा शेवट यांसारखे अतिरंजित आणि अवास्तव किंवा निदान क्वचि-द्वास्तव प्रसंग मधून मधून आढळतात; परंतु तरीहि श्री. काणेकरांच्या लघुकथांना मराठी कथा-वाङ्मयांत बरेंच वरचें स्थान लाभेल. काणेकराच्या या यशाचें मर्म त्याच्या निश्चित अशा पुरोगामी दृष्टींतून केलेलें बारीक निरीक्षण, विचारातील तर्कशुद्धता आणि भाषेतील आवेशपूर्ण जिव्हाळा यांत आहे. काणेकराच्या भाषेचे अुत्कृष्ट नमुने प्रस्तुत संग्रहात अनेक आहेत. रंगदार वर्णनांची रेलचेल आहे. अुदा. रिटाचे वर्णन (पान ६७) आणि बाल्टिक समुद्रांतील पांढऱ्या रात्रीचें वर्णन (पान ७२) पाहा.

काणेकरांनी दाखविलेला दिव्यावरचा अंधार हा असा आहे. प्रकाश आणि प्रकाशांतील व्यक्ति यांकडे सामान्यतः सर्वांचेंच लक्ष जातें; पण अंधारांत चाचपडणाऱ्या आणि ठेचाळ-णाऱ्यांकडे पाहण्याचें काम खऱ्या कलावंताचें असतें आणि विशेषतः प्रकाशाचा अंधार आणि अंधाराचा प्रकाश होणाऱ्या या सद्यःस्थितींत याची फारच आवश्यकता असते. श्री. काणेकरांनी याच दृष्टीने आपल्या लघुकथांतून या नवीन अंधेरावर प्रकाश टाकला आहे याबद्दल ते अभि-नंदनास जरूर पात्र आहेत.

गोमंतकीय लेखक श्री. सां. घ. कंटक यांचा 'शहाळीं' हा लघुकथासंग्रह प्रसिद्ध झाला आहे. 'शहाळीं' हीं मूळचींच रुचकर. त्यात पुनः मानवी जीवनातील आशा, आकांक्षा, विचार आणि विकार अित्यादींचें वास्तवपूर्ण मिश्रण असेल तर त्याची शक्ति वाढतेच. त्या दृष्टीने श्री. कंटकांचीं 'शहाळीं' वाचकाचा विरस करीत नाहीत.

आपल्या घरगुती जीवनात आवतीभोवती अशा अनेक व्यक्ति असतात आणि अशा कांही गोष्टी घडत असतात की लघुकथालेखकाला कथाविषयासाठी दूर जाण्याचें कारण नाही. रोगी भावाचा गफलतीने तहहयात विमा अुतरून स्वतःच्या कुटुंबाची ददात मिटविणारे तेनेंत, निनांवी पत्रावर विश्वसून स्वतःच्या नवपरिचित वधूचा त्याग करणारे तरुण, मूळच्या मोळ्या-भाबड्या आणि बाळबोध वळणाच्या पण नवऱ्याच्या आग्रहाखातर नट्टापट्टा करून मिरवितां मिरवितां संसाराकडे आणि नवऱ्याकडे दुर्लक्ष करणाऱ्या स्त्रिया, अुच्च शिक्षणासाठी अिंग्लंडला, जाण्यापूर्वी लग्नाचें वचन दिलेल्या प्रेयसीला आल्यानंतर ओळखूंहि न शकणारे विनय, स्वतःचा कुरूपपणा झाकण्यासाठी नवरा मुलगा म्हणून दुसराच कुणी दाखवून अैनवेळीं लग्नाला अुभे राहणारे आणि नवमतवादी म्हणून बाहेर मिरविणारे पण स्वतःच्या पत्नीला काडीमोड न देणारे असे कितीतरी प्रकारचे लोक आपल्या समाजात आहेत. श्री. कंटक यांनी अशाच प्रकारचे स्त्रीपुरुष आणि त्यांच्या आयुष्यातील घटना आपल्या कथांसाठी निवडलीं आहेत. विषय जरी साधे आणि रोजच्या व्यवहारांतील असले तरी कसब त्यांचा आशय व्यक्त करण्यांतल्या पद्ध-तींत असते. श्री. कंटकांची लेखनशैली परिणामकारण आहे. 'अक्काचे अश्रु' या कथेंतील

मंदाच्या काकाची व्यक्तिरेखा फारच हळुवार हाताने रंगविली आहे. 'हट्टी कोण' या कथेंतील जोडपें मात्र या जगांतील दिसत नाही. एकशय्येवर असतांना आधी न बोलण्याच्या हट्टाने वाट चुकलेल्या प्रवाशाला तो चिडून दोघांच्यामध्ये येऊन निजेपर्यंत वाट न सांगणारें जोडपें निर्लज्जच म्हटलें पाहिजे. मात्र माणसें निर्लज्ज असतात आणि त्यातहि स्त्रीपेक्षा पुरुष जास्त निर्लज्ज असतो हेंच कंटकाना दाखवावयाचें असल्यास न कळे.

गोमंतकीय लेखकाच्या लेखनात सामान्यतः प्रादेशिकता आढळते. परंतु कंटकांचीं शहाळीं गोमंतकाबाहेरहि आढळतील. 'मायेच्या पोर्टा'मधील फ्लोरा आणि तेनेत हे खिश्चन जोडपें आणि त्याची राहणी, किंवा 'कलंकिता'मधील यल्लमा अनुक्रमे जरी गोवें आणि बेळगांव याची आठवण करून देतात तरी अितरत्र असें जोडपें किंवा अशा यल्लमा काही थोड्या नाहीत. फ्लोरा आणि तेनेंत अैवजी मधुकर आणि मालती हीं नांवें घातलीं तरी स्वभावात कांही बदल होणार नाही.

श्री. ह. वि. देसाअी यांनी या आपल्या कथासंग्रहातून नअू अुंबराचीं फुलें वाचकांसमोर माडलीं आहेत. श्री. देसाअी हे गेलीं आठ-दहा वर्षें वृत्तपत्रव्यवसायात असल्यामुळे भिन्न भिन्न स्वभावाच्या व्यक्तींशीं त्याचा परिचय घडला, आणि जगातील आंदोलनांशीं समरस व्हावें लागलें. वृत्तपत्रव्यवसायात मिळालेल्या या अनुभवावर आपल्या ललितवाङ्मयाची सतत निर्मिति करण्याची त्यांची फार अिच्छा होती, परंतु वृत्तपत्राच्या धकाधकींत त्यांच्या वाङ्मयीन लेखनाची अवस्था अुंबराच्या फुलासारखीच झाली.

बोलून चालून अुंबराचीच फुले. रंग, रूप, गंध अित्यादि आपल्या कल्पनेप्रमाणे त्यावर वाटेल तितके चढवितां येतील. श्री. देसाअी यानी आपल्या नअू फुलाचे रंग, रूप भिन्न भिन्न दाखविलें असलें तरी तीं अेकूण तीन प्रकारातच सामावतात. 'मनातील मनोरे' आणि 'आअीची आठवण' या दोन कथातून मातृप्रेमाची अुदात्तता त्यानी दाखविली आहे; 'तर देवाचा कौल' आणि 'दगडाचा देव' यात देवात देवकळा मुळीच अुरली नसून देवाच्या नावावर दांभिक आणि दुष्ट ग्रामस्थाची मात्र चलती होत असते असें दाखविलें आहे. याखेरीजच्या सर्व कथांतून तरुण स्त्रीपुरुषांच्या मनोव्यापाराच्या अंगोपांगाचें चित्रण केलेलें आहे.

श्री. देसाअी यांनी रंगविलेले पुरुष स्त्रियांच्या मानाने फारच हळवे, दुबळे आणि रडके दिसतात. ललितेने नटी होण्याच्या महत्त्वाकांक्षेने काडीमोड घेतली म्हणून तिचा पति माधव, कॅन्सरच्या आजारामुळे रोगी मुलांना जन्म द्यावा लागूं नये म्हणून नवऱ्यावर खोटे आरोप करून मधुलता घटस्फोट घेते म्हणून श्रीकान्त, सुलूने त्याग केला म्हणून तिचा प्रियकर, विमलने आपल्याला डावलून मनोहरावर प्रेम केले म्हणून विनायक हे सारे रडण्यापलीकडे काहीच करीत नाहीत. फारच झाले तर मार्क्स, अेंजल्स, अप्टन सिंक्लेअर अित्यादींचे ग्रंथ वाचतील. त्या मानाने ललिता, मधुलता अित्यादि स्त्रिया विचारी, दूरदर्शी आणि कर्तबगार दिसतात. स्वतःला झालेला कॅन्सरचा विकार पोटीं येणाऱ्या मुलाना होअूं नये म्हणून प्रेमळ पतीचा संबंध सोडणारी आणि तो कायमचा सुटून त्याने दुसरें लग्न करावें म्हणून घटस्फोट घेणारी मधुलता जरा असामान्यच म्हटली पाहिजे.

श्री. देसाअी हे भावनाचीं आंदोलनें मोठ्या नाजूक हाताने रेखाटतात. 'बदललेलें मन', 'मायेचे पाश', 'मास्तर' अित्यादींत याचा प्रत्यय येतो. परंतु भावनाच्या विश्लेषणात कथेची हानि मात्र होतां अुपयोगी नाही. 'काळा बटन' यांत तशी ती झाली आहे. 'दगडाचा देव' ही मात्र

अेक अुत्कृष्ट लघुकथा आहे, आणि तिच्यांतून श्री. देसाअी यांना हवी तशी फुरसत मिळाल्यास ते कशा प्रकारची लघुकथा लिहूं शकतील याची जाणीव होते.

---

## लघुनिबंध

**१ अेक पाअूल पुढें**– ले० व प्रका० प्रो. वि. पा. दाडेकर, हाथी पोळ नाका, बडोदें; मूल्य १। रु.

**२ पहिली अुडी**– ले० प्रो. श्री. स. भावे, प्रका ०श्री. ज. पु. भागवत, मौज प्रिंटिंग ब्यूरो, मुंबअी नं. ४; मूल्य १। रु.

गेल्या तीनचार महिन्याच्या अवधींत लघुनिबंधाचीं चार पुस्तके प्रसिद्ध झालीं. त्यात प्रो. वि. पा. दाडेकर याचे 'अेक पाअूल पुढें' व प्रो. श्री. स. भावे याचें 'पहिली अुडी' हीं आहेत. आगामी प्रकाशनाच्या यादींत आणखी दोन तीन लघुनिबंधांच्या पुस्तकाचे संकल्प सोडलेले दृष्टीस पडतात. हळूहळू का होअीना पण लघुनिबंध हा प्रकार मराठी वाङ्मयात चागला रुजूं लागला आहे व त्याचा स्वीकारहि मराठी वाचकवर्गाकडून चागला होअूं लागला हें वरील गोष्टींवरून दिसून येण्यासारखे आहे.

अेकंदर वाङ्मयांत लेखकाच्या व्यक्तिवैशिष्ट्याला किती महत्त्व आहे हें निराळें सांगण्याची जरूरी नाही. पण त्याच्या व्यक्तिवैशिष्ट्याच्या विस्ताराला जर कोणत्या वाङ्मयप्रकारात पूर्णपणें अवकाश मिळत असेल तर तो लघुनिबंधप्रकारांत. लघुनिबंध म्हणजे लेखकाच्या व्यक्तिमत्वाचें ललितमनोहर दर्शनच! त्याचें व्यक्तिमत्व जितकें विविध आणि वैचित्र्यपूर्ण असेल तितकें त्याचें लघुनिबंधलेखन प्रभावी आणि वैशिष्ट्यपूर्ण ठरेल. आणि त्याच्या या अनेकविध व्यक्तिमत्वाला लालित्याची जितकी जोड मिळाली असेल तितके त्याचें लेखन रुचिर आणि हृद्य झालेलें आढळेल.

प्रो. दाडेकराच्या 'अेक पाअूल पुढें' या लघुनिबंधसंग्रहात अेकंदर सतरा निबंध संकलित करण्यांत आले आहेत. या सर्व निबंधांतून ज्या कांही गोष्टींचा ठसा मनावर अुमटतो त्यात 'जीवनातून शक्य तेवढा आनंद शोधून घेण्याची त्याची वृत्ति ही मनावर विशेष ठसते. त्यांची ही 'जीवन-लोलुप' दृष्टि 'आनंदाचे संकेत', 'सर्वं क्षणिकम्' 'घर घरटे', 'आळस' अित्यादि निबंधांतून विशेष ठळकपणें प्रत्ययास येते. आयुष्य हा अेक प्रवास आहे व त्याचें प्रतीक अशा ज्या 'रेल्वे लाअीन्स' त्या त्याना आवडतात. 'आळस' म्हणजे निष्क्रियता नव्हे] तर जीवनांतल्या धकाधकीनंतर तत्त्वशोधनात घालविलेला काळ म्हणून तो त्याना प्रिय वाटतो. तरुण स्त्रिया व बालकें तर त्याना हवींशीं वाटतातच पण वृद्ध स्त्रियांबद्दलहि त्याना विशेष आपुलकी वाटते कारण त्याच्या ठिकाणीं दिसून येणारें वात्सल्य व गोष्टीवेल्हाळपणा. 'अेक पाअूल पुढें' टाकण्याचा जबर आशावाद माणसाजवळ असला म्हणजे संसारांतल्या कोठल्याच संकटाची भीति माणसाला भेडसावीत नाही असा त्याचा अभिप्राय आहे.

प्रो. दाडेकराचे या लघुनिबंधातून प्रतिबिंबित झालेलें व्यक्तिमत्व हें असें आहे.

पण या बहुतेक लघुनिबंधातून जो अेक दोष प्रामुख्याने दिसून येतो तो म्हणजे त्यांत दिसून येणारा अेकजिनसीपणाचा अभाव. लघुनिबंध म्हणजे अेखाद्या विषयाचें निमित्त करून

लेखकाने केलेलें आत्माविष्करण हें जरी खरें असलें तरी त्यांत अेक मध्यवर्ती कल्पना हवी. व त्या कल्पनेभोवती सारा लघुनिबंध गुंफलेला हवा. लघुनिबंधाला कांही अेक स्वरूप (Form) आहे त्यांतही सुरवात मध्य आणि शेवट हीं मध्यवर्ती कल्पनेच्या परिपोषाकरिता साधलेलीं असतात ही गोष्ट अलीकडच्या पुष्कळ लघुनिबंधकारांच्या ध्यानींमनींहि असल्याचें दिसत नाही. पहिल्या अुर्डीतहि हा दोष प्रामुख्याने दिसून येतो. मध्यवर्ती कल्पना अमुक अेक अशी निश्चित न केल्यामुळे निबंधाला जें अेक फुटकळ स्वरूप येतें तें यांतील पुष्कळ निबंधाना आलें आहे, व त्याचा मनावर जो अेक ठसा अुमटावयास हवा तो अुमटत नाही. 'न वठणारा वृक्ष', 'मी आणि लहान मुलें', 'अेकेकाची तऱ्हा', 'रेल्वे लाअीन्स' या लघुनिबंधांत हा दोष विशेष डोळ्यांवर येतो. पण हे निबंध वाचल्यावर 'आळस', 'न्हावीदादा', '३१ डिसेंबर' हे निबंध जर वाचले तर मध्यवर्ती कल्पनेभोवती गुंफलेला निबंध किती परिणामकारक होअूं शकतो हें विरोधाने चांगलेंच लक्षांत येअील.

रचना आणि भाषा ललितपूर्ण हवी याची जाणीव लेखकाला पूर्णपणें आहे याचा प्रत्यय हे निबंध वाचताना येतो. पण लघुनिबंधाला हवें तितकें लालित्य लेखकाला कमावतां आलें नाही असें म्हटल्याशिवाय राहवत नाही. लघुनिबंध 'बोलके' हवेत म्हणून त्यांत शक्य तितकी 'गप्पा छाटल्यासारखी' भाषा वापरली पाहिजे हें खरें, पण 'नसतें त्यांचें शिकविण्यात लक्ष किंवा आणखी कशात लक्ष !' अशा तऱ्हेच्या वाक्यांच्या रेलचेलीने मात्र विरस झाल्याशिवाय राहत नाही. पण अेकंदरींत भाषाशैली सहज, टसकेबाज आणि लवचीक अशी आहे.

प्रो. दांडेकरांचें लघुनिबंधाचें तिसरें पुस्तक आहे. त्यांच्या हातून अुत्तरोत्तर अधिकाधिक सुंदर व वैशिष्ट्यपूर्ण लेखन होत राहील अशी आशा करावयास हरकत नाही.

प्रो. भावे यानी आपल्या लघुनिबंधलेखनाला सुरवात लघुनिबंधावरच अेक लघुनिबंध लिहून केली आहे. वास्तविक लघुनिबंध हा अेक वाङ्मयप्रकार आहे व त्याचें तंत्र व मंत्र या गोष्टी आता निश्चित स्वरूपाच्या झाल्या आहेत. त्याच पुन्हा निराळ्या शब्दांत मांडल्याने तो अेक लघुनिबंध कसा होअूं शकेल हे कळत नाहीं! अशाद्या गोष्टीची चर्चा ही प्रबंधांत शोभून दिसेल, लघुनिबंधात खास नव्हे.

या पुस्तकांत लेखनाकरिता निवडलेले विषय सर्वसामान्य असेच आहेत; पण त्यांच्या या सर्वसामान्यपणात लपलेलें त्याचें असामान्य स्वरूप लेखकाला क्वचितच दाखवितां आलें आहे. 'दिवाळी' या विषयावरला लघुनिबंध पाहा. त्याची माडणी अगदी परिचित अशा कल्पनांवरच केली आहे. सर्वांना सुखविणारें हें दिवाळीचें स्वरूप सर्वांच्या नित्य अनुभवाचेंच असल्याने तेंच वर्णन करण्यांत लेखकाने कोणतें वैशिष्ट्य साधलें ? 'रविवार' हाहि लघुनिबंध असाच रविवार म्हणजे सुटीचा– विश्रांतीचा– वार या कल्पनेभोवती गुंफला आहे. 'कोकणचे कातळ' हा वर्णनात्मक लघुनिबंध केवळ मार्मिकतेच्या अभावीं असाच नीरस वठला आहे.

पण सर्वेच निबंध असे नाहीत. 'अेक शोध' हा या संग्रहांतला अुत्कृष्ट निबंध आहे. नर्मदेंतला गणपति या लघुनिबंधांत आलेल्या कल्पना व विचार हृद्य आहेत; पण रचनादोपामुळे त्यांला सामान्य स्वरूप आलें आहे. 'चादोबा आणि चांदणे' यांत संस्कृत वाङ्मयातल्या आणखी कांही रुचिर कल्पनांची भर घातली असती तर या निबंधावर चादण्याची आणखी थोडी खुलावट पसरली असती. 'बैलगाडीचा प्रवास' हाहि अेक अुत्कृष्टतेच्या मार्गावरील लघु-निबंध होता, परंतु त्यांतील पाल्हाळामुळे व मार्मिकतेच्या अभावामुळे तो अलिकडच्याच टप्प्यावर

थांबलेला दिसतो. 'ट्रॅमगार्डी'त जें तत्त्व गोवण्याचा प्रयत्न केला आहे तें अत्यंत शिळें असल्याने त्या लघुनिबंधाला रंगच चढत नाही.

लेखकाच्या संस्कृत भाषेच्या व्यासंगामुळे भाषा भारदस्त झालेली आहे. पण तींत लघुनिबंधाला योग्य असा ढंगदारपणा यावयास पाहिजे तो नाही.

---

## ललित निबंध

**१ अतिप्रसंग**— ले० दत्तु बांदेकर, प्रका०— पु. रा. भिडे आणि कं.; पुणें २. मूल्य १ रु. २ आणे.

**२ हरि विनायक**— ले० हरि विनायक वाडेकर, प्रका०— वा. म. नेर्लेकर, बुधवार चौक, पुणें २; मूल्य १॥ रु.

**३ हंसरे हिरे**: (प्रातिनिधिक विनोदी कथासंग्रह) भाग १— संपा० व प्रका० श्री. रतनलाल डी शहा, रत्नाकर प्रकाशन, सांगली; मूल्य २ रु

**४ शालिनीचीं निवडक पत्रें**— (आवृत्ति तिसरी)— संपा० श्री. गो. ब. माकोडे, प्रका० श्री. के. भि. ढवळे, मुंबअी नं. ४, मूल्य १२ आणे.

**५ व्यक्तिचित्रें**— ले० प्रो. वि. ह. कुळकर्णी, प्रका० देशमुख आणि कंपनी, २६४ नारायण, पुणें २; मूल्य २ रु.

**६ प्रकाशांतील व्यक्ति**— ले० श्री. प्रभाकर पाध्ये, प्रका० श्री. ज. मा. महाजन, कॉन्टिनेन्टल् प्रकाशन १९६।१९, टिळक रोड, पुणें २; मूल्य १॥ रु.

श्री. कृ. कोल्हटकरानी आधुनिक गद्य विनोदाची प्रथा सुरू केली असें मानण्यांत येतें. विशेषतः भोवतालीं समाजात टीकार्ह अशा गोष्टी (व्यक्ति वा प्रसंग) दिसतील त्यांच्यावर अुपरोध, अुपहास, विडंबन अित्यादिद्वारा टीका करताना अेखादी काल्पनिक व्यक्ति निर्माण करून तिच्या जीवनकथेच्या आधारें प्रत्यक्ष प्रसंगावर हल्ला करण्याचा प्रघात सुरू झाला. सुदामा, पाडुतात्या, तिंबूनाना, बाळक्या, चिमणराव, दाजी अित्यादि मंडळी ही त्या पंथांतली आहेत. त्याच्या पुढची पायरी म्हणजे अुघड अुघड नावें घेअून टीकास्पद वस्तुस्थितींतील व्यंगें थोड्याशा अतिशयोक्तीने मांडणें ही होय. श्री. दत्तु बांदेकर याचा **अतिप्रसंग** किंवा श्री. हरि विनायक वाडेकर यांचा **हरि विनायक** हे संग्रह या पद्धतीच्या विडंबनात्मक टीकेचे नमुने आहेत. या दोन्ही लेखसंग्रहांतील लेख वृत्तपत्रव्यवसायाचीं साधनें म्हणून जन्मास आले आहेत. प्रतिपक्षावर परिणामकारक टीका करण्याची चिपळूणकरी पद्धति आणि चालू पद्धति यात मूलतः फारसें अंतर नसलें तरी ही पद्धति चिपळूणकरांच्या काळापेक्षा बरीच लोकप्रिय झाली आहे. या तऱ्हेच्या लेखनाविषयीची लोकप्रियता अितकी वाढल्यामुळे तिची परिणामशीलता कमी होणें अपरिहार्य आहे. श्री. बांदेकर यांच्यासारखीं लेखनकुशल माणसें या पंथांत शिरल्यामुळे वृत्तपत्राच्या खपाचें तें अेक आवश्यक अंग होअून बसलें आहे. अेका साप्ताहिकाला अशा लेखनाने चांगलाच हातभार लावल्याने प्रत्येक साप्ताहिकांत तो प्रयोग सुरू झाला. याबद्दलचें अुदाहरण द्यावयाचें झाल्यास प्रा. फडके यांनी 'झंकार'मध्ये कोपरखळ्या हें सदर बंद करण्याविषयी संपादकास जाहीर विनंति केली तरी संपादकांनी कोपरखळ्या नाही तर निदान 'भेळ' हें तरी सदर चालू करण्याचें जाहीर केलें आहेच! कोठे गुद्दे गुदगुल्या तर कोठे चर्चा-चिमटे, कोठे टाकाच्या फेकी तर कोठे नवटाकाच्या फेकी अशी सदरें सुरू झालीं आहेत. साप्ताहि-

कांत अेक अेक सख्याहरी असावयाचाच ! जाहिराती आणि अशीं सदरें हें साताहिकांचें जीवन होअूं पाहत आहे.

या विनोदपद्धतीचा अतिप्रसंगाच्या प्रस्तावनेंत श्री. चं. वि. बावडेकर यांनी सांगितल्याप्रमाणे समाजांतील दांभिकता कमी करण्याच्या कामीं बराच अुपयोग होतो हें खरें आहे; परंतु पुष्कळ प्रसंगीं अेक दांभिकता जाअून तेथे दुसरी दांभिकता किंवा सत्यप्रियतेच्या वशिल्याने बेजबाबदारपणा प्रस्थापित होअूं लागतो. अशा लेखनाची मागणी वाढत गेल्यामुळे आणि मागणी पुरविण्याअितके अस्सल विनोदी लेखक नसल्यामुळे कांही टारगटांनाहि या या बाजारांत भाव आला आहे. किंबहुना अस्सल विनोदी लेखकहि मागणीच्या मान्यामुळे त्या थरापर्यंत क्वचित् घसरतात.

अतिप्रसंग या संग्रहापुरतें पाहिल्यास त्यांतील लेख दांभिकपणाचें निराकरण करण्याच्या सामाजिक भूमिकेवरून लिहिलेले आणि कलासंपन्न शैलीने लिहिलेले आहेत असें म्हणतां येअील. श्री. बांदेकरांनी या पुस्तकास दिलेलें अतिप्रसंग हें नांव सख्या हरीस देणें जास्त योग्य दिसलें असतें.

आजकालचे गुन्हेगार या मालेंतील कांही गुन्हेगार त्या त्या वृत्तपत्रकचेरीच्या न्यायासनासमोर गुन्हेगार ठरले तरी आज बांदेकर ज्या कचेरींत आहेत तेथे ते गुन्हेगार ठरणार नाहीत ! वृत्तपत्रव्यवसायाचें व्यावहारिक साधन या नात्याने असल्या लेखनास कांही बाबतींत प्रचारकी (बाजारी !) व क्षणजीवी स्वरूप येतें तें असें !

श्री. बांदेकर यांना स्त्रियांचा व विशेषतः आधुनिक तरुण स्त्रियांच्या त्यांच्या दिखाअू पुरोगामित्वाबद्दल उपहास करण्याची कला बेमालुम साधली आहे. त्या कलेचा स्वैर-संचार या पुस्तकांत आहेच. परंतु दिखाअू पुरोगामित्वाविषयींचीं त्यांचीं विडंबनें हीं जेव्हा लैंगिक भावनांच्याच आसपास घुटमळूं लागतात त्या वेळीं लेखक स्वतःच आपल्या कलेशीं अतिप्रसंग करीत आहे असें वाटतें. एखादा प्रसंग रंगवतां रंगवतां अगदी ताज्या घडामोडींचा प्रसंगानुरूप उल्लेख करून त्यानी आपल्या लेखनास सत्याभासाची सुंदर झिलई दिली आहे.

आजकालचे गुन्हेगार या लेखमालेंत न्यायालयाच्या प्रसंगाने भिकारी, ड्रायव्हर, फेरीवाला, पतिता, बेकार, भोंदू बुवा, वेश्या यांची कोर्टापुढे कैफीयत सांगतांना समाजांतील कित्येक शिष्ट लोक आणि त्यांचे धंदे या आरोपींसारखेच आहेत हें प्रच्छन्न टीकेने दाखविलें आहे. हे कोर्टाचे देखावे बरेचसे एकजिनसी आहेत. त्यांच्या रचनेंत नावीन्य नाही. त्यांत कॉंग्रेस कार्यकर्त्यांवर कांही लोकापवादाच्या आधारें झोड उठविली आहे. नीरापान, उथळ वृत्तीच्या सेविका किंवा केशरिया, सूत, टकळी याचा आर्थिकदृष्ट्या फोलपणा, यांबरोबरच शेळीचें दूध, अित्यादि गोष्टींचाहि अुपहास केला आहे. विशेषतः कॉंग्रेसभक्त आणि सेविका यांचे संबध अनैतिक असतात ही श्री. बांदेकरांची फार आवडती कल्पना दिसते !

पक्षाभिवेशाने असें म्हणण्यापेक्षा मालकाचा पक्ष लढविण्याच्या हिरीरीने वर दिल्याप्रमाणे कांही टीका हेतुपुरस्सर, विकृत आणि अेकांगी असली तरी शुद्ध विनोदाचीं उदाहरणेंहि भरपूर आहेत. पानापानावर अशीं उदाहरणें सांपडतात. तंगी हें अेक मजेदार शब्दचित्र आहे. कानडी आणि पुन्हा मुकी अशा प्रियेचें प्रियाराधन व तिच्याशीं मूक चित्रपटाप्रमाणे चाललेल्या संसारांतील गंमती ही या शब्दचित्रांतील मजा आहे.

वयांत येतांना हें नाट्य प्रा. फडके यांच्या अैन पंचविशी या गोष्टीचें सुंदर विडंबन आहे असें थोडक्यांत म्हणतां येअील. त्यांत तिसरा प्रवेश चंपी व गंपू या वयांत आलेल्या

तरुणतरुणींच्या स्वगत निःशब्द संभाषणाने छान रंगवला आहे. चौथ्या प्रवेशांत गंपू व चंपू हीं पुन्हा आपापल्या संसारात तारुण्याच्या आठवणी स्वगतांतच बोलत आहेत! अैन पंचविशी ही गद्धेपंचविशी होती हें त्यांना तारुण्याचा बहर ओसरल्यावर कळलें. रेडिओंतून न सांगितलेली गोष्ट हें पुन्हा कॉंग्रेसच्या राजकारणावर विशेषतः कांही पुढाऱ्यांवर, फेकलेलें अुपहासाचें हत्यार आहे. त्यांत कुरुदवाडला झालेला पशुयज्ञ, पुणेकर फंडवाला, नटी, स्टोव्हकीर्त (of stove fame) कारोनर आठवले, लुंगी, नीरा, भालाकारविरचित द्रोण, चरखा आणि प्रेमभंग झालेल्या तरुणासाठी अफू अित्यादि गोष्टी अेका तडाख्यात मारलेल्या आहेत.

ब्रँडीची बाटली या संवादात त्या मूळ कथेवर प्रचारकी चित्रपटाचें ओझें चढविल्याच्या दोषावर टीका केली आहे, तर तीन वर्षांत दारूबंदी या संवादांत कॉंग्रेसच्या दारूबंदीच्या चळवळींतील उणीवा, भलता ध्येयवाद व प्रवर्तकाचें ढोंगी वर्तन यांजवर हल्ला लढविला आहे. कॉंग्रेसने योजिलेलें हिंदु-मुसलमान अैक्य ही दारूच्या धुंदींत सुचलेल्या कल्पनेसारखी गोष्ट आहे असें दोन दादांच्या दोस्तींत सांगितलें आहे. वर्गकलहाविरुद्ध ओरड करणारे वरिष्ठ वर्गांच्या खास सवलतीविषयी मत्सर बाळगीत असतात असें दाखविलें आहे, वर्ग या शब्दावर कोटीरूपाने रचलेलें रूपक यशस्वी रीतीने वठविलें आहे. पुराणात न सांगितलेल्या कथेंत नटीच्या सामाजिक इभ्रतींतील दांभिकपणा दाखविला आहे, आणि म्हैसूरचे महाराज आणि तुकाराम या नाट्यप्रवेशात चित्रपटांतील भूमिका यशस्वी झाली या जोरावर पागनीसांच्याविषयी समाजांत जी बुवाबाजी माजली आहे तिचें स्वरूप दाखविलें आहे! पागनीसांच्या पायांवर डोकें ठेवून वैकुंठाच्या फ्री पासाची आशा बाळगणारे बावळट देवभक्त, तुकाराम बोलपटानंतर बोकाळले होते. वशीकरणविद्या या कथेंत प्रेमात बनवाबनवी असते हें दाखविलें आहे. जगाचा प्रवास आणि फुटकें जहाज या नाट्यांत सुप्रसिद्ध नटींचीं वैशिष्ट्यें अचूकपणें चव्हाट्यावर आणलीं आहेत. लोकमान्यांनी पाठविलेला काकदूत यांत केसरीचें राजकारण, गांधी-वाद इत्यादि गोष्टींविषयी, कॉंग्रेसच्या राजवटींत झालेल्या कांही गफलती, इत्यादींवर प्रच्छन्न टीका केली आहे. राजकीय पंथ व व्यक्ति यांच्या व्यंगावर उखाणे रचून हा अतिप्रसंग संपला आहे. अतिप्रसंग वाचून संपल्यावर वाचकास दोन गोष्टी स्पष्टपणें दिसतात. एक श्री. बांदेकर यांची अभिजात विनोदबुद्धि आणि दुसरी त्या विनोदाचा केवळ वाङ्मयविलासाऐवजी प्रचारासाठी, राजकीय प्रचारासाठी, केलेला अस्थानीं उपयोग. या ग्रंथात विनोदविषय झालेले प्रसंग हे उघड उघड नैमित्तिक आहेत. त्यामुळे त्यांच्या आठवणींचा ताजेपणा नाहीसा झाल्यावर त्यावर उभारलेला विनोद अर्थशून्य ठरेल अशी साधार भीति वाटते.

अतिप्रसंगाचा प्रेमळ जुलूम सहन केल्यावर 'हरि विनायक' वाचूं लागलों तर विडंबनाचा प्रचारकी कार्यासाठी आणखी अेका गृहस्थाने अुपयोग केला आहे असें दिसतें. हरि विनायक हे विविधवृत्त तालमींतले तर श्री. बांदेकर चित्रा व्यायामशाळेंतले! दोघांचाहि व्यवसाय अेकच! तालमीच्या ब्रीदासाठी लढत राहणें. परंतु हरि विनायकांना अुस्ताद व्हावयास अद्याप बरीच मेहनत करावी लागेल असें दिसतें. विनोदकारास जी सूक्ष्म दृष्टि लागते ती त्यांना येअूं लागली आहे. बरेचसे प्रसंग लक्ष्यांत ठेवून त्यांच्यांत विसंगति अुत्पन्न करण्यासाठी जें रचनाकौशल्य लागतें तेंहि ते मिळवीत आहेत.

आरंभींचें भालाकार कॉलिंग हें अठरापानी प्रकरण लिहितांना त्यांनी भालाकारांच्या वैशिष्ट्यांचा, खुब्यांचा, लकबींचा अतिशय लक्षपूर्वक अभ्यास केलेला दिसतो. ते

भालाकारांशीं पूर्ण समरस झालेले आहेत. भालाकार स्वतः विनोदासाठी बोलत नाहीत, ते तळमळीने बोलतात आणि त्यांच्या भूमिकेशीं समरस होऊन दिलेलीं हीं व्याख्यानें वाचतांना विनोदाची जाणीव होत नाही. भालाकारांच्या विशिष्ट शब्दप्रयोगांनी ओुत्पन्न होओील तेवढाच विनोद ! समरसतेचें, वाङ्मयीन समाधीचें तें अेक अुत्कृष्ट अुदाहरण आहे. परंतु दांडीमार्चं या शब्दावर केलेली कोटी (पृ. ५ ओळ ३), पा. १५ वर ओळ २१-२२ मध्ये केलेला विनोद (!) (की जो अुद्धृत करणाराहि निर्लज्ज ठरेल !) पृ. १७ वर १७-१८ ओळींवरील वैयक्तिक विनोदाचा प्रकार हे हरि विनायकांच्या लेखणीस लांछनास्पद आहेत !

सरस्वतीच्या सिंहासनापुढे वाचतांना श्री. बांदेकरांच्या भंपक न्यायालयाची आठवण होते. सिंहासनापुढे आलेल्या सरस्वतीभक्तांच्या लकबी, वैशिष्ट्यें लेखकांस पुरेशीं माहीत आहेत, परंतु असलेल्या किंवा जमविलेल्या माहितीचा उपयोग करतांना हरिभाऊंचा कांहीं प्रसंगीं तोल सुटला आहे, आणि कांही ठिकाणीं माहितीच मुळात अळणी आहे त्यामुळे त्या माहितीवरील विनोद अगदी निर्जीव वाटतो. 'साहित्यिकाचें स्वयंवर' यांत सिंहासनापुढे मांडलेल्याच सामानाची दुसरी गौर रचली आहे. या दोन्ही लेखात श्री. अत्रे यांच्या शब्दचित्राइतकीं बाकीच्याचीं शब्दचित्रें वठलीं नाहीत. आचार्य अत्रे व भालाकार हे विषय हरिभाऊंचे बरेच तयार आहेत. विचारतरंग हा अेक लघुनिबंधसंग्रहच आहे. त्यांत धर्मांतरानंतरची बालगंधर्वाची मनःस्थिति दाखविणारा देवा हा निबंध आरंभीं दिला आहे. मधून मधून सहज विनोदहि साधला आहे. खोडलेली खुर्ची या विचित्र शीर्षकाखाली सुलभा या तरुणीनें प्रियकरास गंभीरपणें लिहिलेलें गंभीर पत्र आहे. भुतलेले तांदूळ, अहेर, ह्याला कारण, आयुष्याची किंमत ८ आणे, लग्नाची बेडी, असें कां ! चंदनाचें खोड, जनरल स्टोअर्स हीं अेक विचारशील, सत्प्रवृत्त आणि व्यवहारी जगाने सर्वस्वीं फसविलेल्या अशा माणसाच्या जीवनकथेचीं प्रकरणें आहेत. त्या आत्मवृत्तपद्धतीने व्यवहारी जगांतील कटु सत्यें, प्रसंगांच्या साहाय्याने विदारक स्वरूपात मांडलीं आहेत. हरिभाअू गंभीरहि होअूं शकतात अितकेंच नव्हे तर बराच वेळ त्यांचें गांभीर्य टिकूं शकतें हें विचारतरंगांत पाहिल्यावर तें गांभीर्य सोडून 'घसा साफ करून' ते पुन्हा अतिप्रसंग करूं लागलेले दिसतात. लंगोटबंदी वाचतांना ब्रह्मचारी मास्तर विनायकाची आठवण होते. पाळणेबाज हें, अत्यंत भिकार संसारांत गुंग होणाऱ्या 'गृहस्था'चें मनोरंजक शब्दचित्र आहे. 'कशाला अुद्याची बात' हें त्या पद्यपंक्तीवर केलेलें दीर्घ भाष्य शेवटीं शेवटीं चांगलेंच गंभीर झालें आहे. 'लुंगी नि कासोटा' हा लेख वाचतांना विचारतरंग लिहिणारा हरिभाअू अेकच आहेत काय असा प्रश्न पडतो !

हरिभाअूंची लेखणी बरीच बहुरूपी आहे खरी ! आधुनिक तरुणीच्या फॅशनचें विडंबन करतांना, त्यांच्या नाजुकपणांचा अुपहास करतांना हरिभाअू रंगून गेले आहेत आणि त्या टीकाविषय झालेल्या तरुणींच्याच गर्दीत ते गडप झाले आहेत. 'चष्म्याचे व्यापारी' हा पुन्हा अेक भल्यापैकी लघुनिबंध आहे. सुखी होण्यास 'दृष्टि' लागते या कल्पनेचा चांगला विस्तार केला आहे. नव्या व जुन्या शिक्षकांची तुलना करून शेवटीं दोघांतहि फरक असलाच तर डिग्रीपुरता असेल हें सोदाहरण दाखविलें आहे, परंतु या लेखाला शीर्षक गांवठी आणि सेफ्टी रेझर ! आणि उपमानें दोन नायकिणींचीं ! हीं गालबोटें लावून विनोदाचें मुख हरिभाअूंनी विनाकारण रंगवलें आहे. या सगळ्या थिल्लरपणाची भरपाअी "राम बोलो भाअी राम" या नादीने केली आहे !

लेखणीचीं व आपल्या प्रतिभेचीं विविध अंगें हरि विनायक यांनी या ग्रंथांत दाखविलीं आहेत, तें पाहून त्यांची देहयष्टि धष्टपुष्ट आहे हें पटतें. परंतु त्यांना सांगावेंसें वाटतें की,

नेहमीच अंगाला तांबडी माती लावून लंगोट कसून अगडबंब होऊन बसण्यापेक्षा थोड्याशा व्यवस्थित पेहेरावांत तुमची मूर्ति जास्त प्रभावी ठरेल. "शाबास हरिभाऊ" असें म्हणवून घेण्यापेक्षा तुमच्या आगमनाबरोबर "अरे, हरिभाऊ आले बरं का ! ते पाहा !" अशी कुजबूज वाचकांत सुरू व्हावी आणि असें अप्रत्यक्ष स्वागत व्हावें यांत खरी भलाऔ आहे. तुमचे दोस्त वि. मा. दी. यांना विचारा. ते हेंच सांगतील !

प्रातिनिधिक विनोदी कथासंग्रह या प्रातिनिधिक कथासंग्रहाचे संपादक स्वतः अेक नवोदित लेखक आहेत. आणि त्यानी स्वतः हौसेने प्रकाशनकार्यास सुरुवात केली आहे. हें सागण्याचें कारण हा विनोदी संग्रह काढताना त्याच्या अभिरुचीवर कोणतींहि व्यावहारिक बंधनें नव्हतीं. या दृष्टीने त्यानी केलेली विनोदी कथांची निवड ही अगदी शुद्ध वाङ्मयीन दृष्टीने केली असली पाहिजे. परंतु प्रत्यक्ष कथा वाचल्यावर याविषयी मन साशंक होतें. प्रसिद्ध लेखक कोणत्याहि दालनात सारखाच प्रसिद्ध असतो असा काही स्थूल सिद्धान्त त्याच्या मनात असावा. त्यामुळे त्यानी प्रा. फडके यानाहि विनोदी लेखक ठरवून अेक विनोद केला आहे. अनुक्रमणिका पाहिल्याबरोबर साहजिकच तंत्र-विशारद म्हणून वाचक प्रा. फडके याची गोष्ट वाचूं लागतो. तेथे त्याची निराशा होते. नंतर तो श्री. खाडेकर याची गोष्ट वाचतो. तेथे गोष्टीचे शीर्षक व कथानक याचे नाते त्यास शेवट-पर्यंत कळत नाही आणि शेवटीं लेखकाने लावलेलें नाते बादरायणपंथातले आहे हें पाहून वाचकास हसूं होतें ! प्रा. चिं. वि. जोशी याची गोष्ट आरंभींच दिली आहे. त्यांत आपल्या सर्कसबहाद्दर नवऱ्याचा, ताराबाअीचा नाद सुटण्यासाठी त्याच्यावर पहारा ठेवणारी त्याची पत्नी वाघुरड्याच्या भीतीने सर्कशीचा मुक्काम ज्या गावीं असतो त्या गावाहून निघून येते आणि नवऱ्यावर नजर ठेवण्याचें काम तिला सोडावें लागतें अशी कलाटणी दिली आहे. त्यांत विनोद असला तर तो वर्णनातील अतिशयोक्तींत आहे, कथानकाच्या रचनेंत नाही. आध्र मलमल या खाडेकराच्या गोष्टींत अेका मारामारींचें क्षुल्लक कारण गोष्टीच्या शेवटपर्यंत गुपित ठेवून विनोद करण्याचा प्रयत्न केला आहे. सार्वजनिक पैशाने तार करताना तार करणाऱ्याने स्वतःचें नाव तारेंत लिहिलें यावरून प्रचंड मारामारी झाली. गोष्टीचा ओघ चालू असता मुख्य कारण गुप्त ठेवल्याने तें अज्ञात आहे तोपर्यंत होणाऱ्या घडामोडी अतर्क्य, अद्‌भुत वाटाव्यात आणि तें कारण शेवटीं कळल्यावर सर्व आश्चर्य दूर व्हावें आणि 'अरे ! असं आहे होय ! किती चकलों आपण अितका वेळ !" असें वाचकास वाटावे यात विनोदाचा अुत्कर्ष होतो. तें कारण कळल्या-वर अितका वेळ वाटलेले अतर्क्य सुसंगत वाटते. प्रा.फडके याच्या भाल्याची शिकार म्हणजे प्रवासात भेटलेल्या तरुणीविषयी अेखाद्या बावळट तरुणाने केलेल्या अपेक्षांचें कंटाळवाणें वर्णन आहे. ती तरुणी त्या तरुणास मुद्दामच चुकीचें नाव व पत्ता देते. तेथे तो शोधावयास जातो आणि फसतो. त्या पत्त्यातील तरुणी अेक काळीकुळकुळीत बाअी निघते. तरुणास दुर्लभ वाट-णारी ती ती नव्हे. तो पळ काढतो आणि पळतां पळता पडल्यावर बेशुद्ध होतो. त्या स्थितींत त्याला गाडींत भेटलेल्या तरुणीच्याच घरीं नेमका तो— डॉक्टराच्या घरीं म्हणून— येतो आणि त्याचा मिलाप होतो. फसगत झाली तेथेच गोष्ट संपविण्याच्या अैवजी लेखकाने पुढला भाग जोडून विनोदी कथानकाचे विडंबन केलें आहे. श्री. ना. धों. ताम्हनकर याच्या आमच्याने बोलवत नाही या कथेत विनोदी कथेंतहि पचणार नाही अशी असंभवनीयता आहे. श्री. माडखोलकर याच्या मशिनगन या गोष्टींत जंगल सत्याग्रही 'टेलिस्कोप'ला मशिनगन समजून झालेला गोंधळ हा विनोदाचा मुख्य भाग आहे. परंतु गोष्टीचा शेवट मात्र विनोदावर विरजण

घालणारा आहे. शेवटचें पान वगळलें तर गोष्टीचा बाकीच्या भागांत विनोदाचा हळू हळू चित्तवेधक विकास झाला आहे. माझी आगगाडी कशी चुकली ही श्री. न. चिं. केळकर यांची प्रसिद्ध विनोदी लघुकथा या ग्रंथाच्या निमित्ताने पुन्हा अेकदा वाचावयास मिळते. त्या गोष्टीबद्दल ती पुन्हाहि वाचावीशी वाटते अेवढें सागितले कीं पुरे.

चौकशी कमिटी या कथेचे लेखक सुप्रसिद्ध विनोदी लेखक शामराव ओक आहेत. यशस्वी विनोदी कथेचे हें अुत्तम अुदाहरण आहे. अतर्क्य कलाटणीने विनोदास बहर आणण्याचें कौशल्य या कथेंत आहे. तसेच, प्रो. लक्ष्मणराव सरदेसाअी याची प्रेमवीराची शिकार श्री. शं. कृ. देवभक्त यांची तिची आकाक्षा श्री. स. अ. शुक्ल याची आदिपुरुष आणि श्री. द. वि. गुप्ते याची व्हिजिटिंग कार्ड या गोष्टींतहि तें कौशल्य वाचकास तात्रडतोब अनुभवास येतें.

या सहा गोष्टी हे या संग्रहाचे खरे हिरे आहेत. बाकीच्या कथा या हिऱ्याना कोंदणासारख्या वाटतात. श्री. शहा यांनी निवड करताना लेखकाच्या नावापेक्षा कथावर जास्त भर द्यावयास पाहिजे होता. कदाचित् 'विनामूल्य' या गरजेमुळे हा दोष पत्करावा लागला असेल. परंतु निदान यातील काही लेखकानी स्वतःला विनोदी म्हणवून घेतांना सावध असणे जरूर होते. केवळ वाङ्मयाच्या हौसेने प्रकाशनाचा व्यवसाय श्री. शहा यानी सुरू केला आहे असें ते प्रस्तावनेंत सांगतात. त्याना लाभलेल्या या सोयीबद्दल त्याचें अभिनंदन करून दुसरा भाग या पेक्षा जास्त कसोशीने काढावा अशी विनंती करणें जरुर आहे.

'शालिनीच्या निवडक पत्रा'ची शालिनी कोण याविषयींची जिज्ञासा या तिसऱ्या आवृत्तींतहि पूर्ण झाली नाही ! तेव्हा प्रत्यक्ष पत्रावरूनच शालिनीविषयी जी माहिती मिळते तेवढ्यावरच भागवावें लागणार. पहिल्याच पत्रावरून शालिनी ज्या वातावरणात वावरत आहे त्याची कल्पना येते. अेकत्र कुटुंबपद्धतीचा अलीकडे दुर्मिळ होत चाललेला नमुना या पत्रांत पाहावयास सापडतो. ज्या कुटुंबात 'वन्सं' आहेत, नववधूची तिच्या वैवाहिक जीवनाच्या सुरुवातीस पतिसहवासाविषयी दिसणारी अुत्सुकता हा ज्या कुटुंबात अितराना मोठ्या गोड थट्टेचा विषय होतो आणि त्या थट्टेला भिअून दिवसा 'तिकडे' अगदी फिरकायचेंसुद्धा नाही असा कानाला खडा लावणारी वधू ज्या कुटुंबांत असते, सासरच्या माणसाचें मन संभाळणेंहि ज्या नववधूस परीक्षा वाटते व ती यशस्वी रीतीने पार पाडण्याचा अुत्साह जिच्यामध्ये आहे, शालू हा जिचा साज आहे, चैत्र महिना हा जिचा प्रिय महिना आहे, अशी वधू त्या कुटुंबात आहे. त्या कुटुंबात गौरीपूजन सार्वजनिक गणपति अुत्सवाच्या थाटाने होतें. बिंदी, बिजवरा, कंबरपट्टा हे त्या कुटुंबांतील अलंकार आहेत. नाव घेणं ही ज्याना खूप मौज वाटते, आणि आपल्या पत्नीला नाव घ्यावयास लावणें हा ज्या पतींचा शृंगारोत्कर्ष आहे असें हें कुटुंब आहे. अशा कुटुंबात आणि वातावरणात वाढणाऱ्या शालिनीचें मन तरी तसेंच असणार ! पतिप्रेमाची तिने गायिलेली महति (पृ. ११ पाहा) "ज्याची स्वप्नांतहि कसलीहि ओळख नाही त्याच्या ठिकाणीं पवित्र प्रेमाचा प्रवाह मोकळा करून त्याला सर्वस्वीं आपलें करून टाकणें यापेक्षा अधिक अुदात्त काय बरें असेल !"

या अेकत्र कुटुंबांत शालिनीसारखीं माणसें मात्र फार थोडीं ! अेकत्र कुटुंबाचे व्यवहार म्हणजे राजकारण आहे. अेक संस्थानच आहे तें. त्यांतील माणसें अेकमेकाकडे ओढलीं आणि जोडलीं जातात तीं केवळ पैशाच्या देवघेवीमुळे ! ज्याला त्याला आपल्याला मिळावयाच्या

मानपानाची बरोबर आठवण असते. 'करणींत जर अगत्य नाही तर नुसत्या वाणींत त्या अगत्याला करायचं तरी काय ?' (पृ. २०) असा प्रत्येकांचा दंडक ! अेखाद्या कार्यासाठी या नातलगाना येण्याजाण्यास भाड्याचे पैसे पाठवावे लागतात. परंतु पैसे पाठविले, मानपानाची योग्य व्यवस्था केली कीं मग १००।१५० नातलग सहज जमतात. शालिनीला या सासरच्या मंडळींची तब्येत संभाळतांना नेहमी सावध राहावें लागे. आपल्या आअीचें लुगडें सासूबाअींच्या लुगड्यापेक्षा भारी असतां कामा नये येथपर्यंत ती दक्षता बाळगते !

शालिनीच्या पत्रांतील पहिल्या नअू-दहा पत्रात स्वतःच्या कुटुंबाचें वर्णन आहे. त्यापुढची पत्रें लिहिणारी शालिनी अेकदम निराळी वाटते. खरें सांगावयाचें म्हणजे ती शालिनी वाटत नाही. पुढील पत्रात तिने ज्या मोठमोठ्या गंभीर विषयाची चर्चा केली आहे तीं पत्रें नसून व्याख्यानें आहेत. 'होमरूल' या विषयावर लिहिलेल्या पत्र नं. १० मध्ये अमेरिकन वॅार ऑफ अिंडिपेन्डन्स, रिपब्लिकन फॉर्म ऑफ गव्हर्नमेंट, मिल, डिमॉस्थेनिस, पिट, बर्क, सायन्स ऑफ पॉलिटिक्स अित्यादि नावें आहेत. पत्र नं. २१ मध्ये रँ. पराजपे यांनी गणितशास्त्राचा अभ्यास सोडल्याबद्दल चर्चा करताना टिळकाबद्दलहि शालिनीने आपलें मत दिले आहे. वराहमिहिर, ब्रह्मगुप्त याची तिला माहिती आहे. कॅलक्यूलसवर टिळक अेक पुस्तक लिहिणार होते हे तिला माहीत आहे. आणि टिळकांनी गणिताकडेच लक्ष्य लावलें असतें तर त्यानी केलेल्या कोणत्याहि कामापेक्षा तें काम जास्त मोलाचें ठरलें असतें असें तिचें मत आहे ! पत्र नं. २२ मध्ये चंपूताअीना हुंडणावळीची माहिती सांगून सोळा पेन्स अित्यादि विषयांची गंभीर चर्चा आहे. पत्र नं. २३ मध्ये हिमालयारोहणाच्या हकीगतीवरून स्वराज्याखेरीज पराक्रमास वाव नाही हे पटविलें आहे. मग टिळकानी तेंच कार्य केलें यांत वाअीट काय झालें ? गणितशास्त्र आणि स्वराज्य यात तूर्त पण ताबडतोब स्वराज्यच त्यांना आवश्यक वाटलें यात वाअीट वाटण्यासारखे काय आहे ? पत्र नं. २४ त डॉ. केतकराच्या जीवनकार्यावर लिहिलेला अत्यंत सुंदर लेख आहे. त्यात गोडबोल्याचा कोश, मोल्सवर्थ, कॅंडी, शब्दरत्नाकर, फार्शी-मराठी कोश, सरस्वती कोश, प्राचीन महाराष्ट्र अित्यादि ग्रंथ माहीत असल्याचें शालिनी सागते. आणि केतकराची विवंचना आणि दगदग कमी करून त्यांचें आयुष्य वाढविणें हे महाराष्ट्राचें कर्तव्य होते असा मोटा मोलाचा विचार शेवटीं व्यक्त केला आहे ! या पत्रातील मजकुरावरून ही पत्रे तर नाहीतच परंतु लेखिका स्त्री, निदान आरंभींचीं पत्रें लिहिणारी शालिनी, नव्हे हें सामान्य वाचकहि ओळखील !

शालिनी आरंभींच्या पत्रात जुन्या जमान्याबद्दल ओढ दाखवीत असली आणि ते दिवस, ती पिढी, गेल्याबद्दल मधूनमधून हळहळत असली तरी तिचे विचार प्रगल्भ आहेत. शिक्षण व संस्कृति हीं अेकत्र असावींत असें तिने सांगितलें आहे. परंतु शिक्षणाबरोबर संस्कृति वाढली नाही तर मात्र त्या 'सफ्रेजेटा'पेक्षा पूर्वींच्या बायका बऱ्या असें तिचें मत आहे. शिक्षणाचा सदुपयोग विशेषतः स्त्रियाच्या जीविताचें त्यामुळे होणारें संरक्षण व विकास याचें अुत्कृष्ट अुदाहरण म्हणून पत्र नं. १५ मधील विनतेची गोष्ट वाचण्यासारखी आहे. जुन्या पिढींतील अेक संग्राह्य व्यक्ति म्हणजे पत्र नं. १३ श्री. सरमंडळ. जुन्या व नव्यांचा विचित्र संयोग म्हणजे पत्र नं. १४ मधील नादान आअी व सालस मुलगी रंगूताअी ! हीं तीन पत्रें मानवी स्वभावाचे नमुने या दृष्टीने अतिशय अुद्बोधक आहेत, आणि तीं वाचल्यावर शालिनीबाअीस अशी विनंती करावीशी वाटते की, हुंडणावळी, रँ. परांजपे यांनी काय करावें, स्वराज्य व पर-राज्य यांतील फरक अित्यादि गोष्टींपेक्षा आपण जागरूकपणें पाहिलेल्या व्यक्ति आणि कुटुंबें

यांचीं शब्दचित्रें जास्त अुपयुक्त ठरतील. तुमच्याभोवती असलेल्या, माअी, चंपूताअी, वहिनी, भावोजी याना आपण पत्रें लिहिलींत तर तीं जास्त जिव्हाळ्याचीं वाटतील; कारण आपण सूक्ष्म दृष्टि, विवेचक बुद्धि, अतिशय घरगुती, चित्तवेधक मर्मग्राही भाषा यानी अशीं पत्रें किंवा लेख अतिशय परिणामकारक करूं शकतात हें या पत्रावरून दिसत आहे. आपण वत्सलावहिनी होण्यापेक्षा शालिनी होणें जास्त बरें असे आपल्या लेखनप्रकृतीवरून वाटते.

प्रकाशातील व्यक्ति आणि व्यक्तिचित्रें हीं दोन पुस्तकें अनेक दृष्टींनी अुद्बोधक आहेत. लौकिकात सर्वश्रुत झालेल्या व्यक्तींच्या 'जीवना'विषयी साहजिकच अमर्याद अुत्सुकता सर्वांच्या ठिकाणीं असते. फार काय, अेका सर्वश्रुत व्यक्तीलाहि दुसऱ्या सर्वश्रुत व्यक्तीच्या जीवनाविषयी अितकीच अुत्कट अुत्सुकता असेल असें वाटतें. कारण स्वतः अेखाद्या चरित्रग्रंथाचा विषय होण्याअितकीं मोठीं माणसें आपल्यासारख्याच दुसऱ्या व्यक्तीच्या जीवनाची अुत्सुकतेने माहिती जमवून त्याचीं चरित्रें लिहितात अशीं अुदाहरणें आपण पाहतों. चार लोकांबरोबर जगत राहून कांही काळानंतर त्या चार लोकाचीं मने आकर्षित करणाऱ्या माणसाच्या जीवनाची घडण कशी झाली असेल, त्याच्या लौकिक जीवनाच्या मागे त्याचें वैयक्तिक जीवन कसें असेल, त्या वैयक्तिक जीवनात तो कितीसा अलौकिक आहे अित्यादि गोष्टी कळण्याची ही अुत्सुकता असते. या अुत्सुकतेचे स्वरूप अगदी नेमकें ओळखून वाचकास जें पाहिजे तें नेमकें देण्याचें कौशल्य असलेले व्यक्तिचित्रकार चरित्रलेखकापेक्षाहि वाचकास प्रिय होतात. अे. जी. गार्डीनर यांनी लिहिलेलीं व्यक्तिचित्रें (त्या त्या व्यक्तींची खंडोगणती माहिती आधी प्रसिद्ध झाली असूनहि) लोकप्रिय झालीं. त्या प्रातात गार्डीनरने अितकी कीर्ति मिळविली की, गार्डीनर हें त्या वाङ्मयप्रांतात अुपमान झाले आहे. मराठींत असे गार्डीनर आहेत ही अभिमानाने नमूद करण्यासारखी गोष्ट आहे. प्रतिभा पाक्षिकात आलेली व्यक्तिचित्रें या पद्धतीचीं होतीं. विविधवृत्तातील 'अंतर्भेदी' यानी लिहिलेलीं व्यक्तिचित्रें या दृष्टीने अुल्लेखनीय आहेत. त्यानंतर हा प्रकार बराच रूढ होअूं लागला. मुलाखतींच्या द्वारा याच वाङ्मयप्रकाराची अप्रत्यक्ष वाढ होत आहे. परंतु मुलाखतीत व्यक्तिचित्राचा जिव्हाळा कधीच येत नाही. ती व्यक्ति व वाचक यांमध्ये तो 'मुलाखतवाला' पहारा करीत बसलेला असतो. या तात्रिक अडचणीमुळे त्या व्यक्तीची व आपली जिव्हाळ्याची भेट होत नाही. अगदी अलीकडे (सदरहू दोन ग्रंथांखेरीज) अशा जिव्हाळ्याने लिहिलेलीं कांही व्यक्तिचित्रे अुदाहरणार्थ प्रा. वि. बा. आंबेकर यानीं ज्योत्स्नेंत लिहिलेलीं व वाङ्मयशोभा मासिकात श्री निरंतर यानी लिहिलेलीं व्यक्तिचित्रें. त्यात वरील व्यक्तींच्या लौकिकजीवनाच्या मागील वैयक्तिक जीवनाची पार्श्वभूमि जाणण्याचा अत्यंत कसोशीने प्रयत्न केला आहे. प्रतिभा पाक्षिकातील किती तरी व्यक्तिचित्रें धुळींत पडून आहेत ! त्यांतील लेखक आता आपापलीं (आपण लिहिलेलीं) चित्रें गोळा करूं लागले आहेत ही फार आनंदाची गोष्ट आहे.

सदरहु दोन चित्रसंग्रह हे व्यक्तिचित्राच्या दालनात फार चागली भर घालणारे आहेत; तरीसुद्धा आरंभीं सागितलेली वाचकाची अपेक्षा या चित्रानी सर्वथैव पूर्ण होत नाही. कदाचित् या दोन लेखकांच्या दृष्टिकोनाचा हा फरक असेल. परंतु स्थूलमानाने असें म्हणता येअील की, या ग्रंथांतील व्यक्तींच्या जीवनाविषयी असणारी अुत्सुकता पूर्ण करणे हा या लेखकाचा हेतु नसावा. असल्यास तो पार पडला नाहीं.

प्रथम प्रकाशांतील व्यक्ति हेंच पुस्तक पाहा. त्या पुस्तकास व्यक्तिचित्राचे लेखक प्रा. वि. ह. कुळकर्णी यांनी प्रस्तावना लिहिली आहे श्री. प्रभाकर पाध्ये यानी व्यक्तिचित्रास

प्रस्तावना लिहिली असती तर फार चांगला योग आला असता ! प्रस्तावनाकार लेखकाविषयी सांगतात की, "कोणत्याहि विषयाची अैतिहासिक छाननी करून तदनुषंगिक विचारपरंपरेची संगति लावणें हें श्री. पाध्यांच्या लिखाणाचें अेक अनन्यसाधारण वैशिष्ट्य आहे." आणि श्री. पाध्ये याच्या ग्रंथांत व्यक्तिचित्रास लागणारा जिव्हाळा नसण्याचें नेमकें हेंच कारण आहे. 'ते' वैशिष्ट्य हें या प्रकारच्या लेखनास मारक ठरलें आहे. त्यानी रंगविलेलें पहिलेंच गांधींचें चरित्र पाहा. त्या व्यक्तिचित्रांत लेखकाचा प्रचारकी दृष्टिकोन फार जबर असल्याने तें चित्र अत्यंत अुग्र झालें आहे. गांधी महात्मा कीं मुत्सद्दी या विषयावरच तो अेखाद्या साप्ताहिकांत दणदणीत टरणारा प्रचारकी लेख आहे, ते व्यक्तिचित्र नव्हे ! मी शेगावला काय काय पहिलें ? या श्री. माडखोलकर याच्या लेखाचा श्री. पाध्ये यानी (पृ. ९ वर) हवाला दिला आहे त्यावरून तर वरील विधानास पुष्टीच मिळते आणि शेवटीं माणुसकी हें समाजरचनेचें आद्य तत्त्व आहे अशी धिटाअीने (?) घोषणा करणाऱ्या लेखकांत, अैतिहासिक दृष्टिकोनाच्या वेडाने माणुसकीचे हाल होत आहेत कीं काय अशी हळहळ वाटूं लागते. लिऑं ट्रॉट्स्कीचें ते अनन्य भक्त आहेत; परंतु गांधींना विरोध हा जमा प्रचारकी हेतु व्यक्तिचित्रास मारक झाला तशीच ही, अनन्य भक्ति, ट्रॉट्स्कीच्या चित्रात ते चित्र आवेशपूर्ण करण्यास अुपयोगी पडली. परंतु आपल्या वैयक्तिक भक्तीच्या आवेशापेक्षा ट्रॉट्स्कीच्या चरित्रातील अेक हृदयंगम हकीकत दिली आहे (पृ. २३) तशा दृष्टीने हें चित्र रंगीवलें असतें तर स्टॅलिनलासुद्धा तें व्यक्तिचित्र माणुसकीच्या भूमिकेवर आवडलें असतें ! कारण व्यक्तिचित्रात ती दृष्टि व तसे प्रसंग लागतात. डॉ. आंबेडकरांच्या व्यक्तिचित्रातहि लेखक गांधीविषयीचा संताप विसरूं शकत नाहीत. तरी त्या पार्श्वभूमीवर का होअीना तें व्यक्तिचित्र जिव्हाळ्याने बऱ्याच ठिकाणीं हृदयंगम झालें आहे. लोकनायक अणे यांच्या लोकनायकत्वाचें यशोमापन काटेतोलपणें केलें आहे, आणि त्या व्यक्तिचित्रात अर्धस्फुट असलेला श्री. केळकर यांच्याविषयीचा तिरस्कार श्री. न. चिं. केळकर यांच्या शब्दचित्रात भडकला आहे ! जी. के. चेस्टरटन यांना लेखकाने भूतकालात जन्मलेला आणि वर्तमानकाळात अुलटा झालेला पिरॅमिड ठरविलें आहे. प्रस्तावनालेखकानें श्री. पाध्ये यांचा जो विशेष मागितला आहे तो लक्ष्यांत घेतला म्हणजे या पिरॅमिडजवळ श्री. पाध्ये '१० पानें' तरी थाबले हेंच विशेष होय. तें व्यक्तिचित्र रेखाटतांना कागदाखाली शॉचेंहि व्यक्तिचित्र अुठले आहे. प्रा. वा. म. जोशी यांच्या चित्रारंभीं श्री. पाध्ये यांनी केलेला खुलासा फार महत्त्वाचा आहे. ते म्हणतात: "मला त्यांचे गुण आवडतात त्या गुणांपुरती मी मनसोक्त स्तुति करतों. ...... त्याच्याबद्दल स्तुतीचे आत्यंतिक अुद्गार काढण्याची मला सवय आहे ...... माझी कोणावर आंधळी श्रद्धा जडेल असें मला वाटत नाही." या खुलाशाच्या मदतीने हा ग्रंथ वाचला की, मग यांतील मजकूर व्यक्तिचित्रांचा कां नाही हे आपणास कळेल. पण प्रस्तावनाकार अैतिहासिक दृष्टि म्हणतात ती कोणती ? ती आपणांस या ग्रंथांत कळली नाही तरी चालेल. आणि हा ग्रंथ 'व्यक्तिचित्रें' ठरला नाही तरी हरकत नाही. या ग्रंथांतले खरे वैशिष्ट्य श्री. पाध्ये याच्यावरील खुलाशाच्या दृष्टीने ग्रंथ वाचल्यास कळेल. गुण आणि (दोषहि) याविषयीची त्यांची आत्यंतिक वृत्ति या ग्रंथांत सर्वत्र वावरत असल्याने आणि त्यांच्या अत्यंत प्रशंसनीय (हें विधान आत्यंतिक नाही !) मनमोकळेपणाची त्या वृत्तीस जोड मिळाल्याने या ग्रंथांतील धडाडी आपणांस अतिशय आनंददायी होअील यांत शंका नाही. प्रा. वा. म. जोशी यांच्या संशयवादाचें त्यांनी केलेलें विवेचन अतिशय मार्मिक आहे. श्री. पाध्ये यांना अितकें मार्मिक लिहिण्याचीहि सवय आहे हें पाहून किती

आनंद वाटतो आणि प्रा. फडके यांच्याविषयी आता ते काय लिहतील हें पाहण्यासाठी आपण अुत्सुक होणारच ! आरंभींच काय बेफाम विवेचन आहे. कलेचा हेतु आनंद : जीवन ही कला आहे : म्हणून जीवनाचाहि हेतु आनंद हें प्रा. फडके यांचें जीवनकलासूत्र श्री. पाध्ये यांनी सांगितलें आहे. किती अचूक ! किती बरोबर !! आणि किती खुबीदार कारण संदिग्ध !!! आनंद या शब्दावर ही कोटी तर नाही ना? नामाने समता चुन्यास अमृता येअील कैशी परी, या ओळीची येथे आठवण होते. प्रा. वाडेकर यांचा या चित्रांत अुल्लेख आहे. म्हणून आम्ही वाचकांस असें सुचवितों की, प्रा. वाडेकर यांनी प्रा. फडके यांचें प्रतिभेत लिहिलेलें शब्दचित्र या शब्दचित्राच्या शेजारीं ठेवावें (त्या शब्दचित्राच्या आरंभीं Philosophy is smoke हे प्रा. फडके यांचे अुद्‌गार दिले आहेत) म्हणजे श्री. पाध्ये यांची संदिग्धतेंतील खुबी लक्ष्यांत येअील. लहरीच्या आहारीं जाण्याची सवय आहे ही ! श्री. पाध्ये यांनी प्रा. फडके यांच्या सिगारेटच्या धुराबरोबर निघालेल्या त्या नादान वाक्याचें समर्थन करावयाचें ठरविलें ! बस्स ! त्यासाठी त्यांनी तत्त्वज्ञानाचीच रेवडी अुडविली. प्रा. फडके यांचें हें बंड आहे म्हणे ! शास्त्रीय दृष्टीचें (?) आधुनिक बंड आहे हें असेंहि श्री. पाध्ये म्हणतात ! आणि शेवटीं ( पृ. ९२ वर ) वर्णिलेली प्रा. फडके यांची कलाटणी आणि अेका सुरेख, सुंदर नाजूक जीवाला कलाटणी देणारी ती चांडाळीण– दुष्ट– राक्षसी–परिस्थिति–परिस्थिति !! ती परिस्थिति प्रा. फडक्यांची बौद्धिक दरकारी विकृत तर करणार नाही ना अशी शेवटीं श्री. पाध्ये यांनी काळजी व्यक्त केली आहे. तशी काळजी करण्यासारखें कांही झालें आहे का याचा आपण सावकाश विचार करूं. पुढील पानावर रॉयसाहेब वाट पाहत आहेत आणि श्री. पाध्ये यांच्या लेखणीचा अत्यंत मनोरम विलास या व्यक्तिचित्रांत पाहून त्यांच्यावर आपला जास्तच लोभ जडेल. त्यांचें भावना-प्रधान अंतःकरण, आपला लहरी स्वभाव विसरून रॉयच्या जीवनाशीं समरस (ट्राटस्कीच्या जीवनाशीं झालें त्यापेक्षाहि जास्त अुत्कटतेने) झालेलें दिसतें. विभावरी शिरूरकर हें यापुढील व्यक्तिचित्र हा फार सुरेख कल्पनाविलास आहे. त्या चित्रावरील कल्पनेचा पडदा अितका तलम विणण्यांत श्री. पाध्ये यांनी फारच बहार केली आहे. विभावरी वाङ्‌मयाचा अुगम श्री. पाध्ये यांनी शोधला आहे. त्यांत त्यांची वाङ्‌मयीन महात्मता दिसून येते. ज. र. आजगावकरांच्या व्यक्तिचित्रांत पूर्वार्धांत त्यांचें सामर्थ्य फुलवून दाखवून तें भाविकवृत्तीने पछाडलेलें आहे या अुत्तरार्धाने अगदी वाङ्‌मयांतील आदर्श कलाटणी कशी असावी याचें जणूं अुदाहरणच दाखवलें आहे. परंतु त्यांना exhibit in the Museum of Marathi Literature असें म्हणतांना त्यांच्या आदरातिथ्यशील स्वभावाची कृतज्ञपणें नोंद करावयास श्री. पाध्ये विसरले नाहीत. परंतु ती नोंद तपासतां तपासतां वक्तृत्वकलाकुशल आजगांवकर मागील वाक्य तसेंच जाअूं देणार नाहीत असें वाटतें. ते ताडकन् अुत्तर देतील "त्या म्युझियममध्ये माझ्याभोवती जीं exhibits आहेत, त्यांच्या सहवासांत राहणें हें अद्याप तर मानाचें लक्षण आहे ना? मग असूं द्या मी त्या म्युझियममध्ये !"

या व्यक्तिचित्रसंग्रहांत अेका गृहस्थाचें चित्र पाहून हें चित्रदर्शन पुरें होअील. ते गृहस्थ म्हणजे झेड्. अे. बुखारी. म्हणजे आपले ऑल अिंडिया रेडिओ स्टेशन डिरेक्टर ! तेंहि व्यक्ति-चित्र वाचण्यासारखें आहे. परंतु त्यासाठी दालन बदलावें लागतें हें मात्र लक्ष्यांत ठेवलें पाहिजे.

वि. ह. कुळकर्णी यांच्या व्यक्तिचित्रसंग्रहांत श्री. पाध्ये याची धडाडी, आत्यंतिकता, अैतिहासिक दृष्टि यांपेक्षा अगदीच निराळे गुण दिसतील. त्यांनी अुघड अुघड सगळे 'साहेब' लोक निवडले आहेत. त्यांनी आपल्या पुस्तकाची प्रस्तावना शेवटीं छापली आहे. परंतु वाच-

कानी स्वतःच्या सोओीसाठी ती आधी वाचावी. म्हणजे त्यांना पहिला महत्त्वाचा खुलासा असा मिळेल की, हे सर्व लेख अगदी शुद्ध प्रासंगिक कारणानी लिहिले आहेत. निरनिराळ्या वेळीं काही व्यक्तींचीं नांवें कांही प्रसंगाने गर्जू लागतात आणि त्या वेळीं वाचकवर्गात अुत्पन्न झालेल्या अेक प्रकारच्या वृत्तपत्रीय अुत्सुकतेचें समाधान करणें हें वृत्तपत्रांचें कर्तव्य असतें. त्या कर्तव्य-बुद्धीने प्रा. कुळकर्णी यानी हे लेख लिहिले आहेत. त्यांना त्याच्या आवडत्या व्यक्ति निवडावयास सांगितल्या तर त्या याच असतील असें म्हणतां येणार नाही. या भूमिकेमुळे या व्यक्ति-चित्रांत अंतःकरणापेक्षा बुद्धीला संतोष वाटणे जास्त साहजिक आहे. प्रत्येक व्यक्तीविषयी काळजीपूर्वक माहिती मिळवून नंतर हीं चित्रें लिहिलीं आहेत. माहितीचें समाधान होओीपर्यंत लेखक लिहावयास बसले नाहीत, आणि हा ग्रंथ वाचल्याबरोबर वाचकहि अशी मनमोकळे-पणाने कबुली देतील की, भरपूर माहिती मिळाली; समाधान झालें.

पण कशाची माहिती ? या व्यक्तींच्या वैयक्तिक जीवनाची कीं लौकिक कार्याची ? लेखक सागतील लौकिक हेतूनेच जें लिहिले त्यांत लौकिक कार्याचीच माहिती मिळणार, आणि हेंच खरें आहे. श्री. पाध्ये व प्रा. कुळकर्णी यानी चेस्टरटनवर लिहिलें आहे तीं दोन्ही व्यक्ति-चित्रे अेकत्र वाचावीत. आपणांस असा अनुभव येअील अेकाच व्यक्तीचें अेक रेखाचित्र व दुसरें तैलचित्र आहे. प्रा. कुळकर्णी यानी चेस्टरटन याचा पिरॅमिड अुलटा अुभा केला नाही, त्यामुळे आपणांस तो निर्धास्तपणें मनसोक्त पाहता येतो. या चित्राच्या शेवटीं चेस्टरटन यांच्या दर्शनी तऱ्हेवाअीक दिसणाऱ्या विचारांची मीमासा केली आहे ती अतिशय विचारणीय आहे. क्रांतीचा जोर समाजास सुसह्य व्हावा यासाठी ते क्रांतिअश्वाचा लगाम मधून मधून खेचून धरीत असत अशी तीं विचारणीय मीमासा आहे. येथे शॉ व चेस्टरटन यांच्यातील विरोधाचा पुष्कळसा अर्थ आपणांस कळेल. बेनेटवरील लेखांत वाङ्मयापेक्षा व्यक्तित्वाचा परिचय करून देण्याचा प्रयत्न केला आहे असें लेखक खुलाशात म्हणतात, परंतु हा लेख वाचल्यावर लेखकाने दोन्ही कामें केलीं आहेत असें आपणास वाटेल. परंतु हें मात्र लक्ष्यांत ठेवलें पाहिजे की, Old Wives' Tale सारखी कादंबरी लिहिणारे बेनेट ते हेच. म्हणजे हा गृहस्थ अगदीच यंत्र नाही, चागला मोठा माणूसहि आहे, याची आपणास त्या ग्रंथाने आठवण राहील. गॉर्कीच्या व्यक्ति-चित्रांत त्याची टॉलस्टायबरोबर तुलना करताना टॉलस्टायविषयी लेखकाने केलेलीं विधानें, तुलनेंतून जो अर्थ अपेक्षित आहे त्या अर्थाने, फारच निसरडीं आहेत. त्यामुळे टॉलस्टायविषयी गैरसमज व त्याला अुपमान करून मोजलेल्या गॉर्कीविषयी भलत्या कल्पना अुत्पन्न होतात. लेनिन व गॉर्की याच्या विरोधाचें स्वरूपहि असेंच अनैतिहासिक वाटतें. प्रा. कुळकर्णी याचें स्वतःचें मत काय असावें हा प्रश्न नाही. त्यांनी तें विस्ताराने सांगणें जरूर होतें. गॉर्कीचा "भूत-दयाप्रेरित विशिष्ट ध्येयवाद" व टॉलस्टायने "दलितवर्गाच्या सुखदुःखांची त्यानी फक्त हळव्या अंतःकरणाने केलेली चिकित्सा" यांतील अंतर (जें प्रा. कुळकर्णी यास वाटतें) तें, वाचकांस अुमगत नाही. लेनिनने लोकांच्या राजकीय हक्कांवर व मतस्वातंत्र्यावर वरवंटा फिरविला या वाक्याने गॉर्कीच्या प्रतिक्रियेला अुठाव आला तरी त्या वाक्यानेच वाचक गोंधळतो त्याची वाट काय ? वाङ्मय हें साधन आहे. तलवार या साधनाच्या अभावीं तें वापरावयाचें. खरे साधन तल-वारच ही गॉर्कीची लढाअू वृत्ति प्रत्यक्ष त्याच्या जीवनांत कशी व्यक्त झाली हें कळण्याची अुत्सुकता या व्यक्तिचित्रांत पूर्ण कां होअू नये ? कॉनन डॉयल याच्या गुप्तपोलीसाविषयीच्या कादंबऱ्यांमुळे त्यांच्या व्यक्तिचित्राविषयी साहजिकच अुत्सुकता वाटणार आणि त्या कादंबऱ्यांना वाङ्मयांत स्वतंत्र स्थान मिळवून देणारा लेखक किती विविध जीवनक्षेत्रांशीं परिचित व त्या विविधतेचा सक्ष्म अभ्यास आहे हें आपणांस कळतें. पण त्यांच्या परलोकविद्याव्यासंगाविषयी जरा विस्तार

केला असतां तर त्यांच्या जीवनाची आणखी अेक अद्‌भुत बाजू कळली असती. आणि नंतर ज्या व्यक्तिचित्रांबद्दल प्रा. कुळकर्णी याच्या मित्रांना वाअीट वाटलें तें ग्रीटा गार्बोचें व्यक्तिचित्र ! आपणांसहि प्रा. कुळकर्णी यांच्या मित्रासारखेंच वाटेल की, लेखक या नात्याने हा अधःपात आहे. परंतु फक्त पहिलीं तीन पानें ! हे राणी हे वनदेवते ! हे अुर्वशी ! हे तारके—आणि काय वाटेल तें हें !— या स्तोत्रपद्धतीचा अवलंब करण्यात प्रा. कुळकर्णी यानी खरोखरच आपल्या लेखणीला कमीपणा आणला आहे. त्या भाषणात अतिशयोक्ति बिलकुल नाही असें ते म्हणतात (पा. ८३). तेंहि मान्य. परंतु वाटणें आणि वाटलेलें सांगणें यात फरक आहे ना ! आणि 'यात मुळीच अतिशयोक्ति नाही ?' हें म्हटल्यावरहि कोणीहि माणूस असें म्हणणारच की, अतिशयोक्ति नसली, अगदी सत्य असलें तरी अुगाच 'वाटेल' तें (म्हणजे तें तें सर्व) बोलण्यांत काय स्वारस्य आहे ? पुन्हा ग्रीटा गार्बोसाठी अेवढी तयारी मग टागोरानी अुर्वशीचें शब्दचित्र लिहिलें तसें लिहिण्याची वेळ आली तर अुर्वशीसाठी आता काय शिल्लक राहिलें ? मित्राना वाटलें असावें तें हें. लेखकाच्या अभिरुचीबद्दल त्याच्या मित्रास किंवा कोणासहि शंका येण्यासारखे या व्यक्तिचित्रात काहीच नाही ! तिच्या अंतर्मुख वृत्तीची छाननी लेखकाने अतिशय कुशलतेने केली आहे. तिच्या जीवनातील अनेक प्रसंगांचें पर्यवसान तिच्या भेदक औदासीन्यांत कसे झाले हे फार सूक्ष्मपणें दाखवलें आहे. पण शेवटीं लेखक म्हणतात 'खरी गार्बो मात्र रुपेरी पडद्यावरच पाहावयास मिळते हें विसरतां कामा नये !' वास्तविक तिच्या चित्रपटातील भूमिकेच्या वैशिष्ट्याचें कोडे या व्यक्तिचित्राने अुलगडल्यानंतर, तिच्या जीवनात 'खरें' नि 'खोटें' असें काय अुरतें ? लेखकाने वर्णन केलेलें तिचें जीवन यःकश्चित् माणसाप्रमाणे आहे का ? त्यात लोकविलक्षण असे कितीतरी आहे आणि त्यावर औदासीन्याची कायमची छाया पडलेली आहे हे या व्यक्तिचित्रांत परिणामकारकपणें दाखविलें आहे. त्याच तोलाचें पुढले चार्ली चॅप्लिनचें व्यक्तिचित्र. चार्लीच्या विनोदांत प्रतीकात्मक अर्थ कोणता आहे हें दाखविण्यात लेखकाची सूक्ष्म दृष्टि चांगली प्रत्ययास येते. चित्रपट पाहण्याचा हक्क लेखकास आहे असें ते खुलाशात सागतात. चॅप्लिनचे व्यक्तिचित्र लिहिणाऱ्या लेखकास हा हक्क कोणीहि बहाल करील. इतकेंच नव्हे तर, त्याच्या दृष्टिकोनाचा परिचय झाल्याखेरीज कोणा-चेंहि 'पाहणें' पूर्ण होणार नाही. अितकी सूक्ष्म दृष्टि त्यानी या व्यक्तिचित्रांत दाखविली आहे. आणि विनोदमूर्ति चार्ली हा जगातील अेक अत्यंत दुःखी प्राणी आहे, या विलक्षण गोष्टीचें विवेचन करताना त्याच्या दुःखाचे स्वरूपहि ओझरतें दाखवून चार्लीविषयी प्रेक्षक-वाचकाचे ठिकाणीं नवा जिव्हाळा अुत्पन्न केला आहे. क्रीडाक्षेत्रावरहि वाङ्मयाचा हक्क आहे हें सिद्ध करण्यासाठी डॉन ब्रॅडमन हा लेख वाचला तर मात्र आपणांस हें पुन्हा अेकदा पटेल की, क्रीडानैपुण्य हें शंभर टक्के दृष्टिगम्यच सुख आहे. आणि तें प्रत्यक्ष क्रीडा पाहूनच (वाचून नव्हे) मिळवितां येतें. तेवढा भाग सोडला तर ब्रॅडमनच्या जीवनात क्रीडानैपुण्याच्या मागे कशी तपश्चर्या आहे हें दाखविणारा भाग स्मरणीय आहे. पुढील व्यक्तिचित्र (फिलिप स्नोडन) हें सार्वजनिक आयुष्यांत अपयशी पण खाजगी वैवाहिक आयुष्यात यशस्वी (!) अशा माणसाचें आहे. अपयशाची कथा सहानुभूति अुत्पन्न करणारी नाही आणि वैवाहिक जीवनयशहि विलोभनीय वाटेल असें या चित्रांत व्यक्त झालें नाही. लॉर्ड बर्कनहेड (व्यक्तिचित्रांतले) तसेंच. चित्रासाठी 'व्यक्ति' म्हणून निवडण्यासारखें त्यात काय आहे ? परंतु बरेंच वेळां तें नांव आपल्या 'डोक्या'वर आदळल्याने कांही तरी बडें प्रकरण असावें असें वाटतें. तो भ्रम आहे अेवढें हें व्यक्तिचित्र दाखवील !

———

## सन १९४०-४१ सालीं दुसऱ्या सहामाहींत डे. व्ह. ट्रा. सोसायटीने बक्षिसें व प्रशंसापत्रें दिलेल्या पुस्तकांची यादी

| पुस्तकाचें नांव | कर्त्याचें नांव | बक्षिसाची रक्कम |
|---|---|---|
| १ अविवाहितांचे प्रश्न | राजरत्न वा. वि. जोशी | रु. ३० द. प्रा. फंडांतून |
| २ हिमालयांतील प्रवास | रा. भाऊ धर्माधिकारी | रु. ३० ,, |
| ३ सुश्लोककुमार | डॉ. रा. चिं. श्रीखंडे | रु. ६० ,, |
| ४ लोकहितवादींचीं शतपत्रें | रा. श्री. रा. टिकेकर | रु. ३० देशमुख फंडांतून |
| ५ संस्थानातील लोकशाहीचा लढा | रा. वि. अ. पटवर्धन | रु. ३० ,, |
| ६ शीघ्रसाहित्यादर्श | रा. वा. कृ. भावे | रु. ४० ,, |
| ७ वादळी वारे | प्रा. द. के. केळकर | रु. ४० ,, |
| ८ सामुद्रिक तिलक | पं. रघुनाथशास्त्री पटवर्धन | रु. ४० मुळ्ये प्राअीझ |
| ९ मुलांचा भक्तिमार्ग भाग ३ रा | रा. म. अ. भागवत | रु. ३० संस्थेच्या फंडांतून |
| १० चित्रवंशदीप काव्य भाग १ ला | श्रीसमर्थदास रामदासी | रु. ३० ,, |
| ११ श्रुतिगुणनाटिका | रा. शं. ब. तळेकर | रु. ४० ,, |
| १२ उद्यांचें जग | रा. श्री. रा. पोतनीस | रु. ३० ,, |
| १३ श्रीज्ञानदेव | प्रो. मा दा. अळतेकर | रु. ३० ,, |
| १४ निळा पक्षी | रा. साने गुरुजी | रु. ३० ,, |
| १५ स्त्रीजीवनविषयक कांही प्रश्न | सौ. कमलाबाअी टिळक | रु. ३० ,, |
| १६ विलायतेंतील अजब गोष्टी | डॉ. वि. ना. गोखले | रु. ३० ,, |
| १७ कुलाबकर आग्रे सरखेल | रा. दा. गो. ढबू भट | रु. ५० ,, |
| १८ महात्मा कीं मोहात्मा | रा. वि. वि. दीक्षित | रु. ३० ,, |
| १९ शरयू | रा. सीताराम मनाठकर | रु. १५ ,, |
| २० हिंदुस्थानचे हिंदु सम्राट | रा. वा. पु. हर्डीकर | प्रशंसापत्र |
| २१ रामायणामृत | रा. ग. रा. हवलदार | ,, |
| २२ संजीवनी बालबोध गीता | रा. वा. गो. थत्ते | ,, |
| २३ ग्रहणापूर्वी सुटका भाग १।२ | रा. ना. वि. कुलकर्णी | ,, |
| २४ आंधळ्यांचें शिक्षण व जीवित | रा. वि. वा. पोतदार | ,, |
| २५ आधुनिक आहारशास्त्र | रा. र. धों. कर्वे | ,, |
| २६ माझीं कोरीव लेणीं | सौ. शांताबाअी नाशीककर | ,, |
| २७ शांतिकुंज भाग २ रा | ,, | ,, |
| २८ सार्थ ऋग्वेद प्रातिशाख्य भाग १ ला | पं. शिवरामशास्त्री शिंत्रे | ,, |
| २९ आदर्श स्त्रीजीवन | रा. ना. प. थत्ते | ,, |
| ३० रम्य रात्री | रा. र. वा. दिघे | ,, |

# नियामक मंडळाची सभा



म. सा. परिषदेच्या नियामक मंडळाची सभा ता. ११ अेप्रिल १९४१ शुक्रवारीं सायंकाळीं ६ वाजतां सोलापूर येथे संमेलननिवासस्थानात (सेवासदनसंस्थेची अिमारत) भरली होती. सभेस खालीलप्रमाणे १५ सभासद अुपस्थित होतेः—

वा. दा. गोखले, श्री. ग. देवरुखकर, द. सी. पंगु, गं. गो. कानेटकर, के. नारायण काळे, अ. ना. भालेराव, वि. द. घाटे, वा. म. जोशी, भा. वि. वरेरकर, दि. वि. आमोणकर, शं. वा. किर्लोस्कर, ना. सी. फडके, श्री. ना. बनहट्टी, य. रा. दाते, व र. लु. जोशी.

सभेस आरंभ होतेवेळी परिषदेचे अध्यक्ष किंवा कोणतेहि अुपाध्यक्ष सभास्थानीं आले नसल्यामुळे सभेच्या विनंतीवरून अध्यक्षस्थान प्रो. वा. म. जोशी यांनी स्वीकारिलें.

२. रत्नागिरी संमेलनापूर्वी व नंतर छापलेले दोन्ही वृत्तान्त वाचून झाले आहेत असे गृहीत धरून पक्के करण्यांत आले.

३. कार्यकारी मंडळाने तयार केलेलें १९४० या वर्षाचें अितिवृत्त सभेपुढे मांडून झाल्यावर तें मान्य करण्यांत यावें अशी सूचना श्री. दि. वि आमोणकर यानी केली व श्री. भा. वि. वरेरकर यानी या सूचनेस अनुमोदन दिल्यानंतर वरील अितिवृत्त मान्य करण्यांत आलें.

४. १९४० या वर्षी अंदाजपत्रकापेक्षा खालील बाबीत अधिक खर्च झालाः—

पत्रिकाखर्च रु. २०६-८-६, परीक्षाखर्च रु. ५६-१३-९, किरकोळखर्च रु. ८-१४-६.

या अधिक खर्चास मंजूरी द्यावी अशी सूचना श्री. वि. द. घाटे यानी केली व त्यास प्रो. द. सी. पंगू यानी अनुमोदन दिल्यानंतर सभेने हा जादा खर्च मंजूर केला.

५. कार्यकारी मंडळाने १९४० या वर्षासाटी तयार केलेले हिशेब सभेपुढे माडण्यांत आले. हे हिशेब मंजूर व्हावे अशी सूचना प्रो. द. सी. पंगू यानी केली. श्री. श्री. ग. देवरुखकर यांनी या सूचनेस अनुमोदन दिल्यानंतर हिशेब मंजूर करण्यात आले.

हीं कामें झाल्यानंतर परिषदेचे अेक अुपाध्यक्ष प्रो. ना. सी. फडके हे सभास्थानीं अुपस्थित झाल्यामुळे त्यांनी अध्यक्षाचें काम चालविलें.

६. १९४१ या वर्षासाठी तयार केलेलें अंदाजपत्रक सभेपुढे माडलें असता रत्नागिरी संमेलनाकडून नुकतीच आलेली रु. १०० ची देणगी जमेच्या बाजूस धरून संमेलन ठराव अमलबजावणीसाठी रु. ५० खर्चाच्या बाजूस दाखवावे अशा दुरुस्तीसह हें अंदाजपत्रक मान्य करावें अशी सूचना श्री. भा. वि. वरेरकर यानी केली व या सूचनेस श्री. शं. वा. किर्लोस्कर यांचें अनुमोदन मिळाल्यानंतर अंदाजपत्रक सभेने मंजूर केले.

७. श्रीमंत सरदार किबे हे अुपाध्यक्ष म्हणून व नियामकमंडळाचे सभासद म्हणून दोन जागीं निवडून आल्यामुळे त्यांनी अेका जागेचा राजीनामा पाठविला. सभेने तो स्वीकारून अिंदूर गटांतील नियामकमंडळाच्या सभासद म्हणून सौ. कमलाबाई किबे याची नेमणूक केली.

८. कार्यक्रमपत्रिकेंतील शिल्लक असलेलीं कामें त्याच रात्रीं भरविण्यांत येणाऱ्या वार्षिक साधारण सभेपुढे येणार असल्यामुळे त्यांचा विचार त्या सभेंतच व्हावा असें सभेने ठरविलें. हीं कामें झाल्यानंतर अध्यक्षांनी सभा बरखास्त केली.

---

## नियामक मंडळाची दुसरी सभा

घटनानियम ३० प्रमाणे संमेलनाच्या अधिवेशनानंतर संमेलनस्थळीं होणारी नियामक मंडळाची सभा संमेलननिवासस्थानात ता. १४ अेप्रिल सोमवारीं दुपारीं १२ वाजता प्रा. पोतदार याच्या अध्यक्षतेखाली भरली. सभेस पुढील १३ सभासद अुपस्थित होतेः—दि. वि. आमोणकर, वा. दा. गोखले, श्री. ना. बनहट्टी, श्री. नि. चाफेकर, गो. प. पटवर्धन, के. नारायण काळे, वि. स. खांडेकर, द. वा. पोतदार, य. रा. दाते, वि. द. घाटे, अ. ना. भालेराव, शं. के. कानेटकर, व र. लु. जोशी.

१. घटनानियम ४९ प्रमाणे खालील गृहस्थाचे संपादक-मंडळ नियुक्त करण्यांत आलेंः— १ प्रा. द. वा. पोतदार, २ श्री. कृ. ग. लिमये, ३ श्री. श्री. म. वर्दे, ४ प्रा. वि. भि. कोलते, ५ श्री. वा. रा. ढवळे.

२. सोलापूर-संमेलनात मान्य झालेल्या ठरावाची शक्य तेवढी अंमलबजावणी कार्यकारी मंडळाने करावी असें सभेने ठरविले.

याप्रमाणे काम झाल्यानंतर सभा बरखास्त करण्यात आली.

---

## वार्षिक साधारण सभा

म. सा. परिषदेची वार्षिक साधारण सभा ता. ११ अेप्रिल १९४१ शुक्रवारीं रात्रीं ९ वाजतां सोलापूर संमेलनाच्या निवासस्थानात (सेवासदन संस्थेची अिमारत) भरली होती. सभेस पुढील २८ सभासद अुपस्थित होते :—

वा. म. जोशी, वा दा. गोखले, बा. शि. नाअीक, श्री. ना. बनहट्टी, श्री. ग. देवरुखकर, वि. गो. शेट्ये, य. रा. दाते, वा. दा. गाडगीळ, कृ. गो. मराठे, र. धों. कर्वे, राम एल्. गोगटे, भा. वि. वरेरकर, दि. वि. आमोणकर, माधव मनोहर, शं. के. कानेटकर, य. र. आगाशे, र. वि. कुलकर्णी, अ. ना भालेराव, नी. शं. नवरे, गो. प. पटवर्धन, र. भा. रायकर, के. नारायण काळे, वि. द. घाटे, कृ. गो. गोसावी, रा ने. शहा, श्री. ब. रानडे, गं. बा. सरदार, व र. लु. जोशी.

परिषदेचे अध्यक्ष किंवा अुपाध्यक्ष यांपैकी कोणीहि सभास्थानीं न आल्यामुळे श्री. र. वि. कुळकर्णी यांनी प्रा. वा. म. जोशी यांचें नांव अध्यक्षस्थानासाठी सुचविलें, व श्री. भा. वि. वरेरकर यानी या सूचनेस अनुमोदन दिल्यानंतर प्रा. जोशी यांनी अध्यक्षस्थान स्वीकारलें.

२. मागील वार्षिक साधारण सभा व विशेष साधारण सभा यांचे छापील वृत्तान्त वाचून झाले आहेत असें गृहीत धरून ते पक्के करण्यात आले.

३. खालील दिवंगत साहित्यिक व साहित्यसेवक यांजविषयी दुखवट्याचे ठराव करण्यांत आले :—

"कोल्हापूरचे कै. श्रीमंत छत्रपति राजाराममहाराज यांच्या अकालीं निधनामुळे या संमेलनास खेद होत आहे त्यांच्या निधनाने त्यांच्या आप्तस्वकीयांस व प्रजाजनांसच नव्हे तर अखिल महाराष्ट्रीय जनतेस जे दुःख होत आहे त्यांत ही सभा सहभागी आहे."

"(१) श्री. केशवराव बागडे, (२) श्री. बाबासाहेब विद्वांस, (३) श्री. प्रा. ग. ग. पेंडसे, (४) प्रा. वा. गो. अूर्ध्वरेषे, (५) रा. सा. पु. सी. वैद्य, (६) श्री. आनंदराव तेलंग, (७) प्रा. र. श्री. जोगळेकर अित्यादि जे साहित्यभक्त व साहित्यसेवक कालवश झाले त्याच्या निधनाबद्दल या सभेस अतिशय दुःख होत आहे."

४. कार्यकारी मंडळाने तयार केलेलें १९४० चे अितिवृत्त सभेपुढे मांडण्यात आलें. तें मान्य व्हावें अशी सूचना प्रा. श्री. ना. बनहट्टी यानी केली व श्री. श्री. ग. देवरुखकर याचे या सूचनेस अनुमोदन मिळाल्यानंतर सभेने हे अितिवृत्त मान्य केलें.

५. १९४० या वर्षांत झालेल्या जमाखर्चाचे हिशेब सभेस सादर झाले. या हिशेबांस मंजूरी द्यावी अशी सूचना श्री. भा. वि. वरेरकर यानी केली व श्री. कृ. गो. मराठे यानी तीस अनुमोदन दिलें. यानंतर ट्रस्टींकडील पक्के हिशेब आले नाहीत याजविषयी चर्चा होअून कार्यकारी मंडळाकडून मांडिलेले हिशेब सभेने मंजूर केले.

६. श्री. म. वि. गोखले व श्री. द. दा. देशपाडे यानी गतवर्षी हिशेबतपासनिसाचें काम केलें त्याबद्दल त्यांचे आभार मानण्यात येअून त्याची पुन्हा १९४१ या वर्षासाठी नेमणूक करण्यात आली.

सूचकः— श्री. भा. वि. वरेरकर अनुमोदनः— श्री. कृ. गो. मराठे

७. रत्नागिरी संमेलन ठराव अमलबजावणीचा वृत्तान्त सभेस सादर झाला.

८. घटनानियम ४६ अन्वये नवें ट्रस्टडीट करण्याच्या प्रश्नावर बरीच चर्चा झाल्यानंतर ठराव करण्यांत आला तो येणेप्रमाणे :—

"ता. १-१-१९४० पासून पुढे मिळालेल्या व मिळणाऱ्या सर्व रकमांसाठी नवीन ट्रस्टी नेमून व घटनेच्या ४६ व्या नियमाप्रमाणे नवीन ट्रस्टडीड व नियम करावे असा या सभेचा आदेश आहे."

सूचकः— माधव मनोहर अनुमोदनः— श्री. वि. गो. शेट्ये

९. श्री. चिटणीस, मध्यप्रांतशाखा सभा, नागपूर, यांजकडून आलेले ठराव, त्याचप्रमाणे श्री. कृ. गो. मराठे यांचा ठराव व श्री. र. धों. कर्वे यांनी पाठविलेला ठराव चिटणीसांनी सभेस सादर केले. हे सारे ठराव कार्यपत्रिका पाठविल्यानंतर आले असल्यामुळे त्यांची सर्व सूचना सभासदांस देणें शक्य न झाल्यामुळे त्यांचा विचार करितां येत नाही असा निर्णय अध्यक्षांनी दिला.

हीं कामें झाल्यानंतर अध्यक्षांनी सभा बरखास्त केली.

# परिषद्वार्ता



(चिटणिसांकडून)

**कार्यकारी मंडळ**— ता. ११ अेप्रिल, १७ मे, ८ जून व २० जुलै या दिवशीं कार्यकारी मंडळाच्या सभा भरविण्यात आल्या.

श्रीमंत सरकार अिचलकरंजीकर यानी निराळ्या ट्रस्टमध्ये गुंतविलेल्या रु. २००० चे सरकारी कर्जरोखे परिषदेच्या स्वाधीन करण्याची अिच्छा दर्शविल्यामुळे श्रीमंतांनी घातलेल्या अटी स्वीकारण्यात आल्या.

खालील दुखवट्याचा ठराव मान्य करण्यांत आलाः—

"अिंदूर येथील विद्वान व साहित्यप्रेमी प्राध्यापक वा. गो. अूर्ध्वरेषे तसेंच नाशिक येथील साहित्यिक व प्राध्यापक र. श्री. जोगळेकर याच्या अकाली निधनाने म. सा. परिषदेच्या कार्यकारी मंडळास दुःख होत आहे. त्यांच्या निधनामुळे त्याच्या आप्तेष्टास होणाऱ्या दुःखांत कार्यकारी मंडळ सहभागी आहे."

ता. २० जुलै या दिवशीं भरलेल्या सभेंत परिषदेच्या १०६ सभासदांचे राजीनामे स्वीकारण्यात आले.

'शारदामंडळ, कोल्हापूर' व 'कलोपासक मंडळ, वेगुर्लें' या संस्था परिषदेशीं संलग्न करून घेण्यात आल्या.

**संमेलन**— ता. १२,१३ व १४ अेप्रिल १९४१ या दिवशीं सोलापूर येथे महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे २५ वें अधिवेशन श्री. वि. स. खाडेकर याच्या अध्यक्षतेखाली थाटाने भरविण्यात आले होते. संमेलनाचे कार्याध्यक्ष श्री. साठे व सरचिटणीस श्री. जामदार हे तुरुंगवासात असल्यामुळे संमेलन कसे पार पडते याची धास्ती वाटत होती, परंतु सोलापूरकरांनी अुत्साहाने व चिकाटीने संमेलन यशस्वी केलें याजबद्दल त्यास धन्यवाद दिल्याशिवाय राहवत नाही. शब्दभांडाराच्या दृष्टीने प्राचीन जैन वाङ्मयाचे संशोधन करण्यास दिलेली चालना हें यंदाच्या संमेलनाचे वैशिष्ट्य होय. हे संशोधन यशस्वी होअील अशी अपेक्षा आहे.

संमेलनात मान्य झालेले ठराव याच अंकांत अितरत्र प्रसिद्ध झाले आहेत व ठरावांच्या अंमलबजावणीच्या कार्यास आरंभ झाला आहे.

**अितर**—महाराष्ट्र विद्यापीठाच्या स्थापनेसंबंधीच्या सरकारी धोरणाविषयी अिलाखाधिपतीचे सल्लागार श्री. मदन याच्याशीं चर्चा करण्यास ७ जुलै या दिवशीं डॉ. र. पु. परांजपे यांच्या नेतृत्वाखाली शिष्टमंडळ गेले होते. महाराष्ट्र विद्यापीठाची निश्चित योजना तयार करण्यास सरकारने अधिकृत समिति नेमावी अशी विनंती शिष्टमंडळाने केली.

प्रतिवर्षाप्रमाणे अुन्हाळ्याच्या सुट्टींत पुण्यात येणाऱ्या पाहुण्यांस ३ जून या दिवशीं परिषदेच्या कार्यालयात येण्याविषयी निमंत्रण दिले होतें. परिषदेच्या कार्याविषयी त्यांना माहिती करून द्यावी हा हेतु हें निमंत्रण देण्यात होता. या प्रसंगीं पाहुणे मंडळी व परिषदेचे सभासद मिळून सुमारे १००-१२५ मंडळी अुपस्थित होती. परिषदेच्या कार्याची माहिती कार्याध्यक्ष प्रा. वा म. जोशी यानी करून दिली व अुपस्थितांस परिषदेच्या कार्यात लक्ष्य घालण्याविषयी विनंती केली. याच हेतूने पुणे येथे मे महिन्यांत भरलेल्या अध्ययन-अध्यापन परिषदेच्या प्रतिनिधींसहि परिषदेच्या कार्यालयास भेट देण्याविषयी पाचारण केलें होतें. या वेळीं सुमारे ५०-७५ प्रतिनिधिशिक्षक अुपस्थित होते.

# व्याकरण-समितीच्या कार्यव्यवस्थेसाठी केलेले पोट-नियम

व्याकरण परिषदेने नेमलेल्या व्याकरण-समितीच्या कार्यव्यवस्थेसाठी खालील पोट-नियम करण्यांत येत आहेतः—

१ व्याकरण-समितीस सदस्यांचीं त्यागपत्रें स्वीकारण्याचा व अधिक सदस्य स्वीकृत करून घेण्याचा अधिकार आहे.

२ म. सा. परिषदेच्या वर्षगणनेप्रमाणे या समितीची वर्षगणना राहील.

३ वर्षारंभीं समितीने अध्यक्ष व कार्यवाह यांची नेमणूक करावी.

४ प्रत्येक सभेचा वृत्तान्त लिहून ठेवून वर्ष संपतांच वार्षिक वृत्तान्त समितीने म. सा. परिषदेच्या कार्यालयास सादर करावा.

५ (अ) सोयीप्रमाणे चर्चेसाठी समितीच्या पाक्षिक अित्यादि बैठका होतील. या चर्चांचा निष्कर्ष विचारार्थ समितीच्या सर्व सदस्यांच्या निर्णयसभेपुढे ठेवण्यांत येअील.

(आ) अशा निर्णयसभा वर्षांतून प्रायः चार वेळां होतील. या सभांच्या सूचना सदस्यांकडे सभेच्या दिवसापूर्वी दोन आठवडे पाठविण्यांत येतील.

(अि) लागोपाठ तीन निर्णयसभांस अनुपस्थित असलेल्या सभासदाचें नांव समितींतून आपोआप गळेल.

र. लु. जोशी
कार्यकारी मंडळाच्या वतीने

# नवीन सभासद

## तहहयात

डॉ. मु. रा. अुर्फ बाबासाहेब जयकर, मुंबअी
श्रीमंत राजेसाहेब अप्पासाहेब पटवर्धन, सांगली
डॉ. सी. अेम्. मेहता, कोपरगांव
श्री. ज. वि. दातार, पुणें
श्री. बापूराव बोरावके, कोपरगाव

## तहहयात (साधारणांतून)

सौ. लक्ष्मीबाअी धर्माधिकारी, पुणें
सौ. मनोरमाबाअी फडके, दादर

## साधारण

प्रा. कैलासचंद्र शिवलाल मेहता, सोलापूर
श्री. दाअुद युसफ मुकदम, अहमदाबाद
,, रा. बा. दाते, लष्कर
,, भास्कर धोंडो कर्वे, पुणें
,, विष्णु रामचंद्र राजवाडे, अुमरावती
,, महादेव दामोदर संत, वाशीम
,, शांताराम पांडुरंग कणेकर, मांडवी
,, प्रभाकर पाध्ये, दादर
श्री. अनंत आत्माराम काणेकर, दादर
,, दत्तात्रय वामन जोशी ,,
,, लक्ष्मण शिवराम देअूसकर, ,,
,, दिगम्बर महादेव ओक, जव्हार
,, दत्तात्रय नारायण बापट, वहाळ
डॉ. वि. मि. फडके, पुणें
श्री. पु. पां. कुळकर्णी, कशेळी
,, वि. स. जोशी, मुरुड-जंजिरा

# परीक्षांविषयक वृत्त

म. सा. पत्रिकेच्या जानेवारी १९४१ च्या अंकांत प्राज्ञ व विशारद या परक्षिांत यशस्वी झालेल्या अुमेदवारांचीं नांवें प्रसिद्ध झालीं आहेत. यानंतर श्री. श्री. दा. पंडित या अुमेदवाराचा पुनर्विचार होअून तो प्राज्ञ परीक्षेत यशस्वी झाला आहे असें ठरवण्यात आलें आहे.

अुमेदवारांच्या सोयीसाठी नगर येथील 'वाङ्मयोपासक मंडळ' व अिंदूर येथील 'महाराष्ट्र साहित्य सभा' या परिषदेच्या संलग्नसंस्थांनी अभ्यासाचे वर्ग सुरू केले आहेत. नू. म. विद्यालय, पुणें, व गांधी ट्रेनिंग कॉलेज, पुणें, या संस्थांच्या प्रमुखांनी प्रतिवर्षाप्रमाणे अुमेदवाराच्या अभ्यास-वर्गाची व्यवस्था केली आहे. गांधी ट्रेनिंग कॉलेजांत 'विशारद' परीक्षेच्याहि अभ्यासाची सोय स्वतंत्र वर्ग सुरू करून तेथील प्रमुखांनी केली आहे. मुंबअी,नागपूर अित्यादि शहरांतून अभ्यास-वर्गाची स्थापना व्हावी म्हणून प्रयत्न चालू आहेत.

परीक्षांसाठी नेमलेल्या पाठ्य-पुस्तकांच्या अभ्यासास साहाय्य म्हणून खाली दिलेलीं पुस्तकें अुपयुक्त होतील—

## प्राज्ञ परीक्षा

यशवंतराव खरे— हरिभाअूंच्या आठवणी व कादंबऱ्या (वाग्भट नारायण देशपांडे) हरिभाअू आपटे यांचें चरित्र (वेणूबाअी पानसे).

रानडे चरित्र— श्री. न चिं. केळकरकृत 'टिळक चरित्र'

सभासदांची बखर— 'साहित्य समालोचन' (सरवटे).

रसतरंगिणी— 'महाराष्ट्र सारस्वत' भाग १ व २

रसवंती— 'अभिनव काव्यप्रकाश'– (रा. श्री. जोग) या ग्रंथातील काव्यप्रकाराबद्दलचें प्रकरण.

व्याकरण, पद्यप्रकाश, अलंकार— 'मराठी साहित्य आणि व्याकरण' (मोने).

## विशारद परीक्षा

प्रश्नपत्रिका १ ली— मराठी कादंबरी (प्र. वा. बापट), गडकरी– व्यक्ति आणि वाङ्मय (वि. स. खांडेकर), गडकऱ्यांचा विनोद (मावे), फडके– व्यक्ति आणि वाङ्मय (मा. का. देशपांडे), भावबंधनावरील टीका (घारपुरे).

प्रश्नपत्रिका २ री— बखर वाङ्मयविषयक श्री. वि. सी. सरवटेकृत 'साहित्यसमालोचन' या ग्रंथांतील भाग.

प्रश्नपत्रिका ३ री— मोरोपंत– हंसकृत निबंध, मोरोपंतचरित्र (पांगारकर), मयूर-काव्यविवेचन, (बनहट्टी) निबंधमाला; केशवसुत व तांबे– काव्य-चर्चा (भिडे व अनंततनय), काव्यालोचन (द. के. केळकर), अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक भाग १–२ (खानोलकर).

प्रश्नपत्रिका ४ थी— अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका (गं. ब्रा. सरदार), मराठी भाषेची घटना (रा. भि. जोशी)

यांशिवाय विनोदमीमांसा (न. चिं. केळकर), प्रतिभासाधन, (ना. सी फडके), मराठी भाषेचा व वाङ्मयाचा अितिहास (बा. अ. भिडे), स्वभावलेखन (पु. ग. सहस्रबुद्धे) या पुस्तकाचाहि सर्वसामान्य माहितीसाठी अुपयोग होअील.

परीक्षास नेमलेलीं पुस्तकें मिळण्यास अुमेदवारास अडचण पडूं नये व शक्यतों अेकाच ठिकाणीं मिळावीं या अुद्देशाने चालक 'हिंदमाता पुस्तक मंदिर, गणपति चौक, बुधवार पेठ, पुणें २, यांजकडे तीं मिळण्याची व्यवस्था केली आहे.

म. सा. परिषदेच्या परीक्षा आतापर्यंत नोव्हेंबर महिन्यांतील तिसऱ्या आठवड्यांत घेण्यांत येत असत. अुमेदवारांच्या सोयीसाठी त्या आता डिसेंबर ता. १६ च्या सुमारास घेण्यांत याव्या असें ठरलें आहे. या वर्षी 'प्राज्ञ' परीक्षा १५ डिसेंबर व 'विशारद' परीक्षा १७ डिसेंबर या दिवशीं सुरू होतील.

अुमेदवाराकडील अर्ज व शुल्क हीं स्वीकारण्याची शेवटची तारीख १० नोव्हेंबर ही आहे.

---

## साभार स्वीकार



१ **हसरे हिरे** – (प्रातिनिधिक विनोदी कथासंग्रह) भाग १ ला—संपा० व प्रका० श्री. रतनलाल डी. शहा. मूल्य २ रु.

२ **जलधारा** — ले० बाबूलनाथ; प्रका० श्री. ल. ना. चाफेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, टिळक रस्ता, पुणें २; मूल्य १२ आणे.

३ **एक पाऊल पुढें** — ले० व प्रका० प्रो. वि. पा. दांडेकर, हाथी पोळ नाका, बडोदें; मूल्य १। रु.

४ **जुना बाजार** (कथासंग्रह)— ले० श्री. ग. खं. पवार; प्रका० श्री. शांताराम आठवले, टिळक रस्ता, पुणें २; मूल्य १। रु.

५ **सहवास**—ले० श्री. ना. मा. व सौ. अिंदिरा संत; प्रका० आर्यसंस्कृति मुद्रणालय, पुणें २; मूल्य १२ आणे.

६ **प्लेटोची आदर्श राज्यघटना**— अनुवा० श्री. ज. ग. जोगळेकर, १०२ उमासदन, हिंदु कॉलनी, दादर, मुंबई १४; मूल्य ४ रु.

७ **प्रेमसुधा** (स्वामी रामदास यांच्या मराठी कवितांचा अनुवाद)— अनुवा० श्री. श्री. र. देशपांडे; प्रका० आनंदाश्रम, रामनगर, कन्हनगड; मूल्य ६ आणे.

८ **पानपतचे पडसाद** (एकांकी नाटक) — ले० श्री. पु. म. वैद्य, प्रका० नवरस-कार्यालय, अिंदूर शहर; मूल्य ४ आणे.

९ **श्रीज्ञानदेव**— ले० व प्रका० प्रो. माधव दामोदर अळतेकर, विलेंपार्लें; मूल्य २॥ रु.

**१० पहिली उडी**—ले० प्रो. श्री. स. भावे, प्रका० श्री. ज. पु. भागवत, मौज प्रिंटिंग ब्यूरो, मुंबई ४; मूल्य १। रु.

**११ रेखाचित्रें**—ले० श्री. श्री. ना. कुलकर्णी; प्रका० किर्लोस्कर प्रेस, किर्लोस्कर-वाडी; मूल्य ३ रु.

**१२ न बोलायच्या गोष्टी**— ले० श्री. य. ग. वझे; प्रका० श्री. ल. ना. चाफेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, टिळक रस्ता, पुणें २; मूल्य १ रु.

**१३ वाङ्मयीन महात्मता**—ले० श्री. बा. सी. मर्ढेकर; प्रका० श्री. कृ. ना. सापळे, रामकृष्ण प्रकाशन मंडळ, त्रिभुवनरोड, मुंबअी ४; मूल्य १। रु.

**१४ साहित्यप्रकाश**—ले० श्री. दा. ना. आपटे; प्रका० श्री. पु. आ. चित्रे, खारीबाव, बडोदें; मूल्य रु. १-२-०.

**१५ फुलांची बाग** (काव्यसंग्रह)—ले० श्री. म. बा. शिंदे (वासुदेवाग्रज); प्रका० श्री. डी. एन्. मोघे, स्कूल अॅन्ड कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर; मूल्य १। रु.

**१६ सामराज** (चर्चात्मक व संशोधनात्मक)—द्वितीयावृत्ति—ले० प्रो. द. सी. पंगु, प्रका० कर्नाटक पब्लिशिंग हौस, मुंबअी २; मूल्य २ रु.

**१७ अितिहास कसा शिकवावा**—ले० श्री. अं. दा. चितळे; प्रका० श्री. वि. गं. केतकर, अ. वि. गृह, ६२४ सदाशिव पेठ, पुणें २; मूल्य १। रु.

**१८ नरेंद्र कविकृत रुक्मिणीस्वयंवर**—संपा० प्रो. वि. भि. कोलते; प्रका० श्री. ज. भि. कोलते, अरुणप्रकाशन, मलकापूर (वऱ्हाड); मूल्य २॥ रु.

**१९ मराठवाड्यांतील गद्यविहार** (पुस्तक ३ रें)—संग्रा० व प्रका० डॉ. वा. दा. गाडगीळ, मनोरंजक ग्रंथ प्रसारक मंडळ, हैदराबाद [द.]; मूल्य १॥ रु.

**२० मराठी नाट्यसृष्टि**—पौराणिक नाटकें (खंड १ ला) ले० व प्रका० प्रो. वि. पा. दाडेकर, हाथी पोळ जवळ, बडोदें; मूल्य ४ रु.

**२१ बडोदें राज्यदप्तरांतील ऐतिहासिक वेंचे**-खंड ६ (खंड ३ ऱ्याच्या पुरवणी-रूपाने)-अि. स. १७९३-१८८०; प्रका० बडोदें सरकार, बडोदें; मूल्य ९ आणे.

———

## महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेचीं पहिलीं बारा वर्षें

अर्थात्

## पत्रिकेच्या अंकांचीं वर्षशः बांधलेलीं बारा पुस्तकें

दर पुस्तकात अभिप्राय, अैतिहासिक, चरित्रें, निबंध, पुस्तकपरीक्षण, भाषिक शंकाचर्चा, सामाजिक, अित्यादि विषयांवर सदरें असून, सर्व मिळून महाराष्ट्र-भाषा, वाङ्मय, समाज, अितिहास यासारख्या विविध क्षेत्रांतील नवीन विद्वत्ताप्रचुर विचार आणि माहिती मिळणार आहे.

**किंमत** — सुंदर कापडी बांधणी विषयसूचीसह दर वर्षाच्या पुस्तकास ४ रुपये, परिषदेच्या सभासदांस २ रु ; ट. ख. निराळा.

**वि. सू.** — तेराव्या वर्षाच्या पुस्तकाच्याहि बांधीव प्रती तयार आहेत, परंतु या प्रत्येक प्रतीस सभासदांसहि ४ रुपये पडतील; ट.ख. निराळा.

## 'मराठी भाषेचा व वाङ्मयाचा अितिहास'

### महानुभावअखेर

लेखक — कै. **बाळकृष्ण अनंत भिडे**, आकार– रॉयल अष्टपत्री, पृष्ठें–१२५. अुत्तम बांधणी किंमत फक्त अेक रुपया. परिषदेच्या सभासदास बारा आणे; ट. ख. वेगळा.

विशेष माहितीसाठी लिहा :—

चिटणीस,
म. सा. परिषद, टिळक रस्ता, पुणें २

आर्यसंस्कृति मुद्रणालय, विमणबाग, टिळक रस्ता, पुणे, येथे लक्ष्मण नारायण चापेकर यानी छापिलें व पुणें येथे महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या कार्यालयात परिषदेकरिता वामन मल्हार जोशी यानी प्रसिद्ध केलें.

## वर्गणीविषयक माहिती

म. सा. पत्रिकेची वार्षिक वर्गणी — रु. ४।। (ट.ख.सह).

परिषदेचे सभासद व संलग्नसंस्था — वा. व. रु. ३ (म. सा. पत्रिका विना-मूल्य पाठविली जाते)

पत्रव्यवहाराचा पत्ता— **महाराष्ट्र साहित्य परिषद्, टिळक रस्ता, पुणें २.**







# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका



वर्षे १४ वें ] अनुक्रमणिका [ अंक ४ था





# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका



## प्रार्थना

माझी तुला अीश्वरा प्रार्थना ही—
कां ती प्रभो मान्य होणार नाही ?
मागें न मी पुत्रवित्तादि सत्ता.
सिद्धी नको. मुक्ति कैंची प्रमत्ता !

माझी तुला प्रार्थना अीश्वरा ही—
राहो न कोणीहि दु:खी मराठी.
चैतन्य-सौंदर्य-आनंद माजो.
तूं सच्चिदानंद हें ब्रीद साजो.

कोठे रडे मूल, थावे श्रमाने;
कोमेजतें फूल कोठे हिमाने; —
त्यांची कळी हासवी रे फिरोनी
दे शुद्धआनंद त्यांसी भरोनी.

भूमी जिमीं वृष्टिला वाहनेली
जी जी तशी तान्हुल्यी आसलेली
माता करीं तीस; चालो अबाध
हा जीवनस्रोत फोडोनि बांध.

कोठे असे रुग्ण— कोणी असो तो—
—[illegible] युद्धांत; कुष्ठें कुजो तो;
कीं व्याघ्र-गुंफेंत— त्यांचीं शरीरें
उल्हास-ऊर्मीत आल्हादवीं रे !

ये त्रस्त आत्मा जरी आढळांत
—कीं माड वेळेवरी वादळांत—
भारी मनश्चक्रवातें भ्रमेला
बेताल तो क्षोभ येवो समेला.

पावित्र्यगंधास मोहे निजाच्या,
आत्मा अंहकार-पद्मांत ज्याचा
बंदी पडे— मुक्ति दे त्यास देवा
काळद्विपें घात होअी पुढे वा.

पापें जरी चित्त व्यापे कुणाचें
—कीं व्योम काळ्या थव्यांनी घनाचे—
वर्षाव त्यांतून होवो दयेचा
हो ज्योतिचा नाच तेजोमयेचा.

जी प्रार्थना आर्य पूर्वी करीती
मीं गाअिली तीच काव्यैक रीती.
जाणें बरें लक्ष तूं कां न देशी
माझी नसे शुद्ध बुद्धी पुरेशी.

सांगेन लाटांस गर्जा सदा ही,
दाही दिशा वायु नेअील दाही.
गातील तारेहि ती अंतरीक्षीं
कैसी अुपेक्षीसि तूं सर्वसाक्षी !

—पु. मं. लाड

# सद्यःकालीन रसग्रहण*

( ले० — श्री. बा. सी. मर्ढेकर )

जिला आपण सुधारणा म्हणतों तिच्या प्रगतीमुळे ललितकलांची कांही हानि झाली आहे कीं काय, हा प्रश्न विचार करण्यासारखा परंतु फार व्यापक स्वरूपाचा आहे. कांही लोकाना वाटतें, की अशी हानि झाली आहे हें सिद्ध करण्याला पुरेशीं प्रमाणें देतां येतील, अुलट कांही लोक कलेचें नांव निघतांच– आपली तिरस्काराची भावना लपविण्याचा मुळींच प्रयत्न न करतां एकदम 'सौंदर्यविषयक दृष्टि,' अथवा 'प्राथमिक अवस्थेंतील वृत्ति' अित्यादि शब्दांनी तिचा अुपहास करतात.

या प्रश्नाचें समर्पक अुत्तर द्यावयाचें म्हणजे या प्रश्नांत अंतर्भूत होणारे शब्द आणि त्यांमागच्या कल्पना यांची चिकित्सा करावी लागेल, तसेंच कलेच्या अितिहासाचें व्यापक समालोचनहि करावें लागेल. परंतु आज या गोष्टी करण्याचा माझा बेत नाही. पण आजच्या आपल्या जीवनांतील कांही गोष्टी अुत्कृष्ट कलेच्या निर्मितीला किंवा रसास्वादाला अनुकूल नाहीत, ही गोष्ट नाकबूल करतां येअील असें मला वाटत नाही. यांत्रिक युगाकडे पाहण्याची जी अेक द्वेषयुक्त किंवा अप्रीतिमूलक दृष्टि रूढ झाली आहे तिला अनुसरून मी हें म्हणत नाहीं. कारण कांही दृष्टींनी यांत्रिकयुग हें मनुष्यजातीला अेक अपूर्व वरदान आहे, आणि त्याकडे डोळेझाक करायची तर ती त्याने डोळे दिपल्यामुळेच करावी लागेल. कांही झालें तरी यंत्रें हीं माणसाने निर्माण केलेल्या वस्तु आहेत, यंत्रांनी कांही माणसाला निर्माण केलें नाही. अव्याहत पुनरुज्जीवित होणाऱ्या अुत्साहाचा परिणाम जी कार्य-प्रवृत्ति, ती अेखाद्या अिष्टसिद्धीवर केंद्रित झाली असतां सर्व विघ्नांचा निरास करून शेवटीं विजयी झाल्याखेरीज राहत नाही. हीच गोष्ट ललितकलांच्या क्षेत्रांतहि झाल्यावांचून राहणार नाही; किंबहुना होअूं लागलीच आहे. अशा वेळीं अजूनहि अज्ञात असलेल्या अशा विघ्नांकडे अंगुलिनिर्देश केला तर तो अगदीच निष्फळ ठरणार नाही.

मीं वर म्हटल्याप्रमाणे हीं विघ्नें निर्मितीच्या तशींच रसास्वादाच्याहि आड येणारीं आहेत. पण या ठिकाणीं मी कलानिर्मितीला अडथळा करणाऱ्या विघ्नांचा विचार न करतां रसास्वादाच्या आड येणाऱ्या विघ्नांचा विचार करणार आहें. यांचें अेक कारण असें आहे, की रसास्वादावर परिणाम करणाऱ्या गोष्टी सहज ध्यानांत येणाऱ्या आहेत, आणि कलेच्या रसास्वादाच्या सम्यग्बोधाच्या आड येणाऱ्या गोष्टींची तद्विषयक अप्रस्तुतता हीहि साधारण विचारी माणसालासुद्धा आकलन होण्यासारखी आहे. दुसरें कारण असें, की अशा रीतीने सिद्ध झालेल्या कलाविषयक दृष्टिशुद्धीला फार महत्त्व आहे. कारण कलेचा सम्यग् अवबोध आणि आस्वाद–आपल्या अुपकारक परिणामामुळे अुत्कृष्ट प्रकारच्या कलानिर्मितीला अुत्तेजन देणारा अेक आवश्यक घटक आहे. हें माझें विवेचन सांगोपांग केलेलें नाही हें सांगितलें पाहिजे, तसेंच माझीं अनुमानें कोणाला दूरान्वित तर कोणाला अुथळहि वाटण्याचा संभव आहे.

* "ARTS AND MAN" मधील Appreciation of "art in our time" या तिसऱ्या प्रकरणाचा अनुवाद. अनुवादक– श्री. रा. भि. जोशी, अेम्. अे.

या बाबतींत माझें अेवढेंच म्हणणें आहे की, मी ज्या गोष्टींचा अुल्लेख करणार आहें, त्यांनी आपली सगळी कलाविषयक दृष्टिच कलुषित करून टाकली आहे; आणि रसास्वाद आणि सौंदर्य-मीमांसा यांचा पायाच पोखरून टाकला आहे.

संघटना— उत्तरोत्तर अधिकाधिक संपन्न आणि गुंतागुंतीची होत जाणारी संघटना— हा सबंध सुधारणेचा स्थायीभाव आहे असें म्हणतां येअील. वन्य मानवाला ज्या क्षणाला आपलें सामाजिक आणि धार्मिक जीवन संघटित करावें असें वाटलें, त्याच क्षणाला त्याने सुधारणेचें बीजारोपण केलें, असें म्हणावयाला हरकत नाही. अेका प्रकारची संघटना निर्माण व्हावी, तिचा विकास होत जावा, मग तिच्या ऱ्हासाला आरंभ व्हावा आणि शेवटीं तिचा विनाश व्हावा; तिच्या जागीं नवी, अधिक निर्दोष, अधिक बुद्धिप्रधान संघटना यावी आणि तिनेहि निरनिराळ्या अवस्थाक्रमांतून जावें, असा यानंतरचा सगळा अितिहास आहे. कोणत्याहि विशिष्ट कालमर्यादाबद्ध अुदा०— ग्रीक किंवा रोमन-सुधारणेचें स्थैर्य हें तिला आधाररूप असलेल्या 'संघटना-प्रवृत्ती'ला बुद्धि-पूर्वक अुत्तरोत्तर अधिकाधिक नियमबद्ध संघटनांकडे वळवण्याच्या अवश्यकतेची सतत जाणीव ठेवण्यावर अवलंबून असतें. मनुष्याच्या कर्तृत्वाच्या क्षेत्रांचें— धार्मिक, सामाजिक, राजकीय, आर्थिक अित्यादि विविध क्षेत्रांचें— पोषण करीत करीत आणि आपल्याच कार्यसिद्धीच्या फलांवर स्वतःचें पोषण करून घेत घेत, ही 'संघटना-प्रवृत्ति' अनेक अवस्थांमधून जाअून आज आपल्या या युगांत दोन विरुद्ध भासणाऱ्या रूपांत परिणत होअून प्रकट झालेली दिसते. तीं रूपें म्हणजे फॅसिझम् आणि कम्यूनिझम्. आज आतापुरतें जरी या संघटनांचें ध्येय राजकीय-आर्थिकच असल्यासारखें दिसत असलें, तरी त्या वस्तुतः या मर्यादा ओलांडून सबंध मानवी जीवन व्यापणाऱ्या संघटना आहेत आणि आपल्या अधिक व्यापक पद्धतींच्या साहाय्याने आपण सबंध मानवी जीवनाचें स्वरूप बदलून टाकूं, असा त्यांना विश्वास वाटतो.

संघटनेची कल्पना जीवशास्त्रांत अुपयुक्त ठरली आहे; आणि हिच्या साहाय्याने प्राण्यांमध्ये जर सु-प्रजनन यशस्वी झालेलें दिसून आलें आहे, तर तें मनुष्यजातींतहि यशस्वी होअूं शकेल. आजच्या पुष्कळशा अग्रेसर अर्थशास्त्रज्ञांना आर्थिक योजनांची आवश्यकता पटलेली आहे. राष्ट्रसंघ जरी आपल्या कार्यांत अंशतः निष्फळ ठरला असला तरी त्या निष्फळ-तेने सुद्धा आंतरराष्ट्रीय राजकारणांत संघटनेची आवश्यकता आहे हें सिद्ध केलें आहे. मानव-जातिशास्त्राने प्राथमिक अवस्थेतील समाजांतील संघटनांसंबंधी संशोधन केलेंच आहे. धर्माला-सुद्धा आपल्या अीश्वरज्ञानविषयक आणि धर्मसंस्थाविषयक संघटनेची आवश्यकता पटूं लागली आहे. थोडक्यांत सांगायचें म्हणजे "संघटना" हें आधुनिक मानवी विचारांचें ध्येयवचन आहे.

संघटनेचा टेंभा असा पाजळला जात असतांना आणि आपल्या भोवतालच्या जगांत संघटना असली तर हुडकून काढण्याची आणि नसली तर लादण्याची प्रवृत्ति जारी असतांना, खरें पाहिलें तर सौंदर्याच्या आस्वादाला त्यांच्याकडून अडथळा न येतां साहाय्य मिळायला हवें. कारण नाद, गति, रंग अित्यादि माध्यमांची रचनातत्त्वानुरूप केलेली संघटना म्हणजेच कला. आणि ज्या ठिकाणीं संघटना हुडकून काढण्याची प्रवृत्ति आधीच प्रचलित आहे, त्या ठिकाणीं संघटनेचें आकलन अतिशय सहजतेने व्हायला हवें. पण आजच्या प्रेक्षकाच्या बाब-तींत ही गोष्ट घडत नाही हें तर अुघड दिसतें. असें कां? केवळ रूपरचना या दृष्टीने अेखाद्या कलाकृतीकडे पाहिल्यानंतर तिच्याविषयी योग्य ते भाव कां जागृत होअूं शकत नाहीत, याच्या कारणांचा शोध घेतला तर कदाचित् असें आढळून येअील, की कलाकृतींमध्ये अभिप्रेत असलेली संघटना, आणि मनुष्याच्या कार्यसिद्धीच्या वर अुल्लेखिलेल्या अितर क्षेत्रांत अभिप्रेत असलेली

संघटना, यांत मुळांतच भेद आहे. आणि असेंहि वाटूं लागेल, की या दुसऱ्या प्रकारच्या संघटनेला सरावल्यामुळे– तिच्या आहारीं गेल्यामुळे असें वाटल्यास नका म्हणूं– लोकांना पहिल्या प्रकारच्या संघटनेचा बोध होत नाही, अितकेंच नव्हे तर केव्हा केव्हा तिच्या अस्तित्वाचीहि त्यांना जाणीव होत नाही. आणखी थोडासा विचार केला तर वस्तुस्थिति खरीच अशी आहे असें दिसून येअील.

सौंदर्यात्मक ( aesthetic ) घटना आणि अ-सौंदर्यात्मक ( non-aesthetic ) घटना यांत अंतर आहे. सौंदर्यात्मक घटना ही स्वयंपूर्ण असते, तिची अिष्टसिद्धि तन्निष्ठच असते. अितर घटना ही तिच्यापेक्षा वेगळ्या अशा ध्येयाचें साधन असते, त्या ध्येयाच्या सिद्धीसाठीच ती घटना अस्तित्वांत येते आणि हें जें बहिर्गत ध्येय तें साधण्यांत तिचा ज्या प्रमाणांत अुपयोग होअील त्या प्रमाणांत तिचें महत्त्व असतें. ( या ठिकाणीं मी सौंदर्येतर घटनांमध्ये तर्कात्मक घटनेचा [ logical organization ] अंतर्भाव करीत नाहीं. कारण ज्या तत्त्वावर मी आता वर दिलेली भिन्नता निदर्शनास आणीत आहें, त्या तत्त्वाप्रमाणे तर्कात्मक घटना ही सौंदर्यात्मक घटनेशीं समानशील ठरेल. तर्कात्मक घटना आणि सौंदर्यात्मक घटना यांत जो फरक आहे, तो मी अितर ठिकाणीं स्पष्ट करणारच आहें.) सौंदर्यात्मक घटना ही सद्यःफलदायी असते, अुलट तदितर स्वरूपाची जी घटना असते ती अिंद्रिय–किंवा मनोगोचर अनुभवांपासून दूरान्तरित अशा दुसऱ्या अेखाद्या अपेक्षेच्या साफल्याचें किंवा समाधानाचें साधन असते.

अुदाहरणार्थ आपण अेखादें यंत्र घेअूं. हें यंत्र म्हणजे विविध घटकांच्या रचनेने सिद्ध झालेली अेक वस्तु असते. या घटकांची रचना अेका विशिष्ट अुद्देशाने– अुदाहरणार्थ रुळावरून गाडी ओढण्याच्या– केलेली असते. यांतलें अमुक अेक चाक अमुकच ठिकाणीं बसविलेलें दिसतें तें त्या ठिकाणीं बसविलें तरच दृष्टिसुखदायी होअूं शकेल म्हणून नव्हे. त्या संबंध यंत्राला दृष्टिसुखदायक रूप मिळावें म्हणून नव्हे; तर त्या यंत्राचा जर अेंजिनासारखा अुपयोग व्हावयाला हवा असेल, तर तें त्याच ठिकाणीं असावयाला पाहिजे म्हणून. कदाचित् त्या ठिकाणीं असलेलें तें चाक डोळ्यांना अगदी नकोसें होत असेल. आणि त्या अेका चाकामुळे अेरव्ही सुरेख दिसूं शकणारें त्या यंत्राचें स्वरूप अगदी बेढबहि दिसत असेल. आणि अेखाद्या खऱ्या कलावंताला त्याचें चित्र काढावयाचें झालें, तर त्याला तें चाक आपल्या चित्रांतून अजीबात वगळावें लागेल, किंवा ठेवावयाचेंच झालें तर तो बेढबपणा नाहीसा होअील अशा बेताने त्याचा किंवा सबंध यंत्राचा ढंगच त्याला बदलावा लागेल. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे, चक्रहीन यंत्र ही अेक (समाधानकारक) रूपात्मक रचना– (formal organization) अेक सौंदर्यात्मक रचना– होअील, आणि चक्रयुक्त यंत्र ही अेक सौंदर्येतर (समाधानकारक) साधनात्मक रचना– अेक अ-सौंदर्यात्मक रचना– होअील.

तसेंच कांही धार्मिक संस्कार आणि विधि यांमध्ये देवतांना प्रसन्न करण्यासाठी विहित असलेले असे क्रियात्मक अंगविक्षेप करावे लागतात. या बाबतींत या अंगविक्षेपांचें महत्त्व ते आपलें विशिष्ट अुद्दिष्ट साधतात म्हणूनच असतें. तें करण्यामध्ये समाधान वाटतें याचें कारण अेवढेंच, की या विशेष क्रियात्मक अंगविक्षेपांमुळे देवतांचा प्रसादलाभ आणि कोपनिरास होतो असा भाविकांचा विश्वास असतो. अेरव्ही हेच अंगविक्षेप कदाचित् बेडौल किंवा किळसवाणेहि वाटण्यासारखे असूं शकतील. परंतु या अंगविक्षेपांना जेव्हा केवळ स्वतःची अशी अर्थवत्ता ( significance ) प्राप्त होतें, म्हणजे हे अंगविक्षेप किंवा अभिनयविशेष यांमधून शरीराचें आणि अवयवांचें लयबद्ध लास्य निर्माण होतें, व म्हणूनच त्यांपासून समाधान वाटूं लागतें, त्याच क्षणाला हे अंगविक्षेप नृत्य या संज्ञेला पात्र होतात आणि सौंदर्यात्मक रचनाविशेष ठरतात.

तेव्हा सौंदर्येतर रचनाविशेषांचें व्यवच्छेदक लक्षण सांगायचें झालें, तर तें असें सांगतां येअील, की त्यांचें अुद्दिष्ट तद्‌बाह्य-तदितर असें असतें. राजकीय जीवनामध्ये प्रातिनिधिक संस्था निर्माण करण्याचा अुद्देश, बहुसंख्यांच्या अिच्छेचा परिणामकारक प्रभाव पडावा हा असतो. अेकीकडे अुत्पादन आणि दुसरीकडे वांटणी किंवा खप यांचा तोल सांभाळावा, हा आर्थिक योजनेचा अुद्देश असतो. अशींच आणखीहि अुदाहरणें देतां येतील. मला ज्या मुद्याचें विशेष प्रतिपादन करायचें आहे तो असा, की अेखादा रचनाविशेष ज्या मर्यादेपर्यंत आणि ज्या प्रमाणांत प्रेक्षकाचें अवधान अितर सर्व अप्रस्तुत विचारांपासून परावृत्त करून सर्वस्वीं आपल्याकडे, केवळ आपल्याच अंगभूत गुणांच्या आधारावर, आपण रूपरचनेच्या कांही नियमांना अनुसरून घडविले गेलों आहों अेवढ्याचसाठी— ओढून घेअून गुंतवून ठेवूं शकेल, त्या मर्यादेपर्यंत आणि त्या प्रमाणांत, तो रचनाविशेष सौंदर्यात्मक ठरेल. सौंदर्यात्मक रचनेच्या अवलोकनापासून प्राप्त झालेला सौंदर्यात्मक अनुभव ही अेक अिष्टसिद्धिच (attainment) असते; अुलट सौंदर्येतर रचनाविशेषापासून प्राप्त होणारा सौंदर्येतर अनुभव, हें अिष्ट सिद्धीचें अेक साधन असतें. पूर्वोक्त रचनाविशेष आपल्या पलीकडे पाहत नाही, पण अुत्तरोक्त रचनाविशेष हा नेहमी साधनरूपच असल्यामुळे प्रायः बहिर्मुखच असतो.

कोणताहि रचनाविशेष किंवा घटनाविशेष पाहिला, की त्याच्या अुपयुक्ततेचा अूहापोह करून त्याची अेखाद्या हेतूशीं सांगड घालण्याची जी माणसाची स्वाभाविक प्रवृत्ति, तिच्यामधूनच कलेसंबंधीच्या सर्वसामान्य दृष्टींतील हेत्वाभासात्मक दोष अुत्पन्न झालेले आहेत. आणि जीवनकलहाच्या सद्यःकालीन तीव्रतेमुळे या अुपयुक्तताशोधनाच्या प्रवृत्तीला अवास्तवच महत्त्व आलें आहे. अेखाद्या रचनाविशेषाला — मग ती रचना रंग आणि रेषा यांची असो, स्वरांची असो, किंवा अितर अिंद्रियगोचर विषयांची असो — अुपयुक्ततेच्या महत्त्वाखेरीज रूपरचनात्मक अशी स्वतंत्र अर्थवत्ता (significance) असूं शकते, ही गोष्ट अेकदा अुमगली म्हणजे मग कला आणि नीति, कला आणि प्रतिबिंबवाद (representation), कला आणि सृष्टवस्तुदर्शन, सुरूपता आणि विरूपता अित्यादि सगळे प्रश्न सुटावयाला अवकाश लागणार नाही. आणि हे सगळे प्रश्न अुद्‌भवण्याचें कारण म्हणजे, आपली नेहमीच्या अनुभवांवरून अशी अेक कल्पना झालेली असते, की ज्या अर्थी सौंदर्येतर रचनाविशेषांमुळे आपले कांही विशिष्ट अुद्देश साधतात, (आणि आपल्या अनुभवांत यांचेंच प्रमाण मोठें असतें,) त्या अर्थी सर्वच रचनाविशेषांच्या मागे कांहीतरी विशिष्ट अुद्देश असला पाहिजे कलेने मनुष्याला अुदात्त केलें पाहिजे — म्हणजे नैतिक ध्येय साधलें पाहिजे, कलेने सृष्टीचें यथावत् दर्शन घडवलें पाहिजे — म्हणजे फोटोग्राफीचें कार्य साधलें पाहिजे, कलेने तत्तत्कालीन चित्प्रवृत्तीचा (spirit) आविष्कार केला पाहिजे — म्हणजे अितिहासाचें साधन झालें पाहिजे, अशा कलेसंबंधी अनेक अपेक्षा व्यक्त केल्या जातात. अेखाद्या रचनाविशेषाच्या मागे अेखादा व्यावहारिक किंवा अुपयोगरूप हेतु पाहण्याची अनिवार्य प्रवृत्ति हेंच कलेच्या रसास्वादाच्या मार्गांतलें पहिलें आणि सकृद्दर्शनीं अनुल्लंघनीय विघ्न होअून बसलें आहे.

आजच्या सुधारलेल्या जगाचें — आणि म्हणूनच आधुनिक विचाराचें — घटना हें जसें अेक वैशिष्ट्य आहे तसेंच विशेषज्ञता (specialization) हें त्याचें दुसरें वैशिष्ट्य आहे. मनुष्याला जी विशेष प्रकारची शरीररचना आणि विशेष अवयव अित्यादि प्राप्त झालीं आहेत, तीं भिन्नता (differentiation) आणि विशेषविकास (specialization) यांमुळेच. (Renaissance) पासून — विशेषतः विविध शास्त्रांची झपाट्याने प्रगति होत असतां, संशोधनाने सिद्ध झालेल्या तत्त्वांचा व्यवहारांत प्रत्यक्ष अुपयोग केला गेल्यामुळे औद्योगिक क्षेत्रांत गेल्या शतकांत

क्रांति घडून आली, व तेव्हापासून मानवी जीवनांत जी वाढती गुंतागुंत अुत्पन्न होत गेली, तिच्यामुळे संशोधनाचें– किंवा कार्याचें– क्षेत्र आकुंचित करून घेअून त्या त्या क्षेत्रांत विशेष ज्ञान किंवा कौशल्य संपादणें भाग पडूं लागलें. आणि आज तर "अुत्तरोत्तर आकुंचन पावणाऱ्या क्षेत्रामध्ये अुत्तरोत्तर वाढतें ज्ञान मिळवणारा" तो विशेषज्ञ, अशी व्याख्याच होअून बसली आहे. आणि खरें म्हणजे आपल्या विचारांना वळण लावणाऱ्या आणि आपला दृष्टिकोण निश्चित करणाऱ्या, आजच्या सुधारणेच्या या दुसऱ्या वैशिष्ट्याचाहि, पहिल्या, "घटना" या वैशिष्ट्याप्रमाणेच, आपल्या कलादृष्टीवर हितावह परिणाम व्हायला हवा होता. मानवी कर्तृत्वाच्या अितर क्षेत्रांमध्ये विशेषज्ञतेची आवश्यकता मान्य करणाऱ्यांना वास्तविक हें पटावयाला हवें होतें, की कलेच्या क्षेत्रांत देखील कांही थोड्या लोकांनाच अेखाद्या कलाकृतीचा पूर्ण आस्वाद घेतां येअील किंवा सौंदर्यबोध होअूं शकेल. प्रत्येकालाच हें साधेल असें नाही; पण विशेषज्ञतेच्या आवश्यकतेच्या कल्पनेचा कलामीमांसेवर असा अिष्ट परिणाम व्हावयाचें दूरच राहून कलेच्या मीमांसाक्षेत्रांतील विशेषज्ञतेचा अर्थ, चित्रसंग्रहालयांतील चित्रांची वर्गवारी किंवा विभागणी करण्याच्या पद्धतीची वृत्ति, असा होअूं लागला. आणि याच प्रवृत्तीविरुद्ध Prof. Dewey नी आपल्या Art as Experience या पुस्तकांत टीका केली आहे.

Prof. Dewey ची टीका अर्थात् योग्य प्रकारच्या विशेषज्ञतेला लागू पडणार नाही. अत्यंत तीव्र अशा सौंदर्यसंवेदनेवर आधारलेल्या विशेषज्ञतेला ती बाधणार नाही. कलेच्या क्षेत्रांत अशाप्रकारच्या विशेषज्ञतेलाच स्थान आहे, ही गोष्ट आपल्या लक्ष्यांत आली नाही, याचें मला कारण दिसतें तें असें. मानवी जीवनांत विशेषज्ञतेचें महत्त्व जसें वाढूं लागलें, तसें मानवी कर्तृत्वाचें अेक अेक क्षेत्र सामान्य मनुष्याच्या निर्णयकक्षेच्या बाहेर जाअूं लागलें. त्यामुळे त्याला असें वाटूं लागलें, की आपण कलेलाच आता घट्ट बिलगून राहावें आणि त्या क्षेत्रांत आपल्या व्यक्तिगत निर्णयाला, न्यायसिद्ध प्रामाण्य नाही तरी, निदान काही विशिष्ट महत्त्व असल्याचा हक्क सांगावा. सापेक्षतावाद किंवा Quontum Theory आपल्याला कळत नाही याचें त्याला कांही वाटत नाही; दोन अर्थशास्त्र्यांचा वाद चालू असतां ते काय बोलताहेत हें न कळल्यामुळे गोंधळून गेल्याचें त्याला दुःख होत नाही; अेखाद्या प्रचंड कारखान्यांत गेला असतांना तेथील कारागिरांचें आपापल्या कामांतील कौशल्य पाहून तो स्तिमित होअील पण त्यांच्यावर रुष्ट होणार नाही; पण त्याला जर कुणीं सांगितलें, की तो ज्या गाण्याची किंवा चित्राची प्रशंसा करतो आहे, तें त्या प्रशंसेला पात्र नाही, किंवा असलें तरी ज्या कारणाकरिता तो त्याची प्रशंसा करतो त्या कारणाकरिता तें प्रशंसनीय नाही, तर तो अेकदम अुसळेल आणि ठासून सांगेल, की कलेच्या बाबतींत सामान्य माणसाचा अधिकार आक्षेपातीत असतो. आणि आपल्याकडे अधिकार घेण्याच्या या प्रवृत्तीला अँग्लो-सॅक्सन कायदेशास्त्रांत 'सामान्य माणसा'च्या मताला आणि निर्णयाला विशिष्ट मान किंवा महत्त्व देण्याची जी प्रवृत्ति आहे, तिचाहि पाठिंबा मिळाला आहे. आणि लोकसत्तेसंबंधीच्या कल्पनांमुळे तर या प्रवृत्तीला अेखाद्या धर्मसूत्राचें पावित्र्य लाभलें आहे. 'सामान्य माणसा'संबंधीच्या या कल्पनेचा कायद्यांत काय अुपयोग असेल तो असो, पण सौंदर्याच्या क्षेत्रांत तिचा शिरकाव झाला तर ती नुसता गोंधळच अुत्पन्न करते असें नाही, तर तिच्यामुळे कलाकृतींच्या भ्रममूलक रसावबोधाला भलतेंच महत्त्व चढतें. आपल्या सिद्धांतांच्या प्रामाण्यासाठी सामान्य माणसांच्या तोंडाकडे पाहण्याचें सोडून देअून, गाढ आणि विशुद्ध सौंदर्यसंवेदनेने युक्त अशा व्यक्तींच्या समाधानाकडे कलामीमांसा जितक्या लवकर वळेल, तितकें तें तिला आणि सामान्य माणसालाहि हितावह होअील.

आपल्या कलासंवादामध्ये बिघाड अुत्पन्न करणारी आणखी अेक गोष्ट म्हणजे कला-मीमांसेला मतप्रचाराचें साधन करण्याचा मोह. कोणत्याहि रचनेमागे अुद्देश शोधणाऱ्या पहिल्या प्रकारच्या स्वरूपाचीच हीहि गोष्ट आहे; पण तिच्यांत व हिच्यांत फरक हा, की पहिलीचा कल व्यावहारिक अुद्देशाकडे झुकलेला असतो तर हिचा जरा तात्त्विक अुद्देशाकडे. रॉबर्ट बायरन् यांनी मे १९३२ च्या Architectural Review मधील अेका लेखामध्ये मास्कोमधील चित्रसंग्रहासंबंधी जें लिहिलें आहे, त्यांतला सर मायकेल सॅड्लर् यांनी अुतरून घेतलेला भाग मी पुढे देत आहें. मि. रॉबर्ट बायरन् म्हणतात, की मास्कोमध्ये "आधुनिक फ्रेंच चित्रांचे अत्यंत अुत्कृष्ट आणि प्रातिनिधिक स्वरूपाचे असे संग्रह आहेत. आणि 'संस्कृतींचा विशेष लाभ न झालेल्या प्रेक्षकांना रसग्रहणाला साहाय्य व्हावें म्हणून प्रत्येक दालनाच्या दारावर पुढील-प्रमाणे छापील खुलासे लावलेले आहेत.

| (कलावंत) | (संस्कृतिकाल किंवा प्रकार) |
|---|---|
| Monet : | मांडवलशाहीचें साम्राज्यशाहींत संक्रमण होत असतांनाचा कालखंड. औद्योगिक धनिक वर्गाची अभिरुचि. |
| Cezanne : | साम्राज्यशाहीचा प्रारंभकाल. औद्योगिक धनिकवर्गाची अभिरुचि. |
| Gauguin : | शेअरवरील नफ्यावर, पैशावरील व्याजावर अित्यादि अुपजीविका करणाऱ्यांची अभिरुचि. |
| Van Gogh : | अल्पमांडवली धनिकांची अभिरुचि. |
| Signac : | वरिष्ठ श्रेणीच्या औद्योगिक धनिकवर्गाच्या प्रभावाखाली असणाऱ्या कनिष्ठ आणि मध्यम धनिकवर्गाची अभिरुचि. |
| Matisse : | विकृत साम्राज्यशाहीचें युग. नफ्यावर अुपजीविका करण्याची अभिरुचि." |

ही विल्हेवारी कदाचित् कोणाला अगदी अडाणी वाटण्याचा संभव आहे; परंतु लाल सरकारच्या पगारी मीमांसकाचा ठराविक पद्धतीने अुपहास करूं लागण्यापूर्वी, कलाकृतीच्या दर्शनाने आपल्या ठिकाणीं कोणती सौंदर्यात्मक प्रतिक्रिया जागृत होते, आणि धंदेवाअीक मीमांसक कलावृत्तींचें कशा प्रकारें विवेचन करतो, याचा थोडा विचार करून पाहणें बरें होअील. आपण जर प्रचार या शब्दाचा अर्थ थोडा व्यापक करून त्यांत नुसत्या राजकीय ढोलपिटीचाच नव्हे तर सर्व प्रकारच्या अुपदेशकतेचाहि अंतर्भाव केला, तर आपल्याला कबूल करावें लागेल, की आपल्या आजपर्यंतच्या बव्हंश कलामीमांसेचें स्वरूप प्रचारप्रधानच असे व आजहि आहे. या कलामीमांसेचें परमोच्च स्वरूप म्हणजे कलेचें काव्यात्म (lyrical) रसग्रहण ठरतें, आणि मग सगळे लोक या मीमांसेचीं स्तवनें गाअूं लागतात. पण त्यांच्या हें लक्ष्यांत देखील येत नाही, की कलेचा असा अर्थ लावतांनाच आपण तिचें अस्तित्व अनर्थावह करून सोडीत आहों. लाल टीकाकार आणि कम्युनिस्ट विचारसरणी यांच्यावर झोड अुठवण्यासाठी बाह्या सारून पुढे सरसावणाऱ्या बऱ्याच लोकांना या गोष्टीचें मानहि नसतें, की आपण जेव्हा आपल्या धार्मिक किंवा नैतिक विचारपरंपरेला अनुसरून बनलेल्या पूर्वग्रहानुरूप कलेचा अर्थ लावतों, तेव्हा आपणहि स्वतः त्याच मोहाला बळी पडून त्याच पापाचे धनी होत असतों.

अशा या विचारपरंपरावश कलामीमांसेला अेक प्रकारची अुदात्ततेची किंवा अुन्नततेची, झिलई चढलेली असल्यामुळे ती विशेषच घातक ठरते. अडाणबट राजकीय प्रचाराची अप्रस्तुतता आपोआपच अुघडकीला येते. परंतु बंगाली कलेतील गूढवादाची किंवा

धार्मिक प्रतीकात्मतेची जी स्तुति होते, ती भ्रामक कलामीमांसा आहे, ही गोष्ट आपल्या नजरेंतून तशीच निसटून जाते, याचें कारण गूढवाद, धार्मिक किंवा नैतिक भावना यांच्यामध्ये कांही तरी सूक्ष्म अपूर्वता आहे, असे आपल्याला वाटतें हें होय. सौंदर्यानंदाच्या गूढ निर्झरांना संपन्न करतोंसें दाखवून त्यांमध्ये विष कालवणारे हे पूर्वग्रह कलामीमांसेमध्ये अितके माजले आहेत, की त्यांनी आपलें असें अेक कलेचें अंतिम मान ठरवलें आहे. या "काव्यात्म कलामीमांसेचे" (lyrical interpretation) मुख्य साधन म्हणजे सुश्लिष्ट पदन्यास, ओघवती गद्यरचना. यांचा प्रवाह आपल्या निर्णयांच्या असंबद्धतेची बिल्कुल क्षिति न बाळगतां, बेदरकारपणें, मादक आत्मानंदाचे आणि भंगुर आध्यात्मिक अुल्लासाचे फेनपुंज अितःस्ततः अुधळीत अनिरुद्ध चाललेला असतो. मजकूर समजण्याला कठिण, आणि लेखनांत लालित्य नाही, अेवढ्या सबबींवर अेखादा सौंदर्यशास्त्रविषयक ग्रंथ कुचकामाचा ठरवण्यापर्यंत मजल मारणारे समीक्षकबुवहि नाहीत असें नाही! कलेंत व्यक्त होणाऱ्या भावांसंबंधीच्या मंजुगुंजनामध्ये "या गोष्टी अप्रस्तुत आहेत," असें बोलणारे निषेधस्वर निमज्जन पावतात आणि ज्या ठिकाणीं वास्तविक चित्र, मूर्ति, गीत किंवा वास्तु यांचा रसास्वाद घ्यावयाचा त्या ठिकाणीं लोक काव्याचा शोध करूं लागतात. बहुतेक लोकप्रिय चित्रें किंवा पुतळे यांना दिलेलीं नावें पाहिलीं किंवा अेखाद्या कलाकृतीसमोर अुभ्या असणाऱ्या प्रेक्षकांचे अनिच्छया बाहेर पडणारे निर्णयोद्गार विचारांत घेतले, तर आपल्याला असें दिसून येअील, की रशियाचा सरकारी मीमांसकच लाल आहे असें नव्हे, तर आपल्यापैकी प्रत्येकामध्ये लाल रंगाची अेक छटा असतेच.

आतापर्यंत मीं बाह्य जगाशीं संबद्ध असलेल्या घटकांचा विचार केला; आणि हे घटक मनोव्यापारांच्या कक्षेत येअून कलेचा आस्वाद आणि सौंदर्याची मीमांसा यांशीं संबंध असलेल्या मनोव्यापारांच्या आड कसे येतात तें सांगितलें. परंतु या सर्व अनर्थांचें मुख्य कारण म्हणजे कलेची मीमांसा करूं पाहणारांची बौद्धिक आणि भावात्मक (emotional) संकुचितता. मी व्यवसायी लेखका (Journalists) विषयी बोलत नाहीं. त्यांच्या हातून प्रमाद झाले, तरी त्याला तशीं कारणें असतात. आपल्या विचारांप्रमाणे लोकांची अभिरुचि वाकविण्याअैवजी लौकिक अभिरुचीपुढे वाकावें लागणें, त्याच त्या गोष्टी अुगाळीत बसावें लागणें, यामुळे त्यांच्या संवेदनेची धार साहजिकच बोथटते. परंतु जे लोक स्वयंस्फूर्तीने आणि जाणूनबुजून कलामीमांसक किंवा सौंदर्यसमीक्षक होअूं पाहतात, त्यांना असली कोणतीहि सबब नसते. कारण कोलरिजचा अनुवाद करून असें म्हणतां येअील, की "सर्वांनी— किंवा बऱ्याच लोकांनी— तत्त्वज्ञानी होण्याची शक्यता नाही आणि आवश्यकताहि नाही. सर्व विचारशील (आणि संवेदनशील) प्राण्यांच्या ठिकाणीं आढळणारी जी तात्कालीन संज्ञा (spontaneous consciousness) तिच्याखाली किंवा तिच्यामागे दडून बसलेली अशी अेक तत्त्ववित् संज्ञा (philosophic consciousness) [आणि अेक सौंदर्यसंज्ञा (Aesthetic consciousness)] ही असते.'' (चौकटी कंसांतील शब्द माझे आहेत.)

सौंदर्यसंज्ञेचा मूळ अभाव पुरेसा नाही म्हणून कीं काय, त्याच्या भरीला हा आधुनिक कलामीमांसक ज्यांचा नक्की अर्थ कळून घेण्याचा त्याने कधीच प्रयत्न केलेला नाही, असे सुलभ ढंगदार शब्द वापरण्याचें पाप करतो. तार्किक किंवा मानसशास्त्रीय सूक्ष्म भेदाची त्याला दखलहि नसते; जणूं काय त्याच्या मतें संदिग्धता हेंच सौंदर्यसमाधीचें रहस्य. रूढ असलेल्या आयत्या कल्पना वापरावयाच्या, त्याच्या अंतःस्वरूपासंबंधी कधी विश्लेषण— परीक्षण करावयाचें नाही, आणि पारंपारिकता आणि अुताऱ्यांचा खच म्हणजे विद्वत्ता अशी याची समजूत. आजच्या

बव्हंश कलामीमांसेमध्ये सारासार-विवेचनशक्तीचा अभाव अुघडकीस येतांना दिसतो; आणि शेक्सपिअर, शेली, कीट्स्, ब्राअुनिंग आणि क्वचित् गअेटे किंवा डांटे यांच्या वचनांचा शिडकावा करून लोकांचें लक्ष्य वेधण्याचा किंवा दिशाभूल करण्याचा प्रयत्न होतांना दिसतो. "निसर्ग" "अनुभव," "सौंदर्य," "सत्य," "माध्यम," "आध्यात्मिक," "प्रतिमा," अित्यादि शब्द, जणूं कांही त्यांचा अर्थ स्पष्ट, सोपा, सुगम, आणि सर्वमान्य आहे अशा आविर्भावाने वापरले जातात. मध्ये कांही काळपर्यंत "Empalty" या शब्दाचें असें स्तोम माजलें होतें, की जणूं काय या मंतरलेल्या ताअीतापुढे सर्व कलाविषयक प्रश्नांच्या मुतांची बाताहत होत असे, आणि आजसुद्धा हा शब्द वापणाऱ्यांपैकी क्वचितच कोणी त्याच्या अर्थाचा सांगोपांग विचार करतो.

आपल्या स्वतःच्या किंवा अितर विश्वासार्ह व्यक्तींच्या सौंदर्यदर्शनजन्य अनुभवांच्या अधाराने सामान्यपणें कलेचें किंवा विविध कलांचें परमरूप कसोशीने पारखणें, त्याची शहानिशा करणें, आणि ज्या वर्गीकरणाच्या आधारावर सौंदर्यमीमांसेची सशास्त्र अुभारणी होअूं शकेल, त्याचें आकलन आणि आविष्कार करणें, ही प्रत्येक सौंदर्यमीमांसकाच्या आवाक्यांतली गोष्ट आहे. सौंदर्यदर्शनजन्य किंवा तत्सम अनुभव यांचें विश्लेषण केलें, तर तो किंवा तसला अनुभव घेण्याची पात्रता हळुहळू कमी होत जाते, असा अेक समज रूढ असलेला दिसतो पण यांत कांही तथ्य नाही. अशा प्रकारच्या विश्लेषणाला हवे असलेले बौद्धिक श्रम तर करायला नकोत, पण आपला कलामीमांसक म्हणून लौकिक तर राहिला पाहिजे असें ज्यांना वाटतें, तेच असल्या युक्तिवादाने स्वतःचें समर्थन करूं पाहतात. आधुनिक कलामीमांसेमध्ये विश्लेषणाचा अभाव असतो. या गोष्टीवर मी फाजील हल्ला चढवतों आहें असें कुणाला वाटेल; तसें होअूं नये म्हणून अेका प्रोफेसराने लिहिलेलें अेक वाक्यच येथे अुतरून घेतों. तो म्हणतोः— "आपल्या सौंदर्यभावनेचें समाधान करूं शकेल अशा रूपामध्ये सौंदर्याचा आविष्कार म्हणजे कला." आता आपण यावर विचार करूंः—सौंदर्याचा आविष्कार म्हणजे कला; म्हणजे कलेमध्ये आविष्कृत होण्यापूर्वी सौंदर्य कुठे तरी अस्तित्वांत असलें पाहिजे; कुठे?... अशा! रूपामध्ये सौंदर्याचें अविष्करण, मूर्तीकरण म्हणजे कला; म्हणजे कलेमध्ये आविष्कृत होण्यापूर्वी सौंदर्य अशा रूपामध्ये असलें पाहिजे, की ज्या रूपामध्ये आपल्या सौंदर्यभावनेचें समाधान होअूं शकत नव्हतें. मग सौंदर्य म्हणजे तरी काय? आणि हेच प्रोफेसर म्हणाले की, "या व्याख्येला सर्वांची मान्यता आहे!" असें नसेल अशी मी आशा करतों. अितर ठिकाणीं, चांगल्या दर्जाच्या लेखनामध्येसुद्धा, अविश्लिष्ट कल्पनांवर केवळ पांघरूण घालणारें असलें विवेचन करण्याचा प्रयत्न केलेला दिसून येतो. या प्रकारचें लेखन विशेष घातक असतें. कारण वास्तविकपणें कोणत्याहि प्रकारचें स्पष्टीकरण झालेलें नसतांना वाचकांच्या मनामध्ये मात्र स्पष्टीकरण झाल्याचा आभास अुत्पन्न होतो. आणि या फसवणुकीमुळे लोकांवर अेक प्रकारची वांझोटी सौंदर्यमीमांसा लादली गेली आहे.

सौंदर्याचें साक्षात् आकलन किंवा आस्वादन होणें, आधुनिक माणसाला ज्या कारणांमुळे कठिण जातें, त्यांपैकी कांही महत्त्वाच्या कारणांचें दिग्दर्शन करण्याचा मीं वर प्रयत्न केला आहे. आपल्या विचारसृष्टीमध्ये घरें करून राहिलेले हे अडथळे दूर होअून आपण सौंदर्याचा निर्विघ्न, सहजस्फूर्त, आस्वाद घेण्याला जोंपर्यंत समर्थ होत नाही, तोंपर्यंत आपलें रसग्रहण नकलीच राहणार.

---

# राष्ट्रकूटकालीन मराठी

## क्रियापद-विचार*

(लेखक— श्री. ग. वा. तगारे, अेम्. अे., बी. टी.)

**आज्ञार्थ :—**

प्र .पु. पुष्पदंताच्या ग्रंथांत पुढील आज्ञार्थीची रूपें आढळतात.

द्वि. पु. ए. व.– पठ्ठवहि (ना. च. ४-१४-१) खाहि (य. च. २-९-७) लक्खहि (म. पु. २-५-२)

दक्खवहिं (ना. च. १-१४-२) आयण्णहिं (ना. च १-३-१), पेच्छि (य. च. ३-३३-१०) हरि (य. च. १.९.१४) करि, करे (ना. च. १-३-१०; ९-१७-२५) आणेहु, पूरेहु (य. च. १-८-४) णिसुणहुं (य. च. ३-११-१४) बीहसु (य. च. १-१५-५) गच्छसु (य. च. २-३-५) हणसु (ना. च. ३-३-१४) हणु (ना. च. ४-७-१२) चडु (ना. च. ३-२६-६) आउ, जाहु (म. पु. १-६-२) पसाहेह (य. च. १-१८-१०) जय (य. च. १-२-१)

द्वि. पु. अ. व.– जंपह, धरह (य. च. ४- ९-३) कुणहं, मुणहं, ठवहं (य. च. ४-८-५-१५)

तृ. पु. अे. व.– मुक्कअु (म. पु. १-८-७) डज्झअु (ना. च. ३-१५-५) गमअु (य. च. २-२.३) हो (य. च. २-१-१७)

याच रूपांना सदृश रूपें ज्ञानेश्वरकालांतील धातूंचीं होतात. अुदा. द्वि. पु. अे. वचन करीँ, जाण, कर जाणैँ, आअिकै (आअिके + अिँ =आअिकेहिं), अुपसाहे, जाणसु, देअीं, दे अित्यादि.

द्वि. पु. अ. वचनः— देखाँ, धरा, देयाँ, नेयाँ, अि.

तृ. पु. अे. वकनः— जळो, अवधरिजो, करो, करू अि.

(राजवाडे ज्ञाने. व्याकरण पृ. ७९-८०)

**प्रत्ययांची तुलना :—**

पुढील तुलनात्मक कोष्टकावरून हा मुद्दा अधिक स्पष्ट होओील.

| | संस्कृत | प्राकृत | पुष्पदंत | ज्ञानेश्वर अर्वाचीन मराठी |
|---|---|---|---|---|
| प्र. पु. | | | | |
| द्वि. पु. | धि, हि | हि | हि, हिं, अि, अे. | अे, अिँ, अि. |
| अे. व. | ० | | सु, हु, हुं, अु | सु, अु |
| | | | (अे) ह, अ | ० अथवा अ (आधुनिक मराठी) |
| द्वि. पु. | | ह | ह, हं | आ, आं |
| तृ. पु. अे. व. | तु | अु | अु | अू, ओ |

मराठींतील आज्ञार्थ संस्कृत प्राकृत या परंपरेने आला याबद्दल फारसा मतभेद नाही.

**विध्यर्थ :—**

पुष्पदंत वाङ्मयांत विध्यर्थास कर्मणि प्रयोगाप्रमाणे अिज्ज हें विकरण लागलेलें दिसतें आणि नंतर वर्तमानकाळीं प्रत्यय लागतात. वाक्यरचनेवरूनच केवळ हा विध्यर्थ आहे, कर्मणि

* अंक ५८ वरून समाप्त.

प्रयोग किंवा आज्ञार्थ नव्हे हें सांगतां येतें. अुदा. परियणु दाणें संतोसिज्जाअि (परिजनाला दानानें संतुष्ट करावें) ना. च. ३-३-१०. संथारु सोहेअि अुग्गमियसूरम्मि (सूर्योदयानंतर अंथरूण सोडावें) ना. च. ९-२०-११. सोचेय दिणे एक्कु (अेक दिवस शोक करावा) ना. च. ९-२०-१२. तसेंच कज्जणासु कज्जू ण विरअिज्जअि (कार्यनाश करूं नये) ना. च. ३-२-१४. तसेंच यशोधर चरितांत ३-३१-८-१० मधील चिंतिज्जअि, वंदिज्जअि, वंचिज्जअि, अि. प्रयोग विध्यर्थी आहेत. त्यांची कर्मणिप्रयोगाबरोबर गल्लत करतां येत नाही.

**प्रयोजक** (णिजन्त):—

दुसऱ्याकडून अेखादी क्रिया केलेली दर्शविण्यास पुष्पदंत धातूंना "अव" हें विकरण लावून मगच पुढचे प्रत्यय त्यांना लावतो. (पाहा Bloch-FLM§२३२.) अुदा. चड = चढणें, चडावहि (ना. च. १-४-१) नच = नाचणं णच्चावअि (य. च. १-५-१८) वज्जावअि, अुड्+डी चे अुडावअि (ना. च. ३-१५-८) भेसावअि (म. पु. २-१४-१) कधी कधी धातूलाच गुण किंवा वृद्धि हे विकार होअून प्रयोजकाचें अंग तयार होतें. अुदा. फिट = फेड, मण = माण, फुट = फोड, अि. क्त प्रत्ययापूर्वीसुद्धा धातूंत हे फेरफार झालेले आढळतात. अुदा. अुल्लाविय (म. पु. २-१३-२ ना. च. ३-९-१४) बोल्लाविय (म. पु. ४-४-९) अि. याशिवाय भृशार्थे देदेहि (ना. च. ६-१२-११) अुट्टुट्ठु (य. च. ४-४-९) = अुठअूठ अुब्भुब्भु. (य. च. ३-११-१२) अुभाअुभा, अि. प्रयोग पुष्कळच आढळतात. सळसळ, झणज्झण, घमघम अि. ध्वनिवाचक (Onomatopoetic) धातू व चंकम ढंढल्ल अि. पौनःपुन्यार्थक धातू पुष्कळच आहेत. किंबहुना मला या वाङ्मयांत गुमगुम, थरहर, धगधग, मिसमिस, सिमसिम असे धातू अितके आढळले की पुष्पदन्ताने अशांची टांकसाळ अुघडली कीं काय हें कळत नाही. गरुडायते, द्रुमायते, याप्रमाणे रंडमि (ना. च. ४-८-१७) (रण्डा या नामधातूचें वर्तमान काळ प्र. पु. अे. व.) सारखीं स्वतंत्र रूपें मधूनमधून आढळतात.

पुष्पदन्त वाङ्मयांतील ओज व ओघ हें नुकत्याच जन्मास येणाऱ्या भाषेचें स्वरूप नसून यौवनावस्थेंत पदार्पण करणाऱ्या भाषेचें सौंदर्य, माधुर्य व लालित्य त्यांत प्रगट होतें. अेक हजार वर्षांपूर्वीची ती भाषा असल्यामुळे आज ती जरा दुर्बोध वाटेल पण तो त्या भाषेचा दोष नसून मध्यंतरीं गेलेल्या कालाचा परिणाम आहे, अितकेंच.

**कृदन्त**:—

धातूंच्या पूर्ण व अपूर्ण क्रियावाचक रूपांस कृदन्त म्हणतात. त्यांपैकी विभक्तिप्रत्यय घेणारे ते व्ययी व विभक्तिप्रत्यय न घेणारे ते अव्ययी कृदन्त म्हणतात. पुष्पदन्ताच्या भाषेंत वर्तमान व भूतकाळवाचक व विध्यर्थ धातुसाधितें हीं व्ययी कृदंतें व तुमन्त, त्वान्त हीं मुख्यतः अव्ययी कृदन्तें होत.

(१) वर्तमानकाळवाचक धातुसाधितें— हीं विशेषणें असून बहुतेक सर्वांना "अंत" प्रत्यय लागतो. अुदा. वज्जंत (ना. च. ९-२२-६) = वाजत, जगडंत (ना. च. ३-१५-१२) = झगडत, सिज्जंत (य. च. ३-५.१४) = शिजत, सुणंत, कुणंत (य. च. ३-३३-८) अि. हा प्रत्यय लावतांना धातु कोणत्या पदाचा आहे हें पाहत नसत. अुदा य. च. २-३ मध्ये सेविज्जंत हें कर्मणि रूप (सेवसेवा करणें) आढळतें, मागे सांगितल्याप्रमाणे सर्वत्र परस्मैपदाचें राज्य दिसतें. मान प्रत्यय लागलेली सिज्जमाण (य. च. ३-१३-१) = शिजत असलेलें, वीजिज्जमाण (ना. च. २-११-२) कर्मणि— वारा घालत असलेला अि. अशीं रूपें आढळतात पण प्रमाण कमी. अर्वाचीन मराठींत सुद्धा विद्यमान होष्यमाण अशीं मधून मधून रूपें आढळतात पण

त्यांचें प्रमाण कमी आढळतें. तोच प्रकार तेव्हा होता. भू म्हणजे होणें याचीं वर्तमान धा. सा. हुवंत (ना. च. ३-३-१०) होंत (ना. च. ३-१५-१३) हुँत (३-१५-५) होंतअु (य. च. ३-३७-१७) अि. होतात. ज्ञानेश्वर-कालापर्यंत अशीं धातुसाधितें वापरत होते असें होतँ, पावतँ, देतँ होअिजत, म्हणिजत, पाविजत, अि. शब्दांवरून दिसतें. (राजवाडे ज्ञाने. व्याकरण पृ. ९४-९५).

## २ भूतकाळवाचक धातुसाधितें :—

माझ्यासमोर १० व्या शतकांतील ग्रंथगत बोलीचें पृथःकरण असल्यामुळे अल्ल किंवा अिल्ल प्रत्ययान्त भूतकाळवाचक धातुसाधितें नाहीत असें म्हटलें तरी चालेल. हा भूतकाळांतील लकार ८ व्या शतकापासून मराठीचें वैशिष्ट्य म्हणून समजला जातो (अुदा. दिण्णले, गहिल्ले हीं कुवलय मालेंतील रूपें) हें निश्चित आहे. पण महाकाव्यांत वापरण्याअितकी शिष्टमान्यता त्याला १० व्या शतकांत मिळाली नसावी.

माझ्यासमोर असलेल्या भूत. धातुसाधितांत बहुतेक सर्व क्तांत आहेत. आणि त्यांपैकी बऱ्याच धातूंना अिडागम झाला आहे. कै. राजवाड्यांनी काढलेला नियम सकर्मक धातूंचीं निष्ठारूपें अिकारयुक्त करावयाचीं व अकर्मक धातूंचीं निष्ठारूपें अिकारविरहित करावयाची हा या रूपांना लागू पडत नाही. कारण कित्येक सकर्मक धातूंची निष्ठारूपें (आढत्त = आरब्ध, हित्त = हृत (ना. च. २.११.१०) धित्त (य. च. ३.१६.९) = घेतलेला. अि. रूपें अनिट आहेत व रुंजिअ (ना. च. ५.११.२) रहिअ (म. पु. १५.१२.४ = आच्छादित) डोल्लिय (य. च. ४.४.१६)—डोललेला हीं अकर्मक निष्ठारूपें सेट् आहेत.

मला या निष्ठारूपांच्या पृथःकरणावरून असें दिसतें की, (१) सरसकट नामधातूंचीं क्तांत रूपें सेट् आहेत (अुदा. गोंदालिय)– म.पु. १.३.७.= मिळालेले, जमलेले, रंडिय– म. पु. १७.९.१०= विधवा केलेले (विधवीकृत), (२) प्रयोजकांचीं निष्ठारूपें सेट् आहेत. देवाविय (य. च. ४.४.११)= देवविलेले. लिहाविय (ना च. १.१५.१४) लिहाविलेले ("लिखपित" शिलालेखांत आढळते) अि.

(३) बाकी सर्व रूपें धातु+अि+क्त (त=य) अशीं झालेलीं दिसतात अुदा:— ड्डसिय = दष्ट; पच्चारिअ (पाचारलेले), हडाविय (दूर हटवलेले) अि. यांची संख्या बरीच असल्यामुळे हीं रूपें त्या काळीं जास्त प्रचालित होतीं असा तर्क करण्यास काही हरकत नाही.

(४) अनिट् धातूंपैकी बरेच धातु संस्कृतचे प्राकृत केल्यासारखे दिसतात. अुदा. ग्रस्त >घत्थ (म. पु. ९.७.३), अुद्घृष्ट>अुग्घुट्ठ (म.पु. १.५.४) प्रभ्रष्ट>पहट्ठ (य. च. ३.१०.५) व्यापृत>वाअुड (ना. च. १.९.७) अि. अि.

(५) साधर्म्या (analogy) मुळे प्राकृत धातूंचीं संस्कृत सारखीं निष्ठारूपें साधलीं गेलीं आहेत. अुदा. छिव = शिवणें>छित्त (य. च. ३.१४.११) गवेपय=गवसणें, शोधणे>गविट्ठ (म. पु. २.१५.३) खुप = खुपणें>खुत्त (म. पु. ३१.२३.६) अि. अि.

सामान्यतः या पांच प्रकारांनी पुष्पदंत वाङ्मयांत निष्ठारूपें साधलीं गेलीं आहेत. यांना अपवाद, अुपानियम अि. अनेक पुरवण्या जोडतां येतील, पण मुख्यतः क्तांत निष्ठारूपाचें स्वरूप वर दिल्या प्रमाणे आहे.

## (भविष्य)— विध्यर्थ धातुसाधित :—

पुष्पदंताच्या भाषेंत "णार" प्रत्यय लावून होणारें कर्तरि भविष्य कृदंत आढळत नाही. य, तव्य, अनीय व ओलिम या संस्कृत प्रत्ययांपैकीं "तव्य" व (थोड्या प्रमाणावर) "य"

प्रत्यय आढळतो. अुदा. मोरेव्वअु (ना.च. ३.१५.४)=मृ.+णिच्+तव्य=मारावा. तसेंच धरेव्वअु (ना. च. २.८.४) पावेव्वअु (य. च. ३.३६.३) जाणेव्वि V.L.—वि (स्त्री.) (य. च. ४. ६.४.) जाअेवअ (ना. च. ७.४.१०) अि. अि. रूपें धरावा, पावावा, जाणावी, जावा अि. वा प्रत्ययांत कृदन्तें असून तीं विधि, कर्तव्य, आवश्यकता अि. अर्थ दाखवतात. हीं विशेषणें असून विशेष्याप्रमाणे यांचें लिंग वचन बदलतें. मराठींतील वा प्रत्यय तव्य>अव्व>अेव, अेव्वअ } >वा असा आला आहे हें अुघड आहे.
अेवअ }

पेज्ज>पेज, सेज्ज>सेज, कज्ज>काज अि. कृदन्तें नामें म्हणून जुन्या मराठीप्रमाणे पुष्पदंतवाङ्मयांत वापरलीं आहेत तेव्हा त्यांना कृदन्त या सदरांत विचारांत न घेणें बरें.

**अव्ययी कृदन्तें :—**

अव्ययी कृन्दतांत हेत्वर्थक तुमन्त व भूतकालदर्शक त्वान्त किंवा ल्यबन्त आढळतात. दोन्हींचे प्रत्यय ज्ञानेश्वरपूर्वकालीन खालील स्वरूप दाखवतात तें निराळें सांगणें नको.

हेत्वर्थक तुमन्तें—† प्रत्यय तुम् > उम् > हुं > अुं, अूं.

अुदा.— खाहुं (य. च. २.३६.१३) वण्णहुं (म. पु. २.११) मेल्लवहुं (ना. च. ५.३.२). राजवाड्यांच्या ज्ञानेश्वरीच्या व्याकरणांत (पृ. १०९) दिलेल्या भविष्य अव्ययी कृदन्तांत मराठी व माहाराष्ट्री यांमधील सुटलेला दुवा *जिणिहुं, *रमिहुं इ. १० व्या शतकांतील रूपें योजून सहज भरून काढता येअील. हकाराबद्दल चर्चा पूर्वींच येअून गेली आहे.

त्वान्त अव्ययी कृदन्तें पुढील प्रत्यय लावून साधत. एप्पि, ओेप्पिणु अे (अि)-वि, एविणु, वि, ऊण, ऊणं, उं, उदा.:- एप्पि — लेप्पि (य. च. १.२०) या एप्पि चे पुढे पि व वि होते. अुदा.— होवि (य. च. २.२३) गंपि (य. च. ३.११.२)

(इ) एप्पिणु-हवेप्पिणु (ना. च. ९.१३.३) होएप्पिणु (य. च. १.८.१) 'हो' चीं रूपें. आणेप्पिणु (ना. च. १.१५.१५) तोडेप्पिणु (म. पु. १.३.२).

(इ) एवि— करेवि, पेक्खेवि (य. च. १.२५.१८) वेढिवि (ना. च. ३.१६.४). ओसरिवि (ना. च. ८.१५.१०) इ.

एविणु— होएविणु (य. च. १.८.) छंडेविणु (य. च. ३.३८.३.) इ.

पण हीं सर्व रूपें ग्रंथगत भाषेंतील जुने अवशेष आहेत. बोलभाषेंतील ऊण, ऊणं, उं प्रत्ययांपासून आपल्यास यादवकालीन जिणूनि, हसूनि, करुनु, घेउनु, देउनिया, घेउनिया इ. रूपें व्युत्पादितां येतात. पुष्पदन्त वाङ्मयांत सोऊणं (य. च. १.१२) मणिऊण (म्हणून) ठविऊण (ठेवून), दाउं, काउं (य. च. २.१) इ. रूपें दिसतात. या ऊन प्रत्ययाबरोबर आढळणारे ओनि, औनि हे जुने प्रत्यय कोणत्या तरी शब्दापासून निघाले असावे व नि हे शब्दयोगी अव्यय असावे असें प्रो. ब्लोक* (Bloch) यांचें मत आहे. पण तें मला पटत नाही. कारण ओ, औ, उ हीं अेका ध्वनीचीं निरनिराळीं स्वरूपें असल्यामुळे त्यांचें परस्परांत रूपांतर होणें स्वाभाविक आहे ही गोष्ट वर्णप्रक्रियेंत मीं दाखवून दिली आहे.

पुष्पदन्ताच्या भाषेंतील कृदन्ताचें दिग्दर्शन थोडक्यांत केलें असलें तरी त्याचें महत्त्व वाक्यरचनेमध्ये फार मोठें आहे. मुख्य क्रियेचें कृदन्त करून सहाय क्रियापदाच्या योगाने संयुक्त क्रियापद तयार करून काळ बनविण्याची पद्धत त्याच्या काळांत होती. त्यामुळे भूतकाळीं

† Cf Pischel § 573 Grammatik Bloch §265.

* La formation de la Langue Marathe पृ. २६१-२६३.

क्रियापदाचीं रूपें न वापरता धातुसाधितांच्या साहाय्याने वाक्यरचना करण्याचा त्या काळचा प्रघात अजून कायम आहे. त्याचप्रमाणे आपण अजून संयुक्त क्रियापदें वापरून धातुसाधितमय वाक्यरचना (Participial construction) करतों. या गोष्टीला आज १००० वर्षांची परंपरा आहे ही गोष्ट आपल्यास यांच्या ग्रंथावरून कळते.

**प्रयोग:—**

वाक्यांत अत्यंत महत्त्वाचे शब्द म्हणजे कर्ता, क्रियापद व असल्यास कर्म हे होत. ज्या वेळीं क्रियापद व कर्ता किंवा कर्म यांचे परस्परांशीं विशिष्ट संबंध येतात तेव्हा व्याकरण-शास्त्रदृष्ट्या निरनिराळे प्रयोग निर्माण होतात. अुदा.– क्रियापद कर्त्याच्या पुरुषलिंगवचना-प्रमाणे बदललें की कर्तरि प्रयोग; कर्माचे पुरुषलिंगवचनाप्रमाणे बदललें की कर्मणि; ते दोन्ही प्रकारें न बदलतां नपुंसकलिंगी एकवचनी राहिले की भावे; आणि क्रियापदाचा अर्थ (भाव) तोच कर्ता असतांना भावकर्तरि अथवा भावकर्तृक प्रयोग म्हणतात. या चारी प्रयोगां-पैकी कर्तरि प्रयोगाचा आतापर्यंत विचार झाला. आता त्यानंतरचा महत्त्वाचा प्रयोग कर्मणि होय. याचे संस्कृतामधील 'य' या विकरणाची प्राकृतामध्ये इय, इय्य, ईय, ईअ, इज्ज अशीं संस्कृत रूपें आढळतात. पुष्पदन्ताच्या वाङ्मयांत हा प्रयोग दोन तऱ्हेने करतात. त्यांपैकी सर्वमान्य व सामान्य प्रकार म्हणजे धातूला इज्ज हें विकरण लावून नंतर काळाचे किंवा कृदन्ताचे प्रत्यय लावणें. अुदा.– कड्ढ (काढणें)– कड्ढिज्जइ (य. च. ३.२२.१२) = काढिजे, चक्ख (चाखणें) चक्खिज्जइ (य. च. ३.१०.११) = चाखिजे, दा + इज्ज = दिज्ज दिज्जइ (ना. च. २.११.१२) = झिजे, झि (क्षि) + इज्ज = झिज्ज झिज्जइ (ना.च.५.१.११) =झिजे. याचप्रमाणे किज्जइ, माणिज्जइ, लिज्जइ, थुणिज्जइ (म. पु. १.६.१६) (थु = स्तु) इ. इ. अतकीं रूपें आपल्यास आढळतात. ज्ञानेश्वरकालीन मराठींत करीज, देइज, कीज, गमिज, हेंच कर्मणि प्रयोगांतील क्रियापदाचें अंग होतें असें राजवाड्यांचें मत आहे (ज्ञाने. व्याकरण पृ. ८६-८७).

येथपर्यन्त पुष्पदन्तवाङ्मयाचें पृथक्करण करून त्यांत आढळणारा क्रियापदविचार व यादवकालीन मराठीची तुलना मांडली. पुष्पदन्त वाङ्मयावर प्राचीन कवींच्या अभ्यासामुळे संस्कृत प्राकृत भाषांची व तत्कालीन समासप्राचुर्याची छाप आहे. पण त्यामुळे राष्ट्रकूटकालीन मराठीच्या अस्तित्वाला बाध येत नाही. ज्ञानेश्वर व पुष्पदन्त यांच्यामधील काळांत महाराष्ट्राच्या वसाहतींत (आफ्रिका किंवा ऑस्ट्रेलियाप्रमाणे) अघटित घटना घडून न आल्यामुळे आपले ज्ञानेश्वरकालीन पूर्वज मराठी बोलत होते हें जितकें खरें आहे तितकेंच पुष्पदन्तकालीन पूर्वज (ज्ञानेश्वरापूर्वी तीन शतकें) बोलत होते हें खरें आहे. प्रा. ब्लोक यांनी आपलें मराठी भाषेवरील पुस्तक लिहिलें त्या वेळीं अपभ्रंश-वाङ्मय फारसें उपलब्ध नव्हतें. त्यामुळे त्यांचें मराठी भाषा व अपभ्रंश याबद्दल मत* ग्रहण करतांना विचार केला पाहिजे. मला त्याबद्दल स्वतंत्र लिहावयाचें असल्याने येथे जागा अडवत नाही. युरोपियन पंडितांची चिकित्सक अभ्यासपद्धति अनुकरणीय असते, अन् प्रा. ब्लोक यांच्याविषयी अत्यंत आदर असल्यामुळे मला त्यांच्याबद्दल सविस्तर लिहून माझें म्हणणें मांडलें पाहिजे.

माझ्या अभ्यासपद्धतीबद्दल व प्रस्तुत विषयावर कोणीं सूचना, दोषाविष्करण वगैरे केल्यास मी त्यांचा अत्यन्त आभारी होईन.

---

* पाहा La formation de La Langue Marathe §22.

# अंकुशपुराण



[ 'अंकुश-पुराणा'चें हें कथागीत श्री. के. नारायण काळे यांनी कोंकणांतून आपल्या मातोश्रींकडून मिळविलें आहे. त्या आपल्या लहानपणीं तें शिकल्या होत्या. म्हणजे निदान पन्नास वर्षांपूर्वी हें गीत मुख-परंपरेने प्रसृत होण्याअितकें लोकप्रिय होतें हें अुघड आहे. त्यांनी स्मरणाने म्हटलें त्याप्रमाणे हें लिखित स्वरूपांत पुढे दिलें आहे.

वाल्मीकि-रामायणांत वर्णन केलेल्या कांही प्रसंगांत थोडेफार फरक करून रामायणाचीं निरनिराळीं रूपांतरें झालेलींच आहेत. लिहिण्यावाचण्याचें शिक्षण ज्या काळीं स्त्रियांना मिळत नव्हतें त्या काळीं स्त्री-वर्गाने या गीतांत केलेलें रामाच्या कथेचें व विशेषतः लवकुशांच्या चरित्राचें रूपांतर वाचकांना मनोरंजक वाटेल. सीतेची आत्यंतिक सत्त्वशीलता व पातिव्रत्य आणि तिचे हाल करण्याबाबत कैकेयीने दाखवलेला विलक्षण मत्सर व दुष्टपणा, या दोन विषम स्त्री-स्वभावावर विशेष भर देअून त्याप्रमाणे मूळ रामायणांतील कित्येक प्रसंगांना पूर्णपणें निराळें व स्वतंत्र वळण या गीतांत लावलेलें आढळतें. साहित्य-पत्रिकेच्या जानेवारी १९४१ च्या अंकांत मीं अुद्धृत केलेल्या रामायणाच्या कथेवरील जानपदओव्यांपैकी बऱ्याच ओव्यांचा संदर्भ सुसंबद्धपणें या गीतांत मिळतो.

या गीताचे रामायण व अंकुशपुराण असे दोन विभाग असल्याचें गीतांतील अुल्लेखावरूनच स्पष्ट होतें. हे दोन विभाग वेगवेगळ्या व्यक्तींकडून रचले गेले असावेत, असा त्यांमधील पद्यरचनेंतील व भाषा-प्रयोगांतील फरकांवरून निष्कर्ष काढण्यास जागा आहे. पहिल्या भागांतील भाषा व पद्यरचना अुत्तरार्धांतील भाषा व पद्यरचना यांपेक्षा जास्त सफाअीदार व ओघवती आहे. पण अुत्तरार्ध लिहिणाऱ्या कवीच्या ठिकाणीं अधिक विनोदबुद्धि असावी; व तो सामान्य जनतेंतील किंवा सामान्य जनतेशी जास्त संबंध येणारा असावा असें वाटतें. पूर्वार्धाचा लेखक हा बहुधा शिक्षित व अुच्चवर्णीय असावा आणि अुत्तरार्धाचा लेखक हा अशिक्षित पण कथाकथनकुशल असा खालच्या वर्गांतील कीर्तनकार असावा असा तर्क यावरून करतां येतो. पांढरपेशा वर्गाच्या बाहेर गोंधळी हे कीर्तनकारांचा धंदा करणारे म्हणून प्रसिद्ध आहेत. ब्राह्मणे-तरांच्या घरीं लग्नकार्यानंतर व क्वचित् ब्राह्मणांमध्येहि कुलाचार म्हणून 'गोंधळ' घालण्याची, म्हणजे या गोंधळी लोकांकडून तुळजाभवानीची कीर्तनें करविण्याची, प्रथा प्रचलित आहे. आपल्या कथाकीर्तनांत ते पौराणिक आख्यानें लावतात. अशाच अुपयोगासाठी प्रस्तुत कथागीत रचलें गेलें असावें. कोल्हापूर प्रांतां-तून घाटावरून प्रसार पावत पावत तें कोंकणांत गेलें असावें अशी माझी समजूत आहे. प्रस्तुत गीताचें नमन या दृष्टीने विशेष विचारांत घेण्यासारखें आहे.

गीतांतील अुल्लेखांवरूनच गीताच्या पूर्वार्धाच्या कर्त्याचें नांव विनायक रघुनाथ, व अुत्तरार्धाच्या रचयित्याचें नांव "लक्ष्यासदबा" असावें आणि हे दोघे अनुक्रमें ब्राह्मण व गोंधळी असावेत, असें माझें अनुमान आहे.

या सर्व गीतांत रामाच्या स्वभावपरिपोषास कुठेच जागा दिलेली नाही, हें लक्षांत घेण्यासारखें आहे. कैकेयीने सीतेच्या पावित्र्याचा संशय घेतल्याबरोबर राम लक्ष्मणास सीतेचा वध करण्याची आज्ञा करतो. फक्त एकाच ठिकाणीं— सीतेला वधिल्यानंतर साक्ष आणलेला तिचा हात लक्ष्मण दाखवतो तेव्हा— राम सीतेकरिता रडतो असें वर्णन आहे. व सीतेची व पुत्रांची परतभेट होते तेव्हा त्याला आनंद झालेला दाखवला आहे. परंतु यापलीकडे त्याच्या भावनांचे सूक्ष्म धागेदोरे कुठेच गुंफलेले नाहीत. सीतेचा व कैकेयीचा स्वभावपरिपोष मात्र पूर्णपणे केलेला आहे. अंगठ्यावांचून बाकीचा रावण सीतेला बिलकूल माहीत नव्हता— केवढी तिची शालीनता ! कैकेयीचा कावा पूर्णपणें ओळखूनहि ती पूर्णपणें तिच्या आज्ञेंत असते विशेषतः रामाची आज्ञा म्हणजे तर तिचा मोक्षच. आपल्या सत्त्वाचें तेज ती प्रखरतेने दाखवते. मुलां-साठी तर ती वाटेल ते कष्ट सोसते. याअुलट कैकेयीचा मत्सर व दुष्टपणा पूर्णपणें अुठावदार केलेला आहे. सीतेचा अखेरीस प्राण घेअीपर्यंत ती तिची पाठ सोडीत नाही. लक्ष्मणाचा स्वभाव-विकास पूर्णपणें नसला

तरी रामापेक्षा जास्त अुठावाने केलेला आहे. सीतावधाची आज्ञा मिळतांच- 'सीता मला मातेसारखी; मग मातेचा वध मी कसा करूं ?" असें तो म्हणतो; पण तिचा वध करूनच आपलें बंधुप्रेम दिसेल, असें कळतांच विचारा आज्ञा प्रमाण मानतो. तरी शेवटीं सीतेवरील आत्यंतिक प्रेमामुळे व पापपराङ्मुख होण्याकरतां तो रामाशीं खोटें बोलून प्रतारणा करतोच.

ज्या अर्थी अगदी खालच्या वर्गांतील स्त्रियांच्या ओव्या या कथेला धरून रचलेल्या दिसतात, त्या अर्थी रामायणाचें हें रूपांतर स्त्रीसमाजांत किंवा सर्वसाधारण जनतेंत बरेंच रूढ असावे असें वाटतें.

—अनसूया भागवत]

गौरीच्या नंदना तुझि मीं पुष्पें पूजा केली ।
आद्यशक्ती महामाया तुळजामाता रंगा आली ॥
मातें दिलें वरदान् माझी रसाळ वाचा झाली ।
सीतेला वनवास् कैगयी काय करती झाली ॥

कैगयी कौसल्या सुमित्रा या तीघीजणी ।
जवळ बोलावीली राया श्रीरामाची राणी ॥
आजचा ग दिवस् करूं तुझे ग भूवनीं ।
रावणाचें रूप काढुन् दाखव ग मजलागोनी ॥

अूठीली जानकी भिंती घोट केल्या दोन्ही ।
डाव्या हातीं डौत अुजव्ये हातीं जी लेखणी
चित्र लिहित्ये शीता कपट् नाहीं तीच्या मनीं ॥

चित्र लिहिलें जानकीनें अंगुष्ट काढूनी दाखविला ।
यावरता रावण नाहिं मीं दृष्टीनें देखीला ॥
यावरता रावण नाहिं मी डोळ्यांनीं पाहिला ॥

मलिग मलिग शीते बोल आमचा तूं सत्य केला ।
श्रीरामाचे ठायीं त्राअि तूं मानशी आम्हाला ॥
श्रीरामाचे ठायीं त्राअि तूं जोडशी आम्हाला ।
वडिल सुन तूं माझी तुझा सुभवा चागला ॥

अुठली कैगमती चंचळ पालव सरसा केला ।
अंगुष्ठावरून् चित्र लिहिते कैगामती ॥
लिहिलीं पाअूलें नखें बोटें घोट केलीं ।
सरळ जांघ मांड्या त्याचीं कडसूत्रें लिहीलीं ॥
लिहिलासे दंड त्याच्या कंठ आरंभिला ।
लिहिली दहा शीरें वरता हिंगूळ सारवीला ॥
दहा शीरें वीस भूजा रावण रुप दीसे विक्राळ ।
माथीची ये शिंगीं कानीं कुंडलें झळाळ ॥
अिंद्रजित् कुंभकर्ण दोघे लिहीले वीशाळ ।
त्याच खालुतीं लिहिले रामलक्षीमण कैवल्य ॥
लिहिले लंकापती सवें वाजंत्राचा मेळा ।

लिहिलेंसे चित्र, आडपडदा जो लाविला ॥
अिथं कोणी न यअूं द्यावें अैसें सांगे जानकीला ।
सांगेन रामाजवळी अैसा मनीं वीचार् केला ॥

अुगवला सूर्य राम सभेसी बैसला ।
घूडीये तोरण राम अेशवंत झाला ॥
नगरीच्या नारी ओवाळिति श्रीरामाला ॥

तेव्हां त्या कैगामतिनें घरामध्यें आकांत मांडीला ।
नेसली चार चिंध्या चोळी अुरफाटी ल्यायीली ॥
अवदसेचें रूप घेअून कैगया नीघाली ।
परडीमध्यें दीवे घालुन श्रीरामाला ओवाळी ॥
भरत् शत्रूघनें देखुन खालीं मान केली ।
रामलक्षीमणें करीं धरून् बैसवीली ॥
कुणिं माते ग तुज गांजीलें मातें सांगे ग वहिली॥

कैगयी बोलली तुम्ही हे रे चौघेजण ।
सूर्यवंशी जानकीने लावियेलें लांछन ॥
तीच्या शेजेवरी देखिला लंकेचा रावण ।
अेक स्त्री दोन पुरुष अैसा तीने साज केला ॥
हीशी वधील्याने अेश येअील रे तुम्हाला ।
हे शीतेसारख्या दहा करीन् रे दूसऱ्या ॥

विनवी विनायका कोप चढला रघुनाथा ॥

तों ते रामचंद्रें लक्षीमणासी पाचारीलें ।
निर्जनीया वनी शीता न्यावी वधावया ॥
लक्षीमण बोलीले स्वामी कार्याची होवस्था ।
कौसल्ये मातेठायीं जानूकिस् मानीतों मी माता ॥
हीशी कशी वधूं स्वर्गी हांसेल दशरथ पीता ।
कांहिअेक क्षमा करी बाप्पाराया रघूनाथा ॥
विनवी विनायका बाप्पाराया रघुनाथा ।
ही शीता वधिल्यानें तरि तुज जोडेल् बंधूपण ॥

तंव ते लक्षीमण जानकीच्या भुवना गेले ।

मोंवते माचे पलंग त्यासी बैसकार दीले ।।
आलेत् कोणा कार्या अैसें पूसते तयाला ।
जनक तुमचा पीता त्यासी भेटावया चला ।।
मज कैचा मातापीता अैसें बोले पतिव्रता ।।

त्यायली सर्वहि लेणें मोतीयानें भरला माथा ।
नेसली पीतांबर पाटाअु दूणीला वरता ।।
जाअुनि श्रीरामाचे चरणीं ठेवीयला माथा ।।

श्रीरामाची आज्ञा जानकी मागते कैवल्य ।
कोणा बोलावरनं स्वामी तोडीलें जंजाळ ।।
अेक मन दोघांचें हें काय् तूटत् आले तीळ ।
नसे तुम्हाहो वेगळी लवकर पाठवावें हो मूळ ।।

लक्षीमण बरोबरी रथी स्वार झाली ।
पुसती माये बहिणी शिते तुम्ही यावें हो लौकरी ।।
आतां कैचें हो येणें जाणें अैसें बोलली सुंदरी ।।

लक्षीमणें रथ स्थापिला नीरांजने ग भीतरी ।
महागिरी पर्वत तेथें नेली ग सुंदरी ।।
महागीरी पर्वत तेथें झालें अस्तमान ।।

जानकी बोलिली ही तर् नव्हे माझी वाट ।
दिसती वनें भयें वने दिसती अचाट ।।
सुखाचा पंथ टाकुन् तुम्हि का घेतलंत् मनिं कपट ।
आणलित् कोणा कार्या हें मज सांगा हो चखोट ।।

लक्षीमण बोलीले मज आज्ञा तूज वधायाची
जानकी बोलली अेवढी करणी कैकयीची ।।
बसली सूर्या समूर् आसन मांडी जी घालोनी ।
बसली सूर्यासमूर भूअी ठेअूनीया डोअी ।।
हाणा हाणा लक्षीमणा माझी माया सोडुन् द्यावी ।
सहा मासांची गर्भीण जानकी पोटाशीं मानावी ।।
चैत्रमास मंगळवार हे खुण रामासी सांगावी ।।

घेतलें ताडपत्र चिरून घातलें मांडीयेशी ।
श्रीरामाचा वंश वाढवीशी तरी तूं पतिव्रता होशी ।।
वंशखंडणा करितो तो हा आपुल्या कूळांत ।
स्त्रीवध करितो तो हा आपुल्ये कूळांत ।।
पुत्रवध करितो तो हा आपुल्ये कूळांत ।
त्रीषा लागली शीते अूदक मागशील् कोणापाशीं ।।

तों तो लक्षीमण चाफेसरवरेशीं गेला ।
द्रोण केला पळसाचा चोया केल्या मंदराच्या ।।

पळसांच्या द्रोणीं अुदक घेअूनीया आला ।
सत्वधर जानकी हात लावीना अुदकाला ।।
द्रोण तर पळसाचा वरतीं नांव परपुरुषाचें ।
या अुदका शिवल्यानें सत्व जाइल रे शीतेचें ।।
या अुदका शिवल्यानें लाछन जोडेल् रे पापाचें ।
असेल माझें सत्व तरि त्या गंगा येतिल येथें ।।

खडक पाझरे झरे सत्वर त्यांतुनि गंगा आली ।
केळी या नारळी कमळे पत्रें अुगवलीं ।।
द्रोण केला कमळिणीचा अुदक घेअूनीया आला ।
बहुकष्टाची शितेला वनातरीं निद्रा आली ।।
लक्षीमण दीर म्हणे पाहुन आपुलीया चित्तीं ।
हिला सांडुन् जावें व्याघ्र सिंह जे भक्षीती ।।

अितके या अुप्परी लक्षिमण रथीं स्वार झाला ।
चालत् लवलाहें नागरवाडी प्रवेशला ।।
तो येतां अवाचितें नागोबांनीं देखियला ।
होते माचे पलंग त्यासी बैसकार दीला ।।
आलेत् कोणा कार्या अैसें पुसतो तयाला ।।

कैकेयीच्या बोला शिता आणली वधावया ।
वधली नाहीं शीता जीतिच् वनीं मोकलीली ।।
तीची अुजवी भूज करून देअीरे वहिली ।।

तंव त्ये नागोबांनी बरवीं आयतीं मांडीलीं ।
सप्तरंग डाळ रत्नंखचित भूज केली ।।
कनकाचीं कांकणें मुद्रिकांसहित लेववीलीं ।।

मरमर गा चांडाळा का रे वधलिस् जानकीला ।
निजली होती वनी तिचा काय प्राणघात केला ।।
काढीयेतों खड्ग आतां वधियेतों तूजला ।
रंग अुल्खूनी दाखविशी तरि तूं विंधणी तूं मला ।।

तों त्ये नागोबानें रंग अुलखूनी दाखवीला ।
भूज देखली काष्टाची लक्षीमणाचे प्रचीत आली ।।
मला रे भला तूं नागोबा विंधणी तूं मला ।
देअीन् अर्धे राज्य देअिन् मोतीयाचा झेला ।।

भूज घेतली करीं लक्षीमण रथीं स्वार झाला ।
चालत् लवलाहीं अयोध्या नगरीं प्रवेशला ।।
भूज घेतली करीं नेअुन रामाजवळी दिली ।
भूज घेतली करीं रामचंद्र रोदन जें करी ।।
या सीतेसारीखा जन्म नाहिं रे लक्षीमणा ।

सरलें रामायण आतां अंकूशपुराणा ।।

विन्‌वी लखया शब्दा (?) दोन्ही करकमळ जोडून ।

भगवंताच्या पायीं शीतेजवळ् नाहीं कोण ।।
शीतेच्यानी सत्वें वनिच्या वनस्पती डोलत ।
शीतेच्यानी सत्वें वनिच्या वनस्पती बोलत ।।
शीतेच्यानी सत्वें निष्फळ वृक्षास् फळें आलीं ।।

तातोबाचे बडवे तेथें फुलें वेचूं गेले ।
जानकीला देखून मग ते भयामीत झाले ।।
अेकामागून अेक धाअुन तातोबाजवळी गेले ।
अचाट् वनी भूत मुखीं रामनाम बोले ।।
अचाट् वनी भूत ऐसें बोलूं का लागलें ।।

तातोबा निघाला सगळे ऋषीश्वर घेअूनी ।
हिंडला वना मोज जानकी देखीली नयनीं ।।
तातोबा बोलला तूं तर कोणाची सुंदरी ।।

जानकी बोलली मी तर राया श्रीरामाची राणी ।
मजवर आला रे दुखोटा ऐवढी कैगयीची करणी ।।
लक्षीमण दीर माझा मला साडुन गेला वनीं ।
काळवेळ जाणील त्याला पीत्याठायीं मानिन् ।।

तातोबा बोलला इथें कैची शिता मारुन् घलावी बाहेरी ।
जानकी बोलली उठल्यें राज्यावरनं बैसूं देइना कोणी दारीं ।।
काळवेळ जाणील त्याला पित्याठायीं मानिन् ।।

तातोबा बोलिला शीते तुम्ही दिव्य द्यावें हो लौकरी ।
त्रिंबक मुकुटची गंगा आणाशिल तरि तूं पतिव्रता होशिल् ।।

कृष्णा कोयना वेळणा नर्मदा कावेरी भागीरथी ।
मनकर्णिका गोदामाये त्याही धाअूनीया येती ।।
बुडालीं फळपत्रें सगळे ऋषेश्वर वाव्हती ।
तातोबा बोलला माये तुझ्या सत्वा नाहीं मीती ।।
कनकें परिभावें ओवाळीली त्या गंगेसी ।
आल्यात मातानों मजकारणें जा आतां आपूल्ये स्थळासी ।।

शीता गुंफेमध्ये दारीं तातोबा बाहेरी ।
आंतुन निघूती वेळा शीतेचा प्राण दुःखित झाला ।।

तातोबा बोलीला शीते तूं स्मरें ग श्रीरामाला ।
इथें नाहीं स्त्री तुजजवळ धाडूं— गे कोणाला ।।
उजेड सूर्यवंशी पहिले प्रहरीं पुत्र झाला ।।

श्रीरामाला पुत्र झाला सूर्यवंश ग वाढला ।
श्रीरामाचे दारी मोत्याचा पाऊस पडला ।।
श्रीरामाचे मांडीवर सुवर्ण माळुंग पडलें ।
लक्षीमण दीर बोले कोणा भाग्यवंता पुत्र झाला ।।

वाजत् तुंबिर नादात् तातोबानीं नाळ जें कापिलें ।
झाडपत्री पाला शितेला वनिचें औषध दीलें ।।
पाचवे दिवशीं तातोबानीं पांचवी पूजन केलें ।
बारावे दिवशीं बारसें करून नांव अंकूश ठेवीलें ।।

पुजीला बळिराणा शीता तेथून निघती झाली ।
सरवराचे तीरीं शीता बाळंती धुअूं गेली ।।
अुंच रुक्षावरी वांद्री पोटीं बांधोनीया पीलीं ।
या रुक्षावरन त्या रुक्षावरती अुडीये टाकीली ।।
पडेल तूझें पिलूं अैसें बोलीली सुंदरी ।
पडेल् माझें पिलूं मजपसनं दृष्ट ग नीवाली ।।
तूझा अेकला बाळ टाकुन काशि आलिस् ग मावली ।।

वांद्रीणीच्या बोला शिता तेथुन् निघूती झाली ।
आली गुंफेमध्ये तातोबाला निद्रा आली ।।
अंकुश घेतला करीं शिता तेथून निघूती झाली ।
सरवराच्या तीरीं शीता बाळंती धुअूं गेली ।।
अंकुशाला देखुन् वांद्री विमानीं बैसुन गेल्या ।।

अितके अुप्परी तातोबा जों जागा झाला ।
अंकुश न दिसे पाळण्यांत् तातोबा जिव्हारीं खोचला ।।
शीता देअिल् श्राप म्हणून् तातोबा भीयाला ।
आणलन् नदिचा लव्हा त्याचे केलन् बाहूलें ।।
करगोटा मनगट्या जिवती बाळाशीं बांधीली ।
अंकुश घातला पाळण्यांत प्रेम देतसे लव्हाला ।।

अितके या अुप्परी शितेनें सरवर सोडीला ।
आली गुंफेमध्ये पाळक हलवीतां देखीला ।।
माझा मजपाशीं पुत्र तुम्ही हलवीतां कोणाला ।
हाची धर्मपुत्र स्तनीं लावी तं दोघांशीं ।।

बाढति दिवसामाझीं माता होतसे संतोषी ।
पांच वर्षांचे बाळ तेही झाले युद्धाप्रती ।।
हरणें मोरें चित्रें पारध घेऊनीया येती ।
मार्ती झपीवर मोठी अवीळी मांडिती ।।

तातोबा बोलीला शिति तूं आवर अपुल्ये ग पुत्राशी।
जानकी बोलली माझे लहान बाळ ते
न मज आवरती।।
माझे लहान बाळ लिहूं सांगा ये दोघांशीं ।।

तंव ते तातोबानी मर्दन मांडीयेली दोन्ही ।
ओनामाचा धडा लिहूं सांगितला दोघें ।।
ओ म्हणतां ओळख लागेल आमच्ये कुळाला।
ना म्हणतां लंछन जोडेल आमच्ये वंशाला ।।
घेतल्या लेखण्या पाट्या तातोबाच्या मस्तकीं
फोडिल्या ।।

तंव त्या तातोबानी भीअुर दाखवीला दोघांशीं।
जाल् वरल्ये वनीं बागुल् आहे शिंगऋषी ।।
जाल् वरल्ये वनीं जातां धरील रे तुम्हाशी ।
तातोबाचे बोल त्यानीं धरिले मनाशीं ।।
घेतलें धनुष्यबाण दोघे बंधू निघते झाले ।
गेले वरले वनी बागुलाशि बोलूं कीं लागले ।।
बागुलान धरलन् मौन् बागुल कोणाशीं न बोले।।

अंकुशान् काढलन् बाण त्याचा श्रवण विंधीला।
लहू म्हणे स्वामी याचें अुत्कांचन कशानें ।।
अंकुश म्हणे स्वामी याचें करूं कडासन ।
मानवेल् तातोबा अैसें हरीखले दोघेजण ।।

बागुल घातला खादीं नेअून तातोबाला
दाखविला ।
तव त्ये तातोबांनी बंधू अपूला ओळखीला ।।
पापीयाचांडाळांनो जन्म नाहीं रे तुम्हाला ।।

जानकी बोलीली तातोबा माझा पिता आजा
होतो रे तुम्हाशी ।
तोही सांगेल् काम तें तुम्ही करा हो सायेशीं ।।
नित्य पांच कमळें आणा देवाचे पूजेशी ।
नित्य पांच कमळें आणा मातेच्या पूजेशी ।।

लहू बाळ बोलिले माते मला आधीं आज्ञा द्यावी।
येअिन पांचा दिवशीं माझी वाट तुम्हीं पहावी।।
न येअीं साता दिवशीं माझी शुध तुम्हीं करावी।।

दोन्ही करकमळ जोडून मातेच्या चरणीं लागला।
बाहेर निघतां वेळे त्याला अपशकुन झाला ।।
मस्तमढें भेटलें डावा कावळा गेला ।
वामभागीं जातां त्यासी अुजवा चास गेला ।।
सरवराचे तीरीं जाअुन अुभा जो ठाकला ।
द्या रे चारपांच कमळें मातेच्या पूजेला ।।
द्या रे चारपांच कमळें देवाच्या पूजेला ।
तोडीतो रे कमळें भारा कमळाचा बांधीला ।।
वेचीतो रे कमळें भारा कमळाचा बाधीला ।।

श्रीरामाचे सभे ठाकुर गेला सागायाला ।
अुठ अुठ रामराया तुजवर क्षेत्री आला ।।
नळनीळ अंगद तेही जोडीले रथाला ।
तेही झुजाया झुंजती लव्हा रथांशीं बांधिला ।।

अितके या अुप्परी तेथें पावली कैगमती ।
कुठें बा तुझें मरण तूं बा सांग मजपाशीं ।।
लहूबाळ बोलले माते माझें मरण ग सायेशीं ।
उदकी मज दंडावा बांधुन कर्दळी खांबाशीं ।।
समस्त नगरिचे लोक तुम्ही लावाहो पाण्याशी।।

कुंभ कळश नारी ऐसे कावडीचे घड ।
अटरा लक्ष घागर येउन् लहूवरी पडे ।।
जो जों पाणी पडे तो तों लहू अधिक वाढे ।
उदकाचा जिव्हाळा लहु बळतेज अधिक् चढे ।।
तुजवर पाणी घालतां घालतां शीणले बापुडे ।
तुजवर पाणी घालतां बाळा आमची ताळू पडे।।

इतकेयाउप्परी मातेच्या कीं सप्नीं गेला ।
माते झालों ग परदेशी लवकर पाठव अंकू-
शाला ।।

माता निर्वाणी गांजते कृपा नाहीं रघुरायाला।
माता करिते रूदन अंकुश समजवी मातेला ।।
सोडवीन् अपला बंधू तूं काय म्हणतेस ग
परदेशी ।
दोन्ही करकमळ जोडून मातेच्या लागला
चरणाशी ।।

बाहेर निघतां वेळे त्याला बरवा शकुन् झाला।
भरली घागर भेटली उजवा कुंजर भेटला।।

धामभार्गीजातां त्यासी उजवा च्यास गेला ।
सरवराचे तीरी जाऊन उभा जो ठाकला ।।

आलि होती रुद्ध म्हातारी तीनें सांगितली खूण ।
तुझे एवढा बाळे या इथें धरियेला लहान ।।
लक्षीमणाबरोबर त्यानें युद्ध केलें रे दारुण ।

तोच माझा बंधू आलों त्याचें ग कारण ।।
नेशिल् माझा निरोप तूला जोडेल् भलेपणा ।
हातीची मुद्रिका धाड्ली घाग्रींत घालून ।।

सावध होअि रे बाळा तुझा सहकारी पावला ।
नीरोपासरसा नीरोप त्याने पडताळा पाठवीला ।।
घरजा माझें पाणी जाउनि सांगा श्रीरामाला ।।

झगडीयाच्ये नाशे त्यांनी खळ तेथें मांडीली ।
अटरा लक्ष घागर त्यानें एकसरी फोडीली ।।
झाला गाजावाजा नगरीं आरोळी ती झाली ।
हाकेसरशी हाक श्रीरामाच्या सभे गेली ।।
तुम्हावर क्षत्री आला जावें पावें गा वहीली ।।

नळनीळ अंगद तेही जोडीले रथाशीं ।
तेही झूजाऱ्या झूजती झूजावे कोणापाशीं ।।
भरत शत्रुघ्नाचे बाण ते ना अंकुशास लागती ।
मारले सकळ सैन्य पळत आली कैगामती ।।
युद्धासी जा रामा सगळें सैन्य हाकारूनी ।
सीता सोडवून् आणलीस तें बळ रामा काय केलें ।।

रामलक्षीमण तेही युद्धाप्रती गेले ।।

पहिला बाण मारता अंकुशाचे मस्तकीं मूगुट झाला ।

दुसरा बाण मारता झाला दशांगुळिचा झेला ।।
तिसरा बाण मारता कमरेंत करगोटा त्यायीला ।।

अंकुश मानावला राया रामचंद्र वीराशीं ।
उचित् उचित् लेणी ही काय पाठवता आम्हाशी ।।
पाळण्यांत घालून आतां खेळ करीं चरणांशी ।
हरखें नारद् बोले जीवदान मागाहो तयाशी ।।

त्याचें मुळ पुसायला चंपा ठाकूर पाठवीला ।
कोण माता कोण पीता अपुली शत काय ती सांगावी ।।

अैका राया अैका राया माझी शत काय ती वर्णावी ।
जानकी अमची माता रघूराया अमचा पीता ।।
तीनें सांगितले लक्षीमण तूमचा चूलता ।
हेच पुत्र जानकीचे यांशी भेट देअी रघुनाथा ।।

लव्हास सोडवीला अंकूशास् जवळ बोलावीला ।
फोडीलीं मांडारें सोनें वाटीलें लोकांशीं ।।
आनंदलें त्रिभुवन आतां भेटूं जानकीशीं ।।

रामलक्षीमण लहू अंकुश् मिळुनी रथीं जे बैसले ।
चालत लवलाहें तातोबाच्या गुंफे आले ।।
आलेसें पडचक्र अैसे तातोबा बोलले ।
तुला ठाव दीला पूर्वी बाअी माअिट केलें ।।
मला ठाव दीला पिंपळ पार जे बांधीले ।
लहान म्हणाल तरी आहेत भुजंगाची पीलें ।।

अितुकेये अुप्परीं तातोबाचे गुंफे आले ।
तूप भरूनी वाटी रूप पाहूनीया दिलें ।।
बारा वर्षें होतें वनीं माझी शुद्ध तुम्हीं नाहीं केली ।
मज दुःख न आठवीतां तातोबांनी समजावीली ।।

रामलक्षीमण सीता लहू अंकुश् मिळुनी रथीं जी बैसलीं ।
चालत लवलाहें अयोध्या नगरीं प्रवेशलीं ।।
समस्त नगरीचे लोक जान्कीस् भेटावया येती ।
कैगया कौसल्या सूमित्रा या मिळुनी तीघी येती ।।

मावेच्या की बोले अेक बोल माता कैगामती ।
अेक पुत्र रामाचा दुसरा आणलास् तूं कोणाचा ।।
होतिस् वरल्ये वनी संग केलास् तूं कोणाचा ।।

जानकीला कोप आला रथावरनं अुडी टाकली ।
रथावरूनं अुडी टाकतां धरणीमाता दूभंगली ।।
त्याच वेळे भूमाता जानकीला घेअुनी गेली ।।

त्याच रागें कैकेयीला लक्षीमणें रेड्यावर् बसविली ।
सातपाट काढुन् काळे बैलासी जुंपीली ।।
पापीणी चांडाळणीला नगराबाहेर घालविली ।।

जे अैकती रामायण त्यांचीं पापेंकिल्मिषें हरती ।
रामाचें राम्नाम् गाती त्यांना विष्णुंपद मुक्ती ।।

---

# जीवनाला वळण देणारें वाङ्मय*

(लेखक— प्रा. द. वा. पोतदार, बी. अ.)

वाङ्मय म्हणजे कित्येकांच्या मतें लेखकाने स्वतःच्या कल्पनेने, अवलोकनाने आणि मननाने रचलेलें शब्दमंदिर होय. अशा विचारकांच्या मताप्रमाणे काव्य आणि कथा हेंच प्रधानत्वें वाङ्मय होय. अितिहास किंवा शास्त्ररचना यांचा समावेश या मतवाद्यांच्या सिद्धान्ताप्रमाणे वाङ्मयांत होत नाही. परन्तु मला हें मत अेकांगी वाटतें. वाङ्मयांत ज्याप्रमाणे कथा आणि काव्य अित्यादि कल्पनानिर्मित विभागांचा समावेश होतो त्याचप्रमाणे अितिहास किंवा शास्त्ररचना अित्यादि ज्ञानवर्धक शाखांचाहि समावेश केला पाहिजे. हा व्यापक अर्थ मनांत वागवून मी पुढील प्रतिपादन करणार आहें.

आजच्या प्रतिपादनाचा विषय जीवनाला वळण देणारें वाङ्मय असा आहे. वाङ्मय खरोखर जीवनाला वळण देऊं शकतें काय, आणि शकत असल्यास कोणतें वाङ्मय हा परिणाम घडवून आणूं शकेल, असे दोन प्रश्न आपणांपुढे आहेत. पैकी पहिल्या प्रश्नाचा विचार प्रथम करूं. मनुष्यसमाजाचा अेकंदर अितिहास पाहिला असता कोणासहि निःसंदेहपणें असें म्हणतां येअील की वाङ्मयाचा आणि मनुष्यसमाजाचा निकट संबंध आहे. जगांतील सर्व वाङ्मय अेकाअेकीं नष्ट झालें अशी कल्पना केल्यास मनुष्यसमाजाचें केवढें अुदासवाणें आणि भकास चित्र मनापुढे अुभें राहील! ज्ञानवर्धक आणि कल्पनाप्रचुर अशा अुभयविध वाङ्मयावांचून मनुष्यसमाज आजच्या स्थितीला येअून पोचला असता काय? खरोखरच कल्पना करवत नाही! असें आहे तरी सर्वसाधारण माणसाच्या जीवनांत वाङ्मयाचा कितपत संबंध येतो? आपण अेकमेकांशीं वाचेने जो व्यवहार करतों त्यांतहि मधून मधून वाङ्मयांत शोभतील अशा लकेरी चमकून जातात. पण असलें सारें वाङ्मय प्रायः हवेंत विरूनच जातें. शाळांतील शिक्षक, देवळांतील प्रवचनकार आणि व्यासपीठावरील वक्ते हे सामूहिक श्रोतृवृंदांना अुद्देशून बोलत असतात. या बोलण्यांतहि पुष्कळ वाङ्मय प्रकट होत असलें तरी तें सहसा संग्रहित केलें जात नाही; म्हणजे त्याचा प्रभाव होत नाही, असें नव्हे किंवा जीवनांत त्याचें काही कार्य होत नाही असेंहि नव्हे. पुष्कळच परिणाम होतो त्यांचा. अक्षरांच्या खुणांनी शब्द व्यक्त करण्याची सवय जसजशी अधिक होअूं लागली तसतसें वाचिक वाङ्मयाचें महत्त्व कमी झालें असलें पाहिजे. म्हणून वाचिक वाङ्मय सोडून देअून लिखित वाङ्मयाचाच विचार केला असतां पुरेसें होअील. या लिखित वाङ्मयाचे दोन मुख्य विभाग वर दर्शित केलेच आहेत. कल्पनेचें प्राचुर्य ज्यांत अधिक त्यांत आत्मनिष्ठा अधिक, आणि ज्ञानबाहुल्य ज्यांत अधिक त्यांत वस्तुनिष्ठता अधिक असें स्थूलमानाने म्हणण्यास हरकत नाही.

आपला पहिला प्रश्न वाङ्मय जीवनाला वळण देअूं शकतें काय असा आहे. पण जीवनाला वळण म्हणजे काय याचा विचार केल्याशिवाय या प्रश्नाचा अुलगडा होणार नाही म्हणून त्याचा थोडा विचार करूं. वाचिक किंवा लिखित वाङ्मयाचा आपल्या बुद्धीवर आणि मनावर प्रतिक्षणीं कमी अधिक परिणाम होत असतो हें कांही निराळें सिद्ध करण्याची गरज नाही. थोड्याशा विचाराने तें अेखाद्या अडाणी जीवालाहि पटवून देतां येअील. वळण शब्द अुच्चारतांच आपल्याला अेखाद्या नदीची आठवण होते. येथाला येथ

* ठाणें येथील मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या ४८ व्या वार्षिक समारंभप्रसंगीं (२० अेप्रिल १९४१) केलेल्या अध्यक्षीय भाषणाच्या आधारें.

मिळत मिळत त्यांत सहज गति अुत्पन्न होते, प्रवाहाची अेक धार तयार होते आणि धारेला धार मिळून नदीच्या रूपाने वाहूं लागते. आपला मार्ग शोधीत नदी पुढे जात असते आणि यालाच आपण नदीचें वळण म्हणतों. नदी स्वभावक्रमाने जात असते. तें तिचें स्वाभाविक वळण होय. पण या वळणाला आपल्या अिच्छेप्रमाणे आणखी अेखाद्या प्रकारें वळवून माणसें आपलीं कार्यें करून घेत असतात. म्हणजे वळणाचे दोन अर्थ झाले. अेक मूळचें किंवा लागलेलें वळण आणि दुसरें करणीचें किंवा लावलेलें वळण. जीवनाला ही कल्पना लावली तर, म्हणजे जीवन हें प्रवाहासारखें आहे असें मानलें तर, त्याला अनुलक्षून जीवनाचें वळण म्हणजे काय हें निश्चित करावें लागेल. जीवनाला अेक स्वाभाविक वळण, म्हणजे मूळ प्रवृत्तींचें वळण, नदीप्रमाणेच असल्याचें अनुभवास येतें. आमच्या प्राचीन विचारकांनी आहारनिद्राभयमैथुनादिक ज्या सामान्य प्राणिप्रवृत्तींचा जोर वर्णिला आहे त्यांच्या प्रभावाने वाहणाऱ्या जीवनाचा ओघ हा जीवनाचा स्वाभाविक ओघ म्हणजेच तें त्याचें मूळ वळण होय असें मानलें पाहिजे. नदीची कल्पना घेतली खरी परंतु नदी आणि मनुष्य यांच्यांत अेक महत्त्वाचा फरक आहे हें लक्षांत ठेविलें पाहिजे. नदी पाहिजे तशी आणि पाहिजे तिकडे जाअूं शकत नाही, ती निम्नाभिमुखच असली पाहिजे. ती कांही अशी अिच्छा करूं शकत नाही की आपण अमक्याच दिशेने जावें. परंतु माणसांचें तसें आहे काय? आपल्या जीवनाचा ओघ त्याला अिच्छेप्रमाणे वळवितां येतो काय? मानसशास्त्रज्ञ या गूढाचा अुलगडा करण्यांत अजूनहि गुंतले आहेत. पण स्थूल मानाने आपण असें समजण्यांत चूक होणार नाही की माणूस जरी प्रकृति आणि नियति यांच्या अधीन आहे आणि प्रकृति-नियतींचे सप्तसूर जरी त्याला बदलतां येत नाहीत तरी त्या सप्तसुरांचे निरनिराळे मेळ तयार करून आणि राग रचून आपलें स्वतःचें जीवनसंगीत निर्माण करण्याचें स्वातंत्र्य मर्यादित कां होईना, त्याला आहे. आणि असेंहि म्हणावयास हरकत नाही की ही स्वतंत्रतेची अूर्मि त्याच्या प्रकृतिवृत्तींच्या अंगभूतच आहे. म्हणजे मनुष्याच्या जीवनास वळण कांही लागलेलें असतें आणि कांही त्याला स्वतःचें स्वतःलाच लावतां येतें. नदीचें तसें नाही. ती सचेतन नाही, मनुष्य सचेतन आहे या भेदाचा हा परिणाम आहे. या प्रकारच्या भेदावर लक्ष देअूनच मम्मटाचार्यांनी ब्रह्मयाची षड्रसरुचिरानिर्मिति तर त्याच्या दिढीने कविभारतीची नवरस रुचिरा निर्मिति म्हणून कविभारतीचा जयजयकार केला आहे. मम्मट कवीपुरतेंच बोलत आहे आणि त्याचा लक्ष्य आशय बरोबर आहे. मनुष्याच्या वृत्ति-प्रवृत्तींचा खेळ रंगण्यासाठी बाहेरील जगत्पटाची अर्थातच गरज आहे. विषयी जो मनुष्य त्याची जीवनक्रीडा रंगण्यासाठी विषय पाहिजे. या विषयी-विषयक क्रीडेचें अेक रूप वाङ्मय हें आहे. मनुष्य अेकटा राहत नाही समाज करून राहतो, तो स्वतः विचार करतो, अैकतो, पाहतो आणि अनुभवितो आणि कल्पनाहि चालवितो. त्याच्या भावना अुत्तेजित, आंदोलित अथवा संयमित होत असतात. त्यांचें बुद्धिचक्र चालू असतें. लिखित किंवा अलिखित रूपाने स्वतःचें वाङ्मय तो निर्माण करीत असतो. त्याच्या प्रमाणेच त्याच्या भोवतालच्या समाजांतील बंधुवर्ग तसेंच करीत असतो. मनुष्य आपल्या आणि अितरांच्या विचारांचा व अवलोकनांचा मेळ पाहतो, तुलना करतो. अशा अनेकांतून कोणाचा तरी विचार किंवा कल्पना प्रभावी किंवा अनेकमान्य होतात. अेकाची छाप दुसऱ्यावर पडते आणि अेकमेकांच्या बुद्धि किंवा भावना यांच्यावर अेकमेकांचें स्वामित्व बसतें. ते दुसऱ्यांचे वाटाडे होतात, दुसऱ्यांना आवडूं लागतात अथवा पूज्य वाटू लागतात. ख्यातनाम, प्रथितयश, प्रतिभावान, विद्वान वगैरे विशेषणांनी प्रसिद्ध होणारे लोक ते हेच. त्यांच्याद्वारें निर्माण होणारें वाङ्मय हें अनेकांच्या जीवनांवर छाप बसवितें, त्यांच्या जीवनाच्या ओघाची गति वाढ-

विते म्हणजेच त्यांच्या जीवनाला वळण देते. प्राचीन काळ घ्या किंवा आधुनिक काळ घ्या कोणत्याहि काळीं निवडक अशा कवींचीं, तत्त्वज्ञांचीं किंवा चिकित्सकांचीं पांचपन्नास ठळक नांवें आपणांस सांगतां येतील, आणि म्हणतां येअील की त्यांचें वाङ्मय अितर लक्षावधि जनांच्या जीवनाला कांही अेक वळण देत आहे. तेव्हा आपल्या पहिल्या प्रश्नाचें अुत्तर मिळतें तें असें— होय, वाङ्मय जीवनाला वळण देअूं शकतें.

सहजप्रवृत्तींच्या आवेगांमुळे जीवनप्रवाहाला मिळणारें सहज वळण हें अेक वळण होय. परंतु या सहजमार्गाला त्याचा रोख बदलून मुरड घालण्याची क्रिया मानवी जीवनांत सतत चालू असलेली दिसते, म्हणजे जीवनाला वळण— मूळच्याहून निराळें वळण— लावण्याचा प्रयत्न चालू असतो आणि वाङ्मय हें त्या प्रयत्नाचें अेक स्वरूप आहे.

कोणतें वाङ्मय हें वळण देण्याचें काम करूं शकतें असा आपला दुसरा प्रश्न आहे. प्रश्नावरून हें अुघड होतें की वाङ्मयाचें कांही स्थूल भेद आहेत. सहजप्रवृत्तींचा वेग जीवनास कोणत्या तरी दिशेने ओढीत असतो. अेकदा पुढे, मध्यंतरीं मागे, पुन्हा पुढे अशा तऱ्हेने जीवनाचा ओघ वाहत असतो. या ओघाला प्रभावी वाङ्मयनिर्मीते आपआपल्या बाजूकडे खेंचीत असतात आणि या खेचाखेचीचा मोठा जबरदस्त संघर्ष नित्य या जगांत चालू असतो. 'मला असें वाटतें', 'त्याला तसें वाटलें' आणि 'सर्वांना असेंच वाटेल' याप्रमाणे वाटण्याच्या भाषेंत बोलणारें आणि वाटण्याच्या बाजूने खेचणारें वाङ्मय आपणांस जगांत दिसतें. त्याचप्रमाणे 'हें बरोबर आहे', 'तें चूक आहे', 'त्याचें कारण असें आहे' आणि 'ह्याचें कारण तसें आहे' म्हणून प्रतिपादन, मीमांसा आणि चर्चा करणारें वाङ्मय हेंहि आपल्या मानवी जीवनाला निरनिराळ्या दिशेने ओढीत असतें. आणि आपणाला प्रश्न पडतो की आपण कोणीकडे जावें, कसें वागावें, कोणतें बरोबर होअील, कोणतें चूक, कोणतें अिष्ट, कोणतें अनिष्ट, कोणतें शक्य, कोणतें अशक्य, आणि मन गोंधळून जातें.

कार्याकार्यांची गुंतागुंत सोडविणें म्हणजेच वरच्या गोंधळांतून आपली सुटका करून घेणें होय आणि प्रश्नचिन्हाचें निश्चयचिन्हांत रूपांतर करणें होय. यालाच कार्याकार्यव्यवस्थिति असें म्हणतात. कार्याकार्यव्यवस्थिति करून जीवनाची नौका तदनुरूप हाकारणें म्हणजेच जीवनाला अिष्ट तें वळण देणें होय आणि या अिष्ट वळणाला साहाय्यक जें वाङ्मय तें अिष्ट वाङ्मय होय असें म्हणावें लागतें. वाङ्मय जीवनाला वळण देतें; भावनाधिष्ठित आणि विकाराधिष्ठित दोन्ही प्रकारचें वाङ्मय जीवनाला वळण देण्याचें कार्य करूं शकतें यांत शंका नाही. परंतु नुसतें वळण देअूं शकतें अेवढें दाखवून दिल्याने आपला प्रश्न पूर्णपणें सुटला असें होत नाही. आपल्या प्रश्नांत वळण म्हणजे अिष्ट वळण असा वास्तविक अर्थ अभिप्रेत आहे. आणि अिष्टतेची निश्चिति आपण जशी ठरवूं तसें आपल्याला आपलें खरें अुत्तर हातीं येणार आहे.

आपलें सांप्रतचें जीवन आपणांस डोळ्यांसमोर दिसत असतेंच. त्याचे सर्व पैलू कदाचित् आपणां सर्वांस दिसत नसतील. तरी आपल्या आजच्या जीवनाची स्थूल ओळख आपणांस होअूं शकते. अेकंदर मानवी जीवनाचा अुगम काढून आपण मागे जाअूं लागलों तर त्याचा आदिबिंदु आपणांस निश्चितपणें गवसेल असें नाही. आणि अुद्या आपलें जीवन कसें असेल याचाहि निश्चय आपणांस ठामपणें करतां येत नाही. भगवद्गीतेंत म्हटल्याप्रमाणे आपणांसहि म्हणावें लागतें—अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत। अव्यक्तनिधनान्येव (तत्र का परिदेवना)॥ आपल्या जीवनाचा आदि आणि त्याचें निधन म्हणजे अंत हीं आपणांस अव्यक्त आहेत. केवळ आपल्या जीवनाचा मध्य म्हणजे वर्तमान तेवढा आपणास कांहीसा समजूं शकतो.

या वर्तमान जीवनास कोणत्या बाजूने गति द्यावी, म्हणजे कोणतें वळण द्यावें, हें ठरविल्याशिवाय आपणांला आपल्या कर्मस्वातंत्र्याचा कांही अुपयोग करून घेतां येणार नाही. जीवनाची, म्हणजे त्याच्या स्वरूपाची, अिष्टानिष्टता आपणांस ठरविलीच पाहिजे. ही अिष्टानिष्टता ठरविण्यास ज्या वाङ्मयाचें अधिक साहाय्य होअील तें वाङ्मय अधिक अिष्ट होय. म्हणून त्यालाच वळण देणारें वाङ्मय असें म्हणणें अुचित होअील.

यद्यपि भावनांचा आणि जीवनाचा निकट संबंध आहे तथापि बुद्धिमत्त्व हा आपणां मानवांचा सर्वांत मोठा विशेष असा समजला जातो. आणि या समजांत तथ्यहि पुष्कळ आहे. विवेक हें बुद्धीचें कार्य आहे आणि विवेकी वाङ्मय बुद्धीला मार्ग दाखवील हें अुघड आहे. विवेकाचा कस जेणेंकरून वाढीस लागेल तो प्रयत्न माणूस म्हणविणारांनी सर्वात्मना केला पाहिजे. अर्थात् जीवनाला अिष्ट वळण देण्यासाठी माणसाने विवेकवादी वाङ्मयाचाच आश्रय केला पाहिजे.

विवेकाच्या मागून जाणें सोपें नाही. विवेकाचा मार्ग प्रथम प्रथम तर कंटाळवाणाच वाटेल. त्या मार्गाने जावयाला पुष्कळ दगदगहि सोसावी लागेल. त्यांत गोडी आहे पण तिचा अनुभव येण्यास बराच काळ जावा लागतो. अेकदम मन बसावें किंवा पाहतांच भाळून जावें असले कांही अनुभव विवेकराज्यांत येत नाहीत. विवेकाची माधुरी द्राक्षापाक जातीची नाही, नारिकेलपाक जातीची आहे.

आतापर्यंत केलेलें विवेचन लक्षात घेतलें तर आपल्या ग्रंथालयासारख्या संस्थांतील ग्रंथसंग्रहापैकी विवेकवादी ग्रंथाच्या वाचकांची संख्या आणि तदितर वर्गांतील ग्रंथांच्या वाचकांची संख्या यांतील तफावतीचा अुलगडा होण्यास वेळ लागणार नाही. आकर्षक नांवें, मोहक भाषापद्धति, आणि रम्य बाह्यपरिवेष यांनी नटवलेल्या ग्रंथावरच वाचकांच्या अुड्या का पडतात आणि दुर्बोध नांवें, बोजड भाषापद्धति आणि भेसूर कोष्टक परिशिष्टाचा परिवार यांच्या योगाने भीतिप्रद दिसणारे विवेचक ग्रंथ यांना मागणी घालणारे क्वचितच कसे भेटतात याचें आपणास कोडें पडणार नाही.

जीवनाला वळण देणारे ग्रंथ वाचकाच्या हातीं पडावे असा आपल्या संग्रहालयांच्या संस्थापकांचा हेतु होता हें मला माहीत आहे. थकल्याभागल्या वाचकाचें मनोरंजन व्हावें आणि त्यांचा शीण थोडा तरी कमी व्हावा हाहि अेक आपला हेतु असणार, आणि तो अवश्य असला तथापि तो कांही आपला प्रधान हेतु नाही. वाचकांची प्रवृत्ति विवेकवादी वाङ्मयाकडे वळवावयाची असेल तर त्यांच्यापुढे आज मी करीत आहें अशा प्रकारें चर्चा करणें अत्यंत अिष्ट आहे.

रसात्मक वाङ्मयाचा अुपयोग आणि महत्त्व केव्हाहि कमी लेखण्याचा माझा अुद्देश नाही. परंतु मानवी जीवनांतील त्याची जागा माझ्या मतें केव्हाहि विवेकवादी आणि ज्ञानदायक वाङ्मयाच्या खालचीच आहे. रसात्मक वाङ्मयांत कला आणि तंत्र याचें प्राधान्य राखावें लागतें, तर विवेकवाङ्मयांत तर्कानुमानपद्धति आणि सत्य यांना प्राधान्य असतें. रसात्मक वाङ्मयाच्या मयसृष्टींत फसून जाण्याचा संभव फार; त्याच्या अुलट विवेक-वाङ्मयांत सर्व कारभार शहाजोग असतो म्हणून जीवनाच्या साफल्याचा खरा मार्ग शोधणाऱ्यास विवेकवाङ्मयाचीच कास धरली पाहिजे.

कवि, कथालेखक वगैरे कथात्मक वाङ्मयाचे निर्माते यांच्या ग्रंथांतून जीवनाचें अिष्ट वळण शोधण्याच्या भरीस न पडतां ज्ञानवाहक वाङ्मयाकडेच आपणांस वळलें पाहिजे. म्हणजेच

कालिदास-भवभूति आणि शॉ-अिब्सेन यांच्यापेक्षा मनु-शंकराचार्य आणि क्रोशे-मार्क्स यांच्याकडे आपण अधिक लक्ष दिलें पाहिजे. रसात्मक किंवा ललितवाङ्मयांतील रस आणि लालित्य यांच्या सेवनानें आपणांस कितीहि आनंद झाला आणि कितीहि प्रसन्नता वाटली तरी आपल्या जीवनाचे मार्गदर्शक आपण तेथे शोधूं नयेत. त्यांपासून जो आनंद मिळेल तो जरूर लुटावा, परंतु मार्गदर्शनासाठी त्यांच्यावर आपली मदार ठेवूं नये.

कवि आणि कथाकार हे तत्त्वज्ञ किंवा ज्ञानी असूं शकत नाहीत असें नाही. अुलटपक्षीं तत्त्वज्ञ आणि ज्ञानी, रसिक आणि कलावंत असूं शकत नाहीत असेंहि नाही. अुभयविध शक्तीचे समर्थ पुरुष असूं शकतात, नव्हे होअून गेलेले आहेत, आणि आजहि आढळतील. परंतु निवड करून त्यांची ओळख करून घेणें कठीण आहे. अननुभवी वाचकाच्या तर तें केव्हाहि आटोक्याबाहेरचें आहे. यास्तव शुद्ध ज्ञानमार्गी वाङ्मयाचा भोपटमार्गाने जेवढा अभ्यास करतां येअील तेवढा करावा. अशा अभ्यासानेच आपल्या बुद्धीला धार लागेल, आपली विवेकशक्ति प्रखर होअील आणि जीवनाचा अिष्ट मार्ग प्रकाशित होअील.

बहुसंख्य वाचकांचा कल लालित्याच्या रंगांत डुबून जाण्याकडे असतो. मराठी वाङ्मयांतच असें होतें असें नाही तर प्रगल्भ आणि प्रगत अशा अिंग्रजी वाङ्मयाबाबतहि अशी तक्रार करण्यास जागा आहे. मन क्षणिक अुत्तेजित करणाऱ्या ज्या शेकडो कथा अिंग्रजींत नित्यशः प्रसिद्ध होत असतात त्याना अनुलक्षून मि. हॅरॉल्ड निकल्सन यानी ब्रिटिश ब्रॉडकास्टिंग कारपोरेशन या संस्थेच्या द्वारें १९३१-३२ सालीं श्रुत केलेल्या आपल्या व्याख्यानातून क्षणिक आणि अुत्तेजक वाङ्मयाबद्दल पुढे दिल्याप्रमाणे शेरा मारला आहेः—

'माय पॉअींट अिज् दॅट् अिफ् ॲट् अेनि गिव्हन मोमेंट यू फील बोअर्ड विथ् थ्रिलर्स, देन रिअलाअीज् दॅट् ॲट् दॅट् मोमेंट यू हॅव सीन दी लाअिट ... ... ... वन्स यू हॅव रीच्ड धिस् स्टेज यू विल् नॉट रिव्हर्ट अेक्सेप्ट अिंटेन्शनली टु दि बन्स ॲन्ड टीकेक्स ऑफ लाअिट रीडिंग.' (पृष्ठ १०)

प्रकाश केव्हा दिसूं लागेल याची जी मर्यादा रा. निकल्सन यानी जी वर सांगितली आहे ती लक्ष्यांत घेण्यासारखी आहे. वर्तमानपत्री वाङ्मय हें तर सांप्रत सर्वांना गुरफटून बसलें आहे. 'क्विकलि रिट्न्, क्विकलि रेड, क्विकलि फरगॉटन' असें या वर्तमानपत्री वाङ्मयासंबंधाने मि. कार्ल्व्हान डोरेन याने म्हटलें आहे तें किती समर्पक आहे. तो आणखी म्हणतो—'जेनली हाअुअेव्हर दी ग्रेटर ऑफ व्हॉट् अिज प्रिंटेड अिज ट्रीव्हियल्'. आजच्या यंत्रयुगांत वाङ्मय देखील यंत्राधीन झालें आहे आणि जीवन तरी कुठे त्याच्या पकडींतून सुटलें आहे! आता चित्रपट पुढे सरसावले आहेत आणि डोरेन यांचें म्हणणें 'मशीन्स कॅन फोटोग्राफ बेटर दॅन दे कॅन थिंक' हें अगदी यथार्थ आहे.

अेक महायुद्ध होअून गेलें, दुसरें अुमें राहिलें आहे. ही पहिल्याची सुधारून वाढविलेली आवृत्ति दिसते. 'सुधारलेलें' 'सुधारलेलें' म्हणून ज्यांच्या लौकिकाने भूमंडळ निनादून गेलें होतें त्या सर्व राष्ट्रांच्या सुधारणेचें सांप्रतचें हें भीषण प्रदर्शन पाहून सर्व जग भयाने आणि संशयाने ग्रासून गेलें आहे. कांही झालें तरी प्रस्तुत युद्धोत्तर आपणाला जीवनाची नवी रचना करावी लागणार हें अुघड आहे. अशा परिस्थितींत आम्हीं भारतीयांनी आमच्या जीवनाला कोणतें वळण द्यावें हा मोठाच बिकट प्रश्न आहे. आणि तो काय कवि आणि कथाकार याच्या ललितमंडळाच्या मार्फत सोडवावयाचा कीं मनुष्यपणाची मुख्य खूण जो विवेक आणि तज्जन्य फळ जें ज्ञान यांच्या आधाराने सोडवावयाचा? आम्हीं अद्याप आमच्या जीवनाचें वळण निश्चित केलें नाही.

आमचें प्रस्तुतचें जीवन आम्हांसच लज्जास्पद वाटूं लागलें आहे आणि ज्या पाश्चिमात्य जीवनाचा आदर्श आमच्या तोंडासमोर धरण्यांत आला होता तो आदर्शच फुटून त्याचा चक्काचूर होऊन जातो कीं काय अशी भीति आम्हांस भेडसावीत आहे. गतयुद्धोत्तर पाश्चिमात्य वाङ्मयाचा निर्विकार मनाने आढावा घेतांना मशारनिल्हे डोरेन म्हणतात, 'परहॅप्स् दि फायनल् सेन्स आफ्टर अे सर्व्हे ऑफ दि लिटरेचर ऑफ दि मशीनअेज इज् अे सेन्स ऑफ वेस्ट. इन्युरेबल् प्रिंटेड पेजेस् फ्लटर अिन् दिं विंड्; लायब्ररीज् ऑफ अन्ओपन्ड् व्हाल्यूम्स् लाय लाअिक हीप्स् ऑफ स्लॅग.' पण अेवढ्याने काही डोरेन निराश झाले नाहीत. गर्दीतून आणि गर्दीने चालण्याची जशी आपणांस सवय झाली आहे त्याप्रमाणेच या प्रचंड खळबळींतून आपण सही-सलामत बाहेर पडूं असा त्यांस विश्वास वाटतो. कारण ते म्हणतात, 'फॉर देअर स्टिल् आर मास्टरपीसेस अॅज सेफ इन् अे क्राअूड अॅज इन् अे डेझर्ट.' सांप्रत आमच्या चाळीस कोटि भारतजनांचें जीवन अेका अर्थाने डेझर्टमधील जीवनासारखेंच आहे असें म्हणतां येअील. पण पूर्वी याच भूमींतील ऋषींनी त्या वेळच्या डेझर्टमधून आपलीं अुपनिषदें जगास सादर केलीं आणि आमच्या धर्माचार्य मनु महर्षीने असे अुद्गार काढले—

एतद्देशप्रसूतस्य सकाशादग्रजन्मनः
स्वं स्वं चरित्रं शिक्षेरन् पृथिव्यां सर्वमानवाः।

आमचा आदर्श सर्व जगाने पुढे ठेवावा अशा प्रौढीचे हे उद्गार आहेत. अगदी शिवाजीच्या वेळासंबंधाने बोलतांना प्रख्यात मुत्सद्दी अमात्य रामचंद्र नीळकंठ यांनीहि मनूच्याच भाषेत '(या) राज्यांतील नीति व राज्यांतील बुद्धि व राज्यांतील मर्यादा सर्वांनी शिकून जाव्या' असा अभिमानोद्गार काढला आहे. तेव्हा असें न व्हावें की जुना आदर्श आमचा आम्हींच फोडून टाकला आणि नव्याचा हव्यास केला तर तो काळ आपण होअूनच फोडून, मोडून टाकीत आहे. आपण नुसतें जुनें किंवा नवें या मुद्द्याला अवास्तव महत्त्व देण्याचें कारण नाही. विवेकाची जोड जोपर्यंत कायम आहे तोपर्यंत आपला आदर्श आपण निर्माण करूं शकतों.

प्रश्न अेवढाच आहे की आमच्या वाङ्मयांत आम्ही आदर्श जीवनाच्या दृष्टीने विवेकाचा मागोवा घेत निश्चितपणें चाललों आहों काय कीं ललिताच्या रम्योद्यानांत रेंगाळत बसलों आहोंत? जीवनाला वळण द्यावयाचीं कामें हीं मोठ्या धारणेचीं कामें आहेत. नाना शास्त्रांच्या ज्ञानाचें साहाय्य या कामीं अवश्य आहे. मराठी वाङ्मयात आपण कितीसे ज्ञान साठविलें आहे, विवेकाचें सामर्थ्य आपण कितीसें कमाविलें आहे याचा गंभीरपणें विचार केला पाहिजे. आपणाला विवेकपुष्ट व्हावयाचें आहे. पाश्चिमात्यांच्या वैभववार्तांनी हुरळून जावयाचें नाही. विवेकाचें पौष्टिक पाश्चिमात्याकडे आमच्या मानाने शतपटीने उपलब्ध असताहि फ्रान्समधील जॉर्जेस दुहामेलसारख्या विचक्षण साहित्यिकाने काय म्हटलें आहे तें अैका– 'बट् टुडे दी मॅन इन् दी स्ट्रीट इज फेड मॉरली अॅज वेल अॅज फिझिकली ऑन ए मास ऑफ डेब्रिस् विच् हॅज नो रिसेम्ब्लन्स टू ए नरिशिंग डायट्; देअर इज् नो मेथड इन धिस् मॅडनेस विच् इज् दि व्हेरी नेगेशन ऑफ कल्चर' (इन डिफेन्स ऑफ लेटर्स—१९३८, पृष्ठ २१). सावध होण्याला अेवढा अिषारा पुरे आहे. तसेंच शेकडो वर्षांपूर्वी आमचीं प्राचीन काळचीं तुणतुणींहि वाजवीत बसावयाचें नाही. हें सर्व कसेंहि असो, माझा मुख्य मुद्दा आपणांस विवेकप्रधान झालें पाहिजे हा आहे. आणि ज्ञान किंवा विवेक वाढविण्याची जी नियत पद्धति आहे त्या पद्धतीनेच आपणासहि ज्ञान आणि विवेक याची वाढ करता येअील. तसलें वाङ्मय आपण जिव्हाळ्याने अभ्यासिलें पाहिजे. वास्तविक पाहिलें तर आपलें सारें मराठी वाङ्मय जगाच्या मोठ्या मोठ्या

वाङ्मयांच्या तुलनेने पाहतां संख्याबलाने अगदी चिमुकलें आहे. मग त्यांत नानाविध ज्ञानाचा संग्रह किती अल्प असेल हें सांगावयास नको. अेवढें लोकप्रिय राजकारण घेतलें तर त्या विषयावर ग्रंथ असे मराठींत किती आहेत ? फार तर दहा-पांच. राजकारणांतील नुसत्या लोकशाही प्रकरणाचा विचार केल्यास किंवा त्यांतहि केवळ मतदान आणि गतमापनपद्धति या पोटप्रकरणांचा अुल्लेख केल्यास जगांतील या संबंधांचे किती अनेक प्रकार आणि अनुभव नोंदले गेले आहेत याची पुसट तरी कल्पना आपल्या मराठी वाङ्मयांतून अुमटलेली आहे काय ? 'दर डोअी अेक मत' किंवा 'अेक मत अेक किंमत' अित्यादि सूत्रें कित्येकांना ब्रह्मलिखितासारखीं वाटतात. पण जिला खरोखर लोकशाही म्हणतात ती कितपत प्रस्थापित होअूं शकते किंवा या पद्धतीने किती न्याय साधल्याचा अनुभव जगाला आहे ? का लोकशाही म्हणजे 'नांव सोनुबाअी'चा प्रकार आहे वगैरे अनेक शंकांचें समाधान होअील असें किती ज्ञान मराठींत संचित झालें आहे ? अिंग्रजी भाषेमध्ये अथवा अन्य युरोपीय भाषांतून या विषयावर अनेक प्रकारची मनोरंजक माहिती अेकत्र केली असून मोठमोठ्या विद्वानानी गंभीरपणें असल्या विषयांची सप्रमाण चर्चा केलेली अनेक ग्रंथांतून आढळते. आमच्या मराठी वाङ्मयांत याचा मागमूसदेखील सांपडत नाही असें म्हटल्यास कितपत अन्यायाचें किंवा चुकीचें होअील ? अेवढें कशाला ? आपण अद्याप आपली परिभाषा देखील ठरविली नाही. शाळापाठशाळांतील तरुणांनी उत्साहाने चालविलेली शेकडों हस्तलिखित मासिकें चाळून पाहिल्यास काय आढळतें ? सर्वत्र कथा, काव्य आणि सजावट यांवर भर ! ज्ञान किंवा शास्त्र याला चुकून सुद्धा कोठें स्पर्श केलेला आढळत नाही ! काय समजावें यावरून ? कथा-काव्याची आणि पोकळ कल्पनांची हवा भरलेल्या कळाकुसरीच्या फुग्यांत बसून या बॉम्बर युगांत जीवन यशस्वी करण्याचा प्रयत्न आणि विश्वास हास्यास्पद वाटत नाही काय ? अज्ञानाच्या अेवढ्या प्रचंड भिंती आपणासमोर अुभ्या असतांना त्यांचा विध्वंस करण्यास कथा-काव्यांच्या फवाऱ्यांपेक्षा ज्ञानप्रवाहाच्या अनेक जोरदार ओघांचा प्रचंड मारा त्या भिंताडावर करून तीं जमीनदोस्त करावयास नकोत काय ? अेवंच ज्ञान हीच खरी शक्ति आहे हाच सिद्धान्त, जुन्या काय किंवा नव्या काय, जगांत सर्वमान्य झालेला आहे. जगाचा अितिहास हेंच ओरओरडून सांगत आहे. आणि 'अूर्ध्वबाहुर्विरोम्येप' म्हणून मीहि आपणांस आपला अल्प आवाज चढवून तसेंच म्हणत आहें. 'य:कश्चित्‌श्रुणोति माम्' असे कटु अुद्गार काढण्याचा प्रसंग मजवर न यावा आणि जीवनाला वळण देणारें वाङ्मय कोणतें तें आपण ओळखून त्याची निर्मिति आणि प्रसार यांच्या अुपायांचे चिंतन करावें आणि तडक त्या दिशेने कार्यप्रवृत्त व्हावें याहून अन्य काही सांगणें नाही आणि निराळें कांही मागणें नाही.

---

# परीक्षणें



## धर्म-तत्त्वज्ञान

**१ पुनर्विवाहप्रयोग, २ हिन्दूकरणप्रयोग व परावर्तनप्रयोग** (मराठी), **३ हिन्दूकरणप्रयोग तथा परावर्तनप्रयोग** (हिंदी)— प्रका० पं. रघनाथशास्त्री कोकजे, धर्मनिर्णय मंडळ, लोणावळे; मूल्य– अनुक्र. १ आणा, ३ आणे, ३ आणे.

**४ भारतीय-तर्कशास्त्र-प्रवेश**– [ले० पं. रघुनाथशास्त्री कोकजे, प्रका० श्री. र. गो. कोकजे, लोणावळें; मूल्य– ३ रुपये.]

पुनर्विवाहास काही स्मृतिकाराचीं वचनें प्रतिकूल असलीं तरी नारद-पराशरादि स्मृतिकारांचीं वचनें अनुकूल आहेत. ही प्राचीन परंपरा व सद्यःपरिस्थिति याचा विचार करून धर्मनिर्णयमंडळाने हा पुनर्विवाहप्रयोग तयार केला आहे. त्यांत वधूपित्याने करावयाचे कन्यादान, वाङ्निश्चय अित्यादि अुपविधि गाळले आहेत, याचें कारण विधवाविवाह हा वधूवरांच्या परस्परसंमतीनेच होत असतो. विधवेने विधुराशींच पुनर्विवाह करावा असा धर्मनिर्णयमंडळाचा कटाक्ष आहे. पुनर्विवाहित दांपत्यास सर्व धर्मकृत्यांचा अधिकार आहे अशाविषयी प्रस्तावनेंत जें विवेचन करण्यांत आलें आहे तें सर्वांनी लक्षात ठेवण्यासारखे आहे.

धर्मनिर्णयमंडळाने ठरविलेला हिंदूकरणप्रयोग म्हणजे जन्मतः अहिंदु असलेल्याला हिंदु करून घेण्याचा विधि, आणि परावर्तनप्रयोग म्हणजे ह्याच जन्मीं हिन्दुधर्मत्याग करून अिच्छेने वा अनिच्छेने परधर्मांत गेलेल्यास परत या धर्मांत घेण्याचा विधि प्रस्तुत पुस्तकांत दिला आहे. तसेच मूळ संस्कृत प्रयोग, त्याचें मराठी भाषान्तर व आवश्यक तेवढा शास्त्रार्थहि दिलेला असल्याने सामान्य संस्कृत जाणणारे व न जाणणारे ह्या दोघाचीहि या पुस्तकाने सोय केलेली आहे.

साप्रत ह्या दोन्ही संस्कारास शुद्धीकरण असं नाव प्राप्त झाले आहे. पण त्याअैवजी हिंदूकरण व परावर्तन अशीं नावें योजणे कसें अधिक यथार्थ आहे याचे विवेचन प्रस्तावनेंत स्वामी केवलानन्द यानी केलें आहे ते जिज्ञासूंनी विचार करण्यासारखे आहे.

हिंदूकरणप्रयोग तथा परावर्तनप्रयोग ह्या पुस्तकात मूळ संस्कृत प्रयोग व त्याचा हिंदी अनुवाद दिला आहे.

भारतीय तत्त्वज्ञानांतर्गत सहा आस्तिक दर्शनांपैकी सगळ्याच दर्शनांचा मुख्य विषय अध्यात्मशास्त्र (metaphysics) आहे असें म्हणता येणार नाही जीव, जगत् व आद्यतत्त्व यांचें स्वरूप व त्यांचा परस्परांशीं संबंध या अध्यात्मविद्येतील मुख्य प्रश्नांची सर्वांगीण चर्चा प्राधान्याने वेदान्त किंवा उत्तरमीमांसा, सांख्य आणि वैशेषिक या तीनच दर्शनांनी केलेली दिसून येते. तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने जैमिनिप्रणीत पूर्वमीमांसेचें खरें महत्त्व वाक्यार्थनिश्चय करण्यास शिकविणारें शास्त्र याच नात्याने अधिक आहे. पातञ्जलयोगशास्त्राने सांख्यवादाचाच थोड्याफार फरकाने स्वीकार केलेला असून मनुष्याच्या आध्यात्मिक अुन्नतीस आवश्यक असलेल्या शारीरिक व मानसिक बलाचा विकास ज्यायोगे होअील अशा वर्तनाचे नियम व पद्धति यांचेंच विवेचन मुख्यतः त्यांत केलेलें आहे. न्यायदर्शनाची आध्यात्मिक भूमिका प्रायः वैशेषिकांच्या-

सारखीच आहे. पण त्यांतील मुख्य विषय अध्यात्मशास्त्र हा नसून, सत्यज्ञान व त्याचीं साधनें यांचें शास्त्र— म्हणजेच प्रमाणशास्त्र— हा आहे. भारतीयांच्या विरोधवरील अेक सर्वसामान्य आक्षेप असा असतो की त्यांनी बुद्धिप्रामाण्यापेक्षा शब्दप्रामाण्य श्रेष्ठ आहे असें मानिल्यामुळे त्यांच्यामध्ये प्रमाणशास्त्राचा योग्य असा विकास झालेला नाही. परंतु संस्कृत भाषेतील या विषयावरील प्रचंड ग्रंथसंपत्ति पाहिल्यावर या आक्षेपास आपोआपच अुत्तर मिळेल, व असें कळून येअील की पदशास्त्र किंवा व्याकरण आणि वाक्यशास्त्र किंवा मीमांसा या शास्त्रांअितकीच तर्कशास्त्रांतहि भारतीयांनी चांगली प्रगति केलेली आहे.

या विद्याशाखेचा आरंभ वैदिक कालांतच झालेला असावा असें वैदिक वाङ्मयाच्या अभ्यासावरून स्पष्ट होतें; तिला शास्त्रीय स्वरूप मात्र प्रथम गौतममुनीच्या न्यायसूत्रांनीच प्राप्त करून दिलें असें म्हणण्यास प्रत्यवाय नाही. तेव्हापासून भाष्यें, वार्तिकें, निबंध अित्यादि अेतद्विषयक अनेक ग्रंथांतून या शास्त्राचा विकास व्यवस्थित रीतीने होत गेला. संस्कृत वाङ्मयेतिहासाच्या दृष्टीने महत्त्वाची गोष्ट ही की न्यायशास्त्रविषयक वाङ्मयाची परंपरा जितक्या अखंडितपणें जतन झालेली आहे तितकी अितर शास्त्रीय वाङ्मयाची क्वचित्च झालेली दिसून येते. गौतमाचीं 'न्यायसूत्रें', त्यावरील वात्स्यायनाचें 'भाष्य', भाष्यावरील अुद्योतकराचें 'भाष्यवार्तिक', त्याच्या स्पष्टीकरणार्थ वाचस्पतिमिश्राने लिहिलेली 'वार्तिकतात्पर्यटीका' (जिला 'न्यायतात्पर्यटीका' असेंहि म्हणतात), त्या टीकेवरील अुदयनाचार्यांची 'न्यायतात्पर्यटीकापरिशुद्धि', तिच्या सुबोधीकरणासाठी लिहिलेला वर्धमानाचा ग्रंथ 'न्यायनिबन्धप्रकाश', त्या ग्रंथावरील पद्मनाभाची टीका 'वर्धमानेन्दु' अित्यादि अेकाच अखंड परंपरेचें प्राचीन वाङ्मय आजहि अुपलब्ध आहे. तर्कशास्त्राभ्यासाची आवश्यकता भारतीयांनी कधीहि दृष्टीआड केली नाही हेंच यावरून सिद्ध होतें. पंडित कोकजेशास्त्री यानी आपल्या 'भारतीय-तर्कशास्त्र-प्रवेश' या ग्रंथाच्या द्वारा प्राचीन भारतीयांच्या प्रमाणशास्त्रांतील प्रमुख सिद्धान्तांची ओळख मराठी वाचकांस अत्यंत सुबोध रीतीने करून दिलेली आहे याबद्दल ते निःसंशय अभिनंदनास पात्र आहेत.

'भारतीय-तर्कशास्त्र-प्रवेश' या ग्रंथाच्या अनुक्रमणिकेकडे दृष्टि टाकल्याबरोबरच त्यांतील विषयाची मांडणी किती पद्धतशीर आहे याची कल्पना येते. 'विषयप्रवेश' या पहिल्याच प्रकरणांत ग्रंथकर्त्यांनी आपल्या विषयप्रतिपादनाची भूमिका स्पष्ट केलेली आहे. या ग्रंथाचें स्वरूप केवळ वर्णनात्मक किंवा संकलनात्मक नसून टीकात्मक किंवा चिकित्सात्मकहि आहे ही गोष्ट अभिनंदनीय आहे. प्राचीन तर्कशास्त्रांतर्गत सिद्धान्तांनाच तर्कशास्त्राचा निकष लावावयास कसला प्रत्यवाय आहे? प्राचीन भारतीय तर्कशास्त्राचें मूळच अशा गौतमप्रणीत न्यायसूत्रांत अेखादा सिद्धान्त मांडला आहे म्हणूनच केवळ तो निरपवाद व खंडनायोग्य आहे असें मानणें तर्कशास्त्रावरील ग्रंथांत 'वदतो व्याघाता'चें अुदाहरण म्हणूनच शोभण्यासारखें होअील! पंडित कोकजेशास्त्री यांनी आपल्या ग्रंथांत जरी नैयायिकांचीं मतेंच प्राधान्याने प्रतिपादलीं असलीं तरीहि त्या मतांतील युक्तिदुष्ट भागांच्या खंडनाकडे त्यांनी दुर्लक्ष्य केलेलें नाही. तसेंच आधुनिक युगांत विशेष गाजलेल्या विषयप्रतिपादनाच्या 'अैतिहासिक' पद्धतीच्या व 'तौलनिक' पद्धतीच्या मर्यादा पूर्णपणें ओळखून त्यांचा पूर्वकालीन 'मूलगामी' पद्धतीशीं (ज्याला बौद्ध वाङ्मयांत 'योनिसो मनसिकार' असें म्हटलें आहे) योग्य असा समन्वय ग्रंथकर्त्याने आपल्या विवेचनांत केलेला आहे. भारतीयांच्या न्यायदर्शनाची चर्चा करतांना पाश्चात्यांच्या तर्कशास्त्राची आठवण होणें साहजिकच आहे; व त्यामुळे त्यांची

परस्परांशीं तुलना करण्याचा विचारहि मनांत डोकावतो. पण पाश्चात्यांचें 'Logic' व भारतीयांचें न्यायदर्शन या शास्त्रांच्या व्याप्तींतच कसा मौलिक भेद आहे हें शास्त्रीबुवांनी या ग्रंथाच्या प्रास्ताविक प्रकरणांतच थोडक्यांत पण स्पष्टपणें दाखविलेलें आहे. या प्रकरणाच्या शेवटीं केलेलें नैयायिकमतवादी संस्कृत वाङ्मयाचें समालोचन सविस्तर नसलें तरी पुढील विवेचनाची ऐतिहासिक पार्श्वभूमि तयार करण्याच्या दृष्टीने महत्त्वाचें आहे.

प्रस्तुत ग्रंथांतील सर्वच प्रकरणांचा क्रम व संगति तर्कशुद्ध असल्यामुळे या शास्त्रांतील अेका विषयाकडून दुसऱ्या विषयाकडे जाणें सहजसाध्य होतें. अेखाद्या प्रश्नाविषयी अेखाद्या प्रकरणांत ग्रंथकर्त्याने 'जिज्ञासा' निर्माण केलेली असेल तर ती त्याने लगेच पुढील प्रकरणांत तृप्त केली आहे. ग्रंथाच्या सुबोधतेंत अडचण येअील अशा तांत्रिक तपशीलांत ग्रंथकार शिरला नाही; पण त्याबरोबरच विषयविवेचनाच्या पूर्णतेस त्यामुळे बाध येणार नाही याबद्दलहि त्याने दक्षता बाळगली आहे. 'ज्ञान' हा पदार्थच असा आहे की जो मनुष्यमात्राच्या नित्य परिचयाचा असूनहि ज्याचें शास्त्रीय विश्लेषण करण्याच्या भानगडींत आपण सहसा पडत नाहीं. परंतु तसें करणें किती उपयुक्त व मनोरंजक ठरतें याची कल्पना या पुस्तकाच्या पहिल्या कांही प्रकरणांवरून स्पष्टपणें येते. वर वर प्रत्ययदायी वाटणारीं विधानेंहि तर्कशास्त्राची कसोटी लावल्याबरोबर दुष्टहेतुक असल्याचें आढळून येतें. असलें मिथ्याज्ञान टाळून सत्यज्ञान व्हावें यासाठी ज्ञानसाधनांचा सर्वांगीण विचार करणें अवश्य असतें. म्हणून ग्रंथकर्त्याने 'ज्ञान आणि त्याचे प्रकार' या प्रकरणानंतर प्रत्यक्ष, अनुमान, अुपमान व शब्द या मुख्य प्रमाणांच्या स्वरूपाविषयी व त्यांत आढळून येणाऱ्या स्थूल व सूक्ष्म दोषांविषयी विशद चर्चा केलेली आहे. भारतीय तर्कशास्त्राच्या अभ्यासकांच्या मनांत तदंतर्गत 'शब्दप्रमाणा'विषयी अेक प्रकारचें कुतूहल निर्माण झालेलें असतें. अितर बाबतींत दिसून येणारी भारतीयांची तर्ककर्कशता व बुद्धिप्रामाण्यावरील श्रद्धा या ठिकाणीं मात्र बोथट झाली आहे कीं काय असा त्यांस संदेह वाटूं लागतो. श्री. कोकजेशास्त्री यांचें या महत्त्वाच्या विषयावरील विवेचन विचारप्रवर्तक असलें तरी अपुरेंसें वाटतें. आधुनिक युगांतील बौद्धिक अनिश्चयवादाचाच अेक प्राचीन प्रकार या दृष्टीने शब्दप्रामाण्यकल्पनेकडे पाहिल्यास त्यांतील मर्म ताबडतोब लक्षांत येअील. आधुनिक विद्वान त्यामुळे अज्ञेयवादाकडे झुकतात तर प्राचीन भारतीय पंडित सत्यज्ञानाविषयी आशावादी असत अेवढाच काय तो फरक! 'पाश्चात्य तर्कशास्त्राशीं तुलना', 'चर्चेंतील नानाविध दोष', व 'तर्कशास्त्राचे गुणदोष व मर्यादा' हीं या ग्रंथांतील प्रकरणें अत्यंत मार्मिक व महत्त्वपूर्ण म्हणून अुल्लेखितां येतील. विषयविवेचनाच्या अनुरोधाने ग्रंथकर्त्याने दिलेलीं अुदाहरणें वाचकांच्या नित्य परिचयांतीलच असल्यामुळे विषय समजण्यास सोपा जातो. पण त्यांपैकी कांही अुदाहरणें केवळ प्रासंगिक स्वरूपाचीं असल्यामुळे (अुदा० 'अत्रे विरुद्ध विविधवृत्त') ते प्रसंग लोकांच्या स्मरणांतून नष्ट झाले कीं तीं अप्रयोजकपणाचीं वाटूं लागतील अशी भीति वाटते.

या ग्रंथाचें स्वरूप शास्त्रप्रवेशात्मक असल्यामुळे त्यांत विवाद्य विषय फारसे नाहीतच असें म्हटलें तरी चालेल. मधून मधून नैयायिकांच्या मतांची तदितर भारतीय तर्कशास्त्रांतील सिद्धान्तांशीं तुलना केलेली आहे त्यामुळे वाचकास या विषयाचा अधिक खोल अभ्यास करण्याची अिच्छा साहजिकपणेंच अुत्पन्न होते. ग्रंथांतीं घातलेलीं, शास्त्रीय विषयांचें सारांशरूपाने विवेचन करणारें अेक व पारिभाषिक शब्दांचें स्पष्टीकरण करणारें दुसरें अशीं, पहिलीं दोन परिशिष्टें, न्यायशास्त्रविषयक ग्रंथांची सूचि देणारें पांचवें परिशिष्ट व त्यानंतर दिलेली सर्वसामान्य सूचि या सर्वांमुळे ग्रंथाच्या अुपयुक्ततेंत चांगलीच भर पडली आहे. तिसऱ्या परिशिष्टांत घात-

लेल्या श्री. कुवलयानंदजींच्या भाषणाऐवजी तेथे ग्रंथकर्त्याने वैशेषिकवादाचा थोडक्यांत परिचय करून दिला असता तर तें अधिक योग्य झालें असतें. तसेंच भारतीय विद्यांच्या आधुनिक अभ्यासपद्धतीविषयी लिहिलेलें चवथें टीकात्मक परिशिष्टहि वृत्तपत्रीय व नैमित्तिक स्वरूपाचें आहे; त्याचा अन्तर्भाव नित्य महत्त्वाच्या या शास्त्रीय ग्रंथांत करणें कितपत अिष्ट आहे याची शंकाच वाटते.

विषयाच्या मांडणीची व विवेचनाच्या पद्धतीची सुबोधता हा या ग्रंथाचा महत्त्वाचा विशेष म्हणून अुल्लेखितां येअील. शास्त्रीय ग्रंथांत नेहमी आढळून येणारी क्लिष्टता ग्रंथकर्त्याने चातुर्याने टाळली आहे. अपरिचित पारिभाषिक संज्ञा वापरणें आवश्यक झालें असतांहि ग्रंथांतील भाषेचा ओघ कुठेहि खंडित झालेला नाही. त्यामुळे प्रकरणामागून प्रकरणें वाचलीं तरी बुद्धीस थकवा वाटत नाही असा या ग्रंथाविषयी अनुभव येतो. भारतीय न्यायदर्शनाची ओळख करून देणारीं, प्रो. कीथ याचे 'Indian Logic and Atomism', महामहोपाध्याय सतीशचंद्र विद्याभूषण यांचें 'History of Indian Logic' व महामहोपाध्याय कुप्पुस्वामी शास्त्री यांचें 'A Primer of Indian Logic' यासारखीं, कांही स्वतंत्र पुस्तकें अिंग्रजींत अुपलब्ध आहेत. परंतु कोणत्याहि अेका संस्कृत मूलग्रंथावर न आधारलेला पण भारतीय तर्कशास्त्राचा साकल्याने परिचय करून देणारा पंडित कोकजेशास्त्री यांचा हा ग्रंथ मराठी भाषेंत अनेक दृष्टींनी अपूर्व आहे असें म्हणता येअील. तर्कशास्त्राचे विद्यार्थीच केवळ नव्हे तर सामान्य मराठी वाचकहि या ग्रंथामुळे शास्त्रीबुवाचे ऋणी होतील व त्याच्या हातून अितर शास्त्रावरहि असेच ग्रंथ निर्माण व्हावेत अशी अिच्छा करतील. केवळ ललितग्रंथनिर्मितीमुळे दिखाअू पण सत्त्वहीन बनलेल्या आधुनिक मराठी वाङ्मयात पंडित कोकजेशास्त्री याच्या 'भारतीय-तर्कशास्त्र-प्रवेश' यासारख्या चांगल्या शास्त्रीय ग्रंथाची– मधून मधून का होअीना– भर पडत आहे हें पाहून त्या वाङ्मयाच्या भवितव्याविषयीं थोडीतरी आशा वाटूं लागते.

## अितिहास

**१ जगाचा अितिहास**— ले० श्री. रा. ना. नातू; प्रका० श्री. ना. ह. नातू, ६८९ सदाशिव, पुणे २; मूल्य ४ रु.

**२ बडोदें राज्यदप्तरांतील अैतिहासिक वेंचे– खंड ६ वा** (खंड तिसऱ्याच्या पुरवणीरूपाने.)– अि. स. १७९३-१८००; प्रका० बडोदे सरकार, बडोदें; मूल्य ९ आणे.

पांच प्रतिष्ठित प्राध्यापकांच्या शिफारशींसह प्रसिद्ध झालेल्या आठशे पानांच्या या सचित्र ग्रंथांत सृष्टीच्या आरंभापासून तों जर्मनीच्या चालू असलेल्या रशियावरील स्वारीपर्यंतचा अितिहास सामावलेला आहे. लेखक विशीच्या आंतील कॉलेज-तरुण असून आपला नित्य अभ्यास संभाळून त्याने हा ग्रंथ फावल्या वेळांत लिहून काढला आहे. त्यासाठी जे अिंग्रजी मराठी साधनग्रंथ लेखकाने अभ्यासिले आहेत तितके त्या जातींचे ग्रंथ अितिहास घेऊन अेम्.अे. झालेले विद्यार्थीहि अभ्यासीत असतात असें वाटत नाही. अर्थात् ६५० वर्षांनंतर पुन्हा प्रकट होणाऱ्या या नूतन ज्ञानेश्वराबद्दल सर्व गुरुजनांना वाटणारें कौतुक सुस्थानींच आहे. या कृतीवरून लेखकाबद्दल मनोरथ बांधावे असाहि मोह सहजच होतो. आणि या वेगावरून गणित करता लेखकाला

फ्याशी अुलटण्यापूर्वीच आपले समग्र ग्रंथ पुनर्मुद्रित करून साहित्यसम्राटांशीहि स्पर्धा करण्यास अडचण पडणार नाही असें निःसंशय विधान करतां येतें. मराठी भाषेच्या अुत्कर्षाच्या अपेक्षेने असेंच थोर कार्य अुदयाचलावर दिसूं लागलेल्या या नवीन साहित्यसूर्याकडून पूर्ण केलें जावें अशीच कोणाचीहि आशा असणार. तथास्तु.

मामुली अभिप्रायपद्धतीने या ग्रंथाचें परीक्षण करावयाचें तर त्यांत भाषेचे, व्याकरणाचे, मांडणीचे व चुकीच्या विधानांचे असे अनेक दोष आहेत. ते तपशीलवार दाखवूं म्हटलें तर अनेक पानें खर्ची घालावीं लागतील. अितका स्थल-कालांचा व्यय करून त्यापासून तादृश फायदाहि नाही. यांतील बहुतेक दोष व चुका ग्रंथ शक्य तितक्या लवकर लिहून काढून छापून घेण्याच्या घाअीमुळे प्राप्त झालेलीं दिसतात. वर्ण्य विषयांतील दोष कोवळेपणामुळे संचरले असावे. पण ज्या अर्थी आपण सर्वांनी मराठी भाषेंत झालेल्या या भव्य विषयावरील या पहिल्याच स्वतंत्र ग्रंथाबद्दल कौतुक करावयाचेंच ठरविलें आहे, त्या अर्थी अेका अुदयेच्छु तरुणाच्या अुत्साहावर कोणत्याहि तऱ्हेने विरजण घालण्याचें पाप आम्ही करूं इच्छित नाहीं

पुस्तकावरील अभिप्राय येथे संपला. पण अशा तऱ्हेचीं कामें कशा तऱ्हेने झालीं पाहिजेत याबद्दल कांही स्फुट विचार येथे मांडणें अप्रस्तुत ठरणार नाही. वर ज्या दृष्टिकोनांतून परीक्षण केलें तो व्यक्तिगत दृष्टिकोण होता. व्यक्तीच्या दृष्टीने जें फायदेशीर व भूषणावह तें समाजदृष्ट्या फायदेशीर किंवा भूषणावह ठरेलच असें नाही. तरुण विद्यार्थ्याने कोवळ्या बुद्धीने कां होअीना, गंभीर विषयावर मोठा ग्रंथ प्रसिद्ध केला तर तो त्या व्यक्तीस निःसंशय भूषणावह व फायदेशीर होअील. पण त्यामुळे भाषेंत अेका भरीव ग्रंथाची भर पडली आहे किंवा त्याचा अभ्यास समाजाला फायदेशीर ठरेल असें निश्चितपणें म्हणतां येअील असें नाही. झटपट काम अुरकणें हें व्यक्तीला फायदेशीर असेल, पण त्यामुळे चुकांचे अडथळे व दोष समाजाच्या डोक्यावर पडतात ते त्याने कां सोसावे ? लेखकाच्या कोवळेपणामुळे समाजाच्या पदरीं चुकीच्या विधानांचा पोरकट ग्रंथ पदरीं पडला तर त्यामुळे हानि समाजाचीच होणार नाही काय ? मग या हानीबद्दल जबाबदार कोणाला धरावयाचें ? आजच्या व्यक्तिनिष्ठ समाजांत सर्व खापर व्यक्तीवरच फोडण्याचा प्रघात आहे, पण दुसऱ्या दृष्टीने विचार करणारांना याबद्दलचें माप अितरांच्या पदरांत बांधावें लागेल. व्यक्तीला अुद्युक्त करणाऱ्या गुरुजनांच्याच माथीं या हानीचें पाप मारावें लागेल.

मराठी भाषेंत आज तो चित्तचक्षुचमत्कारिक गुणलघु लघुग्रंथांचा झपाट्याचा प्रसार जारी आहे तो वर सांगितलेल्या गुरुजनांच्या बेजबाबदारपणाचाच समाजघातक परिणाम आहे. आज मराठी भाषेंत जे ग्रंथ प्रसिद्ध होतात त्यांपैकी शेंकडा ९० छापण्याच्या लायकीचे नसतात असें आमचें स्पष्ट मत आहे. कोणीं पै-पैशाची चोरी केली तर तो गुन्हा ठरून त्याला रीतसर शिक्षाहि होअूं शकते पण समाजाचा बहुमूल्य वेळ व त्याबरोबरच पैसा वृथा खर्ची टाकणाऱ्यांना कोणतीच शिक्षा न होतां अुलट ते माननीय समाजभूषणें म्हणून अुजळ माथ्याने समाजांत वावरूं शकतात आणि अितरांच्या वेळाची म्हणजेच आयुष्याची हानि करणारे चोर अलगज सुटून जातात.

अुद्योग, अुत्साह व महत्त्वाकांक्षा हे सद्‌गुण मानले गेले आहेत तें ठीकच आहे. पण वर दर्शविल्याप्रमाणे हेच सदगुण समाजहानिकारक ठरण्याचाहि बळकट संभव राहतो हें विसरून चालणार नाही. आज युरोपांत या तीन सद्‌गुणांच्या समाजविकृतीचें नागवें विडंबन धूमधडाक्याने सुरू आहे आणि या सद्‌गुणांचा हात राखूनच व्यय करणाऱ्या आपल्यासारख्या

मागासलेल्या राष्ट्रांना त्याचा घरबसल्या त्रास सहन करावा लागत आहे. समाजहानीचीं असलीं ठळक अुदाहरणें कोणाच्याहि नजरेंतून सुटूं शकत नाहीत व म्हणून त्यांवर टीकाहि होते. पण त्याच सद्गुणांच्या तशाच नित्य होणाऱ्या छोट्या दुरुपयोगांमुळे समाजाची सतत फार मोठी हानि होत असते ती मात्र सर्वांच्या नजरेंतून सुटताना दिसते. वस्तुतः या छोट्या छोट्या हानींचीच बेरीज क्वचित् धूमधडाक्याने होणाऱ्या जगजाहीर हानीपेक्षा जास्त बाधक ठरत राहते.

छापण्याची कला सिद्ध झाल्यापासून समाजाचें जसें कांही कल्याण तसेंच बरेंच अकल्याणहि झालें आहे. आणि यापुढील काळात कल्याणापेक्षा अकल्याणच वाढत्या प्रमाणांत होत राहणार असा सुमार दिसतो. तेव्हा त्यापासून होणाऱ्या समाजहानीचें प्रमाण कमी करीत आणण्याचें काम जबाबदार माणसांवर पडणार हें अुघड आहे. व तें त्यांनी वैयक्तिक हानि सोसूनहि चालू ठेवणें हें त्यांचें कर्तव्यच आहे— मग त्यामुळे स्वतः ते समाजाच्या रोषास, निंदेस किंवा प्रवादास कितीहि पात्र ठरोत.

जगाचें सर्वच ज्ञान अितिहासरूप आहे. समाजाच्या आचाराला कलाटणी देणारे विचार खरा अितिहासकारच प्रतिपादूं शकेल. काव्यकथानाटककाराचीं हीं कामें नव्हत. अर्थात् अितिहासकार होअूं पाहणाऱ्याची जबाबदारीहि सर्वांहून मोठी राहणार. तीन शतकांमागे होअून गेलेल्या ग्रे नामक अिंग्लंडांतील राजनियुक्त प्राध्यापकाला ही जबाबदारी केवढी वाटत होती म्हणाल तर त्याने चार वर्षें अेका अधिकृत प्रास्ताविक व्याख्यानाची जुळवाजुळव करण्यांत घालविलीं. पण तें लिहून काढून वाचण्यापूर्वीच तो मृत्युमुखीं पडला! असेंच पन्नास वर्षांमागचें अुदाहरण विख्यात लॉर्ड अॅक्टनचें आहे. तरुणपणीं त्याला ऑक्सफर्ड, केंब्रिज, विद्यालयांत प्रवेशहि मिळाला नव्हता पण वयाच्या ६१ व्या वर्षी त्याची केंब्रिज येथे राजनियुक्त प्राध्यापक म्हणून नेमणूक झाली. त्याने अर्वाचीन अितिहास लिहिण्याची अेक मोठी योजना आंखून ती चालूहि करून दिली. पण त्याला स्वतःला कांही लिहितां येण्यापूर्वीच तो वारला. त्यामुळे झटपट अितिहासकार बनणाऱ्या अनेक बहुप्रसव प्राध्यापकाना तो अितिहासकार नव्हताच अशी कुत्सित टीका करण्यासहि हवी असलेली सवड मिळाली! तरीहि त्याचें अुदाहरण अनेकाना स्फूर्तिप्रद ठरलें आहे. हीं अुदाहरणें आत्यंतिक म्हणूनच दिलीं, अनुकरणीय म्हणून नव्हत. पण त्यातील सत्य सर्वांनी सदा ध्यानांत ठेवण्याजोगें आहे. सांगण्यासारखें जवळ पुष्कळ ठेवून मरणें चांगले, मनांत सहज येणारी कोणतीहि कल्पना आधी कागदावर अुतरण्यापेक्षा प्रथम शंभर अंक मोजीत बसणें बरें.

मराठी भाषेंत बऱ्याच विषयावर मुळीच ग्रंथ नाहीत. अर्थात् अिंग्रजीसारख्या संपन्न भाषेंतील पुष्कळ ग्रंथांचें केवळ भाषांतरहि मराठींत अुतरलें तरी मराठी भाषेंत ती आवश्यक भरच ठरण्यासारखी आहे. इंग्रजींतीलसुद्धा बरेच ग्रंथ गुणहीन, अपुरे असतात पण तेथे प्रत्येक विषयावर अनेक ग्रंथ असल्यामुळे वाचकाला तारतम्य राखून प्रत्येक ग्रंथातील अिष्ट तेवढें सारग्रहण करून आपला अभ्यास परिपूर्ण व सर्वांगसुंदर करण्याची सवड राहते. मराठी भाषेंत तशी सवड नाही. अर्थात् एखादा विषय शक्य तितका एका ग्रंथातच पूर्ण करण्याची जरूरी त्याला भासते; खेरीज एका विषयावरील अनेक ग्रंथ घेअून वाचण्याची त्याला अैपतहि नसते. म्हणूनच मराठींत एखाद्या विषयावर पहिला नवीन ग्रंथ अुतरणाऱ्यांची जबाबदारी— अर्थात् या जबाबदारीची जाणीव लेखकाला असेल तर— फार मोठी ठरते. अिंग्रजींतील त्या त्या विषयावरील ग्रंथलेखकांनी स्वतः माहिती गोळा करून, ती संशोधून, अितरांनी तत्पूर्वी न सांगितलेली अशी कांही तरी गोष्ट सांगण्यासाठी लिहिलेला असतो. त्यामुळे तेथे अनेक ग्रंथ निर्मिणें अपरिहार्यच

होतें. आम्ही अजून त्या त्या विषयांत कांही नवीन सांगण्याच्या स्थितिप्रत येऊन पोचलेलों नाहीं, म्हणून एकाच विषयावरील अनेक अपुऱ्या ग्रंथांचा बोजा सहन करण्याची आपणांस जरुरीहि नाही. अिंग्रजींतील कोणत्याहि विषयावरील सर्व ग्रंथ वाचून त्यांवरून एकाच बृहत्-ग्रंथांत तो विषय आणण्याची आपली सध्याची गरज आहे. पण त्यासाठी लेखकाला पुष्कळ वर्षे एकाच लहान विषयाचा अभ्यास सतत करीत बसावें लागेल. विषयाचें पूर्ण आकलन होण्या-पूर्वीच तो एका वर्षांत कागदावर अुतरून झटपट छापून काढून एका दिवशीं सुप्रभातीं बडा ग्रंथकार म्हणून विख्यात होण्याची संधि कोणाला मिळणार नाही. ग्रंथलेखनाचा हेतु वैयक्तिक महत्त्वाकांक्षा हा नसून ज्ञानेश्वराप्रमाणे मराठी भाषेंत ज्ञानाच्या कावडी आणणें हा असेल तर अेवढी मोठी तपश्चर्या इष्टहेतुसिद्ध्यर्थ करणें भाग आहे.

कोणत्याहि विषयावर अेखादा सामान्य ग्रंथ मराठींत प्रसिद्ध होअून गेला की दुसरी एक आपत्ति माथेवर कोसळते. त्या विषयावर अुत्तमग्रंथ प्रसिद्ध होण्याची शक्यता लांबणीवर पडते. अेका विषयावरील ग्रंथाला अेकदा चार रुपये खर्चल्यावर पुन्हा त्याच विषयावरील अुत्तम अशा दुसऱ्या ग्रंथांचा संग्रह करण्यास सामान्य वाचक – आणि हाच येथे अपेक्षित आहे – नाखुष व असमर्थ असतो. विशिष्ट मतप्राणालीच्या परिपोषणासाठी जेव्हा ग्रंथांची निर्मिति होत असते तेव्हा तर जास्तच समाजहानि होत राहते. कारण अपरिपक्व, चुकीच्या, पक्षपाती लिखाणामुळे अेक पिढी दूषित वातावरणात वाढली जाते. तिची विचारसरणी चुकीच्या मुद्यांवर अधिष्ठित व केंद्रित झाल्यामुळे समाजातील सर्व हालचाली त्याच अनुरोधाने चालू राहतात आणि मग समाजाला बाहेरून अेक जोराचा झपाटा मिळून पुनः विचार करण्याची आवश्यकता निर्माण झाल्याशिवाय चूक सुधारली जाण्याची शक्यता अुरत नाही. गांधींच्या आगमनानंतर महाराष्ट्रीय राजकीय पक्ष जो पत्त्यांच्या बंगल्याप्रमाणे अेकदम कोसळला त्याचें कारण तो चुकीच्या मत-प्रणालीवर, खोट्या अितिहासावर अधिष्ठित होता हेंच आहे. विशिष्ट मतप्रणाली दोन पिढ्या भ्रमाने अनुसरली गेल्यामुळे ही आपत्ति निर्माण झाली होती. हा भ्रम चिपळुणकरानी निर्माण केलेल्या अज्ञानमूलक, अपरिपक्व, स्वार्थपर विचारसरणीचा परिणाम होता. अेका झटपट लेखक बनलेल्या फर्ड्या लेखकाच्या चुकीचा तो घोर परिणाम होता. अर्थाच्या आकलनापूर्वी शब्दांचा वर्षाव सुरू केल्याचा तो अनर्थ होता. रोमन लोकात साठीखालचा माणूस देशाचें राजकारण चालविण्याचा सल्ला देण्यास लायख समजत नसत. सेनेटर या शब्दाचा मूलार्थच वृद्ध असा आहे. शिवाजीचें राजकारण यशस्वी होण्याचें अेक मुख्य कारण खऱ्या अितिहासाचें– समोंवार घडत असलेल्या अितिहासाचें– त्याला सम्यग् आकलन झालें होतें व त्याला सोनाजीपंतासारखे जुने अनुभवी सल्लागार लाभले होतें हेंच आहे. म्हणूनच तो नवा अितिहास लिहूं शकला. पेश-वाअींत अनुभवी वृद्धांच्या परंपरेचा खंड पडला होता, अितिहासाचें सत्य आकलन झालें नाही, त्यामुळे सर्व कारभार तडफदार तरुणाचा होअून मराठ्याच्या राज्याचें तारूं अब्दालीच्या सिल्या-वर आपटून निसटते तों अिंग्रजांच्या भोवऱ्यांत सापडून रसातळाला गेलें. हा अितिहास महाराष्ट्राने तरी विसरूं नये.

ज्याला स्वतःला संशोधनाची स्वानुभवावरून माहिती झालेली नाही, त्याने अितिहास लिहूं वा शिकवूं नये असें आमचें स्पष्ट मत आहे. मागील कालाचें यथातथ्य स्वरूप पुढे अुभें करण्यास भापा अजून समर्थ झालेली नाही. अेकच पुस्तक वाचणाऱ्या निरनिराळ्या वाचकांना त्यापासून तोच बोध होत नाही ही नित्य अनुभवाची गोष्ट आहे पण याचें अेक कारण वाच-कांचा त्या विषयांत खरा प्रवेश झालेला नसतो हेंच आहे. गुरुमुखाशिवाय असा प्रवेश होणें

कठीण असतें. सूक्ष्मतराचें ज्ञान झाल्याशिवाय कोणत्याहि विषयांत खरा प्रवेश होत नसतो. त्यामुळेच विद्यार्थांना घोकंपट्टीवर वेळ मारून न्यावी लागते. जगाच्या अितिहासासारखा विस्तृत विषय ज्याला हाताळावयाचा असेल त्याने प्रथम अगदी स्थानिक अितिहासापासून अभ्यासास सुरुवात करणें अवश्य आहे. त्यावरून अेखाद्या राष्ट्राच्या अितिहासाकडे, नंतर देशाच्या किंवा राज्याच्या अितिहासाकडे, नंतर अेखाद्या संस्कृतीच्या अितिहासाकडे अशा क्रमाने अभ्यास वाढ-वीत गेलें पाहिजे. तरच त्याला अितर देशांच्या, साम्राज्यांच्या, संस्कृतींच्या, जगाच्या अिति-हासाचें सम्यक् ज्ञान होअूं शकेल. नाही तर शब्दज्ञान होअूनहि, सर्व जगाचा अितिहास पाठ म्हणण्याची तयारी करूनहि, खऱ्या अितिहासाचें ज्ञान त्याला होणार नाही. मोठ्या विषयाचें सार काढणें ही तर सर्वांत अवघड कला आहे. तिचें संपादन वरील अभ्यासप्रणालीशिवाय शक्यच नाही. श्रीयुत नातूंच्या अितिहासांत या असमर्थतेचें प्रदर्शन ठिकठिकाणीं सहजच झालें आहे. अेखाद्या संस्कृतीचे किंवा देशाचें वैशिष्ट्य सांगतांना जी गोष्ट अवश्य सांगितली पाहिजे तीच कांही ठिकाणीं सुटली आहे. हिंदु संस्कृतीचा, हिंदुस्थानच्या अितिहासाचा व त्यांतीलहि मराठ्यांच्या अितिहासाचा भाग सर्वांत पोकळ व ढिला वठला आहे. पोरकटपणाचें त्यांत चांगलेंच प्रदर्शन होतें. पण ज्या ठिकाणीं लेखकाला आपल्या मायभाषेंतच ओतूरकरांच्या अितिहासांशिवाय व मान्यांच्या परशुरामचरित्राशिवाय दुसरा ग्रंथ सांपडला नाही तेथे दुसरा काय परिणाम अपेक्षावा? चिनी संस्कृति, अिस्लामी संस्कृति वगैरेंच्या बाबतींतहि हीच स्थिति आहे. तरीहि ज्या कालांत जगांतील महान् पुरुषांची पुण्यश्लोकनामावली पठन करण्या-अैवजीं सिनेमानटींची नामावळी घोकतांना तरुण दिसतात, अुच्च विचारांचें जागतिक लिखाण मुखोद्गत करण्याअैवजी त्या नटनटींचीं काव्यविदूषक गाणीं आळवताना कानावर पडतात, त्या काळांत नातूंचा मार्ग शतपट प्रशंसनीय व अनुकरणीय म्हटला पाहिजे. त्याबद्दल दुमत होण्याचें कारण नाही. अित्यलम्.

अितिहासासारख्या स्वाभिमानप्रेरक शाखेंतील वाङ्मयप्रकाशनाच्या क्षेत्रांत माजलेल्या बेबंदशाहीचें म्हणजे बेजबाबदारीचें प्रतीक म्हणून बडोदें राज्यदप्तरांतील वेचे— ६ वा खंड आणि यापूर्वीचे पाचहि खंड यांकडे बोट दाखविता येअील.

अनधिकृत गप्पिष्टानी लिहिलेल्या चऱ्हाटांना आळा बसावा म्हणून साने-खरे-राजवाडे यांनी मूळ कागदपत्रें प्रकाशित करण्याचा पायंडा पाडला— अस्सल समकालीन पत्रें आदिकरून अितिहासाचीं साधनें या तऱ्हेने अभ्यासकांना प्राप्त होअूं शकत म्हणून त्यांना 'साधनग्रंथ' म्हणण्याचा प्रघात पडला. हीं साधनें खेडोपाडीं शोधून हुडकून काढण्यांत आलेल्या अडचणीं-चा विचार करून तीं अगदी मूळच्या स्वरूपांत, शुद्ध स्वरूपांत अभ्यासकांना कशीं अुपलब्ध होअूं शकतील या विवंचनेंतच 'साधनचिकित्सा' निर्माण झाली. अशा प्रयत्नांचा आढावा 'अितिहासाच्या साधनग्रंथांचा प्रपंच' (१९३०) व 'अैतिहासिक शुद्धलेखनविषयक कल्पनांची वाढ' (१९३१) अशा दोन लेखमालांतून (लोकशिक्षण मासिक) घेण्याची आवश्यकता वाटली.

परंतु याहून कांहीसे भिन्न स्वरूपाचे प्रयत्न आधीच सरकारने प्रसिद्ध केलेल्या वाडपुर-स्कृत पेशवा डायरींत व पुढें रा. ब. सरदेसायांच्या संपादकत्वाखाली निघालेल्या पेशवे दप्तरांत झाले. या संपादकांना अैतिहासिक सत्याची कांही चाड होती. यांना विवक्षित काटेकोर पद्धतींचीं बंधनें नको होतीं, हें तर खरेंच; पण त्याहूनहि सरकारच्या नित्याच्या धोरणाप्रमाणे आंग्लभाषें-तून अभ्यास करणाऱ्यांना विशेष प्रकारच्या सवलती देण्याची अत्यंत आवश्यकता भासत होती,

त्यामुळे त्यांनी अिंग्रजींत प्रास्ताविकें लिहिलीं तरी त्यांत थोडी तरी विषयचिकित्सा केली; नकाशे अिंग्रजींत छापले, तरी कितीतरी अस्सल पत्रांचे ठसे छापून पत्राचें खरें स्वरूप समजण्याची सोय करून ठेवली; प्रत्येक पत्राचा अिंग्रजी सारांश दिला, तरी तो अगदी थोडक्यांत देअून मूळ पत्र छापण्यात फारशी कुचराअी केली नाही; सूची फक्त अिंग्रजींत दिली आणि मलपृष्ठ फक्त अिंग्रजींत छापलें, तथापि आत स्वतंत्र मराठी असें मुखपत्र दिलें आणि केवळ मराठी वाचकांकडे फारसें दुर्लक्ष केलें नाही. पेशवे दप्तरांतील काम करणारे सामान्यतः तज्ज्ञ होते— फक्त त्यांचा कांही बाबतींत प्रामाणिक मतभेद होता असें म्हणतां येतें.

पण बडोदें राज्यदप्तरांतील अैतिहासिक वेंच्याचें काम करणाऱ्या लोकांबद्दल तसें म्हणतां येअील असें वाटत नाही. पेशवे दप्तराचे निरर्थक अनुकरण करण्याच्या भरांत मुखपृष्ठाचा प्रमुख भाग, अनुक्रमणिका, प्रत्येक पृष्ठाचा मथळा हीं सर्वच अिंग्रजींत छापून मुख्य जो मराठी पत्रांचा भाग त्याची भयंकर कुंचबणा करून टाकली आहे. पुस्तकाचे कांही भाग मराठींत व कांही द्विरुक्तीनेहि अिंग्रजींत छापून जी कांही कंथा निर्माण केली आहे त्याचें प्रत्यंतर अिंग्रजी-मराठी-मिश्रित अनुक्रमणिकेंत पुरेसें येत नाही असें वाटूनच कीं काय तींतील तिसरी बाब 'पत्रें selected letters with English abstracts' अशा संमिश्र पद्धतीने बेधडक नोंदिली आहे! यापूर्वींच्या खंडात संकलकावर (compilers) अितिहासकथनाची जबाबदारी येत नाही म्हणत म्हणत या खंडातहि प्रस्तावनेंत काही अैतिहासिक विधाने केलेलीं आहेत. राणी गयाबाअी गायकवाड यांचे अेखाद्या बाहुलीसारखें दिसणारें चित्र छापूनहि तें कोणत्या संग्रहांतील कोणीं काढलेलें आहे व केव्हाचें आहे वगैरे सांगण्याची फिकीर केलेली नाही. बहुधा तें व दुसरें आनंदराव पवाराचें चित्र हीं दगडी मूर्तींचीं चित्रें असावींत! यापूर्वींच्या सर्वच खंडांतील चित्राबद्दलहि अशी अनास्था दिसून येते.

अशा प्रकारचीं साधने हीं कोणींहि स्वप्रतिभेने निर्माण करूं शकत नसल्यामुळे त्याबद्दल किंवा छापण्यास पुरेसा पैसा हातीं असल्यामुळे तीं छापण्याबद्दल, खरें म्हटलें तर कोणासच विशेष धन्यवाद देण्याचे कारण पडत नाही. हे काम किती काळजीपूर्वक किंवा शास्त्रशुद्ध केलें जातें यावर संकलक किंवा संपादक याचा गौरव करावयाचा असतो. निदान विशेष कांही समजत नसलें तरी आपल्या समजाप्रमाणे काम काळजीपूर्वक करावें अेवढी तरी साधी खबरदारी न घेणें म्हणजे वाचकांची वंचना करणे आहे. अज्ञपणाचीं किंवा बेफिकीरीचीं अुदाहरणेंच द्यावयाचीं तर सहज चालतां चालतां देखील किती तरी सापडतील. लेखांक ७ व १७,१८ यातील अेकाच माणसाचे शिक्के अगदी वेगवेगळे छापले आहेत. ले. ७ मधील शिक्का व ले. ४५ मधील 'आनंदराव पवारांचा मोर्तबसुद' म्हणजे कहरच म्हटला पाहिजे. ले.१७ मधील छाा हा अुघडपणें दकार आहे व तो ले. १९ मधील दकाराप्रमाणे छापला पाहिजे याची संकलकाला दरकार नाही. मग दकारी पत्राचें वाचन कसें होतें याची कल्पना कोठून असणार! पत्रावर दिलेल्या तारखा पैवस्तीच्या आहेत किंवा कोठल्या आहेत याबद्दल स्पष्टपणा नाही.

या पुरवणी खंडांतील पत्रें तशीं फारशीं विशेष महत्त्वाचीं नसल्यामुळे या ठिकाणीं त्यांचा विशेष प्रपंच करणें नलगे. मराठी भाषेंतील साधनग्रंथांचें दालन यथार्थतेने समृद्ध व्हावयाचें असेल व सर्वसाधारण वाचकालाहि पहिल्यापासून योग्य प्रकारचें शिक्षण मिळावयाचें असेल तर अगदी अल्पशा परिश्रमाने करतां येण्यासारख्या ज्या सुधारणा आहेत त्या अगदी अवश्य अमलांत आल्या पाहिजेत. बडोद्यासारख्या संस्थानांत या विषयाचें काम अधिक तज्ज्ञ लोकांकडून झालें पाहिजे असेंच कोणीहि म्हणेल.

## साहित्यशास्त्र

**पद्यमीमांसा**— ले० वि. ज. सहस्रबुद्धे, मिरज; प्रकाशक- गो. वा. कुलकर्णी, महाराष्ट्र ग्रंथभांडार, कोल्हापूर मूल्य १। रु.

हें आकाराने लहान परंतु गुणदृष्ट्या मोठें असें पुस्तक मिरजेच्या वि. ज. अथवा तात्याबुवा सहस्रबुद्धे यांनी वेळोवेळीं लिहिलेल्या पद्यविषयक लेखांचा संग्रह आहे. यांतील बऱ्याच लेखांचा रोख प्रो. पटवर्धनांच्या छंदोरचनेंतील कांही पद्यलक्षणांतील दोष दाखविण्या-कडे आहे. अितर लेखांत मुक्तछंद, शिथिल रचना, मात्रागणविचार, भजनपद्धतीमध्ये सुधारणा अित्यादि सामान्य विचार आला आहे. या आपल्या स्फुट लेखसंग्रहास त्यांनी प्रारंभीं प्रा. बनहट्टींची प्रस्तावना व शेवटीं श्री. काका कालेलकर यांचें पद्यविचारात्मक पत्र जोडलें आहे. जें कदाचित् लेखकाला स्पष्ट म्हणण्याचें धैर्य झालें नाही तें प्रस्तावनाकारांनी म्हणून घेतलें आहे. "पटवर्धनांचें विवेचन 'अशास्त्रीय व तर्कदुष्ट' आहे, त्यांनीं अिंग्रजींतील Rhythm चीच कल्पना लय व ताल या दोन्ही शब्दांनीं, अुल्लेख न करतां, आपली म्हणून माडली, किंबहुना आवर्तनकल्पनेच्या आहारीं गेल्याने पद्यरहस्यहि त्यांना अुमगलें नाहीं" अित्यादि हल्ला त्यांनी पटवर्धनांवर केला. दुसऱ्यांची अुपपत्ति स्वीकारून त्यांचा अुल्लेखहि न करण्याची अनुदारताहि पटवर्धनांनी दाखविली असेंहि सुचवायचें असावें असें अेके ठिकाणीं दिसतें. या साऱ्या जोराच्या हल्ल्यास अुत्तर देण्यास पटवर्धन हयात असते तर बरें होतें. तात्याबुवांचे लेख पटवर्धन असतांनाच लिहिले गेले होते हें खरें, पण मग आता पुनः छापतांना त्यानी या लेखांस सामान्य तत्त्वचर्चेचें स्वरूप दिलें असतें तर बरे दिसलें असतें. 'पद्यमीमासा' हें जें व्यापक नांव त्यांनी या पुस्तकास दिले आहे तेंहि योग्य झाले असतें. त्यांचें आजचें स्वरूप म्हणजे कांही पद्यलक्षणाच्या बाबतींत त्याचा पटवर्धनांशीं जो मतभेद झाला त्याचें टिपण असेंच प्राधान्याने आहे. प्रतिपक्षी दिवंगत झाल्यावर तेंच रूप कायम ठेवण्यांत काय फायदा ? प्रा. बनहट्टींनीहि, सत्यकथनाकरिता का होअीना, आता माधवराव गेल्यानंतर ज्यांच्या निधनाने 'मनास खिन्नता येअून या विषयावर लिहिण्याचें त्याच्या मनाने सोडून दिलें होतें' त्यांच्या-वरील लेखन अधिक सौम्य शब्दांत केलें असतें तर सुजनतेस धरूनच झालें असतें. असो.

श्री. सहस्रबुद्धे यांनी या लेखांतून जे विचार पुढे माडले आहेत ते सर्वस्वीं विचारार्हच आहेत. भजनपद्धतींत सुधारणा करण्याविषयीच्या सूचना कोणालाहि योग्यच वाटतील. मुक्त-छंदासंबंधी त्याच्या पुरस्कर्त्यांमध्येच अेकवाक्यता कशी नाही हें त्यांनी चांगलें दाखवून दिलें आहे. परंतु त्यांची त्याविषयीची दृष्टि प्रस्तावनाकार म्हणतात तशी तटस्थपणाची वाटत नाही. मुक्तछंदामधील निर्यमकत्व त्यांना मान्य दिसत नाही; त्याप्रमाणे मुक्तछंद प्रगतीचें लक्षण नसून परागतीचेंच त्यांना वाटत आहे. याबाबत त्यांनी स्वीकारलेली विचारसरणी निर्दोष वाटत नाही. त्यांच्या मताने प्रगति साधेपणाकडून गुंतागुंत, अलंकृतत्व, निर्बंध यांकडे होत असते; व संस्कृत वृत्तांचा अितिहास व मराठी वृत्तांचा अितिहास हेंच सांगत आहे असें त्यांचें म्हणणें. या दोनहि गोष्टी चिंत्य वाटतात. कांही अेका मर्यादेपर्यंत प्रगतीमध्ये अधिक गुंतागुंत व निर्बंध येतात, पण पुढे पुनः साधेपणा येअूं लागतो व तोहि प्रगतीचाच द्योतक समजला जातो. आधुनिक वास्तुकला, काव्य अित्यादींमधून, किंबहुना सामाजिक व्यवहारांत वेष, अलंकार अित्यादि गोष्टींत- निर्बंध व गुंतागुंत कमी करण्याकडेच प्रवृत्ति आहे व तिला प्रगतिपरच समजण्यांत येतें.

दुसरी गोष्ट ज्ञानेश्वरादि कवींनी योजलेलीं वृत्तें मूळचीं कमी प्रगत व वामनपंडितांनी योजलेलीं अधिक प्रगत असें म्हणणें अितिहासास धरून होणार नाही. मूळ संस्कृत वृत्तांतूनच प्राकृत मात्रावृत्तें व त्यांतूनच जुनीं मराठी वृत्तें अशी परंपरा मानण्यांत येते. तेव्हा निर्बंधांची संख्या कमी असणें हें न्हासाचेंच लक्षण समजण्याचें कारण नाही.

तात्त्विक चर्चेच्या दृष्टीने मात्रा-गण-विचार हा लेख सर्वांत महत्त्वाचा ठरेल. मात्रा-वृत्तांचें लक्षण सांगतांना केवळ अष्टमात्रिक व षण्मात्रिक आवर्तनें सांगून भागत नाही. त्या आवर्तनांत आणखी पोटगण मानून तें लक्षण करावयास पाहिजे हें सहस्रबुद्धे यांनी चांगलें दाखवून दिलें आहे. आवर्तन = गण असें प्रो. पटवर्धनांच्या विवेचनांत स्पष्ट म्हटलें नसलें तरी त्यांचा तसा आशय दिसतो. तर तसें नसून आवर्तनांमध्ये पोटविभाग म्हणून मात्रागण सांगितल्याने अधिक निश्चितता येते असें सहस्रबुद्धे यांचें म्हणणें आहे. परंतु लक्षणें देतांना कोठवर तपशीलाचा विचार करावयाचा हा मतभेदाचा प्रश्न होण्याचा संभव आहे. पद्यविचारांत अेखाद्या प्रकाराचा विचार करीत असतांना नेमकें तेंच वृत्त कळावें म्हणून अितका तपशील द्यावा लागतो की ती व्याख्या (Definition) न राहतां वर्णन (Description) होअूं पाहत आहे; अुदा० 'भूपति' या जातीचें लक्षण सहस्रबुद्धे यांनी केलें आहे तेंच पाहावें, "भूपतीच्या चरणांत चार भाग असतात, ते २।८।८।४ अशा मात्रांचे असतात, दुसऱ्या व तिसऱ्या अष्टमात्रिक विभागांत प्रत्येकीं चतुर्मात्रिक गण येतील अथवा त्रिमात्रिक व द्विमात्रिक गण येतील. चतुर्मात्रिक असल्यास प्रत्येक अष्टमात्रिक गणाच्या अुत्तरार्धांत म्हणजे दुसऱ्या चतुर्मात्रिक गणांत फक्त 'ज गण' चालणार नाही. त्रिमात्रिक व द्विमात्रिक असे गण पाडल्यास प्रथम दोन त्रिमात्रिक व नंतर अेक द्विमात्रिक यावा. तो आधी येअून चालणार नाही. शेवटचा जो चतुर्मात्रिक गण त्या ठिकाणीं – – म गण अथवा ᵕ ᵕ – स गण यावयास पाहिजे, अितर चालणार नाही." लक्षणांत नको असलेले विकल्प, निषेधपर विधान, विस्तार अित्यादि साऱ्या गोष्टी यांत आल्या आहेत. याला शास्त्रशुद्ध म्हणावें कीं अितर कोणताहि पद्यप्रकार ज्यात येअूं शकणार नाही अेवढें व्यतिरेक लक्षण म्हणजे २।८।८।४ अेवढें शास्त्रीय म्हणावें? यांत अव्याप्ति व असंभव हे दोष येणार नाहीत. आल्यास अतिव्याप्तीचा दोष येअील. पण तो काढावयाचा म्हटल्यास वर सांगितलेले विकल्पनिषेधादि प्रकार त्यांत आणावे लागतात. व्याख्येच्या कसोटीस तीही व्याख्या अुतरणार नाही.

जातींमध्ये येणारी ही अडचण सुदैवाने संस्कृत छंदोरचनाकारापुढे नव्हती. संस्कृत वृत्तांची अक्षरसंख्या व लघुगुरुक्रम ठरलेला असल्याने अगदी बिनचूक व यांत्रिक, पण त्यांतील गेयतेची मुळीच कल्पना न देणारी अशी अस्वाभाविक गणपद्धति त्यांना स्वीकारतां आली. त्र्यक्षरी गण आठच होतात हा फायदा, नाही तर चार अक्षरी गण कल्पूनहि त्यांना अितकाच बिनचूकपणा साधतां आला असता. पण त्यामुळे पद्यरहस्याचा अुलगडा त्यांना झाला असें होत नाही. मात्रावृत्तांच्या बाबतींत अेकाच वृत्तांत अितके विकल्प संभवतात की झटक्यांत लक्षण सांगण्याच्या संस्कृत पद्धतीचा अुपयोग होअीना. या विकल्पांनी पटवर्धन काय किंवा सहस्रबुद्धे-खासगीवाले काय, दोघांच्याहि व्याख्या सुबोध न होतां घोटाळ्याच्या झाल्या आहेत. शास्त्रशुद्ध म्हणून खासगीवाले यांची दिंडीची व्याख्या सहस्रबुद्धे यांनी दिली आहे ती तरी स्पष्ट आहे काय? ती व्याख्या अशी— "हें पद्य सहा मात्रांचे तालांतील आहे (म्हणजे पहिल्यापासून अखेरपर्यंत सहा मात्राचे भाग पडतात काय? का दोन विभाग ६।६ मात्रांचे झाले कीं त्या तालांत अितर विभागहि आले?) आवर्तनांचे

दृष्टीनें याचे चार भाग पडतात. (किती किती मात्रांचे?) पहिल्या व तिसऱ्या भागांत त्र्यस्र (हा नवीन शब्द कां?) गण पडतात (किती? २–२ काय?). दुसऱ्या व चवथ्या भागांत चतुरस्र गण पडतात (पुढेच दुसऱ्या भागांत २+४ असा विभाग कां केला?) तिसऱ्या भागांत अुभा गण आल्यास तें अडचणीचें पडतें (अडचणीचें पडत असल्यास तें त्याज्य म्हणा?)" सारांश, अगदी काटेकोर लक्षण म्हणून सांगितलें तरी त्यांत अपूर्णता किती राहते याचा विचार सहस्रबुद्धे यांनी करावयास पाहिजे. अेवढें करूनहि याला लक्षण म्हणावें कीं वर्णनच म्हणावें हा प्रश्न राहतोच.

वरील लक्षणांत आणखी दोष काढतां येअील. अडचणीचें पडतें याचा अर्थ आपल्यास तसें वाटतें. दिंडीचा ज्यांनी पूर्वी अुपयोग केला त्याना तसें वाटत नसावें. त्यांनी ज्या अर्थी अशी बरीच रचना केली आहे त्या अर्थी त्यांना तें क्षम्य–नव्हे दोषरहितच– वाटत असेल. ज्या रघुनाथपंडिताने दिंडीचा आपल्याला विशेष परिचय करून दिला त्याच्या दमयंतीस्वयंवराकडे सहज दृष्टि फेकली तरी 'पारधी माजी खगामृगा राजे' 'मला माझा तूं गडी हंसराया' 'असें बोलोनी नळें रंजवीला' यांसारखीं अनेक स्थळें सांपडतील (प्रियोळकर प्रत). तसेंच स्वतः सहस्रबुद्धे यांनी दुसऱ्या म्हणजे सहा मात्रांच्या विभागांत प्रथम दोन मात्रा व पुढे चार मात्रा भरतील असे शब्द घालून चालणार नाही असें म्हटलें आहे. जेथे शब्द तुटतील तेथे हे असे विभाग पडतात असें कळेल. पण जेथे सहा मात्रांचा अेकच शब्द असेल तेथे विभाग ४+२ असे पडले आहेत कीं २+४ असे पडले आहेत हें कोणीं ठरवावयाचें? अुदाहरणार्थ "असें बोलोनी नळें रंजवीला" अथवा "असें आणोनी हंस वदे त्यांतें". शिवाय २+४ असा विभागहि चालतो हें "तुझा करपंजर होय मला थारा" या अुदाहरणावरून कळेल. या साऱ्या गोंधळापेक्षा पान ३० वर सहस्रबुद्धे यांनी ज्या सह्याद्रींतील लेखाचा टीपेंत अुल्लेख केला त्याच लेखातील दिंडीचें लक्षण अधिक सुटसुटीत व संपूर्ण नाही काय? तें असें:–

दिंडीच्या चरणाचे दोन भाग– ९ व १० मात्रांचे.

पहिल्या भागांत ३,२,२,२ असे मात्रागण
दुसऱ्या भागांत ३,३,२,२ असे मात्रागण

अट अेवढी की मात्रागण संपेल तेथे अक्षर, शब्द नव्हे, संपलें पाहिजे. यांत वर अुद्धृत केलेलीं रघुनाथपंडिताच्या काव्यातील सारीं अुदाहरणें बसतात. मग ही अधिक सुटसुटीत व्याख्या सहस्रबुद्धे यांनी कां स्वीकारली नाही? पटवर्धनांना अभिनिवेशाबद्दल दोष देणारांनी स्वतः आपल्या व्याख्येचा अभिनिवेश धरायचा नव्हता.

गीतीच्या चर्चेत पटवर्धनांनी आपल्या दोन्ही पुस्तकात गीतीला वृत्तांमध्ये कोंबण्याचा प्रयत्न केल्याच्या आरोप लेखक करितात. छंदोरचनेंत पटवर्धनांनी 'वृत्तजातिछंदांपैकी कोणत्याच प्रकारांत बसूं शकत नाही' असें म्हणून अनुष्टुभ् छंदाचा विचार प्रथम केला व पुढें त्याच प्रकारांत गीति बसते असें सांगूनच तिचा विचार केला. पद्यप्रकाशामध्येहि तसें स्पष्ट सांगूनच तिची चर्चा केली. तेव्हा स्पष्ट सांगूनहि भागत नाही असें दिसतें. गीति जातिच आहे असा आपण पाहिजे तर आग्रह धरावा, परंतु पटवर्धनांना भलतीच गोष्ट चिकटविण्याचा प्रयत्न कां करावा? त्यांचें चुकलें अेवढेंच की त्यांनी या अल्पसंख्याक वृत्तांना स्वतंत्र विभाग व प्रकरण न देतां वृत्तविचाराच्या आरंभीं तें विवेचन केलें. गीतीमध्ये समचरणांतील दुसऱ्या अष्टमात्रिक गणांत सुरवातीस चार लघु अक्षरें येतात व तशीं आलीं की त्यातील पहिल्या अक्षरानंतर यति असतो हें पटवर्धनानी न सांगि-

तल्याचें व त्यामुळे त्यांचें लक्षण सदोष झाल्याचें सहस्रबुद्धे सांगतात. यांतील मुद्दा मान्य करूनहि मोरोपंतांच्या विराटपर्वांतील पुढील ओळ पाहण्याची आम्ही शिफारस करतों—

'धर्माश्रितासि आश्रय मी, लोका हासवितिल कविराट' अ. १ आ. २३ यांतील 'स' पुढे यति आहे काय हें त्यांनीच पाहावें. गीतीची गेयता चुकली असेंहि वाटत नाही. पुढील ओळीचाहि त्याच्याबरोबरच विचार व्हावा.

अुठल्या अुत्साहाच्या त्या शांतश्रीम|दुदधिवरि लहरि* अ. ३ आ. २३

अभंगाच्या बाबतींत सहस्रबुद्धे याचा स्वतःचाच निश्चय झालेला नाही परंतु माधवराव म्हणतात ते त्यांना मान्य नाही हें निश्चित. अभंगांना अक्षरसंख्याक म्हणावयास ते तयार आहेत. परंतु लगत्वभेदातीत म्हणावयास ते तयार नाहीत. वस्तुतः अभंगाची त्यांनी जी चर्चा केली आहे तीवरून तेंहि अेक अक्षर-गणवृत्त म्हणावयास हरकत काय आहे ? त्यांच्या मतानें चरणांतील अक्षरसंख्या निश्चित आहे अेवढेंच नव्हे तर त्या त्या स्थानांतील अक्षरांचें लघु-गुरुत्वहि अुच्चारदृष्ट्या निश्चित आहे. अेवढें झाल्यावर त्याला अक्षरगणवृत्त म्हणावयास आणखी काय पाहिजे ? पहिले तीन चरण 'नय' अशा गणांचे व चवथा चरण 'मग'– असा अेक वृत्ताचा विषम प्रकार म्हणावयाला कांहीच प्रत्यवाय नसावा. यात जी रचना बसणार नाही ती सारी शिथिल म्हणावी. पण अडचण अशी आहे की या साच्यात बसणारी रचनाच लेखनदृष्ट्या अस्तित्वांत नाही. तेव्हा या लक्षणाला अुदाहरणच न मिळण्याची अडचण यायची, म्हणून सहस्रबुद्धे याना शंकिताचीच भूमिका स्वीकारणें भाग पडलें आहे.

अभंगांची रचनाच मुळी फार शैथिल्यानें झाली आहे. त्यांतून अुच्चारदृष्ट्या सामान्य तेवढा भाग निवडून काढल्यास त्यांचा अेक प्रकार तरी ६।६।६।४ अशा अक्षरांचा झालेला दिसून येतो. (याच प्रकाराची चर्चा श्री. सहस्रबुद्धे यांनी केली आहे.) येथपर्यंत सर्वांची अेक-वाक्यता होते. पण पुढे पटवर्धन यांतील प्रत्येक अक्षर गुरु मानतात तें सहस्रबुद्धे किंवा भ. श्री. पंडित या दोघांनाहि मान्य नाही. पंडित सरसकट चरण घेअून त्याच्या आठ मात्रा मानतील तर सहस्रबुद्धे पहिल्या तीन चरणांत पहिलीं चार अक्षरें लघु व पुढचीं दोन गुरु मानतील. या साऱ्यात अभंगरचना सामग्र्यानें पाहिली तर पटवर्धनांची भूमिकाच त्यांतल्या त्यांत अधिक निर्दोष म्हणावी लागेल. ज्या चरणांतील अेक पासून सारी सहाहि अक्षरें लेखन-दृष्ट्या लघु किंवा गुरु असूं शकतात, ज्यांतील प्रत्येक स्थानामधील अक्षर लघु किंवा गुरु असूं शकतें, ज्यांतील मात्रासंख्याहि सहापासून बारापर्यंत कोणतीहि (अर्थात् लेखनदृष्ट्या) असूं शकते, त्या वृत्ताची मूळची कल्पना 'सर्वगुरु' अशीच असली पाहिजे हेंच अनुमान व्यापक व अधिक प्रमाणांत रचनेला धरून आहे असें मानावें लागेल. म्हणूनच पटवर्धन त्यास लगत्व-भेदातीत म्हणतात. यावर अेक अगदीच शाब्दिक आक्षेप घेण्यांत येतो. सर्व गुरु म्हटल्यावर लत्वातीतता आहे, पण गत्वातीतता कशी येते हा तो आक्षेप होय. पण लघुगुरुभेदातीत यात भर भेदावर आहे. सारींच अेकाच प्रकारचीं म्हणजे गुरु अेवढाच त्याचा अर्थ आहे. अेखा-द्याला नीति-अनीतीचा, सोवळ्या-ओवळ्याचा विधिनिषेध नाही म्हटलें की तो नीतीबरोबर

* यावरून असाहि बारीक नियम करितां येअील की 'दुसऱ्या चरणांतील पहिला अष्टमात्रिक ताल सर्व गुरूंचा व दुसऱ्यांतील पहिलीं चार अक्षरें लघु असतील तर उपनिर्दिष्ट यति दुसऱ्या तालांतील पहिल्या अक्षरापुढे न येतां पहिल्या तालांतील तिसऱ्या गुरु अक्षरानंतर येतो. आमच्या मतें अेवढें खोलांत जाण्याचें लक्षणका मस कारण नाही, हें वर सांगितलेंच आहे.

अनीतीच्या, सोवळ्या-ओवळ्याच्याहि पलीकडे गेला आहे असा अर्थ अभिप्रेत नसून नीति व सोवळें तो मानीत नसून बोलणाऱ्याच्या मतें तरी ओवळें व अनीति हींच त्याच्या जीवनांत दिसतात असें म्हणावयाचें असतें तेव्हा लगत्वभेदातीत या शब्दावर आक्षेप घेण्याचें कारण नाही.

पण लघूचा उच्चार गुरूसारखा होतो ही गोष्ट मान्य करावयास सहस्रबुद्धे तयार नाहीत. 'लघूची ती एक मात्रा, गुरुच्या दोन मानिती' हा गोडबोले यांच्या वृत्तदर्पणांतील नियमच बरोबर आहे असें ते ठासून सांगतात. या नियमाला वृत्तें व जाति यांच्यामध्ये प्रामाण्य निरपवाद मानावेंच, पण अभंगांच्या बाबतींत सहस्रबुद्धे यांनाहि तो नियम दुसऱ्या बाजूनेहि मोडावाच लागतो आहे. तेथे ते गुरूच्या दोन मात्रा न धरतां अेकच धरतात. त्यांनी चर्चेला घेतलेला

˘˘˘˘ — — ˘ ˘ ˘ ˘——

अभंगच पाहावा, 'सुंदर तें ध्यान अुभे विटेवरी' यांत सुं, तें, भें, टे या अक्षरांना ते अेकमात्रिक समजतात, व आणखी 'न, व' हीं लघु अक्षरें गुरुच मानतात; मग वृत्तदर्पणाचा सिद्धान्त अधिक कोणीं मोडला. पटवर्धनांनी कीं सहस्रबुद्धे यांनी ? त्याच अभंगांतील पुढील चरण पाहावा:— कंठीं कौस्तुभ्मणी । विराजत. याचें सहस्रबुद्धेकृत मात्रालेखन ˘ ˘ ˘ ˘ ˘ ˚ — — । — — — — असें आहे. आता कं, ठीं, कौ, स्तुभ् हीं सारीं अक्षरें लघु मानावयास सांगणारे खरे असें कोणास मान्य होओील ? आम्हांला तर हीं सारीं गुरु म्हटल्याने कांही बिघडतें असें वाटत नाही. मी ज्या पद्धतीने म्हणतों तीच खरी अेवढाच अर्थ सहस्रबुद्धे यांच्या विधानाचा होओील. चरणांतील पहिलीं चार अक्षरें सरसकट लघु असतात अशी भावना अभंगरचना करणारांची असावी असें म्हणवत नाही. तुकारामादि अभंगलेखकानी हजारो चरण गुर्वक्षरप्रधान किंवा गुरु अक्षरांचेच लिहिले आहेत याचा अर्थ त्यांना सहस्रबुद्धे यांचें म्हणणें मान्य नव्हतें असाच घ्यावयास हवा. सहज म्हणून दिलेले पुढील चरण पाहावेत:— (१) जेथें जातों तेथें । तूं माझा सांगाती ॥ (२) देवाचा भक्त तों, (३) माझें अेसें तया, (४) गाता शंका नाहीं, (५) शिव्या देती आओी. हे चरण पाहिले म्हणजे असेंच वाटेल की अनेक गुरु अक्षरांना लघु म्हणणें यापेक्षा अेखादुसऱ्या लघूचाहि अुच्चार गुरु करणें हाच नियम अधिक ग्राह्य व पूर्वीच्या लोकांस संमत असावा.

पण सर्वच अक्षरांचा अुच्चार गुरु करून अभंग कसा म्हणता येओील अशी अडचण सहस्रबुद्धे यांस पडली आहे, पण मागाहून तें शक्य आहे असें वाटून कीं काय 'तो श्रवणाला गोड कसा लागेल' असा प्रश्न ते टाकतात. श्रवणाचीच साक्ष घ्यावयाची झाल्यास पहिल्या चार अक्षरांस व अधिक अक्षरें असल्यास त्यांतलें अेखादें अर्धें मानून, तीं चार बनवून, त्यांना सरसकट लघु करून म्हणणाऱ्या सहस्रबुद्धे यांचें म्हणणें तरी श्रवणसुभग कसें मानावयाचें ? (त्यांतून गुरूचा अुच्चार लघु करण्यापेक्षा लघूचा गुरु करण्यांत अुच्चारसौलभ्य आहे ही गोष्ट कोणासहि मान्य होओील.) 'कंठीं कौस्तुभ' हीं पांच अक्षरें भ चा अुच्चार अर्धा मानून चार करून सारीं लघु म्हटल्याने श्रवणसुभगता साधते असेंच त्यांना म्हणावयाचें झाल्यास 'तुष्यतु भवान्' म्हणण्यापलीकडे अिलाज काय ? आता मतभेदाची बाब अितकीच की 'सारेच दीर्घोच्चार करून आळेंबळें म्हणता येओील कदाचित्' अशी मान्यता देणाऱ्या सहस्रबुद्धे यांची पद्धति कमी कृत्रिम कीं लघूचा अुच्चार गुरु करणें अधिक सुलभ असल्याने सारे गुरुच असतात असें म्हणणाऱ्या पटवर्धनांची पद्धति कमी कृत्रिम व कर्णकटु ?

लगत्वभेद हा भाषेचा स्वभाव आहे असें सहस्रबुद्धे म्हणतात. हें साऱ्यांसच मान्य आहे.

परंतु पद्यविचार म्हणजे केव्हाहि झाला तरी कृत्रिम भाषाविचारच होय. वृत्तांमध्ये विद्युन्माला वृत्ताला म्हणजे साऱ्या गुर्वक्षरांना मान्यता मिळाली आहेच कीं नाही? अेवढेंच नव्हे तर अितरहि कन्या, रूपोन्मत्ता, विद्युत्भ्रान्ता, विद्युल्लेखा, गान्धर्वी, माल्यश्री, कल्याण, पद्मावर्त, कामक्रीडा, कामोन्मत्ता, ब्रह्माणी अित्यादि सर्वगुरुवृत्तें पूर्वाचार्योनी सांगितलीं आहेत. भाषेंत लघुगुरु येतात म्हणून यांतहि आलेच पाहिजेत असा आग्रह धरणें चुकीचें होअील. अितर लघुगुरुमिश्रित वृत्तांच्या मानाने यात गेयता कमी येअील, पण हीं वृत्तें अशक्यच आहेत असें म्हणतां येणार नाही; निदान पूर्वाचार्योना तरी तसें वाटत नव्हतें. अभंगाच्या गेयतेसंबंधाने तीच स्थिति असेल. आता त्यांचा अुपयोग अधिक गेय अशा चालीमध्ये आपण करीत असूं. सहस्रबुद्धे यांनीच परिशिष्टांतील अेका लेखांत लोकांच्या या प्रवृत्तीचा अुल्लेख केला आहे. अभंगांना 'तुम हम संग जिन बोल पियरवा' ही चीजेची चाल लावण्यांत जी वृत्ति प्रकट होते तीच वृत्ति त्यांना धुमाळी ताल लावण्यांत नाही असें कशावरून? मग अेकाचा निषेध कां व दुसऱ्याला मान्यता कां? वरील वृत्तांमध्ये अक्षरें सारींच गुरु योजिलीं पाहिजेत हा निर्बंध शिथिल करून अुच्चार मात्र दीर्घ करूं, अक्षरयोजना लघुगुरु कशीहि करूं, कारण तो भाषेचा स्वभाव आहे, अशी विचारसरणी अभंगात असण्याचा संभव आहे. 'विद्युन्माला' हें वृत्त आणि 'देवीवर' हा छंद का असा प्रश्न सहस्रबुद्धे करीत आहेत (पान ३५ टीप) ह्याचें अुत्तर यात मिळण्याजोगें आहे. अेकांत लेखनदृष्ट्याहि सारीं गुरुच अक्षरें आहेत, तर दुसऱ्यांत फक्त अुच्चारदृष्ट्या आहेत, लेखनदृष्ट्या नाहीत. पद्य-विचाराच्या वेळीं भाषास्वभावाचा विचार करणाऱ्या सहस्रबुद्धे याचा अुच्चार व लेखन यांतला भेद लक्षात घ्यावयास आक्षेप असूं नये.

वरील विवेचनावरून श्री. सहस्रबुद्धे याची पद्यचर्चाहि वादग्रस्त झाली आहे ही गोष्ट लक्ष्यात येअील. त्यांनी केलेला विचार हा बराच सूक्ष्म आहे हें खरें, परंतु 'पद्यमीमासा' हें नाव देण्याअितका तो व्यापक व सामान्य सिद्धान्ताच्या स्वरूपाचा नाही, व पद्याचें रहस्य— अेकच सर्वव्यापी रहस्य— सागण्याच्या दृष्टीने तो अुपयुक्त झाला आहे असें म्हणवत नाही. पद्य-रहस्याचा पटवर्धनांचा आवर्तनसिद्धान्त चुकीचा, तर दुसरा कोणता तें स्पष्ट करावयास हवें होतें. प्रत्येक ठिकाणीं पटवर्धनांनी 'हें अधिक स्पष्ट करावयास हवें होतें' 'याचा खुलासा केला नाही' अित्यादि दोष काढणारानी आपला अेक पद्यविषयक सिद्धान्त तरी स्पष्ट करावयास नको काय? केवळ पटवर्धनाच्या पद्यलक्षणातील अपूर्णता दाखविल्याने व्यापक पद्यमीमांसा झाली असें होत नाही किंवा ती करण्याचें सामर्थ्य प्रकट झालें असेंहि म्हणतां येत नाही. प्रस्तावनाकारांनी लेखकाला मराठीचें नवीन छंदःशास्त्र रचण्याचा आग्रह केला आहे. तें त्यांनी अवश्य करावें, पण त्याआधी त्यांनी आपली बुद्धि अधिक व्यापक व अुदार करावयास हवी असें वाटतें. बारीक विचार करण्याची शक्ति मात्र त्यांनी भरपूर प्रकट केली आहे. त्याची अुपयुक्तता बारीक दोषदर्शनावरच संपूं नये अेवढाच हें विस्तृत व काहीसें तीव्र परीक्षण करण्याचा हेतु. त्याचा विपर्यास करण्याचा श्री. सहस्रबुद्धे यांचा स्वभाव नाही हें माहीत असल्यानेच तें केलें आहे.

## साहित्यसमीक्षा व वाङ्मयेतिहास

१ **श्रीज्ञानदेव**— ले० व प्रका० प्रो. मा. दा. अळतेकर, पार्क रोड, विलेंपारलें, मूल्य २॥। रु.

२ **पंजाबांतील नामदेव**— ले० श्री. शं. पु. जोशी; प्रका० श्री. के. मि. ढवळे, मुंबई ४; मूल्य १२ आणे.

३ **नरेंद्र कविकृत रुक्मिणीस्वयंवर**—संपा० प्रो. वि. भि. कोलते; प्रका० श्री. ज. भि. कोलते, अरुण प्रकाशन, मलकापूर (वऱ्हाड); मूल्य २॥ रु.

४ **मराठवाड्यांतील गद्यविहार**— (पुस्तक ३ रें) संग्रा० व प्रका० डॉ. वा. दा. गाडगीळ, मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळ, हैदराबाद (द.); मूल्य १॥ रु.

५ **मराठी नाट्यसृष्टि**— (पौराणिक नाटकें) खंड १ ला; ले० व प्रका० प्रो. वि. पां. दांडेकर, हाथीपोळजवळ बडोदें, मूल्य ४ रु.

'माझा मराठाची बोल कौतुकें। परि अमृतातेंही पैजा जिंके।' अशी प्रतिज्ञा करून ती शेवटास नेणाऱ्या आणि महाराष्ट्रसंतवाङ्मयाचा पाया घालणाऱ्या ज्ञानेश्वरांचें चरित्र आणि वाङ्मय यांचा परिचय प्रो. मा. दा. अळतेकर यानी आपल्या 'श्रीज्ञानदेव' या ग्रंथद्वारा करून दिला आहे. ज्ञानेश्वरांचें चरित्र त्यांचे समकालीन संत, उत्तरकालीन दासोदिगंबर, महिपति अित्यादि चरित्रकार आणि अर्वाचीन पागारकर, आजगांवकर, दांडेकर अित्यादि अनेकांनी आजवर अनेक लिहिलीं आहेत. ज्ञानेश्वर हे असामान्य बुद्धीचे आणि अलौकिक कल्पकतेचे असे द्रष्टे कवि होते; ज्ञानोत्तर भक्तीचा मार्ग सांगणारे अेक साक्षात्कारी— Mystic— संत होते. आपल्या २१ वर्षांच्या हयातींत ज्ञानेश्वरी, अमृतानुभव यांसारखे ग्रंथ आणि दगडालाहि पाझर फोडतील अशा तऱ्हेचे आर्त अभंग लिहून त्यानी महाराष्ट्राला चकित करून सोडलें. सामान्य लोकांना स्वप्नांतहि खरे न वाटणारे हे जणूं चमत्कारच होत. झालें! त्यांच्या चरित्रकांनी त्यांचें सारें आयुष्यच चमत्कारमय करून सोडलें!! चमत्काराच्या गोत्यांत सापडलेल्या ज्ञानेश्वरांना कोणीतरी सुबुद्ध आणि चिकित्सक असा चरित्रकार लाभणें जरूर होतें. प्रो. अळतेकरांनी ही अुणीव बऱ्हंशीं भरून काढली आहे.

प्रस्तुत ग्रंथाच्या अेकंदर बारा प्रकरणांपैकी पहिलीं सात प्रकरणें— विषयप्रवेशाचें पहिलें प्रकरण सोडून— ज्ञानेश्वरचरित्राला वाहिलीं आहेत. आठवें प्रकरण ज्ञानेश्वरासंबंधीचे विवाद आणि शंका यांकरिता लिहिलें आहे, आणि अुरलेला ग्रंथ त्यांच्या काव्यावर आधारला आहे.

ज्ञानेश्वरांचें असामान्यत्व त्यांच्या चरित्रांतील 'चमत्कार' वर्ज्य करूनहि सिद्ध करतां येतें ही गोष्ट प्रो. अळतेकरानी विषयप्रवेशांत मांडली आहे. प्रो. अळतेकरांची ज्ञानेश्वरचरित्राकडे पाहण्याची दृष्टि यावरून स्पष्ट होते. अंधश्रद्धेने भारलेल्या त्यांच्या सर्व चरित्रांवर अळतेकरांनी बरेच खरमरीत कोरडे ओढले आहेत. मुकुंदराज हे ज्ञानेश्वरांच्या आधी १०० वर्षे होअून गेले असें समजतात तरी ज्याला भागवतधर्म म्हणतात त्याचा पाया ज्ञानेश्वरांनीच घातला. न्या. मू. रानडे ज्याला भागवतधर्म म्हणत त्यालाच पुढे कै० वि. का राजवाडे यानी महाराष्ट्रधर्म असें नांव दिलें. परंतु पा.९ वर अळतेकरांनी या दोन्ही धर्मांची व्यवस्थित सांगड घातली आहे. महाराष्ट्रधर्माची म्हणून जी विचारप्रणाली रामदासांनी सुरू केली असें मानलें जातें, तिचें मूळ वस्तुतः प्राचीन कवींच्याच विचारपरंपरेंतील आहे. महाराष्ट्रधर्माची विशिष्ट परंपरा

मुकुंदराज-ज्ञानेश्वरांपासूनच सुरू झाली आहे. प्रो. रा. द. रानडे यांनीहि याच मताचा पाठपुरावा केला आहे. 'It is indeed true as late Mr. Justice Ranade said, that even pacifist saints like Namadeo and Tukaram laid the moral foundations on which Ramadas later reared his politico-religious edifice (Mysticism in Maharashtra p.422.) न्या. मू. रानडे यांनी अुदाहरणादाखल फक्त नामदेव-तुकारामाचा अुल्लेख केला आहे. ज्ञानेश्वरासंबंधीहि हीच गोष्ट म्हणतां येते.

अलौकिक पुरुषांची अलौकिकता सिद्ध करतांना त्यांच्या मातापितरांनाहि थोडेंफार अलौकिक बनविले जातें. सिधोपंतांच्या स्वप्नात पांडुरंगाने येणें आणि 'विठ्ठलपंतास आपली मुलगी दे' असें सागणें, आणि त्याचप्रमाणे 'तूं ती करून घे' असें विठ्ठलपंतासहि स्वप्नातच सांगणें ह्या गोष्टी यापैकीच आहेत. स्वप्नमीमासा माहीत असणाऱ्याना यातील रहस्य चटकन् कळेल. परंतु ज्ञानेश्वरचरित्रकारानी तिकडे दुर्लक्ष केलें होतें. पांडुरंगाच्या आज्ञेने विवाह करून घेणारा विठ्ठलपंत बायकोचा त्याग करताना मात्र पांडुरंगाची आज्ञा घेत नाही प्रो. अळतेकरांनी यांतील सत्यासत्यता स्पष्ट केली आहे. बुद्धिप्रामाण्याचा हाच निकष प्रो. अळतेकर ज्ञानेश्वरचरित्रांतील सर्वच चमत्कारांना लावितात. ज्ञानेश्वराच्या आयुष्यांतील प्रमुख चमत्कार म्हणजे रेड्यामुखीं वेद वदविल्याचा. भौतिकशास्त्रांत अशक्य गोष्टी शक्य होत असलेल्या आपणांस प्रत्यहीं दिसत आहेत. हाच शक्याशक्यतेचा निकष रेड्याला लावून तो बोलणें अशक्य नाही असा युक्तिवाद काही लोक मांडतात. अुत्क्रांतितत्त्वानुरूप कांही युगानी रेड्यांचीं माणसें होअून त्यांना वाचा फुटेल कदाचित्. परंतु ज्ञानेश्वरकालीं आणि तेंहि ज्ञानेश्वराचा हात लागतांच तो रेडा बोलूं लागला—छे ! वेदघोष करूं लागला— हें म्हणणें कोणत्याहि युक्तिवादाला न पटणारें आहे. प्रो. अळतेकर यांच्या मतें त्या वेळीं अेखादा 'रेडे' या नांवाचा माणूस असावा. अर्थात् ही गोष्ट सर्वस्वीं अशक्य नाही. रेडे हें आडनांव तळेगांवच्या आसपास अनेकांचें आढळतें; आणि त्यांचाच कोणी पूर्वज त्या ठिकाणीं होता असा प्रत्यक्ष पुरावा सांपडला तर अुत्तमच. परंतु त्याअभावीं आमच्या मतें 'रेडा' शब्द अलंकारार्थी घ्यावयास पाहिजे; आणि ज्ञानेश्वरांचा हस्तस्पर्श म्हणजे त्याचा सहवास आणि शिकवण. 'रेड्यामुखीं वेद' याचा अर्थ असा लावला म्हणजे त्यातील असंभवनीयता आणि अतिशयोक्ति या दोहींचाहि निकाल लागतो. श्राद्धदिनीं प्रत्यक्ष पितर ज्ञानदेवानी भोजनास आणले हीहि अेक केवळ भाविक वेड्या खुळ्यांनी अुठवलेली दंतकथा आहे असें सिद्ध करतांना प्रो. अळतेकरांनी अुपरोध आणि अुपहास यांचा अगदी परिणामकारक अुपयोग केला आहे (पा.५६,५७). सर्वच चमत्कारांचा प्रो. अळतेकर याप्रमाणे निकाल लावतात. मात्र हें करतांना त्यांनी ज्ञानेश्वरांचीच बाजू सांभाळली आहे. ज्ञानेश्वरांनी खरोखर चमत्कार केले असें म्हणणें म्हणजे ज्ञानेश्वर हे ढोंगधत्तुरे करून लोकांच्या डोळ्यात धूळ फेकणारे बुवा होते असें म्हणण्यासारखें होअील. चमत्कारांच्या बाजूने बोलणारे लोक ज्ञानेश्वरांनाच अुलट अन्याय करीत आहेत असें ठिकठिकाणीं प्रो. अळतेकर बजावून सांगतात.

ज्ञानदेव आणि त्यांचीं भावंडें यांच्या जन्मतिथि, ग्रंथरचनेचें ठिकाण, ज्ञानेश्वरींतील शेवटच्या 'आणि ग्रंथोपजीवीये' (ओवी १८००) या ओवीपासूनच्या ओव्या यांवर प्रो. अळतेकरांनी फारसा नवीन प्रकाश जरी पाडला नसला तरी अुपलब्ध अशी सर्व माहिती देअून त्यांतून त्यांनी काढलेला निष्कर्ष कोणासहि पटेल असा आहे. परंतु 'बारा शते बारोत्तरे' ही ओवी सच्चिदानंदबावाने ज्ञानेश्वरीची प्रत मिळवून मग लिहून काढली असावी असें अेक अनु-

मान सुचविलें आहे तें जितकेंसें पटणारें आहे असें वाटत नाही. कारण वरील अनुमानांतून आणखी दोन पोटअनुमानें निघतात. अेक ज्ञानेश्वरीची रचना झाली असतां तिचा लेखक सच्चिदानंदबाबा नव्हता. आणि दुसरें, ज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरी लिहिली तिचा काळ 'बाराशते बारोत्तरे' पूर्वीचा असावा. अर्थात् प्रत्यक्ष प्रमाणाभावीं असा निर्णय तूर्त तरी लागूं शकत नाही, आणि याची जाणीव स्वतः प्रो. अळतेकरानासुद्धा आहे. मात्र आलेली शंका आणि सुचलेलें अनुमान व्यक्त करणें हें ते आपलें कर्तव्य मानतात, आणि तेंहि योग्यच आहे. दडपून अनुमानें बांधण्याअैवजी अशीं शंकास्थळें दाखविणें याचीच संशोधनांत अत्यंत जरूरी असते. खऱ्या संशोधनाची अिमारत यावरच बांधतां येते.

तीर्थयात्रा या प्रकरणांतील नामदेवाच्या तीर्थावळीच्या अभंगाची छाननी चांगली झाली आहे. ज्ञानेश्वर आणि त्यांचें वारकरीपंथाशीं नातें याबाबत निश्चित अशीं अनुमानें अजून बांधावयाचीं आहेत. यासंबंधी प्रो. अळतेकरांनी पा. ८३ वर केलेलें विवेचन चिंत्य आहे.

'विवाद आणि शंका' हें प्रकरण प्रस्तुत ग्रंथांतील अेक वाचनीय प्रकरण म्हणून दाखवितां येअील. ज्ञानेश्वरीचा कर्ता ज्ञानदेव आणि अभंग लिहिणारा ज्ञानदेव हे अेकच कीं दोन हा अेक अजून अनिर्णित असा प्रश्न आहे. महाराष्ट्रांत यासंबंधी बरेच वादविवाद रंगले आहेत. प्रो. अळतेकरांनी या सर्व वादविवादांचा सारांश दिला आहे. दोन ज्ञानेश्वर म्हणणारे भारद्वाज आणि त्याचें मत खोडूं पाहणारे भिंगारकरबुवा या दोघांच्या भूमिका, त्यांचे मुद्दे आणि निष्कर्ष या सर्वांचें स्पष्टीकरण प्रो. अळतेकरांनी या प्रकरणांत केलें आहे. ज्ञानेश्वरी आणि ज्ञानदेवी अभंग यांची भाषा जरी सोडली (अर्थात् ती तशी टाळतां येत नाही) तरी त्यांच्या शिकवणींतहि बराच फरक आढळतो. प्रो. अळतेकरांच्या मतें हा फरक त्या दोन ग्रंथांतील नसून तो केवळ आगंतुक आहे, आणि त्याला कारण कांही अभंग क्षेपक असावेत. अळतेकरांचें हें अनुमानहि विचारार्ह आहे. परंतु नक्की कोणते अभंग क्षेपक आहेत याचा प्रथम निर्णय लावला पाहिजे.

प्रो. अळतेकर ज्ञानदेवी अभंग हे ज्ञानेश्वराचेच (काही क्षेपक अभंग वजा करून) मानतात. परंतु प्रस्तुत ग्रंथांतील अुदाहरणांत त्याचा कोठेच अुपयोग केलेला दिसत नाही. निदान 'काव्यसंपदा' या प्रकरणांत तरी त्यांचा अुपयोग करणें जरूर होतें. ज्ञानेश्वरीला तर अुपमा नाहीच, परंतु त्यांचे अभंगहि तितकेच अनुपमेय आहेत. 'In the field of Lyric of devotion— of the lyric of divine love,— of the romance of piety and love of the spirit, Maharashtra literature stands unrivalled, even perhaps unequalled, unapproached and unapproachable' असें प्रो. वा. ब. पटवर्धन यांनी महाराष्ट्रसंत-वाङ्मयाबद्दल म्हटलें आहे तें ज्ञानेश्वरांच्या अभंगांना पुरेपूर लागूं पडतें. परमेश्वराबद्दल वाटणाऱ्या भक्तिभावना ज्यांत ओसंडून आल्या आहेत असे अभंग लिहिणाऱ्या संतकवींत ज्ञानेश्वर रेसभरहि मागे नाहीत. तेव्हा त्यांच्या अभंगांवरहि अेखादें स्वतंत्र प्रकरण प्रो. अळतेकरांनी प्रस्तुत ग्रंथांत लिहावयास हवें होतें.

ज्ञानेश्वरांची 'काव्यसंपदा' (प्रकरण १० वें) वर्णन करतांना भक्तिरस निराळा मानण्याची जरूरी नाही असें प्रो. अळतेकरांनी प्रतिपादन केलें आहे. भक्ति हा शृंगाराचा अेक प्रकार आहे असें सांगून भक्तियुक्त शृंगाररसाचा अुत्कृष्ट परिपोष झाल्याचीं कांही अुदाहरणें त्यांनी दिलीं आहेत. भक्तिरस निराळा मानावा कीं न मानवा या बाबतींत मतभेद असला तरी भक्तियुक्त शृंगाराचीं म्हणून अुदाहरणें दिलीं आहेत तीं पाहून वाचकांचा थोडासा विरस होतो. म्हणजे दिलेलीं

हीं ज्ञानेश्वरींतील अुदाहरणें बरोबर नाहीत म्हणून नव्हे तर त्यांहीपेक्षा सरस अुदाहरणें कां दिलीं नाहीत म्हणून. भक्तिरसाकरिता देव आणि भक्त यांतील द्वैत स्पष्ट असावें लागतें. भक्ताला देवाबद्दल वल्लभावल्लभासारखी विलक्षण ओढ असावी लागते. ज्ञानेश्वरी हा तात्विक स्वरूपाचा ग्रंथ असल्यामुळे वरील प्रकारचीं स्थळें तींत फार न आढळलीं तर नवल नाही. याकरिता भक्तिरसाचा किंवा प्रो. अळतेकराच्या शब्दांत भक्तियुक्त शृंगाराचा अुत्तम नमुना पाहावयाचा असेल तर ज्ञानेश्वराचे अभंगच पाहावे लागतील. ' चंदनाची चोळी । माझें सर्वांग पोळी । ' यासारखे वर वर पाहतां अत्यंत शृंगारिक पण यथार्थत्वाने पूर्णतः आध्यात्मिक असेसुद्धां अभंग त्यांत अनेक दाखवितां येतील. परंतु प्रो. अळतेकरांचें अभंगांकडे लक्ष कसें गेलें नाही याचें आश्चर्य वाटतें. कदाचित् ज्ञानेश्वरी वाचल्यानंतर ते स्वतःच समारोपांत म्हणतात त्याप्रमाणे

सांगे मुकुलदलाचेनि ताटे । जो जेविला चंद्रकिरणें चोखटे ।
तो चकोरू काअी वाळुवंटें । चुंबितु असे ।।

अशी त्यांची स्थिति झाली असणें अशक्य नाही. परंतु ज्ञानेश्वरांच्या अभंगांतून 'चोखटें चंद्रकिरणें' आणि तीहि 'मुकुलदलांच्या ताटांतूनच' त्यांना मिळालीं असतीं खास.

अेकंदरींत चिकित्सापूर्ण दृष्टीने लिहिलेल्या ज्ञानेश्वरांवरील ग्रंथाची भासणारी अुणीव प्रस्तुत ग्रंथाने बव्हंशीं दूर झाली आहे. प्रस्तुत ग्रंथांत प्रो. अळतेकरांनी ज्ञानेश्वरांचे चरित्र आणि त्यांचें वाङ्मय यांचें विवेचन विस्ताराने केलें आहे, परंतु त्याबरोबरच तत्कालीन समाज त्यांतून झालेली ज्ञानेश्वरांची वाङ्मयनिर्मिति, ज्ञानेश्वरांनी केलेली भाषाक्रांति, वारकरीपंथाच्या संघटनेंतील त्यांचें कार्य अित्यादींचा विचार प्रो. अळतेकरांनी केला आहे त्यापेक्षा जास्त विस्ताराने केला असता तर बरें झालें असतें असें वाचकांस वाटल्यावाचून राहत नाही. ज्ञानेश्वरांकडे पाहतांना आज चिकित्सक दृष्टीबरोबर अैतिहासिक दृष्टीचीहि अत्यंत आवश्यकता आहे.

प्रो. अळतेकरांच्या लेखनशैलीबद्दलहि दोन शब्द लिहिणें जरूर आहे. चमत्कार प्रकरणांत वर्णाश्रमधर्माचें स्तोम माजविणाऱ्या सनातन्यांचा समाचार घेतांना प्रो. अळतेकर यांचा अभिनिवेश पाहण्यासारखा आहे. अुपरोध आणि अुपहास यांचीं शस्त्रें परजून अुभे ठाकलेले प्रो. अळतेकर ठिकठिकाणीं दिसतात. ज्ञानेश्वरीच्या त्यांनी केलेल्या अवगाहनामुळे, आणि प्रगाढ अभ्यासामुळे असेल कदाचित्, पण प्रस्तुत ग्रंथाची भाषा जरा जास्त अलंकारिक झाली आहे.

प्रस्तुत ग्रंथांत ज्ञानेश्वरी आणि ज्ञानेश्वरांचें वाङ्मय यांसंबंधीचे अनेक विवाद्य आणि अविवाद्य प्रश्नांचें विवेचन प्रो. अळतेकरानी केलें आहे. त्यांतील अेकेक प्रश्नाचें महत्त्व स्वतंत्रतेने पाठपुरावा करण्याअितकें आहे. परंतु तसा अेकेकाचा पाठपुरावा करून त्यावर नवीन प्रकाश पाडण्याचा प्रस्तुत ग्रंथाचा मुळी हेतूच नाही. परंतु अशा प्रकारची चोदना मात्र प्रस्तुत ग्रंथाच्या वाचनाने मिळते आणि तीमुळे कुणी अितर विद्वानानी (अगर स्वतः अळतेकरांनी) तिकडे लक्ष पुरविलें तर प्रस्तुत ग्रंथाचें खरें सार्थक होअील.

संतकवि नामदेव यांच्या चरित्रविषयक संशोधनात 'पंजाबातील नामदेव' हा अेक महत्त्वाचा मुद्दा अुपस्थित झालेला आहे. शीखांच्या आदिग्रंथांत ज्या कांही भक्तांची काव्यकृति समाविष्ट केली आहे त्यात नामदेव नांवाच्या अेका कवीची काव्यकृति आढळते. त्याचप्रमाणे पंजाबात बरेच नामदेवसंप्रदायी लोक आहेत, व कांही चरित्रकारांनी नामदेवाचें चरित्रहि लिहिलेलें आहे. या चरित्रकारांत नाभाजी हा प्रमुख मानला जातो. नाभाजीच्या भक्तिमाला ग्रंथात नामदेवाचें चरित्र आढळतें. बाबा पूरणदास याने अि. स.

१८९८ मध्ये गुरुमुखी भाषेत 'जन्मसाखी श्रीस्वामी नामदेवजीकी' या नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. नामदेवाचे पंजाबी चरित्रकार त्याला मूळचा महाराष्ट्रीयच मानतात. महाराष्ट्रांतील नामदेव दीर्घायुषी होता व त्याने आपल्या अुत्तरायुष्यांत अुत्तरहिंदुस्थानांत प्रवास केला अशा तऱ्हेचा पुरावा आपणांस त्याच्या काव्यांत आढळतो. या सर्व गोष्टींचा परिणाम महाराष्ट्रांतील नामदेव व पंजाबांतील नामदेव अेकच कीं दोन या प्रश्नाचें अुत्तर शोधण्यांत झाला आहे. नामदेव-चरित्राच्या दृष्टीने याला फार महत्त्व आहे. श्री. अ. का. प्रियोळकर यांनी या प्रश्नावर चांगल्या-पैकी प्रकाश पाडला आहे. "शीखांच्या आदिग्रंथांतील नामदेव" या त्यांच्या निबंधांतून त्यांनी या दोन्ही नामदेवांतील द्वैत सिद्ध केलें आहे. श्री. प्रियोळकरानी वर अुल्लेखिलेल्या सर्व गोष्टींचा बारकाअीने विचार करूनच हा निष्कर्ष काढला आहे. याअुलट फिरते अितिहाससंशोधक श्री. शं. पु. जोशी यांनी 'पंजाबातील नामदेव' या ग्रंथांत या दोन्ही नामदेवांतील अभिन्नता सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. श्री. जोशी यानी मुद्दाम पंजाबची सफर करून गुरुमुखी भाषेचा अभ्यास केला आहे. घोमान येथील नामदेवाची म्हणून दाखविली जाणारी समाधि पाहून तेथील बावा लोकाशीं व अितर नामदेवसंप्रदायी लोकांशीं त्यानी विचारविनिमय केला आहे. श्री. जोशी याचे निष्कर्ष कोणाला अमान्य झाले तरी त्यांनी केलेल्या या स्तुत्य श्रमाबद्दल ते अभिनंदनास जरूर पात्र आहेत.

श्री. जोशी यांनी आपल्या पुस्तकाची विभागणी अेकूण चार प्रकरणांत केली आहे— १ नामदेवकालीन धार्मिक स्थिति, २ संत नामदेव यांचें पंजाबांतील स्मारक, ३ ग्रंथसाहेबां-तील नामदेवाची वाणी, आणि ४ नामदेव, जयदेव, त्रिलोचन. पैकी 'ग्रंथसाहेबांतील नाम-देवाची वाणी' यात ग्रंथसाहेबांतील नामदेवाचे अभंग आणि त्याचा अर्थ दिला आहे; आणि 'नामदेव, जयदेव, त्रिलोचन' या प्रकरणात नामदेकालीन मानल्या गेलेल्या जयदेव व त्रिलोचन याच्या प्रमुख काव्यकृति दिल्या आहेत. श्री. जोशी यांची नामदेवचरित्रासंबंधीचीं अनुमानें विशेषतः पहिल्या दोन प्रकरणांत आलीं आहेत.

पहिल्या प्रकरणांत प्रथम तत्कालीन निरनिराळ्या संप्रदायाची थोडक्यांत माहिती देअून श्री. जोशी हे नामदेवचरित्राकडे वळले आहेत. 'संतचरित्रांत असंभाव्य आणि अशक्य चम-त्काराचा पूर आलेला दिसतो' ही गोष्ट ते कबूल करतात परंतु ग्रंथसाहेबातील नामदेवचरित्र-विषयक पुरावा देतांना मात्र (पा. १४) चमत्कारविषयक पद्याचाहि हे आधार घेतात याचें नवल वाटतें. चमत्काराचें प्राबल्य समाजावर असलें म्हणजे अेकाचे चमत्कार दुसऱ्या विभूतीवर लादले जातात. विभूतिपूजनाचा हा अेक मार्ग आहे. सत्यसंशो-धनांत अशा गोष्टींना महत्त्व देतांना थोडा विचारच करावा लागतो. नामदेवाच्या अुत्तरायुष्यां-तील हालचालींची विशेषशी माहिती दक्षिणेंत अुपलब्ध नाही. तेव्हा त्याचें परप्रांतीं परिभ्रमण होणें अशक्य नाही; आणि ज्या अर्थी अुत्तरहिंदुस्थानांत त्याचा संप्रदाय आढळतो त्या अर्थी नामदेवाचें वास्तव्य अुत्तरहिंदुस्थानांत दीर्घकाल असलें पाहिजे ही गोष्ट श्री. जोशी यांना निर्विवाद वाटते. श्री. जोशी यांना वाटणारी गोष्ट अशक्य नाही पण निर्विवाद आहे कीं नाही याबद्दल मात्र वाद अुत्पन्न होणें शक्य आहे. नामदेवाचा कोणी शिष्य आपल्या गुरूचें नांव धारण करून राहणें अशक्य नाही; परंतु श्री. जोशी या गोष्टीचा स्पष्ट अिन्कार करतात. 'कोणताहि पंजाबी पट्टशिष्य ...... हें नांव धारण करीत नव्हता.' असें ते म्हणतात. त्याचप्रमाणे शिष्यांना पंजाबांत 'चिम्बा' म्हणतात. ग्रंथसाहेबांत नामदेव आपणांस 'छिपा' म्हणवितो. तेव्हा छिपा आणि चिम्बा यांतील अर्थभिन्नत्वावरून व्यवसाय-

भिन्नत्व आणि म्हणून व्यक्तिभिन्नत्व दाखविणें अशक्य नाही. श्री. प्रियोळकरांनी या गोष्टीचा अुल्लेख केला आहे. परंतु श्री. जोशी यांना हें मान्य नाही. मान्य होणें किंवा न होणें हा प्रश्न अलाहिदा; पण श्री. जोशी हे अशा भिन्न मताच्या लोकांचा अुल्लेख ज्या प्रकाराने करतात तो मात्र गर्ह्य वाटतो. 'मध्यंतरीं महाराष्ट्रांतील कांही बैठ्या आणि अुपद्व्यापी लोकांनी...' असा त्यांचा अुल्लेख करून या लोकांच्या मताला ते 'अविचाराचे व मूर्खपणाचे' म्हणतात. अेके ठिकाणींच न राहतां परिभ्रमण करणें ही गोष्ट संशोधनास आवश्यक आहे. परंतु स्वतः हिंडून साधनसामुग्री गोळा केल्यानंतर शांतपणें तिचा विचार करून अनुमानें बांधणेंहि तितकेंच महत्त्वाचें आहे. हीं दोन्ही कामें अेकमेकांना पूरक आहेत. या दोन्ही गोष्टी जर अेकाच्याच हातून घडल्या तर अर्थात् चांगलेंच. श्री. जोशी यांनी असा प्रयत्न केला आहे. परंतु अेके ठिकाणीं राहून संशोधन करण्याचें कार्यहि कांही कमी योग्यतेचें ठरत नाही. श्री. जोशी यांनी अेक गोष्ट सिद्ध करतांना विरोधी मताच्या लोकांना वरील शब्दांत अहेर करण्याचें प्रयोजन नव्हतें. हा कांही वादविवाद नव्हे; हें सत्य-संशोधन आहे. कदाचित् आणखी कांही दिवसांनी नवीन कांही माहिती मिळाली तर श्री. जोशी आज ज्या गोष्टी सिद्ध करूं पाहतात त्याहि चुकीच्या ठरणें अशक्य नाही.

ग्रंथसाहेबांतील 'संतमंडळ' या पोटभागांत श्री. जोशी यांनी जयदेव-त्रिलोचनादि संतांची थोडक्यांत माहिती त्यांच्या प्रमुख पद्यांसह दिली आहे ती वाचनीय आहे. या संतमंडळींतील 'सैन' या संताबद्दल 'हा महाराष्ट्रीय होता असें म्हणणें अविचाराचें होअील' अशाच तऱ्हेचें अत्याग्रही विधान केलें आहे. सेना न्हाव्याचे म्हणून अुपलब्ध असलेले मराठी अभंग दुसऱ्या कोणा महाराष्ट्रीय सेनाचे नसून याच अुत्तरहिंदुस्थानी सेनाने मराठींत लिहिलेले अभंग आहेत असें त्यांचें म्हणणें आहे. महाराष्ट्रीय सेना न्हाव्याची चरित्रविषयक विशेष अशी माहिती अुपलब्ध नाही हें जरी खरें असलें तरी दक्षिणेंतील सेना न्हावी हा अुत्तरहिंदुस्थानी सेनाहून निराळा नसेलच असेंहि निश्चितपणें म्हणण्यास प्रस्तुत पुस्तकांत पुरेसा आधार नाही.

प्रस्तुत पुस्तकाचें दुसरें प्रकरण घोमान येथील नामदेवाच्या समाधीबद्दलचें आहे. नामदेवाच्या दोन समाध्या नामदेवाच्या अभिन्नत्वाच्या आड येतात. परंतु ज्या जागीं नामदेव राहत होते त्याच जागीं त्यांच्या मृत्यूनंतर हें स्मारक बहोरदास या त्याच्या शिष्याने बांधलें असें घोमान येथील बावा लोकांचें म्हणणें आहे. नांवाशीं निगडित झालेल्या स्थानीं समाधि बांधणें अशक्य नाही परंतु केवळ बावामंडळीचें असें म्हणणें आहे यावरून अनुमान बांधणें योग्य नव्हे. त्याचप्रमाणे तिकडील लोकांना ही भिन्नत्वाची कल्पना मुळीच सहन होत नाही असें ठिकठिकाणीं श्री. जोशी म्हणतात. परंतु सत्यसंशोधनांत कोणाच्याहि भावनांना फारशी किंमत नसते हें ते जाणत असतीलच. प्रस्तुत पुस्तकांत त्यांनी घोमान येथील समाधीचा व भिंतीवरील नामदेवाचा म्हणून मानलेला असे दोन फोटो दिले आहेत. त्याचप्रमाणे तेथील अितर स्मारकांची थोडक्यांत माहिती देअून नामदेवाच्या नांवाने चालविलेल्या शाळा, लायब्ऱ्या अित्यादींची माहिती दिली आहे. नामदेवाच्या मंदिरावर शीखांचें झालेलें आक्रमण आणि गुरुद्वार ॲक्ट, कोर्टाचा निकाल अित्यादि माहिती अुद्बोधक आहे.

श्री. जोशी हे अेक फिरते अितिहाससंशोधक आहेत. त्यांच्या परिभ्रमणांत आढळलेली नामदेवविषयक माहिती आणि त्यावरील त्यांचीं अनुमानें त्यांनी प्रस्तुत पुस्तकांत दिलीं आहेत. श्री. जोशी यांचीं सर्वच मतें मान्य होणारीं नसलीं तरी नामदेवविषयक संशोधनास त्यांनी हातभार लावला आहे. फिरतें संशोधन होणें कांही सर्वांनाच शक्य नसतें. तेव्हा बैठ्या

संशोधकांचा अुपरोधपूर्ण अुपमर्द न करतां श्री. जोशी हे शक्य तों त्याच्याशीं सहकार्य करतील तर संशोधनाच्या दृष्टीने प्रगतीचें पाअूल पुढे पडेल असें येथे म्हटल्यावांचून राहवत नाही. प्रस्तुत पुस्तकाला प्रो. प्र. वा. बापट यानी प्रस्तावना लिहिली आहे. नामदेवविषयक संशोधनाची त्यांनाहि तळमळ आहे. श्री. जोशी याना या संशोधनास त्यानीच प्रवृत्त केलें असल्याचें लेखकाच्या हृद्गतावरून दिसतें.

महानुभवीय साती ग्रंथापैकी पाच ग्रंथ यापूर्वीच प्रसिद्ध झाले आहेत. अुर्वरित दोन ग्रंथांपैकी नरेंद्राचे रुक्मिणीस्वयंवर हा अनेक वाङ्मयगुणांनीं युक्त असा सुंदर काव्यग्रंथ अमरावती अेथील किंग अेडवर्ड कॉलेजचे मराठीचे अध्यापक श्री. वि. भि. कोलते यांनी मोठ्या परिश्रमपूर्वक संपादन करून महाराष्ट्रीय वाचकापुढे ठेविला आहे. या काव्याच्या प्रसिद्धीकरणाने प्राचीन मराठी काव्यवाङ्मयातील अेका बहुमोल काव्याचें आपणास सम्यग्दर्शन घडलें असें रसिकांना वाटल्यावांचून खास राहणार नाही.

प्राचीन मराठी काव्याच्या हस्तलिखित पोथ्या मिळवून त्यांतील पाठभेदांची संगति लावून, त्यातलें शुद्धाशुद्ध पाहून, विशेष जागीं सविस्तर टीपा देअून अगदी शुद्ध स्वरूपात त्याचें संपादन करणे हें किती कष्टाचें आणि जिगजिगीचें असतें याची कल्पना सामान्य वाचकांना येणार नाही; पण अशा परिश्रमाची कल्पना ज्या अभ्यासकाना असते तेच अशा ग्रंथाचें विशेष चीज करतात. तेव्हा नरेंद्रकृत रुक्मिणीस्वयंवर ह्या काव्यग्रंथाचा अुपयोग अभ्यासक खात्रीने करतीलच. पण मूळ काव्यच अितके गोड आहे की सामान्य रसिकानाहि त्याचा आस्वाद घेतां येअील. ही सोय प्रो. वि. भि. कोलते याच्या प्रयत्नामुळे आज होत आहे यासाठी संपादक म्हणून ते अभिनंदनास पात्र आहेत.

ह्या पुस्तकाचें संपादन करताना महानुभावपंथांतील ज्येष्ठ व श्रेष्ठ महंत श्रीदत्तलक्षराज, यक्षदेव गोपीराज, लासूरकर अित्यादि मंडळीकडून सारी साधनसामुग्री जमवून प्रो. वि. भि. कोलते यांनी चार पोथ्यांच्या साहाय्याने ग्रंथाचें संपादन केलें आहे. त्याना योग्य वाटलेला पाठ मान्य करून अितर प्रतींतील पाठभेदांचा तळटीपामध्ये अुल्लेख केला आहे. शेवटीं अर्थनिर्णायक टीपा म्हणून दिल्या आहेत त्यांत काही विशेष पाठभेदाची योग्यायोग्यतेच्या दृष्टीने त्यांनी चर्चा केली आहे. प्राचीन भाषेच्या अभ्यासकाच्या दृष्टीने ह्याचाच विशेष अुपयोग होण्यासारखा आहे. पन्नासअेक पानाचा जोडलेला विस्तृत शब्दकोश आणि शेवटीं स्थळ, व्यक्ति, संगीतांतील पारिभाषिक शब्द यांसंबंधीची जोडलेली सूची ह्यांचाहि वरील दृष्टीनेच विशेष फायदा अभ्यासकाना होअील यांत बिलकुल शंका नाही.

चाळीसअेक पानांची विस्तृत प्रस्तावना प्रोफेसरमहाशयानी जोडली आहे. त्यांतला पूर्वभाग—पाठभेद, निश्चित ओवीसंख्या, कविचरित्रातील काही दंतकथांचा निश्चय, काव्याचा लेखनकाल, काव्याचे आधारभूत ग्रंथ अित्यादिविषयींची चर्चा केवळ अभ्यासकानाच अुपयोगी असली तरी नरेंद्राच्या काव्यगुणाविषयी संपादकांनी मार्मिक आणि रसिक बुद्धीने जें विवेचन केले आहे तें सामान्य रसिकाच्या दृष्टीनेहि वाचनीय आणि मार्गदर्शक ठरेल यात शंका नाही.

मराठवाड्यातील गद्यविहार ह्या पुस्तकाने मराठवाड्यांतील बहुतेक विद्यमान गद्य लेखकांचा त्रोटक परिचय त्याच्या लेखनाच्या द्वारा बृहन्महाराष्ट्राम होणार आहे. डॉ० वा. दा. गाडगीळासारखे संग्राहक बुद्धीचे वाङ्मयभक्त प्रतिकूल परिस्थितींतहि मोठमोठे ग्रंथ जरी नाही तरी अशा तऱ्हेचीं वाचनीय आणि संस्मरणीय पुस्तकें संपादित करीत आहेत हीच मोठी अभिनंदनाची गोष्ट होय.

म. सा. प. (१४-४-७)

यांत अेकंदर २३ लेख संकलित केले आहेत. मराठवाड्यांतील पांचसहा प्रसिद्ध लेखकांचा जरी यांत समावेश केला गेला नाही तरी अेकंदरींत हा संग्रह प्रातिनिधिक स्वरूपाचा आहे असें म्हणावयास कांही प्रत्यवाय दिसत नाही. लेखकांच्या वयांत, निवासस्थानांत, सामाजिक दर्जांत जशी विविधता आहे त्याचप्रमाणे वृत्तींत, विचारप्रदर्शनांत व वाङ्मयप्रकारांत सर्वतोपरी वैविध्य दिसून येतें. त्यामुळेच हा संग्रह वाचतांना वैचित्र्यदर्शनाचा आनंद अनुभविण्यास मिळतो.

प्रो० चिं. नी. जोशी यांचा नागेशांच्या सीतास्वयंवराचा परिचय करून देणारा लेख किंवा कृष्णाकुमाराचा ललितवाङ्मयातून आजवर झालेल्या मुसलमानी समाजाच्या चालीरीतींचें, राहण्यावागण्याचें, आशा-आकांक्षांचें चित्रीकरण याविषयी नवा दृष्टिकोन दाखवून देणारा टीकात्मक लेख, श्री.कानोले याचा मुकुंदराजाची अंबानगरी कोणती हा काहीसा संशोधनात्मक लेख किंवा अेम्. रघुनाथ आणि कोरेकल याचे वैचारिक दीप आणि सर्वात्म्याची ओळख हे विचारात्मक लेख विशेष अुल्लेखनीय वाटतात.

त्या मानाने ललितस्वरूपाचे म्हणून या संग्रहात समाविष्ट केलेले लेख तितकेसे नावीन्यपूर्ण वाटत नाहीत. अर्थात् मराठी वाङ्मयाची बुद्धिपुरःसर खर्ची केल्या जाणाऱ्या प्रदेशातील लेखकाच्या पुढे जितक्या प्रामुख्याने आदर्श ललितलेखक यावयाला पाहिजेत तितके येत नसावेत, त्यामुळे तंत्राच्या आणि मांडणीच्या दृष्टीने जें नावीन्य आजच्या लेखनात असावें अशी अपेक्षा महाराष्ट्रीय वाचकाची असते ती अभिनवतेची मागणी ह्या दूरस्थ बाधवांकडून पुरविली जात नाही म्हणून आश्चर्य मानण्याचें किंवा त्याना दोष देण्याचें विशेष कारण नाही. तरी प्रद्युम्न ह्या लेखकानी मराठीची कहाणी म्हणून ज्ञानेश्वराच्या वाङ्मयाची पुन्हा अेकवार ओळख करून दिली आहे. तिचा कहाणीवजा प्रारंभ अगदी अभिनव म्हटला नाही तरी आकर्षक आहे यांत शंका नाही. तीच गोष्ट सौ. अुपा पगडी, बी. रघुनाथराव, पाहेनेरकर, सोवनी, डॉ. माले सौ. सुशीलाबाअी फाठक अि० ललित लेखकांच्या लेखांची आहे.

अेकंदरींत ललित आणि गंभीर दोन्ही प्रकारच्या निवडक लेखानी सजविलेला हा गद्य-विहार अिकडील त्याच त्या लेखकाच्या पुस्तकांना कंटाळणाऱ्याना वाचनीय वाटेल यांत शंका नाही. शिवाय मराठवाड्यातील व्यक्तींच्या बौद्धिक सहवासातहि राहण्याचा आनंद पदरात पडणार आहे.

बडोद्याचे साहित्यिक आणि मराठीचे प्राध्यापक श्री. दांडेकर यानी सतत चार वर्षे परिश्रम करून आम्हांस मराठी नाट्यसृष्टींतील पौराणिक नाटकांचें दर्शन घडविले आहे. या ग्रंथाचे दोन भाग असून त्यांपैकी पहिल्या भागांत मराठी नाट्यसृष्टीचा संकलनात्मक अितिहास दिला असून अुत्तरार्धांत मराठींतील अुपलब्ध छापील नाटकाचीं त्रोटक परीक्षणें दिलीं आहेत. अशा-प्रकारें या ४०० पानाच्या ग्रंथाची सजावट आहे. ग्रंथाचे मुद्रण सुंदर आहे !

'प्रस्तुत ग्रंथांत लेखकाने पौराणिक नाटकाची सर्वांगीण चर्चा केली असून ती अत्यंत अुद्बोधक व मार्मिक आहे. ललितें, तमाशे, कळसूत्री बाहुल्या, दशावतारी खेळ अित्यादिकाची या ग्रंथांत आलेली माहिती साधार व सोपपत्तिक असून तिने पौराणिक नाटकावर नवीन प्रकाश टाकला आहे' असें प्रकाशकानी पुस्तकाच्या मलपृष्ठावर आश्वासन दिलें आहे, तर 'परि-चयां'त लेखक म्हणतात "प्रस्तुत ग्रंथांत जीं प्रमेये (?) मांडलीं आहेत तीं मांडीत असताना अस्सल साधनाचा (नाटके, ललिते, तमाशे, कळसूत्री बाहुल्या) याचा अुपयोग केला गेलेला वाचकांना स्पष्ट दिसेल." या दोन्ही आश्वासनाच्या कसोटीला प्रस्तुत ग्रंथ कितपत अुतरतो तें पाहूं.

या ग्रंथांत जी ललितांची माहिती आली आहे ती जरी साधार असली तरी तिच

आधार डळमळीत पायावर आहे. लेखकांनी 'पाठक बुकसेलरांनी छापलेल्या' ललितसंग्रहांतील अुतारे देअून तद्वारा विवेचन केलें आहे. हें चोपडें अगदी आधुनिक असून महाराष्ट्रांत रूढ असलेल्या ललितांचा प्रकार त्यांत पूर्णांशाने प्रतीत होत नाही. या पुस्तकांतील काही सोंगें वात्रट व हीन अभिरुचीचीं द्योतक आहेत (अुदाहरणार्थ 'ब्राह्मण पूजा करतो'). महाराष्ट्र-भाषेंत ललितप्रकार अेकनाथांच्या कालापासून रूढ आहे ह्याची दखल दाडेकरांस असल्याचें दिसत नाही. तसें असतें तर त्यानी श्री. दंडवते यांच्या सामान्य पुस्तकाचा आधार घेण्या-अैवजी अेकनाथी वाङ्मय व तदुत्तर ललिताच्या वह्या मिळविल्या असत्या. पाठकांचें चोपडें प्रसिद्ध होण्याच्या पूर्वी १०० वर्षें तरी निदान होत असलेल्या ललितप्रकारांचीं कथानकें आम्हीं पाहिलीं आहेत, त्यावरून आम्हाला असें वाटतें की या पुस्तकातील याविषयीचें विवेचन अधिकृत समजतां येणार नाही.

ललितापेक्षा तमाशाची माहिती देणे वा विवेचन करणें जरा सोपें आहे, कारण तमाशांतील जो मुख्य भाग लावण्या तो ग्रंथरूपाने प्रसिद्ध आहे. याचा फायदा घेअून या प्रकाराचें सामाजिक महत्त्वदर्शक विवेचन करावयास हवें होतें. परंतु लेखकांनी दोन तीन लावण्याच अुद्धृत करून आटोपतें घेतलें आहे. तोच प्रकार शाहिरी वाङ्मयाचा.श्री.अण्णा केळकरांचें पुस्तक या बाबतींत मार्गदर्शक झालें असतें. गोंधळ्याबद्दलची माहितीसुद्धा व्यवस्थित दिलेली नाही. भारत अितिहास संशोधक मंडळांतून प्रसिद्ध झालेल्या गोंधळाच्या पोथ्यांच्या अुपयोग करणें जरूर नव्हतें काय ?

आणि कळसूत्री बाहुल्याच्या बाबतींत लेखकांनी कमालच केली आहे! ते ६० पानावर म्हणतात, "अस्सल महाराष्ट्रीय व अत्यंत जुनी अशी ही (कळसूत्री बाहुल्या) अेकच संस्था असून जीव धरून राहिल्याचें पाहून सकौतुक अभिमान वाटतो." कळसूत्री बाहुल्या अस्सल महाराष्ट्रीय हा शोध दांडेकरांस कोठे लागला ? अकराव्या शतकांतील बालरामायण या नाटकात चार कळ-सूत्री बाहुल्या रंगभूमीवर आणीत व त्यांच्या द्वारें अभिनय करवीत असा स्पष्ट अुल्लेख आहे. ह्याचा लेखक अेक काश्मिरी पंडित होता. हें अुदाहरण अलीकडचें म्हणून सोडून दिलें तरी जावा, ब्रह्मदेश अित्यादि पौर्वात्य देश व अिजिप्त, ग्रीस अित्यादि पाश्चात्य देशात कळसूत्री बाहुल्याचे खेळ (Puppet plays) सर्रास होत असत हें स्पष्ट आहे. लेखकानी Dramatic Dances of Non-Europian Races सारखीं अधिकृत पुस्तकें पाहिलीं असतीं तर त्यास असलें बेजबाबदार विधान ठोकून देता आलें नसतें.

दशावतारी नाटकांचें विवेचन करण्याचें लेखकांनी कटाक्षाने टाळले आहे. रत्नागिरीस झालेल्या दशावतारी नाटकास लेखक हजर होते हा त्याचा या विषयावरील साधार व्यासंग. वस्तुतः रत्नागिरीस झालेलें नाटक दशावतारी नव्हतें. तें भाव्यांच्या नंतरचें त्यांनी प्रसृत केलेल्या नाटकाचें भ्रष्ट अनुकरण होय. आज ४५० वर्षांपासून अगदी आजतागायत चालू असलेला दशावतारी नाट्यप्रकार हा भाव्याच्या नाटकाचा आजोबा होय. या नाटकाचीं हस्त-लिखितें जीं आम्हीं पाहिलीं आहेत त्यांवरून आमचें असें मत झालें आहे की लक्ष्मी नारायण कल्याण नाटकापूर्वीहि २००-२५० वर्षांपासून हीं नाटकें होत. शिवाय हीं नाटकें करणाऱ्या नाटक मंडळींस सुटलेलीं वर्षासनें २५० वर्षांपूर्वीपासून सुटलीं आहेत ! भाव्यानी आपल्या कवितेच्या प्रस्तावनेंत ज्या हरदासांचा अुल्लेख केला आहे ते हरदास म्हणजे हीं नाटकें करणारे कोकणांतील पुनाळेकर हरदास असावे असें दिसतें. मराठी पौराणिक नाटकाचें मूळ जर कोठे आहे हें सांगावयाचें असेल तर या दशावतारी नाटकांचाच अभ्यास करावयास पाहिजे.

याप्रमाणे दांडेकरांच्या 'साधार विवेचना'चा फोलपणा दाखवला. त्यांच्यावर ही आपत्ति येण्याचें कारण त्यांनी परिचयांत आश्वासन दिल्याप्रमाणे अस्सल साधनें मिळविण्याची कोशीस केली नाही. ग्रंथसंग्रहालयांतील नाटकें व दंडवते याची पुस्तकें अैतिहासिक संशोधनास पुरेशीं नाहीत. त्यामुळे भाव्यांच्या पूर्वीच्या नाट्यसृष्टीचें दर्शन दांडेकरासच झालेलें नाही तर ते तें आम्हांस कसें घडविणार ?

बरें, भाव्यांच्यानंतरच्या नाटकांचा अितिहास लिहितांनाहि दांडेकर 'रंगभूमि मासिक' भाव्यांच्या कवितेची प्रस्तावना व किर्लोस्करचरित्र याजशिवाय पुढे गेले नाहीत, नाही तर 'पेशवाअीच्या सावलींत' या पुस्तकांत नानासाहेब चापेकरांनी दहा पानें माहिती नाटकांसंबधाने दिली आहे तिचा अुपयोग दांडेकरानी केला असता, त्याचप्रमाणे मराठी नाटकांचें मूळ कशांत आहे याची माहिती ज्ञानेश्वरींतील त्रोटक अुपमावगुंठित माहितींपेक्षा अेकनाथी वाङ्मय, जुन्या दशावतारी नाटकांच्या पोथ्या, ललितांचीं हस्तलिखितें अित्यादि 'अस्सल' साधनांतच त्यांना सांपडली असती.

या वेळच्या नाट्यप्रकारांचा अितिहास देतांना अगर नाट्यसृष्टीचें दर्शन घडवितांना त्यांचा समाजाशीं संबंध, तत्कालीन चालीरीतींचें प्रतिबिंब त्यांतील तत्त्वप्रतिपादन अित्यादींचे ओझरतें विवेचन न करणें हें अशा ग्रंथास भूषणावह नाही. दशावतारी नाटकांतील गणपति व त्याचा गणराजपद्धतीशीं संबंध, शंखासुराच्या भाषणांतील व्यवहारज्ञान, लावणीवाङ्मयाची अुपपत्ति व युद्धोत्तर संकटाशीं तिचा संबंध अित्यादि समाजशास्त्रीय मुद्यांचा विचार होणें जरूर होतें. अेवढें हें निव्वळ दोषदर्शन करण्याचें कारण या पुस्तकाच्या लेखकाचें वाङ्मयांतील स्थान आणि त्यांचा हें पुस्तक संदर्भग्रंथ म्हणून समजण्याचा आग्रह, सयाजीमालेतर्फे प्रसिद्धि आणि युनिव्हर्सिटीची आर्थिक मदत यांमुळे ज्या अपेक्षा वाटतात त्या फलद्रूप झालेल्या नाहीत. यांतील अपुऱ्या माहितीवर व अुथळ संशोधनावर आधारलेल्या 'प्रमेयां'वर अधिकृत म्हणून तें शिक्का बसण्याचा संभव आहे म्हणूनच हें अप्रिय लेखन करावे लागलें.

किर्लोस्कराच्यानंतरच्या नाटकाबद्दची माहिती नवीन नसली तरी सुंदर भाषेंत व व्यवस्थित दिली आहे. शेवटचीं परीक्षणे निव्वळ जंत्री देण्यापेक्षा बरीं आहेत. या पुस्तकानंतर जीं पुस्तकें लेखक लिहिणार आहेत त्याच्या बाबतींत त्यांनी जास्त काळजी घ्यावी. विशेषतः 'रंगभूमि' हा विभाग लिहितांना जुन्या रंगभूमीचें विवेचन करावें लागेल. त्या वेळीं आत्मचरित्रांतील अुतारे देण्याहून काही 'अस्सल साधनें' आहेत याची दखल घ्यावी.

## शिक्षणशास्त्र

**अितिहास कसा शिकवावा ?**— ले० श्री. शं. दा. चितळे; प्रका० श्री. वि. गं. केतकर, अ. वि. गृह, ६२४ सदाशिव, पुणें २; मूल्य १। रु.

अितिहासाचें योग्य अध्ययन म्हणजे काय हें नीट ठरल्याशिवाय त्याच्या अध्यापनपद्धतीविषयी निश्चित आंखणी करता येणें शक्य नाही. स्वतंत्र राष्ट्राची राष्ट्राच्या अितिहासाकडे पाहण्याची दृष्टि आणि परतंत्र राष्ट्राला राष्ट्राच्या अितिहासाकडे पाहावयास लावण्याची दृष्टि यात केव्हाहि तफावत पडणार. असें असलें तरी कार्यकारणपरंपरा समजून घेणें, घडामोडींचें पृथःकरण करतां येणें, अैतिहासिक कालाच्या विशालत्वाची कल्पना येणें, संस्कृति व पूर्वज यांच्याविषयी योग्य त्या समजुती होणें, वर्तमानकाळच्या घडणींची छाननी करणें आणि

आशा-आकांक्षांची रूपरेषा ठरविण्यास स्फूर्ति मिळणें अित्यादि बाबी अितिहासाच्या अध्ययनाने साध्य व्हाव्या याविषयी सहसा मतभेद असणार नाही. आपल्याकडे श्री. वि. द. घाटे, अिन्स्पेक्टर ऑफ स्कूल्स, प्रो. वि. पां. बोकील यांच्यासारख्या अनुभवी अितिहासज्ञ व शिक्षणपद्धतिज्ञ अशा विद्वद्वरांनी योग्य पद्धतीचें ज्ञान देणारीं अुत्कृष्ट पुस्तकें प्रसिद्ध केलींच आहेत. परंतु तीं आंग्लभाषेंत असल्याने बहुसंख्याक अध्यापकांना त्याचा अुपयोग प्रत्यक्ष करून घेतां येत नाही. ही अुणीव श्री. शं. दा. चितळे यांनी 'अितिहास कसा शिकवावा' हा ग्रंथ मराठींत लिहून भरून काढली आहे. मराठींत अितिहासाच्या अध्यापनावर हा पहिलाच ग्रंथ होय. या ग्रंथाने शैक्षणिक वाङ्मयात अुत्कृष्ट व नावीन्यपूर्ण भर पडली आहे. श्री. चितळे यांच्या या स्तुत्य, अभिनव व आवश्यक कृतीबद्दल शिक्षणप्रेमी जनता त्यांचें स्वागतच करील. प्रस्तुत ग्रंथांत अितिहासाध्ययनाच्या तथाकथित अुद्देशांसंबंधी साधकबाधक पण समर्पक विवेचन करून त्यापासून अिष्ट तोच निष्कर्ष काढला आहे. आरंभींच्या ह्या प्रकरणावर लेखकांनी अधिक भर दिला आहे व तो अगदी रास्त आहे. मात्र नागरिकत्वाच्या मूलभूत कल्पनांचे ठसे विद्यार्थ्यांच्या मनावर ठसले पाहिजेत. या बाबतींत 'Through History he will be introduced to civics and become acquainted with the social forces around him' हीं Mr. Adams यांचीं वाक्यें समर्पक वाटतात.

अितिहासाध्ययनाच्या प्रचलित सर्व पद्धतींचा अूहापोह सुमारें ७।८ प्रकरणांत केला असून प्रत्येक पद्धतींतील या विषयापुरत्या योजना नीटनेटक्या माडल्या आहेत. श्री. चितळे हे नामवंत व जातिवंत शिक्षक असल्याचा निर्वाळा प्रस्तावनालेखक प्रो. बोकील यांनीच दिला आहे, तेव्हा हीं प्रकरणें तन्मयतेने लिहिलीं गेलीं असल्यास नवल नाही. त्यांतहि शिक्षणाचें शास्त्र व व्यवहार यांचा गोड संगम पाहून वाचकास समाधान लाभतें. मात्र कथनपद्धति व व्याख्यानपद्धति ह्याचे अेकीकरण न करतां त्यांचें भिन्नत्व दाखवून, त्यांचा अुपयोग कोठे कोठे करतां येतो हें दाखविणें अगत्याचें होतें.

पद्धतीच्या ज्ञानाबरोबरच पद्धति ज्या ज्या साधनांच्या जोरावर वापरावयाची त्या सर्वांचा मुद्देसूद अूहापोह पुढील ५।६ प्रकरणांतून केला आहे.

नाट्यीकरण हा अितिसाच्या अभ्यासाचा आत्मा म्हणावा लागेल. परिस्थितीचें यथातथ्य चित्रण नाट्यीकरणाशिवाय होणार नाही आणि अितिहासांत तर परिस्थितीच्या यथातथ्यतेची अधिक जरूरी. अशा या महत्त्वाच्या प्रकरणाचें विवेचन मार्गदर्शक झालें आहे. विविध साधनें, अितिहासमंदिर, वर्गाबाहेर अितिहास, अनुबंध अभ्यासक्रमाची आंखणी, फळ्याचा अुपयोग व सारांश हीं प्रकरणें शास्त्रशुद्ध व आटोपशीर लिहिलीं गेलीं आहेत.

वाचनाने, समजुतीने विषय शिकण्यापेक्षा चित्रांच्या साहाय्याने विपय सुलभतेने शिकतां येतो. अितिहासांत चित्रें म्हणजे राजे, महाराजे, गव्हर्नर वगैरेंचीं असा सामान्य प्रघात, पण वर्ण्य विषयाचें चित्रीकरण करून विपय कसा सुलभ व आकर्षक करतां येतो याचे नमुने चितळे यानी आपल्या ग्रंथात दिले आहेत. ही अेक प्रकारचीं कोडींच म्हणाना ! स्वयंशिक्षणतत्त्वाचें शंभर टक्के पालन व आकर्षकता याचा सुदर मिलाफ या चित्रीकरणयोजनेंत साधला आहे. पुस्तकांतील अुत्कृष्ट वाक्यें अुद्धृत केलीं जातात. त्याच तत्त्वावर जरा पुढे जाअून पुस्तकांतील चित्रें कां अुद्धृत करतां येअूं नयेत ? म्हणून मुद्दाम पुढील पानावर नमुन्यादाखल दोन चित्रें

(१)



(२)




लेखकाच्या परवानगीने दिलीं आहेत. हीं चित्रें व पृष्ठ ६५ वरील हिंदुस्तान व परदेश यांतील समकालीन घडामोडींचा कालपट, तसेंच परिशिष्टांत दिलेल्या कालपटासह पेशवाअीचा वंशवृक्ष या योजना अभिनव वाटतात. हें पाहिलें म्हणजे प्रस्तुत विषय लेखकाच्या अंगीं किती बाणला आहे व विषयप्रतिपादनाची कल्पकता किती तीव्र आहे याची जाणीव झाल्याशिवाय राहत नाही.

परीक्षा प्रकरणांत परीक्षा कशी घ्यावी याचा अूहापोह करून प्रश्नांचे कांही आधुनिक नमुने दिले आहेत. त्यांचा सर्रास अुपयोग तातडीने होणें जरूर आहे. पण अितिहासाचें अध्ययन व परीक्षासमन्वय दाखविला असता तर अभ्यासकाची अधिक सोय झाली असती. अध्यापन व परीक्षा हे शिक्षण या अेका वस्त्राचे अुभेआडवे भाग आहेत. त्यांची वीण ज्या कुशलतेने बनेल त्यावर शिक्षणरूपी वस्त्राची मजबुति वा सौंदर्य अवलंबून असणार. याचा परामर्श घ्यावयास हवा होता.

पाठ शिकविण्यापूर्वी पाठाची तयारी करतांना पाठाच्या सर्वांगांचा विचार ज्यांत केला जातो तें तंत्र म्हणजे पाठाचें टांचण. टाचणें तयार करणें खरोखरच कौशल्याचें काम आहे. त्यांत नुसतीं तत्त्वें सांगून जमणारें नाही. म्हणून श्री. चितळे यांनी आपल्या ग्रंथात शेवटीं टांचणांचे अुत्कृष्ट नमुने दिले आहेत. ते निःसंशय मार्गदर्शक होतील.

## नाटक

**चार चांदण्या**— [चार अेकांकी संगीत नाटिका.] ले०— सदाशिव अनंत शुक्ल; प्रका० व मुद्रक— श्री. मंगेश नारायण कुळकर्णी, कर्नाटक पब्लिशिंग हाअुस, चिरा बाझार, मुंबअी नं. २; मूल्य १। रुपाया.]

अलीकडे थोड्या दिवसात चारपांच तरी नाटिकांचे संग्रह प्रसिद्ध झालेले दिसतात.

लघुकथांचें युग संपत येअूं पाहत असून, मराठी वाङ्मयांत आता नाटिकांचें नवयुग सुरू व्हावयाचें आहे, याचें निदर्शक प्रतीक म्हणून या "चार चांदण्या" आणि त्यांच्या सख्या-सहचरी यांचें प्रकटन व प्रकाशन मानावयाचें कीं काय असा प्रश्न साहित्यसमीक्षकांच्या मनांत क्षणभर सहज अुद्भवल्याशिवाय राहणार नाही.

श्री. शुक्ल हे आज कितीतरी वर्षे लोकप्रिय नाटककार म्हणून ख्यातनाम आहेत. त्यांच्या लेखणींतून अुतरलेल्या या नाटिकांतून त्यांच्या नाट्यवाङ्मयाचे सर्व बरेवाअीट गुण कमीजास्त प्रमाणांत आढळून येतात. सर्व नाटिकाचे विषय आधुनिक आणि सामाजिक आहेत. मनोरंजनाबरोबर बोध देण्याची लेखकाची तळमळ सर्व नाटिकांतून दिसून येते. परंतु त्यांतल्या त्यांत "समाज सेविका" आणि "शिकलेले शहाणे" यांत मनोरंजनाबरोबर बोध देण्याअैवजी बोधासाठी मनोरंजक माध्यमाचा लेखकाने अट्टाहासाने अुपयोग केला आहे कीं काय असा भास होतो. तरी पण श्री. शुक्ल यांचे संवाद खटकेबाज आणि पदललित असल्यामुळे अेरव्ही नाटकांत नीरस आणि कंटाळवाण्या वाटाव्यात अशा व्यावहारिक तात्त्विक चर्चा, त्यांच्या या नाटिकातून बऱ्याचशा धकून जातात असे दिसतें. या दोन्ही नाटिकांतील मुख्य दोष म्हणजे त्यांच्या कथानकांतील वस्तु अखंडप्रवाहित नसल्यामुळे वाचकाला पुढे काय होणार आहे याची अटकळ आरंभींच होते व तिला कोठेच मुरड न पडल्यामुळे त्याचें कुतूहल वृद्धिंगत न होतां कमी कमी होत जातें व त्याला या नाटिकांचें वाचन अगदी अळणी बेचव वाटतें हा होय. याच्या अुलट, "डोळ्यांत धूळ" व "रात्रीचा पाहुणा" या दोन नाटिकांचीं कथानकेंहि "समाजसेविका" किंवा "शिकलेले शहाणे" यांच्या कथानकांअितकींच सरळ व साधीं आहेत पण त्यांच्या कथानकाचा विकास लहान लहान पलटे व वळणें घेत झालेला असल्यामुळे वाचकाला त्यांच्या परिपोषामध्ये अेक प्रकारची गति आढळते. त्यामुळे अखेरपर्यंत वाचनातील त्यांची अुत्कंठा कायम राहते; त्यांचें वाचन त्याला रुचकर, खमंग वाटतें.

परिणामकारकतेसाठी व विनोदासाठी अतिरंजन करण्याची लेखकाला मुभा असते खरी, पण तिलाहि कांही मर्यादा असणें आवश्यक आहे. "माटुंग्याचा बंगला विकला — वाळकेश्वराच्या बंगल्याची डागडुजी चालल्येय्. सगळं फर्निचर तिकडेच पडलंय्. तीन चाळी आहेत आमच्या" अशी थाप, "किती भिकार जागा आहे ही! हवेचा बुंद नाही अगदी. कसे राहतां अिथं कुणास ठाअुक!" या वस्तुस्थितीच्या वर्णनात्मक प्रश्नानंतर मारणारी आणि ती अैकून घेणारी, अशा दोघीहि मुली अलौकिकच म्हटल्या पाहिजेत. (पृष्ठ २०). तसेंच, बी.अे. ची परीक्षा नापास होअून नौकरी मिळत नाही म्हणून जीव देण्यास तयार होणारा तरुण नौकरी मिळतांच "मजुरापासून मॅनेजरपर्यंत सारीं कामं" करून अवघ्या सहा महिन्यांत "विलायतला धंद्याचं अुच्च शिक्षण घेण्यासाठीं पाठविण्या" अितका तयार होतो, ही प्रक्रिया सुद्धा सुरवंटाचें फुलपाखरूं होण्याच्या प्रक्रियेपेक्षाहि जास्त चमत्कारपूर्ण व आश्चर्यकारक वाटणारी आहे यांत संशय नाही.

पण अशा प्रकारचा भाबडा स्वप्नाळूपणा हा या नाटिकांच्या तात्त्विक भूमिकेचा पायाच आहे. शास्त्रीय तत्त्वान्वेषणाच्या दृष्टीने हा पाया किती भुसभुशीत आहे याची श्री. शुक्ल यांच्या लिखाणाबाबत तरी चर्चा करण्याचें कारण नाही. कारण आपण मोठे तत्त्वज्ञ लेखक आहोंत, जगाला कांही तरी नवीन आणि प्रचंड असा संदेश आपण आपल्या लेखनद्वारा देण्यास अुद्युक्त झालों आहोंत असा आव ते कधीच आणीत नाहीत. सोज्वळ आणि मनोरंजक लिखाण ते करतात आणि त्यांच्या वाचकांचीहि त्यांच्याकडून तेवढीच अपेक्षा

असते. आपल्या चार चांदण्या या नाटिकांच्या द्वारा स्वतःची लेखनाची भूमिका आणि आपल्या वाचकाची आपल्याबद्दलची अपेक्षा या दोहोंचीहि जबाबदारी श्री. शुक्ल यांनी यशस्वी रीतीने पार पाडली आहे.

नाटिकातून प्रसंगानुसार श्री. शुक्ल यानी आपली ध्वनिमुद्रिकाच्या द्वारा लोकप्रिय झालेलीं भावगीतें घातलेलीं असल्यामुळे प्रयोगदृष्ट्या या नाटिकाना अधिकच शोभा आलेली आहे. सुश्लिष्ट, पदललित गीताचे रचनाकार या नात्याने मराठी गीतलेखकांतील श्री. शुक्ल यांचें स्थान फारच वरच्या दर्जाचे आहे हें सांगण्याची जरूरच नाही, पण त्या पदवीला पूर्णपणें साजेल अशीच या नाटिकांतील भावगीतांची रचना झाली आहे हें सांगण्यासाठी त्या निर्विवाद्य सामान्य विधानाचाहि पुनरुच्चार करणें येथें जरूर पडलें. संमेलनें व समारंभ प्रसंगीं होणाऱ्या छोट्या नाट्यप्रयोगांना अुपयुक्त अशा या आपल्या सुंदर नाटिकाचें पुस्तकरूपाने संकलन करून श्री. शुक्ल यानी हौशी नटवर्गाला अुपकृत केलें आहे यांत शंका नाही.

## कादंबरी

१ **नवें जग**—लें० श्री. पु. य. देशपांडे; प्रका० श्री. रा. ज. देशमूख, देशमुख आणि कं., २६४ नारायण, पुणें २; मूल्य २ रु.

२ **जग कुठें आहे?**—लें० श्री. ना. वि. कुलकर्णी; प्रका० श्री. वि. रा. खाडिलकर, महाराष्ट्र कुटुंबमाला, ३९२ नारायण, पुणें २; मूल्य १॥ रु.

३ **दडलेलीं पत्रें**—लें० श्री. श्रीनिवास कोचकर; प्रका० मानस प्रकाशन मंडळ, लष्कर (ग्वाल्हेर); मूल्य १ रु.

४ **आहुति**—लें० श्री. वि. म. कुलकर्णी; प्रका० श्री. त्रिं. मा. सातारकर, अुदय साहित्य प्रकाशन, ९६ गंज, पुणें २; मूल्य १। रु.

सुप्रसिद्ध समाजसत्तावादी लेखक श्री. पु. य. देशपांडे यांनी 'नवें जग' या कादंबरींत अेका आधुनिक तरुणीच्या जीवनातील वैचारिक द्वंद्व रंगवितांना चालू जगांतील नव्या समाज-व्यवस्थेविषयीच्या विचारप्रवाहावर काही प्रकाश पाडला आहे. चालू युद्धाच्या निमित्ताने हिंदुस्थानांतील राजकीय वातावरणात जे निरनिराळे विचारप्रवाह सुरू झाले त्याच्याशीं कथानकाचा संबंध जोडून लेखकाने कादंबरीस ताजेपणा आणला आहे. राष्ट्रीय सभा, हिंदुमहासभा व रॉयिस्ट या पंथातील सूत्रचालकाविषयी भोवतालच्या तरुण पिढींत असमाधान आहे, तरुणाचीं मनें आकर्पून घेण्यासारखा कार्यक्रम वरील तीन पंथापैकी कोणालाहि आंखतां येत नाही यामुळे तरुणाची निराशा झाली आहे, पुढाऱ्याच्या मार्गदर्शनातील जिव्हाळा नाहीसा झाल्यामुळे कार्याची तळमळ असलेले तरुण आपल्याला सुचेल त्या मार्गाचा अवलंब करीत आहेत, देशांतील तरुण पिढीस हिंदु राष्ट्राची भव्य कल्पना व हिंदु संस्कृतीचा जाज्वल्य अभिमान अुत्स्फूर्त करीत आहे असें लेखकाने सुचवून (पृ. १४१) आणि 'विराटभारतवाद' या नव्या (!) तत्त्वप्रणालीची घोषणा केली आहे. या विराट भारतवादाला चालू महायुद्ध ही बलसंवर्धनाची सुवर्णसंधि वाटत आहे. या निमित्ताने आपण शस्त्रसंपन्न झालें पाहिजे असा अखिल तरुण पिढीस या विराटभारतवादाचा संदेश आहे. पण विराटभारतवादाचा हा अदाज ही योजना फोल आहे असें कादंबरीच्या शेवटीं दाखवून समाजसत्तावादाचा विजय सूचित केला आहे.

हे विचार ज्यांच्या जीवनांत लेखकाने घातले आहेत त्यांना ते पेलतात असें वाटत

नाही. कादंबरीची नायिका 'तरु' हिच्याकडून लेखकाने सगळें कथानक वदविलें आहे. ती तरुलता, तिचा आतेमाऊ विना आणि विनाचा 'जुळा आत्मा' (?) 'अरविंद' या तिघांवर सगळें कथानक उभारलें आहे. विना आणि तरुलता यांना लहानपणापासून अेकमेकांबद्दल ओढ वाटत होती. भरपूर सहवासहि दोघांत झाला. परंतु विनाने तरुलतेस बंदुक उडवावयास शिकवितांना तिच्या कांही चुकांबद्दल तिचा उपहास केला. निशाणबाजी हें पोरींसोरींचें काम नाही असें तो म्हणाला. त्याबरोबर तरूच्या मनाने प्रतिक्रिया सुरू केली. आणि तेथे विरोध-विकासवाद सुरू झाला. विनाला विरोध, अविरत विरोध, करण्याचें व्रत तरूने घेतलें. परंतु त्याच्या प्रभावी व्यक्तित्वापुढे पुष्कळ वेळा तिचें मन घायाळ होअी. यासाठी अेकाच कॉलेजांत असूनहि तरु विनास टाळूं लागली. अेका जाहीर सभेंत तिने विनाच्या भाषणावर सडकून टीका केली. परंतु तिचें मन विनाकडे सारखें ओढ घेत असल्याने तिचा विनास विरोध करण्याविषयी धीर सुटूं पाहत होता. आपणांस केविलवाणें आत्मसमर्पण करावें लागेल कीं काय अशी तिला भीति वाटूं लागली.

अशा वेळीं तिला अरविंद भेटला आणि 'रितेपणाची भयानक जाणीव' 'हताश हृदयाचा केविलवाणा विभ्रम' दूर करण्यासाठी तरूने अरविंदाचा स्वीकार केला आणि कांही काळ ती वास्तवताविस्मृतींत रंगून गेली. विना कॉलेज सोडून हटवादीपंथाने नवें जग उत्पन्न करण्यासाठी कार्य करीत होता. तरू 'युद्धांत शिरा' असा संदेश तरुणांना देअूं लागली; अरविंद युद्धावर जाण्यास निघाला. आपण विरोधांत विनाचा पराभव केला असें तरुलतेस वाटूं लागलें. तिने अरविंदाशीं लग्न लावून टाकलें– हिंदु सनातनपद्धतीने विवाह केला आणि अेक रात्रहि अेकान्त न मिळतां अरविंद युद्धावर गेला ... अरविंद युद्धांतून जखमी होअून परत आला. दरम्यान तरूच्या मनाची विनाकारण ओढ अनावर झाली आणि अरविंद परत आला तो पौरुष गमावून हें 'प्रत्यक्ष' कळल्यावर ती त्याला लाथाडून विनाकडे गेली. अरविंदाची पौरुषहानि हा तिला आपल्या मतांचा पराभव आणि विनाचा विजय वाटला. विनाने तिचा कधीच तिटकारा केला नव्हता; उलट तो तिची वाट पाहत होता. ज्या युद्धाने अरविंदास खची केलें त्या युद्धावर संतापत आणि अरविंदाची कींव करीत विनाने तरुलतेस हृदयाशीं घट्ट धरून ठेविलें !! अरविंदाचा नाश तरुलतेसारख्या उच्छृंखल पोरीने केला हें वाचकास पटलें तरी कादंबरीचा नायक (?) विना सांगणार 'अमानुष समाजरचनेच्या उदरांतून अदयास आलेल्या थोतांडांनी' (पृ. १८७) त्याचा नाश केला ! युद्धातील जखमानी पौरुषत्व नाहीसे झाल्यावर त्याचा तिरस्कार करणारी स्त्री– तरुलता– कोणत्या नव्या जगास जन्म देणार आहे कोणास ठाअूक ?– ती अरविंदाला घेअून विनाकडे जावयाचा बेत करीत होती– तोंच विना अेकाअेकीं नाहीसा झाला आणि विनाच्या नव्या जगाकडे दृष्टि लावीत जगणें हेंच तिचें जीवन व नवें जग ठरलें.

या कथानकांत आरंभीं सांगितलेल्या विचारप्रवाहास, विराटभारतवादास किंवा विनाच्या समाजसत्तावादास कोठे स्थान आहे असें वाटत नाही. अरविंद जखमी झाल्याने व पौरुषहीन झाल्याने विराटभारतवादाचें, शस्त्रसिद्धीसाठी युद्धाची संधि साधण्याचें धोरण फोल कसें ठरतें आणि त्यामुळेच विनाच्या दहशतवादाचा विजय कसा ठरतो हें अेक कोडें आहे.

महाराष्ट्र कुटुंबमालेचे संचालक श्री. ना. वि. कुलकर्णी यांची प्रश्नचिन्हांकित कादंबरी 'ग्रहणापूर्वी सुटका' या कादंबरीचा 'जग कुठें आहे?' हा तिसरा भाग आहे. पूर्वीच्या दोन भागांतील कथासूत्राने ही कादंबरी कांहीशी पहिल्या दोन भागांशीं संबद्ध असली तरी तिच्यांत स्वयंपूर्णत्वहि आहे. कारण या कादंबरींतील कथानक महाराष्ट्र कुटुंबमालेंत रंगविलेल्या मध्यम-

वर्गातील अेक जीवनकथा आहे. आधुनिक कालात जगणाऱ्या समाजाचें जीवन हीच अेक मोठी समस्या आहे. त्या दृष्टीने आधुनिक कथावाङ्मयांत त्या समस्येचा धागा सर्वत्र आहेच. त्या जीवनांत अनेक नव्या प्रश्नांची गर्दी अुडाली आहे आणि या कादंबरीच्या लेखकांसारखे विचारी लेखक अत्यंत अेकाग्रपणें ती गल्लत पाहत असतां, त्यांच्या मनांत अकच प्रश्न अुभा राहतो की, जग कुठे आहे? जग प्रगतीकडे चाललें आहे कीं अवनतीकडे घसरत आहे? क्रांति चालली आहे कीं अुत्क्रांति चालली आहे? कीं नुसतें काही माथेफिरूंनी बंड माजविलेलें आहे? कांही याला नवें जग म्हणतात, कांही नवे संसार म्हणतात. श्री. कुलकर्णी यांना त्यांतील नावीन्य कळलें आहे, परंतु त्या नावीन्याचा अर्थ काय, त्या नावीन्याचा प्रभाव काय याबद्दल ते साशंक आहेत. सार्वजनिक कार्यक्षेत्रांत कार्य करणारे लोक, अुपदेशकाच्या भूमिकेवरून अुपदेश करणारे लोक स्वतः खाजगी जीवनांत अत्यंत बेछूटपणें वागतात. त्यांच्या-भोवतीं जमलेली तरुण पिढी लौकिक जीवन व वैयक्तिक जीवन यांतील विसंगति हीं समर्थनीय समजतात आणि आपल्या पुढाऱ्यांच्याकडे पाहून नैतिक जीवनाविषयी बेफिकीरपणें वागतात. तरुण-तरुणींच्या दीर्घ सहवासांत अेकमेकांविषयी अुत्पन्न झालेलें आत्यंतिक प्रेमहि अेकदम पलट खातें आणि आपल्या प्रेयसीची फसवणूक करणाऱ्या प्रियकराना विवाहबाह्य आकर्षणाच्या पायीं प्रेमासह प्रेयसींना लाथाडतांना काहीहि वाटत नाही, स्त्रीविषयक आकर्षणाचा अंमल अितका जारी आहे की अत्यंत अेकनिष्ठ तत्त्वचारी गृहस्थहि अुतारवयांतसुद्धा त्या आकर्षणाच्या आहारीं जातो— अित्यादि प्रसंगांचें मनोवेधक चित्रण करून अशा प्रसंगांनी व्यापलेल्या जीवनाकडे पाहून वाचकासहि प्रश्न पडतो की, जग कुठें आहे? लेखक नुसता प्रश्न अुभा करून थांबले नाहीत तर त्या प्रश्नाचें त्यांनी अुत्तरहि सुचविलें आहे. वरील व्यक्तींच्या हातीं जर जगाचीं सूत्रें सांपडलीं तर जगांत अनवस्था प्रसंग ओढवेल. अुपयुक्ततावाद, पार्थिव सुखावर अुभारलेला अुपयुक्ततावाद जीवनासह जगाला निरुपयोगी केल्याखेरीज राहणार नाही हें श्री. कुळकर्णी यांनी या कादंबरींत सुचविलें आहे. 'नवें जग?' वाचल्यावर 'जग कुठे आहे?' हा श्री. कुळकर्ण्यांचा प्रश्न वाचकांचें मन व्यापून टाकल्याखेरीज राहणार नाही.

श्री. श्रीनिवास कोचरकर यांनी आजच्या समाजातील स्त्रीपुरुषसंबंधाच्या बाबतींतील कांही गोष्टी अुजेडात आणणारीं हीं पत्रें लिहिलीं आहेत. जे निरनिराळ्या कारणानी दडले जातात, बोलले जात नाहीत असे कांही विचार या पत्रसंग्रहांत आपणांस वाचावयास मिळतील अशी अपेक्षा वाचकाच्या ठिकाणीं अुत्पन्न होते. आणि तें कांहीसें खरें आहे. कारण आपली पत्नी आपल्या मित्राची प्रेयसी आहे हें कळल्याबरोबर त्या मित्रास पत्नीशीं वाटेल त्या स्वरूपाचें प्रेम(?)संबंध ठेवण्यास परवानापत्र पाठवितो. स्वतःला अेखाद्या पुरुषाची बहीण समजणारी स्त्री आपल्या मानलेल्या भावाला "भाअी, तुला घेववतील तेवढीं तूं माझीं चुंबनें घे आणि माझे गाल कुस्कर!!!" (पृ. ८२) असें पत्राने कळवते आणि तें मनाच्या पावित्र्याला अनुसरून! असे मित्र आणि अशा बहिणी नि त्यांचे भाअी यांच्या या भावना समाजांत दडलेल्या होत्या त्या येथें पत्ररूपाने कळतात! स्वैराचारासाठी धडपडणारीं, चरफडणारीं हीं पात्रें पुन्हा आपली संस्कृति, आपला प्रिय देश, आत्माहुती यांच्याहि गप्पा मारतात. बहिणीचीं शेकडो चुंबनें घेणारा हा अनिलभाअी मित्राने स्वतःच्या पत्नीविषयीहि परवानगी दिल्यावर मात्र अेकदम समाजाच्या घडीबद्दल कां कळवळा दाखवतो तें कळत नाही! थोडक्यांत म्हणजे नावीन्याच्या मोहाने कोठलें तरी कांही तरी अुकरून काढण्याचा लेखकाने

प्रयत्न करूं नये असें सांगावेंसें वाटतें. अुलट अशा गोष्टी दडपून नेस्तनाबूत करणें हेंच समाजकार्य होय! आणि या ग्रंथासहि ग्वालेर दरबारने २०० रु. पारितोषिक दिलें आहे! (असें लेखकाने कळविलें आहे!)

श्री. वि. म. कुलकर्णी यांनी 'आहुति' या कादंबरींत अेका नालायक धनाढ्य पतीच्या पायीं त्याच्या सच्छील आणि लोकसेवेची तळमळ असलेल्या पत्नीच्या जीवनाची कशी 'आहुति' पडली हें दाखविलें आहे. समाजांत कंटकवृत्तीचे लोक समाजसेवकाच्या भोवतीं अनेक रूपांनी कसे वावरत असतात हें या कथेंत चांगलें दिसून येतें. लोकसेवा करणाऱ्या व्यक्तीच्या मार्गांत वैयक्तिक जीवनांतच अपरिहार्य संकटें अुत्पन्न होतात आणि तीं संकटें लौकिक संकटांपेक्षाहि फार दुस्तर असतात हें ताअीच्या जीवनावरून दिसून येतें. ग्रामीण जीवनांतील कंटकमय भाग दाखवून त्या क्षेत्रांतील अुत्साही कार्यकर्त्यांना अेक प्रकारें अुपकारक असें ज्ञान लेखकाने पुरविलें आहे आणि त्या कंटकांतून मार्ग काढण्यासाठी कोणत्या प्रकारचें व्यक्तित्व लागतें हें ताअीच्या स्वभावचित्राने चांगलें स्पष्ट केलें आहे. आज ज्या समाजदोषांविरुद्ध मोहीम करण्याच्या योजना शहरांत चालू आहेत ते दोष ग्रामीण जीवनांत आहेत. त्या जीवनाशीं अपरिचित राहून समाजाची पुनर्रचना करण्याचे प्रयत्न यशस्वी होणार नाहीत हें लेखकास दाखवावयाचें आहे. हें दाखवितांना कळकळीच्या नि तळमळीच्या पोटीं कां होअीना परंतु अतिरंजनाचा दोष कांही ठिकाणीं अुत्पन्न झाला आहे. परंतु ग्रामीण जीवनाच्या सूक्ष्म अवलोकनाच्या गुणापुढे तो दोष फारसा शिल्लक राहत नाही. अेका कार्यकर्तीच्या जीवनांतील हे अनुभव पुरुष कार्यकर्त्यांनाहि वाचनीय वाटतील यांत शंका नाही.

## लघुकथा

**१ कोंवळीं किरणें**— ले० श्री. दिनकर द. पाटील; प्रका० श्री. दा. ना. मोघे, स्कूल व कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर; मूल्य १। रु.

**२ जुना बाजार**—ले० श्री. ग. खं. पवार; प्रका० श्री. शांताराम आठवले, टिळक रस्ता, पुणें २; मूल्य १। रु.

**३ पाणपोअी**— ले० श्री. पां. गो. लोहोकरे; प्रका० श्री. हे. ग. करमरकर, २० नारायण पेठ, पुणें २; मूल्य १। रु.

**४ न बोलायच्या गोष्टी**— ले० श्री. य. ग. वझे; प्रका० श्री. ल. ना. चापेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, टिळक रस्ता, पुणें २; मूल्य १ रु.

**५ निवाडे**— ले० श्री. ना. धों. ताम्हनकर; प्रका० श्री. रा. ज. देशमुख, देशमुख आणि कं., २६४ नारायण, पुणें २; मूल्य २। रु.

मराठी लघुकथेच्या प्रांगणांत आता खूपच नवोदित लेखक अुतरले आहेत आणि दर महिन्याला बाहेर पडणाऱ्या पुस्तकात लघुकथांचा संग्रह नाही असें क्वचितच झालें आहे. कथावाङ्मयाच्या आघाडीवर असणाऱ्या फडके, खांडेकर, काणेकर अित्यादींचें लेखनहि झपाट्याने चालू आहे. पण या थोरांच्या हातून अधूनमधून अुत्कृष्ट कलाकृति अुतरत असल्या तरी आता त्यांच्या लेखनाला ठराविकतेच्या मर्यादा पडूं लागल्या आहेत ही गोष्ट निर्विवाद. या ठराविकतेच्या चाकोरींतून लघुकथेची चाल बाहेर पडावयाची असेल तर आता नवीन लेखकांकडेच आशेने पाहिलें पाहिजे.

या दृष्टीने 'कोवळीं किरणे' या संग्रहातील 'दिवाळीची भेट', 'सुखस्वप्न' आणि 'देह व मन' या गोष्टी अुल्लेखनीय आहेत असें म्हणावेंसें वाटतें. या लघुकथांत रेखाटलेलीं सावकार, कारकून आणि व्यसनासक्त पतीची स्त्री यांचीं चित्रें सहानुभूतीने काढलीं गेल्यामुळे परिणामकारक वठलीं आहेत.

पण अुरलेल्या सर्व कथांचे विषय आणि कल्पना जुन्या आणि अति वापरलेल्या अशा आहेत. प्रेमकथांतील प्रेमभावना तर सर्वस्वीं अुथळ व कृत्रिम वाटते. त्यांत जिव्हाळा व सखोलतेचा अभाव असल्याने त्या कथाची भाषा व सजावट रेखीव असूनहि त्या नीरस व पोरकट वाटतात. या प्रेमकथातून रेखाटलेल्या सर्व नायिका प्रियकरासाठी हपापलेल्या, प्रेमाचा अनुभव घेण्यास अधीर झालेल्या सहजसाध्य अशा दाखविल्या आहेत. लेखकाचा स्त्रीस्वभावाचा अनुभव कल्पनारम्यतेच्या कोटींत शोभेल असाच दिसतो. बाकीच्या लघुकथांतून कलासक्ति कीं प्रेम, पतित स्त्रियाचा प्रश्न अित्यादि प्रश्न हाताळले आहेत. परंतु लेखकाला वास्तवतेची कल्पना अजून नीटशी झाली नसल्याने या सर्व कथात अतिरंजितता आणि भडकपणा आला आहे.

या पुस्तकांतलें बहुतेक सर्व लेखन अजून तें अनुकरणावस्थेंत असल्याची साक्ष देतें. सुरुवातीच्या कथांत बारीकसारीक गोष्टींचें व हालचालींचें सूक्ष्म वर्णन करण्याची प्रो. फडक्यांची लकब अुचलल्याचें दिसून येतें. पण या वैशिष्ट्याचा योग्य ठिकाणीं योग्य अुपयोग करून घेतां न आल्याने हीं वर्णनें त्या त्या कथांना भारभूत झाल्याचें दिसून येतें. नंतरच्या गोष्टींत खांडेकर-पद्धतीचा संवाद लिहिण्याचा प्रयत्न लेखकाने करून पाहिल्याचें दृष्टीस पडतें. कांही ठिकाणीं तो प्रयत्न जमला असला तरी त्यामुळे कथांची गति अुगीचच रेंगाळली असल्याचें प्रत्ययास येतें.

'जुना बाजार' या श्री. पवार यांच्या संग्रहांतील 'अदृश्य जखम' ही गोष्ट परिणामकारक आहे. तिची कल्पना अिंग्रजीवरून घेतल्याचें लेखकाने सुरुवातीस नमूद केलें आहे. 'पतंग आणि ज्योति' हें या संग्रहांतलें अेक अुत्तम गद्य-काव्य आहे. श्री. पवारांनी अशींच गद्य-काव्यें लिहिण्याचा प्रयत्न करावा असें सुचवावेंसें वाटतें. 'रूपगर्विता' आणि 'सौंदर्योपासक' यांत सौंदर्याच्या आवडीमुळे व सौंदर्याच्या गर्वामुळे आयुष्याचें कसें नुकसान होअूं शकतें हें दाखविलें आहे. 'पहिलें प्रेम' या कथेंत प्रथमदृष्टिपातांत अुद्भवणाऱ्या प्रेमामुळे कधी कधी हास्यास्पद प्रसंग कसे अुद्भवतात हें लेखकाने दिग्दर्शित केलें आहे.

अुरलेल्या कथा मात्र परिणामशून्य आणि नीरस वाटतात. रचनाचातुर्याची अुणीव ठिकठिकाणीं प्रतीत होते. संयमाचा अभाव असल्याने सर्वत्र पाल्हाळ झाल्याचें दिसून येतें.

श्री. पां. गो. लोहोकरे यांनी नअू कथांची 'पाणपोअी' वाचकांसाठी घातली आहे. श्री. लोहोकरे यांच्या लघुकथाचा थाट जरा जुनाट वळणाचा वाटतो. प्रस्तुत संग्रहांतील लघुकथांत 'प्रेमवेडी' ही अेक प्रदीर्घ कथाहि आढळते. 'प्रेमवेडी'चा अवतारहि वर अल्लेखिल्याप्रमाणे जरी जुन्या वळणाचा असला तरी या संग्रहांतील अेक अुत्तम कथा म्हणून हिच्याकडे बोट दाखविता येअील. सूर्याजी आणि चंद्रराव हे दोघे भाअू आणि चंद्रावती ही सूर्याजीची पत्नी या तिघांभोवतीं या कथेची गुंफण केली आहे. प्रेम हें या कथेचें सूत्र म्हणतां येअील. गोष्टीच्या पार्श्वभूमीसाठी घेतलेलें जहागिरदाराचें जुनाट घराणें, त्यांची गढी, शेजारचा गोदावरीचा डोह अित्यादींचीं वर्णनें परिणामकारक आहेत. 'प्रेमवेडी' या प्रदीर्घ कथेप्रमाणेच 'प्रेमासाठी' ही लघुकथाहि या संग्रहांतील अेक उत्कृष्ट लघुकथा आहे. विशेषतः रोशनला स्वतः सुखी करूं शकत नाही असें पाहून गुलाब तिला दुसऱ्याशीं निका लावण्याबद्दल शपथ घालतो आणि शेवटीं चार पैसे मिळूं लागल्यावर तिला लग्नाकरिता बोलावणें पाठवितो. परंतु ज्या

गफुरशेटमुळे त्याला बरे दिवस आले असतात त्याच्याशींच तिचें लग्न लागल्याचें ती सांगते. लघुकथेंतील भावनाविष्कार मोठा संयमपूर्ण झाला आहे. अितर कथांपैकी 'मिळवती बायको' हीहि अेक बऱ्यापैकी गोष्ट आहे.

श्री. लोहोकरे यांनी आपल्या 'पाणपोअी'करिता आणलेलें पाणी जर ठराविक झरा सोडून निरनिराळ्या अनेक झऱ्यांतून आणलें तर त्यांच्या पाणपोअींतील पाणी आकंठ प्राशन करण्यास दूरदूरचे प्रवाशीहि धावतील अशी आशा प्रस्तुत पाणपोअीने निर्माण होअूं शकते.

'न बोलायच्या गोष्टी' हा श्री. यशवंत गणेश वझे यांचा नवीन कथासंग्रह आहे. समाजांत अशा कांही गोष्टी असतात की त्या फक्त मनांत ठेवायच्या असतात, त्यांचा अुच्चार करावयाचा नसतो, निदान सामान्यतः त्यांचा अुचार जाहीरपणें करावयाला कुणी धजावत नाही. श्री. वझे यांनी हा धीटपणा दाखविला आहे. प्रस्तुत संग्रहांत 'कोबी', 'ह्मावलाक येलीस', 'अेकसष्ठीचे बळी', 'चंद्र-सूर्य कीं काजवे ?' आणि 'गैरसमज' या गोष्टी वरील सदरांत मोडणाऱ्या आहेत. पैकी 'कोबी' ही गोष्ट सोडली तर बाकीच्या गोष्टी नुकत्याच कांही दिवसांपूर्वी घडलेल्या कांही प्रसंगांवरून सुचलेल्या दिसतात. त्यांतील व्यक्तींची तोंडओळखहि विनाप्रयास होअूं शकते. रत्नागिरी किंवा सोलापूर येथील साहित्यसंमेलनप्रसंगीं घडलेल्या गोष्टींना श्री. वझे यांनी अितकें प्रातिनिधिक स्वरूप देअून 'न बोलायच्या गोष्टीं'त त्या कां समाविष्ट केल्या समजत नाही. अुपरोध-अुपहासगर्भ आणि टीकात्मक गोष्ट लिहितांना वाचकांना माहीत असलेले प्रसंग नि व्यक्ति घ्याव्या लागतात हें खरें, परंतु त्याना सार्वजनिक आणि सामाजिक असें स्वरूप असल्यास जास्त चांगलें. 'चंद्र-सूर्य कीं काजवे ?' ही अेक या संग्रहांतील अुत्कृष्ट रूपककथा (Allegory) आहे. अत्रे, फडके आणि खांडेकर या व्यक्तींवर आणि त्यांच्या साहित्यावर लेखकाने टीका केली आहे. या साहित्यिकांच्या साहित्यावर मतें देण्याचा अधिकार सर्वांनाच पोहोचतो परंतु त्यांच्या खाजगी चारित्र्याबद्दल अुल्लेख करतांना त्याची मर्यादा कितपत पाळावी हा प्रश्न मात्र अजून अविवाद्य झाला नाही. परंतु अेकंदरींत या कथेवरून श्री. वझे हे चांगल्यापैकी अुपरोध-अुपहासपूर्ण रूपककथा लिहूं शकतात याची साक्ष पटते.

'मंदिरांतील अंधार' ह्या कथेंत अेका विशिष्ट जातीने स्थापन केलेल्या शाळेंत जातीयतेचें वारें कसें धुमाकूळ घालीत होतें आणि त्यामुळे परजातीय विद्यार्थ्याला कसा अुपसर्ग पोहचत असे याचें अुत्तम चित्र रंगविलें आहे. परजातींतील हुशार विद्यार्थ्याचा अितर विद्यार्थ्यांनी मत्सर करणें, त्याच्यावर किटाळ आणणें, मुख्याध्यापकानेहि सारासार विचार न करतां त्याला आजारी पडेपर्यंत छडीने चोपणें अित्यादि वर्णनें परिणामकारक झालीं आहेत. 'अपवादाचे क्षण' हीहि चांगल्यापैकी भावकथा आहे. असहाय आणि तरुण अशा बालविधवा विद्यार्थिनीस मास्तरांनी केलेली मदत आणि त्यामुळे त्याच्या पत्नीचा झालेला गैरसमज यावर ही कथा आधारलेली आहे. यांतील प्रभा या विद्यार्थिनीचें चित्र अत्यंत करुणरसपूर्ण रंगविलें आहे. 'वा भाअी !!' ही कथा अेका बोलघेवड्या आणि फसव्या अशा भाअीवर आधारली आहे. समाजवादाच्या पुरस्कारार्थ निघालेल्या भाअींत अशा तऱ्हेचीं कांही 'काळीं मेंढरें' नसतीलच असें जरी नसलें तरी या अपवादात्मक अुदाहरणामुळे खऱ्या आणि कळकळीच्या कार्यकर्त्यांवर मात्र अन्याय झाल्याखेरीज राहणार नाही. कामगारांची चळवळ कामगारांनीच लढवावी हें तत्त्व जरी मान्य असलें तरी कामगारांत जागृति अुत्पन्न करण्याचें काम सुबुद्ध अशा पांढरपेशांचें नाही असेंहि म्हणतां येणार नाही

लेखकाने आपल्या भूमिकेंत 'पुरोगामी साहित्य', 'कलेसाठी कला' आणि 'जीवना-

शठी कला' अित्यादींची बरीच टर अुडविली आहे. श्री. वझे यांचें लेखन त्यांच्या समजुती-प्रमाणे या कोठल्याच पंक्तींत बसणारें नाही. स्वतंत्र वृत्ति ही केव्हाहि चांगली. पण वरील तत्त्वांची टर अुडविणाऱ्यांचाहि अेक पंथ होअूं पाहत आहे. आणि त्यांत देखील श्री. वझे यांनी सामावून घेअूं नये अशी अेक मित्रत्वाची सूचना त्यांना द्यावीशी वाटते. 'साहित्यिक-श्रेष्ठतेबरोबर प्रामाणिकपणा व व्यक्तिमत्व यांच्या बळावर' श्री. वझे यांचा विश्वास आहे. त्याचप्रमाणे न बोलणाऱ्या गोष्टींची यादी अजून कितीतरी राहिली आहे. श्री. वझे हे अशाच धीटपणाने त्यांना वाचा फोडतील आणि वाचकांच्या मनांतील मळमळ दूर करतील अशी आम्ही अुमेद बाळगतों.

श्री. ना. धों. ताम्हनकर यांनी समाजांतील अनेक प्रश्नांचा नीट विचार करून हे 'निवाडे' केले आहेत. हे निवाडे यमरायाच्या न्यायालयांत झाले आहेत. आणि हे यमलोकीं चुकून जाअून आलेल्या केसोबच्चाजी यांनी समक्ष अैकले आहेत. माणसांच्या जगांतील न्यायान्यायाच्या कल्पना कशा अेकांगी आहेत हें ह्या 'निवाड्यां'वरून आपल्या लक्ष्यांत येअील. आणि कोणत्याहि गोष्टीची योग्यता ठरवितांना किती दूरवर विचार करावा लागतो हें यम-राजाच्या न्यायदृष्टीवरून आपणांस कळावें हा लेखकाचा हेतु आहे. हाडांचीं कांडें करून विद्वान झालेला मनोहर सहस्रबुद्धे यमराजांनी शरीराची हानि केल्याबद्दल अपराधी ठरविला, आणि स्वतःच्या अपमृत्यूमुळे पत्नीवर आलेल्या वैधव्याचें पातक त्याच्या माथीं आहे. तेंच जगांत बैलोबा ठरलेला ढवळ्या बैल हा प्रामाणिकपणामुळे मनुष्यजन्मास यमराजांनी लायक ठरला. शिक्षणासाठी नैसर्गिक भावना बाजूस ठेवून विदुषी ठरलेली कुमारी गांधारी आत्मवंचना व राष्ट्रघात हे गुन्हे करणारी गुन्हेगारीण ठरली, कारण तिने ज्या विद्येचा ध्यास घेतला ती विद्या वांझ ठरली! दातृत्वाने धर्मरक्षक ठरलेला महाराजा दौलतसिंग खऱ्या न्याय-दृष्टीने धर्मघातकी ठरविला, कारण त्याची दानपद्धति आजच्या धर्मास घातक ठरली, आणि आपल्या प्रजेला निरक्षर ठेवून त्यांचा अेक प्रकारें घात केल्याने हा दानशूर राजा यमधर्माने पुत्रघातकी ठरविला. समाजाने सर्व बाजूंनी अुपासमार चालविल्यामुळे त्याची प्रतिक्रिया म्हणून दरवडे घालूं लागलेला दंड्या दरवडे यमधर्माने अदण्ड्य ठरविला, कारण दंड्या दरवडे हा सत्तेने धुंद झालेल्यांना वठणीवर आणीत होता. यमराजाने त्याला भूलोकीं देवांचें कार्य केल्याबद्दल स्वर्गवासाचें पारितोषिक दिलें. मामलेदारीण बाअीसाहेब याचा खटला अैकून भूलोकास आश्चर्याचे धक्केच बसतील. पतीची बौद्धिक सहवासाची भूक आणि प्रमाणबद्ध यौवनसंपन्न स्त्रीदेहाच्या अुपभोगाची भूक या दोन भुकांची पर्वा न करतां बाअीसाहेबांनी मामलेदारांची केलेली पतिसेवा फोल ठरली आहे! यमधर्माची ही आधुनिकता अिहलोकीच्या पामरास केव्हा कळणार असेंच कित्येक असंतुष्ट रसिक पति म्हणत नसतील का? नामदेवबुवा म्हणजे अगदी देवमाणूस, परंतु त्याची भक्ति आधुनिक युगांत खोटी ठरली. आणि अखंड देवपूजा, नाम-संकीर्तन अित्यादि गोष्टी करूनहि श्रद्धा आंधळी राहिल्याने शेवटीं तो देवद्रोही आणि बुद्धिभेदी ठरला! जेथे नामदेवबुवांचा असा निकाल लागला तेथे चित्रपटतारका सारिकादेवी या स्वजाति-कलंक-भगिनीसंसारनाशिका न ठरल्या तरच आश्चर्य! कारकुनींत रखडणारा, केवळ चहा पिअून जगणारा शांताराम आनंदकर नोकरींतील अपमानाच्या प्रतिक्रियेने पत्नीस छळत होता त्यामुळे माणसांनी त्याची कींव केली तरी यमधर्माने त्याला सापाचा जन्म ठोठावला! आणि महाराष्ट्रीय गाढव झालेला चिल्या हा मात्र गाढवाच्या जन्मांत गाढवासारखा वागल्यामुळे (बुद्धि नसल्याने यानें कांही पापहि केलें नाही नि पुण्यहि केलें नाही) त्याला यमराजांनी पुढील जन्मीं प्रोफेसर

केला ! निवाड्याच्या शेवटीं मल्या मुस्कुटे याची कैफीयत आहे. त्यांत मल्याने माणसाच्या जगामध्ये चाललेली दंडेली स्वानुभवाने सांगितली आहे आणि लवकरच क्रांति होऊन सगळें ठीक होईल असा निर्वाळा देऊन देवगुरूंनी त्याचें सांत्वन केलें आहे !

अशा रीतीने निवाडापद्धतीने चालू समाजांतील भोंदूपणावर, अरेरावीवर श्री. ताम्हनकर यांनी परिणामकारक टीका केली आहे. परंतु ही टीका करतांना त्यानी निवाड्याचें रूपक अेक-सारखें चालू ठेवल्याने तें कंटाळवाणें होतें आणि कित्येक वेळां निवाड्याची पार्श्वभूमि नाहीशी होऊन आपण लेखकाचें व्याख्यान अैकत आहोंत असें वाटतें. परंतु तें व्याख्यानहि लेखकाच्या भाषाप्रभुत्वाने वाचनीय होतें हेंहि नमूद केलें पाहिजे.

## ललितनिबंध

**१ दाजी**— (भाग २ रा.) ले० श्री. ना. धों. ताम्हनकर; प्रका० किर्लोस्कर प्रेस, किर्लोस्करवाडी; मूल्य १॥ रु.

**२ पुष्पांजली**— ले० श्री. के. डी. भाटे; प्रका० कुसुमकान्त डी. भाटे, धुळें; मूल्य १ रु.

श्री. ना. धों. ताम्हनकर यांनी 'दाजी'ची हकीगत लिहिण्याच्या निमित्ताने अेका लेखनतंत्राचा आश्रय केला आहे. श्री. कृ. कोल्हटकर हे या लेखनपद्धतीचे प्रवर्तक म्हणतां येअील. कोणी तरी अेक सर्वव्यापी काल्पनिक व्यक्ति तयार करून तिच्या जीवनकथेंतील निरनिराळ्या प्रसंगांच्या निमित्ताने निरनिराळ्या प्रचलित विषयांतील आपलीं मतें लेखकाने सांगावीं अशी ही पद्धति रूढ झाली आहे. नुसत्या मतप्रवचनास व्याख्यानाचें किंवा निबंधाचें कांहीसें रूक्ष स्वरूप येतें त्यापेक्षा कांहीसे विनोदी प्रसंग निर्माण करून ती व्याख्यानबाजी सुसह्य करण्याचा हा प्रयत्न आहे. निबंध व कथा यांच्या मधला हा प्रकार आहे. त्यांत कथाभाग हा केवळ निमित्तमात्र ! मुख्य रोख निबंधात्मक मतप्रवचन !

दाजी हें पात्र श्री. ताम्हनकरांनी याच हेतूने निर्माण केलें आहे. आणि तें अतिशय चातुर्याने तयार केल्याने त्यांत जिवंतपणाहि आला आहे. परंतु पहिल्या भागाप्रमाणेच दुसऱ्या भागाच्याहि बाबतींत अेक गोष्ट लक्ष्यांत येते ती ही की, लेखकास बऱ्याच विषयांसंबंधींचीं मतें सांगावयाचीं आहेत आणि तीं सगळीं सांगण्याचें काम अेकट्या दाजीवर पडलेलें. अितक्या विविध विषयांवरचीं मतें सांगण्यासारखे अनुभव व प्रसंग अेकाच व्यक्तीच्या आयुष्यांत येत नाहीत. त्यामुळे कथासूत्राच्या सुसंगतीकडे काणाडोळा करून दाजीला सारखा बोलत ठेवावा लागला आहे. दाजीचे बंधुतुल्य मित्र व त्यांच्या पत्नी यांनी या भावोजीला कांही तरी कारणें अुकरून बोलत ठेवला आहे ! दुसऱ्या भागांत हा वाचाळपणा मधून मधून कंटाळवाणा झाला आहे ! परंतु तो कंटाळा फार वेळ टिकत नाही. याचें श्रेय लेखकाची अत्यंत ओघवती भाषा ! संभाषणें असोत, वृत्तान्तकथन असो भाषेचा जिवंतपणा सर्वत्र अनुभवास येतो.

या दुसऱ्या भागांत दाजीच्या भोवतीं ज्या प्रसंगांची मंगळागौर रचली आहे ते प्रसंग म्हणजे देशी चित्रपट, षष्ठ्यब्दिसमारंभ, संस्थानांतील अुधळपट्टी, समाजांतील मिरासदारी, अस्पृश्योद्धाराची चालू कल्पना, देशभक्तांची— विशेषतः गांधीभक्तांची— बुवाबाजी, पोषाकपद्धतीं-तील फॅशन व गरजा, भाषाभिमानाचें योग्य स्वरूप, अहिंसातत्त्वातील व्यवहार्यता, सत्याग्रह, धर्माभिमानाचें खरें स्वरूप या विषयांशीं बादरायणसंबंध असलेले प्रसंग होत. वरील विषयां-

वरील आपलीं मतें सांगण्यासाठी दाजीस निरनिराळ्या प्रसंगांकडे धाव ठोकावी लागली आहे. त्यासाठी तो कधी अचानक नाहीसा होतो आणि कधी अचानक प्रकट होतो ! केव्हा केव्हा तो कांही विचित्र वर्तनाने सर्वांचें लक्ष आपल्याकडे वेधतो आणि ओघानेच मग असें कां असा प्रश्न त्याला त्याचे बंधुतुल्य मित्र किंवा वैनी विचारतातच; आणि मग तो त्या प्रस्तुत विषयावरचीं मतें सांगतो या मतांच्या द्वारें लेखकाने आपल्या विचारसरणींतील व्यापकता व तर्कशुद्धता वाचकांच्या प्रत्ययास आणून दिली आहे. कथनास ताजेपणा आणण्यासाठी प्रसंग निवडतांना ते केवळ काल्पनिक निवडले नाहीत तर प्रत्यक्ष घडलेल्या प्रसंगांचेंच वाङ्मयीकरण केलें आहे हे लेख मासिकांतुन येत होते त्या वेळीं हा ताजेपणा चांगला प्रत्ययास येत होता. ग्रंथरूपाने वाचतांना ते प्रसंग लगेच आठवतात. अुदा० पृ.५० वरील संतपटावरील टीका, 'षष्ठ्यब्दीविषयी तुमचं मन मोडायचं माझ्या जिवावर येतं' असें म्हणून रावसाहेबांनी अनुमति देणें (पृ.५५), शृंगारपूर संस्थानातील दसऱ्याची शिलंगणस्वारी, पृ. १७० वरील नीरापानाचा अुल्लेख, भाषाशुद्धीविषयी सावरकर आणि मराठी मायबोलीचे गृहस्थ, कंकणपूर संस्थानांतील सत्याग्रह, गेला पंचरंगी सामना (हा तर स्पष्टच अुल्लेख आहे) (पृ.२३९) अित्यादि ठिकाणीं कोणत्या प्रत्यक्ष घडामोडीच्या आधारें हें विवेचन चाललें आहे हें सहज ओळखतां येतें.

मताविषयी थोडक्यांत असें सांगतां येअील की त्या मतावर किर्लोस्करी मतांची चांगलीच छाप आहे. परंतु या ठिकाणीं अट्टाहास, कलात्मक अेकांगीपणा पुष्कळच कमी केला आहे. धर्माबद्दलचीं दाजीचीं मतें (पृ. १७७ व पृ. २५७) हीं प्रचारकी थाटाचीं असलीं तरी सारासारविचार दाखवणारीं प्रतिपादनस्थळें या ग्रंथांत बरींच आहेत. "परदेशी दारूगोळ्यानं देशी लोकांच्या महत्त्वाकांक्षा, कल्पकता धुळीस मिळविण्याचं आणि जनतेच्या मनांत देवदास्याची अफू टोचण्याचं पातक महाभाग करीत आहेत" ही देशी लोकप्रिय चित्रपटकारावरील टीका, तामसी हेतूंनीं लडबडलेला नटवेपणा प्रेक्षणीय असला तरी प्रेक्षणार्ह खास नाही ही शृंगारपूरच्या दसरासमारंभावरील टीका, मुलांच्या मनोविकासाच्या दृष्टीने आअी व बाप यांचीं कर्तव्यें, अहिंसेच्या अतिरेकावरील व्यवहार्य विचार, अस्पृश्योद्धाराच्या नांवाखाली चाललेली मिरासदारी, देवालाच सत्त्वहीन आणि निरर्थक करून टाकणारे दुसऱ्याला देवलसी (!) बनविणारे सनातनी, राममंदिरांचीं आराममंदिरें करण्याची योजना, साधेपणा नि स्वदेशी या तत्त्वांबरोबर गांधीवाद्यांत शिरलेला भोंदूपणा आणि आडमुठेपणा, भाषाशुद्धीविषयी शुद्धि आणि फाजील सोवळेपणा या विषयींचें तारतम्य अित्यादि विचार अत्यंत मननीय आहेत. ते विचार मांडण्याची दाजीची पद्धति परिणामकारक आहे. आपलीं मतें प्रत्यक्ष आचरणांत आणण्यासाठी दाजीने केलेलीं साहसें चित्तवेधक आहेत आणि लोकमत दुरुस्त करण्यासाठी अितकी यातायात करून शेवटीं आपल्या कार्याविषयी दाजीला वाटूं लागणारा निरुत्साह, निराशा, अुद्वेग हीं हृदयस्पर्शी आहेत.

असा हा आपला मित्र दाजी नेहमी आपल्या स्मरणांत राहील. दाजीचे वाचक दाजीला कधी विसरणार नाहीत. आणि त्याच्याबरोबरच त्याचे प्राणप्रिय मित्र आणि वहिनी, दाजीच्या पत्नी आणि विम्या हेहि आपणांस आपल्या कुटुंबीयांअितकेच प्रिय होतील.

पहिल्या भागाच्या शेवटीं भूकंपांत पडलेला दाजी दुसऱ्या भागांत 'मास्को'हून धावत आला तसाच क्षणभर नैराश्याने 'संपलेला' दाजी तिसऱ्या भागांत पुन्हा आपलें पराक्रम दाखवील अशी आशा आहे.

'पुष्पांजली' हा गद्यकाव्याचा अेक रम्य नमुना कै. रवींद्रनाथ ठाकूर यांच्या पद्धतीची बारंवार आठवण करून देणारा आहे. विरह, संगमोत्सुकता, दुर्दम्य आशावाद, अेकांतिकता, अैहिकाच्या नश्वरतेची जाणीव अित्यादि भावना या पुष्पांजलींत काव्यमय गद्यांत अुत्कटपणें मांडल्या अहित. भाषेचेंहि लेखकास काव्यानुकूल देणें आहे. कल्पनाशक्तीचें सामर्थ्यहि अनेक ठिकाणीं व्यक्त झालें आहे. निसर्गदृश्याचीं वर्णनें वाचता वाचता वाचकास दृष्टिसुख देतात अितकी अर्थवाही रचना या पुष्पांजलींत आहे. हीं पुष्पें ज्या दिव्यतेच्या पायीं वाहिलीं आहेत ती दिव्यता लेखकाच्या प्रतिभारूपाने तरी वाचकास प्रतीत होते. रवींद्रबाबूंचें गूढत्व (mysticism) सोडलें तर ही पुष्पांजली त्याच्या अनेक गीताजलींची आठवण देणारी वाटते.

---

# स्त्रियांच्या म्हणी

( ५८ व्या अंकावरून पुढे )

(५४१) फार बायका तेथे पीठ नाही, फार दादा तेथे मीठ नाही.
(५४२) भाअू सक्खा, वैरी पक्का.
(५४३) सासू तशी सून, घराचा गूण.
(५४४) माझें मी वाणी (वाखाणीं) जग देतें गाऱ्हाणीं.
(५४५) ज्याला नाही लाज, त्याला पृथ्वीचे राज (राज्य).
(५४६) आधीच रडवी, त्यात माहेरची आडवी.
(५४७) शेतकऱ्यासारखा दाता नाही, कुटल्याशिवाय देता नाही.
(५४८) देव्हारीं असे अन्नपूर्णा, अन् गृहीं अन्नचि मिळेना.
(५४९) अडाणी भट, वाजंत्र्यांचा गजर.
(५५०) म्हाताऱ्याची बाअील लाडकी, भिकाऱ्याचें पोर लाडकें.
(५५१) लिंबावाचून कडू नाही, मायेवांचून रडूं नाही.
(५५२) अहेर खणाचा, गजर वाजंत्र्याचा.
(५५३) बडा घर पोकळ वासा, पाहिल्या तर ढेकूणपिसा.
(५५४) नाकीं नाही काटा, रिकामा ताठा.
(५५५) काही नाही लागत, पायलीची आगत.
(५५६) कांही नाही खात, पातलीचा भात.
(५५७) नको नको, पायलीचे चाखो.
(५५८) ज्याचें नाक नकटे, त्याला सारा गाव चिकटे.
(५५९) लाज नाही मना, कुणी काही म्हणा.
(५६०) पदरीं पडलें झोंड, हसून करा गोड.

नीलकंठ शंकर नवरे

# हिंदी शास्त्रीय परिभाषेचा प्रश्न



(लेखक—प्रा. दे. द. वाडेकर, अेम्. अे.)

**प्रास्ताविक.**

हिंदुस्थानांत जे अनेक शिक्षणविषयक प्रश्न देशाच्या विशिष्ट राजकीय व सामाजिक परिस्थितीमुळे विशेष महत्त्व पावले आहेत त्यातच अेक शिक्षणाचे (माध्यम) वाहित्र काय असावें हा आहे. या प्रश्नासंबंधी हिंदुस्थानात कित्येक वर्षे बराच विचार झाला असून सांप्रत त्यासंबंधी शिक्षणतज्ज्ञाचे मत बहुतांशीं देशी भाषांना अनुकूल असेच झालें आहे. या मतास अनुसरून सरकारनेहि दुय्यम शिक्षणाच्या शाळांतून द्यावयाचें शिक्षण त्या त्या देशी भाषेंतून द्यावयाची वैकल्पिक परवानगी दिली आहे. याहीपुढे जाअून अुच्च विश्वविद्यालयीन शिक्षणहि देशी भाषेंतूनच देण्याची कल्पना व प्रघात अजून तितका रूढ झालेला नाही; परंतु याहि बाबतींत बनारस विश्वविद्यालयासारख्या संस्था अिंटरपर्यंतचें शिक्षण देशी भाषेंतुन देण्याचा प्रयोग करीत आहेत ही समाधानाची गोष्ट आहे.

देशी भाषातून विविध विषयाचे शिक्षण मुलास देण्याच्या बाबतीत सर्वांत मुख्य अडचण जर कोणती असेल तर ती म्हणजे शास्त्रीय स्वरूपाचे विषय शिकवितांना भासणारी देशी भाषेतील शास्त्रीय परिभाषेच्या अभावाची अडचण. भौतिक शास्त्रें हीं आपणांस बहुतांशीं युरोपियन राष्ट्रांची देणगी आहे. गेल्या तीनचारशें वर्षांत युरोपियन देशात भौतिक शास्त्रांचा अुदय व प्रगति हीं फार झपाट्याने झालीं; आणि साहजिकच या शास्त्रांची रचना करितांना शास्त्रज्ञांना नवीन पारिभाषिक शब्द निर्माण करावे लागले. अर्थात् या परिभाषानिर्मितींत शास्त्रज्ञांनी बहुतेक युरोपियन भाषांची जननी म्हणून प्रथम ग्रीक व नंतर लॅटिन या भाषातील शब्दसंपत्तीचा सर्रास अुपयोग केला ही गोष्ट अगदी साहजिक आणि सरळच झाली. यामुळे शास्त्रीय परिभाषेच्या रूपाने युरोपियन भाषांत अेका नवीन व विपुल शब्दसंग्रहाची महत्त्वाची भर पडली. शिवाय ही भर मुख्यतः ग्रीक व लॅटिन या सर्वांस सामान्य अशा मूळ भाषांतील असल्याने ती युरोपीय भाषांपुरती थोडीफार अैक्यसंपादकहि झाली. यावरून पाहतां शास्त्रीय परिभाषा ही सर्व देशांतून शक्यतोंवर अेकच असल्यास तीपासून होणारा फायदा व सोय हीं फार महत्त्वाचीं आहेत यांत शंका नाही.

युरोपमध्ये जो भौतिकशास्त्रांचा अुदय व विकास झाला असें वर म्हटलें त्याबरोबरच तिकडे भौतिकेतर (मानविक)[१] शास्त्रांचाहि विकास होत होता ही गोष्ट लक्ष्यांत ठेविली पाहिजे. अर्थात् या विकासाबरोबरच याहि शास्त्रांची परिभाषा बनत होती. किंबहुना 'शास्त्र' (Science) ही संज्ञा कोणत्याहि अेका विशिष्ट अभ्यासविषयापुरती मर्यादित न राहतां ती कोणत्याहि विषयाबद्दल प्रत्यक्ष आणि अनुमान या साधकबाधक प्रमाणपरीक्षणांच्या पद्धतीने केलेला विचार या सर्वसामान्य अर्थाने रूढ झाली; व यामुळे शास्त्रीय विचारांचेंच अेक वेगळें शास्त्र होअून

---

१. Humanistic.

त्यांचीहि परिभाषा ठरूं लागली. अशा रीतीने 'शास्त्रीय परिभाषा' म्हणजे केवळ भौतिक शास्त्रांतील परिभाषा अेवढाच त्या शब्दसमूहाचा आशय न राहतां कोणत्याहि विषयाचा शास्त्रीय विचार करतांना अुपयोजिलेली परिभाषा असा विस्तृत अर्थ त्यास प्राप्त झाला. या शास्त्रीय परिभाषेने सर्वच युरोपीय भाषा गेल्या कांही शतकात फार संपन्न झाल्या आहेत यांत शंका नाही.

**प्रारम्भ.**

हिंदुस्थानांत अर्थात्‌च ह्या युरोपीय शास्त्रीय भाषा-परिभाषेच्या द्वारें शास्त्रीय विषयांचें शिक्षण द्यावयाचें म्हटलें तर प्रथमतः ही विदेशी भाषा-परिभाषा शिकण्यांतच विद्यार्थ्यांचा बराच वेळ जाणार; आणि युरोपातल्याप्रमाणे शास्त्रीय विचार आमच्या देशात पूर्वी झालेला नसल्याने आमची स्वतःची मूळची शास्त्रीय परिभाषा साहजिकच तयारहि नाही. म्हणूनच हिंदुस्थानात मुलाना शास्त्रीय विषय शिकविताना त्या त्या विषयांकरिता देशी परिभाषा निर्माण करण्याचा प्रश्न अुद्भवतो.

आपल्या देशांत तीनचार वर्षांपूर्वी प्रांतातून काँग्रेसने अधिकारस्वीकार केल्यानंतर साहजिकच प्रांतीय काँग्रेस सरकारांनी शैक्षणिक सुधारणेच्या कार्यास अुत्साहाने हात घातला. मुंबअी सरकारांत या प्रश्नाचा विचार चालू असताना शास्त्रीय परिभाषेचा प्रश्न पुढे आला. तेव्हा मुंबअी सरकारने आपल्या विचारासाठी आपले अेक शिक्षणाधिकारी प्रो. बी. अेन्. सील, डेप्युटी डायरेक्टर ऑफ पब्लिक अिन्स्ट्रक्शन, यांना या प्रश्नासंबंधी साधकबाधक विचाराचें पत्रक तयार करण्यास सांगितलें. त्यानी तें तयार केल्यानंतर त्यात 'शास्त्रीय परिभाषा निश्चित करावयाची तर ती केवळ प्रांतीय नसून अखिलभारतीय स्वरूपाची असावी; व तशी ती असावयाची तर त्यासंबंधी प्रथमतः हिंदुस्थान सरकारतर्फे सेंट्रल ॲडव्हाजरी बोर्ड ऑफ अेज्यु-केशन अिन अिंडिया (हिंदुस्थान सरकारचें मध्यवर्ति शैक्षणिक सल्लागारमंडळ) या संस्थेने विचार करून हिंदुस्थान सरकारचें त्याबाबतचें अखिल भारतीय धोरण ठरविलें पाहिजे; म्हणजे मग पुढील कामासाठी योग्य त्या (अखिल भारतीय व प्रांतीय) समित्या नेमून हिंदु-स्थानची शास्त्रीय परिभाषा बनविता येअील' अशा तऱ्हेची विचारसरणी मांडण्यात आली. त्यामुळे प्रो. सील यांचें हें पत्रक मुंबअी सरकारने पुढील विचारासाठी हिंदुस्थान सरकारच्या मध्यवर्ति शैक्षणिक सल्लागार मंडळाकडे (Central Advisory Board of Education in India) पाठविलें. (नोव्हेंबर १९३९).

यानंतर या सल्लागारमंडळाने हा प्रश्न विचारांत घेअून त्यासंबंधी (१) हिंदुस्थानातील प्रांतीय भाषांकरिता स्वीकारावयाची शास्त्रीय परिभाषा ही सर्व भाषास सामान्य असावी, व (२) हें अुद्दिष्ट अिंग्रजी शास्त्रीय परिभाषेचा आयता स्वीकार करूनच अुत्तम रीतीने साध्य होअील, असा आपला अभिप्राय नमूद केला. तथापि या प्रश्नाचा जास्त साक्षेपाने विचार व्हावा या हेतूने मंडळाने त्यासाठी अेक आठ सभासदांची 'शास्त्रीय परिभाषा समिति' (Scientific Terminology Committee) नेमिली व तिला अधिक सभासद स्वीकृत करण्याचा अधिकार दिला. (मे १९४०).

या समितींत पुढील आठ सभासद होते: (१) सर अकबर हैदरी, अध्यक्ष, (२) सर के. रामुन्नी मेनन, (३) मि. अेस्. सी. त्रिपाठी (ओरिसाचे शिक्षणाधिकारी), (४) मि. डब्ल्यू. अेच्. अेफ्. आर्मस्ट्राँग (पंजाबचे शिक्षणाधिकारी), (५) सर झियाअुद्दीन अहमद, (६) पंडित अमरनाथ झा (अलाहाबाद विश्वविद्यालयाचे कुलगुरु), (७) डॉ. यू. अेम्. दाअूदपोटा (सिंधचे

शिक्षणाधिकारी), व (८) हिंदुस्थान सरकारचे अेज्युकेशनल कमिशनर. या समितीने पुढील तीन सभासद स्वीकृत करून घेतले: (९) डॉ. अब्दुल हक (दिल्लीच्या अंजुमान-इ-तरक्की-इ-अूर्दू या संस्थेचे चिटणीस), (१०) डॉ. अेम्. अेस्. भटनगर (पंजाबमधील शास्त्रीय आणि औद्योगिक समन्वेषक) व (११) डॉ.मुझफरोद्दीन कुरेशी (हैदराबादच्या अुस्मानिया विद्यापीठांतील रसायनशास्त्राध्यापक). असे अेकूण या समितीचे अकरा सभासद झाले. या समितीच्या सभा आक्टोबर (१५ व १६) १९४० मध्ये हैदराबादेस भरल्या. त्या वेळीं निजाम सरकारचे शिक्षण-मंत्री व अुस्मानिया विद्यापीठाचे कुलगुरु नबाब महदीयारजंग बहादूर हेहि विशेष निमंत्रणावरून हजर होते. या समितीचा अहवाल व शिफारशी या नुकत्याच हिंदुस्थान सरकारच्या शैक्षणिक सल्लागारमंडळाने आपल्या निर्णयासह प्रसिद्ध केल्या आहेत. त्यांचाच त्रोटक परिचयपरामर्श या लेखांत घ्यावयाचा आहे.

वरील 'शास्त्रीयपरिभाषासमिती'पुढे विचारासाठी जे कागदपत्र माडण्यांत आले होते त्याची माहिती करून घेणे फारच बोधप्रद होणार आहे. कारण या कागदपत्रावरून व त्यांवरूनच तयार केलेल्या विषयसूचिकेवरून हिंदी शास्त्रीय परिभाषेच्या प्रश्नास मुंबअी सरकारकडून मुळांतच कसें अनिष्ट वळण दिलें गेले हे स्पष्टपणें दिसून येतें. म्हणून या कागदपत्राची व विषय-सूचिकेची माहिती प्रथम थोडक्यात देअून मग समितीच्या निर्णय-शिफारशींकडे वळूं.

**कागदपत्र.**

समितीपुढे ठेविलेल्या कागदपत्रात अग्रपूजेचा मान अर्थात्च मुंबअी सरकारने पाठविलेल्या प्रो. सील याच्या पत्रकास दिलेला आहे. याशिवाय या पत्रकासंबंधी व त्यातील विषया-संबंधी माहिती व आपापल्या दृष्टीने विचार प्रदर्शित करणारी हैदराबादचे शिक्षणाधिकारी, मद्रास सरकार, पंडित अमरनाथ झा, डॉ. अब्दुल हक व डॉ. मुजफरुदिक कुरेशी यांचीं पत्रकेंहि समितीपुढे विचारासाठी ठेवण्यात आलेली होती.

१. प्रो. सील यांच्या मूलभूत पत्रकातील विचारांचा सारांश सामान्यतः पुढीलप्रमाणे देतां येअील. सर्व दर्जोचें शिक्षण देशी भाषातून देण्यांत यावें हें तत्त्व सर्वमान्य आहे. परंतु त्याकरिता आवश्यक तें शास्त्रीय वाङ्मय व परिभाषा तयार केल्याखेरीज हें तत्त्व परिणामकारक रीतीने अमलात येअूं शकणार नाही; आणि हें वाङ्मय व परिभाषा तयार करण्याचें काम खासगी ग्रंथकर्त्यांच्या प्रयत्नावर सोंपविल्यास संकुचित व स्थानिक दृष्टीचा प्रादुर्भाव होअून तें हिंदुस्थानच्या सास्कृतिक अैक्याच्या आड येअील. यासाठी (१) शास्त्रीय परिभाषा ही सार्व-भारतीय पाहिजे व (२) ती बहुतांशीं आंग्लभाषेंतूनच स्वीकृत करावयास पाहिजे. (३) कांही थोडे दुय्यम महत्त्वाचे शब्द खुद्द प्रांतिक भाषातून, व (४) त्यांच्या संस्कृत अगर पर्शो-अेरेबिक यांसारख्या मूल भाषामधून (मातृभाषातून) स्वीकारावे लागतील. (५) अशा तऱ्हेची संमिश्र परंतु मुख्यतः **दत्तक घेयविलेली आंग्लरूप परिभाषा नेमून देण्याचें काम** सरकारनेच योग्य त्या सार्वभारतीय व प्रांतिक समित्याकडून करविलें पाहिजे; व (६) या परिभाषेप्रमाणे न लिहिलेल्या पुस्तकांच्या अुपयोगास बंदी करून (७) शास्त्रीय शिक्षकांस अगर ग्रंथकर्त्यांस अितर स्वतंत्र परि-भाषा वापरण्याची मुभा न ठेविता (८) **ही सरकारमान्य परिभाषाच वापरण्याची सक्ती केली पाहिजे.** (९) अशा रीतीने तयार झालेल्या पुस्तकांचाच अुपयोग शिक्षणसंस्थांनी सतत करीत राहिल्यास कोणतीहि परिभाषा रूढ व सर्वमान्य होअूं शकेल.

प्रो. सील यांच्या पत्रकांतील मुख्य विचारसरणी या प्रकारची आहे. याशिवाय त्यांच्या पत्रकांत त्यांनी आपल्या मुख्य सिद्धांताच्या (म्हणजे हिंदी शास्त्रीय परिभाषा ही मुख्यतः अिंग्रजींतून अुसनवारलेली पाहिजे याच्या) समर्थनार्थ कांही युक्तिवाद मांडले आहेत; शास्त्रीय-संज्ञांचें अेक कामचलावू वर्गीकरण दिलें आहे; व हिंदी शास्त्रीय परिभाषेची जरूरी असलेल्या शास्त्रांची अेक तात्पुरती यादीहि दिली आहे. पैकी त्याचे मुख्य युक्तिवाद पुढीलप्रमाणे आहेत :

१. सर्व हिंदुस्थानांत **अेकच** परिभाषा असणें हेंच राष्ट्रीय भावनाना अनुरूप होअील, व त्यायोगें संस्कृत व पर्सो-अॅरेबिक पक्षांचीं भांडणें मिटतील व दोन वेगळ्या परिभाषा बनविण्याची आपत्ति टळेल. शिवाय, अर्वाचीन शास्त्र ही सर्वच पश्चिमेची देणगी आहे; आणि पाश्चात्य असो कीं पौर्वात्य असो, ज्ञान हें ज्ञान असल्याने पाश्चात्य शास्त्रीय ज्ञानाबरोबर पाश्चात्य परिभाषाहि स्वीकारण्यांत स्वाभिमान दुखावण्याचें काही कारण नाही. २. पाश्चात्य शब्द स्वीकारल्याने देशी भाषांचें ध्वनिमाधुर्य व प्रवाह बिघडेल हाहि युक्तिवाद देशी भाषांची व्यंजनस्वरात्मक प्रकृति पाहिल्यास टिकत नाही; आणि शिवाय परदेशी शब्दांचा स्वीकार करतांना त्यांच्या अुच्चारांत थोडा फरक करण्यासहि हरकत नाही. ३. परदेशी शब्दांस देशी शब्दांचें कल्पनासाहचर्य लाभत नाही हाहि आक्षेप टिकत नाही. शब्द मूळचे स्वीकारले जातात ते त्याच्या कल्पनासाहचर्यामुळे नसून त्यांच्या अंगच्या सोयीस्करपणामुळे होय; आणि शब्दांस प्राप्त झालेलें कल्पनासाहचर्य हें मूळचें नसून तें दीर्घ अुपयोगाने प्राप्त होतें. ४. कोणत्याहि भाषेच्या वाक्यतन्त्रावर जोपर्यंत परिणाम होत नाही तोपर्यंत त्या भाषेंत होणाऱ्या परकी शब्दांचा भरणा आक्षेपार्ह असूं नये. अिंग्रजी भाषेंत अफाट ब्रिटिश साम्राज्यातील अनेक भाषांतील शब्दांचा भरणा झाला आहे. ५. पाठ्य-पुस्तकांच्या लेखकांतील अनिर्बंध स्पर्धेमुळेच शेवटीं अिच्छित प्रकारची परिभाषा आपोआप ठरून जाअील हीहि कल्पना अिष्ट नाही. या अनिर्बंध (Laissez faire) धोरणामुळे पुष्कळसे श्रम वायां जातील, आणि मुख्य प्रश्नाची सोडवणूक लाबणीवर मात्र पडेल. ६. शास्त्रविषयांच्या शिक्षकांच्या नुसत्या तोंडी शिकवण्यावरहि प्रमाणभूत परिभाषा ठरविण्याचे काम अवलंबून ठेवितां येत नाही, कारण त्यामुळे विषयात भयंकर बजबजपुरी माजेल. ७. आपले विद्यार्थी युरोपीय विद्यापीठांत अुच्च अभ्यासासाठी व समन्वेषासाठी जावयाचे असतात, व त्यांना शास्त्रीय समित्यांचीं नियतकालिकें व अहवाल वाचावयाचे असतात. त्यासाठी अिंग्रजी परिभाषाच येथीलहि शिक्षणांत वापरणें अिष्ट होअील. शिवाय खेडेगावातील अगदी गरीब विद्यार्थ्यांसहि विद्यापीठीय शिक्षण घेणें सुलभ व्हावयाचें असल्यास खेडेगांवी व शहरी शिक्षणात भेद न ठेवतां खेडेगावी शिक्षणांतहि अिंग्रजी परिभाषेचा अुपयोग अिष्ट होअील. शिवाय पुष्कळसे अिंग्रजी पारिभाषिक व शास्त्रीय शब्द हे व्यापारांतील-कारखान्यांतील वगैरे कामकरी मंडळींच्या अुपयोगाने पूर्वीच स्वीकृत झाले असून त्यांना आता हाकून देतां येत नाही. सारांश, शास्त्र हें जागतिक आहे; व म्हणून शास्त्रीय परिभाषाहि कांही मर्यादेपर्यंत तशीच असावी.

२. हैदराबादच्या शिक्षणाधिकाऱ्यानी समितीस सादर केलेल्या पत्रकांत शास्त्रीय परिभाषेच्या प्रश्नाबद्दल निजाम सरकार व अुस्मानिया विद्यापीठ यांच्या धोरणाचा खुलासा केला आहे. अुस्मानिया विद्यापीठांत अुच्च पदवीपरीक्षेपर्यंतचे सर्व शास्त्रीय व साहित्यिक शिक्षण अुर्दू या देशी भाषेंतून द्यावयाचें असें धोरण आरंभापासूनच आहे हें मशहूर आहे. या शिक्षणकार्यासाठी अुपयुक्त अशी ग्रंथसंपत्ति निर्माण करण्यासाठी निजाम सरकारने कित्येक वर्षांपूर्वी 'ट्रान्स्लेशन ब्यूरो' नांवाचें खातें निर्माण करून व त्यावर लक्षावधि रुपये खर्च करून विपुल ग्रंथरचना करवून घेतली आहे. या ग्रंथरचनेच्या कामात साहजिकच अुस्मानिया विद्यापीठास शास्त्रीय

परिभाषेसंबंधाने आपलें धोरण ठरवावें लागलें. तें धोरण असें की (१) शास्त्रीय विषयांतील आंतरराष्ट्रीय नामकरणपद्धति[1] ही जशीच्या तशी स्वीकारावी व ती अिंग्रजी व अुर्दू या दोन्ही लिपींत लिहावी; (२) तसेंच आंतरराष्ट्रीय प्रतीकें आणि प्रतीकसूत्रें[2] हींहि जशींच्या तशीं स्वीकारावीं; आणि (३) बाकीच्या सर्व परिभाषेच्यां बाबतींत भाषांतरपद्धति स्वीकारून संज्ञांचें अुर्दूत भाषांतर, अिष्ट तर नवीन शब्द बनवून, करण्यांत यावें. अशा या त्रिवर्गीकृत शास्त्रीय परिभाषेंत—आणि परिभाषेचें हेंच वर्गीकरण शास्त्रीय आहे—तिसऱ्या प्रकारच्या पारिभाषिक शब्दांची (म्हणजे अुर्दूत भाषांतरित, अिंग्रजींतून जसेच्या तसे स्वीकारलेले नव्हत) संख्या सर्वात मोठी असणार; आणि देशी भाषेंतून शिक्षण द्यावयाचें तर हेंच धोरण युक्त आहे यांत शंका नाही. या कारणास्तव प्रो. सील यांचा अिंग्रजी परिभाषा दत्तक घेण्याचा सिद्धांत (की ज्याप्रमाणे शास्त्रीय परिभाषेपैकी सुमारें शेकडा ८० शब्द अिंग्रजी असणार तो) देशी भाषांतून शिक्षण देण्याच्या धोरणाचा खंबीर पुरस्कार करणाऱ्या निजाम सरकारच्या शिक्षणाधिकाऱ्यांस मान्य नाही. किंबहुना, प्रो. सील यांच्या सिद्धांताचा स्वीकार म्हणजे आजवर शिक्षणाचें वाहित्र म्हणून अिंग्रजी भाषेचा होत असलेला अयोग्य पुरस्कार पुढेहि तसाच चालू ठेवणें होय असेंच या शिक्षणाधिकाऱ्यांचें मत आहे. प्रो. सील यांनी सुचविलेल्या हिंदुस्थान सरकारच्या शैक्षणिक सल्लागारमंडळाने शास्त्रीय परिभाषाप्रश्नासंबंधांत नेमावयाच्या अखिल भारतीय मंडळाची कल्पना त्यांस पसंत असून या मंडळाने अुस्मानिया विद्यापीठांतील अनुभवानुसार पारिभाषिक वर्गीकरण, भाषांतर किंवा स्वीकार या संबंधी अुद्भवणाऱ्या प्रश्नांचा निर्णय देणें हें मंडळाचें कर्तव्य असावें असें त्यांचें मत आहे. मात्र, प्रो.सील यानी अुर्दू भाषेचा जो पर्शो-अरेबिक भाषांत अंतर्भाव केला तो त्यांस सर्वस्वीं मान्य नाहीं. अुर्दू भाषेंतील क्रियापदें व्रजभाषेंतून घेतलेलीं असल्याने अुर्दू ही अेक संमिश्र स्वरूपाची भाषा आहे; आणि म्हणून अितर कोणत्याहि भाषेपेक्षा सार्वभारतीय शास्त्रीय परिभाषेसाठी मूलभाषा म्हणून अुपयोजिली जाण्याचा तिचा अधिकार अधिक मोठा आहे; व याच दृष्टीने अुस्मानिया विद्यापीठांत तयार झालेली प्रस्तुतची अुर्दू शास्त्रीय परिभाषा ही सार्वभारतीय परिभाषा म्हणून चांगली अुपयोगी पडूं शकेल असें त्यांचें मत आहे.

३. मद्रास सरकारने सादर केलेल्या पत्रकांत मद्रासकडे परिभाषाविषयक झालेल्या मागील सरकारी प्रयत्नाचा निर्देश करण्यात येअून मद्रास सरकारनेच नवीन नेमलेल्या अेका समितीचा त्यास नुकताच सादर झालेला अहवालहि दिलेला आहे. अि.स. १९२३ सालीं मद्रास सरकारने आपल्या अिलाख्यांतील चार मुख्य भाषांत (कन्नड, तेलुगु, तामीळ व मल्याळम्) शास्त्रीय पारिभाषिक शब्दांच्या याद्या तयार करण्यासाठी अेक समिति नेमिली होती व तिने १९३१ सालीं हें काम संपविल्यानंतर या याद्या सरकारने छापल्या. परंतु त्यांस विद्वन्मान्यता न मिळाल्यामुळे सरकारनेहि त्यास शालेय अुपयोगासाठी विशेष अशी पसंती दर्शविली नाही. अलीकडे (१९३८-३९) मद्रास सरकारने दुय्यय शाळांतील शिक्षणात देशी भाषा हें वाहित्र म्हणून अुपयोजिण्याचें ठरविल्याने या प्रश्नास अधिक महत्त्व प्राप्त झालें आहे; आणि म्हणून जून १९४० मध्ये सरकारने अिलाख्यांतील प्रचलित देशी भाषांत, त्यांना सामान्य अशी प्रमाणभूत शास्त्रीय परिभाषापद्धति तयार करण्याबाबत, सामान्य तत्त्वे ठरविण्यासाठी ना. श्रीनिवासशास्त्री यांच्या अध्यक्षतेखाली अेक समिति नेमिली. याहि समितीपुढे अितर कागदपत्रांबरोबर (प्रो. परांजपे व प्रो. सोमयाजी याचीं पत्रकें) प्रो. सील यांचेहि पत्रक होतेंच. समितीने आपल्या अहवालांत प्रो. सील याच्या सार्वभारतीय शास्त्रीय परिभाषेच्या कल्पनेचें स्वागत

---

१. Nomenclature. २. Symbols and Formulæ. ३. Terminology.

केलें असून अशी सार्वभारतीय परिभाषा तयार झाल्यानंतर तिच्या अनुरोधाने प्रांतीय परिभाषा सुधारून घेतां येतील असा अभिप्राय व्यक्त केला आहे. समितीने दक्षिण हिंदुस्थानांतील भाषांत त्यांना सामान्य अशी प्रमाणभूत शास्त्रीय परिभाषापद्धति तयार करण्याबाबतचीं सामान्य तत्त्वें पुढीलप्रमाणे ठरविलीं आहेत :– (१) हल्ली खालच्या शिक्षणांत अुपयोगांत असलेले परदेशी शास्त्रीय पारिभाषिक शब्दांचे त्या त्या दक्षिणभारतीय भाषेंतील पर्यायशब्द हे रूढ झालेच आहेत व ते तसेच शिक्षणांत स्वीकारावेत. अितरहि (नैसर्गिक पदार्थ अगर घटना अित्यादिकांचीं नांवें वगैरे) दक्षिणभारतीय भाषेंतील रूढ शास्त्रीय शब्द तसेच स्वीकारावेत. या प्रकारच्या शब्दांचा समूह त्या त्या भाषेचा वेगवेगळा असेल. (२) साम्यदर्शक (Conceptual) किंवा गुणधर्मवाचक (Abstract) कल्पना व्यक्त करण्याकरिता किंवा त्या प्रकारचें नामकरण करण्यासाठी सर्व दक्षिणभारतीय भाषाना सामान्य अशी प्रमाणभूत परिभाषा तयार करणें जरूर आहे; आणि त्यासाठी द्राविडी भाषांकरिता संस्कृतचा व अुर्दूकरिता फारशी-अरबीचा आधार घ्यावा. या प्रकारच्या शब्दाचा समूह साहजीकच लहान असेल. (३) वरील दोन्ही प्रकारांत न बसणारी अितर परिभाषा अिंग्रजींतून अेनजिनसी घ्यावी व ती दक्षिणभारतीय लिप्यातून (जरूर तर पुढे कंसांत मूळ अिंग्रजी स्वरूपासह) लिहावी. (४) गणितादि शास्त्रीय पुस्तकांत अरबी अंक व अिंग्रजींत रूढ असलेलीं चिन्हें कायम ठेवावी. सरकारने विशिष्ट व सामान्य समित्या नेमून या तत्त्वानुसार परिभाषा तयार करवून घ्यावी व ती प्रस्तुत समितीने पसंत केल्यावर लेखक, प्रकाशक, शिक्षक व परीक्षक यानी तिचा अुपयोग करण्याबद्दल सरकारने सक्तीचा हुकूम काढावा. मात्र ठराविक काळानंतर योग्य अधिकाऱ्याकडून या परिभाषेची फेरतपासणी व सुधारणा होत राहील अशी तरतूद सरकारने करावी; म्हणजे शेवटी सर्वांना सामान्य व सर्वांना स्वीकार्य अशी परिभाषा तयार होअून तिच्या अुपयोजकांस प्रतिस्पर्धी परिभाषांचा मोह राहणार नाही.

४. पंडित अमरनाथ झा यानी 'हिंदी भाषातील शास्त्रीय परिभाषा' या आपल्या पत्रकांत शास्त्रीय परिभाषा तयार करण्याबाबत प्रातांप्रातांतून आजवर जे प्रयत्न झाले त्यांचा आढावा घेण्याचा प्रयत्न केला आहे. या आढाव्यात बडोदे सरकारने प्रो. टी. के. गजर यांच्या मार्फत अि. स. १८८८ सालापासून देशी भाषांत शास्त्रीय ग्रंथांची निर्मिति करविण्यासाठी केलेल्या आद्य प्रयत्नांचा सादर अुल्लेख प्रथमतःच केलेला आहे. हिंदींतील काशीची नागरी प्रचारिणी सभा, प्रयागची विज्ञानपरिषद्, व श्री. सुखसंपत्तिराय भंडारी यांचा अिंग्रजी-हिंदी कोश अित्यादिकाच्या प्रयत्नांचा अुल्लेख पंडित झा यानी केला आहे. बंगालींत वंगीय साहित्य परिषद् व कलकत्ता विद्यापीठ याचेहि प्रयत्न अुल्लेखनीय आहेत. मराठी आणि गुजराथी भाषांतील कार्याची माहिती त्याना नाही; परंतु बंगाली आणि हिंदी परिभाषांत बरेंच साम्य असून या परिभाषा मराठी व गुजराथी भाषकासहि सुलभ वाटतील अशी पंडितजींची अटकळ आहे. अुर्दूमधील अंजुमान अि-तरक्की-अि अुर्दू व अुस्मानिया विद्यापीठ यांच्या प्रयत्नांमुळे बरेंच कार्य झालें आहे. बिहार सरकारने नेमिलेल्या 'हिंदुस्थानी समिती'नेहि हिंदी व अुर्दू या दोन्ही भाषात अुपयोजितां येतील अशा शोधिलेल्या किंवा बनविलेल्या पारिभाषिक शब्दांच्या याद्या अलीकडे तयार केल्या आहेत. तसेंच 'आक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस' या प्रकाशक संस्थेनेहि अलीकडे (१९३९) प्रसिद्धिलेली 'पारिभाषिक शब्दांची यादी' ही (अिंग्लिश, अुर्दू, हिंदी व मराठी) कित्येक दृष्टींनी अुद्बोधक आहे. अुदाहरणार्थ, या यादींतील हिंदी व मराठी पारिभाषिक शब्दांची कलकत्ता विद्यापीठाच्या यादींतील शब्दाशीं तुलना केली असतां या तिन्ही

भाषांत कित्येक शब्द अभिन्न असल्याचें स्पष्ट होतें. किंबहुना, हिंदी, मराठी व बंगाली (आणि गुजराथीहि ?) भाषांत हजारों शब्द (संस्कृतोत्पन्न असल्याने) अभिन्नच असल्याचें दाखवितां येईल. (अर्थात्‌च या भाषास व त्याच्या भाषकांस अेकच परिभाषा अुपयोजितां येईल.) अुर्दूने अरबी व फारशी भाषांचा मूलाधार अुपयोजिल्यामुळे हिंदी, बंगाली, मराठी व गुजराथी प्रांतांत अुर्दू परिभाषा समजणार नाही असेंहि आपलें मत पंडितजींनी नमूद केले आहे. तसेंच, नागरी प्रचारिणी सभा, बिहार हिंदुस्थानी समिति, विज्ञान परिषद् व अंजुमान तरक्की-अि-अुर्दू या संस्थानी आपआपल्या परिभाषा तयार करतांना स्वीकारलेलीं मूलभूत तत्त्वेंहि पंडितजींनी माहितीकरिता आपल्या पत्रकात नमूद केलीं आहेत. परंतु विस्तारभयास्तव त्यांचा येथे जास्त अुल्लेख करता येत नाही. त्यांच्या पत्रकाच्या शेवटीं त्यानी काढलेला निष्कर्ष मात्र येथे मुद्दाम नमूद केला पाहिजे : संस्कृतोत्पन्न शास्त्रीय परिभाषा ही हिंदवासीयांपैकी अेका मोठ्या बहुसंख्य लोकसमूहास आकलनीय होणार असली, तरी त्याच्यापैकी दुसऱ्या अेका महत्त्वाच्या लोकसमूहास फारशी किंवा अरबीमूलोत्पन्न शब्द जास्त परिचित वाटतील; या वस्तुस्थितीकडे दुर्लक्ष्य करितां येत नाही. यांपैकी कोणत्याहि लोकसमूहास केवळ संस्कृतमूलोत्पन्न किंवा केवळ अरबी-फारशी-मूलोत्पन्न परिभाषा स्वीकारण्याची सक्ति करण्याचा प्रयत्न केल्यास कटु वाद अुत्पन्न होतील. बरें, संस्कृत किंवा अरबी-फारशी आधारावर सर्व शास्त्रांतील सर्व पारिभाषिक शब्द बनवितां येतील हें शक्य नाही; आणि नवीन बनविण्याचे शब्द केवळ संस्कृत किंवा केवळ अरबीमधूनच घेण्याची मर्यादा स्वीकारल्यास जातीय बेबनावहि अुत्पन्न होईल. शिवाय, हिंदुस्थानांत अिंग्रजी पारिभाषिक शब्द सांप्रत मूळचेच अुपयोगात व आकलनीय असून तेच पुढेहि तसेच अुच्चशास्त्राभ्यासकांस आकलनीय व अुपयुक्त राहतील. त्यांचाच (अिंग्रजी पारिभाषिक शब्दांचा) स्वीकार केल्याने त्याचे हिंदी पर्यायशब्द बनविण्यांत खर्च होणारी कार्यशक्ति व काल यांचा अपव्यय वांचेल; व हे (अिंग्रजी) पारिभाषिक शब्द प्रत्येक युरोपियन भाषेंत बहुतेक अेकच असल्याने त्यांच्या ज्ञानामुळे परदेशी शास्त्रीय ग्रंथ व नियतकालिकें हींहि सुगम होतील. या सर्व कारणांसाठी सर्व हिंदी भाषांतील सर्व शास्त्रीय लिखाणांत अिंग्रजी परिभाषेचा स्वीकार करणें अिष्ट आहे.

५. डॉ. अब्दुल हक यांनीहि आपल्या पत्रकांतील अेका परिच्छेदांत शास्त्रीय परिभाषा बनविण्यासंबंधांत अुर्दूत झालेल्या कार्याचें अैतिहासिक वृत्त दिलें आहे. या वृत्तांत अेकोणिसाव्या शतकांत बंडापूर्वीच्या काळांत दिल्ली कॉलेज या संस्थेने किती मोठें (सुमारे २०० पुस्तकें), विविध व अुपयुक्त कार्य केलें याचें व अलीकडे म्हणजे चालू शतकांत अुस्मानिया विद्यापीठ व अंजुमान-अि-तरक्की-अि-अुर्दू यांनी तेंच कार्य कसें जोमदार रीतीने चालू ठेविलें आहे याचें अुपयुक्त वर्णन आलें आहे. आणखी अेका परिच्छेदांत त्यांनी हिंदी परिभाषेच्या प्रश्नाबद्दल आपली सर्वसामान्य भूमिका सांगितली आहे. हिंदुस्थानांत शास्त्रीय परिभाषा ठरवावयाची ती अखिल भारतीय स्वरूपाची म्हणजे सर्व भाषांस सामान्य अशी ठरवावयाची झाल्यास ती मध्यवर्ति राजकीय सत्तेने— ब्रिटिश किंवा हिंदी— सत्तेने लादल्याशिवाय शक्य नाही. परंतु प्रस्तुत राजकीय घटनांचा प्रवाह पाहतां, ब्रिटिश सरकार आपल्या हिंदुस्थानांतील राजकीय सत्तेचें वितरण करीत आहे; आणि हिंदुस्थानांतील दोन मोठ्या जमातींपैकी कोणत्याहि अेका जमातीस आपली भाषा ही सर्वसामान्य हिंदी परिभाषेचा मूलाधार म्हणून दुसऱ्या जमातीवर लादतां येईल अेवढें राजकीय वर्चस्व अेकाच पक्षास देणारी हिंदी राज्यघटना केव्हाहि संस्थापित होणार नाही. तेव्हा अशा रीतीने कोणतीहि अखिल भारतीय स्वरूपाची सर्वसामान्य

परिभाषा ब्रिटिश किंवा हिंदी राजकीय सत्तेकडून लादली जाणें शक्य नसल्याने, प्रश्न असा अुपस्थित होतो की हिंदुस्थानांतील असंख्य भाषांची असंख्य परिभाषानिर्मिति नियंत्रित करण्याच्या दृष्टीने दुसरा पर्याय कोणता? या दृष्टीने पाहतां, शक्य तितक्या जास्त भाषांच्या प्रकृतीस जमणाऱ्या सामान्य परिभाषा बनविणें हें आपणांपुढील ध्येय होय; आणि त्यासाठी **हिंदी भाषांचे परस्परसाम्यदृष्ट्या कमींत कमी समूह** आपणांस बनविले पाहिजेत. असे समूह दोन होत:– (१) आर्य (यांतच अूर्दूचा समावेश होतो) व (२) द्राविड; आणि म्हणून हिंदुस्थानाला दोन परिभाषांची जरूरी आहे (आणि या दोन्हींतहि अेक सामान्य भाग म्हणून आंतरराष्ट्रीय परिभाषेचाहि अंतर्भाव होअीलच). पैकी आर्यभाषासमूहासाठी अूर्दूत झालेलें परिभाषीय कार्य आर्योत्पन्न भाषांस (बंगाली, मराठी, गुजराथी, सिंधी, पंजाबी अित्यादि) सामान्य अशा परिभाषेला मूलाधार सहज होअील. शेवटच्या परिच्छेदात हकसाहेबांनी आपला अेकंदर निष्कर्ष नमूद केला आहे. त्यांच्या मतें अूर्दू भाषेजवळ आजच अशी परिभाषा आहे की तिचा कोणत्याहि आर्यभाषेस सहज स्वीकार करतां येअील; आणि तो झाल्यास तीनचतुर्थांश हिंदुस्थानास सर्वसामान्य परिभाषा पुरविली असें होअील; आणि याच तत्त्वावर द्राविड प्रांतासाठीहि सर्वसामान्य परिभाषा बनवितां येअील. परिभाषेचा प्रश्न फक्त याच मार्गाने सोडवितां येअील. मात्र जर दुर्दैवाने हिंदी भाषेच्या पक्षपात्यांनी, आज अूर्दूत अुपलब्ध असलेल्या परिभाषेच्या संस्कृत पर्यायाचा आग्रह धरला तर हिंदुस्थानांत अेकंदर तीन परिभाषा होतील:– अूर्दू व संस्कृत या दोन परिभाषा अिंडोआर्यन् भाषाप्रदेशासाठी, व द्राविड ही द्राविड प्रांतासाठी. म्हणून प्रो. सील यांची अिंग्रजींतून विपुलपणें यथास्थित अुचललेल्या सर्वसामान्य अखिल भारतीय परिभाषेची कल्पना ही अिष्टहि नाही आणि शक्यहि नाही. कोणतेंहि सुधारलेलें व प्रगतिप्रिय राष्ट्र परकी परिभाषेचा[१] सर्रास भरणा आपल्या भाषेंत करीत नाही. अशा तऱ्हेचा भरणा केल्यास नेमळटपणा पसरेल, भाषा विद्रूप होअील व तिची प्रकृति दडपून जाअून तिचा आपलेपणा नाहीसा होअील. **युरोपांतील प्रत्येक देशाची स्वतःची शास्त्रीय परिभाषा**– तींत थोडा सार्वराष्ट्रीय भाग असला तरी– **वेगळी आहे**; आणि म्हणून अशी परिभाषा बनविण्याच्या निर्बुद्ध अुद्योगांत शक्तीचा अपव्यय करण्यापेक्षा अिंडो-आर्यन व द्राविड अशा दोन परिभाषा बनविणें हाच मार्ग समंजसपणाचा होअील.

६. डॉ. मुझफरुद्दीन कुरेशी यांनी आपल्या पत्रकांत अुस्मानिया विद्यापीठांत पूर्ण विचारान्तीं स्वीकारण्यांत आलेल्या परिभाषाव्यवस्थेचें स्वरूपदिग्दर्शन केलें आहे. शास्त्रीय परिभाषेचे दोन स्पष्ट विभाग पडतात: (१) सार्वराष्ट्रीय (यांत नामकरणपद्धति व चिन्हपद्धति यांचा अंतर्भाव होतो), आणि (२) राष्ट्रीय (यांत साम्यकल्पना, गुणधर्म, क्रिया, अुपकरणें, आकृति यांचा अंतर्भाव होतो). पैकी सार्वराष्ट्रीय परिभाषा ही अिंग्रजी स्वरूपांत (कांही अपवादांसह) स्वीकारण्यांत आली आहे; आणि राष्ट्रीय परिभाषेच्या संबंधांत मात्र (अिंग्रजी शब्दांस) आधीच अुपलब्ध असलेल्या अुर्दू पर्यायांचा स्वीकार करून बाकीच्या ठिकाणीं नवीन अुर्दू शब्द बनविले आहेत. प्रो. सील यांची अिंग्रजी शब्दांच्या आयत्या स्वीकाराची सूचना मान्य केल्यास सुमारें ५००० परदेशी शब्द त्यांच्या साधितांसह स्वीकारावे लागतील; आणि ते पचविणें हें कोणत्याहि देशी भाषेच्या आवाक्याबाहेरचें आहे. युरोपियन भाषांतहि ही परिभाषा सर्वसामान्य आहे असें नाही. हिंदुस्थानांतील अितर भाषांनी अुर्दूप्रमाणे अुपर्युक्त मार्ग स्वीकारल्यास 'सार्वराष्ट्रीय' परिभाषा ही देशांतील सर्व भाषांस सामान्य होअील. 'राष्ट्रीय' परिभाषेच्या विभागांत

१. Demoralising effect.

मात्र, हिंदुस्थानासाठी अेकच अेक राष्ट्रीय भाषा असल्याशिवाय अैक्य साध्य होणार नाही. परंतु डॉ. हक यांनी सुचविल्याप्रमाणे, हिंदुस्थानांतील भाषा आर्यन व द्राविडी अशा दोन भाषासमूहांत विभागून व त्यांपैकी प्रत्येक विभागापुरती सामान्य राष्ट्रीय परिभाषा बनवून, **भाषिक भेद कमी करतां येतील.** अुस्मानिया विद्यापीठातील राष्ट्रीय परिभाषाविभाग अशा तऱ्हेने बनविण्यांत आला आहे की त्यात अुर्दू भाषेच्या प्रकृतीला अनुसरून पर्सो-अरेबिक व संस्कृत या दोन्ही मूळभाषातून शब्द घेतले आहेत. या कारणाने ही परिभाषा आर्यभाषांसाठी सामान्य परिभाषा म्हणून अुपयोगी पडेल.

**सरकारी शा. प. स.**

हिंदुस्थान सरकारच्या मध्यवर्ति शैक्षणिक सल्लागारमंडळाने नेमलेल्या शास्त्रीय परिभाषासमितीपुढे परिभाषाविषयासंबंधाने जे कागदपत्र ठेवण्यांत आले त्यांचें स्थूल स्वरूप वरीलप्रमाणे आहे. या कागदपत्रांतून निष्पन्न होणारे खालील चारपांच मुद्दे सरकारी शास्त्रीय-परिभाषा-समितीच्या विचारासाठी व निर्णयासाठी विषयसूचिकारूपाने पुढे ठेवण्यांत आले:— (१) सबंध हिंदुस्थानासाठी सर्वसामान्य शास्त्रीय परिभाषा ठरवावी किंवा कसें; व ती ठरवावयाची तर तिचा मुख्य भाग पुष्कळसा अिंग्रजी परिभाषेतून आयताच दत्तक घ्यावा किंवा कसें; (२) प्रत्येक हिंदी भाषेस (अ) अिंग्रजी (म्हणजे सार्वभारतीय), (ब) विशिष्टभाषीय, व (क) संस्कृत किंवा पर्सो-अरेबिक अशी त्रिविभागात्मक शास्त्रीय परिभाषा असावी किंवा कसें; (३) शास्त्रें विविध आहेत तर त्या सर्वांचाच प्रमाणभूत परिभाषा ठरविण्याच्या प्रश्नांत अेकदम अन्तर्भाव करावा किंवा नाही; (४) मध्यवर्ति शैक्षणिक सल्लागारमंडळाने अेक कायमचें विचारणामंडळ (Board of Reference), की ज्याची मतें सर्व शैक्षणिक अधिकारी व संस्था यांनी स्वीकारावींत असें, नेमावें किंवा काय; व (५) सभेत अुपस्थित होणारे अितर प्रश्न.

वर दिलेल्या कागदपत्राचा व अुपक्रमणिकेचा विचार करून शास्त्रीय परिभाषासमितीने आपला अहवाल व शिफारशी केल्या आहेत. प्रथमतः समितीने परिभाषेच्या प्रश्नाचा विचार करावयाचा तो शिक्षणाच्या सर्वच— म्हणजे प्राथमिक, दुय्यम व अुच्च— अवस्थांना अनुलक्षून करावयाचे ठरविलें; आणि कोणत्याहि **विशिष्ट** शास्त्रास अनुलक्षून या प्रश्नाचा विचार करणें कठीण असल्याने समितीने त्या प्रश्नाच्या सर्वसामान्य स्वरूपाचाच विचार करण्याचें निश्चित केलें. या धोरणाप्रमाणे समितीने पुढीलप्रमाणे शिफारशी केल्या:—

(१) अखिल भारतीय परिभाषेच्या प्रश्नासंबंधात अडचणी असल्या तरीहि, **अखिल** हिंदुस्थानाच्या दृष्टीनेच त्याबाबत सामान्य असा जो मार्ग काढावयाचा तो काढावा. या बाबतींत प्रमुख प्रांतिक भाषांच्या दृष्टीने पूर्वी झालेलें व प्रस्तुत होणारें कार्यहि विचारात घ्यावें. स्वीकारावयाचे पारिभाषिक शब्द शक्य तितके काटेकोर (अव्यभिचरित) (Precise) व सोपे असावे, म्हणजे ते शैक्षणिक लोकांना आणि अितरेजनानाहि सहज समजतील.

**(२) आजच बरेचसे अिंग्रजी पारिभाषिक व शास्त्रीय शब्द अखिल हिंदुस्थानांतील पुष्कळशा लोकांना परिचित असल्याने, व विशेषतः, शास्त्राभ्यासाच्या अुच्चतर अवस्थेतील सार्वराष्ट्रीय शास्त्रीय परिभाषास्वीकाराच्या जागतिक प्रवृत्तीमुळे, समितीने असें मत बनवलें की (अ) जेथे अिंग्रजी स्वरूपांतील सार्वराष्ट्रीय पारिभाषिक शब्द हिंदुस्थानांत आधीच सर्वसाधारण अुपयोगांत आहेत तेथे ते कायम ठेवावेत; आणि अितर बाबतींतहि अशा शब्दाचें (म्हणजे अिंग्रजी स्वरूपांतील सार्वराष्ट्रीय शब्दांचे) हिंदी पर्यायशब्द बनविण्यापूर्वी तेच मूळ शब्द हिंदुस्थानांतील**

अुपयोगासाठीहि शक्यतो स्वीकारण्याच्या प्रश्नाचा प्रथम विचार करावा. हिंदी शास्त्रीय परिभाषेचा हा पहिला म्हणजे सार्वराष्ट्रीय विभाग होय. (ब) या सार्वराष्ट्रीय परिभाषेस, विशेषतः शिक्षणाच्या आधीच्या अवस्थांतून, देशाच्या सर्व भागात स्वीकारणीय अशा खास हिंदी शब्दांची पुरवणी जोडली पाहिजे; आणि हिंदुस्थानी (अुत्तरहिंदुस्थानातील) व द्राविडी (दक्षिणहिंदुस्थानातील) अशा दोन स्थूल भाषासमूहांसाठी सामान्य परिभाषा बनविणें हें शक्य व अिष्ट होअील. आधीच अुपयोगांत असलेले अथवा नवीन बनविलेले परंतु सोपेसे शब्द त्या त्या भाषासमूहांत सहज समजतील. महित[1] भाषांवर आधारलेल्या जाड्या किंवा पंडिती शब्दास अुत्तेजन देअूं नये. हिंदी शास्त्रीय परिभाषेचा हा दुसरा म्हणजे खास भारतीय विभाग होय. (क) हिंदी शास्त्रीय परिभाषेच्या तिसऱ्या म्हणजे प्रांतीय किंवा केवळ स्थानिक विभागांत प्रांतिक-भाषाविशिष्ट व सामान्य जनाच्या अुपयोगांतील शब्दांचा अंतर्भाव होअील. शिक्षणाच्या खालच्या अवस्थांतून सुगमतेच्या दृष्टीने अशा शब्दांची आवश्यकता स्पष्ट आहे. अर्थात् शिक्षणाच्या पुढील अवस्थांत या विभागांतील शब्दांअैवजी भारतीय किंवा सार्वराष्ट्रीय विभागातील शब्द अुपयोजिले जातील.

(३ व ४) अर्थात् परिभाषेसारख्या बाबतींत निश्चलपणा शक्यहि नाही व अिष्टहि नाही. देशांतील अनुभव व देशाबाहेरची शास्त्रीय प्रगति हीं लक्षांत घेअून परिभाषा सुधारावी लागेल. तसेंच शिक्षणाच्या आधीच्या अवस्थात वेगवेगळ्या प्रांतांतील शास्त्रीय परिभाषेंत (त्याच्या प्रांतिक व स्थानिक विभागांमध्ये) महत्त्वाचे भेदहि असणार. तेव्हा अशा बाबतींतील शेवटचा निर्णय स्थानिक स्वरूपाचा व प्रांतीय किंवा संस्थानी सरकारच्या कक्षेतील असणार. तथापि त्याबद्दलचा सर्वसामान्य विचार करण्याकरिता म्हणून अेक मध्यवर्ति विचारणामंडळ (Central Board of Reference) नेमावें. तसेंच हिंदुस्थानी व द्राविडी या प्रमुख देशी भाषासमूहांसाठी आपापल्या विशिष्ट पारिभाषिक प्रश्नांबद्दल विचार करण्याकरता म्हणून अेक अेक विशेष विचारणामंडळ नेमावें. अशीं अेकंदर तीन मंडळें असणें जरूर आहे. या मंडळांची घटना– त्यांत शास्त्रीय किंवा भाषिक तज्ज्ञच असले पाहिजेत असें नाही, परंतु अशा प्रकारचे तज्ज्ञ सभासद स्वीकृत करण्याचा किंवा जरूरीप्रमाणे तज्ज्ञांच्या अुपसमित्या नेमण्याचा अधिकार त्यांस असावा– प्रांतीय सरकाराच्या सल्ल्याने मध्यवर्ति सरकारने ठरवावी व त्यांचे मार्गदर्शन व निर्णय प्रांतिक सरकारें व अितर समित्या यांनी मान्य करावे.

(५) सर्व शास्त्रविषयांत सार्वराष्ट्रीय चिन्हें व आकृति यांचा अवश्य स्वीकार करावा. तसेंच घोटाळा टाळण्यासाठी गणितांतील विधानें आणि प्रश्न अुर्दूसारख्या भाषेंतूनसुद्धा डावीकडून अुजवीकडे लिहावे.

(६) सरकारच्या जबाबदार अधिकाऱ्यांनी या समितीच्या शिफारशींना धरून पाठ्यपुस्तकें लिहवावयाचा अुपक्रम करावा व अशी संमत परिभाषा वापरणारीं पुस्तकेंच मंजूर केलीं जाण्याची व्यवस्था करावी.

सरकारी शास्त्रीय परिभाषासमितीच्या शिफारशींचे स्वरूप हें असें आहे. (पं. अमरनाथ झा यांनी आपली अेक अत्यंत संक्षिप्त पण महत्त्वाची भिन्नमतपत्रिका लिहिली असून तींत समितीच्या अहवालांत हिंदी भाषांचें जें हिंदुस्थानी व द्राविडी असे वर्गीकरण केले आहे त्यास आक्षेप घेअून या भाषाचे त्यांनी स्वतः संस्कृत, पर्शो-अरेबिक, व द्राविड असे तीन वर्ग सुचविले आहेत.)

---

[1]. जुन्या अभिजात classical.

**सरकारी म. शै. स. मं.**

अशा तऱ्हेचा हा समितीचा अहवाल व शिफारशी समितीच्या अध्यक्षांनी मद्रासेस जानेवारी १९४१ मध्ये मध्यवर्ति शैक्षणिक सल्लागार मंडळास सादर केल्या. त्या वेळीं मंडळाने फक्त खाली दिलेला थोडासा फरक करून अेकंदर समितीच्या शिफारशी मान्य केल्या.

फरक असे :—

(१) समितीची शिफारस २ (ब) गाळावी. कारण शिफारस २ (क) याखालीहि लोक-परंपरा व प्रवृत्ति यांस धरून बनविलेल्या किंवा बनलेल्या नवीन शब्दांचा स्वीकार अशक्य नसल्याने हिंदी भाषांच्या या बाबतींतील योग्य त्या आकांक्षा त्याच शिफारशीने [२ (क)ने] पूर्ण होण्यासारख्या आहेत; आणि म्हणून शिफारस २ (ब) हिचा त्याग करून नसता घोटाळा टाळावा.

(२) हिंदी भाषांचे जे दोन समूह करावयाचे ते समितीने सुचविल्याप्रमाणे हिंदुस्थानी व द्राविडी असें न करता तेच संस्कृत व पर्सो-अेरेबिक असे करावे.

(३) समितीने शिफारस ५ मध्ये "गणितांतील विधानें आणि प्रश्न" असें म्हटलें आहे त्याच्या अैवजी गणितात्मक क्रिया आणि सूत्रें (processes and formulae) असें घालावें.

**परामर्श.**

या लेखाचा प्रमुख अुद्देश 'शास्त्रीय परिभाषा समिती'च्या अहवालाचा व त्यावरील मध्यवर्ति शैक्षणिक सल्लागार मंडळाच्या निर्णयाचा आपल्या मराठी वाचकांस परिचय करून देण्याचा असल्याने व परिचयहि बराच लांबल्याने या अहवालाचें विस्तृत परीक्षण या लेखांत करतां येणार नाही. परंतु या अहवालासंबंधी व त्यांतील विषयासंबंधी महत्त्वाच्या मूलभूत तत्त्वां-बाबत कांही विचार अत्यंत संक्षिप्तपणें वाचकांपुढे मांडून हा लेख आता आटोपता घेतों.

प्रस्तुतचा अहवाल वाचून प्रथमच जर अेक कोणता विचार मनांत येत असेल तर तो हा की शास्त्रीय परिभाषेसारख्या देशी भाषांच्या विकासावर हमखास परिणाम करणाऱ्या महत्त्वा-च्या प्रश्नाचा विचार करतांना सरकारने त्यासंबंधी **अभिजात लोकमत** काय आहे हें अजमा-वण्याचा पद्धतशीर प्रयत्न केलेला नाही. समिति नेमिली ती हिंदुस्थान सरकारच्या शैक्षणिक सल्लागारमंडळाने. तेव्हा ती नेमतांना तींत लोकमताचे प्रतिनिधि व भाषिक व शैक्षणिक तज्ज्ञ यांचा **योग्य** तो समावेश व्हावयास पाहिजे होता. समितींतील सभासदांची यादी पाहिल्यास ही अपेक्षा पुरी झालेली नाही असें स्पष्ट दिसतें. किंबहुना अध्यक्ष सर अकबर हैदरी यांनी समितींत नवीन सभासद स्वीकृत करून घेतांनाहि समितीस लोकमताच्या दृष्टीने प्राति-निधिकत्व प्राप्त करून देण्याचा प्रयत्न केला नाही असेंहि म्हणावें लागतें. समितींत सरकारी अधिकारी व अुर्दू भाषेच्या पूर्वाभिमानाने निश्चित मत असलेल्या मंडळींचाच प्रामुख्याने समावेश करण्यांत आलेला दिसतो. यामुळे या समितीस प्रातिनिधिकत्वाच्या गुणाचा लाभ झालेला नाही यांत संशय नाही.

बरें, या दोषी घटनेच्या समितीने तरी अेकदा आपणांस सरकारने नेमल्यावर आपल्या विचारविषयक प्रश्नासंबंधी लोकमताचा अंदाज घेण्याचा पद्धतशीर व कसून प्रयत्न करावा हें अिष्ट होअील. परंतु तेंहि समितीने केलेलें नाही. समितीने केवळ मद्रास सरकारकडून व विशेषतः अुर्दू भाषा व साहित्य यांचें कार्य करणाऱ्या संस्थांच्या प्रतिनिधींकडून (यांपैकी दोन मंडळी तर

समितीचेच समासद आहेत) शास्त्रीय परिभाषाप्रश्नाबाबत त्यांनी केलेल्या कार्याबद्दलचीं पत्रकें मिळविलीं आहेत. समितींतील फक्त अेका समासदाने (पं. झा) या प्रश्नाबाबत मुद्दाम आपणहून चौकशी करून बरीच माहिती मिळविली आहे व ती ग्रथित करणारें पत्रक समितीस सादर केलें आहे. प्रस्तुत समितीने अितर देशी भाषा व तत्साहित्य याच्या अुत्कर्षासाठी खटपट करणाऱ्या संस्था व पंडित, शास्त्रीय विषयांचे अध्यापक, शिक्षणतज्ज्ञ,हिंदी सांस्कृतिक जीवनांतील नेते, अित्यादि **बिनसरकारी मंडळींचें**, त्यांना साक्षीला बोलावून अथवा अितर मार्गांनी, फारसें कोणचेंहि **सहकार्य** मिळविलेलें नाही. ही या समितीच्या कार्यपद्धतींत मोठीच अुणीव राहिली आहे यांत शंका नाही. असें अुघड दिसतें की या समितीच्या विचारणेस लोकमताचा संपर्क असा तादृश घडला नाहीच. मग सल्लागारमंडळाने समितीची नेमणूक करतांना व तीस विशिष्ट अधिकार देतांना मुद्दाम हेतुपूर्वक तो संपर्क समितीस होअू नये अशीच योजना केली की काय नकळे.

परंतु या सर्व अहवालावरून प्राथमिक व मूलभूत चूक झालेली दिसते ती मुंबअी सरकारची. मुंबअीस खेर सरकार अधिकारांत असतांना, त्यानी देशी भाषांसाठी सामान्य शास्त्रीय परिभाषेसंबंधांत अेक पत्रक तयार करण्यास प्रो. सील (डेप्युटी डायरेक्टर ऑफ पब्लिक अिन्स्ट्रक्शन) यांस सांगितलें. हें काम प्रो. सील यांस सांगताना सरकारने तें नक्की कोणत्या स्वरूपांत त्यांस सांगितलें व त्यांच्या नक्की कार्यमर्यादा (Terms of Reference) सरकारने काय घालून दिल्या होत्या हें समजण्यास मार्ग नाही. परंतु प्रो. सील यांनी मात्र जें पत्रक तयार केलें आहे त्यांतील प्रमुख शिफारस म्हणजे हिंदी शास्त्रीय परिभाषा ही बहुतांशीं अिंग्रजींतून आयतीच घेतली जावी ही पाहतां व ती प्रतिपादणारें पत्रक मुंबअी सरकारने खुद्द त्या शिफारशीविषयी कांहीहि मत प्रदर्शित न करतां मध्यवर्ति शैक्षणिक सल्लागारमंडळाकडे पाठविलें, या गोष्टीवरून ती शिफारस मुंबअी सरकारास मान्य आहे, किंबहुना तींतील तत्त्व सरकारनेच प्रथमतः आपणहून प्रो. सील यांस सुचवून तें प्रतिपादन करण्यासाठीच तुमचें पत्रक तयार करा असें मुंबअी सरकारने प्रो. सील यांस सांगितलें असावें अशी शंका येअू लागते. असें असेल तर मुंबअीच्या माजी कॉंग्रेस सरकारची देशी भाषांच्या विकासाच्या प्रश्नाबद्दलची भूमिका अत्यंत आक्षेपार्ह होती असें म्हटलें पाहिजे. बरें, प्रो. सील यानी सरकारने कांहीहि न सांगतां केवळ आपल्याच वैयक्तिक मताने तें पत्रक तयार केलें असें म्हणावें तर आपलीं वैयक्तिक व अेकांगी मतें अुच व जबाबदार सरकारी अधिकारी म्हणून पुढे मांडण्यांत प्रो. सील यांची अदूरदृष्टि दिसून येते असें म्हटलें पाहिजे; व तें अत्यंत अैकांतिक मताचें पत्रक, त्यांतील मुख्य अनिष्ट शिफारशींसंबंधी कांहीहि आक्षेप न घेतां, पुढे पाठविण्यांत मुंबअी सरकारचीहि चूकच झाली असेंहि म्हणणें प्राप्त आहे. किंबहुना, समितीच्या सबंध अहवालाचें निरीक्षण केलें असतां प्रो. सील याच्या पत्रकांतील ही प्राथमिक अेकांगी शिफारस व तीसंबंधाचें मुंबअी सरकारचें मौन यामुळे समितीच्या शास्त्रीय परिभाषेबाबतच्या पुढील सर्वच विचारास अनिष्ट वळण दिलें गेलें असें म्हणण्यास हरकत नाही. समितीच्या शिफारशींत प्रो. सील याच्याच शिफारशीभोवतीं समितीचे सर्व विचार घोंगावत राहिल्याचें स्पष्ट दिसतें.

यानंतर समितीच्या खुद्द विचारविषयासंबंधांतील जे प्रमुख दोन तीन मुद्दे आहेत त्यासबंधीच्या माझ्या स्वतःच्या दृष्टिकोणाचें थोडेंसें दिग्दर्शन करितों.

अखिल हिंदुस्थानासाठी अेकच शास्त्रीय परिभाषा ठरवावी कीं नाही असा अेक प्रमुख मुद्दा समितीपुढे विचारासाठी होता.. याबाबत असा अेक विचार कांही मंडळीमध्ये सांपडतो की अेकच शास्त्रीय परिभाषा ठरविण्याचा प्रश्नहि काढू नये. हिंदुस्थानांत प्रचलित भाषा अनेक.

त्यांच्या मातृभाषाहि (source or root languages) अनेक. तेव्हा त्यांना सामान्य अशी परिभाषा कशी ठरणार ? तेव्हा देशी भाषांना आपापल्या परंपरेप्रमाणे व प्रवृत्तिप्रमाणे स्वतंत्र वाढूं द्यावें; त्यांत मुद्दाम कोणीं— खासगी संस्थांनी अगर सरकारने— हात घालूं नये. परंतु मला असें वाटत नाही. हिंदुस्थानचे भौलोलिक, अैतिहासिक व सांस्कृतिक अैक्य (Unity) ही खरी गोष्ट आहे अशी या भडकलेल्या विचाराच्या दिवसांतहि मी खात्री बाळगून आहें. हें अैक्य आजवरच्या काळांत अनेक कारणांनी, राजकीय विसंवादांचाहि त्यावर फारसा परिणाम न होतां, टिकूं शकलें. या कारणांचा येथे विस्तृत विचार करावयाचा नाही. परंतु या कारणांपैकी अेक महत्त्वाचें कारण म्हणजे हिंदुस्थानांतील बहुजनसमाजास पूज्य व जीवनास आवश्यक वाटणाऱ्या व अनेक भाषांतील ग्रंथांची व बहुजनसमाजाच्या बोलींची परिभाषा ही अेकाच किंवा सजातीय मातृभाषेच्या (source language) प्रपंचाने सिद्ध झाली होती हें होय. गज्जल म्हणणारा फकीर व दोहे म्हणणारा बैरागी हे याच भूमिकेवरून परस्परांच्या संगतींत रमत असत. परंतु अिंग्रजी राज्यामुळे आमचा जो पाश्चात्य शास्त्र वाङ्मयाशीं संबंध आला त्यामुळे आमच्या विचाराची दिशा व विषय झपाट्याने बदलले; आणि या नवीन दिशेच्या व विषयांच्या विचारांनी जर हिंदी भाषा समृद्ध करावयाच्या तर त्यासाठी त्यांनी म्हणजे त्या भाषांनी आपली स्वतःची वेगळी नवीन परिभाषा तरी बनविली पाहिजे. किंवा अिंग्रजींतील परिभाषा तरी सर्रास स्वीकारली पाहिजे असा प्रश्न अुपस्थित झाला आहे. या वेळीं हिंदभूमीच्या हितेच्छूंनी हिंदुस्थानचें जुनें सांस्कृतिक अैक्य टिकविण्याच्या दृष्टीने तिच्या अनेक भाषांतील महत्त्वाच्या परिभाषेचें अैक्य टिकविण्याचा मुद्दाम प्रयत्न केला पाहिजे. अशी परिस्थिति अुत्पन्न झाली आहे. हें अैक्य पूर्वी आपोआप, निदान दीर्घप्रयत्नांशिवाय टिकत होतें. प्रस्तुत काळीं भेदप्रवृत्ति चहूंकडे अुचंबळून आणविण्यांत येत असल्याने ते अैक्य टिकविण्याचा हेतुपुरःसर व चिकाटीचा प्रयत्न होणें जरूर आहे; आणि हा प्रयत्न करावयाचा तर हिंदी संस्कृतीचीं जीं प्रमुख अंगें आहेत त्यांचें अैक्य, साम्य, सजातीयत्व टिकविणें हें साहजिकच अत्यंत आवश्यक आहे. भाषा ही अेक महत्त्वाचें सांस्कृतिक अंग आहे. तेव्हा हिंदीभाषांतील महत्त्वाच्या परिभाषेचें अैक्य, निदान सजातीयत्व, टिकविणें हा या प्रयत्नाचाच अेक महत्त्वाचा भाग होय. म्हणून अखिल हिंदुस्थानासाठी अेकच शास्त्रीय परिभाषा असावी. हें नच जमलें तर निदान जितक्या सजातीय प्रचलित भाषांसाठी अेकच सामान्य परिभाषा बनविता येअील तितके बरेंच होअील; आणि ज्या भाषांना ही परिभाषा मानवणार नाही असें वाटेल त्याना वेगळी परिभाषा बनविण्यास सजातीय गटाने स्वातंत्र्य द्यावें.

मग ही सामान्य परिभाषा कोणती ? ती बहुतांशीं अिंग्रजींतून आयतीच दत्तक घेतलेली असावी काय हाहि अेक समितीपुढे महत्त्वाचा मुद्दा होता. याला माझें अुत्तर नकारात्मक आहे. आजवर हिंदी भाषांचें महत्त्वाच्या परिभाषेबाबतचें अैक्य प्राचीन अभिजात महित[1] भाषेचा प्रपंच विस्तारूनच टिकविलेलें आहे; व अलीकडील काळांतील नवीन दिशेच्या व विषयांच्या विचारांची अभिव्यक्ति करण्याकरिता जी नवीन पण सामान्य परिभाषा हिंदी भाषांनी बनवावयाची तीहि प्राचीन अभिजात हिंदी महित भाषेच्या प्रपंचविस्तारानेच बनविली पाहिजे. कारण या योगानेच हिंदी भाषाच्या विकासाचें अैतिहासिक सातत्य टिकेल व त्यांची नैसर्गिक वाढ होअून ती वाढ बहुजनसमाजासहि अुपयुक्त ठरेल. निदानपक्षीं, प्राचीन अभिजात महित भाषेपासून जीवनरस घेअून अुत्पन्न केलेली नवीन शास्त्रीय परिभाषा बनविणें

१. Classical.

शक्य नाही असें ठरेपर्यंत तरी, दुसऱ्या मार्गाचा अवलंब करणें घातक ठरणार आहे यांत शंका नाही.

आतां कोणी म्हणतील कीं शास्त्रीय विचार प्रदर्शित करण्यासाठी पाहिजे तर देशी-भाषोत्पन्न परिभाषा अुपयोगी पडेल; परंतु अुच व **सार्वराष्ट्रीय** शास्त्रीय **समन्वेषाचें** काय? मानवी ज्ञानांत हिंदुस्थानने भर घालण्याच्या पवित्र व जागतिक कामांत तरी देशी परिभाषेच्या अभिमानाचा अडथळा न येअूं देतां अिंग्रजी शास्त्रीय परिभाषा स्वीकारणेंच परिणामीं हितकर ठरणार आहे, अशा तऱ्हेचा विचारहि कधी कधी पुढे मांडण्यांत येतो. हाहि विचार मला सर्वस्वीं मान्य नाही. संशोधन व समन्वेष याचें जागतिक महत्त्व मला मान्य आहे; व त्यांतहि हिंदुस्थानने चमकलें पाहिजे अशी माझी आकांक्षा आहे. परंतु केव्हाहि अत्यंत अल्पसंख्य असलेल्या समन्वेषकांच्या सोयीसाठी बहुजनसमाजाच्या शिक्षणांत अिंग्रजी परिभाषा वापरावी हें केव्हाच युक्त ठरणार नाही. प्राथमिक शिक्षणापासून तों विद्यापीठांतील प्रथम पदवीपर्यंतचें शिक्षण हें **सर्वस्वीं देशी भाषेतून** झालें पाहिजे, कारण तेथपर्यंतच्या शिक्षणाचें ध्येय समन्वेषक तयार करण्याचें नसून सुबुद्ध नागरिक तयार करण्याचें आहे. आमच्या पदवीधरानीं अुच्च शास्त्रीय व साहित्यिक विषयांचा अभ्यास करून नागरिक व ग्रामीण जीवनाचें नेतृत्व पत्करलें पाहिजे अशी आमची त्यांबद्दलची अपेक्षा असते. अर्थात् या नेत्यांना आपले अर्वाचीन, किंबहुना अद्ययावत शास्त्रीय व साहित्यिक वाङ्मयावरून निष्पन्न होणारे जीवनात्मक विचार आपल्या बांधवास—बहुजनसमाजास— देशी भाषांतून सांगता येतील अशा प्रकारचें शिक्षण आम्ही त्यांस देण्यास हवें; आणि ही विचारसरणी जर बरोबर असेल तर, प्रथमपदवीपर्यंतचें सर्व शिक्षण देशी भाषेंतून व देशी प्राचीन महितभाषोत्पन्न परिभाषेंतूनच देण्याची व्यवस्था आम्ही केली पाहिजे; हें शैक्षणिक धोरण तीपासूनच साहजिक निष्पन्न होतें. आमच्या बहुजन समाजाचें यशस्वी नेतृत्व या धोरणावर अवलंबून आहे; व म्हणून या धोरणाच्या निश्चयाबद्दल आम्ही जागरूक राहिलें पाहिजे.

मग समन्वेषकाच्या शिक्षणाचें काय असा प्रश्न शिल्लक राहतोच. हा शिष्यवर्ग अर्थात् अल्पसंख्य असणार हें पूर्वी सांगितलेंच आहे. परंतु त्यांच्या शिक्षणाचीहि अुत्तम बूज राखली पाहिजे असें माझें मत आहे. अिष्ट व आवश्यक तर त्याच्या शिक्षणाची वेगळी व्यवस्था करावी व त्याकरिता योग्य ती व्यवस्था करण्यासाठी जादा खर्च करण्याचें धोरण शिक्षण-संस्थानी ठरवावें. परंतु असें त्यांचें वेगळें शिक्षण शक्य न झालें तरी त्यांची समन्वेषिक लायकी त्याच्या अितरांबरोबरच्या सामान्य शिक्षणातहि वाढविण्याची खटपट करिता येअील. अिंग्रजी भाषा हा आवश्यक अभ्यासविषय म्हणून आज विद्यापीठात आहेच व पुढेहि राहावा. तेव्हा अुच्च दर्जाच्या समन्वेषिक शिष्यांस देशी परिभाषेबरोबरच तिचा अिंग्रजी पर्याय शिकविणें हें त्यांजवर फारसें जादा ओझें होअील असें वाटत नाही. अुलट, या अल्पसंख्य समन्वेषिक विद्यार्थ्यांच्या सोयीसाठी बहुसंख्य अितर विद्यार्थ्यांवर अिंग्रजी परिभाषा लादल्यास त्यांची मात्र बहुजन-समाजाचें नेतृत्व करण्याची लायकी मुळीच सुधारणार नाही.

समितीच्या शिफारशींतील सर्वांत महत्त्वाची व परिणामीं अनिष्ट अशी जी शिफारस की हिंदी शास्त्रीय परिभाषा ही बहुतांशीं अिंग्रजींतून अवतारिलेली असावी, तिजबद्दल मीं माझें प्रति-कूल मत सांगून स्वतःचें मत म्हणून असें प्रतिपादिलें की ही नवीन हिंदी शास्त्रीय परिभाषा बहुतांशीं देशी महित (प्राचीन अभिजात) भाषेवर आधारलेली असावी; व अशी अेकच हिंदी परिभाषा बनविणें शक्य नसलें, तर निदान प्रचलित भाषांचें सजातीयतेप्रमाणे कमींत कमी गट करून

त्यांसाठी बनवावयाच्या परिभाषा शक्य तितक्या कमी ठरवाव्या. त्या किती व कोणत्या या व अितर प्रश्नांत मी विस्तारभयास्तव तूर्त पडत नाही. परंतु समितीने आपल्या शिफारशींत प्रचलित भाषांचे हिंदुस्थानी व द्राविडी असे दोनच गट करून म्हणजे साहजिकच हिंदुस्थानी-मध्ये मराठी व अितर सर्व अुत्तरहिंदुस्थानांतील संस्कृतोद्भव भाषांचा अंतर्भाव करून, या भाषांवर जें संकट आणलें होतें तें पंडित अमरनाथ झा यांनी आपल्या अेकट्याच्या भिन्न-मतपत्रिकेने प्रतिकारिलें व सल्लागारमंडळानेहि आपल्या निर्णयांत या भाषांस स्वतंत्र स्थान दिलें याबद्दल माझें समाधान मी येथे नमूद करितों.

शेवटीं समितीच्या शिफारशींत सरकारच्या प्रयत्नांनी नवीनच बनविली जाणारी परिभाषा अुपयोजिणारीं पाठ्य पुस्तकेंच शिक्षणसंस्थातील अुपयोगासाठी मंजूर करण्यासंबंधी, म्हणजे या परिभाषेची सक्ति करण्यासंबंधी, जी शिफारस आहे तिजबद्दल मला पूर्ण नापसंती व्यक्त करावयाची आहे. सरकारची सक्ति अेकाच परिस्थितींत समर्थनीय ठरेल. ती म्हणजे सरकारच्या प्रयत्नाने तयार झालेल्या परिभाषेस जर बिनसरकारी देशी शास्त्रज्ञ, भाषापंडित व शिक्षणतज्ज्ञ यांनी सामान्यपणें संमति दिली तर. अशी संमति मिळाल्यास मात्र सरकारने त्या परिभाषेची सक्ति केली पाहिजे; पण अेरव्ही नाही. परंतु प्रस्तुत समितीची नेमणूक, तींतील वातावरण व तिची कार्यपद्धति पाहतां अशा तऱ्हेची लोकमताची संमति व पाठिंबा मिळविण्याविषयी सरकारची अुत्सुकता दिसत नाही. तेव्हा अशा स्थितींत सरकारने सक्तीचा अवलंब केल्यास त्याबद्दल नापसंती व्यक्त करावी लागेल यांत शंका नाही.

हिंदुस्थान सरकारच्या मध्यवर्ति शैक्षणिक सल्लागारमंडळाने नेमिलेल्या शास्त्रीय परि-भाषा समितीच्या नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या अहवाल-शिफारशींचें परिचयात्मक विवेचन व त्यांतून अुद्भवणाऱ्या कांही थोड्या स्थूल प्रश्नांबद्दल मतप्रदर्शन या लेखांत, मुख्यतः महाराष्ट्र-वाचकांच्या विचारास चालना देण्याच्या हेतूने, केलें आहे. या समितीच्या अहवाल-शिफारशींचें निरीक्षण व परीक्षण महाराष्ट्रांत काळजीपूर्वक व्हावें, व शक्य तर अेखादी 'महाराष्ट्र शास्त्रीय परिभाषा परिषद्' भरवून तिचें अधिकृत मत सरकारकडे वेळींच सादर करण्यांत यावें अशी महाराष्ट्र साहित्य परिषदेस नम्र पण आग्रहाची सूचना आहे.

———

# विष्णुशास्त्री पंडित

(ले. प्रा. गं. बा. सरदार, अेम्. अे.)

"विष्णुबावा ब्रह्मचारी, विष्णुशास्त्री पंडित, व दयानंद सरस्वती यांजसारखे देशोन्नत्यर्थ हरअेक प्रकारची सुधारणा करण्याविषयीं कायावाचामनेंकरून अश्रांत श्रम करणारे हे या कलियुगांतील केवळ ऋषीच होत."[१]

अेकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धात महाराष्ट्रात ज्या अनेक लहानमोठ्या धार्मिक व सामाजिक चळवळी झाल्या त्यांचा अुगम बहुधा ख्रिस्ती धर्मोपदेशकांच्या धर्मप्रचारांतूनच झालेला आढळतो. ह्या धर्मोपदेशकांचें प्रचारकार्य किती व्यापक व बहुविध होतें त्याचें दिग्दर्शन विष्णुबावा ब्रह्मचारी व जोतीराव फुले याच्या चरित्रात प्रसंगोपात्त केलेलेंच आहे. ख्रिस्तीधर्म व पाश्चात्य संस्कृति यांचें श्रेष्ठत्व महाराष्ट्रातील आबालवृद्धाच्या मनात पूर्णपणें बिंबविण्याचा त्यांचा आटोकाट प्रयत्न चालू होता. हिंदूंचे धर्मग्रंथ व समाजरचना ह्यावर निकराचा हल्ला चढविण्याची अेकहि संधि ते वाया दवडीत नसत. सरकारचें शिक्षणविषयक धोरणहि त्यांना अनुकूलच होतें. ह्या सर्व गोष्टींचा महाराष्ट्रांतील तत्कालीन अर्धशिक्षित तरुणांवर अनिष्ट परिणाम झाल्याशिवाय राहिला नाही. आपला धर्म, भाषा, अितिहास, संस्कृति यांमध्ये कांही तथ्य नाही असा त्यांचा ठाम ग्रह बनला; व हरअेक बाबतींत अिंग्रजांचें हुबेहूब अनुकरण केल्याशिवाय आपणांस गत्यंतर नाही अशा न्यूनगंडाने ते पछाडले गेले. पाश्चात्यांचा देशाभिमान, शौर्य, शिस्त, शोधकता, चिकाटी अित्यादि मौलिक गुण आत्मसात् करण्याची या तथाकथित सुशिक्षितांच्या अंगीं मुळींच कुवत नव्हती. तेव्हा त्यांचा पोशाख, चालीरीति वगैरे बाह्य गोष्टींचें बेगडी अनुकरण करण्यातच त्याना भूषण वाटूं लागलें. मात्र ह्या सांस्कृतिक आक्रमणामुळे लोकांच्या धर्मभावनांवर पोट भरण्याच्या सनातनी पंडितांचें धाबे दणाणलें. परतु जुन्या पठडींतील बरेचसे शास्त्री पुणें पाठशाळेंत सरकारी नोकरीच्या पाशांत जखडलेले असल्यामुळे त्यांना फारशी हालचाल करतां आली नाही. मोरभट दांडेकर, कृष्णशास्त्री साठे, गंगाधरशास्त्री फडके अित्यादिकांनी ह्या ख्रिस्ती आक्रमणाचा यथाशक्ति प्रतिकार केला. पण तो अपुरा व अेकांगी असल्यामुळे व्हावा तसा फलद्रूप झाला नाही. ख्रिस्ती धर्मोपदेशकाच्या कोटीवर कोटी लढवून अुत्तराला प्रत्युत्तर देअून त्या वेळीं निभाव लागण्यासारखा नव्हता. आत्मसमर्थनापेक्षा आत्मपरीक्षणाकडेच आमच्यांतील जबाबदार पंडितांनी जास्त लक्ष द्यावयास हवें होतें. ख्रिस्ती धर्मोपदेशकांच्या टीकेंतील ग्राह्यांश लक्षांत घेअून आपल्या समाजव्यवस्थेंत जरूर त्या सुधारणा घडवून आणण्याच्या खटपटीला ते लगोलग लागते, तर त्यामुळे आपल्या समाजाचें बळ खचित वाढलें असतें. परंतु आपल्या परंपरागत समाजरचनेंत कांही दोष असतील, ही कल्पनाहि या जीर्णमतवादी पंडितांच्या मनांत येणें शक्य नव्हतें. मात्र बाळशास्त्री जांभेकर, भाअू महाजन, दादोबा पांडुरंग, लोकहितवादी यांच्यासारख्या विचारी व दूरदर्शी पुरुषांनी हें बरोबर ओळखलें.

१ लोकहितवादी– स्वाध्याय ५. २०५

जातिवैमनस्याच्या भावनेने आपला सर्वंध समाज पोखरला गेला आहे, कोट्यवधि लोक पिढ्यान् पिढ्या गाढ अज्ञानांत व दारिद्र्यांत खितपत पडले आहेत, पांढरपेशा वर्गातील स्त्रियांची स्थितीहि अत्यंत शोचनीय व निराशाजनक आहे, धर्माच्या नांवाखाली शेकडो अज्ञानमूलक व हास्यास्पद कल्पना अुराशीं बाळगून आम्ही आपल्या प्रगतीच्या मार्गात कांटे पसरीत आहोंत, ह्या सर्व दोषाचें निर्मूलन होअून आपला समाज समर्थ व संघटित बनला तरच आपणांस आधुनिक जगात मानाचें स्थान प्राप्त करून घेतां येअील अशा तऱ्हेचा दूरवर विचार करून जांभेकर-महाजन-लोकहितवादीप्रभृति विचाराग्रणींनी लोकांच्या स्तुतिनिंदेची पर्वा न करता महाराष्ट्राच्या सर्वांगीण सुधारणेचें कंकण हातीं बांधलें.

ह्या काळांत ज्या निरनिराळ्या सामाजिक सुधारणांचा धडाडीने पुरस्कार केला गेला त्यांमध्ये स्त्रीशिक्षण, प्रौढविवाह, जरठकुमारीविवाहनिषेध, पुनर्विवाह अित्यादि स्त्रियांच्या प्रश्नांचें स्थान फार महत्त्वाचें होतें. दर्पण, प्रभाकर, ज्ञानोदय, ज्ञानप्रकाश, ज्ञानप्रसारक अित्यादि नियतकालिकातून ह्या विषयांची साधकबाधक चर्चा होअूं लागली होती. मुंबअी, पुणें, नाशिक, नगर, हरणअी, बाणकोट अित्यादि ठिकाणीं खिस्ती धर्मोपदेशकांनी मुलींच्या शाळा अुघडल्या होत्या. त्यानंतर अि.स.१८४५ त मुंबअीच्या सुशिक्षित तरुणांनी मुलींची शाळा स्थापन केली. अि. स.१८५१ त पुणें येथेहि जोतीराव फुले यानी मुलींसाठी शाळा काढली. अशा रीतीने हळूहळू महाराष्ट्रांत स्त्रीशिक्षणाचा प्रसार होत चालला. बालविवाहाच्या घातुक चालीमुळे मुलींच्या शिक्षणात व्यत्यय येत असे, व त्याना आपलें हिताहित समजूं लागण्यापूर्वीच त्याचें जीवन परस्वाधीन होअून राही. त्यामुळे पत्नी ही पतीची सहधर्मचारिणी होण्याअेवजी बहुधा त्याच्या पायाची दासी झालेलीच दिसून येअी. अेखाद्या स्त्रीचा पति अकालीं दिवंगत झाल्यास तिला पुनर्विवाहाची मोकळीक नसल्यामुळे तिचें जीवन अत्यंत दुःसह होत असे. ह्या सर्व प्रश्नांना तत्कालीन वृत्तपत्रानी तोंड फोडले होतें. त्यांतल्या त्यांत लोकहितवादींनी आपल्या शतपत्रांत या सुधारणांचा निर्भीडपणें पाठपुरावा केला आहे. शास्त्रवचनांचा आधार असो वा नसो स्त्रीजातीची विटंबना ही यापुढे बंद झालीच पाहिजे अशी त्याची सडेतोड विचारसरणी होती.[1] अंतःकरणाच्या तळमळीने बाहेर पडलेल्या त्यांच्या अुद्गारांमुळे क्षणभर कट्टर सनातन्यांचें चित्तहि द्रवत असेल; पण दुसऱ्याच क्षणीं धर्माचा बागुलबोवा पुढे करून ते परंपरागत रूढीसमोर मुकाट्याने मान वाकवीत असतील. पिढ्यानपिढ्या झालेले संस्कार तडकाफडकी झुगारून देण्याचे धैर्य फारच थोड्या लोकांत असतें. त्यामुळे लोकहितवादींच्या अप्रिय पण पथ्यकर अुपदेशाची लोकांनी बिलकूल कदर केली नाही.

नुसत्या बुद्धिवादाने लोकांची मनें वळवीत बसण्यापेक्षा शास्त्रवचनांच्या आधाराने

१. "अितके दिवस तुम्ही स्त्रियांस या देशांत दुःखांत घातल्या. अजून तरी त्यांस या तुमच्या ब्राह्मणी पाशापासून सोडवावें. मनूचें वचन असो, याज्ञवल्क्याचें असो, कोणाचेंही असो, महादेवाचे कां असेना. "बुद्धिरेव बलीयसी" असें आहे. त्यापेक्षां तुम्ही जें अुवड पाहतां त्याचा बंदोबस्त शास्त्रांत नाहीं म्हणून, करीत नाही हें योग्य नाहीं. शास्त्रास अेकीकडे ठेवा. आपली बुद्धि चालवा, विचार करून पाहा. घातक वचनावर हरताळ लावा. हा प्रसंग तुम्ही कसा जाणत नाही ? मी तुम्हा सर्वांस असें म्हणतों कीं, तुम्ही आपल्या मुली व बहिणी विधवा पाहतां, तेव्हां तुम्हांस लाज वाटत नाही काय ? त्यांस सुखी करण्यास तुम्हांस सामर्थ्य आहे, परंतु तुम्ही करीत नाही हा मूर्खपणा आहे. तुम्ही आजपर्यंत बायकांचे शाप घेतले व पुढें घेतां, त्याचे फळ कोठें जाल ? लोकहितवादी– निबंधसंग्रह– पृ. ३२५.

कोणत्याहि सुधारणेचें समर्थन करतां आल्यास ती समाजाच्या त्वरित पचनीं पडेल अशा भावनेने कांही पंडितांनी प्राचीन धर्मग्रंथांचें परिशीलन केलें, व त्यांच्या अनुरोधाने ते नवीन सुधारणांचा पुरस्कार करूं लागले. अि. स १८४० च्या सुमारास विष्णुशास्त्री बापट यांनी 'पुनर्विवाहप्रकरण' या नांवाचें अेक लहानसें चोपडें प्रसिद्ध केलें. त्यांत स्त्रीशिक्षण व पुनर्विवाह या दोन्ही प्रश्नांचा त्यांनी धर्मशास्त्राच्या दृष्टीने थोडक्यांत अूहापोह केला आहे. त्यानंतर अि. स. १८५७ त बाबा पदमनजी यानी 'यमुनापर्यटण' या नांवाची कादंबरी लिहिली. तींत त्यांनी हिंदुस्थानांतील विधवांच्या करुणास्पद स्थितीचें यथातथ्य वर्णन केलें आहे. ह्या ग्रंथाच्या पहिल्या आवृत्तींत आरंभीं दादोबा पांडुरंग यांचा 'विधवाश्रुमार्जन' हा संस्कृत निबंध जोडला आहे व लगेच पुढे त्याचा मराठींत सारांश दिला आहे. या निबंधांत दादोबा पांडुरंग यांनी पुनर्विवाहाविषयी शास्त्रदृष्ट्या त्रोटक विवेचन केलें आहे. हे दोन्ही प्रयत्न अगदीच किरकोळ स्वरूपाचे आहेत. विष्णुशास्त्री पंडितांनी मात्र ह्या दिशेने आपल्या प्रयत्नांची पराकाष्ठा केली. आपली संस्कृति जितकी अुच्च तितकीच अुदार आहे. मंत्रदृष्ट्या ऋषींच्या पवित्र वचनांवर आपल्या धर्माची अुभारणी झालेली आहे. तेव्हा त्यांत अशा अन्याय्य व अमानुष रूढींना थारा मिळण्याचा मुळींच संभव नाही अशी त्यांची दृढ श्रद्धा होती. वेद, स्मृति व पुराणें यांच्या सतत व्यासंगाने ती तिळमात्र कमी न होतां अुलट दुणावली. म्हणूनच जुन्या धर्मग्रंथांच्या साहाय्याने आमच्या भ्रामक व वेडगळ समजुतींचें समूळ अुच्चाटन करण्याचें कार्य त्यांनी हातीं घेतलें.

समाजसुधारणेच्या कोणत्याहि कार्यांत आपलें सर्व सामर्थ्य अेकवटल्याशिवाय केवळ शाब्दिक काथ्याकूट करून लोकांचें मतपरिवर्तन होणें शक्य नाही याची विष्णुशास्त्री पंडितांना पूर्ण जाणीव होती. म्हणूनच स्त्रीजातीच्या अुन्नतीसाठी आपले शक्तिसर्वस्व वेचण्याचा त्यांनी निश्चय केला, व लोकनिंदेच्या निष्ठुर आघाताना बिलकूल न जुमानता त्यांनी तो आमरण पाळला. ज्या ज्या वेळेला त्यांच्या कसोटीची पाळी आली, त्या त्या वेळीं ते आपल्या शब्दाला जागले व आपली तत्त्वनिष्ठा किती अढळ आहे याची त्यांनी जगाला खात्री पटवून दिली.

विष्णुशास्त्री पंडितांचें मूळगांव सातारा जिल्ह्यातील बावधन हें होय. त्यांचे वडील परशुरामशास्त्री हे पुढे सातारकरांच्या आश्रयास येअून राहिले. तेथे अि. स. १८२७ त विष्णुशास्त्र्यांचा जन्म झाला. लहानपणीं त्यानी वडिलाजवळ संस्कृत भाषेचें प्राथमिक शिक्षण घेतलें व नंतर वेदशास्त्रसंपन्न राघवेंद्राचार्य गजेंद्रगडकर व त्याचे चिरंजीव नारायणाचार्य यांच्याजवळ बारा वर्षें राहून न्यायव्याकरणादि प्राचीन शास्त्रांचें परिश्रमपूर्वक अध्ययन केलें. अिंग्रजी शिक्षणाचें दिवसानुदिवस वाढत चाललेलें महत्त्व लक्षात घेअून ते अि. स. १८४५ त पुण्यास आले, व संस्कृत पाठशाळेंतील अिंग्रजी वर्गात त्यानी आपलें नांव दाखल केलें. परंतु वडिलांच्या आकस्मिक निधनामुळे त्यांना दीड वर्षांतच अिंग्रजी शिक्षण अर्धवट सोडावें लागलें. मात्र व्याकरणशास्त्राच्या मूलभूत तत्त्वाशीं त्याचा पूर्ण परिचय असल्यामुळे अेवढ्या अल्पावधींतहि त्यांनी अिंग्रजी भाषेचा कसून अभ्यास केला; आणि विद्यालय सोडल्यानंतरहि आपला व्यासंग अव्याहत चालू ठेवून त्या भाषेंत प्रावीण्य मिळविलें. त्या काळीं अगोदर संस्कृत विद्येचें शास्त्रोक्त अध्ययन करून मग अिंग्रजी शिक्षण घेतलेलें अनेक शास्त्री नावारूपास आले. महादेवशास्त्री कोल्हटकर, कृष्णशास्त्री चिपळूणकर, श्रीकृष्णशास्त्री तळेकर, कृष्णशास्त्री गोडबोले, कृष्णशास्त्री भाटवडेकर यांच्या गाढ विद्वत्तेपुढे कोणत्याहि आंग्लभाषाभिज्ञ पंडिताचें मस्तक नम्र झाल्यावाचून राहणार नाही. सुधारणेच्या कार्याला त्यांच्यापैकी बहुतेकानी यथाशक्ति हातभारच लावला आहे. परंतु अुज्ज्वल

चारित्र्य, अलौकिक कार्यनिष्ठा, असामान्य नीतिधैर्य, लोकोत्तर त्याग अित्यादि गुणांत विष्णुशास्त्री पंडितांची बरोबरी करणारे महापुरुष त्या काळीं केवळ महाराष्ट्रांतच नव्हे तर अुभ्या हिंदुस्थानांतहि हाताच्या बोटांवर मोजण्याअितके असतील असें वाटत नाही.

वडिलाचें कृपाछत्र अेकाअेकीं गमावल्यामुळे विष्णुशास्त्र्यांना कुटुंबपोषणाचा भार आपल्या शिरावर घ्यावा लागला. अि. स. १८४८ त पंडितांनी सरकारी नोकरींत प्रवेश केला व त्यांना दरमहा ४० रुपये पगारावर ट्रान्सलेशन अेक्झिबिशनरची जागा मिळाली. भाषांतराच्या कामाशिवाय त्यांना अध्यापनाचे कामहि थोडें करावें लागे. ह्या खात्यांत काम करीत असतांना त्यांनी दोनतीन भाषांतरात्मक शालेय ग्रंथ प्रसिद्ध केले. बाळशास्त्री जांभेकर, दादोबा पांडुरंग, गोविंद नारायण, केरो लक्ष्मण छत्रे, महादेवशास्त्री कोल्हटकर वगैरे त्या काळचे नामवंत लेखक, व कार्यकर्ते शाळाखात्यांतूनच अुदयास आले होते. पंडितांनीहि आपलीं नोकरीचीं पंधरा सोळा वर्षे विद्यादानाच्या पवित्र कार्यांत खर्च केलीं.

कौटुंबिक आपत्तीमुळे जरी विष्णुशास्त्री पंडितांनी आपणांस सरकारी नोकरींत गुंतवून घेतलें होतें, तरी त्यामुळे त्यांना खरेंखुरें समाधान लाभलें नाही. जुन्या शास्त्रीघराण्यांत जरी त्यांचा जन्म झाला होता, तरी त्यांची दृष्टि पाढिक पंडितांप्रमाणे पूर्वग्रहाने दूपित झालेली नव्हती. समाजांत प्रत्यहीं चालणाऱ्या घडामोडींकडे त्यांचें फार बारीक लक्ष असे. बदलत्या काळाचें स्वरूप त्यांनी अचूक ओळखलें होतें, आणि म्हणूनच सनातन्यांच्या रुढिप्रियतेचा व अविचारीपणाचा त्यांना मनस्वी संताप येत असे. शाळेच्या टीचभर आवारांत पांचपन्नास मुलांना तींच तींच ठराविक पाठ्यपुस्तकें शिकविण्यांत त्याचें चित्त रमणें शक्य नव्हतें. त्यापेक्षा अधिक व्यापक व महत्त्वाच्या कार्याला त्यांनी आपलें आयुष्य वाहावें अशी ओश्वरी योजना होती. समाजांतील शेकडो अनाथ व असहाय स्त्रियांच्या दुःखाना वाचा फोडण्यासाठीच त्यांचा जन्म होता. ह्या आपल्या जीवित-कार्याची त्याना ओळख पटतांच अि. स. १८६४ च्या सुमारास ते सेवानिवृत्त झाले, व लोकसेवेच्या अुच्च ध्येयाने प्रेरित होअून त्यांनी वृत्तपत्रव्यवसायांत लक्ष घातलें.

लोकजागृतीचें प्रभावी साधन या दृष्टीने नियतकालिकाचा प्रभाव नुकताच दृग्गोचर होअूं लागला होता. ज्ञानप्रकाश, शुभसूचक, वृत्तवैभव, अिंदुप्रकाश, वृत्तप्रकाश, नेटिव ओपीनियन अित्यादि वृत्तपत्रें दर आठवड्यास निघूं लागलीं होतीं. शालापत्रक, आनंदलहरी, कथाकल्पद्रुम, ज्ञानदर्पण, ज्ञानाकर अित्यादि लहानसहान मासिकेंहि मराठी भाषेंत प्रसिद्ध होत होतीं. श्रीकृष्णशास्त्री तळेकरांच्या नंतर विष्णुशास्त्री पंडित स्वतः शालापत्रकाचे संपादक म्हणून काम पाहात होते. सरकारी नोकरींतून मुक्त होतांक्षणींच त्यांनी वृत्तपत्रव्यवसायांत शिरकाव करून घेण्याची संधि साधली. अि. स. १८६४ च्या सुमारास ते अिंदुप्रकाशांतील मराठी विभागाचे अुपसंपादक म्हणून मुंबअीस गेले. अिंदुप्रकाश हें साप्ताहिक अि. स. १८६२ मध्ये निघालें. लक्ष्मण मोरेश्वरशास्त्री हळबे व केशव सखारामशास्त्री गाडगीळ हे या पत्राची व्यवस्था पाहात असत. अिंदुप्रकाशाच्या अिंग्रजी विभागाचे संपादक न्या. मू. रानडे होते व मराठी विभाग जनार्दन सखाराम गाडगीळ यांच्याकडे सोपविला होता. सुरवातीपासूनच पंडितांचा ह्या साप्ताहिकाशीं निकट संबंध होता. पुण्यास असतांना ते या पत्रांचे 'मुनीम' होते. अि. स. १८६४ पासून मात्र ते प्रत्यक्ष लिहूं लागले, आणि पुढे अखेरपर्यंत ते या पत्राचेच संपादक होते.

अिंदुप्रकाशाचीं सूत्रें हातीं घेतल्यानंतरच पंडितांच्या कार्याला खरी सुरवात झाली. त्यापूर्वी त्यांनी सरकारच्या आश्रयाने कांही शालेय ग्रंथ प्रसिद्ध केले होते. पण त्यांत त्यांच्या रुढि-

भंजक विचारसरणीला बिल्कूल वाव मिळाला नाही. सेवानिवृत्त झाल्यानंतर स्त्रीजातीच्या अुद्धारासाठी प्राणपणाने झगडण्याचा त्यांनी निर्धार केला व त्या धोरणानेच अिंदुप्रकाशांत ते आपलीं मतें निर्भीडपणें मांडूं लागले. प्राचीन धर्मग्रंथांचें त्यांनी स्वतंत्र दृष्टीने आलोडन केलें; आणि त्यांच्या पाठबळावरच नवीन सुधारणाचा पुरस्कार करण्यास ते पुढे सरसावले. लेखन, भाषण, चर्चा, कीर्तन अित्यादि साधनाच्या द्वारा आपले विचार लोकांच्या गळीं अुतरविण्याच्या ते प्रयत्नाला लागले. अिंदुप्रकाशात बालविवाह, पुनर्विवाह, केशवपन, जरठकुमारीविवाह अित्यादि प्रश्नांची सांगोपांग चर्चा करून विरोधकांच्या आक्षेपांचें सप्रमाण खंडन करण्याचा त्यांनी परिपाठ पाडला. प्राचीन काळीं समाजजीवनांत स्त्रियांचें स्थान फार मोठें होतें हें त्यांनी लोकांच्या निदर्शनास आणून दिलें. स्त्रियांना ज्ञानाचा अधिकार आहे किंवा नाही ? आजन्म अविवाहित राहण्यास त्यांना शास्त्रांची कांही हरकत आहे काय ? लग्नाच्या वयासंबंधी कांही किमान मर्यादा ठरवितां येअील किंवा नाही ? विधवाविवाह सशास्त्र किंवा अशास्त्र आहे ? अित्यादि अनेक गोष्टींचा अूहापोह करून आपलीं निर्णायक मतें लोकांना पटवून देण्याची त्यांनी अविश्रांत खटपट केली.

पंडितांनी स्त्रियांच्या मूलभूत हक्कांचा जरी साकल्याने विचार केला होता, तरी पहिल्या प्रथम त्यांनी विधवाविवाहाचा प्रश्नच प्रामुख्याने हातीं घेतला. महाराष्ट्रात पुनर्विवाहाच्या प्रश्नाला अि. स. १८४० पासूनच चालना मिळाली होती. अि. स. १८४२ सालीं बेळगांव येथे दोन ब्राह्मण बालविधवांचे पुनर्विवाह झाल्याचें वृत्त प्रभाकर पत्रांत प्रसिद्ध झालें होतें. याच सुमारास मुंबअीस 'परमहंस मंडळी' या नांवाची गुप्त संस्था स्थापन झाली होती. तिच्या अुद्देशपत्रिकेंतहि "विधवांच्या पुनर्विवाहाविषयी संमति असावी" असें प्रमुख कलम होतें. अि. स. १८५६ त विधवाविवाहाचा कायदा झाला. त्यामुळे ह्या सुधारणेच्या मार्गातील मोठी धोंड दूर झाली. सुसंघटित प्रयत्नाशिवाय पुनर्विवाहप्रतिबंधाच्या दीर्घकालीन रूढीचें निर्मूलन होणार नाही हें लक्षांत घेअून पंडितांनी ता. २८ जानेवारी १८६६ रोजीं पुनर्विवाहोत्तेजक मंडळीची स्थापना केली. ह्या सभेचे अध्यक्ष जमखंडीकर होते; व अुपाध्यक्षाच्या जागीं माधवराव विंचूरकरांची योजना केली होती. सभेचे चिटणीस स्वतः विष्णुशास्त्री पंडित होते. पहिल्या चार सहामाहींतील सभासदांची संख्या अनुक्रमें ११२, १३४, १६४, १९८ अशी होती. श्रीकृष्णशास्त्री तळेकर, काशीनाथ महादेव थत्ते, गोपाळराव देशमुख वगैरे लोकांनी सभासद मिळविण्याच्या कामीं बरेंच परिश्रम घेतले. यानंतर हळूहळू पुणें, रत्नागिरी, अहमदाबाद अित्यादि ठिकाणीं पुनर्विवाहोत्तेजक सभा स्थापन झाल्या. मुंबअी येथील सभेच्या विद्यमानें दर आठवड्यास ह्या प्रश्नाची चर्चा करण्यासाठी बैठक भरत असे. त्या वेळीं सनातनी पंडितांनाहि तेथे येअून वादविवाद करण्यास मोकळीक होती. लोकांचें औदासीन्य, भित्रेपणा व धर्मभोळेपणा या तीन गोष्टी मुख्यतः पुनर्विवाहाच्या चळवळीच्या आड येतात. तेव्हा त्या नाहीशा करण्याचा आटोकाट प्रयत्न करणें हेंच पुनर्विवाहोत्तेजक मंडळीचें मुख्य कार्य होतें. ह्या कामीं त्यांना नेटिव ओपीनियन, हिंदु, रिफॉर्मर, मित्रोदय अित्यादि पत्रांचा पूर्ण पाठिंबा होता.

आपल्या अंगीकृत कार्यावर पंडितांची जरी अढळ श्रद्धा होती, तरी त्यांच्या वृत्तींत दुराग्रहाचा लवलेशहि नव्हता. व्यावहारिक दृष्ट्या प्रतिपक्षांशीं तडजोड करण्यास ते नेहमी तत्पर असत. मतभेदांच्या मुद्यांवर अवास्तव जोर देअून मांडणें वाढवीत बसण्यापेक्षा अुभयपक्षांची कोणत्या बाबतींत अेकवाक्यता होण्यासारखी आहे अिकडे त्यांचें जास्त लक्ष असे. पुन-

विवाहाच्या प्रश्नावर जरी दुमत असलें, तरी बालविवाहाचे अनिष्ट परिणाम सर्वांस मान्य होण्याजोगे आहेत असें दिसून येतांच त्यांनी सनातनी व सुधारक या दोन्ही पक्षांना पसंत पडेल असें संमतिपत्र तयार केलें, व तें गोविंदशास्त्री लेले, गणेशशास्त्री मालवणकर, सदाशिवशास्त्री लेले, विष्णुशास्त्री पंडित, लक्ष्मणशास्त्री हळबे अित्यादि पंडितांच्या नांवांनी प्रसिद्ध केलें. त्यांत कन्येचा विवाह बारा वर्षांपासून सोळा वर्षांपर्यंत करावा, व पुरुषाने सतरा वर्षांपुढे पंचेचाळीस वर्षांपर्यंतच आपलें लग्न करावें असें स्पष्ट म्हटलें होतें.

"कन्येचा विवाह ती अुपवर झाल्यावर म्हणजे बारा वर्षांपासून सोळा वर्षांपावेतों रजोदर्शनाच्या पूर्वी करावा. अशा रीतीने कन्या ठेवण्यांत कदाचित् विवाहापूर्वी रजोदर्शन झाल्यास त्याबद्दल गोप्रदानात्मक वगैरे प्रायश्चित्त मन्वादिकांनीं सांगितलें आहे (हें ब्राह्मणकन्याविवाहविचार नांवाच्या पुस्तकांत लिहिलें आहे.) तें करून नंतर विवाह करावा; परंतु कन्या अुपवर होण्याच्या पूर्वी तिचा विवाह करूं नये. याप्रमाणेच पुरुषाने १७ वर्षांपुढे ४५ वर्षांपर्यंतच आपलें लग्न करावें. त्याच्या अगेमागे त्याने लग्न करूं नये व त्यांस कोणी कन्या देअूं नये. या दोन अुपायानी दुःखांत पडणाऱ्या अनेक स्त्रियाची विपत्ति बऱ्याच अंशीं दूर होअील."

पंडिताच्या प्रोत्साहनाने पुणें येथील नारायण जगन्नाथ भिडे यांनी पुनर्विवाह केला; परंतु त्याचा फारसा गाजावाजा झाला नाही. त्यानंतर विष्णुशास्त्र्यानी ता. १५ जून १८६९ रोजीं मुंबअीस मोरोबा कान्होबा याच्या वाड्यात प्रभाकर भट पराजपे यांची कन्या वेणूबाअी हिचा पुनर्विवाह मोठ्या थाटामाटांत घडवून आणला ह्या विवाहांत नियोजित वर पांडुरंग विनायक करमरकर हे होते. समारंभाच्या कुंकुमपत्रिकेवर गोपाळ हरी देशमुख, विष्णु परशुराम पंडित, विष्णु मोरेश्वर भिडे, श्रीकृष्णशास्त्री तळेकर, विष्णु परशुराम रानडे, महादेव गोविंद रानडे, जनार्दन सखाराम गाडगीळ अशा सात वजनदार पुढाऱ्याच्या सह्या होत्या. ह्या समारंभास मुंबअींतील बरेच प्रमुख लोक अुपस्थित होते. वधूवराना मिळालेल्या अहेराची रक्कमहि जवळ जवळ तीन हजारांपर्यंत गेली. शिवाय विष्णुशास्त्री पंडितानी पुनर्विवाहोत्तेजक मंडळीच्या फंडांतून दोन हजार रुपये पुनर्विवाहित स्त्रीच्या नावे बँकेंत ठेवले. हा समारंभ कल्पनेबाहेर यशस्वी झाला. त्यामुळे विरोधकाचें पित्त खवळलें, व त्यानी बहिष्काराचे रामबाण अस्त्र बाहेर काढलें.

पांडुरंगराव व वेणूबाअी यांच्या पुनर्विवाहामुळे पुराणमताभिमानी लोकांत खूपच खळबळ अुडाली. सुधारणावादी पक्षाचें बळ दिवसानुदिवस वाढत चाललें आहे हें लक्षण कांही ठीक नव्हे अशी त्यांनी आपल्या मनाशीं खूणगाठ बांधली, व भल्याबुऱ्या मार्गांनी त्याचा नायनाट करण्याचा अुद्योग आरंभिला. मुंबअी, पुणें वगैरे ठिकाणीं सनातनी पंडिताच्या सभा भरून त्यात प्रस्तुत पुनर्विवाहाला पाठिंबा देणाऱ्या पुढाऱ्याना बहिष्कृत करण्याचा व्यूह रचण्यांत आला. प्रभाकर शिवराम भावे व कृष्णाशास्त्री साठे यानी मुंबअीस 'हिंदुधर्म व्यवस्थापक सभा' स्थापन केली व तिच्या मार्फत दर रविवारीं जाहीर बैठक भरवून पुनर्विवाहपक्षाचें खंडन करण्याचें काम हातीं घेतलें. आमचा अुपक्रम शास्त्रसंमत आहे याबद्दल आम्हांस मुळींच संशय नाही; शिवाय ज्या कोणास आमचें मत अमान्य असेल त्यांच्याशीं वाद करण्यास आम्ही तयार आहोंत असें विष्णुशास्त्र्यांनी सनातनी पंडितांना निक्षून सांगितलें

१. पुनर्विवाहोत्तेजक मंडळीचा रिपोर्ट, १८६७-६८.

होतें. याच सुमारास जगद्गुरु शंकराचार्यांची स्वारी रत्नागिरीस गेली होती. तेव्हा कांही लोकांनी पुनर्विवाहाविषयी त्यांचा अभिप्राय विचारला, परंतु श्रींनी संभावितपणें अुत्तर देण्याची टाळाटाळ केली. मात्र लवकरच त्यानी कऱ्हाड येथील सुप्रसिद्ध धर्ममार्तंड विठोबाअण्णा दप्तरदार यांना विधवाविवाहनिषेधाची मोहीम सुरू करण्याची आज्ञा केली. श्रींच्या अिच्छेस मान देवून सुधारकपक्षाला नामोहरम करण्याचा विठोबाअण्णांनी विडा अुचलला व त्यासाठी पुणें येथे येअून त्यांनी आपला मुक्काम ठोकला. त्याचा व पंडितांचा पुनर्विवाहाच्या सशास्त्रते-विषयी जाहीर वाद व्हावा म्हणून बोलणें चालू होतें. परतु वादाच्या अटींसंबंधीं अेकवाक्यता न झाल्यामुळे ते फिसकटलें. पुढे विठोबाअण्णानी पाच्छापूरकरांच्या वाड्यांत व्याख्यानें देण्यास आरंभ केला. पंडितानीहि अनेक सुधारणाप्रेमी मित्रांच्या आग्रहावरून मांडयांच्या वाड्यांत आपली व्याख्यानमाला गुंफली. त्यानंतर थोडक्याच दिवसात शंकराचार्यांची स्वारी आपल्या लवाजम्यासह पुणें येथे आली व त्या वेळीं बरेच दिवस घाटत असलेल्या शास्त्रचर्चेचा योग जुळून आला. पुनर्विवाहोत्तेजक पक्षाचे पांच, व निषेधक पक्षाचे पांच, आणि सरपंच अेक अशा अकरा पंचांसमोर विष्णुशास्त्री पंडित व नारायणाचार्य गजेंद्रगडकर याचा नअू दिवस कडाक्याचा वाद झाला. सुधारणावादी पक्षाच्या भूमिकेचा निर्विकार मनाने विचार न करतांच निषेधकांनी निर्णयाची मागणी केली. आयत्या वेळीं सनातनी पंडिताच्या भिडेला बळी पडून अुत्तेजक पक्षाकडील अेका पंचाने विरुद्ध मत दिलें. त्यामुळे पुनर्विवाहपक्षाचा दोन मतानी पराभव झाला; व तळेकर, रानडे, देशमुख प्रभृति पुढाऱ्यावरील बहिष्काराला पुष्टि मिळाली. गोपाळराव देशमुख हे मुलीला सासरीं त्रास होअूं नये म्हणून प्रायश्चित्त घेअून मोकळे झाले. पण पंडित, रानडे व मोडक यांना मात्र बहिष्काराचा जाच बराच काळ सहन करावा लागला. मूठभर पंडितानी जरी पुनर्विवाह निषिद्ध ठरविला तरी समाजांतील डोळस व विचारी लोकाना ह्या सुधारणेचें महत्त्व अधिकाधिक पटूं लागलें होतें. समाजाच्या अुद्धारासाठी स्थापन झालेलीं धर्मपीठेंच कालान्तराने कशीं निष्क्रिय व प्रतिगामी बनतात याचें अुत्कृष्ट प्रत्यन्तर या वादाने मिळालें. आपला पक्ष जरी न्याय्य असला तरी जगाची रीत अुफराटी आहे याची विष्णु-शास्त्र्यांना जाणीव होती. अदूरदर्शी पंडितांच्या न्यायालयांत साक्रेटीस गुन्हेगार ठरला, येशू खिस्ताला देहान्तशासन दिलें गेलें; परंतु त्यामुळे त्याचें काहीच नुकसान झाले नाही. सर्व जग त्यांच्या पायावर लोळण घेअूं लागलें. त्यांचे तत्त्वज्ञान अमर होअून राहिलें. ह्या सर्व गोष्टी विचारांत घेअून पंडितांनी आपला धीर खचूं दिला नाही व आदर्श कर्मयोग्याप्रमाणे आपलें कार्य अखंड चालू ठेवलें.

विष्णुशास्त्री पंडित हे बोलघेवडे सुधारक नव्हते. आपल्या तत्त्वांचें तंतोतंत परिपालन करतांना पडेल ती झीज सोसण्याची त्यांची तयारी होती. महाराष्ट्रांतील मी मी म्हणणाऱ्या नामवंत सुधारकांनी वाटेल त्या लंगड्या सबबी पुढे करून अैन आणीबाणीच्या वेळीं कच खाल्ल्याचीं अुदाहरणें कांही थोडींथोडकीं नाहीत, परंतु पंडितांची वृत्ति फार वेगळी होती, लोकांना ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी सांगून आपण नामानिराळें राहणें त्यांना कधीच रुचलें नाही. यदृच्छेने त्यांच्या आयुष्यांत कसोटीची वेळ आली, व तिच्यांतून ते तावूनसुलाखून बाहेर पडले. अि. स. १८७४ च्या सुमारास त्यांची पहिली पत्नी दिवंगत झाली. आता पुढे पंडित अविवाहित राहतात, पुनर्विवाह करतात, का आपलें सर्व तत्त्वज्ञान गुंडाळून ठेवून साळसूदपणें अेखाद्या बालवधूशीं विवाहबद्ध होतात अिकडे सर्वांचे डोळे लागून राहिले होते. ज्या पवित्र कार्याचा जन्मभर प्रसार केला त्याला प्रत्यक्ष कृतीने पाठिंबा देण्याची संधि पंडितांनी वाया जाअूं दिली

माही. ता. २१ अेप्रिल १८७४ रोजीं त्यांनी न्यायकचेरींत जाऊन आपलें करारपत्र सादर केलें. ह्या कराराने त्यांनी वामनराव आगाशे यांची कन्या कुसाबाअी हिच्याशीं विवाह करण्याचें ठरविलें. हरीपंत पटवर्धन यांच्या आकस्मिक निधनाने कुसाबाअी विधवा झाली होती. करारानंतर आठ महिन्यांनी पंडितांनी तिच्याशीं विधिपूर्वक पुनर्विवाह केला.

स्त्रीजातीच्या अुन्नतीपुरतेंच जरी विष्णुशास्त्र्यांनी आपलें कार्यक्षेत्र मर्यादित केलें होतें, तरी त्यांची दृष्टि अत्यंत व्यापक होती. समाजजीवनाच्या धार्मिक, सामाजिक, शैक्षणिक, राजकीय, औद्योगिक अित्यादि सर्व अंगांच्या सुधारणेविषयी त्यांना सारखीच तळमळ होती. अशा निरनिराळया समाजोपयोगी विषयाचा त्यांनी आपल्या अिंदुप्रकाशांतील लेखांत वेळोवेळीं परामर्श घेतला आहे. जन्मभर त्यानी समाजाचीच चिन्ता वाहिली. लोकापवादाची पर्वा केली नाही. शेकडो संकटें ओढवून घेतलीं. पण स्वतःच्या सदसद्विवेकबुद्धीशीं प्रतारणा करण्याचें मनांत आणलें नाही. अशा रीतीने आपल्या आयुष्याचा प्रत्येक क्षण समाजसेवेंत खर्च करून या महापुरुषाने ता. २९ अेप्रिल १८७६ रोजीं महाबळेश्वरीं आपला देह ठेवला.

सरकारी नोकरी सोडल्यापासून पंडितांनी आपलें सारे लक्ष स्त्रियांच्या सुधारणेकडे लावलें होतें. त्यासाठी त्यांनी गांवोगांवीं व्याख्यानें दिलीं; अनेक ग्रंथ लिहिले, शेकडो लेख प्रसिद्ध केले; आबालवृद्धांशीं खुल्या दिलाने वारंवार चर्चा केली; मतप्रचाराचें अेकहि साधन त्यांनी ठेवलें नाही. स्त्रीशिक्षण, पुनर्विवाह, बालविवाह, जरठकुमारीविवाह, परदेशगमन, जातिभेद अित्यादि अनेक प्रश्नाचा त्यांनी आपल्या लेखांतून अूहापोह केला आहे. त्यांचें सगळें विवेचन प्रायः जुन्या धर्मग्रंथांवर आधारलेले आहे. प्राचीन धर्मग्रंथांचें चिकित्सक दृष्टीने अध्ययन करून त्यांनी आपलीं मतें बनविलीं होतीं. त्यामुळे त्यांच्याशीं वाद करतांना मोठमोठ्या शास्त्रज्ञांचीहि तारांबळ अुडत असे. त्याची भाषा कांहीशी खडबडीत, पण सरळ, व सोपी आहे. त्यांच्या प्रत्येक लेखांत त्यांच्या अंतःकरणाची तळमळ, आत्मविश्वास, शोधकता व व्यासंग स्पष्ट दिसून येतो.

## विष्णुशास्त्री पंडितांचे ग्रंथ, लेख व व्याख्यानें

**शालेय**

| | |
|---|---|
| १ नाना फडनवीस ह्यांची संक्षिप्त बखर | मुंबअी १८५९ |
| २ हिंदुस्थानचा अितिहास भाग ३ रा (मरेकृत अितिहासाचें भाषांतर) | मुंबअी १८६१ |
| ३ अिंग्रजी-मराठी कोश | मुंबअी १८६४ |
| ४ संस्कृत आणि महाराष्ट्र धातुकोश | मुंबअी १८६५ |
| ५ संस्कृत तिसरें पुस्तक (अिंग्रजी) | मुंबअी १८६८ |

**सामाजिक व धार्मिक**

| | |
|---|---|
| १ ब्राह्मणकन्याविवाहविचार | मुंबअी १८६४ |
| २ पुरुषसूक्तव्याख्या | मुंबअी १८६४ |
| ३ विधवाविवाह | मुंबअी १८६५ |
| ४ विधवोद्वाहविवेक (संस्कृत) | मुंबअी १८६८ |
| ५ पुनर्विवाह सशास्त्र असल्याविषयीं पुणें व नाशिक येथें दिलेलीं व्याख्यानें | मुंबअी १८७० |

६ आर्य लोकांच्या प्राचीन व अर्वाचीन रीति व त्यांची परस्परांशीं तुलना आणि ख्रिअांनीं नावेतून विलायतेस जाणें निर्दोष आहे या विषयांवर व्याख्यानें मुंबअी १८७२

७ स्मृतिशास्त्र– व्याख्यान मुंबअी १८७३

८ शूद्रधर्म मुंबअी १८७३

९ वेदांतील सूर्यासावित्रीविवाह मुंबअी १८७४

१० देवलस्मृतिविषयीं विचार मुंबअी १८७४

११ आयुष्यवर्तनक्रमाविषयीं श्रुतिस्मृतींच्या आज्ञा– व्याख्यान मुंबअी १८७५

१२ स्त्रियांचे अधिकार– व्याख्यान मुंबअी १८७५

रचनात्मक

१ पुष्पमाला मुंबअी १८७४

२ तुकारामबावाच्या अभंगांची गाथा—भाग १–२ मुंबअी १८६९-७३

३ स्त्रीगायनसंग्रह अथवा बायकांचीं गाणीं मुंबअी १८८२

विष्णुशास्त्री पंडित हे विद्याखात्यांत जवळ जवळ सोळा वर्षें नोकरीस होते. तेवढ्या मुदतींत 'ट्रान्स्लेशन अेक्झीबिशनर' म्हणूनहि ते पाठ्यपुस्तकांच्या भाषांतराचें काम पाहत असत. त्यामुळे त्यांच्या हातून चारपांच शालेय ग्रंथ निर्माण झाले. त्यांपैकी दोन कोशग्रंथ आहेत व अितर दोन भाषांतरात्मक आहेत. क्यापटन् म्याक्डोनाल्ड यांच्या 'नाना फडनवीस यांची बखर' या चरित्रग्रंथाचा सुबोध साराश त्यांनी अि. स. १८५९ त प्रसिद्ध केला. त्याच-प्रमाणे मरे यांच्या हिंदुस्थानच्या अितिहासाच्या तिसऱ्या विभागाचें त्यांनी भाषांतर केलें आहे. हीं सर्व पुस्तकें सरकारी विद्याखात्याच्या प्रेरणेने व प्रोत्साहनाने लिहिलीं गेलीं. तेव्हा पंडितांच्या विवक्षित विचारसरणीचें प्रतिबिंब त्यांत अुमटलें नसलें तर मुळींच नवल नाही.

पंडितांचें सामाजिक विषयावरील पहिलें प्रसिद्ध पुस्तक 'ब्राह्मणकन्याविवाहविचार' हें होय. त्यामध्ये त्यांनी श्रुति, स्मृति व पुराणें याच्या आधारें प्रौढविवाहाचें समर्थन केलें आहे. 'खोट्या खळ्यास चमक अधिक' या म्हणीप्रमाणे आपल्या समाजांत मूळ शास्त्रापेक्षा परंपरागत रूढीचें महत्त्व जास्त वाढलें आहे हें त्यानी लोकाच्या निदर्शनास आणून दिलें. लग्नापूर्वी ऋतु-प्राप्ति झाली असतां ब्राह्मणकन्येला विवाहयोग्यता येतच नाही ही समजूत कशी फोल व निराधार आहे तें पंडितांनी या निबंधांत मनुस्मृति, यमस्मृति, संस्कारकौस्तुभ, प्रयोगरत्न अित्यादि ग्रंथांतील प्रमाणें देअून स्पष्ट केलें आहे. लेखकाची भूमिका लक्षांत येण्यास त्यांतील अेक छोटासा अुतारा येथे सादर करतों.

"कन्येस विवाहाच्या पूर्वी व विवाहहोमकाळीं ऋतुप्राप्ति झाली असतां प्रायश्चित्त सांगितलें. यावरूनच त्या ऋषींच्या मतीं ऋतुप्राप्त्युत्तरविवाह कांहीसा सदोष आहे, आणि ऋतुप्राप्तीच्या पूर्वीचा त्यापेक्षां विशेष प्रशस्त आहे, हें अगदीं अुघड सिद्ध होतें. तथापि तो ऋतुप्राप्तीपूर्वीच झाला पाहिजे, नाहीं तर कन्या ब्राह्मण्यांतून भ्रष्ट होते, असा जो ग्रह आहे तो निर्मूल आहे हें, आणि ऋतुप्राप्तीच्या पूर्वी केव्हाही विवाह करणें सारखेंच प्रशस्त आहे हें, या दोन गोष्टी वरील ग्रंथावरून सिद्ध होतात हें येथें दाखवणें आहे. दुसरी गोष्ट, कोणत्याही दोषाचें गुरुत्व अथवा लघुत्व त्या दोषाबद्दल प्रायश्चित्तरूप जी निष्कृति सांगितली असेल तिच्या गुरुत्वा-

वरून अथवा लघुत्वावरून अनुमेय आहे, हें स्पष्टच आहे. आणि ज्या अर्थी विवाहापूर्वी रजोदर्शन झालें असता निष्कृति मोठीशी नाहीं त्या अर्थी तो दोष मोठासा नाहीं हें अगदीं अुघडपणें सिद्ध दिसतें, याचा सुज्ञांनीं विचार करावा''.

विधवाविवाहाच्या चळवळींतच पंडितांनी आपलें सर्व आयुष्य खर्च केलें होतें. तेव्हा या विषयावरच त्यांचें बरेंचसें लेखन व्हावें हें स्वाभाविक आहे. अगदी आरंभीं त्यांनी पंडित अीश्वरचंद्र विद्यासागर यांच्या 'विधवाविवाह' या ग्रंथाचा मराठींत अनुवाद केला. अीश्वरचंद्र विद्यासागर यानी बंगालमध्ये पुनर्विवाहाच्या प्रश्नाला जोराची चालना दिली. पाराशरस्मृतींतील ज्या दोन श्लोकांवर पुनर्विवाहपक्षाची सगळी अिमारत अुभारली होती ते श्लोक अीश्वरचंद्रांनीच प्रथम शोधून काढले. या ग्रंथाच्या वाचनानेच विष्णुशास्त्री पंडितांनाहि जुन्या धर्मग्रंथांचें चिकित्सक दृष्टीने अध्ययन करण्याची स्फूर्ति मिळाली असेल असें वाटतें. अीश्वरचंद्रांचा ग्रंथ प्रसिद्ध झाल्यानंतर काशीनाथशास्त्री अष्टपुत्रे यांनी त्याचें पत्रद्वारें खंडन केलें होतें. त्याचप्रमाणें काशींतील चौदा पंडितांनीहि विधवाविवाहाच्या खंडनासाठी 'पुनर्विवाहनिषेध' या नांवाचा ग्रंथ लिहिला. कृष्णशास्त्री साठे यानी त्याचें मराठी भाषांतर प्रसिद्ध केलें. ह्याखेरीज बाळकृष्ण लक्ष्मणशास्त्री बापट यानीहि 'विधवाविवाहखंडन' या नांवाचा ग्रंथ लिहिला. अशा रीतीने त्या वेळीं ह्या प्रश्नाचा अुलटसुलट दोन्ही बाजूंनी अूहापोह होत होता. काशीच्या चौदा पंडितांनी लिहिलेल्या ग्रंथाच्या खंडनार्थ विष्णुशास्त्र्यांनी 'विधवोद्वाहविवेक' हा संस्कृत ग्रंथ लिहिला. त्याच्या मराठी भाषांतराचें काम चालू होतें. परंतु तें प्रसिद्ध झाल्याचें कोठे आढळत नाही. पंडितांनी या विषयावर ठिकठिकाणीं अनेक व्याख्यानें दिलीं. त्यांपैकी पुणें व नाशिक येथील व्याख्यानें मात्र पुस्तकरूपाने प्रसिद्ध झालीं आहेत. त्या व्याख्यानांतील अेक अुतारा येथें अुद्धृत करतों.

''विवाह होण्याविषयीं पुरुषांच्या व स्त्रियांच्या अंगीं जे गुण असले पाहिजेत म्हणून सांगितले आहेत त्यांत, सर्व सांसारिक कृत्यांची जबाबदारी स्त्रीपेक्षां पुरुषावर जास्ती असल्याचें मनात आणून पुरुषाच्या आंगच्या गुणाची संख्या जास्त लिहिली आहे आणि अर्थात् स्त्रीच्या आंगच्या गुणांची संख्या कमी लिहिली आहे. याजपैकीं कांहीं कांहीं गुणांची परीक्षा फार बारकाअीनें करण्यास सांगितलें आहे. परंतु कितीहि बारकाअी केली तरी अत्यंत अल्पज्ञ हा मनुष्य अनेक कारणांनीं चुकीस पात्र आहेच. यास्तव अशाप्रकारें चुक्या होअून विवाह घडून आल्यास त्यांतून आणि विवाहोत्तर आधिदैविक अथवा आधिभौतिक अित्यादि संकटें आलीं असतां त्यांतून त्यास पार पाडण्यास तसतसे मार्ग करून ठेवलेच आहेत.— म्हणजे विवाहित पुरुषाचा व विवाहित स्त्रीचा पुनः विवाह करण्यास मोकळीक दिली आहे. त्यांत ती पुरुषास दिली असल्याचें सर्वांस माहीत असून वस्तुतः ती जितकी दिली आहे तिजपेक्षां स्वहस्तांतच सर्वदा नियम धारण करणाऱ्या पुरुषांनीं ती वाढविली आहे. ती आतां वाढतां वाढतां अशा अुच्चपदास येअून पोंचली आहे कीं, बिचाऱ्या हजारों अबला तेथून तीस बळी पडत आहेत. मुलीच्या विचारावांचून पाहिजे तितक्या वयाच्या व पाहिजे त्या ठोंब्यास मुली देण्याच्याच अेकट्या प्रघाताचा विचार केल्यासही मी म्हटलेल्या गोष्टीचीं अुदाहरणें हजारों सांपडतील. अस्तु.

आतां पुरुषांप्रमाणेंच स्त्रियांसहि कित्येक आपत्तींच्या प्रसंगीं पुनर्विवाहास स्पष्टपणें मोकळीक दिली आहे. ही मोकळीक देणारा साक्षात् वेदपुरुष आहे व मनु, कात्यायन, वसिष्ठ,

---

१ ब्राह्मणकन्याविवाहविचार— पृ. ६१—६४

प्रजापति, शातातप, नारद, हारीत, व पराशर हे आठ महर्षि आहेत. तूर्त अितके अवगत आहेत व शोधाअंतीं आणखीहि बहुत अुपलब्ध होतील असा बहुत संभव आहे."[1]

'आर्य लोकांच्या प्राचीन व अर्वाचीन रीति......' या छोटेखानी पुस्तकांत विष्णुशास्त्री पंडितांनी पुण्यास 'फ्रेंडली मीटिंग' पुढे दिलेल्या तीन व्याख्यानांचा समावेश केला आहे. पहिल्या व्याख्यानांत प्राचीन व अर्वाचीन चालींची तुलना करून पूर्वकालीन समाजव्यवस्थेत स्त्रियांचे हक्क अबाधित राखण्याची किती दक्षता घेण्यांत आली होती तें साधार स्पष्ट केलें आहे. पूर्वी स्त्रियांना वेदाध्ययनाचा अधिकार होता; मुलींच्या संमतीशिवाय वराची निवड करण्यास मनाअी होती; कन्याविक्रयाच्या चालीचा ठिकठिकाणीं तीव्र निषेध केला आहे; प्रौढ विवाहाची प्रथा सर्रास रूढ होती; अित्यादि गोष्टींचा त्यांनी आपल्या भाषणांत अुल्लेख केला आहे. त्याचप्रमाणे श्रुतिस्मृतिप्रणीत राजधर्माचें स्वरूप विशद करून आमच्या राजेरजवाड्यांची सौम्य शब्दांत हजेरी घेतली आहे. तिसऱ्या व्याख्यानांत ज्ञानार्जनासाठी परदेशगमन शास्त्रदृष्ट्या निषिद्ध नाही ह्या मुद्याचें थोडक्यांत विवेचन केलें आहे. तसेंच रोटीव्यवहार व बेटीव्यवहार या दोन्ही बाबतींत जातिभेदाचे निर्बंध पूर्वी आजच्या अितक्या कडक रीतीने पाळले जात नसत ह्या गोष्टीकडेहि त्यांनी मुद्दाम श्रोत्यांचें लक्ष वेधलें आहे.

"विवाहसंबंधांत जातिभेद अगर वर्णभेद प्राचीनकालीं मानीत नव्हते असें धर्मशास्त्रावरून व त्या काळच्या व्यवहारावरून निर्विवाद सिद्ध होतें. ब्राह्मणास ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र या चार वर्णांच्या; क्षत्रियास क्षत्रिय, वैश्य, शूद्र या तीन वर्णांच्या; वैश्यास वैश्य, शूद्र या दोन वर्णांच्या, व शूद्रास शूद्रवर्णाची अशा बायका करण्यास आज्ञा दिली आहे व ती प्राचीन काळीं चालू होती असें मन्वादि सर्व स्मृतींच्या आचाराध्यायांतील व व्यवहाराध्यायांतील वचनांवरून स्पष्ट होतें. याशिवाय क्षत्रियवंशांतील पुरुषही ब्राह्मणवर्णाच्या बायका करीत असत असें अितिहासांत आढळतें. ही चाल फार चांगली व लोकांस सुखावह होती. ती अर्वाचीन काळीं अगदीं बंद झाली, ती पुन्हा चालू करणें हें सर्वांचें कर्तव्य आहे."[2]

पंडितांनी ता. ११ अेप्रील १८७२ रोजीं मराठी ज्ञानप्रसारक सभेमध्ये 'स्मृतिशास्त्र' या विषयावर विचारप्रवर्तक व्याख्यान दिलें. तें विविधज्ञानविस्तारांत प्रसिद्ध झालें आहे. या भाषणांत त्यांनी युरोपियन पंडितांच्या भाषांतरावर अवलंबून न राहता स्वतंत्र रीतीने स्मृतिग्रंथांचा अभ्यास करण्याची आवश्यकता प्रतिपादन केली आहे. पंडितांच्या सूक्ष्म व शोधक बुद्धीचे पुरावे या व्याख्यानात जागोजाग आढळतात. आरंभीं त्यांनी श्रुति व स्मृति याच्या प्रामाण्याची मीमांसा करून नंतर स्मृतिग्रंथाचें स्वरूप सविस्तर स्पष्ट केलें आहे. शेवटीं वैदिक वर्णव्यवस्था व स्त्रियांसंबंधीचा प्राचीन शास्त्रकाराचा दृष्टिकोन या गोष्टींचें थोडक्यांत दिग्दर्शन केलें आहे.

"धर्मशास्त्राचें खरें मर्म समजण्यास साक्षात् श्रुति व स्मृति यांचाच अभ्यास केला पाहिजे. व्याख्याग्रंथांवरच भरवसा ठेवून अुपयोग नाही. तसेंच युरोपियन लोकाचीं भाषांतरें कितीहि चांगलीं झालीं असलीं तरी त्याच्या द्वारें मूळ ग्रंथांचें यथार्थज्ञान कधींहि व्हावयाचें नाहीं. खेरीज त्यांचीं बहुतेक भाषांतरें चुकलेलीं आहेत व कितीअेक मूळापासून फारच दूर आहेत. अर्वाचीनकाळच्या शास्त्री वगैरे लोकांस स्मृतींची जी माहिती आहे ती मयूख, मिताक्षरा,

१. स्त्रीपुनर्विवाह सशास्त्र असल्याविषयीं व्याख्यानें– पृ. ६१-६२.
२. आर्य लोकांच्या प्राचीन व अर्वाचीन रीति– पृ. १४-१५.

माधव, निर्णयसिंधु अित्यादि निबंधांवरून आहे. प्रत्यक्ष स्मृतीच वाचून पाहणारे असे थोडे आहेत. यामुळे या स्मृतीविषयीं, त्यांच्या कर्त्यांविषयीं व त्यांतील विषयांविषयीं त्यांस असावा तसा समज नाहीं."[१]

विष्णुशास्त्र्यांनी ता. १२ मार्च १८७४ रोजीं अुपयुक्त मराठी ज्ञानप्रसारक सभेपुढे 'आयुष्यवर्तनक्रमाविषयी श्रुतिस्मृतींच्या आज्ञा' या विषयावर केलेलें भाषणहि विविधज्ञानविस्तारांतच प्रसिद्ध झालें आहे. सुरवातीस त्यांनी सृष्टीच्या अुत्पत्तिविषयी श्रुतींचा अभिप्राय सांगितला, व त्यांत रूपकालंकाराने विराट्स्वरूपाच्या चार अवयवांच्या ठिकाणीं चतुर्वर्णात्मक सृष्टीची योजना केली आहे असें प्रतिपादन केलें. नंतर त्यांनी चाऱ्ही आश्रमांचा निर्देश करून ब्रह्मचर्याश्रम व गृहस्थाश्रम या दोहोंचेंच प्रामुख्याने विवेचन केलें. तसेंच नुसतें पाठांतर व्यर्थ आहे व 'अर्थज्ञान झाल्यावांचून अध्ययनाची समाप्तिच होत नाहीं असें श्रुतिस्मृतींचें खरें मत आहे' या मुद्यावर त्यांनी विशेष भर दिला आहे. शिवाय परधर्मीय राजवटींत धर्मशिक्षणाची हयगय झाल्याशिवाय राहात नाही; तेव्हा आपणच त्या बाबतींत प्रयत्न केला पाहिजे असेंहि त्यांनी सांगितलें. त्यांच्या ह्या भाषणांतील कांही भाग येथें अुद्धृत करतों.

"लोकांस धर्मसंबंधी शिक्षणाची अत्यंत आवश्यकता आहे हें अुघडच आहे. परंतु विद्याभ्यासाचें काम केवळ राजाच्याच हातांत राहील आणि तो राजा व प्रजा ही अुभयतां अेकधर्माचीं नसतील तेव्हा धर्मसंबंधी शिक्षणाची न्यूनता अथवा हयगय होअून लोकांत धर्माविषयी अज्ञान होअून ते धर्मरहित अथवा परधर्माश्रित असे होतात हें हल्लींच्या स्थितीवरून सहज लक्षांत येत आहे."[२]

ज्ञानप्रसारक सभेपुढे ता. ५ मार्च १८७५ रोजीं पंडितांचें आणखी अेक व्याख्यान झालें. तेंहि विविधज्ञानविस्तारांत आलें होतें. व्याख्यानाचा विषय 'स्त्रियांचे अधिकार' हा होता. त्यांत त्यांनी स्त्रीजीवनविषयक अनेक प्रश्न अुपस्थित करून त्यांची शास्त्रशुद्ध चर्चा केली आहे. सामान्य जनांचा बुद्धिभेद करण्यापेक्षा धर्मवचनांच्या आधारानेच न्याय्य सुधारणांचें समर्थन केल्यास तें अधिक परिणामकारक होतें असें त्यांनी आरंभीं स्पष्ट म्हटलें आहे. मन्वादि स्मृतिकारांनी समाजजीवनांत स्त्री आणि पुरुष या दोघांचेंहि महत्व सारखेंच मानलें आहे. पूर्वीच्या कल्पांत स्त्रियाना अुपनयनसंस्कार विहित होता, त्याचप्रमाणे वेदाध्ययनाचाहि पुरुषांच्या बरोबरीने अधिकार होता. गार्गी, वडवा, सुलभा अित्यादि ब्रह्मवादिनी स्त्रियांचीं नांवें प्रसिद्ध आहेत. विवाह करणें अथवा न करणें स्त्रियांच्या मर्जीवर अवलंबून आहे. त्यांना शास्त्रांचें तसें बंधन नाही. विवाहाच्या बाबतींत मुख्य विचार व संमति कन्येचीच असली पाहिजे, आणि तिच्या अिच्छेनुरूपच वराची योजना झाली पाहिजे अशा अनेक मुद्यांचा पंडितांनी या व्याख्यानांत परामर्श घेतला आहे. त्यांतील कांही भाग येथे अुतरून घेतों.

"आपल्या सर्वसाधारण लोकांच्या प्रस्तुतच्या निकृष्ट प्रतीच्या मानसिक स्थितीच्या मानानें पाहतां कोणीही मनुष्य कसाहि विद्वान् अथवा प्रतिष्ठित असला तरी आजच्या व्याख्यानाच्या विषयांत त्याचेच विचार म्हणून कधीं अुपयोगी पडावयाचे नाहींत. तर ज्या महर्षीविषयीं त्यांची पूज्यबुद्धि अद्यापि नष्ट झाली नाहीं, त्यांचे विचार त्या विषयावर काय आहेत हेंच मुख्यत्वें लिहून प्रसंगविशेषीं स्वाभिप्राय द्यावा हें बरें वाटल्यामुळें तशीच आज योजना केली आहे."

---

१. विविधज्ञानविस्तार, पु.५, पृ.२०५. २. विविधज्ञानविस्तार, पु. ७, पृ. १५७.

"आपणांस पसंत वाटत असून कन्येस पसंत वाटत नसेल तर तो वर सोडून कन्येस जो पसंत वाटत असेल त्यासच कन्या पित्यानें द्यावी, आणि तसेंच आपणांस आवडत असेल तीच कन्या मुलाच्या गळ्यांत न बांधतां त्यास जी आवडत असेल ती त्यास द्यावी. म्हणजे विवाहाच्या बाबतींत वधूस वर पसंत व वरास वधू पसंत असेल तरच त्यांचा विवाह करावा; नाहीं तर कसा तरी अेकदां विवाह करून दोन हातांचे चार हात (मुसक्या बांधण्याचें काम) करूं नयेत अशी या नियमाची आज्ञा आहे. तेव्हा आपणास आवडेल तसाच नवरा बाप वगैरेकडून करून घेण्याचा किंवा स्वतः करण्याचा स्त्रियांस पूर्ण हक आहे. कन्येस यथायोग्य वर न मिळेल तर ती जन्मभर अविवाहित ठेवावी, परंतु अयोग्य वरास कधींहि देअूं नये असें मनूनें स्पष्ट सांगितलें आहे."[1]

लेख, भाषणें, चर्चा याचप्रमाणे पंडितांनी देशाच्या सर्वांगीण सुधारणेच्या दृष्टीने कीर्तनें करण्याचाहि अुपक्रम केला. त्यांत ते अनेक समाजोपयोगी विषयांचें निरूपण करीत असत. त्यासाठी त्यांनी निरनिराळ्या वृत्तांत बरींचशीं पद्यें तयार केलीं, व स्नेह्यांच्या आग्रहाखातर पुस्तकरूपाने प्रसिद्ध केलीं. ह्या पुष्पमालेंतील पांच सात पद्यें जरी सहज चाळलीं, तरी त्यावरून पंडितांची दृष्टि किती शुद्ध व व्यापक होती तें चांगलें दिसून येतें. सामान्य हरदासी पदांप्रमाणेच ह्या पद्यांची रचना आहे. त्यांत कल्पनासौष्ठव किंवा पदलालित्य यांचा लवलेशहि नाही. त्यांतील दोन पद्यें नमुन्यासाठी अुद्धृत करतों.

"नाहीं कंठा माजी गोडी । नाहीं वक्तृत्वाची प्रौढी ॥
येथें अुद्देश प्रधान । त्याशि द्यावा सकळीं मान ॥
नाहीं तालस्वरज्ञान । नाहीं गायनसाधन ॥
नाहीं कवनामाजी छंद । नाहीं प्रतिमेचाही गंध ॥
नाहीं काव्याचा अभ्यास । तरी न व्हावें अुदास ॥
मित्र विनवी जेवी भृंग । व्हावें मकरंदीं दंग ॥"[2]
"कोणी लोटा किंवा वारा । परि येअूं तुमच्या दारा ॥
आम्ही होअूनी गोसावी । फेरी करूं गांवोगांवीं ॥
ठाअीं ठाअीं हाका मारूं । निजलियां जागे करूं ॥
देश जननीचे बंदे । होअूनी करूं हेचि धंदे ॥
मित्र म्हणे हा निर्धार । सिद्धि दाता जगदीश्वर ॥"[3]

विष्णुशास्त्री पंडित यांनी मुंबअी सरकारच्या आश्रयाने "तुकारामबावाच्या अभंगाची गाथा" दोन भागांत प्रसिद्ध केली. ह्या कामीं त्यांना शंकर पांडुरंग पंडित यांचें सहकार्य लाभलें होतें. त्यांनी तळेगांव, देहू, पंढरपूर, कडूस या चार ठिकाणच्या प्रती ताडून पाहून प्रस्तुत ग्रंथांतील पाठ निश्चित केले आहेत. अशा चिकित्सक दृष्टीने ग्रंथ संपादित करण्याचा हा मराठी भाषेंतील पहिलाच प्रयत्न होय. या ग्रंथाला तुकारामबावांचें अिंग्रजी व मराठी चरित्र जोडलें आहे. मराठी चरित्र ७६ पानांचें आहे. तें बहुधा पंडितांनीच लिहिलें असावें.

विष्णुशास्त्री पंडितांच्या शैक्षणिक, सामाजिक, व वाङ्मयीन कार्याचें आपण स्थूलमानाने अवलोकन केलें. स्त्रीजातीच्या न्याय्य हक्कांसाठी सतत बारा वर्षें ते जीर्णमतवादी पक्षाशीं हटातटाने झगडले. सभोवार लोकनिंदेचें काहूर अुठलें असतांहि त्यांनी कधी रेसभर देखील माघार

१. विविधज्ञानविस्तार पु. ७, पृ. ११५, १२०. २. पुष्पमाला पृ. ३. ३. पुष्पमाला पृ. ४५-४६.

घेतली नाही. त्यांचे विचार, उच्चार व आचार यांमध्ये पूर्ण ऐकवाक्यता होती ही गोष्ट त्यांच्या कट्टया शत्रूलाहि मान्य करावी लागेल त्यांची वेधकशक्ति व संघटनाचातुर्य अलौकिक होतें. महाराष्ट्र व गुजराथ या दोन्ही प्रांतांतील प्रमुख पुढाऱ्यांचा त्यांनी आपल्या कार्याला पाठिंबा मिळविला. ज्या ज्या वेळीं आपल्या सहकाऱ्यांचा अंगचोरपणा त्यांच्या नजरेस आला त्या त्या वेळीं त्यांची कडक शब्दांत संभावना करण्यास त्यांनी मागेपुढे पाहिलें नाही. त्यांच्या अविश्रांत प्रयत्नांमुळेच महाराष्ट्रांत घरोघर स्त्रियांच्या प्रश्नांची चर्चा होऊं लागली. यदृच्छेने स्वतःवर प्रसंग आला असतां आपल्या तत्त्वांचें परिपालन करून त्यांनी जगाला उदाहरण घालून दिलें; आणि म्हणूनच अर्वाचीन महाराष्ट्रांतील तत्त्वनिष्ठ सुधारकांच्या मालिकेंत पंडितांना अग्रस्थान दिलें पाहिजे.

---

## साभार-स्वीकार

१. *Modern Marathi Short Stories*— Editor and Publisher : B. G. Shinde, Saroj Prakashan, 249 Sharad Villa, Bombay 19.

२. **श्रीज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान**— ले० डॉ. शं. दा. पेंडसे, एम्.ए., एम्.ओ.एल्., पीएच्.डी.; प्रका० के. भि. ढवळे, मुंबई ४; मूल्य ४ रु.

३. **जिवलग**— ले० श्री. दा. न. शिखरे, एम्.ए.; प्रका० श्री. य. गो. जोशी, सदाशिव पेठ, पुणें २; मूल्य १॥ रु.

४. **सिद्धपुरुष व त्यांचा संप्रदाय**— ले० श्री. वा. ल. चिपळोणकर व श्री. रा.स. भागवत; प्रका० श्री. ग. स. मराठे, पुणें ४; मूल्य १।। रु.

५. **थिऑसफीवरील सुबोध व्याख्यानें** (The Popular Lectures on Theosophy या डॉ. बेझंट यांच्या पुस्तकाचा मराठी अनुवाद)— अनु० श्री. दे. का. लेले, बी.ए.; प्रका० श्री. वा. ल. चिपळोणकर, अकोला; मूल्य १२ आणे.

६. **यशोनिधि**— कवि : राजकवि यशवंत; प्रका० श्री. य. दि. पेंढारकर, १९६/३४ सदाशिव, पुणें २; मूल्य १। रु.

७. **अशोकाचीं पानें**— ले० कृष्णाकुमार, एम्. ए.; प्रका० श्री. ग. ना. अंबेकर, गोदावरी प्रिंटिंग प्रेस, नांदेड; मूल्य १॥ रु.

८. **वेदांतील गोष्टी**— ले० श्री. वि. कृ. श्रोत्रीय, एम्. ए., बी. टी., प्रका० के. भि. ढवळे, समर्थसदन, गिरगांव, मुंबई ४.

९. **एकावळी** (प्रा. श्री.ना. बनहट्टी यानी लिहिलेल्या व्यक्तिचरित्रात्मक लेखांचा संग्रह) संपा० व प्रका० डॉ. मा. गो. देशमुख, एम्. ए., एल्एल्. बी., पीएच्. डी., विठ्ठल (यवतमाळ); मूल्य १॥ रु.

१०. **भुरग्यालें व्याकरण**— (पैलो वांटो) ले० शणें गोंयबाब; प्रका० श्री. के. एस्. नायक, गोमंतक छापखाना, रामचंद्र बिल्डिंग, गिरगांव, मुंबई ४; मूल्य ६ आणे.

११. **संगम**— ले० श्री. श्याम गोऱ्हे; प्रका० श्री. शं. ज. नाशीक, उदय साहित्य प्रकाशन, ९६ गंज, पुणें २; मूल्य १ रु.

१२. **दीपज्योति**— संपा० व प्रका० पु. आ. चित्रे, खारीबाव, बडोदें.

---

# परिषद्वार्ता



(चिटणिसांकडून)

**कार्यकारी मंडळ**— ऑगस्टच्या २४ तारखेस भरलेल्या कार्यकारी मंडळाच्या सभेंत दुखवट्याचा खालील ठराव करण्यांत आला :—

"भारतीय संस्कृतीचे अेक निःसीम अुपासक, मानवधर्माचे प्रेषित, कव्यात्मसौंदर्याचे पूजक, विश्वभारतीचे संस्थापक, अभिजात साहित्याचे निर्माते, आंतरराष्ट्रीय कीर्तिसंपन्न कलावंत श्रेष्ठ कवि, राष्ट्रीय स्वातंत्र्याचे पुरस्कर्ते व निःसीम देशभक्त डॉ. रवीन्द्रनाथ टागोर यांच्या शोककारक निधनामुळे बंगालचीच नव्हे तर अखिल भारताची किंबहुना सर्व मानवतेची हानि झाली आहे व असा सर्वांगीण अुन्नतीचा अमौलिक द्रष्टा व नेता कालवश झाल्यामुळे म. सा. परिषदेच्या कार्यकारी मंडळास अत्यंत दुःख होत आहे."

त्याचप्रमाणे परिषदेचे सदस्य श्री. वि. कृ. देशपांडे यांच्या निधनाविषयी खेद व्यक्त करण्यांत आला.

गेल्या संमेलनांत झालेल्या महाराष्ट्र विद्यापीठासंबंधी झालेल्या ठरावाचा विचार होअून महाराष्ट्रांतील शिक्षणसंस्था व अितर संस्कृतिविषयक संस्था यांचें प्रातिनिधिक मंडळ निर्माण करण्याच्या योजनेस सभेने मान्यता दिली. या कामास आरंभ झाला आहे.

**परीक्षा**— मागे सूचना गेल्याप्रमाणे यंदा परीक्षांस आरंभ १५ डिसेंबर या तारखेस होणार आहे. अुमेदवारांकडील अर्ज व शुल्क हीं स्वीकारण्याची १० नोव्हेंबर ही शेवटची तारीख म्हणून ठरविली आहे.

अुमेदवारांस मार्गदर्शन व्हावे म्हणून प्रा. वा. म. जोशी यांचें 'ज्ञान हें विष कीं अमृत' व 'सुशीलेचा देव' या दोन पुस्तकांसंबंधी गांधी ट्रेनिंग कॉलेज, पुणें येथे ता. ११ सप्टेंबर या दिवशीं व्याख्यान करविण्यांत आलें.

**चुकीची दुरुस्ती**— मागील अंकीं 'परिषद्वार्ते'तील १३ व्या ओळींत 'कलोपासक मंडळ, वेंगुर्लें' ही संस्था परिषदेशीं संलग्न करून घेतल्याचें प्रसिद्ध झालें आहे. वेंगुर्ल्याच्या 'कलोपासक मंडळ' ह्या संस्थांचें नांव चुकून छापलें गेलें. संलग्न केलेली संस्था 'अभिनव वाङ्मय मंडळ, वेंगुर्लें,' ही आहे.

## नवीन सभासद

**तहहयात**

लॉर्ड बिशप ऑफ बॉम्बे, मुंबअी
प्रो. स. रा. भट, बेळगांव
डॉ. के. सी. घारपुरे, पुणें

**साधारण**

श्री. प्रभाकर दगडू पुराणिक, अमळनेर
प्रो. पांडुरंग नारायण मोडक, सुरत
रा. सा. बाबूराव रामचंद्र रणसिंग, धुळें
डॉ. रामकृष्ण नारायण अष्टपुत्रे, धुळें
श्री. शंकर सावळाराम परांजपे ,,
,, भिवाजी अर्जुन परब, मुंबअी
,, ल. रा. मोडक, पुणें
,, नारायण गणेश गोरे, पुणें
,, वामन राधाकृष्ण, नवें गोरें
,, केशव त्र्यंबक दाते, पुणें

# संपादकीय

प्रस्तुत साठावा अंक हा 'पत्रिके'च्या चौदाव्या वर्षाचा शेवटचा अंक होय. तेराव्या वर्षापासून पत्रिकेचें संपादन मजकडे आलें; आणि आज माझ्या संपादकीय कारकीर्दीतील दुसऱ्या वर्षाचा हा अखेरचा अंक आहे.

पत्रिकेच्या संपादनाची जबाबदारी मजवर सोपवितांना पत्रिकेच्या स्वरूपांत कांही विशेष फरक घडवून आणण्याची कार्यकारी मंडळाची मजकडून अपेक्षा होती. पत्रिकेचें मूलभूत स्वरूप न बदलतां ती अधिक वाचनीय कशी करतां येईल या धोरणाने हा बदल घडवून आणावयाचा होता. आणि आज दोन वर्षांच्या पत्रिकेच्या अंकांबद्दल जे सुबुद्ध वाचकवर्गाचे अभिप्राय पडले आहेत, त्यांवरून पाहातां कार्यकारी मंडळाला अपेक्षित असा फरक पूर्णांशाने जरी साध्य झाला नसला, तरी संपादनाचें कार्य त्या मार्गावर आहे, असें समजण्यास हरकत दिसत नाही.

या मार्गावर येण्यास पत्रिकेचा संपादक या नात्याने मी केवळ निमित्त मात्र असून त्याचें सर्व श्रेय पत्रिकेच्या लेखनसाहाय्यकर्त्यांस आहे. पत्रिकेच्या अठावन्नाव्या अंकांतील "श्रि. स. १९४० चें सांवत्सरिक साहित्यसमालोचन" हें सदर अभिप्रायांतून विशेष उल्लेखिलें गेलें आहे. तसेंच पत्रिकेंत येणाऱ्या परीक्षणविभागाबाबतहि अनेक ठिकाणांहून समाधान व्यक्त करण्यांत आलेलें आहे.

सांवत्सरिक साहित्यसमालोचनाची कल्पना नवीन आहे, असें नाही. पण तें काम पार पाडणें तपशिलाच्या दृष्टीने बरेंचसें कठीण आहे. या कामांत येणाऱ्या व असलेल्या अडचणींचा उल्लेख मीं त्या अंकांतील 'संपादकीया'मध्ये केला होता व आता पुन्हा लवकरच पुढील वर्षासाठी तें काम सुरू करण्याची वेळ आली असल्यामुळे त्यांचा पुन्हा अेकदा उल्लेख करणें जरूर आहे.

या कामांतील मुख्य अडचण म्हणजे समालोचनाच्या वर्षांत प्रकाशित झालेली पुस्तकें किंवा त्यांचीं नांवेंहि मिळवण्यासंबंधाची आहे. सरकारी गॅझेट्सवर या बाबतींत सर्वस्वीं विसंबून राहतां येत नाही. या कामीं सहकार्याची जबाबदारी मुख्यतः लेखक व प्रकाशक यांच्यावर आहे. प्रकाशित पुस्तकांची परिपूर्ण व अधिकृत यादी नसतांना केलेलें समालोचन अपुरें व अनधिकृत स्वरूपाचें झालें तर त्यांत कांहीच नवल नाही, पण या अुणीवेची जाणीव असतांहि पत्रिकेने हें काम हातीं घेतलें याचें कारण केवळ "अकरणात् मन्दकरणं श्रेयः" अेवढेंच होय. समालोचनाचें काम तपशिलापुरतें तरी परिपूर्ण व्हावयाला पाहिजे असेल तर मराठींत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक पुस्तकाची साहित्यपरिषदेकडे नोंद होणें आवश्यक आहे व त्यासाठी प्रकाशक व लेखक यांनी आपल्या प्रत्येक प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकाची अेक प्रत परिषदेकडे पाठविल्याशिवाय, किंवा निदानपक्षीं आपलें अमुक नांवाचें, अमुक विषयावरील, अमुक किंमतीचें पुस्तक प्रसिद्ध झालें आहे, असें परिषदेच्या कचेरीकडे कळविल्याशिवाय तें शक्य होण्यासारखें नाही. याबाबत मीं समालोचन अंकांत प्रकाशकांना विनंती केली होती. परंतु अद्यापहि ती विशेषशी फलद्रूप झालेली दिसत नाही, म्हणून पुनः अेकवार तीच विनंती मी

येथे करीत आहें. पुस्तकें अभिप्रायाला पाठविल्यानंतर त्यांवर अनेक दिवस किंवा मुळींचहि अभिप्राय न येता तीं तशींच परिषदेच्या कचेरींत पडून राहतात, अशी लेखक व प्रकाशकयाची अेक तक्रार पुस्तकें अभिप्रायार्थ न पाठविण्याचे कारण म्हणून केलेली पूर्वी अैकण्यात येत असे; परंतु यासंबंधात अलीकडील व्यवस्थेत तक्रारीला जागा अुरलेली नाही, हें गेल्या दोन वर्षांतील परीक्षणविभाग पाहिले असतां आढळून येअील. परिषदेकडे अगदी अंक तयार होअीपर्यंत आलेल्या पुस्तकांचेंहि परीक्षण देण्याचा शक्यतोंवर प्रयत्न करण्यांत येतो. ज्या ग्रंथाच्या परीक्षणासाठी विशेष अभ्यासाची व अभ्यासकाची गरज असते, असा अेखादा महत्त्वाचा ग्रंथ अेखादवेळीं थोडासा अुशीराने विस्तृत रीतीने परीक्षिला जाअील, किंवा गेला असेल. पण अेकंदरींत परीक्षणविभाग शक्य तितका अद्यावत् करण्याचा प्रयत्न समीक्षकांकडून करण्यात येत असतो असेंच दिसून येअील. याशिवाय परीक्षणास आलेल्या पुस्तकांची ताबडतोब पोंच देण्यात येते ती वेगळीच. तेव्हा अशा परिस्थितींत लेखक-प्रकाशकाकडून जर पत्रिकेने अधिक सहकार्याची अपेक्षा केली तर ती चूक ठरेल काय ?

परीक्षण व समालोचनविभाग सांभाळणाऱ्या माझ्या समालोचक मित्राचे त्यांच्या निरपेक्ष लेखनसाहाय्याबद्दल कितीहि आभार मानले तरी ते अपुरेच ठरतील. समालोचकांचीं समालोचनासमवेत नावें यावींत कीं नाही हा प्रश्न मात्र अजूनहि विवाद्यच राहिला आहे. याबाबत प्रा दि. धों. कर्वे यांचें संपादकाना अेक पत्र आले असून त्यांत ते म्हणतातः– "परीक्षणें कोणीं केलीं हें गुप्त ठेवण्यात मुद्दा काय ? मी तर म्हणतो की परीक्षण अधिकारी व्यक्तीने केलें आहे, हें वाचकास जरूर कळावें. विशेषतः जूल ब्लॉग्च्यासारख्या महत्त्वाच्या पुस्तकाचें परीक्षण ज्या व्यक्तीने केले आहे, व ज्या परीक्षणात त्या व्यक्तीने स्वतःस प्रथमपुरुषी अनेकदा अुल्लेखलेले आहे, तिने परीक्षणाच्या शेवटीं आपले नाव न देणें किंवा संपादकाने तिचें नांव न छापणें हा अक्षम्य अपराध आहे. "Nature", "New Statesman and Nation" वगैरे सर्वमान्य नियतकालिकातील नामांकित टीकाकारानी (Literary Critique) केलेलीं परीक्षणें नेहेमी टीकाकारांच्या सहीने प्रसिद्ध होतात, व तेंच योग्य आहे. पत्रिकेत अुच्च दर्जाच्या व अधिकारी अशा परीक्षकाचीं परीक्षणें येतात हे कळणें जरूर आहे व तें परीक्षकाचीं नावें जाहीर केल्याखेरीज कळणार नाही. जेथे परीक्षक ग्रंथकाराशीं मतभेद जाहीर करून आग्रहाने आपलें मत मांडतो तेथे तर तो परीक्षक कोण आहे हें गुप्त ठेवणें चूकच आहे."

या प्रश्नावर प्रथम रत्नागिरी येथील साहित्यसंमेलनात चर्चा झाली, आणि व्यक्तिशः माझें मत अनामिक समालोचनाच्या विरुद्ध असतांहि अनेक सुज्ञाचा तसा आग्रह दिसला म्हणून प्रयोग या दृष्टीने समालोचकाच्या संमतीने अनामिक समीक्षणाची ही प्रथा मीं पत्रिकेंत सुरू केली आणि त्यासाठी याच्या अुलट मताच्या प्रा श्री. म. माटे याच्यासारख्या अेक दोन महत्त्वाच्या समीक्षकांच्या सहकार्याला पत्रिकेला मुकावेहि लागलें. प्रयोगदृष्टीने अनामिक समालोचनपद्धतीला आता पुरेसा अवसर देण्यात आलेला आहे व आता लेखकाचा नामोल्लेख असलेली परीक्षणें देअून काय होतें तें पाहावें असे मलाहि वाटतें; परंतु या संबंधात काय धोरण ठेवावयाचें ठरेल ते पुढील अंकात दिसेल; कारण त्यापूर्वी सध्याच्या माझ्या सर्व समालोचक मित्राची संमति आणि सल्ला घेणें मला आवश्यक आहे. जातां जातां जूल ब्लॉखूच्या पुस्तकाचें परीक्षण करणाऱ्या व्यक्तीने परीक्षणाच्या शेवटीं आपलें नांव दिलें होतें, परंतु तें न छापण्याचा अक्षम्य संपादकीय अपराध माझा आहे हें स्पष्ट करणें जरूर आहे.

वनस्पतिशास्त्रविषयक परिभाषा गेल्या अंकीं देण्यात आली होती तीबाबत याच पत्रात प्रा. कर्वे यांनी, "तींतील शब्द वर्णानुक्रमें दिलें नसल्यामुळे त्याचें निम्मे महत्त्व कमी झालें आहे. अमुक अेका अिंग्रजी शब्दाला मराठी पारिभाषिक शब्द काय हें पाहावयाचें कसें ? सर्व परिभाषा प्रारंभापासून अखेरपर्यंत पाहावयाची कीं काय ?" असा आक्षेप घेतला असून "तरी ही परिभाषा शक्य तर वर्णानुक्रमें परत छापावी" अशी सूचना केली आहे. यावर परिभाषामंडळाचे चिटणीस श्री. त्र्यं. गो. ढवळे यानी खुलासा केला आहे तो असा — "औद्भिदशास्त्राची परिभाषा अद्याप अपुरी आहे. फक्त अेकाच विभागाची–'External Morphology" ची परिभाषा तयार झालेली आहे. बाकीचे विभाग व्हावयाचे आहेत. ते झाल्यानंतर सर्व औद्भिदपरिभाषा अकारविल्हाने द्यावी. तत्पूर्वी ती प्रकरणवारीने दिल्यासच त्या त्या शब्दाचे मर्म समजण्याला अुपयोग होअील असें अेकंदर सभासदाचे मत पडल्यावरून त्याप्रमाणे ती छापलेली आहे." असो.

या अंकीं प्रा. गं. बा. सरदार याची "महाराष्ट्राचे अुपेक्षित मानकरी" ही चरित्रलेखमाला विष्णुशास्त्री पंडित याच्या चरित्रलेखाने पुरी होत आहे; व लवकरच ती ग्रंथरूपाने प्रकाशित होअील. या लेखमालेतील शेवटचा अुपसंहारात्मक लेख पुढील अंकी देण्यात येअील. तसेंच श्री. बा. सी. मर्ढेकर याच्या ARTS and MAN या पुस्तकाच्या भाषांतरातील शेवटचा लेखांक पुढील अंकीं येअून तो ग्रंथहि समाप्त होअील. यावरून व पत्रिकेत आलेली श्री. ग. वा. तगारे याची "राष्ट्रकूटकालीन मराठी"वरील ही लेखनमाला, श्री. त्र्यं. गो. ढवळे व प्रा. स. वि. आपटे याचे शास्त्रीय परिभाषाविषयक लेख, श्री. गो. कृ. मोडक याची व्युत्पत्तिविषयक टिपणे, कु. अनसूया भागवत याचे 'जात्यावरील ओव्यावरील लेख, श्री. य. रा. दाते व प्रा. वाडेकर याचे अखिल भारतीय शास्त्रीय परिभाषेबद्दलचे लेख, प्रो. पोतदार यानी 'जीवनाला वळण लावणारे वाङ्मय' हा त्यांच्या अेका भाषणावरून तयार केलेला निबंध, अित्यादि चर्चात्मक व संशोधनात्मक निबंधावरून परीक्षणाव्यतिरिक्त अितरहि विचारप्रवर्तक लिखाणाला भरपूर अवसर दिलेला आहे हे दिसून येअील. पत्रिकेला अशाप्रकारच्या वैचारिक महत्त्वाच्या लेखांनी भारदस्तपणा आणण्याला मदत करणाऱ्या त्या व अितर सर्व लेखकाचा मी अत्यंत आभारी आहें व त्यांनी आपली ही मदत अशीच पुढे चालू ठेवून मला अुपकृत करावें, अशी माझी त्याना आग्रहाची नम्र विनंती आहे.

ज्या विद्वानाना मीं लेखनसाहाय्याची विनंती केली परंतु कार्यबाहुल्यामुळे ज्याना ती पुरी करण्यास आतापर्यंत अवसर मिळाला नाही, त्याचेहि त्यांच्या मदतीच्या आश्वासनाबद्दल मी आभार मानतों व माझ्या संपादकीय कारकीर्दीच्या अुरलेल्या अेका वर्षांत आपलीं आश्वासनें पुरीं करून ते मला ऋणाअीत करतील अशी मी आशा बाळगतों.

के. नारायण काळे

## संलग्नसंस्था वृत्त

**मुंबअी मराठी ग्रंथसंग्रहालय—**

या संस्थेचा ४२ वा वार्षिक वृत्तान्त प्रसिद्ध झाला आहे. गतवर्षी समासदांची संख्या ८२ ने वाढली. संस्थेचे नवीन अुपक्रम म्हणजे स्त्रियांचें मोफत वाचनालय व फिरतें वाचनालय हे आता बहुतेक कायमचेच झाले आहे. संस्थेने दादर येथे नवीन शाखा अुघडली आहे. मायमाषेची बहुमोल सेवा करणाऱ्या या संस्थेचा अधिकाधिक अुत्कर्ष होत आहे हें पाहून समाधान वाटतें.

**डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्सलेशन सोसायटी—**

या संस्थेचा ४७ वा वार्षिक अहवाल आला आहे. वृत्तान्तवर्षी २८ ग्रंथकर्त्यांना बक्षिसें देण्यांत आलीं.

---

## अनिष्ट लेखन समालोचन समिति

सोलापूर साहित्यसंमेलनाचे ठरावान्वये महाराष्ट्र साहित्य परिषदेने ता. २०-७-४१ रोजीं पुढील समासदांची 'अनिष्ट लेखन समालोचन समिति' नेमिली :—

श्री. वि. स. खांडेकर, अध्यक्ष.
प्रो. वा. म. जोशी, समासद.
,, द. वा. पोतदार, ,,
श्री. चिं. ग. कर्वे, ,,
,, कृ. गो. मराठे, आमंत्रक.

सदर समितीच्या ता. २२-८-४१ व ता. २३-९-४१ रोजीं अशा दोन बैठकी झाल्या. त्या बैठकींमध्ये या समितीचें अधिकारक्षेत्र, नियतकालिकांत छापल्या जाणाऱ्या अिष्ट व अनिष्ट लेखनाच्या मर्यादा, परीक्षणाची व मार्गदर्शनाची योजना अित्यादि बाबींचा विचार झाला. काही लेखनाचीं कात्रणें समितीपुढे मांडण्यांत आलीं व त्यांच्या अिष्टानिष्टतेबद्दल विचार चालू आहे.

**कृ. गो. मराठे**
आमंत्रक, अनिष्ट लेखन समालोचन समिति

---

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिकेचीं पहिलीं बारा वर्षें

अर्थात्

## पत्रिकेच्या अंकांचीं वर्षशः बांधलेलीं बारा पुस्तकें

दर पुस्तकांत अभिप्राय, अैतिहासिक, चरित्रें, निबंध, पुस्तकपरीक्षण, भाषिक शंकाचर्चा, सामाजिक, अित्यादि विषयांवर सदरें असून, सर्व मिळून महाराष्ट्र-भाषा, वाङ्मय, समाज, अितिहास यांसारख्या विविध क्षेत्रांतील नवीन विद्वत्ताप्रचुर विचार आणि माहिती मिळणार आहे.

**किंमत** — सुंदर कापडी बांधणी विषयसूचीसह दर वर्षाच्या पुस्तकास ४ रुपये, परिषदेच्या सभासदांस २ रु.; ट. ख. निराळा.

**वि. सू.** — तेराव्या वर्षाच्या पुस्तकाच्याहि बांधीव प्रती तयार आहेत, परंतु या प्रत्येक प्रतीस सभासदांसहि ४ रुपये पडतील; ट.ख. निराळा.

---

## ‘मराठी भाषेचा व वाङ्मयाचा अितिहास’

### महानुभावअखेर

लेखक — कै. **बाळकृष्ण अनंत भिडे**, आकार — रॉयल अष्टपत्री, पृष्ठें — १२५. अुत्तम बांधणी. किंमत फक्त अेक रुपया. परिषदेच्या सभासदांस बारा आणे; ट. ख. वेगळा.

विशेष माहितीसाठी लिहा :—

चिटणीस,
म. सा. परिषद्, टिळक रस्ता, पुणें २



---

आर्यसंस्कृति मुद्रणालय, चिमणबाग, टिळक रस्ता, पुणें, येथे लक्ष्मण नारायण चापेकर यांनी छापिलें व पुणें येथे महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या कार्यालयांत परिषदेकरिता वामन मल्हार जोशी यांनी प्रसिद्ध केलें.